# मराठी वाङ्मयाचा इतिहास

## खंड चौथा

इ. स. १८०० ते १८७४ या कालखंडातील
मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास

संपादक

प्रा. रा. श्री. जोग. एम्. ए.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ पुरस्कृत
पहिली आवृत्ती : १९६५
दुसरी आवृत्ती : १९७३
मुद्रक : मो. स. लाटकर, श्रीसरस्वती मुद्रणालय, भोसरी, पुणे २६.
प्रकाशक : डॉ. भीमराव कुलकर्णी, कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०
मुखपृष्ठ व आतील चित्रे यांचे मुद्रण : बालोद्यान प्रेस, पुणे
रेखाचित्रे : चित्रकार ओके : मुखपृष्ठ : चित्रकार सुभाष अवचट
मूल्य तीस रुपये

महाराष्ट्र साहित्य परिषद
वाङ्मयेतिहास समिती ( १९७०-७३ )

डॉ. **रा. शं. वाळिंबे** ( अध्यक्ष )
**श्री. रा. ज. देशमुख,**
डॉ. **वि. म. कुलकर्णी,**
डॉ. **भीमराव कुलकर्णी** ( निमंत्रित )

# दुसऱ्या आवृत्तीचे निवेदन

ह्या खंडाची पहिली आवृत्ती इ. स. १९६५ मध्ये प्रकाशित झाली. ती चार-पाच वर्षांतच संपली आणि गेली दोन वर्षे उपलब्ध नव्हती. म्हणून ही दुसरी आवृत्ती खंड ३ व खंड ५ यांच्या पहिल्या आवत्तीबरोबर प्रसिद्ध होत आहे. पहिली आवृत्ती अपेक्षेपेक्षा थोड्या कालावधीत संपली, यावरून तिने अभ्यासकांची गरज भागवली, असे अनुमान करावयास प्रत्यवाय नाही.

ह्या दुसऱ्या आवृत्तीत पहिलीमधील मजकुरात काही किरकोळ दुरुस्ती-पुस्तीशिवाय इतर काही फारसा बदल केलेला नाही. तथापि, प्राचीन परंपरेतील तत्त्वविवेचनात्मक काव्याचा परामर्श घेणारे एक प्रकरण ( लेखक डॉ. वि. रा. करंदीकर ) नव्याने घातले आहे, याचा निर्देश येथे करावयास पाहिजे. मूळ कल्पनेप्रमाणे हा भाग प्राचीन परंपरेशी निगडीत असल्याने मागील म्हणजे तिसऱ्या खंडातच तो समाविष्ट व्हावयाचा होता, पण त्यामुळे त्या खंडाचा तोल बिघडण्याचा संभव वाटला शिवाय १९ व्या शतकात निर्माण झालेले हंसराज, निरंजन रघुनाथ, नारायणमहाराज जालवणकर इत्यादी कवींचे हे जे वाङ्मय आहे, त्याकरिता अभ्यासक या खंडातच शोध घेऊ लागले. म्हणून तद्विषयक हे प्रकरण या खंडातच समाविष्ट केले आहे. तसेच या खंडातील सारी चित्रे नव्याने चित्रकार ओके यांजकडून काढून घेतली आहेत. पहिल्या आवृत्तीपेक्षा या आवृत्तीतील चित्रसंख्या अधिक आहे आणि अनेक दुर्मिळ छायाचित्रे मिळवून ती आकर्षक स्वरूपात छापण्यात आली आहेत.

खंडाच्या बाह्यरूपामध्ये मोठा फरक झालेला दिसेल. काही व्यावहारिक कारणांमुळे या समग्र इतिहासाचे मुद्रण निराळ्या आकारात करणे इष्ट आणि आवश्यक वाटू लागले. त्यामुळे सूचीही सर्व बदलून घ्यावी लागली. हा आकार हातात वागविण्याच्या दृष्टीनेही सोयीचा होईल अशी आशा आहे.

हे सारे करिताना मूळ लेखकांचे, परिषदेच्या इतिहास-समितीचे आणि परिषद कार्यालयाचे फार साहाय्य झाले आहे. त्यांचे येथे आभार मानणे मी आपले कर्तव्य मानतो.

रा. श्री. जोग
संपादक

१ जानेवारी १९७३

## कार्याध्यक्षांचे निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने नियुक्त केलेल्या वाङ्मयेतिहास समितीने पतकरलेली जबाबदारी आज बहुतांशी पूर्ण केली आहे. बरेच दिवस उपलब्ध नसलेल्या चवथ्या खंडाचे पुनर्मुद्रण केले, तिसरा खंड सिद्ध केला, आणि पाचव्या खंडाचे दोन भागही तयार केले.

चवथा खंड पूर्वी ज्या आकारात छापला होता तो आकार पुनर्मुद्रण करताना बदलला आहे. सर्वसामान्य वाचकांच्या आणि विशेषतः विद्यार्थ्यांच्या सोयीच्या दृष्टीनेच आकारात हा बदल केला आहे.

वाङ्मयेतिहास समितीने वर उल्लेखिलेले सर्व खंड निरनिराळ्या अधिकारी तज्ज्ञांकडे पाठविले आणि ते त्यांच्याकडून तपासून घेतले. या तज्ज्ञांकडून ज्या सूचना आल्या त्या संपादकांकडे पाठविल्या. या सूचनांपैकी ज्या सूचना संपादकांना स्वीकार्य वाटल्या त्यांचा त्यांनी स्वतःच्या अधिकारात स्वीकार केला.

या खंडांच्या प्रसिद्धीला अपेक्षेपेक्षा अधिक विलंब झाला हे खरे आहे. या विलंबाला जी कारणे झाली त्यांच्यापैकी काहींचा येथे निर्देश करतो. ज्या लेखकांकडे विषय सोपविले होते त्यांच्यापैकी काही लेखकांनी अनेक वर्षे मुदत मिळूनही आपले लेख तयार केले नाहीत. ते अन्य लेखकांकडे सोपवावे, असे वाङ्मयेतिहास समितीला वाटू लागले, परंतु संपादकांना त्याच लेखकांनी हे काम पुरे करावे, असे वाटत असल्यामुळे त्यांनीही त्या दृष्टीने निकराचे प्रयत्न केले. शेवटी नाईलाजास्तव त्यांनी

वाङ्मयेतिहास समितीला नव्या अधिकारी लेखकांकडून दीर्घ काळ रेंगाळलेले हे काम पुरे करून घेण्यास संमती दिली व त्यांनी स्वतःही त्या बाबतीतील बरीच जबाबदारी स्वीकारली.

यानंतर वाङ्मयेतिहास समितीने व संपादकांनी संयुक्त रीत्या तातडीने पुष्कळ परिश्रम केले. यामुळे पूर्वीचे लेखक बदलून त्यांचे काम नव्या लेखकांकडे देण्यात आले. अधिक विलंब होऊ नये म्हणून काही काम संपादकांनीसुद्धा केले. अनेक व्यासंगी विद्वानांच्या, संशोधकांच्या, समीक्षकांच्या दीर्घ प्रयत्नातून हे खंड सिद्ध होत आहेत, याचा मोठा आनंद वाटतो.

दुसऱ्या खंडाचे संपादक म्हणून डॉ. स. गं. मालशे यांची नियुक्ती झाली आहे. प्रा. नरहर कुरुंदकर यांनी सहाव्या खंडाच्या संपादनाची जबाबदारी स्वीकारली आहे. प्रा. कुरुंदकरांनी आपले काम जवळ जवळ पुरे करीत आणले आहे. डॉ. मालशे यांनी कामाला आरंभ केला आहे.

पहिला खंड आणि सातवा खंड या दोन खंडांच्या बाबतीत मात्र म्हणावी तशी प्रगती झाली नाही. तरीही येत्या काही दिवसांत या खंडांचे काम मार्गी लावण्याच्या दृष्टीने समितीने इष्ट ती पावले टाकली आहेत.

चवथ्या खंडाच्या पुनर्मुद्रणाला साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले नाही. यामुळे पूर्वीप्रमाणे कमी किंमत ठेवणे शक्य झाले नाही. तिसऱ्या आणि पाचव्या खंडांसाठी साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले. पण ते नेहमी प्रमाणे ७५ टक्के न मिळता फक्त २५ टक्के मिळाले. त्यामुळे बऱ्याच नव्या अडचणी निर्माण झाल्या. परंतु नाउमेद न होता परिषदेने हे काम तितक्याच निष्ठेने पुढे चालू ठेवले आहे. यामुळे या दोन्ही खंडांच्या किंमती जास्त ठेवणे भाग पडले.

साहित्य संस्कृती मंडळाच्या सक्रिय प्रेरणेनेच परिषदेने हे काम अंगीकारलेले आहे. सध्याच्या बिकट परिस्थितीमुळे इच्छा असूनही मंडळास अधिक अनुदान देता आले नाही याची परिषदेस जाणीव आहे. झालेल्या कामात साहित्य संस्कृती मंडळाच्या प्रेरणेचा मोठाच वाटा आहे. आगामी खंडांसाठी मंडळाकडून पूर्वीप्रमाणेच अनुदान मिळेल, यात मला शंका वाटत नाही.

या खंडांच्या सिद्धतेसाठी साहित्य संस्कृती मंडळाच्या अनुदानाखेरीज मराठवाडा विद्यापीठाने पाचशे रुपयांचे अनुदान दिले याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो. मुंबई विद्यापीठाकडे आणि पुणे विद्यापीठाकडे अनुदानासाठी मागणी केली आहे. शिवाजी विद्यापीठाने नकार दिला आहे.

श्री. नीळकंठ खाडिलकर, प्रा. अ. म. जोशी, डॉ. प. ल. वैद्य, श्री. ग. म. आपटे यांनीही या कार्यासाठी देणग्या दिल्या आहेत. त्यांचे आभार.

सरकारी ग्रंथालय खात्याचे प्रमुख श्री. कृ. द. पुराणिक यांनी सदर कार्याकडे

नेहमीच सहानुभूतीने पाहिले. हे कार्य अतिशय महत्त्वाचे असून ते शक्य तितक्या लवकर पुरे व्हावे, ही त्यांची धारणा. त्यामुळे प्रसिद्ध झालेल्या खंडांचे काही संच खरेदी करण्याचे त्यांनी आश्वासन दिले आहे. त्यांचेही आभार.

चवथा खंड, तिसरा खंड आणि पाचवा खंड या तीनही खंडांच्या संपादनाची सारी जबाबदारी प्रा. रा. श्री. जोग यांनी पत्करली, आणि प्रकृतीच्या अस्वास्थ्याचा सतत त्रास होत असूनही त्यानी सर्व जबाबदारी उत्कृष्टपणे पार पाडली, याबद्दल त्यांचे आभार जितके मानावेत तितके थोडेच आहेत. आणखी एक संस्मरणीय गोष्ट म्हणजे प्रा. जोगांनी वाङ्मयेतिहासाच्या कार्याला पाच हजार रुपये अनुदान देऊन साहित्य परिषदेला कायमचे उपकृत करून ठेवले आहे. केवळ मिळणारे मानधन कमी आहे या सबबीवर कालहरण करणाऱ्या काही विद्वानांच्या तुलनेने प्रा. जोगांचे हे ऋण विशेष मोलाचे वाटते.

वाङ्मयेतिहासाची योजना एकंदरीत फार खर्चाची असल्यामुळे द्रव्याच्या मदतीसाठी आम्ही दानशूर व सधन लोकांना आवाहन केले आहे.

वाङ्मयेतिहास समितीच्या सर्व सभासदांचे उत्कृष्ट सहकार्य लाभले म्हणूनच सारी कामे सुकर होत गेली. श्री. रा. ज देशमुख यानी वाङ्मयेतिहास समितीचे सभासद या नात्याने जे मोलाचे कार्य केले त्याला खरोखरच तोड नाही. समितीच्या यशामध्ये श्री. देशमुख यांचा वाटा फार मोठा आहे. ते समितीचे सभासद होते म्हणूनच अनेक अशक्य वाटणाऱ्या गोष्टी शक्यतेच्या कोटीत आल्या. समितीच्या कामासाठी त्यांनी किती वेळ खर्च केला असेल याला सीमा नाही. मी त्यांना वेळोवेळी समितीच्या कामासाठी जो त्रास दिला तो आनंदाने सोसला. परिषदेच्या इतिहासात त्यांनी केलेले कार्य उल्लेखनीय आहे.

या तीन खंडांच्या सिद्धतेसाठी वाङ्मयेतिहास समितीच्या गेल्या तीन वर्षांत एकूण एकोणीस सभा झाल्या. परिषदेचे चिटणीस डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्यावर अनेक महत्त्वाच्या कामांची जबाबदारी असली तरी वाङ्मयेतिहास समितीच्या बहुतेक सर्व सभांमध्ये ते उपस्थित राहिले आणि अनेक प्रकारांनी त्यांनी समितीला फार मोलाची मदत केली. परिषदेचे खनिजदार श्री. अनंतराव कुलकर्णी हे समितीचे सभासद नव्हते. तथापि वाङ्मयेतिहासाच्या योजनेत त्यांनी आस्थेने व अगत्याने लक्ष घातले व व्यवहाराच्या दृष्टीने त्यांनी वेळोवेळी महत्त्वाचा सल्ला दिला. 'आर्थिक अडचणींमुळे वाङ्मयेतिहासाचे कार्य कधीच अडू देणार नाही' या त्यांच्या आश्वासनामुळे कार्य करण्यास आम्हाला फार मोठा उत्साह प्राप्त झाला. काही वेळा नियुक्त मुद्रित-संशोधकांनी वेळेवर मुद्रिते तपासून दिली नाहीत. परंतु आपली हातातली महत्त्वाची कामे दूर ठेवून समितीच्या काही सभासदांनीं मुद्रिते पाहिली हे नमूद करणे माझे कर्तव्य आहे. मुद्रितशोधक श्री. मु. शं. देशपांडे यांचीही याबाबत फार मदत झाली.

श्रीसरस्वती मुद्रणालयाने संपूर्ण चवथ्या खंडाचे आणि पाचव्या खंडाच्या पहिल्या

भागाचे मुद्रण केले. या मुद्रणालयाकडून आम्ही फारच तातडीने मुद्रण करून घेतले. साधना छापखान्याने पाचव्या खंडाच्या दुसऱ्या भागाचे मुद्रण केले. संगम प्रेसने संपूर्ण तिसरा खंड छापला, व त्यांनीही मोठ्या तडफेने व तातडीने काम पुरे केले.

साहित्य परिषदेचे लेखनिक श्री. जि. व्यं. देशपांडे आणि शिपाई राजाराम बात्रलेकर यांनीही खूप परिश्रम केले हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

साहित्य परिषदेचे हे कार्य फार मोठे आणि मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने मौलिक व चिरस्थायी आहे. या कामात अनेकांचे अनेक प्रकारे साहाय्य घ्यावे लागले. ते सारेच परिषदेचे ऋणानुबंधी असल्याने आभाराची उपचाराची भाषा मी वापरीत नाही.

**(रा. शं. वाळिंबे)**
कार्याध्यक्ष.

१ जानेवारी १९७३

# पहिल्या आवृत्तीचे संपादकीय निवेदन

सुमारे सतरा-अठरा वर्षांपूर्वी, म्हणजे १९४६/४७ या वर्षांत केव्हातरी महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे एका अगदी अनपेक्षित दिशेकडून मराठी वाङ्मयाचे इतिहासाकरिता देणगी देण्याची इच्छा व्यक्त करण्यात आली. त्यावेळी येथील नवरोसजी वाडिया कॉलेजमध्ये गणिताचे प्राध्यापक असलेले श्री. श्री. भि. बोंडाळे यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेने वाङ्मयाचा इतिहास सिद्ध करावा याकरिता पाचशे रुपयांची देणगी दिली आणि आणखी आणखी आर्थिक साहाय्य मिळवून देण्याची तयारी दर्शविली. समग्र मराठी वाङ्मयाचा इतिहास सिद्ध करण्याच्या दृष्टीने ही देणगी अगदी अपर्याप्त असली, तरी त्या कल्पनेला या देणगीने प्रथम चालना मिळाली यात काही शंका नाही. ही कल्पना अंकुरावस्थेत असताना अशा इतिहासाची अवश्यकता आणि व्यवहार्यता कितपत आहे हे अजमावण्याच्या दृष्टीने म. सा. परिषदेच्या तत्कालीन कार्यकर्त्यांनी अनेक लेखक, साहित्यिक यांच्याकडून या प्रकरणी मते मागविली. त्या मतांच्या मंथनातून असे निष्पन्न झाले की आवश्यक तेवढी माहिती व साधने आणि एतद्विषयक संशोधन या दृष्टींनी असावी तेवढी अनुकूलता आज नसली, तरी आहे तेवढ्या माहितीच्या आणि उपलब्ध साधनांच्या आधारे असा इतिहास लिहिला जाणे हे इष्ट आणि उपयुक्त होईल. मराठी वाङ्मयभक्तांचे आणि वाङ्मयसेवकांचे हे मत लक्षात घेऊन परिषदेचे त्या वेळचे कार्याध्यक्ष प्रा. श्री. म. माटे यांनी ही योजना हाती घेऊन धडाडीने कामास प्रारंभ केला. त्याकरिता आर्थिक साहाय्यही मिळविण्यास आरंभ केला. आणि तेव्हापासून

या योजनेच्या कार्यवाहीस सुरुवात झाली. त्यांनी कल्पिलेल्या एकादश-खंडात्मक योजने-विषयी मध्यंतरी मतभेद निमाण होऊन १९५३ मध्ये ती सप्तखंडात्मक करण्याचे म. सा. परिषदेने ठरविले. या सप्तखंडात्मक योजनेचा तपशीलवार आराखडा १९५५ मध्ये संमत होऊन १९५६ च्या प्रारंभी खंडसंपादकांनी लेखनास प्रारंभ करावा असा आदेश परिषदेकडून त्यांना देण्यात आला. तथापि पुढील चार वर्षांत इतिहासाची रचना प्रत्यक्षात कोणाकडूनही उतरण्याची चिन्हे दिसेनात. या परिस्थितीचा उल्लेख ठाणे येथील साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात परिषदेच्या कार्यकर्त्यांच्या संमतीने अत्यंत निरुपायाने मी केला. त्यानंतर अंगीकृत केलेले कार्य आणि त्याकरिता म्हणून स्वीकारलेले आर्थिक साहाय्य याविषयीच्या तीव्र जाणिवेमुळे त्या विषयीची सर्व जबाब-दारी परिषदेने पुन्हा आपल्याकडे घेतली, आणि १९६० च्या उत्तरार्धात परिषदेच्या कार्यकारिणीने "वाङ्मयेतिहास योजनेच्या कार्यवाहीचा सर्वाधिकार" मजकडे सोपविला, व मला ते काम करण्याची आज्ञा केली. संमेलनाध्यक्षीय भाषणामधून यासंबंधी प्रकट केलेल्या विचारांमुळे, या प्रकरणात आधीची दहा वर्षे मी दूर राहिलो असताही, हे काम स्वीकारावे लागले. आज या इतिहासाचा पहिला भाग, म्हणजे चौथा खंड प्रकाशित होत आहे. या खंडाच्या सिद्धीलाही अपेक्षेपेक्षा अधिक काल लागला आहे. तथापि अकरणान्मन्दकरणं श्रेयः या बुद्धीने हे काम केले आहे.

हा चौथा खंडच प्रथम हाती घेण्याचे एक कारण असे की इतर खंडापेक्षा या खंडाविषयी, एक दोन लहान पुस्तके सोडल्यास, विशेष वाङ्मय उपलब्ध नव्हते. त्यामुळे अध्ययन आणि अध्यापन करण्यात संबंधितांची फार कुचंबणा होई. दुसरे असे की, या कालखंडामध्ये मुद्रित आणि प्रकाशित झालेले वाङ्मय दुर्मिळ झाले असून हळु हळू नष्ट होण्याच्या मार्गास लागले आहे. आणि ते पुन्हा प्रकाशित होण्याची फारशी आशा दिसत नाही. इतर कालखंडांमधील ग्रंथकार आणि वाङ्मय यांजविषयी बरेच संशोधन, लेखन व प्रकाशन चालू आहे. प्रस्तुत खंडाच्या प्रकाशनाने या विषयींची अडचण आणि कुचंबणा बऱ्याच अंशी दूर होईल अशी कल्पना आहे.

वाङ्मयेतिहासाचे स्वरूप काय असावे याविषयी अनेक मतमतांतरे आहेत, हे सांगावयास पाहिजे असे नाही. परंतु झालेल्या वाङ्मयाचा यथार्थ परिचय वाचकास करून देणे हे त्याचे प्रमुख अंग आहे या विषयी दुमत होऊ नये. कोणत्याही वाङ्मयाचा अभ्यास अनेक हेतूंनी आणि अनेक दृष्टींनी करता येतो; पण तो करावयालाही त्या वाङ्मयाचे स्थूल स्वरूप तरी यथार्थपणे माहीत असावे लागते. ते परिचित करून द्यावे ही दृष्टी या खंडांच्या लेखनामध्ये प्राधान्याने डोळ्यापुढे टेविला होती. हे करत असताना अर्थात त्या कालातील सामाजिक आणि राजकीय परिस्थिती कोणत्या प्रकारची होती, त्या वाङ्मयाच्या मागील आणि पुढील वाङ्मयास कोणत्या प्रकारचा अनुबंध होता इत्यादी विषयांसंबंधीचे काही विवेचन यावे हे क्रमप्राप्तच होते. प्रस्तुत कालखंडातील विविध वाङ्मयप्रकाराचा परिचय करून देतान हेही करण्याचा प्रयत्न झाला आहे हे वाचकांच्या लक्षात येण्या-

सारखे आहे. ग्रंथकारांच्या चरित्रनिवेदनास विशेष महत्त्व न देता त्यांच्या चरित्राविषयीची आवश्यक एवढीच माहिती तळटीपांच्या स्वरूपात दिली आहे. लेखकांच्यापेक्षा त्यांच्या वाङ्मयाचा परिचय अधिक करून द्यावा ही दृष्टी ठेवलेली असल्याने आज दुर्मिळ होत चाललेल्या किंवा झालेल्या वाङ्मयातून बरेच उतारे देण्यात आले आहेत, हे अभ्यासकांच्या लक्षात येईल. इतिहासात प्रत्येक लहानसहान पुस्तकाचा परिचय झाला पाहिजे असेही म्हणता येणार नाही; कारण इतिहास म्हणजे कोश नव्हे, किंवा ग्रंथसूचीही नव्हे. आजच्या वाङ्मयेतिहास जाणू इच्छिणाऱ्या वाचकांची गरज शक्यतो लक्षात घेऊन या इतिहासाची मांडणी करण्यात आली आहे. यापेक्षा अधिक खुलासा करण्याची आवश्यकता दिसत नाही.

वाङ्मयेतिहासाच्या सिद्धीबाबत मला एकट्याला सर्वाधिकार देऊन म. सा. परिषदेने मजवर जो विश्वास टाकला, त्याबद्दल मी तिचा फार आभारी आहे. तथापि अशा कामात आणखीही जाणत्या लोकांचे साह्य असणे वे केव्हाही इष्टच असते. म्हणून मी होऊन परिषदेकडे मला सल्ला देण्यासाठी आणि माझ्या जबाबदारीत भाग घेण्यासाठी एका सल्लागार समितीची मागणी केली. म. सा. परिषदेने श्री. श्री. के. क्षीरसागर, श्री गं. बा. सरदार आणि श्री. दि. के. बेडेकर यांची या समितीचे सभासद म्हणून नियुक्ती केली. या समितीने वेळोवेळी मला तत्परतेने सल्ला दिल्याबद्दल मी या समितीचा मनःपूर्वक आभारी आहे. समितीच्या सभासदांप्रमाणे परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी आणि तिच्या कार्यालयाने मला जे सहकार्य सतत दिले, त्याबद्दल येथे अवश्य उल्लेख करावयास हवा. लेखनाच्या कामात माझे सहकारी लेखक माझ्या इतकेच, किंबहुना अधिक प्रमाणात सहभागी आहेत. त्यांनी मनःपूर्वक केलेल्या सहकार्याचा उल्लेख केल्याविना हे निवेदन संपविता येत नाही.

शेवटी या कामात राहिलेल्या उणीवांची जाणीव ठेवूनही मागणे असे की—

“ केली - झाली जशी, तशी ही सेवा;
काहीही म्हणा, परि स्मरूनी नेकी ! ”

**रा. श्री. जोग**
संपादक

जून १९६५

## लेखक--परिचय

१. रामचंद्र श्रीपाद जोग, जन्म १९०३, एम्. ए. ( मुंबई विद्यापीठ ); निवृत्त प्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेज, पुणे; अभिनव-काव्यप्रकाश, सौंदर्यशोध आणि आनंदबोध इ. ग्रंथांचे लेखक.

२. भवानीशंकर श्रीधर पंडित, जन्म १९०६; एम्. ए. ( नागपूर विद्यापीठ ); निवृत्त प्राध्यापक, हिस्लॉप व मॉरिस कॉलेज, नागपूर; माजी मराठी-विभाग-प्रमुख, नागपूर विद्यापीठ; आधुनिक मराठी कविता, केशवसुत-पाच चिंतनिका, आधुनिक काव्याचे प्रणेते इत्यादी ग्रंथांचे लेखक; उन्मेष--आणि उद्रेक, रस आणि सुवास इ. काव्यसंग्रहांचे कर्ते; समग्र केशवसुत इ. चे संपादक ; कबीर-वचनावलीचे भाषांतरकर्ते.

३. गोविंद मल्हार कुलकर्णी, जन्म १९१४; एम्. ए. ( मुंबई विद्यापीठ ); मराठीचे प्राध्यापक, विजापूर; खंडन-मंडन, रसग्रहण-कला व स्वरूप या ग्रंथांचे लेखक; प्राची ( काव्यसंग्रह ), स्फुट स्वरूपाचे बरेच महत्त्वाचे टीकालेखन.

४. विश्वनाथ विठ्ठल पटवर्धन, जन्म १९१५; एम्. ए. ( मराठी व हिंदी ), पीएच्. डी. पुणे विद्यापीठ; सांप्रत गरवारे कॉलेजमध्ये मराठी विभाग-प्रमुख; स्वातंत्र्यसमर ( सावरकर ) आणि कामायनी ( जयशंकर प्रसाद ) यांचे भाषांतरकर्ते; डॉक्टरेट-प्रबंध 'वाङ्मयीन संकेत ( जुने व नवे )' ( अप्रकाशित. )

५. कृष्ण भिकाजी कुलकर्णी, जन्म १९१७; एम्. ए; बी टी. पीएच् डी; ( मुंबई विद्यापीठ ); सांप्रत मराठी-विभाग-प्रमुख, मथुरादास विसनजी कॉलेज, अंधेरी; डॉक्टरेट-

प्रबंध 'एकोणीसाव्या शतकातील शालेय वाङ्मय आणि त्याचा मराठी भाषेवर झालेला परिणाम'. ( प्रकाशित )

६. विनायक रामचंद्र करंदीकर, जन्म १९१९; एम्. ए. पीएच्, डी. ( पुणे विद्यापीठ ), सांप्रत मराठी विभाग-प्रमुख, फर्ग्युसन कॉलेज, पुणे; पीएच्. डी चा प्रबंध 'वामनपंडितांची यथार्थ-दीपिका' ( प्रकाशित ).

७. लक्ष्मण महादेव भिंगारे, जन्म १९२०; एम्. ए. पीएच्, डी. (मुंबई विद्यापीठ ); सांप्रत- ' माधवनगर; येथील महाविद्यालयात मराठी विभाग-प्रमुख—डॉक्टरेट प्रबंध – 'हरिभाऊ' ( प्रकाशित ).

८. दत्तात्रय भिकाजी कुलकर्णी, जन्म १९३४; एम. ए. पीएच्. डी. (नागपूर); सांप्रत-मराठी पदव्युत्तर विभागात प्राध्यापक, नागपूर विद्यापीठ; डॉक्टरेट प्रबंध-महाकाव्य विषयक; ( अप्रकाशित ) मराठी नियतकालिकांतून विपुल टीका लेखन.

९. संपादकीय साहाय्यक : चंद्रशेखर शंकर बर्वे, जन्म १९३८; एम. ए.( पुणे विद्यापीठ ); सांप्रत स. प. महाविद्यालय, पुणे येथे प्राध्यापक; मराठीच्या महत्त्वाच्या मासिकांतून समीक्षात्मक लेखन.

## अनुक्रमणिका

## प्रकरण पहिले

# प्रास्ताविक

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या प्रस्तुत खंडात विचाराकरिता घेतलेला कालखंड हा इ. स. १८०० ते १८७४ असा आहे. या कालखंडाच्या पूर्वोत्तरमर्यादा ठरविताना डोळ्यांपुढे असणारी दृष्टी येथे प्रथमच विशद करणे आवश्यक आहे. वाङ्मय-विचारामध्ये वेगवेगळे कालखंड आणि त्यांच्या पूर्वोत्तर सीमा ठरविताना वाङ्मयविषयक घटना अथवा कारणे लक्षात घेणे उचित होय. परंतु काही वेळा हा विचार बाजूला राहून इतर कारणेच पुढे येतात. काही काळ असा गेला की, ज्या वेळी इ. स. १८१८-पासून या कालखंडाचा प्रारंभ झाल्याचा उल्लेख होई. पेशवाईची व पर्यायाने मराठी राजवटीची अखेर आणि ब्रिटिश राजवटीचा प्रारंभ ही राजकीय घटना याच्या मुळाशी होती. या राजकीय स्थित्यंतराचे आपल्या वाङ्मयनिर्मितीवर महत्त्वाचे परिणाम झाले, हे मान्य करूनही इ. स. १८१८ या वर्षाचे प्रस्तुत कालखंडाचा प्रारंभ म्हणून समर्थन वाङ्मयविचारात करणे शक्य होत नाही. एक राजवट संपली की लगेच त्या घटनेचे वाङ्मयीन परिणाम सुरू होत नाहीत; त्यास काही काल जावा लागतो. या दृष्टीने इ. स. १८१८ ही सीमा सोडून द्यावी लागते. कित्येक वेळा वाङ्मयविचार शतकान्तराच्या कल्पनेवर आधारून करण्यात येतो. याचेही खरोखर शुद्ध वाङ्मयदृष्टीने समर्थन करिता येत नाही. तथापि एका शतकाच्या अखेरीस वा पुढील शतकाच्या प्रारंभास वाङ्मयदृष्ट्या विशेष अर्थपूर्ण अशी घटना घडली असल्यास किंवा वाङ्मयास निराळेच वळण लागले असल्यास शतकानुरोधाने कालखंड करण्यास हरकत नाही. ही शतके शकानुरोधाने लक्षात घ्यावयाची, की इसवी सनानुरोधाने हा विचार खरोखर

गौण आहे. मराठी वाङ्मयविचारात मात्र असे झाले आहे की, प्राचीन वाङ्मयविचार शकानुरोधाने व अर्वाचीन वाङ्मयविचार इसवी सनानुरोधाने केला गेला. परंतु त्यामुळे वाचकांचा गोंधळ होण्याचा संभव असल्याने प्रस्तुत वाङ्मयेतिहासात इसवी सनानुरोधानेच वाङ्मयाचे कालखंड व त्यांचा विचार करण्यात आला आहे.

## प्रस्तुत कालखंडाची पूर्वसीमा

प्रस्तुत कालखंडाचा प्रारंभ इ. सनाच्या अठराव्या शतकाच्या अखेरीने व एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीने धरण्यात आला आहे. हे केवळ शतकान्तविचाराने झाले, असे नाही. इ. स. १८१८ हा कालबिंदू केवळ राजकीय दृष्ट्या मानला गेल्यामुळे सोडून द्यावा लागतो. म्हणून नवीन राजवटीच्या परिणामाची दृश्य चिन्हे दिसू लागल्यापासून केव्हा तरी नव्या कालखंडास प्रारंभ करावयास हवा. तसे न करिता मागे जाऊन तो इ. स. १८००-पासून करण्यास काही वाङ्मयीन कारणेच झाली आहेत. नव्या वाङ्मयनिर्मितीस जीमुळे विशेष चालना मिळाली, अशी सर्वाधिक महत्त्वाची कोणती गोष्ट असेल, तर ती मराठी वाङ्मयास मिळालेली मुद्रणाची जोड ही होय. मराठी भाषेतील पुस्तकांना पहिला मुद्रणसंस्कार इ. स. १८०५-मध्ये कलकत्त्याजवळ सेरामपूर येथे झाला. त्या वर्षी तेथील ख्रिस्ती मिशनच्या विद्यमाने 'सेंट मॅथ्यू' आणि 'मराठी भाषेचे व्याकरण' ही दोन पुस्तके मुद्रित होऊन प्रसिद्ध झाली व पुढेही इ. स. १८१८-पर्यंत आणखी दहा पुस्तके छापून प्रकाशित केली गेली. याआधी एक वर्ष म्हणजे इ. स. १८०४-मध्ये कलकत्त्याच्या 'कॉलेज ऑफ फोर्ट वुइल्यम्'मध्ये मराठीच्या अध्ययन-अध्यापनाला प्रारंभ झाला होता. याचा अर्थ असा की, इ. स. १८००-च्या जवळपासच अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या जोपासनेला प्रारंभ झाला. हा प्रारंभ महाराष्ट्रापासून दूर झाला किंवा परकीयांच्या हस्ते झाला ही गोष्ट चमत्कारिक वाटली, तरी तो प्रारंभ म्हणून मान्य व्हावयास हरकत नाही. प्रस्तुत कालखंडाची पूर्वसीमा याकरिता इ. स. १८०० ही धरण्यात आली आहे.

## उत्तरसीमा

या कालखंडाची उत्तरसीमा इ. स. १८७४ ही धरण्यात वाङ्मयीन दृष्टी ही अर्थातच निर्णायक ठरली आहे. पुढील वाङ्मयनिर्मितीला स्फूर्ती, चालना, उत्तेजन वा वळण देण्यास फार मोठ्या प्रमाणात कारणीभूत झालेली चिपळूणकरांची 'निबंधमाला' ही १८७४ साली सुरू झाली, ही मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने एक क्रांतिकारक घटनाच समजावयास पाहिजे. मराठी वाङ्मयाच्या पुढील कालखंडाचे ते आरंभस्थानच ठरते. साहजिकच त्याआधीच्या कालखंडाची ती उत्तरसीमा ठरते. निबंधमालेचा प्रारंभ अथवा अखेर याला हे श्रेय देण्याविषयी काही मतभेद आहेत. तथापि निबंधमालेला तत्पूर्वीच्या वाङ्मयाची उत्कर्षसीमा मानण्यापेक्षा तिला पुढील वाङ्मयाचे आरंभस्थान मानणे हेच अधिक योग्य ठरेल. आधीच्या वाङ्मयीन कार्याचा तो कळस नव्हे; नवीन वाङ्मयनिर्मितीचा पाया घालून देणारी, तिला चालना देणारी अशीच ती घटना आहे.

प्रस्तुत कालखंडाच्या पूर्वोत्तरसीमा याप्रमाणे निश्चित झाल्या, तरी त्यांना अगदी काटेकोरपणे चिकटून राहणे अशक्य आहे, हे सांगावयास नको. कोणताही एक कालबिंदू आपण सीमा म्हणून पतकरिला, तरी त्याच्या आगेमागे जाऊन विचार करणे हे अनेक वेळा आवश्यक असते. निबंधमालेने एकंदरीत वाङ्मय आणि भाषा यांच्या विचाराला विशेष चालना दिली असली, तरी नवीन काव्य, अथवा कथावाङ्मय, किंवा नाट्यवाङ्मय यांना ती प्रत्यक्षपणे कारणीभूत झाली, असे म्हणता येत नाही. मराठीमधील अर्वाचीन नाट्याचा जन्म किर्लोस्करांच्या शाकुंतल-सौभद्रांनी झाला, असेच मानावे लागते. नवीन कथावाङ्मयाला प्रारंभ हरिभाऊ आपट्यांच्यापासून झाला, असे म्हणावे लागते. त्याचप्रमाणे नवीन कवितेस केशवसुतांनीच रूप दिले, असे म्हटले जाते. म्हणजेच अर्वाचीन ललितवाङ्मयाचा जन्म १८८० ते १८९० या दशकात झाला, असे स्थूल मानाने म्हणणे क्रमप्राप्त होते. त्यामुळे प्रस्तुत खंडात ललितवाङ्मयाच्या या प्रकारांचा परामर्श इ. स. १८७४-च्या पुढे आणखी पाचदहा वर्षांपर्यंत तरी घ्यावा लागेल. उलटपक्षी, पंडिती आणि शाहिरी काव्य, व बखरगद्य यांची निर्मिती इ. स. १८००-नंतर बराच काल, किंबहुना चाळीस-पन्नास वर्षे होत राहिली असली, तरी त्यांचा परामर्श या खंडात न घेता मागील खंडातच घेण्यात आला आहे. कारण त्यांचे स्वरूप व त्यांमागची भूमिका अथवा वृत्ती ही मागील शतकाला अनुरूप अशीच होती.

### नव्या वाङ्मयाची पूर्वतयारी

प्रस्तुत कालखंडाचे सर्वसामान्य स्वरूप पाहिल्यास ते नव्या वाङ्मयाच्या पूर्वतयारीचे युग होते, असे म्हणावे लागेल. आताच उल्लेखिल्याप्रमाणे अर्वाचीन मराठीमधील नवीन स्वतंत्र ललितवाङ्मयास १८८० ते १८९० या दशकामध्येच प्रारंभ झाला, असे स्थूल मानाने मानावे लागते. ललितवाङ्मयच नव्हे, तर चरित्रे, टीका इत्यादी तदितर वाङ्मयप्रकारांचाही खराखुरा उन्मेष याच कालावधीमध्ये झाला, असे दिसून येईल. परंतु हे व्हावयास काही एकदमच प्रारंभ झाला, असे नाही. त्याची पूर्वतयारी होण्यास काही काल आवश्यक होता. प्रस्तुत कालखंड हा अशा पूर्वतयारीचा कालखंड आहे. तसे पाहिले, तर तो फारसा मोठा नाही. वाङ्मयाच्या इतिहासात पाउणशे वर्षे म्हणजे काही दीर्घ कालावधी नव्हे. अगदी स्वाभाविकपणे, त्या वाङ्मयाच्या अंतःप्रवृत्त्यनुसारे या वाङ्मयाचा विकास व्हावयास पुष्कळच काल लागला असता. परंतु इंग्रजी वाङ्मयाच्या बऱ्याच अंशी आवश्यक झालेल्या अभ्यासामुळे आणि परिचयामुळे वाङ्मय-विकासाला बरीच जोराची गती मिळाली. या विकासाला उत्क्रांती किंवा क्रमविकास म्हणण्यापेक्षा क्रांती म्हणणेच अधिक योग्य ठरेल. परंतु विकासाची वाढलेली गती एवढेच रूप या घटनेला नव्हते. अनेक वेळा अर्वाचीन मराठी वाङ्मय हे मराठी वाङ्मयावर इंग्रजी वाङ्मयाचे कलम झाल्यामुळे प्राप्त झालेले फळ आहे, असे म्हटले जाते. कलम करण्याचे

फायदे असे की, प्राप्त झालेले फळ वेगळ्या स्वरूपाचे, अधिक सकस आणि भरदार असून अल्पावधीमध्ये मिळते. तसे ते मराठी वाङ्मयाच्या बाबतीतही झाले.

## योजनापूर्वक वाङ्मयनिर्मिती

या प्रक्रियेत स्वाभाविकपणे झालेल्या निर्मितीपेक्षा जाणीवपूर्वक प्रयत्नामुळे झालेल्या निर्मितीचा भाग अधिक असतो. तसा तो या कालखंडातील वाङ्मयनिर्मिती-मध्येही होता. असा प्रयत्न शासनसंस्थेकडून क्वचितच होई किंवा आजही होतो. कवीस किंवा ग्रंथकारास पारितोषिक किंवा आश्रय सत्ताधारी लोकांकडून मिळाला, अशा घटना पूर्वीच्या काळी कदाचित आणि क्वचित घडल्याही असतील. तथापि त्या काही योजनापूर्वक आणि धोरण म्हणून शासनाकडून होत होत्या, असे नाही. त्यांत वैयक्तिक दानादानाचा प्रकारच अधिक असे. वाङ्मयास वळण देण्याचा सहेतुक प्रयत्न शासनसंस्थेकडून क्वचितच होई. गेल्या शतकात असा प्रयत्न शासनसंस्थेकडून झाला, हा या कालखंडाचा एक विशेषच मानावयास हवा. ही शासनसंस्था परकीय होती, हा या घटनेतील आणखी एक लक्षणीय भाग होय. जित लोकांच्या वाङ्मयास उत्तेजन देण्याचे, किंवा प्रयत्नपूर्वक त्याची निर्मिती करण्याचे परकीय राज्यकर्त्यास काहीच कारण सामान्यतः असत नाही. परंतु आपले राज्य स्थिरपद व्हावे, त्याकरिता जित लोकांचे साहाय्य आपल्यास मिळत रहावे, अशा स्वार्थी हेतूने का होईना, ब्रिटिश राज्यकर्त्यांनी मराठीमध्ये ग्रंथनिर्मिती करवून घेण्याचे प्रयत्न केले. त्यांत शालेय व शैक्षणिक वाङ्मयाचा मोठा वाटा होता, हे या स्वार्थी धोरणास धरून झाले. तथापि मराठी गद्यास विशिष्ट वळण लागण्याच्या दृष्टीने याचा फार उपयोग झाला. मराठी गद्याची भाषा शुद्ध, निर्दोष व व्यवस्थित होण्यास त्याचे फार साहाय्य झाले, यात शंका नाही. गद्य वाङ्मयाची निर्मिती होण्यासच केवळ नव्हे, तर काव्यनिर्मितीलाही 'दक्षिणा प्राइझ कमिटी'कडून उत्तेजन मिळत गेले. खरे काव्य हे अशा कृत्रिम प्रयत्नांनी निर्माण होणारे वाङ्मय नव्हे, हा भाग वेगळा. परकीय शासनसंस्थेकडून शासितांच्या वाङ्मयनिर्मितीबाबत इतका प्रयत्न झाल्याचे हे पहिलेच उदाहरण असेल.

## मिशनऱ्यांचा हातभार

परकीय शासकांशिवाय परकीय मिशनरी लोक यांचेही साहाय्य या वाङ्मय-निर्मितीस होत गेले, हा या कालखंडाचा आणखी एक विशेष होय. यामागेही स्वार्थी हेतू होता व तो धर्मप्रचाराच्या स्वरूपाचा होता. या धर्मप्रचारास प्रारंभी परकीय राज्यकर्त्यांचा पाठिंबा नसला, तरी विरोधही फारसा नसावा, व पुढेपुढे साहाय्यही असावे. आपल्या धर्मग्रंथांचा मराठीमधून परिचय करून देण्याकरिता त्यांचे भाषांतर करून, व धर्माचारात आवश्यक असणारे इंग्रजी प्रार्थनादी वाङ्मय अनुवादित करून मराठी ग्रंथ आणि वाङ्मय यांच्या निर्मितीस या मंडळींनी साहाय्य केलेच; पण अशा धर्मप्रचाराला विरोध करणाऱ्या एतद्देशीयांच्या वाङ्मयालाही त्यांच्या या प्रयत्नांमुळे जन्म मिळाला, व ते स्वरूपाने अधिकच मराठी उतरले. परकीय धर्मप्रचारकांचा

मराठी वाङ्मयावर हा दुहेरी उपकारच झाला, असे म्हणता येईल.

## भाषांतरयुग

प्रस्तुत कालखंडास कित्येक वेळा 'भाषांतर-युग' असेही संबोधिले जाते. याचे कारण अर्थात उघड आहे. या कालातील बरेच वाङ्मय भाषांतरस्वरूपाचे आहे. आरंभी जे शालेय वाङ्मय निर्माण करण्यात आले, ते बहुतेक सारे इंग्रजीवरून भाषांतरित असे होते. या वाङ्मयास जुनी परंपरा अशी नव्हतीच. नव्याने आणि अल्पावधीत या स्वरूपाची वाङ्मयनिर्मिती करावयाची, तर भाषांतराखेरीज मार्ग नसतो. या भाषांतरात वाङ्मयाबरोबर शास्त्रीय स्वरूपाचे ग्रंथही झाले. ललित नसणाऱ्या वाङ्मयाप्रमाणे ललितकथात्मक वाङ्मयही आले. इंग्रजीतून भाषांतर करण्यावर भर असला, तरी संस्कृत आणि फारसी वाङ्मयावरूनही भाषांतरे झाली. प्राचीन मराठीमध्ये भारत-भागवत-रामायणादी ग्रंथांचे अनुवाद झालेले असले, तरी त्यांना भाषांतराचे स्वरूप सहसा नसे; बहुधा स्वैर अनुवादाचे असे. या नवीन अनुवाद-वाङ्मयात मुळास धरून भाषांतर करण्याचीच दृष्टी प्राधान्याने होती. कथावाङ्मयात स्वैर अनुवादास वाव असला, तरी शास्त्रीय किंवा माहिती देणाऱ्या वाङ्मयातून तो तितका नसतो. स्वतंत्र ग्रंथनिर्मितीपेक्षा भाषांतररूप निर्मितीस स्वतंत्र प्रतिभेचे देणे अल्प असले, तरी पुरते, किंवा आवश्यकही नसते. भाषांतररूप कृतींना अर्थात अव्वल दर्जाच्या वाङ्मयाचे मूल्य मिळू शकत नाही म्हणून कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या भाषाप्रभू रसिकालाही स्वतंत्र वाङ्मयनिर्मिती करणाऱ्याइतका मान मिळत नाही. लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे संस्कृत नाटके किंवा काव्ये यांचे अनुवाद करण्याची कल्पना आधीच्या कालात कोणास सुचली वा रुचली नव्हती, ती या कालखंडात मान्य होऊन बहुतेक प्रसिद्ध व रसिकमान्य नाटके, व मेघदूत-रघुवंशादी काव्ये मराठीत उतरली गेली. जवळचा मोलाचा ठेवा उमगलाच नव्हता, तो या कालखंडात डोळ्यांस दिसू लागून त्याची भाषांतरे करण्याची जणू अहमहमिका लागली इंग्रजीतून कथा, नाटके व काव्य यांची मराठी भाषांतरे अर्थातच होत होती. स्वतंत्र निर्मितीपेक्षा ही अनुवादरूप निर्मितीच अधिक झाल्याने या वाङ्मयीन युगास 'भाषांतर-युग' म्हटले गेल्यास ते स्वाभाविकच होते.

## भाषाविकासास उपकारक वाङ्मय

या कालखंडामध्ये मराठीच्या भाषिक अभ्यासाच्या दृष्टीने एक-दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. प्राचीन कालात मराठी वाङ्मयाचे वाचनसुद्धा संख्येने फारच मर्यादित अशा जनसमूहाकडून होई. वाङ्मयाचे वाचन याचा अर्थ त्याचा अभ्यास असा अर्थात नव्हता. वाङ्मयाच्या अभ्यासात भाषेचा अभ्यास तर त्याहूनही अल्प प्रमाणात होत असावा. भाषेबद्दलचा अभिमान ज्ञानदेवांपासून मोरोपंतांपर्यंतचे वाङ्मयनिर्माते प्रकट करीत आले असले, तरी तो अभिमान भाषेच्या व्याकरणिक अंगापेक्षा साहित्यिक अंगाविषयीचा असावा, असे वाटते. मराठी ही ज्यांची बोली, स्वभाषा

होती, त्यांना भाषेच्या ह्या अंगाच्या अभ्यासाची गरजही न वाटणे स्वाभाविक होते. फादर स्टीफन्ससारख्या परकीयालाच मराठीच्या व्याकरणाची गरज असे. म्हणून मराठीच्या भाषिक अभ्यासास पोषक व तिच्या स्वरूपास योग्य, शुद्ध वळण मिळण्याच्या दृष्टीने लक्षात घेण्याजोगे प्रयत्न पूर्वी झाले नाहीत. प्रस्तुत कालखंडात या प्रयत्नास पद्धतशीर प्रारंभ झाला, त्याचे मूळ प्रामुख्याने परकीयांच्या गरजेतच होते. त्यांची गरज अर्थात त्यांच्या भाषेत लिहिल्या गेलेल्या व्याकरणाने भागली असती. परंतु एतद्देशीयांना त्यांच्याच भाषेत शिक्षण देऊन ते आपल्या उपयोगास येतील इतके शहाणे करून सोडण्याच्या राज्यकर्त्यांच्या धोरणामुळे मराठीचे व्याकरण मराठीमध्येच तयार होण्याची आवश्यकता वाटू लागली. तीमुळे मराठीच्या भाषिक अभ्यासास प्रारंभ झाला, व इंग्रजी पद्धतीने का होईना, दादोबा पांडुरंगांचे मराठी व्याकरण लिहिले गेले. त्याआधी काही थोडा काल मराठीच्या एका जुजबी व्याकरणाने काम भागविण्यात येत असले, तरी दादोबांचे व्याकरण हाच अर्वाचीन मराठी व्याकरणाच्या अभ्यासाचा पाया ठरतो, असे समजावयास हरकत नाही. भाषिक अभ्यासाच्या दृष्टीने ही फार महत्त्वाची, अत्यंत आवश्यक आणि फार उपकारक अशी घटना घडली. अशीच दुसरी घटना म्हणजे मराठी भाषेचा शब्दकोश तयार होणे ही होय. अशा कोशाची गरजही परकीयांसच प्रथम भासणार, हे उघड आहे. स्वभाषेतील शब्दांचा कोश रचण्याची आवश्यकता तिच्या व्याकरणरचनेप्रमाणेच ती भाषा बोलणाऱ्यांना तितक्या लवकर भासत नाही. प्राचीन मराठीमध्ये यामुळे कोशग्रंथ संख्येने फारच थोडे आहेत, व त्यांतील बहुतेक ज्ञानदेवीसारख्या किंवा 'साती ग्रंथां'सारख्या ग्रंथांपुरते मर्यादित होते त्यांना कोशाचे स्वरूप असण्यापेक्षा अर्थनिर्णायक टीपांचेच स्वरूप असे. भाषेतील सर्व शब्दांचा कोश करण्याची कल्पना त्यांच्या मुळाशी नव्हती. अशा कोशाची गरज भासावी, याला भाषिक अभ्यासाची जाणीव असावी लागते. तिचा प्रायः अभाव असल्याने असे कोश आधीच्या कालात झालेले नव्हते. प्रस्तुत कालखंडामध्ये मोल्स्वर्थ आणि कँडी यांच्या मराठी-इंग्रजी आणि इंग्रजी-मराठी या कोशांनी अर्वाचीन मराठी कोशवाङ्मयाचा पायाच घालून दिला. या कोशांच्या स्वरूपावरून इंग्रजी जाणणाऱ्यांच्या सोयीकरिता म्हणजेच राज्यकर्त्यांच्या सोयीकरिता ते निर्माण झाले, हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. त्यांच्या रचनेत मराठी शास्त्रीपंडितांचे साहाय्य पुष्कळच झाले असले, तरी त्यांच्या संपादनाचे श्रेय या दोघा साहेबांनाच देणे योग्य होईल. भाषेच्या विकासास आवश्यक असणाऱ्या व्याकरण कोशांच्या या द्विविध कार्यास शास्त्रीय पायावर या कालखंडात प्रारंभ झाला, ही गोष्ट त्याच्या वैशिष्ट्याची निदर्शक आहे.

### गद्यास मिळालेले महत्त्व

मराठी गद्याला मिळालेले महत्त्व हा या कालखंडाचा आणखी एक विशेष गणावयास पाहिजे. प्राचीन वाङ्मयात पद्यरचना हेच वाङ्मयाचे बाह्यरूप अथवा शरीर

होते, मग ते गद्यसदृश अशा वाङ्मयीन ओवीचे का असेना. ज्याला काव्याचा स्पर्श दुरूनच आणि क्वचितच झालेला असे, अशा विवेकसिंधु, यथार्थदीपिका यांसारख्या विवेचनात्मक लेखनासही ओवीसारख्या पद्याचा आश्रय करावा लागे. गद्य वङ्मय मुळीच निर्माण झाले नव्हते, असे नाही. महानुभावीय गद्य आणि बखरगद्य असे गद्याचे दोन निरनिराळे नमुनेही आज उपलब्ध आहेत. तथापि एकंदरीत गद्यलेखनास विशेष मान्यता लाभली होती, असे म्हणता येणार नाही. अव्वल इंग्रजीमध्ये गद्यरचनेचे महत्त्व मान्य होऊन गद्याचे योग्य ते स्थान त्यास मिळाले; एवढेच नव्हे, तर पद्यरचनेपेक्षा गद्यरचनाच अधिक प्रमाणात झाली. शिक्षण हे वाङ्मयनिर्मितीचे मोठे कारण आणि कार्यक्षेत्र आहे. नवीन राजवटीत व्यवहारोपयोगी शिक्षणास विशेष महत्त्व मिळून इतिहास-भूगोल, भौतिक शास्त्रे, व्यावहारिक नीती यांविषयीचे वाङ्मय निर्माण होण्याची आवश्यकता वाटू लागली, व या गरजेतून नवीन गद्य वाङ्मय निर्माण झाले. या वाङ्मयास मूळ आधार इंग्रजीमधील वाङ्मयाचा होता. त्याचा अनुवाद मराठीमध्ये केल्याने हे गद्यलेखन पूर्वीच्या गद्यपरंपरांहून वेगळे असे गद्य झाले. स्वरूपाने ते फारच बालबोध आणि अलंकरणरहित असे उतरले. याआधीच्या बखरगद्याचा डौल आणि सामर्थ्य त्यात दिसत नाही. त्याचा हेतूही बहुतांशी केवळ ज्ञानदानाचा असल्याने सुबोधता आणि वक्रोक्तिरहितता या दोन गुणांपेक्षा इतर अलंकरणाची आवश्यकता त्यास भासली नाही. परंतु यामुळे त्या गद्यास साधे पण नेटके असे वळण मिळाले व मराठीची वेगळी अशी शैली अस्तित्वात आली. अगदी प्राचीन गद्यातील त्रुटितता आणि अपूर्ण अर्थव्यक्ती या गद्यशैलीत राहिली नाही, आणि बखरीच्या गद्यातील कृत्रिमता आणि आडंबरही त्यात उरले नाही. वाक्यरचना व्याकरणदृष्ट्या शुद्ध व निर्दोष व्हावी, असा जाणीवपूर्वक कटाक्ष पाळला गेला. या दृष्टीने पुन्हा एकदा एका परकीयाची[1] कामगिरी महत्त्वाची ठरली. या शैलीला पूर्वपरंपरेचे बळ लाभले नसल्याने मालापूर्वकालीन गद्यात जातिवंतपणाचा अभाव असल्याचा आक्षेप घेतला गेला.[2] तथापि तिला एक रेखीव स्वरूप याच काळात मिळाले, हे विसरता येत नाही. या शैलीच्या पायावरच पुढे कृष्णशास्त्री चिपळूणकरादी संस्कृताची पीठिका लाभलेल्या मंडळींनी एक डौलदार वळण निर्माण केले; आणि विष्णुशास्त्र्यांसारख्या मराठीच्या शिवाजीच्या हातात ते किती समर्थ ठरले, हे सर्वांस परिचितच आहे. मराठी गद्याचा आणि गद्यशैलीचा नवावतार हा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' म्हणून आज ओळखला जात आहे.

### ज्ञानसंग्रह व ज्ञानप्रसार

या गद्य वाङ्मयाचा प्रमुख हेतू ज्ञानसंपादन आणि ज्ञानप्रसार हा होता. त्यामुळे त्याच दृष्टीने त्याची निर्मिती व्हावी, हे स्वाभाविक होते. हे ज्ञान तत्त्वज्ञानाच्या

१. मेजर कॅंडी.

२. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, दुसरी आवृत्ती, पृ. ३५.

स्वरूपाचे नसून ऐहिक व्यवहारोपयोगी ज्ञानाच्या स्वरूपाचे होते. त्या बाबतीत आपला समाज फार काल वंचित राहिलेला होता. त्याला इतर देशांचे वा समाजांचे इतिहास तर राहोतच, पण आपल्याच देशाचा व समाजाचा इतिहास माहीत नव्हता. ज्या पृथ्वीवर आपण राहतो, त्या पृथ्वीचे आणि तीमधील आपल्या या खंडप्राय देशाचे आपले भौगोलिक ज्ञानही अज्ञानापासून फारसे दूर नव्हते. सृष्ट पदार्थांविषयीचे आपले ज्ञानही विशेष स्पृहणीय नव्हते. हे सारे ज्ञान आपल्यास व्हावयास पाहिजे व त्याचा शक्य तेवढा प्रसार व्हावयास हवा, अशी भूक या काळामध्ये निर्माण झाली होती. म्हणून ' अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह ' करण्यात आला. ' सिद्धपदार्थविज्ञानविषयक संवाद ' लिहिले गेले. हिंदुस्थान आणि इंग्लड यांच्या इतिहासाबरोबर जगाचाही इतिहास सांगण्याचा प्रयत्न झाला. कोलंबस आणि कुक यांच्या जलपर्यटनांची माहिती करून देण्यात आली. सॉक्रेटीस, लूथर, क्लाइव्ह, वॉशिंग्टन इत्यादी परकीयांच्या चरित्रांचा परिचय करून देण्यात आला. आपला प्रांत, देश, खंड आणि अखेरीस सबंध भूगोल यांविषयीचे ज्ञान उपलब्ध करून देण्यात आले. सारांश, ज्ञानाचे संपादन आणि त्याचा प्रसार या दृष्टीने खूपच प्रयत्न झाले. त्यांचे स्वरूप फार प्रगत अथवा उच्च दर्जाचे साहजिकच नव्हते. परंतु त्या वेळी हा विचार महत्त्वाचा नसून उपलब्ध तुटपुंजे ज्ञानही लोकांस उपलब्ध करून देण्याचीच गरज अधिक निकडीची होती. त्या कालखंडात निघालेली वृत्तपत्रे आणि मासिके यांची नावे पाहिली, तरी ही ज्ञानसंपादनाची आणि त्याच्या प्रसाराची दृष्टी किती उत्कट होती, याची कल्पना येते. ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, ज्ञानचक्षू ही काही वृत्तपत्रांची नावे आहेत, तर ज्ञानचंद्रोदय, ज्ञानप्रसारक, ज्ञानदर्पण, विविधज्ञानविस्तार आणि ज्ञानसंग्रह ही काही मासिकांची नावे आहेत.

### नियतकालिकांचा उदय

या नियतकालिकांचा उदय हाही या कालखंडाचा नवा विशेष आहे. नियतकालिकांची कल्पनाच आपल्यास हा कालपावेतो अपरिचित होती आणि त्यांची आवश्यकताही वाटली नव्हती. ' वर्तमान ' हा नियतकालिकांचा जीवनाधार होय. त्याच्याकडे लक्ष देण्याची गरज किंवा त्यापासूनचे फायदे यांची जाणीव पूर्वीच्या कालात आपल्यास झालेली नव्हती. वर्तमान म्हणजे बातमी हा अर्थ जो आज त्या शब्दास आला आहे, तो मात्र त्या कालात नव्हता. बातमीपेक्षा ज्ञानप्रसार, मतप्रकटन किंवा विचारजागृती हीच या नियतकालिकांची उद्दिष्टे असत; बातमी देणे हा भाग गौण होता. म्हणजेच वाङ्मयनिर्मितीस त्यांचे स्वरूप अधिक अनुकूल असे. यातूनच अर्वाचीन मराठीमधील एक महत्त्वाचा असा वाङ्मयप्रकार जन्म पावला. तो म्हणजे निबंध हा प्रकार होय. या नियतकालिकांतून येणारे लेख, अग्रलेख आणि केव्हा-केव्हा पत्रेही निबंधांच्या स्वरूपाची असत, आणि त्यांचेच महत्त्व दैनिकांतील बातम्यांपेक्षा अधिक असे. यांतील मतप्रकटन किंवा विचारजागृती ही प्राधान्याने धार्मिक वा सामाजिक विषयांसंबंधी असे, राजकीय फारच अल्प. सामाजिक जीवनात

किंवा धर्मविचारात काही बदल, सुधारणा व क्रांती व्हावयास हवी, हा विचार नव्याने आलेला होता. इंग्रज आणि इंग्रजी यांच्याशी आपला जो संबंध आला, त्यामुळे या विचाराला प्रारंभ झाला आणि धर्म आणि सामाजिक जीवन या बाबतींत खूपच खळबळ माजून राहिली. या नियतकालिकांबाबत आपल्यापुढे असणारे आदर्श हे परकीय म्हणजे इंग्रजीच होते. त्यामुळे काही नियतकालिके इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषांमध्ये निघत, आणि त्यांतील मराठीपेक्षा इंग्रजी अधिक चांगले असे. जुने विचार आणि संस्कार बदलण्यास विरोधही पुष्कळच झाला आणि या संघर्षामुळे वाङ्मयनिर्मितीस चालना मिळाली. हे सारे घडून येण्यास मुद्रणाची सुकरता फार मोठ्या प्रमाणात कारणीभूत झाली. मुद्रणसुकरता, तीमुळे नियत-कालिकांचा संभव, त्यांच्या द्वारे झालेली विचारजागृती आणि विचारांचा संघर्ष, आणि त्यांतून वाङ्मयनिर्मिती अशी ही परंपरा आहे. आपला परकीयांशी आलेला संबंध अर्थात या सर्वांच्या मुळाशी आहेच.

### पायातील दगड

प्रस्तुत कालखंडामध्ये मराठीत जे वाङ्मय निर्माण झाले, त्याचे महत्त्वमापन करण्याचे स्थल हे नव्हे; ते या खंडाच्या अखेरीस आहे. तथापि एका मताचा उल्लेख येथे करणे हे एका दृष्टीने उपयुक्त ठरेल. या कालखंडातील वाङ्मयापासून करावयाच्या अपेक्षांची कल्पना त्यामुळे आपल्यास येऊ शकेल आणि मग निराशा पदरी पडणार नाही. या काळातील मराठी गद्याचा बराचसा सविस्तर परामर्श प्रथम घेणारे महामहोपाध्याय द. वा. पोतदार आपल्या ग्रंथाच्या उपोद्घातात म्हणतात —

" परंतु सामग्र्याने जेव्हा या काळातील मराठी ग्रंथ व ग्रंथकार आमच्या पुढे उभे राहतात, तेव्हा आम्हांस प्राजंळपणाने असे कबूल करणे भाग पडते की, या **पाऊणशें वर्षांत एकही अलौकिक किंवा अजरामर ग्रंथ मराठीत झाला नाही.** लहानसहान सटरफटर ग्रंथ भाराभर झाले. ' तारागण ' पुष्कळच उगवला, पण तमोनाशक चंद्र मात्र कोठेच आढळला नाही ! "

मराठी गद्यासंबंधाने त्यांनी हे जे म्हटले आहे, ते या कालातील पद्यासंबंधाने म्हणजे काव्यासंबंधानेही खरे मानावयास हरकत नाही. परंतु एवढाच एक विचार मनात ठेवून या कालखंडातील वाङ्मयाचे परिशीलन करणे अयोग्य ठरेल. प्रारंभी म्हटल्याप्रमाणे प्रस्तुत कालखंड हा पुढे येऊ घातलेल्या एका उज्ज्वल कालखंडाच्या पूर्वतयारीचा काल होता. चिपळूणकरांसारखा प्रभावी निबंधलेखक काही आकाशातून एकदम खाली आला नाही. किर्लोस्करांची नाटके, हरिभाऊ आपटे यांचे कादंबरीवाङ्मय, केशवसुतांची नवीन कविता,— हे वाङ्मय काही अचानकपणे अवतीर्ण झालेले वाङ्मय नव्हे. त्याची पूर्वतयारी होण्यास इतका अवधी अवश्यच होता. किंबहुना, एरवी तो अपुराच वाटला असता. इंग्रजी वाङ्मयाचा मागोवा घेत आपण हा आधीचा प्रवास केल्यामुळेच पुढील क्रांती गेल्याच शतकाच्या उत्तरार्धामधील शेवटच्या २५–३०

वर्षांमध्ये होऊ शकली. त्याकरिता इंग्रजी आणि संस्कृत वाङ्मयांचे वळण गिरवावे लागले; भाषांतरे करावी लागली, अनुकरण करावे लागले. भाषा समर्थ होण्यास व तिला रेखीव वळण प्राप्त होण्यास कोश-व्याकरणादी साधनभूत वाङ्मय निर्माण करावे लागले. याच कालात नवीन धर्मविचार आणि समाजविचार सुरू झाला, ही गोष्ट वाङ्मयदृष्टीनेही इष्ट अशीच ठरली. याआधीच्या कालखंडाच्या अखेरीस आपण स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा आणि वाङ्मय या सर्वच दृष्टींनी अधोगतीची कड गाठली होती, असे म्हणता येईल. यातून उत्थान घेऊन उद्गतीचा मार्ग आक्रमावयाचा होता. याला प्रयत्न आणि नेट यांची आवश्यकता होती. त्या दृष्टीने प्रस्तुत कालखंडाचे कार्य आपण लक्षात घ्यावयास हवे. त्यात डोळे दिपविणारी आणि भान हरपून टाकणारी वाङ्मयकृती निर्माण झाली नाही, हे खरे असेल; परंतु तेवढ्याने त्याचे महत्त्व कमी मानण्याचे कारण नाही. पायातील दगड पाहून कधी कोणी स्तिमित झालेला नाही; पण त्यामुळे त्याची उपयोगिता आणि उपकारकता अमान्य करणे न्यायाचे ठरणार नाही. उपरिनिर्दिष्ट अभिप्रायामध्येही तशी दृष्टी नाही, हे कदाचित लक्षात येणार नाही, म्हणून हा विस्तार करावा लागला.

प्रकरण दुसरे

# राजकीय स्थित्यंतर व त्याचे वाङ्मयीन परिणाम

एकोणिसाव्या शतकापासूनचा पुढचा सत्तर-ऐंशी वर्षांचा मराठी वाङ्मयाचा इतिहास म्हणजे ब्रिटिश राजवटीमुळे निर्माण झालेल्या नवसंस्कारांच्या क्रिया-प्रतिक्रियांच्या प्रारंभाचा व विस्ताराचा इतिहास होय. ब्रिटिश राजवटीमुळे साऱ्या भारतीय जीवनातच स्थित्यंतर घडून आले, आणि त्याने एका अगदी वेगळ्या प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीला प्रेरणा दिली. म्हणूनच या राजवटीपासूनच्या पुढील कालखंडात निर्माण झालेल्या वाङ्मयाला अर्वाचीन वाङ्मयाचा कालखंड असे संबोधिण्यात येते. येथे प्रस्थापित झालेल्या या नव्या राजसत्तेचा उगम एका व्यापारी संस्थेत असला, तरी तिचे स्वरूप केवळ व्यापारी नव्हते; अथवा आजपर्यंतच्या येथील इतर देशी-विदेशी सत्तांप्रमाणे केवळ राजकीयही नव्हते. व्यापारी वा राजकीय हेतू सिद्धीला नेण्यासाठी का होईना, पण पाश्चात्त्य संस्कृतीचा हेतुपुरस्सर प्रचार करणे हेही तिचे एक महत्त्वाचे उद्दिष्ट होते. या संस्कृतीची मूल्ये व त्यांच्या प्रचाराची साधने या सत्तेच्या छायेखालीच परिचित आणि उपलब्ध झाली. नवी शासन-व्यवस्था, शिक्षण-संस्था, मुद्रणालये, ग्रंथप्रसार, वृत्तपत्रे, खिस्ती धर्मोपदेशक आणि एतद्देशीय लोक यांनी या अनुसंधानाने केलेल्या सामुदायिक वा व्यक्तिगत हालचाली या सर्वांच्या क्रिया-प्रतिक्रियांतून या नव्या मूल्यांचे येथे कमीजास्त प्रमाणात संवर्धन होत गेले. जीवनाच्या राजकीय, धार्मिक, आर्थिक, सांस्कृतिक अंगांकडे पाहण्याचा एक नवा दृष्टिकोण त्यामुळे येथील लोकांना प्राप्त झाला. किंबहुना, राजकीय क्रांती-बरोबर एक प्रचंड मानसिक क्रांती येथे घडून आली. या सर्वांचा वाङ्मयनिर्मितीवर

परिणाम होणे अपरिहार्य होते.

## वाङ्मयनिर्मितीचा योजनाबद्ध प्रयत्न

जीवनातील निरनिराळ्या घडामोडींचा वाङ्मयनिर्मितीवर परिणाम होतो किंवा नाही, हा प्रश्न विवाद्य असला, तरी तो आत्मनिष्ठ ललितवाङ्मयाच्या संदर्भातच होय. ज्या कालखंडाचा प्रस्तुत विचार करावयाचा आहे, त्या कालखंडातील वाङ्मय-निर्मितीच्या प्रेरणा प्राधान्याने वस्तुनिष्ठ, ललितेतर गद्य-वाङ्मयनिर्मितीच्या होत्या. येथील जनमनावर विशिष्ट प्रकारची सांस्कृतिक मुद्रा उमटविण्यासाठी चाललेल्या प्रयत्नांचाही वाङ्मयनिर्मिती हा एक अविभाज्य घटक होता. त्यात सहेतुकता अभिप्रेत होती, प्रचाराचा बाणा होता; बोधवाद आवर्जून आणण्याचा प्रयत्न होता. वाङ्मयनिर्मिती ही शक्य तितकी ऐहिक, उपयुक्त व व्यावहारिक ठरावी, असा उद्देश शासनसंस्था व तत्कालीन विचारवंत या उभयतांच्याही मनात वावरत होता. त्यासाठी त्यांनी काही योजनाही आखल्या होत्या. या प्रयत्नात राज्यकर्ते व खिरती-धर्मप्रचारक यांनी फार मोठा भाग घेतला. परकीय राज्यकर्ते व परधर्मीय लोक भिन्न भाषा व वाङ्मय यांच्या अभिवृद्धीसाठी संघटित प्रयत्न करीत असल्याचे प्रारंभकाळातील हे दृश्य एका दृष्टीने अपूर्व आहे. येथील लोकांनी यापासून प्रेरणा घेऊन जे मार्गक्रमण केले, त्यावर परप्रत्ययनेयतेची दाट छाया स्वाभाविकपणेच पसरली आहे. एखाद्या राजवटीने स्वतःच्या सोयीसाठी सरकारी पातळीवरून केलेल्या हालचालींचे जे फायदे-तोटे असतात, ते यातही आढळतात. तथापि प्रारंभकालातील प्रयत्नांत मराठी वाङ्मयाच्या विकासाच्या दृष्टीने तोट्यांपेक्षा फायदेच अधिक झालेले दिसतील. विज्ञानप्रवण, संघटनाकुशल अशा या परकीय राजवटीने मराठी गद्याची पायाभरणी ज्या पद्धतीने केली, त्या पद्धतीने ती करण्यास सर्वथैव मागासलेली स्वकीय राजवट समर्थ नव्हती, आणि नजीकच्या काळात ती तशी समर्थ होईल, अशी शक्यताही नव्हती.

## आणि – त्याचे परिणाम

या राजवटीने जसे काही लाभ झाले, तसे काही तोटेही झाले. विकासाच्या एकंदर क्षेत्राला इंग्रज राजवटीच्या विशिष्ट स्वरूपामुळे फार मोठ्या मर्यादा पडल्या. येथील देशाचा खंडप्राय विस्तार, धर्म-जाती इत्यादी विविध भेद व संस्कृतीच्या भिन्नभिन्न पातळ्या यांमुळे देथील जनमनावर झालेल्या संस्कारांचे स्वरूप फार संमिश्र व गुंतागुंतीचे झाले होते. येथील रूढ संस्कृतींची पाळेमुळे येथील जमिनीत शतकानु-शतके खोल रुजलेली असल्यामुळे त्यांचे पूर्ण निर्मूलन होणे अशक्य होते. त्यामुळे जे संस्करण झाले, ते जुन्या वृक्षांवर केलेल्या नव्या कलमाप्रमाणे झाले. या वृक्षाला मग ज्या शाखा फुटल्या, त्या सरळ आणि वक्र अशा दोन्ही प्रकारच्या. त्यांची परस्परांत गुंतागुंत तर झालीच, पण काही वेळी विरोध निर्माण होऊन त्यांचा विकासही अवरुद्ध झाला व वृक्षाच्या एकंदर वाढीवर त्याचा फार मोठा परिणाम झाला.

## इंग्रजपूर्व समाजस्थिती

या कालखंडातील एकंदर वाङ्मयाच्या स्वरूपाचे आकलन होण्यास वरील परिस्थितीचा थोडा तपशीलवार विचार करणे आवश्यक आहे. तत्कालीन राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक व सांस्कृतिक स्थिती, राज्यकर्त्यांची उद्दिष्टे, एतद्देशीयांवर या उद्दिष्टांचा झालेला परिणाम व तदनुषंगिक चळवळी यांचा यासाठी साकल्याने विचार करावयास हवा. तो करताना पार्श्वभूमीदाखल ब्रिटिशपूर्व कालातील जीवनाचाही थोडा मागोवा घेणे क्रमप्राप्त ठरते. ब्रिटिशपूर्व भारतीय जीवनात ठळकपणे व सातत्याने जाणवणारी गोष्ट म्हणजे सर्व क्षेत्रांतील स्थितिशीलता. अनेक स्वकीय व परकीय राजवटी येथे आल्या व गेल्या; पण जीवनविषयक दृष्टिकोणात म्हणण्यासारखा बदल घडून आला नाही. धर्मकल्पना, अर्थजीवन, ग्रामव्यवस्था व सामाजिक व्यवहाराचे संकेत यांत दीर्घकालापर्यंत मध्ययुगीन संस्कृतीचेच वर्चस्व राहिले. समाजधुरीणांना या स्थितीची अधूनमधून जाणीव होई व पारमार्थिक क्षेत्रात काही आंदोलने निर्माण होत. पारलौकिक क्षेत्रापुरते व्यक्तिविमोचन घडण्यास या चळवळींचा थोडाफार उपयोगही होई; तथापि या चळवळींना भौतिक जीवनातील उन्नतीची साथ न मिळाल्यामुळे येथील ऐहिक जीवन विपन्नच राहिले. पारमार्थिक वाटचालीला पोषक असे काही प्रभावी वाङ्मय यातून निर्माण झाले व भारतीय जीवनातील कर्मठपणा व मिथ्याचार दूर करण्यास त्यांचे काही अंशी साहाय्य झाले हे खरे; पण ते पारंपरिक, बोधप्रचुर, पुनरुक्त व एकांगी स्वरूपाचेच राहिले. या साऱ्यात क्रांतिकारक व वेगवान बदल घडून येण्याची शक्यता प्रथम निर्माण झाली, ती ब्रिटिश अमदानीतच ब्रिटिश संस्कृती मुख्यतः विज्ञाननिष्ठ, नागर व उद्योगप्रवण होती, तर त्याउलट आपली संस्कृती ही पारमार्थिक, कृषिप्रधान व ग्रामीण होती. कृषिप्रधान संस्कृती स्थितिशील, दैववादी व संकुचित असते, तर औद्योगिक संस्कृती गतिशील, प्रयत्नवादी व व्यापक दृष्टीची असते. या औद्योगिक संस्कृतीशी कृषिप्रधान भारतीय संस्कृतीचा संघर्ष होताच जुनी भारतीय संस्कृती विकल झाली.

## नवी पाश्चात्त्य संस्कृती

या नव्या पाश्चात्त्य संस्कृतीचा जन्म युरोपमध्ये सोळाव्या शतकात झाला व अठराव्या शतकातील औद्योगिक क्रांतीने तिला जोर चढला. ही संस्कृती साहसी, व आशिया खंडाच्या मानाने वैज्ञानिक व इतर क्षेत्रांत पुढारलेली होती. या पुढारलेपणाच्या जोरावर, विशेषतः नौकानयनाच्या जोरावर, पाश्चात्त्य संस्कृतीच्या उपासकांनी भारतीय समुद्रावर व्यापाराच्या उद्दिष्टाने फेरफटका मारण्यास पंधराव्या शतकाच्या शेवटापासून प्रारंभ केला. यातील पहिला मुशाफिर जो वास्को-द-गामा, त्याचे आगमन कालिकत येथे २७ मे १४९८ रोजी झाले व आशिया खंडात एका नव्या मनूस प्रारंभ झाला. या काळातील भारतीयांची भूसेना प्रबळ असली, तरी समुद्रावरून येणाऱ्या या संकटास तोंड देण्यास ती समर्थ नव्हती. याचा परिणाम म्हणून, तिन्ही बाजूंनी समुद्रवलयांकित असल्यामुळे सुरक्षित मानला गेलेला भारत आता उघडा

पडला आणि पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज इत्यादी युरोपीय लोकांच्या टोळ्या व्यापाराच्या निमित्ताने इकडे येऊ लागल्या. येथील अंतर्गत यादवीचा व येथील जनतेच्या मागासलेपणाचा फायदा घेऊन निरनिराळ्या ठिकाणी त्या आपला जम बसवू लागल्या. त्यांनी हळूहळू येथील भूप्रदेशही अंकित करण्यास सुरुवात केली. या परकीय सत्तांमध्ये पुढेपुढे चुरस निर्माण झाली. तीत शेवटी यशस्वी झाले ते इंग्रज.

**इंग्रजांचे आक्रमण**

भारतात इंग्रजांचे आगमन सोळाव्या शतकापासून सुरू झाले होते. १७५० इसवीपर्यंत त्यांचे धोरण मुख्यतः व्यापारी होते; १७५०-पासून ते राजकीय होऊ लागले. मुंबई बंदर इ. स. १६६५-पासून त्यांच्या ताब्यात होते. इ. स. १७६७ साली बंगाल प्रांत संपूर्णपणे इंग्रजांच्या ताब्यात आला आणि हळूहळू सारा भारत हस्तगत करण्याची अभिलाषा त्यांच्या मनात जागृत झाली. या त्यांच्या अभिलाषेच्या आड येऊ शकणारी एकच भारतीय सत्ता त्या काळी अस्तित्वात होती, आणि ती म्हणजे मराठ्यांची. मराठ्यांनीही काही काळ भारताच्या सार्वभौमत्वाची स्वप्ने पाहिली होती, पण पानिपतच्या युद्धानंतर मराठी सत्तेला उतरती कळा लागली, ती कायमचीच. थोरल्या माधवरावाने हा डोलारा सावरून धरण्याचा प्रयत्न काही काळ केला, तथापि त्याच्या अकाली मृत्यूमुळे, पेशव्यांच्या घराण्यातील अंतर्गत यादवीमुळे, मुत्सद्द्यांच्या व्यक्तिगत स्वार्थबुद्धीमुळे व एकंदर समाजातील दूरदृष्टीच्या अभावामुळे इंग्रजांच्या सत्तेपुढे मराठ्यांचा निभाव लागणे अशक्य झाले. इ. स. १७८६-पासूनच इंग्रजांची वकिलात पुणे येथे स्थापन झाली होती आणि इंग्रजांना मराठ्यांची मर्मस्थाने पूर्णपणे कळली होती. या परिस्थितीला खुद्द मराठेच जबाबदार होते. कारण मराठ्यांनी आपण होऊनच इंग्रजांना आपल्या अंतर्गत कारभारात हात घालण्याची संधी प्राप्त करून दिली होती. भारतातील एक महत्त्वाचे सत्ताधारी ही इंग्रजांची भूमिका मान्य करूनच राघोबा, नाना फडणवीस व दुसरा बाजीराव या तिघांनीही कारणपरत्वे त्यांचे साहाय्य घेतले होते. दुसरा बाजीराव तर सर्वथैव इंग्रजांच्या मदतीनेच गादीवर आला होता.

**मराठ्यांमधील अराजक**

ज्या काळापासून प्रस्तुतच्या वाङ्मयेतिहासाला प्रारंभ होतो, त्या वेळी दुसरा बाजीराव पेशवाईवर आरूढ होऊन तीनचार वर्षे झाली होती. इ. स. १७९६-मध्ये अनेक लटपटी-खटपटी करून तो गादीवर आला; पण त्याचे आसन कधीच स्थिर नव्हते. त्या काळच्या मुख्य मुत्सद्द्यांपैकी नाना फडणविसाशी त्याचे सख्य नव्हते. बाजीरावाच्या अधिकाराला नानाने मान्यता दिली होती, ती अगदी नाइलाजाने. गादीवर आल्यानंतर वर्षभरातच बाजीरावाने नानाला कैदेत ठेवले. पुढे नानाची सुटका झाली, तरी या धक्क्यातून तो पुन्हा कधी वर आला नाही. आणि या कालखंडाच्या प्रारंभीच – इ. स. १८००-मध्ये – नानाचा मृत्यूही घडून आला. नानाच्या

मृत्यूनंतर त्याच्या तोलाचा मुत्सद्दी पेशवाईत उरला नाही. पराक्रमाच्या बाबतीत पेशव्यांची खरी मदार शिंदे, होळकर आणि गायकवाड यांवर असे; पण त्यांचे आपापसांत सख्य नव्हते. शिवाय होळकरांचे व बाजीरावाचे संबंध सरळ नव्हते. इ. स. १८०१-मध्ये विठोजी होळकराला बाजीरावाने पकडून शनिवारवाड्यात स्वतःच्या डोळ्यांसमोर हत्तीच्या पायांखाली दिले. त्याचा बदला घेण्यासाठी विठोजीचा भाऊ यशवंतराव याने पुणे शहर लुटले. महादजी शिंदे १७९४-मध्येच मृत्यू पावला होता. त्याचा वारस म्हणून आलेला मुलगा दौलतराव हा चौदा वर्षांचा कोवळा पोर होता, व त्याच्याही घरात तंटे चालू होते. परशुरामभाऊ पटवर्धन हा तत्कालीन पिढीतील कर्तबगार सेनानी, पण त्याचे व बाजीरावाचे संबंध ठीक नव्हते. शिवाय, हाही १७९९-मध्ये पट्टणकुडीच्या लढाईत मारला गेला. १८०२-मध्ये, म्हणजे पेशवाईचा अधिकृत लोप होण्याच्या आधीच पंधरा-सोळा वर्षे बडोद्याच्या गायकवाडांनी पेशव्याचा मुलाहिजा न बाळगता इंग्रजांशी स्वतंत्र तह केला होता. खुद्द बाजीरावालाच होळकरांच्या भीतीने इंग्रजांचे साहाय्य घ्यावे लागले होते. बाजीराव पुण्याहून पळून वसईस इंग्रजांच्या आश्रयास गेला, तो जनरल वेलस्लीच्या साहाय्याने १८०३-मध्ये पुन्हा गादीवर स्थानापन्न झाला.

### बाजीरावाचा कारभार

वस्तुतः, ही घटना घडली, तेव्हापासूनच एक प्रकारे पेशवाईचा लोप झाला, असे म्हणावयास हरकत नाही. बाजीरावाचा इंग्रजांशी झालेला वसईचा तह म्हणजे स्वातंत्र्याची किंमत देऊन बाजीरावाने केलेला स्वदेहाचा बचाव होता. इंग्रजांनी पेशवाई खालसा करण्यासाठी १८१८-पर्यंत वाट पाहिली, ती केवळ स्वतःच्या धोरणाच्या सोयीच्या दृष्टीने होय. बाजीरावाचे सारे बालपण नजरकैदेत गेले असल्याने राज्यकर्त्याला आवश्यक असलेल्या शिक्षणाचा लाभ त्याला कधी झाला नव्हता. सततच्या नजरकैदेमुळे व्यापक जीवनाचा अनुभव घेण्याची संधीही त्याला कधी मिळाली नव्हती. रिकामपणचे छंदफंद मात्र त्याने खूप पैदा केले होते शिवाय, तो जात्याच सत्ताभिलाषी, भित्रा, कपटी व कमालीचा ढोंगी होता, आणि त्याचे सारेच धोरण स्त्रैण, संधिसाधू व छाकटे होते. गादीवर आल्यानंतर शासनसंस्था शुद्ध करण्याऐवजी स्वतःची बेफाट चैन चालविण्यासाठी त्याने लोकांकडून सूक्तासूक्त मार्गांनी पैसा उकळण्यास प्रारंभ केला. जनतेवर डोईजड कर लादले, जमीनमहसुलाचे मक्ते देण्यास सुरुवात केली व पैशासाठी अब्रूदार लोकांचा अनन्वित छळ केला. मातबर व कर्तबगार व्यक्तींस जवळ करून त्यांच्या सल्ल्याने चालण्याऐवजी हुजऱ्ये, पाणक्ये, खुशामत्ये इत्यादी व्यक्तींना त्याने जवळ केले. बहुतेक साऱ्या प्रमुख मराठे सरदारांशी याचा या-ना-त्या प्रकारचा बेबनाव होता; आणि ज्या इंग्रज सरकारच्या मेहेरबानीने तो पेशवेपद उपभोगीत होता, त्यांचाही तो मनातून द्वेष करीत होता. इंग्रजांच्या विरुद्ध कारस्थाने करण्यास त्याने प्रारंभ केला. याचा परिणाम म्हणजे

इ. स. १८१८-मध्ये स्वतःच्या डोळ्यांनी पेशवाईचा नाश झाल्याचे पाहणे त्याच्या नशिबी आले व शेवटची अडीच-तीन तपे त्याला महाराष्ट्रापासून दूर अशा ब्रह्मावर्तासारख्या ठिकाणी काढावी लागली. मराठ्यांच्या या राज्यलोपाबद्दल लिहिताना मराठ्यांकडे कलुषित दृष्टीने पाहणाऱ्या ग्रॅण्ट डफसारख्या इतिहासकारानेही केवळ मूर्खपणाने साम्राज्य घालविल्याचे यासारखे दुसरे उदाहरण आढळणार नाही, (Never was an empire so foolishly lost) असे उद्गार काढिले आहेत.

## समाजस्थितीही जबाबदार

शिवछत्रपतींनी स्थापन केलेल्या व नागपूर, इंदूर, ग्वाल्हेर, बडोदा, झाशी येथपर्यंत पसरलेल्या या मराठी सत्तेचा हा लोप केवळ विशिष्ट राजवटीमुळे झाला, असे नसून या नाशाची बीजे फार खोलवर भारतीय जीवनात रुजली होती. बाजीरावच काय, पण त्याआधी झालेल्या नाना, महादजी, सखारामबापू यांसारख्या चतुर मुत्सद्द्यांनाही या गोष्टीची नीटशी कल्पना आली असेल, असे वाटत नाही. तसे पाहिल्यास भारतातील इंग्रजपूर्व कोणत्याही सत्ताधाऱ्याला या एकंदर भारतीय विनाशाची पूर्ण कल्पना आली होती, असे म्हणता येत नाही. पेशवाईचा लोप होण्यापूर्वीच्या कालामध्ये, पेशवाईच्या ऐन भरभराटीतसुद्धा, सामाजिक जीवनाच्या ठराविक चौकटीत विशेष बदल होऊ शकला नव्हता.[१]

## मध्ययुगीन समाजस्थिती

मध्युगीन काळात सरंजामशाही व चातुर्वर्ण्य हीच तत्त्वे दीर्घकालपर्यंत महत्त्वाची मानली जात होती. समाजात स्वधर्मनिष्ठा असली, तरी समाजनिष्ठा निर्माण झाली नव्हती. कुळाची प्रतिष्ठा जातीची शुद्धता व वतनाचा (देशाचा नव्हे,) अभिमान यांभोवतीच सारे जीवनचक्र फिरत होते. वैयक्तिक धर्मनिष्ठा व स्वामिनिष्ठा हे गुण जोपासले गेले होते, पण त्याला सामूहिक अधिष्ठान नव्हते धर्मनिष्ठेतही खऱ्या धार्मिकतेपेक्षा धर्म-

१. "पेशव्यांच्या अमदानीत स्वराज्याची साम्राज्यांत परिणती झाली. मुलुखगिरीमुळे इतर प्रांतांतील संपत्तीचा ओघ हळूहळू महाराष्ट्राकडे वळला. समाजातील सर्वच थरांत थोडेबहुत चैतन्य सळसळू लागले. मराठेशाहीच्या वाढत्या पसाऱ्यामुळे ग्राम-जीवनाची जुनी ठराविक चाकोरी सोडून स्वतंत्रपणे कर्तृत्व गाजविण्याची पुष्कळांना संधि लाभली. कोकणांतील ब्राह्मणांनी रणांगणात समशेर गाजवून हिंदुस्थानच्या राजकारणाची सूत्रे हाती घेतली मावळातील शेतकरी शिलेदार बनले...अशा तऱ्हेने काही थोड्या व्यक्तींच्या आयुष्यात जरी फार मोठे स्थित्यंतर घडून आले, तरी खेड्यापाड्यांतील लक्षावधी लोकांच्या जीवनाची जुनी चौकट अंभग राहिली आणि हिंदू समाजरचनेतील मूलतत्त्वांना यत्किंचितही धक्का बसला नाही. ग्रामसंस्था आणि जातिसंस्था यांच्या उभ्याआडव्या धाग्यांनी आपला सामाजिक जीवनपट विणला गेला होता. ...... वतनदारांचे हक्क आणि कर्तव्ये परंपरेने ठरलेली असल्यामुळे राज्यकर्त्यांमध्ये बदल झाला, तरी ग्रामजीवनात कधी उलथापालथ होत नसे ...... इंग्रज येथे येईपर्यंत आर्थिक क्षेत्रात वतनदारी व सामाजिक क्षेत्रात जातिभावना यांचे वर्चस्व अबाधित राहिले."— महाराष्ट्रातील राष्ट्रवादाचा विकास, नलिनी पंडित, पृ. ४.

भोळेपणा, शास्त्रापेक्षा रूढीचे स्तोम, कर्मकांड, मंत्रतंत्र, जारणमारण, शकुनापशकुन यांवरच विशेष भर दिला जात होता. जातीपोटजातींमुळे समाजाची अनेक शकले झालेली होती. सांस्कृतिक साधने मूठभर लोकांच्या हातांत होती. सामान्य जनता अज्ञानात लोळत होती. उत्पादनसाधने व दळणवळणाचे मार्ग फार मर्यादित होते. शेती, सैनिकी पेशा, वैदिकी व मामुली गरजा भागविणारी कारागिरी यांपलीकडे अर्थार्जनाचे मार्ग उपलब्ध नव्हते उत्तर-भारतात काही प्रमाणात हस्तव्यवसाय, कारागिरी वगैरेंना जसे महत्त्व होते, तसे ते महाराष्ट्रात आढळत नाही मराठ्यांचे वा पेशव्यांचे एकंदर आर्थिक धोरणच उथळ स्वरूपाचे होते. चौथाई, सरदेशमुखी, खडणी, सारा इत्यादी वसूल करणे व उत्तरेकडचा सुवर्णनद दक्षिणेकडे वळविणे ही पेशव्याच्या ऐन भरभराटीतील महत्त्वाकांक्षा. साहुकार म्हणजे राज्याची शोभा ही परंपरागत दृष्टी व कर्जाखाली कपाळ छिनत चालले, ही सर्वांत पराक्रमी ठरलेल्या पेशव्याची — पहिल्या बाजीरावाची — तक्रार लक्षात घेतली, म्हणजे पेशव्यांच्या एकंदर दिवाळखोर आर्थिक धोरणाचे स्वरूप लक्षात येते. कर्जबाजारीपणातून पेशवे कधी वर आले नाहीत. येथे नवे अर्थोत्पादक व्यवसाय सुरू करण्याची कल्पना निर्माण होणे अशक्य होते. महाराष्ट्र मुळातच खडकाळ, नापीक देश; बंगालप्रमाणे सुपीक नव्हे, किंवा गुजरातप्रमाणे व्यापारी वृत्तीचाही नव्हे. महाराष्ट्रीयांनी व्यापाराकडे कधी लक्ष पुरविलेच नाही.[1] याचा परिणाम म्हणजे परकीय व्यापाऱ्यांचा महाराष्ट्रात झालेला सुळसुळाट. उत्तरपेशवाईत साऱ्या बाजारपेठा परदेशी मालाने भरून गेल्या होत्या. उच्च प्रतीचे कारागीर बोलवावयाचे झाले, तरी परके कारागीर बोलवावे लागत. देश-रक्षणाचे कार्यही हळूहळू परक्यांच्या हाती गेले होते पेंढारी, बंडखोर इत्यादींचा साऱ्या देशभर धुमाकूळ सुरू झाला होता. परावलंबन वाढले होते.[2] परावलंबनाचा

१. " पुष्कळ दिवसांपासून दाक्षिणात्यांचा वैश्यवृत्तीकडे बहुतेक ओढा नाही म्हटले, तरी चालेल गेल्या हजारपाचशे वर्षांत विद्वान व्हावे, राज्यकारभार हाकावा, जमेदार बनावे, स्थावर संपादावे,ह्या व ह्यांसारख्या उद्योगांची दक्षिणेत अतोनात चहादारी झाली आणि तागडीमाप हाती धरावे व एकाचे दोन करावे, असल्या वाणिज्याला लोक तुच्छ मानू लागले. ब्राह्मण्य किंवा क्षात्रधर्म यांना काय-तो मान मिळू लागला आणि वैश्यवृत्ति मानहीन झाली." त्रिं. ना. अत्रे, गांवगाडा, नवी आवृत्ती पृ. ११२.

२. "पल्लेदार तोफा, बंदुका, पाणीदार तरवारी व कट्यारी, होकायंत्रे, दुर्बिणी वगैरे युद्धोपयोगी पदार्थ, तसेच घड्याळे, हंड्या, झुंबरे, आरसे, उत्तम रेशमी कपडा, तलम मलमल वगैरे व्यवहारोपयोगी पदार्थ यांकरिताही त्यांना इंग्रज, चिनी, मुसलमान वगैरे लोकांच्या तोंडाकडे पहावे लागे. परदेशी व्यापारी मराठ्यांच्या सौद्यावर गबर होऊन जात. मिजासी किंवा उपयुक्त जिनसा वापरण्याची हौस मराठ्यांना मुळातून मुळीच नव्हती, असे नाही पण या जिनसा स्वतः उत्पन्न करण्याची इच्छा त्यांना फारशी झाल्याचे आढळत नाही."

मराठे व इंग्रज, समग्र केळकर-वाङ्मय, खण्ड ७ पृ, ३०४.

हा दोष वास्तविक साऱ्याच मराठी राज्यकर्त्यांत होता स्वतःची अद्ययावत शस्त्रे तयार करण्याऐवजी ती विकत घेण्याची प्रथा शिवकाळापासूनच पडली होती. वसईच्या मोहिमेत पोर्तुगीजांच्या आधुनिक शस्त्रास्त्रांविरुद्ध झगडताना चिमाजी अप्पाला केवढा त्रास झाला! पण या अनुभवाने पहिला बाजीराव वा पुढे कोणी सावध झाल्याचे दिसत नाहीं. फ्रेंच पलटणी पदरी बाळगून आधुनिक पद्धतीचे कवायती शिक्षण देण्याचा उपक्रम महादजी शिंदे याने काहीसा केला, किंवा उत्तरपेशवाईत पानसे यांच्या नेतृत्वाने पेशव्यांनी आपला तोफखाना थोडाफार सज्ज केला; पण नवयंत्रनिर्मितीची कला मराठ्यांनी व एतद्देशीयांनी आत्मसात करण्याचा उत्साह दाखविला नाही. यंत्रविद्या व धर्मलोप याची काहीतरी सांगड दीर्घकालपर्यंत जनमनात असावी. धर्मलोपाच्या भीतीमुळे शास्त्रीय ज्ञान संपादण्याच्या मागे लागावे, असे तत्कालीन लोकांना वाटले नसेल. कलकत्ता, गोवा, पॉंडिचेरी येथे छापखाने असल्याचे मराठ्यांना विदित होते. पण तसे ते स्वराज्यात निर्माण करण्याचा प्रयत्न इकडे केला गेला नाही. थोरल्या माधवरावाच्या पदरी युरोपियन डॉक्टर होता व दुसऱ्या बाजीरावाला युरोपियन वैद्याकडून देवी टोचून घेतल्या होत्या; पण या वैद्यकाचा पद्धतशीर अभ्यास करण्याची इच्छा येथील लोकांना झाली नाही. अश्वमेधाचे काटेकोर तंत्र मुखोद्गत असलेले वैदिक इकडे अनेक निर्माण झाले; पण अश्वसंगोपनाचे शास्त्र अवगत असलेली माणसे फारच थोडी निघाली. आधुनिक विज्ञानाचे संस्करण इकडे ब्रिटिशपूर्व काळात झालेच नव्हते.[१] याचाच परिणाम म्हणजे भारतीय स्वातंत्र्याचा झालेला लोप.

१. "उत्तम, रेखीव व नेमके हत्यार बनविण्याची कला पैदा होण्यास शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रात व्हावी लागते, ती त्या काळी महाराष्ट्रात नव्हती. शहाजीच्या हयातीत युरोपात डेकार्ट, बेकन इत्यादी विचारवंत सृष्ट-पदार्थ-संशोधनकार्याचे वाली जारीने पंचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहित करीत होते आणि आपल्या इकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत ... इत्यादी संत पंचभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारात राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटीत होते. अशांना स्क्रू, टाचर्णा, बंदूक व तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यात नवल कसचे? थोडक्यात आगस्ट कौंट याच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे महाराष्ट्र त्या वेळीं Metaphysical अवस्थेत होते, आणि Positive अवस्थेत येण्यास अद्याप पाचशे वर्षे अवकाश होता.

"......अनेक शोधांच्या साहाय्याने सिद्ध झालेली जी लांब पल्ल्याची कारागीर हत्यारे, त्यांत त्यांचे (युरोपियनांचे) सामर्थ्य होते. ही हत्यारे म्हणजे युरोपियन शास्त्रीय संस्कृतीचा केवळ निष्कर्ष होत. या हत्यारांच्या जोरावर एक युरोपियन हजार हिंदुमुसलमानांना भारी होता. हा अर्थ शहाजीसारख्या धोरणी दूरदर्शी, मतलबी व जागरूक सरदाराच्या लक्षांत न यावा, अशीच तत्कालीन महाराष्ट्र-समाजाची स्थिती होती. तेव्हा दोषाचा वाटा शहाजीप्रमाणेच तत्कालीन समाजावर पडतो, हे उघड आहे. या बाबतीत शहाजीच्या पंक्तीस अकबर, शहाजहान, मीर जुमला व औरंगजेब असे सारेच बसतात. तेव्हा हा तत्कालीन भारतवर्षीय संस्कृतीतलाच सर्वसाधारण दोष होय, हे कबूल करावे लागते."— वि. का. राजवाडे, 'राधामाधवविलासचंपू', प्रस्तावना, पृ. १०७–१०९.

### कलांकडेही दुर्लक्ष

विज्ञान व व्यापार यांप्रमाणेच विविध कलांकडेही मराठ्यांनी दीर्घकाल दुर्लक्षच केले. शिवकालातच उत्तरेस ताजमहाल व दक्षिणेस गोलघुमट तयार झाला होता. शिवाजीचा व इतर मराठ्यांचा या स्थळांशी घनिष्ठ संबंधही आला होता. पण या कारागिरीसंबंधीचा बरावाईट उल्लेख उपलब्ध कागदपत्रांत आढळत नाही. मोगल रियासतीत ज्याप्रमाणे खास मोगली बाण्याचे शिल्प, चित्र व संगीत तयार झाले, तसे तयार करण्याकडे स्वराज्यकालात कोणी आवर्जून लक्ष पुरविले नाही. किल्ले, वाडे, धर्मशाळा, देवालये, घाट, अन्नच्छत्रे यांसारखे काही उपयुक्त व धार्मिक स्वरूपाचे बांधकाम केले गेले; पण त्यातही कलात्मक दृष्टी कमी होती.[१] वैदिक संस्कृत कवी, पंडित, शाहीर, बखरकार इत्यादींना थोडाफार आश्रय पेशवेकाळात दिला गेला, पण खास ललितकलांकडे लक्ष पुरविले गेले नाही. कदाचित एकंदर धामधुमीमुळे तसे करणे तत्कालीन परिस्थितीत जमलेही नसेल. कारण सबंध स्वराज्यकाळात या ना त्या प्रकारची अस्थिरता सातत्याने जाणवते. शाहू छत्रपतीवर बालपणापासून मोगली वातावरणाचा संस्कार असल्याने मोगलांच्या विलासप्रियतेचे अनुकरण करण्याची वृत्ती मात्र त्याच्या कारकीर्दीपासून वाढीला लागलेली दिसते. गायन, नर्तन, बागबगीचे, रंगपंचमीसारखे सण याना उत्तर-पेशवाईत प्राधान्य आले, ते यामुळेच.

### मराठीला आश्रय नाही

उत्तरकालीन विलासप्रियतेचा हा भाग सोडला, तर मराठी भाषेला शिवकालात किंवा पेशवाईत राजाश्रय असा नव्हता. इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'राधामाधव-विलासचंपू'च्या प्रस्तावनेत शहाजीच्या पदरी असलेल्या कवींची जी यादी दिली आहे, तीत मराठी कवींची संख्या संस्कृत कवींच्या तुलनेने फारच कमी आढळते. शिवाजीने भूषणासारख्या हिंदी कवीला आश्रय दिला, राजव्यवहार-कोशासारखा कोश संस्कृत धर्तीवर रचवून घेतला, अथवा गागाभट्टासारख्या वैदिकाचा गौरव केला, यात मराठीला तसे कुठे स्थान नाही. मोरोपंतांना बारामतीकरांचा किंवा विठ्ठल-नागेशांना काही सरदारांचा आश्रय होता. पण तो गौण सत्ताधाऱ्यांचा; मुख्य सत्ताधाऱ्यांकडून मराठीचा कधी गौरव झाला नाही. रामदास-तुकारामांचा शिवकालात गौरव झाला हे खरे; पण तो कवी म्हणून नव्हे, तर साधू म्हणून. याचाच अर्थ मराठीला वेगळे वाङ्मयीन मूल्य प्राप्त झाले नव्हते, असा आहे. तिचा वेगळा वाङ्मयीन विकास करण्याची आवश्यकता तत्कालीन विचारवंतांना वाटत नव्हती. वाङ्मयदृष्ट्या प्रतिष्ठा होती ती संस्कृताची. पेशव्यांचे राज्य तर बोलूनचालून ब्राह्मणी राज्य. या राज्यात

१. " दोन-अडीचशे वर्षांच्या मराठ्यांच्या अमदानीत एकही देऊळ, किंवा एकही मूर्ती, एकही चित्र असे दाखविता यावयाचे नाही, की जे चालुक्यादींच्या देवालयाशी किंवा मूर्तीशी, किंवा चित्राशी दूरचीही बरोबरी करील."

वि. का. राजवाडे, राधामाधवविलासचंपू. पृ. १८२

वैदिकांची मूळची प्रतिष्ठा श्रावणदक्षिणेच्या रूपाने अधिक गौरविली गेली. संस्कृत भाषेविरुद्ध बंड करून मराठीचा गौरव करण्याची व सामान्य जनतेत संस्कृती पसरविण्याची संतकालीन कल्पना आता मागे पडून उत्तरकालात पुन्हा संस्कृतीकरणाकडे ओढा सुरू झाल्याचे दिसते. मोरोपंताचे काव्य किंवा उत्तरकालीन बखरगद्य याचीच साक्ष देते. पेशवे-काळात सामान्य जनता व उच्चवर्णीय यांच्यातील मुळात असलेले अंतर अधिकच वाढले. चातुर्वर्ण्याची चौकट अधिक बळकट झाली. प्रभुसमाजाला वैदिक ब्राह्मणाचे हक्क नाकारणे किंवा महारसमाजाला गळयात मडके बांधून फिरण्यास भाग पाडणे हे याचेच निदर्शक. सामाजिक वैषम्याचा हा अग्नी आधीपासूनच धुमसत होता. इंग्रजी राजवटीत त्याला अनुकूल संधी मिळताच तो भडकला.

## पूर्वकालीन शिक्षण आणि वाङ्मय

शैक्षणिक बाब ही खास परंपरेनेच ब्राह्मणांकडे आलेली असल्याने तीत पेशवेकालात काही बदल होण्याचे अर्थातच कारण नव्हते. व्यावहारिक, लष्करी व वैदिक असे साधारणपणे तत्कालीन शिक्षणाचे तीन कप्पे मानल्यास, व्यावहारिक शिक्षणात कारकुनी व्यवसायाला लागणाऱ्या शिक्षणाचा व वैदिक शिक्षणात धर्मग्रंथ, वेदवेदांगे यांचा अंतर्भाव होई. व्यावहारिक शिक्षणासाठी पंतोजींच्या व वैदिक शिक्षणासाठी शास्त्रीपंडितांच्या पाठशाळा असत. देणग्या, गुरुदक्षिणा, थोरामोठ्यांचा आश्रय, वतने, नेमणुका इत्यादींवर या शाळांचा निर्वाह चाले. शिक्षण ही पूर्णपणे खाजगी बाब होती. इंग्रजी अमदानीपर्यंत तिला सरकारी यंत्रणेचे स्वरूप आले नव्हते. या काळच्या वाङ्मयावर जी छाप आहे, ती आशयदृष्ट्या धार्मिकतेची व रचनादृष्ट्या पौराणिकतेची. व्यवहारोपयोगी बखरलेखनावरही याची छाया आहे. लोकवाङ्मय सोडल्यास वाङ्मयाला ऐहिक वळण नव्हते.[१] ग्रंथनिर्मितीची संधी व साधने जशी मर्यादित,

१. " धर्मग्रंथाबाहेर स्वतंत्र वाङ्मय असा पदार्थच असू शकत नाही, अशी मराठेशाहीत कल्पना होती. मोरोपंतांची कविता आज आपण वाङ्मय या सदरात घालतो. पण पेशवाईच्या काळच्या ग्रंथसूचीत ती कदाचित धर्मग्रंथांत पडली असती. मोरोपंतांच्या ग्रंथात मुख्यतः भारत, भागवत, रामायण हेच विषय असल्यामुळे व त्यांची स्फुट कविताही केवळ भक्तिप्रधान असल्यामुळे ते ग्रंथ धर्मग्रंथांच्या सदरात घालणेच प्रशस्त वाटले असते. मोरोपंतांच्या ग्रंथांच्या पोथ्या लिहून घेतल्या जात, पण अब्राह्मणांच्या हाती मोरोपंतांची कविताही ब्राह्मणाने सहसा पडू दिली नसती असे वाटते. वेद, वेदांगे, पुराणे हे तर धर्मवाङ्मयच होय. वाटेल ती विद्या धर्मपर मानण्याची–धर्माच्या सदराखाली कोंबण्याची प्रवृत्ती फार जारी होती, असे दिसते. धर्मविचाराची ही एककल्ली दिशा सोडून दिली, तरी व्यावहारिक शिक्षणही फारसे नव्हते, असेच आढळून येते. अक्षर, साधे गणित, हिशेब व थोडेसे संस्कृतज्ञान यांतच उच्च प्रतीच्या गृहस्थांच्या शिक्षणाची परिसमाप्ती तेव्हा होत असे."

मराठे व इंग्रज, समग्र केळकर-वाङ्मय, खंड ७, पृ. ३०४.

तशीच त्यांच्या प्रसाराचीही साधने मर्यादितच होती. मुद्रणव्यवस्थेच्या अभावी ग्रंथ ही चीज फार दुर्मिळ व महाग होती.[1] त्यामुळे संस्कृतीचा प्रसार मुख्यतः होई तो मुखद्वारेच. विद्यासंपादनाचे प्रमुख साधन म्हणजे श्रवण. श्रोता अज्ञ असल्याने पाल्हाळ व पुनरुक्ती या गोष्टी अर्थात आल्याच. हरिदास, पुराणिक यांच्यामार्फतच रामायण, भारत व भागवत यांच्या द्वारा तत्कालीन समाजाचे उद्बोधन व रंजन होत असे. उच्च प्रकारच्या वैचारिक वा नैतिक वातावरणासाठी साधुसंतांनी लिहिलेले वाङ्मय नकलून घेऊन वाचण्याची किंवा वाचवून घेण्याची प्रथा होती. मराठी भाषेपुरता विचार केल्यास ज्ञानेशाची ओवी, तुकयाची अभंगवाणी, वामनाचा श्लोक आणि मोरोपंतांची आर्या हे तत्कालीनांचे मानदंड होते. वैदिक पंडित हे संस्कृताचे चाहते असले, तरी सस्कृत ग्रंथनिर्मितीची परंपरा मात्र लोपली होती. या रूढ उद्बोधनाच्या वा रंजनाच्या प्रकारांत दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत भर पडली, ती विशिष्ट प्रकारच्या शाहिरी काव्याची व उत्तर-हिंदुस्थानी ख्याल, टप्पा, ठुंबरी, गझल, कवाली इत्यादी प्रकारच्या गायकीची. बाजीरावाचा शाहिरांना खास आश्रय असे. त्याच्या अनुकरणाने इतर सरदार वगैरेंनीही या प्रकारच्या काव्याला उत्तेजन दिले. रामजोशी, प्रभाकर, होनाजी, परशुराम, सगनभाऊ ही सारी प्रसिद्ध शाहीरमंडळी याच काळातील. यांचे वेगवेगळे फड असून त्यांत विलक्षण चुरस आढळून येई. क्वचित तिचे पर्यवसान होनाजीसारख्या शाहिराच्या खुनातही झालेले दिसते. बाजीरावाला किंवा 'बाजीरावी' वृत्तीला खास करून आवडेल अशा प्रकारचे उत्तान काव्य लिहिणे हे या शाहिराचे प्रमुख उद्दिष्ट, किंबहुना त्याचा व्यवसायच होता. एका ठराविक विषयाला फाटे फोडून ते बाह्य कल्पनांनी नटविण्याकडे व चविष्ठ करण्याकडे शाहिरी वाङ्मयाचा कल दिसतो. अभिनय, नर्तन व गायन यांची जोड या काव्याला होती. पेशवाईत मॅलेटसारख्या इंग्रज रेसिडेंटाच्या सहवासामुळे युरोपियन चित्रकला किंवा घड्याळे, काचसामान इत्यादीसारख्या वस्तूंचा परिचय मराठ्यांना झाला होता. खुद्द नाना फडणविसाने लाकडी ठोकळ्याच्या साहाय्याने गीता मुद्रित करण्याचा प्रयत्न केला होता, किंवा दुभाषेपणासाठी इंग्रजी भाषेचे अध्ययन काहींनी केले होते; पण हे सारे अगदी जुजबी स्वरूपाचे होते. महाराष्ट्राबाहेर तंजावर येथे निर्माण होत असलेली नाटके किंवा कलकत्त्याजवळ सेरामपूर येथे मराठी ग्रंथ निर्माण करण्याचा खिस्ती मिशनऱ्यांनी चालविलेला प्रयत्न यांची दखल मध्यमहाराष्ट्राला नव्हती.

सारांश, इंग्रजपूर्व राजवटीतील सांस्कृतिक वाङ्मयीन परिस्थितीचा विचार करताना असे दिसते की, एकंदर काळ धामधुमीचा होता. शैक्षणिक साधने फार मर्यादित व तीही मूठभर लोकांच्या हाती होती; बहुजनसमाजाशी त्यांचा संबंध नव्हता.

१. "योगवासिष्ठासारख्या एका पोथीची नक्कल करून घेण्यास त्या काळी सुमारे चारशे रुपये खर्च येई." पेशवेकालीन महाराष्ट्र, वा. कृ. भावे, पृ. १०५.

भोगप्रियतेला उत्तेजन देणारे वाङ्मय सोडले, तर नव्या वाङ्मयाला प्रेरणा देण्याजोगे प्रयत्न तत्कालीन परिस्थितीत घडत नव्हते. जे नव्या प्रकारचे वाङ्मय महाराष्ट्राबाहेर निर्माण होत होते, त्याची जाणीव इकडे नव्हती. संतवाङ्मयाला मान असला, तरी त्या परंपरेत चैतन्यपूर्ण नववाङ्मय निर्माण होत नव्हते. वाङ्मयात भाषेचे संस्कृतीकरण वाढत होते. सारे वाङ्मय साचेबंद व एकारलेले असून त्यावर पारमार्थिकतेची दाट सावली पडली होती. यातही पारंपरिकतेचा व पुनरुक्तीचाच भाग फार होता. पद्याच्या मानाने गद्याची निर्मिती फार तोकडी होती. मराठी भाषेला राजाश्रय नव्हता. वेगळे मूल्य नव्हते. व्यावहारिक गद्यावर फारसीची छाया होती. या राजकीय, सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक वातावरणात इंग्रजांची राजवट सुरू झाली. सर्व बाजूंनी मोडकळीस आलेल्या या मध्ययुगीन संस्कृतीमध्ये इग्रजी अंमल बसल्याबरोबर अल्पकाळातच अनेक स्थित्यंतरे झाली व मराठी वाङ्मयाला अगदी वेगळे वळण लागले.

**नवीन पाश्चात्त्य संस्कृती**

पाश्चात्त्य संस्कृतीच्या जीवनविषयक दृष्टिकोणाचा विचार करिता तो भारतीय दृष्टिकोणापेक्षा अगदी वेगळा असलेला दिसतो. १७५०-नंतर झालेल्या औद्योगिक क्रांतीमुळे युरोपमध्ये भौतिक सुधारणांना चालना मिळाली. राजकीय क्षेत्रात लोकशाही, सामाजिक क्षेत्रात समता व धार्मिक क्षेत्रात अंतःकरण-प्रवृत्ती महत्त्वाची मानण्यात येऊ लागली. विज्ञानाच्या सामर्थ्याच्या प्रत्ययामुळे व तज्जन्य नव्या उत्साहामुळे एक नवी जीवनदृष्टी तेथील जनतेत दृढमूल झाली. ऐहिक सौख्य, आर्थिक विकास, उपयुक्तता व बुद्धिप्रामाण्य इत्यादी मूल्यांना अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले. व्यापारस्वातंत्र्यापोटी व्यक्तिस्वातंत्र्याचा जन्म झाला. मानवतेबद्दलची नवी जाणीव आली. उदारमतवादाचे व लोकशाहीचे वारे वाहू लागले. नव्या औद्योगिक वसाहती निर्माण झाल्या. धर्माच्याइतकेच देशाभिमानालाही महत्त्व आले. सामान्य उपेक्षित जनतेला स्वतःच्या हक्कांची जाणीव झाली. लोकशिक्षण ही सरकारची जबाबदारी ठरली. ऐहिक सुखोपभोगाची व दळणवळणाची साधने वाढू लागली. जन्मापेक्षा कर्मावर योग्यता मानली गेली. श्रद्धायुगाचा लोप होऊन बुद्धियुगाचा जन्म झाला. सामाजिक न्यायबुद्धि व निसर्गाकडे पाहण्याची एक नवी दृष्टी समाजाला आली. विज्ञाननिष्ठ ज्ञानातून एक नवे नीतिशास्त्र घडत होते. विश्व हे एक सुंदर व सुसज्ज यंत्र आहे. निसर्गात योजनाबद्धता आहे, जीवित विकासशील आहे, निसर्गाचे अनुकरण म्हणजे पर्यायाने ईश्वरी नियमांचे पालन, मानवसेवेनेच ईश्वरसेवा केल्याचे श्रेय मिळते, अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाला इंग्लंडमध्ये मान्यता मिळाली होती. इंग्रजांची सत्ता प्रस्थापित झाली, त्या वेळी इंग्लंड लोकशाहीच्या बाबतीत युरोपमध्ये अग्रगण्य ठरले होते. मध्यवर्गीय सुशिक्षितांचे राजकारणात महत्त्व वाढत होते. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धात ( इ. स. १७७६–१७८३ ) केवळ अमेरिकेच्याच स्वातंत्र्याची नव्हे,

तर एक प्रकारे साऱ्या मानवजातीच्या स्वातंत्र्याची सनद तयार झाली होती.[1] या नव्या वैचारिक आंदोलनांचा इंग्रजी वाङ्मयावर परिणाम होणे अपरिहार्य होते. ग्रीक-लॅटिनऐवजी देशी भाषांना महत्त्व आले होते. गद्य वाङ्मयाचा सर्वांगीण विकास झालेला होता. औद्योगिक क्रांतीनेच रोमँटिक वाङ्मयप्रवृत्तींना जन्म दिला होता. वर्ड्स्वर्थ व कोलरिज यांची 'लिरिकल बॅलड्ज्' १७९८-मध्येच प्रसिद्ध झाली होती. शेली, कीट्स, बायरन हे प्रसिद्ध रोमँटिक कवी एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातच कर्तबगारी गाजवून गेले होते; आणि स्कॉट हा प्रसिद्ध कादंबरीकार या शतकाच्या आरंभी नुकताच उदयास येत होता.

## इंग्रजांचे स्वागत

या साऱ्या आयुधानिशी सज्ज झालेल्या इंग्रज संस्कृतीला येथे स्थिर करण्यास एतद्देशीयांतील अनेक थरांनी साहाय्यच केले. इंग्रजांची राजवट व्यापारी असल्याने बंगालमधील व्यापाऱ्यांनी बंगालमध्ये तिला स्थिरस्थावर होण्यास मदत केली. महाराष्ट्रात असा व्यापारी वर्ग नसला, तरी सर्वसाधारण माणूस बाजीरावाच्या अशान्त व अव्यवस्थित राजवटीला कंटाळलेला होता. इतर प्रांतांतील इंग्रजांची सुयंत्रित राजवट पाहून येथील जनतेला त्यांच्याबद्दल एक प्रकारचे आदरमिश्रित कौतुक वाटत होते. इंग्रजी सत्तेचे यामुळे येथे स्वागतच झाले.[2] येथील राजेरजवाडे केव्हाच हतबल झाले होते. ज्या सैन्याच्या जोरावर परचक्राचा प्रतिकार करावयाचा, त्या स्वदेशी सैन्याला स्वकीयांच्या बेशिस्त नोकरीपेक्षा इंग्रजांची सुव्यवस्थित पद्धतीची नोकरीच बरी वाटत होती. स्वदेशाभिमानाचा प्रश्न नव्हताच. सैनिकांचा धर्माभिमान दुखविला नाही आणि त्यांस पोटास दिले म्हणजे झाले, 'मग ते आपला बाप असला, तरी त्याच्यावर बंदूक उचलण्यास मागे पाहणारे नाहींत.' (लोकहितवादी – ऐतिहासिक गोष्टी, भाग १, पृ. १५९) या वृत्तीचे येथील सैनिक होते. त्यामुळे इंग्रजांनी भारत पादाक्रांत केला, तो एतद्देशीय सैन्याच्या जोरावरच. इंग्रज सरकारच्या सैन्यात शेकडा वीसहून अधिक युरोपियन सैनिक केव्हाच नव्हते. परकीय, दूरस्थ, परधर्मीय, मूठभर व्यापारी मंडळाला स्थानिक सैनिकांच्या बळावरच येथे प्रचंड साम्राज्याचे आधिपत्य प्राप्त व्हावे,

---

1. "All men are created equal, that they are endowed by their creator with certain inalienable rights, that among these are life, liberty and pursuit of happiness."

अमेरिकन स्वातंत्र्याचा जाहीरनामा

२. "इंग्रजी अमलाच्या आधीं प्रजेची दुर्दशा, मराठेशाहींत दाद नाहीं, व मक्तेदारीचा जुलूम, तसेच लष्करे, शिपाई जिकडेतिकडे फिरत, त्यांतून पेंढाऱ्यांचा उपद्रव; लोक अगदीं त्रासून गेले. त्यामुळे इंग्रज चांगला व इनसाफी असे लोकांस वाटूं लागलें व त्याचें राज्यनिर्मितीस साह्य मिळाले."

लोकहितवादी, ऐतिहासिक गोष्टी, भाग १, पृ. ८३.

ही अद्भुत किमया घडून आली, ती वरील विशिष्ट परिस्थितीमुळेच. इंग्रजांच्या चाकरीवर येथील सैनिकच खूष होते असे नव्हे, तर पुढील कालातील व्यक्तींनाही देशी संस्थानी नोकरीपेक्षा इंग्रजांची सेवा शतपटींनी बरी वाटे.[1] येथील विचारवंतांच्या निरनिराळ्या थरांनाही स्वदेशहितदृष्ट्या इंग्रजांचे राज्य येथे रहावे, असे प्रारंभकालात तरी मनःपूर्वक वाटत होते. ' इंग्रज लोक येथून जावेत, ही शहाण्याने अपेक्षा करू नये ' हे लोकहितवादींचे उद्गार, १८५७-च्या बंडाला प्रतिकूल असलेली सर्वसाधारण सुशिक्षितांची वृत्ती, " निर्माणकर्त्याने इंग्लिश लोकांस...पंगुशूद्रादि अतिशूद्रादि धूर्त आर्य अशांच्या दास्यत्वापासून मुक्त करण्याकरितां या देशांत मुद्दाम पाठविले आहे," ही जोतीराव फुले यांनी केलेली घोषणा ( आजकालचा महाराष्ट्र, पृ. १०४ ) किंवा न्यायमूर्ती रानड्यांसारख्या समतोल व्यक्तींची इंग्रजी राज्याबाबतची दैवी योजनेची ( Divine Dispensation ) भूमिका लक्षात घेता इंग्रजी राज्य हे भिन्न-भिन्न कारणांसाठी का होईना, पण अनेकांना कसे हवेसे वाटत होते, हे स्पष्ट होते.

**ब्रिटिश राजवटीचे स्वरूप**

येथील परिस्थितीचा मागासलेपणा, इंग्रजाकडे असलेली ऐहिक अभिवृद्धीची समृद्ध सामग्री व त्यांच्या राजवटींना अनुकूल असलेली जनमने पाहता एकंदरीने येथे राजकीय, सामाजिक वा आद्योगिक क्षेत्रांत केवढी तरी प्रगती होणे शक्य होते; पण त्या मानाने तशी ती झाली नाही. कारण या राजवटीचा मूळ पाया परकीय व स्वार्थी तर होताच; शिवाय तिचे उपरे स्वरूप कधीच नष्ट झाले नाही. भारतातील यापूर्वीच्या परकीय राजवटी सत्तासंपादनानंतर येथेच स्थायिक झाल्या; तसा ब्रिटिश राजसत्तेचा केव्हाच उद्देश नव्हता. ही सत्ता व्यापारी होती. त्यामुळे तीत ध्येयवादापेक्षा मतलब व संधिसाधूपणा यांना प्राधान्य होते. येथून कच्च्या मालाची निर्यात करून त्या ठिकाणचा पक्का माल आयात करावा, खिस्ती धर्म व कचा माल यांची येथे एक वसाहत निर्माण करावी, या दृष्टीनेच राजकर्त्यांकडून सारा व्यूह रचण्यात येत होता. मूळ ब्रिटिश सत्ता जरी लोकशाहीप्रवण असली, तरी तिचा भारतातील अवतार साम्राज्यशाही स्वरूपाचा होता. साम्राज्यशाहीने उदारमतवाद वा लोकशाही यांचे कितीही अवसान आणिले, तरी त्यामुळे तिचे आर्थिक पिळवणुकीचे धोरण नष्ट होत नाही. साम्राज्यांतर्गत वसाहतीचा विकास मूळ साम्राज्यशाहीला पोषक होईल एवढ्याच मर्यादेत होणार, हे उघड होते. त्यामुळे स्वतःच्या हितसंबंधांना सोयीच्या व सुखावह होतील, तेवढ्याच गोष्टी इंग्रज राजवटीने येथे केल्या. एखाददुसऱ्या स्थानिक

१. " इंग्रजांकडील पसाभर बाजरी घेऊन त्यांची चाकरी करावी, परंतु यांचे रुपये-मशाल-अबदागिरी नको."

संस्थानिकाच्या पदरी असलेल्या उच्चपदस्थ देशी अधिकाऱ्याने दादोबांजवळ काढलेले उद्गार. दादोबा पांडुरंग, पृ. १७७.

अधिकाऱ्याला उच्च मानवी भूमिकेवरून येथील लोकांसाठी अधिक काम करावेसे वाटले, ( असे काही इंग्रजी राजवटीच्या आरंभकालात होते, हे मान्य करावयास हवे.) तरी तसे करण्यास तो अधिकारी स्वतंत्र नव्हता. येथील कंपनीच्या शासनसंस्थेची शेंडी इंग्लंडमधील कंपनीच्या नियामक-मंडळाच्या हाती होती, व या मंडळावर ब्रिटिश पार्लमेंटाची देखरेख होती. कधीकधी येथील परिस्थिती व नियामकमंडळाची उद्दिष्टे परस्परांना पोषक नसत; त्यांत विसंगती व विरोधही आढळे. ( उदा. ख्रिस्तीधर्म-प्रचारकांना येथे मोकळीक देण्याचा प्रश्न अथवा शैक्षणिक माध्यमाचा प्रश्न ) त्यामुळे शासनसंस्थेची पावले कधी उलट, तर कधी सुलट दिशेने पडत. म्हणून ब्रिटिश राजवटीतील बदल एका सरळ रेषेत होणे शक्य नव्हते. ब्रिटिश सत्तेने आपले प्रत्येक पाऊल अतिसावधपणे व जपून टाकल्याने धोरण म्हणून बऱ्याच वेळा येथील जुन्याच जीवनमूल्यांचा पुरस्कार केल्यामुळे येथे आमूलाग्र क्रांती घडणे अशक्य होते. ब्रिटिशांच्या ताब्यात आलेला भारतीय प्रदेश मूळचाच जाती, धर्म, भाषा, संस्कार इत्यादींच्या वैचित्र्याने गजबजलेला; त्यातून तो सलगपणे त्याच्या कक्षेत एकाच वेळी न आलेला; त्यामुळे जो प्रदेश हाती येई, त्या-त्या प्रदेशातील स्थानिक परिस्थितीप्रमाणे तेवढ्या-पुरते काही धोरण इंग्रज राजवटीकडून ठरविले जाई. याचा परिणाम म्हणून ब्रिटिश सत्तेचे संस्करण भिन्न-भिन्न प्रकारचे झाले, आणि ब्रिटिश सत्तेचे सार्वभौम सत्तेत रूपांतर झाल्यानंतरदेखील संस्थानांच्या रूपाने येथील काही भूभाग मध्ययुगीन अवस्थेत राहिला. विज्ञानाबरोबर येणारे औद्योगीकरण व सर्वांगीण भौतिक विकास हा ब्रिटिशांच्या मतलबाला पोषक नसल्यामुळे काही बंदरे व राजधान्यांची ठिकाणे सोडली, तर येथे सर्वत्र जुन्याचेच अवशेष मोठ्या प्रमाणात शिल्लक राहिले. त्यामुळे येथील जुन्या जगाला तडे गेले, पण त्या जागी नवे वैभवसंपन्न जग निर्माण झाले नाही. सांस्कृतिकदृष्ट्या येथील वातावरणाला परस्परविरोधी हेलकावे मिळाले. जागृती आली, पण ती अर्धवट; प्रकाश आला, पण तो अंधुक आणि मर्यादित कक्षेत. त्यामुळे चाचपडण्याची अवस्था संपली नाही; धडपड मात्र वाढली या धडपडीची जी अंगे होती, ती अनेकविध; तीत कधी इंग्रजी संस्कृतीचे अनुकरण होते, तर कधी संघर्ष होता; कधीकधी समन्वयही आढळे. या संघर्षाची, अनुकरणाची व समन्वयाची अवस्था एकाच वेळी चालू असल्याचीही दृश्ये दिसतात.

## ब्रिटिश राजवटीचे फायदे तोटे

ब्रिटिश राजवटीने येथील जनतेला एकच्छत्री अंमल, दळणवळणांच्या साधनांची वृद्धी, कायदा व सुव्यवस्था यांचे राज्य, शांतता, मुद्रणकला, आधिभौतिक संस्कृतीचा परिचय, संघटना, जीवनाकडे पाहण्याची नवी दृष्टी, तिच्या आविष्काराची नवी साधने, समाजातील साऱ्याच थरांना आत्मविमोचन करून घेण्याची तात्त्विक संधी इत्यादी गोष्टी प्रथमच उपलब्ध करून दिल्या. या दृष्टीने ही राजवट पुरोगामीच

मानावयास हवी;[1] पण वर सांगितल्याप्रमाणे काही बाबतीत तिने बळेच मागासलेल्याही मूल्यांचा पुरस्कार केल्याने येथे नव्याजुन्याची ओढाताण फार मोठ्या प्रमाणात सुरू झाली. त्याने सुशिक्षित-अशिक्षित, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, सनातनी-सुधारक, ख्रिस्ती-ख्रिस्तीतर, राज्यकर्ते-प्रजा इत्यादी अनेक द्वंद्वांना जन्म दिला. ब्रिटिशांइतकीच येथील विशिष्ट परिस्थितीही याला अर्थातच जबाबदार होती. या द्वंद्वात प्रारंभी उच्चवर्णीय भारतीय व इंग्रज विरुद्ध सामान्य जनता असा सामना होता, तर कालांतराने इंग्रज व बहुजनसमाज विरुद्ध उच्चवर्णीय असे स्वरूप त्याला प्राप्त झाले. उच्चवर्णीय भारतीय व बहुजनसमाज विरुद्ध इंग्रज ही याची कालांतराने निर्माण झालेली शेवटची अवस्था. तिच्याशी प्रस्तुत आपल्याला कर्तव्य नाही; प्रस्तुत प्रारंभावस्थेपुरताच विचार करावयाचा आहे.

## मराठी भाषेचे क्षेत्र

माऊंट स्टयुअट एल्फिन्स्टनने कंपनी-सरकारचा प्रतिनिधी म्हणून ज्या वेळी मुंबई प्रांताचा कारभार हाती घेतला, त्या वेळी मराठी भाषेत व्यवहार करणारा फार मोठा भूभाग त्याच्या ताब्यात आला. निजाम सरकारच्या ताब्यातील मराठवाडा सोडला, तरी मराठी संस्थानांच्या रूपाने नागपूर, इंदूर, बडोदे, ग्वाल्हेर, झाशी हा मध्यभागातील सर्व टापू व मुंबई प्रांताचा सारा भाग ( यात मुंबई-कर्नाटकाचाही समावेश होतो; तेथील कोर्टकचेरीची भाषा त्या वेळी मराठी होती. ) यात समाविष्ट होतो. भाषेचा हा भौगोलिक व्याप जरी मोठा असला, तरी नव्या सांस्कृतिक संपर्काच्या दृष्टीने मुंबई-पुणे व त्याचा परिसर एवढा भाग विचारात घ्यावा लागतो.

## मुंबई आणि पुणे

मुंबई व पुणे आणि त्याच्या आसपासचा भाग या दृष्टीने विचारात घेतानाही मुंबई व पुणे अलग-अलगपणेच लक्षात घ्यावी लागतात. मुंबई व पुणे यांतील भौगोलिक अंतर जरी अल्प असले, तरी सांस्कृतिक अंतर फार मोठे होते. पेशवाई जाण्याआधी सुमारे शंभर-दीडशे वर्षांपासून मुंबईवर इंग्रजांचे वर्चस्व होते. पेशवाईत इंग्रजांचा उल्लेख पुष्कळदा ‘ मुंबईकर ’ असाच केला जात असे. मुंबई हे एक बंदर असल्याने इंग्रजांचे ते एक प्रमुख व्यापारी केंद्र होते. व्यापाराच्या निमित्ताने गुजराती, पारशी वगैरे जमाती तेथे स्थायिक झाल्या होत्या. यामुळे हे शहर औद्योगिक क्षेत्रात पुढारलेले होते. इंग्रजांच्या प्रदीर्घ सहवासाने व मिशनरी चळवळीमुळे येथे आधुनिक

१. लो. टिळकांनी इंग्रज राजवटीचे फायदे सांगताना खालील गोष्टी नमूद केल्या आहेत — “ शांतता, कायद्याची सर्वत्र व्यवस्था, अपराध्यांचा बंदोबस्त, सार्वजनिक आरोग्य, व्यापारसमृद्धी, शेतकीसुधारणा, खनिज व उद्भिज्ज संपत्तीची अभिवृद्धी, विद्यादानाच्या अनुपम सोयी, स्वराज्य-कारभाऱ्यांची प्राप्ती, लेखनस्वातंत्र्य, यंत्रादी सामग्रीचा परिचय आणि स्वातंत्र्याची अभिरुची. ”

लो. टिळकांचे केसरीतील लेख, खंड १, पृ. ७३.

सुधारणांचा जमानाही पेशवाई जाण्याच्या पुष्कळच आधी सुरू झालेला होता. इंग्रजी भाषा व चालीरीती, शिक्षणसंस्था, मिशनरी हालचाली, व्यापारी उलाढाली, वृत्तपत्रे इत्यादींमुळे इंग्रजी संस्कृतीचेही या भागातील ते प्रमुख केंद्र बनले होते. याउलट पुणे ही पेशव्यांची राजधानी असल्याने या शहरावर जो पगडा होता, तो साऱ्या जुन्या कल्पनांचा. किंबहुना, पेशव्यांच्या राजवटीमुळे पुणे हे जुन्या संस्कृतीचे भारतातील एक प्रमुख ठिकाण बनले होते. श्रावणदक्षिणेच्या निमित्ताने वैदिक विद्येत पारंगत असलेली भारतातील सारी मंडळी पुण्यास वर्षातून एकदा तरी भेट देत. राज्यकर्ते ब्राह्मण असल्यामुळे पुणे हा वैदिक संस्कृतीचा मानबिंदू ठरला होता. पुणे व मुंबई या दोन्ही शहरांची भाषा मराठी असली, तरी पुणे-मुंबई याच्या सांस्कृतिक वातावरणात वरील कारणांमुळे महदंतर होते. पुण्याचा ब्राह्मण मनुष्य कारणपरत्वे काही काळ मुंबईस राहून पुण्यास परत आल्यानंतर पुणेकरांनी त्याला बाटगा ठरवून बहिष्कृत केल्याचेही उदाहरण आढळते.[१] दोन शहरांतील या सांस्कृतिक भिन्नतेमुळे अव्वल इंग्रजीतील आधुनिक चळवळींचे पुढारीपण स्वाभाविकपणे मुंबईकडे गेले. नव्या मराठी गद्याची घडण मुंबईसच झाली व नवे ग्रंथकार निर्माण झाले ते प्रथम मुंबईतच व भाषेवर प्रभाव पडला, तोही मुंबईच्या आसपासच्या भागातील कोकणी बोलीचा.

### पेशवाईच्या अस्ताचा पुण्यावरील आघात

पेशवाईच्या नाशामुळे मुंबईवर काही परिणाम होण्याचे कारण नव्हते; पण पुण्यावर त्याचा फार मोठा आघात झाला. पेशवाईच्या लोपामुळे तीवर आधारलेली अर्थव्यवस्था कोलमडून पडली, जुने व्यवसाय नष्ट झाले, सैनिकी पेशाला उतरती कळा लागल्याने शेतीवर अधिक ताण पडला, बेकारी वाढली, व्यापार मंदावला व पेंढारी, भिल्ल वगैरेंच्या उपद्रवाचे प्रमाण वाढले. या सर्वांत पेशवाईच्या विनाशाचा फार मोठा आघात जर कोणावर झाला असेल, तर तो पुण्याच्या ब्राह्मणवर्गावर. या वर्गाचा आश्रयच नष्ट झाल्याने त्याची स्थिती फार केविलवाणी बनली. इंग्रज राजवटीबद्दल एक प्रकारचा द्वेष त्याच्या मनात यामुळे निर्माण झाला. या ब्राह्मणवर्गाचे तत्कालीन समाजावर धार्मिकदृष्ट्या फार मोठे वजन होते. एल्फिन्स्टनला या साऱ्या परिस्थितीची चांगली जाणीव होती. त्याला येथे शांतता व सुव्यवस्था निर्माण करून आपले राज्य सुस्थिर तर करावयाचे होतेच; शिवाय, पेशवाईच्या नाशाने दुखावल्या गेलेल्या निरनिराळ्या वर्गांच्या मनोभावनेवर फुंकर घालून त्यांच्या अंतःकरणात नव्या राजवटीबद्दल अनुकूल ग्रहही निर्माण करावयाचा होता; आणि हे करीत असताना स्वतःचा मतलब साधण्यासाठी नव्या संस्कृतीचे आरोपणही त्याला अभिप्रेत होते. हे काम फार जिकिरीचे व गुंतागुंतीचे होते, पण एल्फिन्स्टनने ते फार कौशल्याने पार पाडले. अव्वल इंग्रजीतील सांस्कृतिक घडामोडींवर एल्फिन्स्टनची फार मोठी छाप

१. विष्णू कृष्ण चिपळूणकर : काल आणि कर्तृत्व, ग. त्र्यं. माडखोलकर, पृ. ४६.

आहे. कारण या कालातील सांस्कृतिक घडामोडींची सारी सूत्रे राज्यकर्त्यांच्या हातात होती व एल्फिन्स्टन हा मुंबई प्रांताचा इ. स. १८१९-१८२७-पर्यंत प्रमुख शासक होता.

### एल्फिन्स्टन

इंग्रजांच्या सुदैवाने इंग्रज राजवट येथे स्थिर करण्यास हेस्टिंग्ज, वेलस्ली, बेंटिंक, मॅलेट, मन्रो, मेटकाफ यांसारख्या मुलकी व लष्करी या दोन्ही क्षेत्रांतील निपुण व्यक्ती शासनसंस्थेची धुरा वाहण्यास मिळाल्या. या साऱ्या व्यक्ती सुसंस्कृत, पुरोगामी विचाराच्या, उदारमतवादी धोरणावर श्रद्धा असलेल्या होत्या. ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभावस्थेतील या अव्वल दर्ज्याच्या कर्तबगार व धोरणी मुत्सद्द्यांत एल्फिन्स्टनची प्रामुख्याने गणना होते. हा प्रथम भारतात आला, तो ईस्ट इंडिया कंपनीच्या कचेरीतील सामान्य कारकून म्हणून; पण पुढे स्वतःच्या कर्तबगारीने तो वर चढला. राजकीय दृष्ट्या महत्त्वाच्या मानलेल्या भारतातील साऱ्या प्रमुख स्थळांना त्याने भेटी दिल्या होत्या. निरनिराळ्या लष्करी मोहिमांत तो सामील झाला होता. येथील लोक-स्थितीचे, परंपरांचे व इतिहासाचे त्याने सूक्ष्म निरीक्षण केले होते. तो स्वतः मोठा व्यासंगी, रसिक वृत्तीचा, व कला आणि वाङ्मय यांचा भोक्ता होता. येथील सनदी नोकरांना शिक्षण देण्याची कंपनी सरकारची जी योजना होती, तीत तो प्रारंभी विद्यार्थी म्हणूनही दाखल झालेला होता. मराठ्यांच्या राज्यकारभाराशी त्याचा १८०२–३-पासूनच संबंध आला होता व मराठ्यांच्या गुणदोषांचा त्याने बारकाईने अभ्यास केला होता. येथे त्याने जे धोरण आखले, ते विवेकी, धूर्त, धिमे व दूरदृष्टीचे होते.

### आणि त्याचे शासनेचे धोरण

आपण परकीय, परधर्मीय; आपल्याला जे राज्य करावयाचे आहे, ते मुख्यतः स्थानिक सैन्याच्या बळावर; हे सैन्य पोटार्थी असले. तरी त्याचा धर्माभिमान कडवा आहे; येथील जनतेत परंपरापालन फार कडकपणे करण्यात येते; या बाबतीत प्रत्यक्षपणे काही ढवळाढवळ केल्यास आपल्या सत्तेलाच धोका आहे, हे या नव्या राज्यकर्त्यांनी ओळखले होते; म्हणून नव्या राजवटीचे परकीयत्व येथील जनतेला जाणवू नये, यासाठी शक्य तितके कसोशीचे प्रयत्न या नव्या राजवटीने केले. एल्फिन्स्टन, मन्रो यांसारखे अधिकारी इंग्लंडमधील उदारमतवादी नव्या मानवतेने प्रभावित झाले होते. येथील मागासलेल्या जनतेसाठी काही करावे, अशी त्यांची उत्कट इच्छा होती. म्हणून येथील जनतेत सुधारणा तर व्हावी, पण त्याचबरोबर त्यांना नव्या राजवटीचे परकीयत्वही जाणवू नये, असे सहिष्णू धोरण त्यांनी आखले.[1]

---

1. "Liberal treatment has always been found the most effective way of elevating the character of any people and we may be sure that it will produce a similar effect on that of the people of India."

T. Munro's Minute of 1824, The Making of British India Ramsay Muir, page 284

मराठ्यांचे स्वराज्य नुकतेच गेलेले असल्याने त्याच्या आठवणी त्यांच्या मनात अगदी ताज्या होत्या. मराठा हा इतर भारतीयांप्रमाणे स्वधर्माभिमानी तर आहेच, शिवाय तो स्वभाषाभिमानीही आहे, हेही इंग्रजांनी ओळखले होते. म्हणून येथील जनतेला शक्य तितके कमी दुखविणारे, त्यांच्या जीवनव्यवस्थेत कमीत कमी ढवळा-ढवळ करणारे व त्यांना न्याय्य वाटणारे धोरण एल्फिन्स्टनने अवलंबिले. पुण्यात संस्कृत कॉलेज काढणे, ब्राह्मणदक्षिणेची पद्धती चालू ठेवणे, पेशवेपूर्व वतनदाराचे हक्क शक्य तर अबाधित ठेवणे इत्यादी एल्फिन्स्टनच्या धोरणामागची भूमिका हीच आहे. महसूल वसूल करणाऱ्या आपल्या अधिकाऱ्यांना त्याने जो आदेश दिला तो परंपरेने चालू असलेली व्यवस्थाच शक्य तितकी चालू ठेवण्याचा.[1] जमाबंदीच्या क्षेत्रात हे जे धोरण त्याने पतकरिले, तेच इतर क्षेत्रातही. इतरांनी आपल्या भावनांविषयी आत्मीयता दाखवावी असे वाटत असेल, तर आपण इतरांच्या भावनांची कदर केली पाहिजे, केवळ सुव्यवस्था व कायदा करून हे होणार नाही, असे याबाबतचे सूत्र त्याने सांगितले आहे. स्वतःची राजवट स्थिर करण्याच्या धोरणाचे हे जसे एक अंग होते, तसेच त्याचे दुसरे अंग नवसंस्कृतीशी जनतेचा परिचय करून देणे हे होते. कोणत्याही नव्या संस्काराचे बीजारोपण करण्याचे सर्वमान्य साधन शिक्षण हेच असल्याने राज्यकर्त्यांना नवशिक्षणाची कास धरणे भाग होते. आडमुठ्या माणसाशी व्यवहार करण्यापेक्षा सुजाणाशी व्यवहार करणे कमी धोक्याचे, असेही एक सूत्र एल्फिन्स्टनने प्रतिपादिले आहे.[2] या सूत्रानुसार वर दिलेल्या धोरणाच्या दोन्ही बाजू लक्षात घेऊन त्याने येथे नव्या शिक्षणाचा पाया घातला आणि या पायावरच आधुनिक काळातील मराठी वाङ्मयाची इमारत उभारली गेली.

### शिक्षणविषयक कार्यवाही

बाजीरावाच्या कारकीर्दीत समाजात शिरलेला कमालीचा व्यसनीपणा व येथील समाजातील अज्ञानजन्य समजुती नष्ट व्हाव्यात, हाही एक उद्देश नवशिक्षणामागे होता. समाजातील दुर्गुण नष्ट होण्यास एल्फिन्स्टनच्या मते शिक्षण हाच एक उपाय होता.[3]

1. "Maintain the native system; levy the revenue according to the actual calculation; make the assessment light; impose no new taxes, and do away with none, unless obviously unjust, above all make no new innovations."

Rulers of India — Elphinston, page 136.

2. "Popular knowledge is a safer thing to deal with than popular ignorance."

3. "I do not perceive what we can do to improve the morals of the people except by improving their education."

Selections from the Records of the Govt. of Bombay (Education), Part-I, 1819-1852.
Edited by R. V. Parulekar, page 91.

एका बाजूने हे करीत असता पेशवाईच्या लोपामुळे असंतुष्ट झालेल्या ब्राह्मणवर्गाला खूष करण्यासाठी त्याने पुण्यास एक पाठशाळावजा खास संस्कृत कॉलेजही १८२१-मध्ये स्थापन केले. यात अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना विद्यावेतन देण्याचीही सोय होती. एवढेच नव्हे, तर त्यांच्या औषधपाण्यासाठी, खाण्यापिण्यासाठी व त्यांच्या धार्मिक सण-उत्सव वगैरेंसाठी वेगवेगळ्या खर्चाचीही तरतूद त्याने केली होती. तत्कालीन चालीरीती, सोवळेओवळे इत्यादी गोष्टी तेथे पाळण्याची मुभा विद्यार्थ्यांस होती. या कॉलेजच्या स्थापनेसाठी एल्फिन्स्टनने दसऱ्याचा मुहूर्तही शोधून काढला होता. असेच एक कॉलेज नासिक येथे काढण्याचा त्याचा उद्देश होता, पण तो सफल झाला नाही. येथील असंतुष्ट उच्चवर्णीयांचा अनुनय करून त्यांना अनुकूल करण्याच्या प्रयत्नांपैकी एक, असेच या संस्थेचे स्वरूप होते. या संस्थेच्या स्थापनेमागे पौरस्त्य विद्यांच्या जोडीला शक्य तर पाश्चात्त्य विद्यांचा अभ्यास ( तशी येथील लोकांची इच्छा असल्यास ) व्हावा असे एक उद्दिष्ट असले,[1] तरी या संस्थेच्या प्रारंभकाळात जे शिक्षण देण्यात आले, त्यात वेदवेदांगे, ज्योतिष, तर्क, न्याय, वैद्यक, अलंकार इत्यादी संस्कृत विद्यांच्या शाखोपशाखाच प्रमुख होत्या.

**सरकारी शिक्षणसंस्था**

जुन्याचा हा पुरस्कार धोरण म्हणून एल्फिन्स्टनने केला, तरी मुख्यतः नव्या शिक्षणाचा संस्कार येथील प्रजेवर व्हावा, अशी त्याची उत्कट इच्छा होती. नव्या राजवटीला नवसंस्कारांनी युक्त अशा लोकांची शासनसंस्था चालविण्याच्या दृष्टीने गरज होतीच. शिवाय, नव्या शिक्षणाने जनमनात क्रांती होऊन इंग्रज सत्तेला अनुकूल असा एक वर्ग तयार होईल व नव्या शासनसंस्थेच्या नव्या प्रकारच्या गरजा भागविण्यास तो उपयुक्त होईल, आणि नव्या शिक्षित वर्गाच्या द्वारा व देशी भाषांच्या आश्रयाने हे नवसंस्करण समाजाच्या निरनिराळ्या थरांत कालांतराने नेता येईल, तसेच इंग्रजी विद्येच्या संस्करणाने इंग्रज लोकांचा व्यापार वाढेल व ख्रिस्ती धर्माच्या प्रचारास पर्यायाने साहाय्य होईल, असाही विश्वास राज्यकर्त्यांना वाटत होता. पुणे व मुंबई यांतील वातावरण भिन्न असल्याने जुन्या संस्कारांच्या पुरस्कारासाठी एल्फिन्स्टनने पुणे निवडिले, तर इंग्रजी शिक्षणास उत्तेजन देण्याचा उपक्रम मुंबई येथे सुरू केला. इंग्रजी शिक्षणाचा प्रचार करणाऱ्या संस्था मुंबईस अँग्लो-इंडियन व युरोपियन यांच्या

1. " Encouragement and improvement of the useful parts of Hindoo learning and also to introduce as far as possible the means of communication to the new ( Indian ) subjects such branches of Europian knowledge as they may be able and willing to receive. "

Introduction to the Selections from the Records of the Govt. of Bombay ( Education ), Part I, 1819 – 1852, Page – XXXIV. R. V. Parulekar

प्रोत्साहनाने आधीपासून निघाल्या होत्याच. त्यांतील प्रमुख संस्था म्हणजे इ. स. १८१५-मध्ये स्थापन झालेली ‘ बॉंबे एज्युकेशन सोसायटी.’ ही संस्था खाजगी होती. तिलाच एल्फिन्स्टनने हाताशी धरून तिच्या द्वारा देशी भाषांतून ग्रंथनिर्मिती करण्यासाठी १८२०-मध्ये ‘द नेटिव्ह स्कूल अँड स्कूल बुक कमिटी’ स्थापन केली. हिलाच पुढे इ. स. १८२२-मध्ये ‘द बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन अँड स्कूल बुक सोसायटी’ हे नाव मिळाले. हिलाच १८२७-मध्ये ‘द नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी’ हे नाव प्राप्त झाले. इ. स. १८३७-मध्ये याच संस्थेचे ‘ दी एल्फिन्स्टन नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी ’ असे नामकरण केले गेले व हिचेच इ. स. १८४०-मध्ये बोर्ड ऑफ एज्युकेशनमध्ये रूपांतर झाले. इ. स. १८२० ते १८४०-पर्यंत मराठी वाङ्मयात ज्या नव्या घडामोडी झाल्या, त्या मुख्यतः या संस्थेमार्फतच. या घडामोडींना सरकारी व देशी अशा उभयपक्षीय विचारवंतांचे साहाय्य होते. मराठी व गुजराती वाङ्मयांत ‘ भाषांतरयुगा’चे प्रवर्तन करणारी ही प्रमुख संस्था या दृष्टीने या संस्थेचे विशेष महत्त्व आहे. या संस्थेची धोरणे वीस वर्षांच्या अवधीत परिस्थितीप्रमाणे बदलत गेली. या संस्थेचे बदलते नामकरण हे याचेच प्रतीक होय. नवा शिक्षणक्रम सुरू करणे, त्याला उपयोगी अशी ग्रंथनिर्मिती देशी भाषांत करणे आणि नवा अभ्यासक्रम शिकविणारा शिक्षकवर्ग तयार करणे हे या संस्थेचे १८४०-पर्यंतचे, म्हणजे सरकारचे शिक्षणविषयक धोरण बदलेपर्यंतचे कार्य होय. मुंबई प्रांतातील एकूण शिक्षणविषयक धोरणाचा भारतातील कंपनी-सरकारच्या धोरणाशी फार निकटचा संबंध आहे; म्हणून मध्यवर्ती कंपनी-सरकारचे शिक्षणविषयक धोरण पाहिल्याशिवाय मुंबई प्रांतातील शैक्षणिक हालचालींचे स्वरूप पूर्णपणे आकलित होत नाही.

### ई. इं. कंपनीच्या धोरणातील बदल

ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराचे धोरण कंपनीच्या नियामक-मंडळाच्या आदेशानुसार कंपनीला नवी सनद देताना ठरविले जात असे. ही सनद दर वीस वर्षांनी नव्याने दिली जाई. कंपनी-सरकारच्या नियामकमंडळाने येथील प्रजेच्या शिक्षणाकडे लक्ष देण्यास प्रारंभ केला, तो १८१३-मध्ये ईस्ट इंडिया कंपनीला सनद देतेवेळी. १८१३–१८३३ व १८३३–१८५३-पर्यंतच्या वीसवीस वर्षांच्या मध्यवर्ती कालखंडात कंपनी-सरकारचे शैक्षणिक धोरण बदलत गेले. या कंपनी-सरकारच्या शैक्षणिक धोरणाचा इंग्रज राजवटीतील नव्या संस्कारांच्या घडणीत फार मोठा हात आहे. त्याचे परिणाम साऱ्या आधुनिक भारतावर झालेले आहेत.

कंपनी-सरकारने कंपनीच्या नोकरांना येथील इतिहास, भाषा, चालीरीती वगैरे समजावून देण्यासाठी इ. स. १८००-मध्ये ‘फोर्ट वुइल्यम कॉलेज’ची स्थापना केली होती; पण तिचा उद्देश मर्यादित होता. कंपनी-सरकारचा जसजसा राज्यविस्तार होत गेला, तसतसा येथील लोकांच्या शिक्षणाचा प्रश्न कंपनी-सरकारासमोर उभा राहिला.

राज्यकर्ते या दृष्टीने न्यायदान करतेवेळी त्यांना येथील प्रजेच्या चालीरीती समजून घेणे भाग पडू लागले. फौजदारी स्वरूपाचे कायदे जरी सर्वत्र सारखे ठेविले होते, तरी मुलकी स्वरूपाचे निवाडे त्या-त्या प्रांताच्या पूर्वापर रूढीप्रमाणे करण्याचे धोरणच कंपनी-सरकारने अवलंबिले होते. लोकांच्या समाजजीवनात शक्यतो ढवळाढवळ न करण्याच्या भूमिकेशी सुसंगत असेच हे धोरण होते. पण यामुळे निवाडे देताना हिंदू वा मुस्लिम दोन्ही जमातींतील कायदेकानू व ग्रंथ समजून घेणे कंपनीच्या न्यायाधिकाऱ्यांना आवश्यक होऊ लागले. शिवाय, ज्या समाजावर राज्य करावयाचे, त्या समाजाचे स्वरूप, भाषा, वर्तनपद्धती सांगोपांग समजून घेण्यासाठी[1] पौरस्त्य ग्रंथांच्या अभ्यासाची गरज राज्यकर्त्यांना वाटू लागली. या गरजेबरोबर जिज्ञासेमुळेही काही पाश्चात्त्य विद्वानांनी संस्कृत, पर्शियन वगैरे भाषांचा अभ्यास सुरू केला होता. युरोपमधील विद्येच्या पुनरुज्जीवनाची ( Renaissance ) परंपरा घेऊन हे इंग्रज लोक इकडे आले होते. त्यांची ज्ञानलालसाही जबरदस्त होती. एरवी १७८०-मध्येच इंग्रजीत भाषांतरित झालेल्या भगवद्गीतेसारख्या ग्रंथाला वॉरन हेस्टिंग्जसारख्या राजकारणी माणसाने प्रस्तावना लिहिण्याचे कारण नव्हते. व्यावहारिक गरज व ज्ञानलालसा या दोन्ही गोष्टींमुळे भारतीय भाषांतील प्राचीन ग्रंथांच्या अध्ययनाला उत्तेजन देण्याची आवश्यकता राज्यकर्त्यांना वाटू लागली[2]. त्याच्या जोडीला येथील कच्च्या मालाचे उत्पादन वाढविण्यासाठी व मालाची वाहतूक जलद करण्यासाठी येथील वातावरणावर यांत्रिकीकरणाचेही थोडे संस्करण करणे जरूर होते. यासाठी येथील जनतेत विज्ञानाच्या, प्राथमिक स्वरूपाच्या का होईना, कल्पना प्रसृत करणे आणि उपयुक्त कलांची व कारागिरीची माहिती उपलब्ध करून देणे याही गोष्टींची निकड जाणवू लागली. यामुळेच इ. स. १८१३ साली कंपनीला नवी सनद देताना पौरस्त्य व पाश्चात्त्य या दोन्ही पद्धतींचे शिक्षण एतद्देशीयांना देण्यासाठी एक लाख रुपये कंपनीने खर्च केले पाहिजेत, अशी अट

1. "To consult the feelings of the natives and to yield to the prejudices of the natives."

२. कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सने गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिलला इ. स. १८१४-मध्ये जे पत्र लिहिले आहे, त्यात युरोपियनांपैकी संस्कृत भाषा शिकण्यास उत्सुक असलेल्यांना उत्तेजन द्यावे व नवे युरोपीय विज्ञान शिकविताना संस्कृत भाषेतील वैद्यक, ज्योतिष, गणित इत्यादी क्षेत्रांतील उपलब्ध परिभाषा वापरावी, असाही आदेश दिलेला दिसतो. नव्या ज्ञानाचा जुन्याला धागा जोडण्याचा हा यत्न दिसतो.

गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिलला कोर्ट ऑफ डायरेक्टर्सचे ३ जून १८१४ रोजीचे पत्र.

History of Education in India under the Rule of East India Company, B. D. Basu, Page 7.

कंपनीच्या नियामकमंडळाने कंपनीवर लादली.[1]

## आरंभीचे पौरस्त्य-पाश्चात्य मिश्रशिक्षण

इंग्रज सरकारच्या या प्रथमावस्थेतील ( १८१३–१८३३ ) शैक्षणिक धोरणात पौरस्त्य व पाश्चात्त्य विद्या यांची जी सरमिसळ आढळते, ती वरील कारणांनी. एका बाजूने जुन्याला खूष करण्याचा, तर दुसऱ्या बाजूने नव्याचा परिचय करून देण्याचा इरादा तीत दिसतो. मात्र हे फार मर्यादित प्रमाणात करण्याचे धोरणही स्पष्ट आहे. पौरस्त्यांवर पाश्चात्त्य विद्यांचे संस्करण फार मोठ्या प्रमाणात होऊ नये, अशी या राज्यकर्त्यांच्यापैकी एका गटाची भूमिका होती. इंग्रजांच्या तडाख्यातून अमेरिका देश नुकताच स्वतंत्र झाला होता. भारत जर कायमचा, निदान दीर्घकाल, इंग्रजांच्या ताब्यात रहावयास हवा असेल, तर भारतीय व इंग्रज यांच्यामधील सांस्कृतिक अंतर कायम राखणे आवश्यक आहे; पौरस्त्य लोक पाश्चात्त्य विद्या व कला यांत पारंगत झाल्यास हे अंतर नष्ट होईल व पर्यायाने स्वतःचे येथील राज्य धोक्यात येईल, अशी भीती राज्यकर्त्या वर्गातील एका गटाला वाटत होती. हा धोका पतकरूनही नवे शिक्षण द्यावे, असे म्हणणारी एल्फिन्स्टनसारखी काही उदारमतवादी मंडळी होती; पण त्यांची संख्या अल्प होती. पाश्चात्त्य शिक्षणाचा आवर्जून पुरस्कार करणाऱ्या लोकांनीही साऱ्या नव्या ज्ञानविज्ञानांत भारतीयांना पारंगत करण्याची भूमिका कधी घेतली नव्हती आणि पुढेही केव्हा राज्यकर्त्यांनी त्या दृष्टीने येथील जनतेला स्वयंपूर्ण होण्यास उत्तेजन दिलेले नाही. त्यामुळे नवविद्या संपादन करणाऱ्या व्यक्तींचा नव्या क्षेत्रातील वाङ्मय ( Literature ), समाजशास्त्र ( Social Sciences ) वा तत्त्वज्ञान ( Metaphysics ) यांच्याशी जेवढा परिचय झाला, तेवढा भौतिक शास्त्रांशी ( Material Sciences ) झाला नाही. या क्षेत्रातील एतद्देशीयांचे एतद्विषयक ज्ञान, इच्छा असूनही सामान्य पातळी ओलांडून पुढे जाऊ शकले नाही. या विज्ञानपरिचयाचा भारतीय जीवनात प्रभाव पडला तो सामाजिक, धार्मिक क्षेत्रात बुद्धिनिष्ठ दृष्टिकोण निर्माण होऊन श्रद्धायुगाचा लोप होण्यापुरताच. पौरस्त्य व पाश्चात्त्य अशा दोन्ही प्रकारच्या शिक्षणाला उत्तेजन देण्याच्या व पाश्चात्त्य विद्यांचे ज्ञान देशी भाषांतून प्रसृत करण्याच्या ईस्ट इंडिया कंपनीच्या धोरणाला अनुसरून एल्फिन्स्टनने मुंबई प्रांतातील शैक्षणिक

---

1. " A sum of not less than 1, 00,000 Rs. should be spent every year for revival and improvement of oriental literature, and for the encouragement of the learned natives of India, and for the introduction and promotion of knowledge of the Sciences among the British territories of India. "

— History of Education in India under the Rule of East India Company, B. D. Basu, Page 6-7.

१८१३–मध्ये ईस्ट इंडिया कंपनीला देण्यात आलेल्या सनदेच्या ४३व्या कलमाचा भाग.

योजना आखली होती. स्थानिक परिस्थितीप्रमाणे या दोन प्रकारच्या शिक्षणाचे विभाजन करून पौरस्त्य विद्यांचे अध्ययन पुण्यास व पाश्चात्त्य शिक्षण मुंबईस सुरू करण्याची त्याची योजना मागे निर्देशिली आहेच. एल्फिन्स्टनची या बाबतची भूमिका स्पष्ट होण्याच्या दृष्टीने इ. स. १८१३-मध्ये ईस्ट इंडिया कंपनीला पाठविलेल्या खलित्याकडे वळले पाहिजे. या खलित्यात तो म्हणतो —

(१) देशी शाळांतून सध्या जी शिकविण्याची पद्धत आहे, ती सुधारावी आणि शाळांची संख्या वाढवावी.

(२) त्यांना शालोपयोगी पुस्तकाचा पुरवठा करावा.

(३) याप्रमाणे शिक्षणाच्या ज्या सोयी करून देण्यात येतील, त्यांचा फायदा घेण्याची इच्छा खालच्या दर्ज्यांच्या लोकांना व्हावी, म्हणून त्याना काही तरी उत्तेजन देण्यात यावे.

(४) पाश्चात्त्य विज्ञान शिकविण्यासाठी शाळा काढाव्यात आणि शिक्षणाच्या उच्च शाखांत सुधारणा करावी.

(५) देशी भाषांतून पदार्थविज्ञान आणि नीतिशास्त्र यांवर पुस्तके तयार करवून ती प्रकाशित करण्याची व्यवस्था करण्यात यावी.

(६) पाश्चात्त्य संशोधनाचे ज्ञान संपादन करण्याचे साधन, आणि एक अभिजात भाषा म्हणून ज्यांची इंग्रजीचा अभ्यास करण्याकडे प्रवृत्ती असेल, त्यांच्यासाठी इंग्रजी शिक्षण देणाऱ्या शाळा काढाव्यात.

(७) या ज्या ज्ञानाच्या शाखा शेवटी सांगितल्या, त्यांचा व्यासंग करण्याच्या कामी देशी लोकांना प्रोत्साहन द्यावे.

## शिक्षणविषयक उद्दिष्टांमधील अडचणी

ही वर नमूद केलेली शैक्षणिक क्षेत्रातील एकंदर उद्दिष्टे लक्षात घेता ती सिद्धीला जाण्याच्या मार्गात येथे अनंत अडचणी होत्या. ब्रिटिशपूर्व राजवटीत या प्रकारच्या शिक्षणाला अनुकूल अशी पार्श्वभूमी केव्हाच निर्माण झाली नव्हती. येथे नव्या पद्धतीच्या शैक्षणिक गरजा भागविण्यास योग्य असे ग्रंथ उपलब्ध नव्हते. सर्वसामान्य माणसात वाचनाची अभिरुची नव्हती, शिकण्याची हौस नव्हती.[1] नवे ग्रंथ देशी भाषांतून तयार करण्यास असलेले ग्रंथकार नव्हते; ते छापण्यासाठी मुद्रणालये नव्हती. देशी ग्रंथ छापण्यास लागणारे खिळे (types) इंग्लंडहून मागवावे लागत. तसे करण्यास लागणारी दळणवळणाची साधनेही त्या काळीं तेवढी उपलब्ध नव्हती.

---

१. हरि केशवजीकडून सात हजार रुपये खर्चून सोसायटीने सर्वोत्कृष्ट पुस्तक तयार करून घेतले. पण त्याची एकही प्रत खपली नाही.

Selections from Educational Records,
Part II, Page 158, Parulekar and Bakshi.

छापील ग्रंथ हातात धरणे म्हणजे भ्रष्टाकार अशी जाणत्या लोकांचीही समजूत होती. नवे शिक्षण म्हणजे धर्मांतराची पहिली पायरी अशीही सकारण वा अकारण भीती लोकांच्या मनात वावरत होती. नवे पाश्चात्त्य ज्ञान देशी भाषांतून अनुवादित करावयाचे, तर त्याला योग्य अशी परिभाषा तयार नव्हती. गद्यवाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीने विचार करिता मराठी भाषेच्या व्याकरणाचे नीट व्यवस्थापनही याआधी कधी झालेले नव्हते; आणि मराठी भाषा म्हणजे एक साधी बोलभाषा ( merely a spoken language ) अशी एल्फिन्स्टन, कॅनेडी, मोल्स्वर्थ वगैरे या क्षेत्रातील कार्यकर्त्यांची समजूत झालेली होती. यामुळे मराठी नवगद्याची निर्मिती करताना अगदी पायापासून राज्यकर्त्यांना तयारी करावी लागली. कोश, व्याकरणे इत्यादींच्या निर्मितीवर विशेष भर द्यावा लागला.[१] लेखनशैली सुबोध ठेवण्याबद्दल सूचना द्यावी लागली, परिभाषा घडवावी लागली, लोकांत वाचनाभिरुची निर्माण करण्यासाठी ग्रंथ छापून फुकट वाटावे लागले, नव्या अभिरुचीचा वाचकवर्ग तयार करावा लागला, त्याच्या मनातील नव्या उपक्रमाबद्दलचा पूर्वग्रह दूर करण्यासाठी विदुरनीती, इसापनीती, पंचोपाख्यान, सिंहासनबत्तिशी यांसारखी सोपी, रंजक व भारतीय वातावरण असलेली पुस्तकेच प्रथम छापावी लागली, भाषांतरित व स्वतंत्र अशा नवग्रंथनिर्मितीसाठी शंभर ते चारशे रुपयांपासून प्रसंगी पाच हजार रुपयांपर्यंतच्या बक्षिसांचे आमिष दाखवावे लागले, परकीय ग्रंथांची भाषांतरे करताना त्यांतील वातावरणाचा परकेपणा घालविण्यासाठी ती भाषांतरे शब्दशः न करता इकडील वातावरणाशी मिळती-जुळती करून घ्यावी लागली, सुबोधपणा आणण्याचा आवर्जून प्रयत्न करावा लागला, भाषेची अडचण ज्यात कमीत कमी येईल, अशीच गणितविषयासारखी शास्त्रीय पुस्तके प्रथमतः भाषांतरास घ्यावी लागली, शैली जुन्या पद्धतीची – गुरुशिष्यसंवादात्मक, क्वचित पत्रात्मक – ठेवावी लागली, पद्याचाही आश्रय अधूनमधून घ्यावा लागला आणि तांत्रिक परिभाषेच्या अभावी बोलभाषेचा वापर करावा लागला.[२]

### शिक्षणाची पायाभरणी

या कार्यासाठी ( ग्रंथाचे लेखन, प्रकाशन, प्रोत्साहन, पुरस्कार, इत्यादी ) इ. स. १८२५–१८३२-पर्यंत द बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन स्कूल बुक सोसायटीने दोन लाखांहून अधिक रक्कम खर्च केली. देशी भाषेच्या इतिहासात राज्यकर्ते व विचारवंत

---

१. १८१० डॉ. केरीचा कोश, १८२४ केनेडीचा कोश, १८२९ पंडितांचा कोश, १८३१ मोल्स्वर्थचा कोश आणि १८३६-पर्यंत बाळशास्त्री जांभेकर, गंगाधरशास्त्री फडके व दादोबा यांची तयार झालेली व्याकरणे ही या संदर्भात लक्षात घ्यावीत.

२. या नव्या पुस्तकांना क्वचित ‘पोथी’ असे संबोधण्याची प्रथा होती. ब्राह्मण-ग्रंथकारांचा उल्लेख सर्रास ‘शास्त्री’ असा केला जाई. ‘शास्त्री’ म्हणून संबोधण्याची ही परंपरा थेट विष्णुशास्त्री चिपळूणकरांपर्यंत येऊन भिडलेली आहे.

यांनी एकत्र येऊन एवढा संघटित प्रयत्न करण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. वर नमूद केलेल्या एकदर अडचणी लक्षात घेता अल्पावधीतच जी पायाभरणी झाली, ती संघटनाकुशल, धोरणी, विज्ञानसंपन्न राजवटीशिवाय होऊ शकली नसती हे, ती राजवट परकीय असली तरी, कृतज्ञतेने मान्य करावयास हवे. एल्फिन्स्टन, मोल्सवर्थ, कॅंडी, जर्विस इत्यादींनी या क्षेत्रात केलेले कार्य फार मोलाचे मानावयास पाहिजे.

## प्रारंभीची ग्रंथनिर्मिती

आशयदृष्ट्या या ग्रंथांचा विचार केल्यास लोकांच्या धार्मिक भावना दुखावल्या जाणार नाहीत, अशा बेताने नैतिक बोधाचा पुरस्कार करणाऱ्या, मनोरंजन करणाऱ्या व विज्ञानाचा प्राथमिक स्वरूपाचा परिचय करून देणाऱ्या ग्रंथावर भर देण्याचे धोरण राज्यकर्त्यांनी अवलंबिलेले दिसते.[1] सुभाषिते, नीतिकथा, पशुपक्ष्यांच्या कथा लिहून घेण्याच्या भूमिकेतूनच पंचतंत्र, बाळमित्र, हितोपदेश, पंचोपाख्यान, विदुरनीती, वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी इत्यादी ग्रंथ निर्माण झाले. वाचकाला व्यवहारनीती कळावी, भाषेचे ज्ञान व्हावे, हे उद्देश या ग्रंथलेखनाच्या मागे होते. या प्रकारच्या लेखनात अग्रगण्य ठरलेले अव्वल पिढीतील लेखक म्हणजे बापू छत्रे व हरि केशवजी हे होत. दोघेही मुंबईकर व सरकारी नोकरीत असलेले. चिल्ड्रन्स फ्रेंड ( Children's Friend ) या पुस्तकाचे ' बाळमित्र ' या नावाने भाषांतर करणारे सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे हे या पुस्तकाचा उद्देश स्पष्ट करिताना " या पुस्तकाच्या वाचनाने मुलांस लहानपणापासून बोलावयाचा अभ्यास होईल. त्यांचा शब्दसंग्रह वाढेल, व्यवहार, रीतिनीति कळेल, " असे प्रस्तावनेत नमूद करतात.[२] या ' बाळमित्र ' पुस्तकाचा त्या काळी पुष्कळ बोलबाला झाला होता. यावरून तत्कालीन ललितवाङ्मयाचे प्रयोजन स्पष्ट होईल. सरकारचे शैक्षणिक धोरण सांभाळून मराठीत

---

1. ( अ ) " Without any reference to religious matters, should tend to improve the morals, enlarge the understanding and promote the general and useful knowledge. "

बॉबे एज्युकेशन सोसायटीचा सहावा वार्षिक वृत्तान्त
Selections from Educational Records, Bombay,
Part II, Page 198, Parulekar & Bakshi.
History of Education in India under the rule of East India Company, by B. D. Basu, या ग्रंथावरून.

२ " हा ग्रंथ मुलांस पढविल्याने त्यांस लहानपणापासून अनायासानें बोलावयाचा अभ्यास होईल; त्यांचा शब्दसंग्रह वाढेल; त्यांस अनेक व्यवहार, रीतिनीति समजतील; बुद्धि सदसद्विकारक्षम होईल. त्यांचे हृदय कोमल होईल; मातापितरांच्या ठायीं त्यांचें प्रेम वाढेल, बहीणभावंडांच्या ठायीं त्यांची प्रीति वाढेल. "

" ग्रंथकर्त्याने दोन गोष्टी मनांत आणून ग्रंथ केला आहे, एक तर मुलांचे रंजन, दुसरें, त्यांस सद्‌गुण सहज लाभावे. "

मराठी साहित्यातील उपेक्षित मानकरी, पृ. ३.

इंग्रजी ग्रंथांचा सुबोध अनुवाद करणारा लेखक हा त्या काळचा आदर्श शैलीकार होता, आणि हा मान बापू छत्रे ( १७८८–१८३४ ) यांच्याकडेच जातो.[१] यांना या कारणासाठी अर्वाचीन मराठीचे जनक मानण्यात येते. सरकारच्या भाषांतरविषयक धोरणास त्यांनी मोठे साहाय्य केले. शिवाय, भाऊ महाजन व बाळशास्त्री जांभेकर या पुढील पिढीतील दोन प्रमुख लेखकांना त्यांनी उत्तेजन दिले. हरि केशवजी ( १८०४–१८५८ ) यांचे ग्रंथलेखन मुख्यतः शास्त्रीय विषयांचे आहे. ईसापनीती व पंचोपाख्यान यांची भाषांतरे त्यांनी केली खरी; पण मुख्यतः विज्ञानविषयक ग्रंथांच्या भाषांतराला यांचे फार मोठे साहाय्य झाले. कॅप्टन जर्विस हा नवी पाठ्यपुस्तके तयार करणाऱ्या वर निर्दिष्ट केलेल्या संस्थेचा इ. स. १८२२–१८३०-पर्यंत चिटणीस होता. मराठी पुस्तके छापण्यासाठी एक छापखाना सोसायटीने काढिला होता त्याची व्यवस्थाही जर्विसकडेच होती. त्याने विज्ञानविषयक ग्रंथनिर्मितीस फार मोठे साहाय्य केले. मुंबई प्रांतातील वैज्ञानिक शिक्षणाचा पाया यानेच घातला, असे म्हणावयास हरकत नाही. स्थापत्यशास्त्र शिकविण्यासाठी त्याने १८२५-मध्ये एक शाळा काढिली. गणित, ज्योतिष, पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, भूगोल यांतील प्राथमिक तत्त्वांचा परिचय करून देणारी अनेक पुस्तके याने तयार करवून घेतली. हरि केशवजी हे याच्या हाताखालीच एंजिनिअरिंग शाळेत नोकरीला असल्यामुळे साहजिकच विज्ञानविषयक ग्रंथनिर्मितीशी त्याचा अधिक संबंध आला. तत्कालीन परिभाषेची अडचण असतानाही हरि केशवजी यांनी केलेले या क्षेत्रातील कार्य महत्त्वाचे आहे. वाङ्मय ( Literature), कला ( Art ), विज्ञान ( Science ) असे जे शब्द या काळात वापरले जातात, त्यांचा अर्थ, वाङ्मय म्हणजे नीतिबोधपर कथा, कला म्हणचे प्राथमिक स्वरूपाची कारागिरी व विज्ञान म्हणजे निसर्गविषयक ज्ञानाचा स्थूल परिचय, असा सर्व-साधारणपणे मानावयास हरकत नाही.

### ज्ञानसंपादनावर असणारा भर

पाश्चात्त्य विज्ञानकल्पनांचा देशी भाषांतून प्रचार करण्याच्या दृष्टिकोणालाच तत्कालीन शिक्षणपद्धतीत प्राधान्य होते. या विज्ञानकल्पनांच्या प्रसाराबरोबरच शांतताप्रिय इंग्रजी राजवटीशी एकनिष्ठ राहणारे, निर्व्यसनी, साधेपणा, नियमितपणा व शिस्त यांची आवड असलेले एक नवे नागरिकत्व घडविणे हेही या शिक्षणाचे उद्दिष्ट होते; आणि या उद्दिष्टाला पूरक होईल, असेच साऱ्या ग्रंथनिर्मितीमागचे धोरण होते. या प्रथमावस्थेतील वाङ्मयाला शालेय, सामान्य, भाषांतरित, प्राथमिक स्वरूपाचे, प्रज्ञाशून्य, बालबोध, परप्रत्ययनेय, हुकमेहुकूम ( made to order ) पद्धतीने तयार झालेले, रसरूपगंध नसलेले, इत्यादी विशेषणे बहाल केली जातात. पण या वाङ्मयनिर्मितीच्या पूर्वीची

१. " मराठींत तर्कशुद्ध रीतीने फकीकेत लिहिणारे हेच पहिले. "
दादोबा पांडुरंग, आत्मचरित्र, पृ. ६०.

मराठी गद्यवाङ्मयाची अभावात्मक स्थिती विचारात घेतली व तत्कालीन परिस्थितीतील दुर्लंघ्य अडचणी लक्षात घेतल्या, तरच या वाङ्मयाचे ऐतिहासिक मूल्य व मुद्रणसंस्थेसारख्या संस्थांच्या परिचयाची महती पटू शकेल. श्रद्धायुगातून विज्ञानयुगात प्रवेश होताना नव्या ज्ञानकल्पनांनी भारावून जाऊन ते शक्य तितके आत्मसात करण्याची उत्कट तळमळ तत्कालीन पिढीतील जाणत्यांना कशी लागलेली होती, हे तत्कालीन वृत्तपत्रांची नावे पाहिली तरी लक्षात येते. ' ज्ञान हाच पराक्रम' असे उद्गार लोकहितवादींच्या शतपत्रांत आढळतात. ( शतपत्रे, पत्रक्रमांक ८५ ) या नव्या ज्ञानाच्या प्रचंड शक्तीचा व महतीचा साक्षात्कार व त्याच्या प्रचारासाठी अविरतपणे चाललेला प्रयत्न बाळशास्त्री जांभेकरांच्या जीवनात आढळतो. अवघ्या चाळीस वर्षांच्या आयुर्मर्यादेत त्यांनी जिज्ञासेने व तळमळीने या दिशेने केलेले कार्य विस्मयचकित करणारे आहे. जुन्या शास्त्रांना मान्यता देऊनही ज्ञान म्हणजे जाणणे अशी ज्ञानाची व्यापक व्याख्या त्यांनी केली आणि प्रत्यक्ष प्रमाणाच्या दृष्टीने नवे विज्ञान कसे महत्त्वाचे आहे, हेही पटवून देण्याचा प्रयत्न केला. ( दिग्दर्शन, मे १८४० ) ' विलायती विद्यांचा अभ्यास वाढावा, तेथील ज्ञान प्रसिद्ध व्हावे,' ही त्यांना लागलेली तळमळ त्यांच्या लेखनात स्पष्ट दिसते. विद्येने अज्ञानांधकार दूर होईल, दुष्ट सवयी लोपतील, अशी त्यांची श्रद्धा होती. युरोपियन लोकांची ज्ञानासाठी हजारो मैल जाण्याची धडपड जांभेकरांना मोह घालते. प्रतिदिवशी, प्रतिघटका नवे ज्ञान उपलब्ध होत असल्याची जाणीव त्यांच्या लेखनात सातत्याने दिसते. वाफयंत्रे, उष्णता, सोने तयार करण्याची पद्धती, सूक्ष्मदर्शक यंत्रे, काच वगैरेसारख्या उपयुक्त वस्तूंच्या कार्यकारणांचा उलगडा करणारे ज्ञान आत्मसात करण्याची फार मोठी धडपड जांभेकरांच्या लेखनात प्रतिबिंबित झालेली आहे. पुढे आगरकरांनी आत्मोन्नतीसाठी बुद्धीवर भर देण्याची जशी शिकवणूक दिली, तशी आणि त्याच तळमळीने या प्रारंभकालात ज्ञानप्राप्तीची शिकवणूक जांभेकरांनी जनतेला दिली. त्यांचे व्यक्तिगत जीवन म्हणजे तत्कालीन ज्ञानलालसेचा एक आदर्शच होय.

### नव्या शिक्षणाचे परिणाम

या नव्या शिक्षणाच्या प्रथमावस्थेचा वाङ्मयीन दृष्ट्या विचार करिता असे दिसते की, या नव्या शिक्षणाने इंग्रजीसारख्या समृद्ध भाषेशी आपली ओळख करून दिली. आशय व अभिव्यक्ती यांचे काही प्रकार नव्यानेच आपल्यासमोर आणिले, अनेक ज्ञानशाखांशी परिचय करून दिला, भाषेची उभारणी एका स्थिर पायावर केली, तिला एक नवे सांस्कृतिक मूल्य प्राप्त करून दिले, साऱ्याच गोष्टींकडे बुद्धिनिष्ठ चिकित्सेने ' ऐहिक चष्म्या'तून पाहण्याची नवी दृष्टी आणिली, स्वभाषेच्या महतीबरोबर तिच्यातील वैगुण्यांचीही जाणीव करून दिली, ही वैगुण्ये दूर करण्यासाठी पद्धतशीरपणे व संघटित रीत्या कसे प्रयत्न करिता येतील याची दिशाही दाखविली, जातिनिरपेक्ष ऐहिक भूमिकेवरून विचार करणारा एक नवा वाचकवर्ग व ज्ञानप्रसाराची नवी साधने

उपलब्ध करून दिली, व ज्ञानाचे वितरण करणारे नवे ग्रंथकार पुढे आणिले.

### ज्ञानाच्या विविध क्षेत्रांत प्रवेश

अव्वल इंग्रजीतील पहिल्या पाचपन्नास वर्षांचा काळ लक्षात घेतला, तर असे दिसते की, या ज्ञानलालसेमुळे व तत्कालीन गरजेप्रमाणे एकेक ग्रंथकार मूलतःच एकमेकांपासून भिन्न असलेल्या विविध ज्ञानक्षेत्रांत तेवढ्याच उमेदीने प्रवेश करी. हरि केशवजीच्या किंवा त्याच्यानंतर आलेल्या जांभेकर, दादोबा वगैरेंच्याच चरित्रात हे दिसते असे नाही, तर त्याहीपुढील पिढीतील महादेव मोरेश्वर कुंटे, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादींच्या चरित्रांवरूनही हेच स्पष्ट होते. कुंटे यांनी इंग्रजी, मराठी कविता लिहिली, पेन्सिली तयार करण्याचा कारखाना काढिला व आर्य-संस्कृतीचे स्वरूप स्पष्ट करणारा गंभीर स्वरूपाचा ग्रंथही लिहिला. कृष्णशास्त्री चिपळूणकर याच्याही लेखनात अशीच विविधता आढळते. अरबी भाषेतील गोष्टी हे भिन्न प्रकृतीचे कथासाहित्य, अन्योक्तिकलाप व मेघदूत यांसारख्या संस्कृत काव्यांची भाषांतरे, अर्थशास्त्र वा व्याकरणशास्त्र यांवरील त्यांचे लेख व 'अनेकविद्या-मूलतत्त्वसंग्रह' यासारखा ग्रंथ हे पहिले, तर याची सहज कल्पना येते. चिपळूणकरांनी 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' हा ग्रंथ सरकारी प्रेरणेने लिहिला असला, तरी त्याच्या नावावरूनच सरकारला तत्कालीन जनतेला सर्व प्रकारचे ज्ञान देण्याची कशी निकड वाटत होती, याची कल्पना येते. 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' हे नाव एका विशिष्ट ग्रंथाचे असले, तरी अव्वल इंग्रजीपासून पुढील काही वर्षांतील ज्ञानक्षेत्रातील एकंदर प्रवृत्तीचेही ते निदर्शक मानण्यास हरकत नाही. पुढील काळातील एका मासिकाचे 'विविध-ज्ञानविस्तार' हे नावही असेच बोलके आहे.

### नवीन शिक्षणाबद्दलची आस्था

बापू छत्रे, हरि केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग इत्यादी मंडळी मुंबईची, तर कृष्णशास्त्री चिपळूणकर, म. मो. कुंटे वगैरे मंडळी पुण्याची होती. मुंबईला सुरू झालेल्या नवशिक्षणाच्या उपक्रमाचे लोण हळूहळू पुण्यासही आले. एल्फिन्स्टनने सुरू केलेले, संस्कृत विद्यांना प्रामुख्य असलेले पुणे कॉलेज चालू होतेच; पण १८३०-मध्ये बुधवारवाड्यात स्वतंत्र इंग्रजी शाळा आली व १८३७-पासून पुणे कॉलेजलाच हे इंग्रजीचे वर्ग जोडण्यात आले. इंग्रज लोकांबद्दलची पुण्यातील ब्राह्मणांची पहिली प्रतिकूल प्रतिक्रिया आता कमी झाली होती. एवढेच नव्हे, तर त्यांच्यात इंग्रजांच्या न्यायबुद्धीबद्दल विश्वास निर्माण झाला होता.[1] इंग्रज

१. १८२७-मध्ये करवीरमठाचे शंकराचार्य पुण्यास आले असता त्यांनी पाद्यपूजेची भारी पट्टी लोकांवर सक्तीने लादावयास सुरुवात केली त्या वेळी पुण्यातील काही प्रमुख ब्राह्मणांनी कलेक्टरकडे अर्ज करून लोक स्वेच्छेने जी दक्षिणा देतील, ती शंकराचार्यांनी स्वीकारावी, असा हुकूम पुण्याच्या कलेक्टरकडून मिळविला!
चिपळूणकर : काल व कर्तृत्व, ग. त्र्यं. माडखोलकर, पृ. ९६.

(राजवटीने) आता महाराष्ट्रात एक तप पूर्ण केले होते. उमाजी नाईक (१८३२) किंवा ठग लोक यांच्यासारखे काही अपवाद सोडल्यास सर्वसामान्य जनतेत इंग्रजी राजवटीला निदान प्रकट विरोध राहिला नव्हता. यामुळे इंग्रज राज्यकर्त्यांची पावलेही अधिक निश्चितपणे पडू लागली होती. सामाजिक व धार्मिक दृष्टीने येथील जनतेला महत्त्वाची वाटणारी सती जाण्याची पद्धती इंग्रजांनी (१८२९-पासून) बंद केली, ही याचीच निशाणी. इंग्रजी विद्येचे महत्त्वही जाणत्यांना हळूहळू पटू लागले होते. शिवाय, इंग्रजी शिक्षणामुळे सरकारी नोकरी मिळणे सुलभ होई व अधिकार, अर्थप्राप्ती व सामाजिक प्रतिष्ठा यांची द्वारे झटकन खुली होत. महाराष्ट्रातील सुशिक्षित ब्राह्मणांची शैक्षणिक पार्श्वभूमी लक्षात घेता त्यांनी नवे शिक्षण घेण्याचा मार्ग अहमहमिकेने चोखाळावा, या नव्या शिक्षणाविषयी इतरांहून अधिक अगत्य दाखवावे,[१] प्रसंगी इतरांनी या राखीव क्षेत्रात प्रवेश करू नये असा प्रयत्न करावा, हे स्वाभाविक हो जुन्या संस्कृत पठडीने अध्ययन केलेली प्रौढ मंडळीही नव्या उत्साहाने इंग्रजीची धुळाक्षरे गिरवून या नव्या विद्येत पारंगत होऊ लागली होती. कृष्णशास्त्री चिपळूणकर हे याचे प्रातिनिधिक उदाहरण. जुन्या पद्धतीने संस्कृत विद्येचे अध्ययन पूर्ण झाल्यानंतर वयाच्या पंचविसाव्या वर्षी त्यांनी इंग्रजीच्या अध्ययनाला सुरुवात करून त्यात पारंगतता मिळविली. एवढेच नव्हे, तर मराठीचे विशिष्ट मुंबईवळण सोडून तिला खास पुणेरी वळण लावण्यास मोठा हातभार लावला. विष्णुशास्त्री चिपळूणकरांपर्यंतच्या वाङ्मयलेखकांचे चरित्र पाहिल्यास बहुतेक सारे लेखक सरकारी नोकरीत व बौद्धिक व्यवसायातच मग्न असल्याचे दिसते. इंग्रजी राजवटीत पार्शी, गुजराती, बंगाली वगैरे समाजांतील व्यक्तींनी व्यापाराच्या क्षेत्रात पदार्पण केले, तसे महाराष्ट्रियांनी केले नाही. व्यापारक्षेत्रातील वा औद्योगिक क्षेत्रातील परपराप्राप्त उपेक्षा महाराष्ट्रियांत चालूच राहिली. नव्या राजवटीत मध्यमवर्गीय महाराष्ट्रियांनी जो पेशा पतकरिला, तो शिक्षण व नोकरी यांचाच. सरकारी नोकरीमुळे या सुशिक्षित महाराष्ट्रियांच्या कर्तृत्वाला काही मर्यादा पडल्या; पण बौद्धिक, वृत्तपत्रीय, शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रांत त्यांचे सारे बळ व निष्ठा एकवटल्याने त्याला व्रतपालनाचेही स्वरूप आले. मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतर जे पहिलेवहिले पदवीधर तयार झाले, ते सारे एकजात महाराष्ट्रीय ब्राह्मण आहेत. एवढेच नव्हे, तर पुढेही दीर्घकाल मुंबई प्रांतापुरता विचार केल्यास पदवीधरांच्या एकूण संख्येत महाराष्ट्रियांचे प्रमाण अधिक आढळते. या बुद्धिजीवी मध्यमवर्गीय

१. गुजरातमध्ये इंग्रजी शाळा काढावी, असा गुजरातमध्ये राहणाऱ्या महाराष्ट्रीय ब्राह्मणांचा अर्ज होता; पण तशी स्थानिक बहुसंख्याकांची मागणी नाही, म्हणून तो फेटाळला गेला.

2. Selections from Educational Records, Part I, P. 184.
— Parulekar.

सुशिक्षितांच्या आचारविचारांची छाप महाराष्ट्राच्या संस्कृतीवर व वाङ्मयावर रहावी व त्यात महाराष्ट्रातल्या त्या विशिष्ट थराच्या संस्कृतीचे प्रतिबिंब पडावे, हे स्वाभाविकच होते. अव्वल इंग्रजीतील पहिल्या पिढीतील बहुतेक लेखक मुंबईचे व चौल-अष्टागरा-सारख्या कोकणच्या विशिष्ट भागातून आलेले; यामुळे गद्य भाषेवर जी छाप होती, ती या साध्या कोकणी बोलभाषेची. ती नाहीशी करून कृष्णशास्त्री चिपळूणकर व त्यांचे समकालीन पुणेरी लेखक यांनी तिला संस्कृतप्रचुर, प्रौढ असे ग्रांथिक वळण दिले. यालाच पुणेरी वळण असे म्हणतात. मराठी वाङ्मयाचा केंद्रबिंदू जो अव्वल इंग्रजीत मुंबई हा होता, तो आता पुणे हा बनला व पुढे तो न्या. रानडे, विष्णुशास्त्री चिपळूण-कर, लो. टिळक, आगरकर, हरिभाऊ आपटे वगैरेंच्या पुण्यातील वास्तव्याने व व कर्तृत्वाने तेथेच स्थिर झाला.

## भाषेचे पुणेरी वळण आणि मेजर कँडी

हे पुणेरी वळण लावण्यास ज्या कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, महादेवशास्त्री कोल्हटकर, विष्णुशास्त्री पंडित इत्यादींचे साहाय्य झाले, ती सारी शास्त्री-मंडळी एल्फिन्स्टनने सुरू केलेल्या पुण्याच्या संस्कृत पाठशाळेत शिकून तयार झालेली होती. संस्कृत भाषेत यांनी नैपुण्य संपादिले होतेच. शिवाय, या पाठशाळेला जोडून सुरू केलेल्या इंग्रजी शिक्षणाचा लाभही या मंडळींना झाला होता. इंग्रजीच्या अध्ययनाने आलेल्या नव्या दृष्टीचा जुन्या संस्कृताशी मेळ घालण्याची कामगिरी मुख्यतः या मंडळींनी केली. विदग्ध संस्कृत साहित्याची – काव्यनाटकांची – भाषांतरे या रसिक व विद्वान मंडळींनी मराठीत केली व जुने ललितवाङ्मय सर्वसाधारण माणसाला प्रथमच उपलब्ध करून दिले. या मंडळींचे वाङ्मयीन कार्य प्राधान्याने भाषांतरात्मक असले, तरी ललितवाङ्मयाच्या संदर्भात त्यांना महत्त्वाचे स्थान आहे. पुणे पाठशाळेला इंग्रजीचा वर्ग जोडल्यानंतर इंग्रजी भाषेतील ज्ञान देशी भाषांतून रूपांतरित करण्याचेही एक उद्दिष्ट राज्यकर्त्यांसमोर होते. या भाषांतर-रूपांतरांच्या कामासाठी संस्कृताचे साहाय्य शक्य तितके घेण्याचे धोरण अंगीकारिल्यानेही मराठी भाषेला संस्कृतप्रचुर वळण लागले असावे.[1] हे वळण लावण्यात पुणे पाठशाळेचा प्रमुख मेजर कँडी याचा फार मोठा वाटा आहे. मेजर कँडी हा १८३७-पासून पुणे पाठशाळेचा प्रमुख होता. त्याने सुमारे तीस-बत्तीस वर्षे मराठीची सेवा केली. मराठी भाषेच्या आधुनिक ग्रांथिक शैलीवर याच्याइतकी, विदेशीच काय, पण इतर कोणत्याही देशी पंडिताची वा ग्रंथकाराची छाप नाही. वि. कों. ओकांसारख्या तत्कालीन प्रमुख देशी ग्रंथकाराने

1. "Knowledge must be drawn from the store of English language, the vernaculars must be employed as the media of communicating it, and Sanskrit must be largely used to improve the vernaculars and make them suitable for the purpose."

आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, कृ. भि. कुलकर्णी, पृ. २२.

आपणांस मेजर कँडीने लिहावयास शिकविल्याची प्रांजळ कबुली दिली आहे. परशुरामपंत तात्या गोडबोले यांनी केलेल्या 'नवनीत' या प्राचीन मराठी कवितेच्या महत्त्वपूर्ण संपादनाला मे. कँडीचे प्रोत्साहन होते. शाळाखात्याशी व दक्षिणा प्राइझ कमिटीसारख्या संस्थांशी मे कँडीचा अधिकारी या नात्याने संबंध आला होता. ग्रंथपरीक्षण, मुद्रणालय व भाषांतर याही खात्यांचा तो प्रमुख होता. कोशरचना व व्याकरण तयार करण्याच्या कामात त्याचा हात होता. पाठ्यपुस्तके तयार करून घेणे, ग्रथांच्या नवीन आवृत्त्या तयार करणे इत्यादी कामेही सरकारने त्याच्याकडेच सोपविली होती. वाङ्मयाचा आशय व त्याची अभिव्यक्ती या बाबतीत निर्णायक मत देणारा प्रमुख सरकारी अधिकारी कँडीच होता. मे. कँडीचे निर्णय काही वेळा एककल्लीपणाचे निदर्शक वाटले, तरी वाक्यरचना, प्रयोग, शब्दांची रूपे यांवर त्याचे बारीक लक्ष असे. ग्रथकारांना ग्रंथसुधारणेच्या बाबतीत अनेक तपशीलवार सूचना तो देई. मराठी वाक्यरचनेतील शैथिल्य व अनियमितपणा काढून टाकून भाषेला बंदिस्तपणा आणिला, तो मेजर कँडीनेच. मराठी भाषेच्या लेखनात विरामचिन्हे वापरण्याची पद्धतीही त्यानेच सुरू केली. सत्ताधाऱ्यांच्या पाठिंब्यामुळे स्वतःच्या कल्पनेप्रमाणे त्याने भाषेला वळण दिले आणि विद्याखात्याशी संबंध असल्यामुळे ते लोकांच्या गळी उतरविले. मनोरंजनात्मक ग्रंथापेक्षा बोधप्रचुर वाङ्मयनिर्मितीकडे त्याचा अधिक कल होता. वाङ्मयीन सौंदर्यापेक्षा सुबोध व्यावहारिक माहितीपर धडे वाचनपाठमालेत घालण्याकडे त्याची प्रवृत्ती होती. तोच कित्ता दीर्घकालपर्यंत शाळाखात्यात चालू होता.

## चार वेगवेगळी वळणे

मेजर कँडीने मराठी भाषेच्या गद्यशैलीकडे लक्ष पुरविण्यापूर्वी मराठी भाषेत सामान्यतः चार प्रकारची वळणे रूढ झाली होती :

( १ ) गृहस्थी वळण या नावाने प्रसिद्धी पावलेले जुने पेशवाई वळण

( २ ) शास्त्रीवळण किंवा संस्कृती वळण

( ३ ) इंग्रजी किंवा नवे भाषांतरी वळण

( ४ ) संमिश्र वळण [१]

या चार वळणांपैकी ग्रंथात कोणतेही वळण वेळप्रसंगी येत असे. दादोबा पांडुरंग यांच्या 'यशोदा-पांडुरंगी'ची प्रस्तावना पाहिल्यास आपले नेहमीचे बालबोध वळण सोडून मुद्दाम प्रौढ संस्कृतप्रचुर भाषेचा आश्रय त्यानी संस्कृत पंडितांना स्वतःची 'यशोदा-पांडुरंगी'संबंधीची भूमिका पटविण्यासाठी केलेला दिसतो. त्यांच्या आत्मचरित्राची शैली याहून अगदीच वेगळी वाटते.[२] आशयाप्रमाणे व व्यक्तीप्रमाणे

१. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, द. वा. पोतदार, उपोद्घात, (आवृत्ती-२), पृ. २५.

२. दादोबा पांडुरंग, आत्मचरित्र, संपादक अ. का. प्रियोळकर, पृ. ३०.

शैली बदलते हे सर्वसाधारणपणे खरे असले, तरी हा नियम प्रस्तुतच्या कालाला तेवढा लागू पडत नाही. कारण व्यक्तित्वानुसारी लेखनपद्धतीपेक्षा ठराविक कित्त्याबरहुकूम लेखन करण्याचा तो काळ होता; आणि आशयाचे स्वरूपही शक्य तितके वस्तुनिष्ठ व ठराविक प्रकारचे असे. वर जी वेगवेगळी वळणे सांगितली आहेत, ती वेगवेगळ्या शैलींची जशी निदर्शक आहेत, तशी मराठी लेखनाच्या अनियमितपणाचीही निदर्शक आहेत. त्या काळच्या मराठीत पर्शियन शब्दांचे प्रमाणही अलीकडच्या मानाने अधिक होते. कारण संस्कृत भाषा व जुने मराठी काव्य यांच्या जोडीला पर्शियन भाषेच्या अध्ययनाची पद्धतीही त्या काळी प्रचलित होती. या परिस्थितीत मेजर कॅंडीचा एकंदर ओढा संस्कृतीकरणाकडे होता, हे बापू छत्रे याच्या 'बाळमित्र' या पुस्तकाची नवी आवृत्ती काढताना त्याने या पुस्तकाच्या भाषेत केलेल्या बदलावरून स्पष्ट दिसते. (मराठी गद्याची उत्क्रांती, कृ. भि. कुलकर्णी, पृ. १५७–१५८). परग्रंथांतील गंभीर आशयाचे मराठी भाषांतर करिताना संस्कृताचा आश्रय करणे हे तत्कालीन विद्वानांना अपरिहार्य वाटत होते, हे 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' या पुस्तकाच्या संदर्भात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी काढिलेल्या उद्गारांवरून स्पष्ट होते.[1] हेच संस्कृतप्राचुर्य 'मुक्तामाला', 'मंजुघोषा' यांसारख्या कादंबऱ्यांतही शिरलेले दिसते. 'गंगावर्णन' या काव्याच्या प्रस्तावनेत या काव्याचे लेखक बापूसाहेब कुरुंदवाडकर तर संस्कृत भाषेला इंग्रजीपेक्षा श्रेष्ठ ठरवितात. संस्कृत भाषा, संस्कृत साहित्य, भारतीय इतिहासपरंपरा इत्यादींना एक वेगळे महत्त्व या कालात आले. संस्कृतसाहित्याच्या मराठी अनुवादाबरोबरच जुन्या मराठी काव्याकडेही लोकांचे व सरकारचे लक्ष गेलेले आढळते.

### नवीन शिक्षणाचे परिणाम

कंपनी-सरकारची १८१३-नंतरची शैक्षणिक भूमिका लक्षात घेतली, म्हणजे इंग्रजी राजवटीच्या पहिल्या अवस्थेत पौरस्त्य विद्या, कला व देशी ग्रंथ यांच्या अभ्यासाला उत्तेजन का मिळाले, हे समजू शकते. राज्यकर्त्यांना यामुळे समृद्ध भारतीय वारशाची कल्पना तर आलीच, पण त्याहीपेक्षा जुन्या ठेव्याकडे बुद्धिनिष्ठ, चिकित्सक, ऐतिहासिक अशा नव्या दृष्टीने पाहण्याची प्रेरणा एतद्देशीयांना मिळाली.

१. या "ग्रंथांत शास्त्रीय विषयांचे निरूपण करिताना संस्कृत शब्द आले आहेत; परंतु तसल्या विषयावर लिहितांना संस्कृत शब्द घातल्यावांचून उपाय चालत नाहीं, हे प्रायः सर्व सुज्ञ मराठी ग्रंथ लिहिणाऱ्यांचे अनुभवास आलेच असेल; ह्यास्तव विद्वज्जन निरुपाय गोष्टींविषयी प्राकृत ग्रंथकारास नांव फारसे ठेवणार नाहींत, अशी खातरी आहे."

'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह', प्रस्तावना.

त्यातील वाङ्मयीन व वैचारिक सौंदर्यामुळे पाश्चात्त्य लोकही भारावून गेलेले पाहून[1] प्राचीन संस्कृतीविषयीचा आपला अभिमान जागा झाला व यातून पुढे भारतीय संस्कृतीची गौरवगाथा तयार झाली. आपल्या राष्ट्रीयतेची ज्वाला प्रदीप्त होण्यास या गौरवभावनेने पुष्कळ काळ इंधन पुरविले. पाश्चात्त्य संस्कृतीने भारावून जाऊन तिच्या अंधळ्या अनुकरणापासून येथील समाजाला परावृत्त करण्यास हेच संस्कृतिधन इंग्रजी अमलाच्या पूर्वार्धात उपयोगी पडले. ब्राह्मो समाज, प्रार्थना-समाज, आर्य-समाज इत्यादी ब्रिटिश राजवटीतील नव्या धार्मिक-सामाजिक संस्थांमागचे अधिष्ठान या प्राचीन संस्कृतीच्या थोरवीवरच आधारलेले आहे. इंग्रजी राजवटीच्या उत्तरार्धात राष्ट्राभिमानाचे स्फुलिंग यातूनच निर्माण झाले. राष्ट्राभिमानाची प्रयोजक कारणे आणखीही काही आहेत; पण त्याच्या आविष्काराचे प्रमुख साधन प्राचीन संस्कृती व प्राचीन इतिहास हेच राहिले. ऐतिहासिक कथा, काव्य, नाट्य यांना यामुळेच पुढे बहर आला. पाश्चात्त्य संस्कृतीतील नवविचारग्रहण करतानासुद्धा तिची बैठक जुन्या हिंदु-धर्माच्या तत्त्वावर आधारण्याचा प्रयत्न थेट राजा राममोहन रायपासून दयानंद, न्या. रानडे, विवेकानंद, लो. टिळक, म. गांधी, रवीन्द्रनाथ टागोर, महर्षी अरविन्द, आचार्य विनोबा येथपर्यंत झालेला दिसून येईल. केवळ वाङ्मयदृष्ट्या विचार केल्यास इंग्रजी राजवट येथे दीर्घकाल राहूनही आपल्या वाङ्मयप्रकारांचे वा आशय-आविष्कार-पद्धतींचे युरोपइतके आधुनिकीकरण न होण्याचे हे एक कारण आहे. प्रार्थनासमाजाच्या प्रचारासाठी न्या. रानडे यांनी जुन्या संतकवींचा आश्रय केला, किंवा डॉ. भांडारकरांनी कीर्तनसंस्थेचा वापर केला, यात नवल नाही; पण मिशनऱ्यांसारख्या परधर्मीय लोकांनी स्वधर्मप्रचारासाठी भारतीय कीर्तनपद्धतीचा उपयोग केल्याचे उदाहरण अमेरिकन-मराठी-मिशनच्या इतिहासात आढळते.

पौरस्त्य भाषांच्या द्वारा पाश्चात्त्य ज्ञानाचे वितरण करण्याचा हा प्रयोग फार काळ चालू राहिला नाही. इ. स. १८३३-पासून वारे उलट दिशेने वाहू लागले. याचा परिणाम जरी मुंबई प्रांतात थोड्या उशिरा दिसून आला, तरी मुख्यतः देशी भाषांना उत्तेजन देण्याचे मध्यवर्ती कंपनी-सरकारचे धोरण १८३५-पासून बदलल्याने १८४०-नंतर मुंबई प्रांतातील शिक्षणपद्धतीला नव्या धोरणाचे वेध लागले. १८४७–४८-पासून शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न मुंबई प्रांतात धसास लागला. यामुळे मुंबई

१. कालिदासाच्या अभिज्ञानशाकुंतलाचे इ. स. १७८९-मध्ये वुइल्यम् जोन्सने केलेले इंग्रजी भाषांतर व साऱ्या युरोपखंडात त्याचा झालेला बोलबाला, उपनिषदांची राजा राममोहन यांनी १८१६–१८१९-च्या दरम्यान केलेली भाषांतरे व त्या जोरावर मिशनरी लोकांचे त्यांनी परतवून लाविलेले हल्ले, १८४९-च्या पुढे माक्स म्युलर याने या ग्रंथांच्या वाङ्मयीन व भाषिक प्राचीनतेचा दिलेली निर्वाळा, १८०४-मध्ये स्थापन झालेली बॉंबे लिटररी सोसायटी, पौरस्त्य ग्रंथांची युरोपमधील वाढती मागणी इत्यादी गोष्टी या संदर्भात लक्षात घेण्यासारख्या आहेत.

प्रांतापुरता विचार केल्यास देशी भाषांना अधिकृतरीत्या व पूर्णतया उत्तेजन देण्याच्या सरकारी धोरणाचा काळ सुमारे पाव शतकाचा ठरतो. एखाद्या भाषेच्या प्रारंभापासूनच्या सर्वांगीण विकासाला ( विशेषतः परकीय अमलाखाली ) मिळालेला हा अवसर अत्यल्पच मानावयास हवा. मराठी वाङ्मयाच्या अव्वल इंग्रजीतील निर्मितीचा विचार करिताना या गोष्टीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. बदललेल्या शैक्षणिक धोरणाने देशी भाषांना प्रत्यक्षपणे उत्तेजन देण्याचे सरकारी धोरण ( दक्षिणा प्राइझ कमिटीसारखे अपवाद वगळल्यास ) संपुष्टात आल्याने यापुढील मराठी वाङ्मयाची वाटचाल पाहताना नव्या धोरणाचे झालेले अप्रत्यक्ष परिणामच विचारात घ्यावे लागतात. प्रत्यक्षपणे याचे परिणाम झाले, ते येथील लोकांच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय दृष्टिकोणावर. मात्र या दृष्टिकोणाने पुढील ललित-अललित मराठी साहित्याला पुष्कळच खाद्य पुरविले.

**इंग्रजी माध्यम आणि देशी भाषांच्या शिक्षणाची पिछेहाट**

१८१३ साली सुरू झालेल्या शैक्षणिक धोरणात ही जी १८३३-पासून क्रांती झाली, तीत देशी भाषा वा पौरस्त्य भाषा यांना उत्तेजन देण्याचे व त्यांना शैक्षणिक माध्यम बनविण्याचे धोरण जाऊन इंग्रजी शिक्षण व इंग्रजी माध्यम यांच्यावरील भर वाढू लागला. देशी भाषांच्या कैवाऱ्यांचा पक्ष मागे पडून इंग्रजीच्या अभिमान्यांचे पारडे जड झाले. मुंबई प्रांतात देशी भाषेवर ज्या पद्धतीने खर्च केला जाई, त्याबद्दलची नापसंती व्यक्त करणारे पत्र मुंबई-सरकारास कंपनी-सरकारच्या नियामक-मंडळाकडून १८३२-मध्येच आले.[१] मुंबई-सरकारचे देशी भाषांना उत्तेजन देण्याचे प्रयत्न पुढे काही काळ चालले. प्रसंगी मध्यवर्ती कंपनी-सरकारच्या या बदलत्या धोरणाशी देशी भाषेचा कैवार घेणाऱ्या मुंबई प्रांतातील सरकारी अधिकाऱ्यांनी टक्करही दिली. बंगाल प्रांतापेक्षा मुंबई प्रांताची परिस्थिती या बाबतीत वेगळी होती. बंगालमध्ये शैक्षणिक माध्यमाबाबत जो झगडा होता, तो बंगाली विरुद्ध इंग्रजी असा नसून संस्कृत-अरेबिक विरुद्ध इंग्रजी असा होता; orientalist व occidentalist यांमधील होता. बंगालीचा कैवार तेथील स्थानिक बंगाली लोकांनीही घेतला नाही. उलट राजा राममोहन रायसारख्या तत्कालीन अग्रगण्य पुढाऱ्यांनी उपनिषदांचे महत्त्व ओळखूनही पुरोगामी विचारांची बीजे भारतात रुजविण्याच्या दृष्टीने १८२३-पासूनच इंग्रजीच्या बाजूने कौल दिला होता. एवढेच नव्हे, तर इंग्रजीचे शिक्षण देणाऱ्या संस्था त्यांनी स्वतंत्रपणे काढिल्या होत्या. मुंबई प्रांतात इंग्रजीच्या शिक्षणाला विरोध होता असे नव्हे, पण त्याबरोबरच मराठी-गुजरातीसारख्या देशी भाषाची उपेक्षा होऊ नये, अशी वाजवी अपेक्षा येथील जगन्नाथ शंकरशेठसारख्या संस्कृत भाषाभिमान्यांची होती. देशी भाषेच्या माध्यमासाठी या अव्वल काळात मुंबई प्रांताइतका अन्य कोणत्याही प्रांताने झगडा केलेला नाही. पण बंगालमधील मुख्य सरकारी कचेरीचा

१. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, द. वा. पोतदार, नवी आवृत्ती, पृ. ३१.

व खुद्द विलायतमधील नियामक-मंडळाचा कौल संपूर्ण इंग्रजीकरणाच्या बाजूने पडल्याने मुंबई सरकारलाही आपले धोरण हळूहळू बदलणे प्राप्त झाले. परिणामतः देशी भाषांच्या सांस्कृतिक विकासाला पुन्हा जबर धक्का बसला. पुढे १८५७ साली मुंबई विद्यापीठाची स्थापना होऊन व न्या. रानडे, तेलंग वगैरेसारख्या व्यक्तींनी प्रयत्न करूनही मुंबई विद्यापीठात अलीकडच्या काळापर्यंत मराठीला मानाचे स्थान मिळाले नव्हते. विद्यापीठाच्या स्थापनेनंतर १८६२-पर्यंत बी. ए ला एक गौण विषय म्हणून मराठीला स्थान होते; पण त्यानंतर मराठीत बी. ए.ला शिकविण्याजोगे योग्य ग्रंथ नाहीत, विद्यापीठाच्या एकूण गरजा लक्षात घेता जुने मराठी काव्य शिकविण्याची गरज नाही, अशा सबबींवर त्या वेळच्या मुंबई प्रांताच्या विद्याधिकाऱ्याने मुंबई विद्यापीठातून मराठीचे उच्चाटन केले.[1] अर्थात विद्यापीठाचे हे कृत्य १८३३-च्या व त्यानंतर १८५३ साली असलेल्या कंपनी-सरकारच्या धोरणाला अनुसरूनच होते. १८३३-च्या शिक्षणक्षेत्रातील इंग्रजीकरणाच्या मूलभूत भूमिकेत १८५३-मध्ये कंपनीला नवी सनद देताना काही फरक केला गेला नाही. शिक्षण-खात्याची कारभारदृष्ट्या पुनर्रचना करणे व विद्यापीठांची स्थापना करणे एवढेच नवे कार्य या १८५३-च्या धोरणाने केले गेले.

### धोरण बदलण्यामागील हेतू

१८१३-पासून सुरू झालेले शिक्षणविषयक धोरण १८३३-पासून बदलण्यास कंपनी-सरकारच्या बाजूने अनेक कारणे होती; त्यांची राजवट येथे एव्हाना चांगली स्थिर झाल्याने एतद्देशीयांचा अनुनय करण्याची त्यांना यापुढे गरज उरली नव्हती. प्रत्येक प्रांताची भाषा वेगवेगळी असल्याने सर्व कारभारात एकसूत्रीपणा ठेवण्याच्या दृष्टीने प्रांतानिहाय वेगवेगळ्या भाषेला उत्तेजन देणे त्यांना गैरसोयीचे वाटू लागले होते. इंग्रजीचे वितरण येथील जनतेची इंग्रजविरोधी भावना नष्ट करिते, राजकीय क्रांतीला विरोधी वातावरण निर्माण करिते, इंग्रजी संस्कृती, धर्म व चालीरीती यांचे अनुकरण करण्याची वृत्ती प्रबल करिते; एवढेच नव्हे, तर व्यापारवृद्धीस, खिस्ती धर्मप्रचारास व राज्याला बळकटी आणण्यास सहायभूत होते, असा राज्यकर्त्यांचा आतापर्यंतचा अनुभव होता. उलट, प्राचीन विद्यांच्या अध्ययनाने एतद्देशीयांची अस्मिता जागृत होण्याची शक्यता दिसत होती. स्वतःच्या मतलबासाठी शरिराने हिंदी पण मनाने इंग्रजी असा एक एतद्देशीयांचा वर्ग राज्यकर्त्यांना येथे निर्माण करावयाचा होता.[2] असे झाल्यास या आंग्लशिक्षित वर्गाद्वारे स्थित्यंतर घडवून आणिता येईल, असा

---

1. History of Education in India, Naik & Nurulla, P. 292.

2 "We must do our best to form a class who may be interpreters between us and the millions whom we govern, a class of persons Indian in blood and colour, but English in taste, in opinions, wor ds and intellect." Macaulay.

Education in India under E. I. Company, B. D. Basu, Page 92.

त्यांना विश्वास वाटत होता. अव्वल दर्ज्यांचे पाश्चात्त्य शिक्षण देऊन त्यातून वरच्या दर्ज्यांचे सेनापती, मुत्सद्दी वा कायदेपंडित एतद्देशीयांतून तयार करावेत, हे इंग्रज सरकारच्या शिक्षणाचे कधीच प्रयोजन नव्हते.[1] सैनिकी पेशाच्या लोकांना वरच्या दर्ज्यांचे शिक्षण देणे हे शैक्षणिक क्षेत्रात अतिउदार दृष्टी स्वीकारणाऱ्या सर चार्ल्स एड्वर्ड ट्रेव्हेलियनसारख्या व्यक्तीलाही अमान्य होते. सैनिकांना शिक्षण द्यावयाचेच झाले, तर ते ब्रिटिशांशी कृतज्ञ राहतील इतपत द्यावे, असे तो म्हणतो. सर चार्ल्स एड्वर्ड ट्रेव्हेलियनने बंगालच्या मुलकी खात्याचा सदस्य म्हणून भारतात बारा वर्षे काढिली होती. येथील शैक्षणिक खात्याशीही (General Committee of Public Instruction) सभासद या नात्याने त्याचा घनिष्ठ संबंध आला होता. इ. स. १८३८-मध्ये त्याने भारतातील शैक्षणिक परिस्थितीवर व पद्धतीवर प्रकाश टाकणारा एक ग्रंथ लिहिला आहे.[2] त्यात तो म्हणतो, "भारतीय लोकांना ज्ञानवान करण्याचे आपले धोरण नाही. वस्तुत:, तसे असावयास पाहिजे. आपण त्यांना ज्ञानवान करण्याने जे सामर्थ्य त्यांच्या ठिकाणी निर्माण करू, ते कालांतराने आपल्यावरच उलटण्याचा संभव असल्याने स्वतःच्या पायावर एक प्रकारे कुऱ्हाड पाडून घेतल्यासारखे होईल, हे खरे; पण हा झाला दूरचा विचार. सद्यःस्थितीत येथील लोकांना ज्ञान देण्याने इंग्रजांनाही काही महत्त्वाचे लाभ होणार आहेत. या नवशिक्षणामुळे येथे सुधारणा होईल, पण क्रांती होण्याची भीती कांही काल तरी टळेल; एतद्देशीयांच्या मनात आपल्याबद्दल आदर-बुद्धी निर्माण होईल; येथील उत्पादनतंत्र व लोकस्थिती सुधारल्याने येथील सुपीक जमिनीतून उत्कृष्ट पिके निर्माण होऊन इंग्लंडची कच्च्या मालाच्या पुरवठ्याची निकडीची गरज भागेल."

## मध्यमवर्गापुरते शिक्षण

त्या वेळच्या लोकस्थितीचे व मनोवृत्तीचे जे वर्णन सर चार्ल्स एड्वर्ड ट्रेव्हेलियनने केले आहे, त्यावरून असे दिसते की, वरच्या वर्गाला स्वराज्य प्राप्त व्हावे, असे वाटत होते. खालच्या वर्गांचे जुने उद्योगधंदे नव्या राजवटीत नष्ट झाल्याने ते इंग्रज राजवटीबद्दल मनातून नाराज झाले होते; मात्र मध्यमवर्गीय समाज तेवढा असा होता की, त्याला इंग्रजी राजवटीमुळे निर्माण झालेल्या वक्तृत्वसभा, वाचनालये, चर्चामंडळे, छापखाने, वृत्तपत्रे इत्यादींचे आकर्षण निर्माण झालेले असून या वर्गाला नव्या शिक्षणाची गरज व महती पटलेली होती; आणि ते ज्ञान आत्मसात करण्याची उत्कंठाही लागली होती. यासाठीच कंपनी-सरकारने या मध्यमवर्गीय व्यक्तींना हाताशी धरून एक नवे पुढारीपण येथे निर्माण केले व परंपरागत चालत आलेले इनामदार, जहागिरदार, वतनदार इत्यादींचे वर्चस्व नष्ट केले. पुनश्च या जुन्या वर्गांचे पुढारीपण

1. "We do not want generals, statesmen and legislators: we want industrious husbandmen." Ibid, Page 37.

2. Education of the People of India.

निर्माण होणे अशक्य होते. कारण इंग्रजी शिक्षणात काया नसली, तरी वाचा व मन पालटण्याची किमया आहे, याची सरकारला जाणीव होती. सरकारचे बहुजनसमाजाला शिक्षित करण्याचे धोरण नव्हतेच.[१] नवशिक्षणाचे आवश्यक तेवढे संस्कार खालच्या थरात प्रविष्ट होण्यास हा आंग्लशिक्षित मध्यमवर्ग उपयोगी पडेल व त्याच्या द्वारा हे नवसंस्करण देशी भाषांच्या माध्यमांतून खालच्या थरांत झिरपत राहील ( Filtration Theory ), अशीही इंग्रजांच्या द्वारे पाश्चात्त्य विद्येचा पुरस्कार करणाऱ्यांची भूमिका होती.

### इकडील वाङ्मय व शास्त्रे यांविषयीचा प्रतिकूल ग्रह

लॉड मेकॉले हा इंग्रजी माध्यमाचा प्रमुख पुरस्कर्ता असला, तरी देशी भाषा नव्या उच्च शिक्षणाच्या दृष्टीने निरोपयोगी आहेत, असे सर्वच पक्षांचे मत असल्याचे तो नमूद करितो.[२] व्यक्तिशः तर त्याचा प्राचीन भारतीय वाङ्मयाबद्दल विलक्षण प्रतिकूल ग्रह होता. ज्या कागदावर हे ग्रंथ छापिले जातात, त्या कागदाच्या किमतीचेहि ते नसतात, हे त्याचे उद्गार प्रसिद्धच आहेत. त्याच्या मते या ग्रंथांत जे आढळते, ते सारे त्याज्य, टाकाऊ व हास्यास्पद होते.[3] मेकॉले हा त्या वेळी कंपनी-सरकारच्या नोकरीत महत्त्वाच्या हुद्द्यावर ( Law Member ) होता त्या वेळचा गव्हर्नर-जनरल बेंटिंक हा इंग्रजी शिक्षणाला अनुकूलच होता. विलायतमधील नियामकमंडळाचा १८३३ साली कंपनीला नवी सनद देताना इंग्रजी शिक्षण देण्याचा आदेश मिळालेला होता; देशी भाषांच्या द्वारा शिक्षण देण्याचा आतापर्यंतचा प्रयत्न राज्यकर्त्यांना असमाधानकारक वाटत होता; व देशी भाषा इंग्रजीच्या तुलनेने आधुनिक क्षेत्रांत फारच मागासलेल्या होत्या. या सर्वांचा साकल्याने झालेला परिणाम म्हणजे बेंटिंकने भारतात इंग्रजी शिक्षणाचा पुरस्कार करण्याबाबत काढलेले ७ मार्च १८३५ रोजीचे फर्मान.[४]

1. With the very limited means at the disposal of Government for educational purposes, it is impossiple to undertake such a gigantic scheme as the education of the masses of India.
Report of the Board of Education, 1847-1848, Page 3.

2. All parties seem to be agreed on one point, that the dialects commonly spoken among the natives of this part of India contain neither literary nor scientific information, and are, moreover, so poor and rude that until they are enriched from some other quarter, it will not be easy to translate any valuable work into them.

3. "Absurd history, absurd metaphysics, absurd physics and absurd theology" हे त्याचे शब्द.

4. The great object of the British Government ought to be the promotion of European literature and science among the natives of India; and that all the funds appropriated for the purpose of education would be best employed on English education alone.
Education in India under E. I. Company, B. D. Basu, Page 84.

## इंग्रजी शिक्षणाचे उद्दिष्ट

इंग्रजी शिक्षणाचे हे १८३५-पासून सुरू झालेले पर्व पुढे १८५३–५४ साली पुन्हा कंपनीला सनद देतेवेळी चालूच राहिले.[१] शास्त्रीय ज्ञानाचा येथे अधिक प्रसार करावा, अशी मनीषा १८५४ सालच्या शिक्षणविषयक खलित्यात प्रकट केली आहे, पण हे शास्त्रीय ज्ञान फार वरच्या पातळीचे असू नये, व्यवहारोपयोगी असावे, असाही इशारा त्यात आहे.[२] या खलित्यात शिक्षणाची जी उद्दिष्टे ग्रथित केली आहेत, त्यांत निरनिराळ्या पाश्चात्त्य विद्यांचा परिचय, भारतीयांचे नैतिक व भौतिक उन्नयन व त्यांच्यातील परंपरागत अज्ञानजन्य कल्पना व रूढी इत्यादींचे निर्मूलन यांना प्राधान्य दिले आहे. हे कार्य पवित्रतम असून ते पार पाडण्याची जबाबदारी इंग्लंडवर आहे; आणि या कार्याला अनुकूल भूमिका व स्थैर्य फक्त नव्या प्रकारचे शिक्षणच देऊ शकेल, असेही या खलित्यात म्हटले आहे.[३] मुंबई, मद्रास, कलकत्ता इत्यादी ठिकाणी १८५७ साली विद्यापीठांची स्थापना केली गेली, ती वर नमूद केलेल्या धोरणाच्या अनुषंगानेच. विद्यापीठातील शिक्षणक्रमात कायदा व स्थापत्यशास्त्र ( Law and Civil Engineering ) यांना प्राधान्य द्यावे, अशी सूचना असून कलाविभागाच्या ( Arts Faculty ) पदवीच्या अभ्यासक्रमात भाषा, इतिहास, गणित, तत्त्वज्ञान, भौतिक व नैतिक शास्त्रे इत्यादींना महत्त्व असावे, असे म्हटले आहे. सर्वसामान्य माणसाला सज्ञान बनविण्यासाठी जिल्हावार शाळा वाढण्याची व स्थानिक मदत व सरकारी मदत ( Grant-in-aid ) यावर या शाळा चालविण्याची भूमिका या खलित्यात आढळते.

---

1. Diffusion of improved Arts, Science, Philosophy and Literature of Europe, in short, of European knowledge.
Education Despatch of 1854.

2. Of a less high order but of such a character as may be practically useful to the people of India in different spheres of life.
Education Despatch of 1854.

3. It is one of our most sacred duties, to be the means as far as in us lies of conferring upon the natives of India those vast moral and material blessings which flow from the general diffusion of useful knowledge, and which India may, under providence, derive from the connection with England. For, although British influence has already in many remarkable instances, been applied with great energy and success to uproot demoralising practices, and even crimes of a deeper dye, which for ages had pervaded among the natives of India, the good results of those efforts must, in order to be permanent, possess the further sanction of a general sympathy in the native mind which the advance of education alone can secure.

## देशी भाषांची आबाळ

या १८५४-च्या खलित्यापुरताच विचार केल्यास भारतीय भाषांना पूर्णपणे डावलण्याची भूमिका त्यात नाही. तसे त्या खलित्यात नमूदही केले आहे.[1] बहुजनसमाजाला ज्ञान देण्याच्या संदर्भात देशी भाषांची उपयुक्तता या खलित्यात मान्य केली असून इंग्रजी भाषा व देशी भाषा यांचा योग्य त्या प्रकारचा मेळ घालण्याची अपेक्षाही त्यात व्यक्त केली आहे. पण प्रत्यक्षात मात्र ही अपेक्षा व हे धोरण कधीच अमलात आली नाहीत. संस्कृतासारख्या प्राचीन भाषांना काही-एक स्थान विद्यापीठात मिळाले; पण देशी भाषांना मात्र कधी महत्त्व मिळाले नाही. येथील विचारवंतांकडून प्रयत्न होऊनही मराठीसारख्या देशी भाषांची विद्यापीठांतून कशी गळचेपी झाली, याचा निर्देश मागे केला आहेच.

## इंग्रजी शिक्षण आणि माध्यम यांचे परिणाम

पाश्चात्त्य विद्यांचे शिक्षण इंग्रजीसारख्या समृद्ध माध्यमाच्या द्वारा देण्याच्या धोरणाचे काही फायदे भारतीयांच्या दृष्टीनेही झाले. आंतरप्रांतीय वैचारिक देवाणघेवाण यामुळे सुलभ झाली. समान कायदा, एकच्छत्री राजवट इत्यादींच्या जोडीला विचारविनिमयाचे एक नवे दालन येथे निर्माण झाले. उच्च पाश्चात्त्य ज्ञानविज्ञानाचे सखोल अध्ययन करण्याची संधी येथील जनतेला मिळाली. या सर्व गोष्टी झाल्या खऱ्या, तथापि या धोरणामुळे एकंदर भारतीय जनता सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेलीच राहिली.

पाश्चात्त्य विद्या व कला यांचा जो अल्पस्वल्प प्रसार येथे झाला, तो मूठभर मध्यमवर्गीयांतच. याला सरकारचे शैक्षणिक धोरण जसे होते, तसे माध्यमविषयक धोरणही कारणीभूत होते. कारण कोणतीही परकीय भाषा कितीही श्रेष्ठ झाली, तरी सर्वसामान्य माणसाच्या शैक्षणिक विकासाचा विचार करिता ती मातृभाषेचे स्थान घेऊ शकत नाही. त्यामुळे बहुजनसमाज नव्या उच्च शिक्षणापासून वंचित तर राहिलाच, पण देशी भाषांचाही मागासलेपणा कमी होऊ शकला नाही. तिचा स्वतंत्र विकास होण्याची इंग्रज राजवटीच्या प्रारंभकालातील शक्यता लुप्त होऊन तिचे परावलंबित्व कायम झाले. पूर्वी ती संस्कृताच्या ओंजळीने पाणी पिई; आता ती इंग्रजीच्या ओंजळीने पाणी पिऊ लागली. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी इंग्रजी विद्येला वाघिणीच्या दुधाची उपमा देऊन तिच्या प्राशनाने होणाऱ्या बलवृद्धीची ग्वाही दिली आहे. या दुधाच्या वेगळेपणाने भारतीयांना काही बलप्राप्ती झाली हे खरे; पण हे दूध पूर्णपणे भारतीयांच्या कधीच पचनी पडले नाही. तसे ते पचनी पडणे शक्यही नव्हते. या शिक्षणाच्या प्रारंभकाली तरी, विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्याच भाषेत बोलावयाचे झाल्यास,

1. It is neither our aim nor desire to substitute the English language for the vernacular dialects of the country.
Education Despatch of 1854.

पाश्चात्त्य विद्यावारुणीने धुंद झालेला आणि स्वभाषेकडे उपक्षेने पाहणारा वर्ग मात्र निर्माण झाला. इंग्रजपूर्व काळातील जुने चातुर्वर्ण्य लोपून त्या जागी आता हे आंग्लभाषाकोविदांचे नवे चातुर्वर्ण्य निर्माण झाले; विशेषतः परक्या भाषेच्या व परसंस्कृतीच्या अनुषंगाने हे निर्माण झाल्याने सामान्य जनतेच्या दृष्टीने पूर्वीच्या चातुर्वर्ण्यापेक्षाही ते काही बाबतीत अधिक बोचक ठरले. या नव्या आंग्लविद्याविभूषित माणसाने देशी भाषांचा उद्धार करावा, ही जी नव्या शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांची अपेक्षा होती, ती दसरीच राहून सुशिक्षितांत इंग्रजी आचार, इंग्रजी विचार, इंग्रजी उच्चार यांचेच स्तोम माजले. राज्यकर्त्यांना याचे काही सोयरसुतक असण्याचे कारण नव्हते. पण विद्वान माणसांचे सारे वाचन, लेखन व व्यवहार इंग्रजीतूनच होऊ लागल्याने ते मराठीकडे सहसा ढुंकूनही पाहीनातसे झाले. मराठीच्या वाट्याला मग जो वाचकवर्ग उरला, तो सामान्य अभिरुचीचा, असंस्कृत असा. त्याच्या गरजा भागविण्यासाठी जे ललित-अललित साहित्य निर्माण होऊ लागले, ते सामान्य दर्ज्याचे. इंग्रजीतून एखादा वाङ्मयप्रकार कोणी हौसेने आणण्याचा प्रयत्न केलाच, तर तो देशी भाषांच्या मागासलेपणामुळे व सामान्यांच्या खालावलेल्या अभिरुचीमुळे उपरा ठरू लागला.[१] इंग्रजी वाङ्मयात जे नवे वाङ्मयप्रकार निर्माण झाले, ते त्या समाजाच्या व भाषेच्या आंतरिक गरजेतून झाले. येथे त्यांना केवळ एक ' टूम ' एवढेच स्वरूप प्राप्त झाले. एतद्देशीय विद्वान अव्वल दर्ज्याचे लेखन करीत, ते राज्यकर्ते व इतरप्रांतीय विद्वान यांना कळण्याच्या दृष्टीने इंग्रजीतच; त्यामुळे यांच्या विचारसंपदेचा आणि चिंतनाचा लाभ देशी भाषांना तेवढासा मिळू शकला नाही. देशी भाषेत ग्रंथ लिहितानाही त्यांच्या प्रस्तावना बऱ्याच वेळा इंग्रजीत लिहिल्या गेल्या. वृत्तपत्रेही दीर्घकाल द्वैभाषिक राहिली. फार काय, मराठी भाषेबद्दलची उपेक्षा व अवहेलना दूर करण्यासाठी पुढे १८७४-मध्ये अवतरलेल्या विष्णुशास्त्र्याचे, आपण मराठी भाषेचे शिवाजी असल्याबद्दलचे, तेजस्वी उद्गारही मुळात इंग्रजीतूनच प्रकट झाले. या नव्या शिक्षणाने मराठी भाषेवर कसे घेडगुजरी संस्करण केले, याचे चित्र भाऊ महाजन यांनी आपल्या ' प्रभाकर ' वृत्तपत्रात १८४२-मध्येच रेखाटले आहे.[२] यापुढच्या

1. No mere foreign graftings can ever thrive and flourish, unless the tender plant on which the grafting is to be made first germinates and sends its roots deep in its own indigenous soil.

Miscellaneous Writings, Justice Ranade, Page 26.

२. " येथील लोकाची भाषा व स्थितिरीति हीं विलक्षण होत चाललीं आहेत. तीं अशीं कीं, ते बोलू लागले असतां पंचवीस शब्दांमध्ये वीस शब्द इंग्रजी येऊन मध्यें विभक्ति, अव्ययें, सर्वनामें आणि प्रसिद्ध क्रियापदें इतकीं मात्र बहुधा स्वभाषेचीं उपयोगांत आणतात. तसेच नमस्कार करणे अथवा आगतस्वागत विचारणें झाल्यास इंग्रजी शब्दांनीं करितात. "

काळात ही प्रक्रिया कितीतरी प्रमाणात वाढल्याने चिपळूणकरांना आपल्या 'निबंधमाले'तून 'भाषाशुद्धी'चा स्वतंत्रपणे आणि सविस्तर विचार करावा लागला. या सर्व अनर्थाला विशिष्ट प्रकारे देण्यात येणारे हे विलायती शिक्षणच जबाबदार असल्याचा न्या. रानडे यांचाही अभिप्राय आहे.[१]

## नव्या शिक्षणाचे धार्मिक व सामाजिक परिणाम

नव्या राजवटीमुळे व नव्या शिक्षणामुळे घडून आलेल्या या बदलाचे परिणाम या दोन क्षेत्रांपुरतेच मर्यादित राहणे शक्य नव्हते. या बदललेल्या संस्कारांचे लोण कळत-न-कळत जीवनाच्या सामाजिक, धार्मिक इत्यादी अंगांतही मग प्रविष्ट झाले. राजकीय व आर्थिक स्थित्यंतराबद्दलच्या काही नव्या कल्पना बदललेल्या परिस्थितीमुळे जीवनात वावरू लागल्या होत्या; आणि त्या प्रकारचा क्वचित उच्चारही केला गेला असला, तरी तसा आचार मात्र तत्कालीन परिस्थितीत घडणे शक्य नव्हते. राजकीय क्षेत्रात लोकशाहीचे व आर्थिक क्षेत्रात औद्योगीकरणाचे वा स्वावलंबनाचे मूल्य लोकहितवादींसारख्यांनी अव्वल इंग्रजीतच पुरस्कृत केले. विलायतेतील पार्लमेंटकडे अर्ज करून आपल्यालाही त्या प्रकारचे पार्लमेंट मागता येईल, असे ते 'शतपत्रां'तून म्हणतातही.[२] इंग्रज राज्यकर्ते योग्य वेळ आली म्हणजे आपल्याला पार्लमेंट देतील, याबद्दलही त्यांना शंका नव्हती. ही ब्रिटिश लोकशाहीवरची व त्यांच्या न्यायबुद्धीवरची एतद्देशीय सुशिक्षितांची श्रद्धा पुढे दीर्घकाळपर्यंत अविचलित राहिली होती. न्या. रानडे यांच्या कार्यकालात म्हणजे विसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत श्रद्धा व आशा ( Faith and Hope ) हेच परवलीचे शब्द होते. पण येथील अर्धरानटी परिस्थिती नष्ट झाल्याखेरीज लोकशाहीच्या मागणीला अर्थ नाही, हे अव्वल इंग्रजीतील विचारवंतांनी ओळखून त्या प्रकारची व्यावहारिक मागणी न करता त्याचा फक्त ध्येयस्वरूपी पुरस्कार केला.[३] औद्योगिक क्षेत्रात महाराष्ट्राची स्थिती फारच मागासलेली असल्याने आर्थिक

---

1. The fault does not lie with the individuals so much as with the system under which they are brought up. Thus education is so exclusively foreign that all incentive to study and to add to, the stock of national literature is for the most part, entirely wanting and year after year this indifference and neglect are becoming more pronounced.

Miscellaneous Writings, Justice Ranade, Page 44.

२. शतपत्रे, क्रमांक ५४.

३. राष्ट्रीय सभे( Indian National Congress )सारख्या संस्थेची राजकीय हक्कांबद्दची मागणी १९२९-पर्यंत वसाहतीच्या स्वराज्यापलीकडे गेली नव्हती, हे येथे लक्षात येते.

सुधारणांचा विचार तत्त्वदर्शनापुढे फारसा गेला नाही, पण धार्मिक व सामाजिक ही क्षेत्रे मात्र अशी होती की, ज्यांवर इंग्रजी राजवटीचा जोरदार आघात झाला होता. या क्षेत्रांतील मूल्यांचा अंतर्मुख होऊन तातडीने पुनर्विचार करण्याची निकड अव्वल राजवटीतच निर्माण झाली होती. आपल्या साऱ्या दुरवस्थेची बीजे या दोन क्षेत्रांतील मागासलेपणात आहेत, असे अव्वल इंग्रजी काळातील विचारवंतांचे मत बनले होते. सामाजिक क्षेत्रात बदल करावयाचा म्हणजे धर्मविषयक कल्पनांतही बदल करणे क्रमप्राप्त होते. कारण 'इष्टं धर्मेण योजयेत्' या नियमाने त्यांत दीर्घकालापासून परस्परावलंबित्व निर्माण झाले होते. शिवाय, तत्कालीन समाज धर्म व रूढी यांत फरक न मानणारा होता. या धार्मिक-सामाजिक विचारमंथनाला खिस्ती मिशनऱ्यांच्या चळवळीमुळे फार मोठा हातभार लागला. स्त्रीपुरुषसमता, जातिभेदांचे निर्मूलन, अस्पृश्योद्धार, स्त्रीशिक्षण, भूतदया इत्यादी प्रकारांचा जो पुरस्कार येथील ललित-अललित वाङ्मयातून झाला, त्याला ब्रिटिश राजवटीतील बदललेल्या परिस्थितीइतकीच मिशनरी चळवळही जबाबदार आहे. ब्रिटिश राजवटीच्या आधीपासून काही शतके येथे खिस्ती मिशनऱ्यांची हालचाल चालू होती. तथापि तिला विशेष जोर चढला, तो खिस्तधर्मीय ब्रिटिश राजवटीतच. राज्यकर्ते व मिशनरी यांचे धोरण परस्परांना नेहमीच मान्य होणारे होते असे नाही. काही महत्त्वाच्या बाबतींत उभयतांच्या धोरणांत तीव्र विरोधही होता; पण भारतीयांच्या संदर्भात खिस्तीधर्मप्रचार हे दोघांचेही एक समान उद्दिष्ट असल्याने दोघांच्याही हालचाली शेवटी परस्परांना पूरक ठरणाऱ्या होत्या. इंग्रजी शिक्षणाने पाश्चात्त्य जीवनमूल्यांना पोषक असे वातावरण येथे निर्माण करण्याचे राज्यकर्त्यांचे जे उद्दिष्ट होते, त्याला मिशनऱ्यांच्या चळवळी पूरकच होत्या. किंबहुना, राज्यकर्त्यांना धोरण म्हणून या बाबतीत ज्या गोष्टी करणे अवघड वाटत होते, त्या करून मिशनऱ्यांनी राज्यकर्त्यांच्यापुढे या क्षेत्रात आघाडी मारलेली दिसते. मिशनरी हालचालींमुळे येथील सनातनी व सुधारक या दोघांनाही सामाजिक व धार्मिक मूल्यांचा विचार करणे भाग पडले.

### धर्मप्रचाराविषयीचे शासकीय धोरण

खिस्तीधर्मप्रचाराच्या कार्यात येथे प्रथम पुढाकार घेतला तो पोर्तुगीजांनी. खिस्ती धर्म येथील जनतेवर लादण्यासाठी त्यांनी क्रूर मार्गांचा अवलंब केला. यामुळे येथील लोकांच्या सहानुभूतीला ते पारखे झाले आणि त्यांच्या व्यापारावर त्याचा प्रतिकूल परिणाम झाला. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी पोर्तुगीजांच्या या उदाहरणाने धडा घेतला व येथील जनतेच्या धर्मात बाह्यतः तरी ढवळाढवळ न करण्याचे धोरण प्रारंभापासूनच पतकरिले. मिशनरी चळवळींना आपण आश्रय दिल्यास येथील सैनिकांत असंतोष माजण्याची भीतीही इंग्रज राज्यकर्त्यांना वाटत होती. शिवाय, इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराबरोबर येथील जनता खिस्ती धर्म स्वखुषीने पतकरील, असा राज्य-

कर्त्यांना विश्वास वाटत होता.[1] यामुळे प्रारंभकाळात मिशनऱ्यांना आश्रय न देण्याचे ब्रिटिश कंपनी-सरकारचे धोरण होते. प्रसंगोपात्त डॉ. केरीसारख्या मिशनरीचा फोर्ट वुइल्यम येथील कॉलेजात शिक्षक म्हणून राज्यकर्त्यांनी उपयोग करून घेतला असला, तरी डॉ. केरीला आपल्या धर्मप्रसाराच्या चळवळीचा पसारा ब्रिटिश हद्दीबाहेर डेनिश हद्दीत सेरामपूर येथे मांडावा लागला. अमेरिकन मिशनला यामुळेच प्रारंभी मुंबईत स्थान मिळू शकले नाही. ब्रिटिश राजवटीच्या प्रारंभकाळात मिशनरी मंडळींना फार चिकाटीने व अनेक हालअपेष्टांतून आपला मार्ग काढावा लागला. १८१३-मध्ये कंपनीला नवी सनद देताना मिशनऱ्यांना धर्मप्रसाराचे स्वातंत्र्य देण्याची अट पार्लमेंटने घातली, व तेव्हापासून मिशनरी चळवळींना कंपनी सरकारच्या हद्दीत प्रचाराची मुभा मिळाली.

**मिशनऱ्यांचे भाषाविषयक कार्य**

नव्या धर्माचा कोणताही प्रसारक स्थानिक भाषेचीच कास धरतो, या नियमाला धरूनच मिशनऱ्यांनी निरनिराळ्या भारतीय भाषांतून ग्रंथनिर्मितीस प्रारंभ केला. पेशवाई जाण्याच्या आधी बरीच वर्षे ( इ. स. १८०० ) डॉ. केरी या मिशनऱ्याच्या नेतृत्वाने मराठी भाषेत ग्रंथनिर्मिती होण्यास सुरुवात झाली होती. इ. स. १८००-मध्ये सेरामपूर येथे केरीने एक छापखाना काढला. इंग्रजी भाषेत मराठीचे व्याकरण लिहून ते त्याने १८०५-मध्ये प्रसिद्ध केले. १८१०-मध्ये मराठी कोश मोडी लिपीत छापिला सिंहासनबत्तिशी ( १८१४ ), पंचतंत्र ( १८१५ ), हितोपदेश ( १८१५ ), राजा प्रतापादित्याचे चरित्र ( १८१६ ), रघूजी भोसल्याची वंशावळी ( १८१६ ) इत्यादी पुस्तके पंडित वैजनाथशास्त्री या गृहस्थाच्या मदतीने लिहून प्रसिद्ध केली.[2] इंग्रजी राजवटीच्या प्रथमावस्थेत मराठी भाषेच्या पायाभरणीचे जे कार्य झाले, त्याची सुरुवात डॉ. केरीसारख्या मिशनऱ्यांनी सरकारच्या आधी कितीतरी वर्षे केली होती, हे यावरून स्पष्ट होते. मराठीतील पहिले पुस्तक छापण्याचा मान मिशनऱ्यांच्याकडे जातो. पहिले मराठी व्याकरण, पहिला कोश, पहिले मुद्रणालय, पहिली स्त्रियांची शाळा, इत्यादी बऱ्याच नव्या सांस्कृतिक घडामोडींच्या प्रवर्तनाचे पहिलेवहिले श्रेयही मिशनरी मंडळीकडेच जाते.

---

1. It is my firm belief that, if our plans of education are followed up there will not be a single idolater among the respectable classes in Bengal thirty years hence

लॉर्ड मेकॉलेने आपल्या वडिलांस १८३६ मध्ये-लिहिलेले पत्र
The Life and Letters of Lord Macaulay
Sir George O. Trevelyan, Page 329.

२. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, गं. बा. सरदार,
दुसरी आवृत्ती, पृ. ६–७.

## मिशनरी मराठी

या कार्यात विशेषत्वाने पुढाकार घेणारी महाराष्ट्रातील मिशनरी संस्था म्हणजे **अमेरिकन-मराठी-मिशन**. या मिशनच्या कार्यास १८१३-पासून मुंबईत प्रारंभ झाला. १८१५-मध्ये त्यांनी इंग्रजी शाळा काढली; देशी भाषाचे शिक्षण देणाऱ्याही काही शाळा काढल्या; १८१५-मध्ये मुंबईस त्यांनी एक छापखाना काढला; १८२५-मध्ये कलकत्त्याहून मराठी खिळे ( type ) मागवून अनेक पुस्तकेही छापून काढली. पेशवाईचा लोप झाला, त्या वर्षी ( १८१८ ) अमेरिकन-मराठी-मिशनच्या अकरा शाळा होत्या व त्यांत एकूण सहाशे विद्यार्थी शिकत होते. भारतीय जनतेला 'अडाणी धर्मातून चांगल्या धर्मात नेण्यासाठी' त्यांनी अनेक पुस्तके प्रसिद्ध केली वाङ्मयीन-दृष्ट्या विचार करिता मिशनरी लेखनाचा दर्जा फार वरचा होता, असे नाही. सामान्य जनतेत खिस्ती धर्माचा प्रचार व्हावा, या उद्देशानेच मुख्यतः त्यांनी लेखन केलेले आहे.[1] मिशनऱ्यांनी प्रकाशित केलेली पुस्तके प्राधान्याने भाषांतरात्मक आहेत. मिशनऱ्यांनी या पुस्तकांची भाषा 'फार उच्च नसावी अथवा फार सामान्य नसावी,' असे धोरण आखले होते. ती शक्य तर साधी (simple ), मराठी धाटणीशी जुळणारी ( idomaitcal ) व व्यवहार्य ( practical ) ठेवण्याकडे त्यांचा कल होता.[2] या ग्रंथलेखनास त्यांनी एतद्देशीय पंडितांचे साहाय्य घेतले होते एतद्देशीय खिस्त्यांनी मराठीतून चरित्रात्मक, इतिहासविषयक, निबंधात्मक वा संवादात्मक लेखनकार्य करावे, म्हणून काही बक्षिसेही अमेरिकन-मराठी-मिशनने जाहीर केली होती व त्यांच्या परीक्षणासाठी कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या मंडळींचे साहाय्य घेतले होते. मिशनरी-मराठी भाषेत कालाप्रमाणे कसा बदल होत गेला, त्याची कल्पना बायबलच्या एका वाक्याच्या निरनिराळ्या कालखंडात केल्या गेलेल्या खालील भाषांतरांवरून येते :—

( १ ) जस स्वर्गीं तस पृथीवींत् तुमची इष्ट क्रिया केली जावो.

सेरामपूर आवृत्ती, १८०७.

---

1. The language of the Marathas as well as the people themselves, must be christianised.

१८४७-मध्ये डॉ. ॲलनने काढलेले उद्गार.

The Literary Work of the American Marathi Mission ( 1813 –1881 ) Rev. Henry Bruce, Page 13.

मोल्सवर्थने सहा वर्षे परिश्रम करून जो मराठी-इंग्लिश कोश १८३१-मध्ये तयार केला होता, त्याचा उद्देश स्पष्ट करताना तो म्हणतो :

It was undertaken not from a thirst after honour or emolu ment but from a humble desire of promoting the propagation of the glorious Gospel.

युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा, श्री. म. पिंगे, पृ. १७०.

2. The Literary Work of American Marathi Mission, Rev. Henry Bruce, Page 7.

(२) जसे स्वर्गात तसे पृथ्वींत तुझें इच्छेप्रमाणे केलें जावो ॥

अमेरिकन-मिशन-आवृत्ती, १८२६.

(३) जसें आकाशांत तसे पृथ्वीवरहि तुझ्या इच्छेप्रमाणें होवो.

बायबल सोसायटी आवृत्ती, १८७८.

सुमारे सत्तर वर्षांच्या कालात बायबलाच्या भाषांतरातील मराठी भाषेची बदलती मोडणी एकंदर भाषेच्या बदलाची प्रतीक मानावयास हरकत नाही. उत्तर-कालातील विरामचिन्हांचा वापरही येथे लक्षात येतो.

खिस्ती मिशनऱ्यांनी शाळा, वृत्तपत्रे, छापखाने, अनाथालये, रुग्णगृहे इत्यादींच्या स्थापनेत तर पुढाकार घेतलाच; पण विशिष्ट धार्मिक उद्दिष्टाने का होईना, पण मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या अभिवृद्धीचा आपल्याकडून कसोशीने प्रयत्न केला. बाबा पदमनजी यासारख्या खिस्ती झालेल्या गृहस्थाने मराठी भाषेत विपुल लेखन केलेच; शिवाय, काहींच्या मते मराठी कादंबरीच्या जनकत्वाचा मानही त्यांच्याचकडे जातो. 'बालबोधमेवा' यासारखे बालवाङ्मयाला प्राधान्य देणारे मासिकही मिशनरी लोकांनी चालविले होते (१८७३). खिस्ती धर्माच्या स्वीकाराने त्यांनी भारतीय भूमीला तुच्छ लेखिले नाही.[1] स्वधर्मप्रचारासाठी भारतीय साधनांचाच मिशनऱ्यांनी अंगीकार केला; चर्चमध्ये प्रार्थना करतेवेळी पाश्चात्त्य संगीताऐवजी भारतीय राग-संगीताचा स्वीकार केला; स्वतंत्र पद्धतीची स्तोत्रे रचिली. कृष्णाजी रत्नाजी सांगळे यांच्यासारख्याचे या क्षेत्रातील कार्य एका दृष्टीने महत्त्वाचे आहे.

## खिस्ती वाङ्मयाचा धार्मिक व सामाजिक परिणाम

पण हे सारे मान्य करूनही खिस्ती लोकांनी निर्माण केलेल्या वाङ्मयाचा फार मोठा ठसा मराठी वाङ्मयावर उमटला नाही. कारण या खिस्ती वाङ्मयाचे उद्दिष्ट व स्वरूप फार संकुचित होते. व्यापक भूमिकेवरून लेखकांच्या भावभावनांना आवाहन करण्याचे सामर्थ्य त्यातून निर्माण होणे अशक्य होते. यामुळे वाङ्मयनिर्मितीच्या प्रत्यक्ष कार्याला मिशिनरी चळवळीचे विशेष साहाय्य झाले नाही. मात्र येथील धार्मिक व सामाजिक आंदोलनांना त्यांनी प्रत्यक्षपणे फार मोठी चालना दिली. रूढिप्रधान हिंदुधर्मातील व समाजव्यवस्थेतील वैगुण्ये मिशनरी चळवळीमुळे उघडी पडली. हिंदुधर्मीय विचारवंतांना स्वधर्माचा विचार करण्यास या चळवळीने प्रवृत्त केले. नव्या संस्कृतीचे लोण बहुजनसमाजात व खेड्यापाड्यांत मिशनऱ्यांनीच पोहोचविले. इंग्रजी विद्येच्या अध्ययनाने येथील सुशिक्षिताना एक नवा बुद्धिवादी, ऐहिक, गतिशील दृष्टिकोण प्राप्त झाला होताच; त्यात मिशनरी चळवळीमुळे भूतदया, समता, मानव-

१ "माझ्या स्वदेशी लोकांनी असें समजूं नये कीं, मीं आपला धर्म पालटला म्हणून त्यांजवरील प्रीति पालटली; मी इंग्रज झालों नाहीं किंवा माझ्या मनांतून स्वदेशाभिमान गेला नाही माझ्या मनांत स्वदेशप्रीति वाढत जाईल."

बाबा पदमनजी, अरुणोदय, पृ. २०९.

सेवा, साधेपणा, कर्मठपणाचा तिटकारा इत्यादी प्रवृत्तींची भर पडली. संस्था स्थापून तिच्या द्वारा स्वार्थत्यागपूर्वक व संघटितपणे समाजकार्य करण्याची जी लाट पुढे उसळली, तिची प्रेरणा इकडील जनतेला मिशनरी कार्यपद्धतीतून मिळालेली दिसते. देहाच्या व मनाच्या नैसर्गिक प्रेरणांना योग्य स्थान देण्याची कल्पना, ऐहिक व पारमार्थिक मूल्यांची सांगड घालण्याची दिशा, नीतिपूर्वक ईश्वरसेवेला अग्रस्थान देण्याचा विचार यांसारख्या नव्या संस्कृतीतील काही कल्पना संतांच्या शिकवणुकीतही आढळतात, पण या शिकवणुकीत चातुर्वर्ण्यव्यवस्थेवर किंवा स्त्रीपुरुषविषमतेवर ऐहिक भूमिकेवरुन हल्ला केलेला नाही. नव्या विचारांत ऐहिक समतेला अग्रस्थान आहे. वर वर्णन केलेल्या या नव्या विचारांनी मराठी वाङ्मयाला दीर्घकालपर्यंत फार मोठा आशय पुरविला आहे. समता, भूतदया, दलितांचा कळवळा, व्यक्तिस्वातंत्र्य, बंधविमोचन, स्त्रीस्वातंत्र्य, पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, प्रौढ विवाह इत्यादी विषयांना मराठी साहित्यात किती महत्त्व आले होते, हे या कालखंडात निर्माण झालेले काव्य, कथा, नाटके यांकडे ओझरती नजर टाकली, तरी स्पष्ट होते. सुधारक विरुद्ध सनातनी यासारख्या द्वंद्वाचा उगमही या नवविचारप्रवर्तनातच आहे. या सांस्कृतिक जागृतीला अनेक अंगे आहेत. तिच्या एका टोकाला ख्रिस्ती धर्माचा पूर्णतया अंगीकार करणारा बाबा पदमनजीसारखा गृहस्थ दिसतो, तर दुसऱ्या टोकाला विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यासारखी हिंदुधर्माचा हिरिरीने पुरस्कार करणारी व्यक्ती आढळते. बाळशास्त्री जांभेकरांची शुद्धीकरणाची मोहीम किंवा मोरभट दांडेकर वा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे ख्रिस्ती धर्माचा हल्ला परतवून लावण्याचे प्रयत्न हे या जागृतीचेच एक अंग होते.

### मिशनऱ्यांना झालेली प्रतिक्रिया

परंतु राजकर्त्यांचा रोष होईल, या भीतीने किंवा पद्धतशीर संघटित प्रयत्नांच्या अभावी मिशनऱ्यांचा हल्ला परतवून लावण्याचे हिंदुधर्माभिमान्यांचे प्रयत्न फुटकळच राहिले. शिवाय, मिशनरी लोकांना त्यांच्या भारतातील दीर्घकालीन वास्तव्यामुळे येथील समाजाची वैगुण्ये हेरण्याची जशी संधी मिळाली होती, तशी युरोपियन समाजाची वैगुण्ये शोधण्याची संधी हिंदुधर्मीयांना कधी मिळाली नाही. हिंदुधर्माची तपशीलवार माहिती देण्यास मिशनऱ्यांना येथील हिंदुधर्मीय विद्वानांचे जसे साहाय्य झाले, तसे ख्रिस्ती पंडितांचे साहाय्य हिंदुधर्मपुरस्कर्त्यांना झाले नाही. त्यामुळे हिंदुधर्माचे मंडन प्रभावीपणे करणाऱ्या विष्णुबुवा ब्रह्मचारींसारख्यांच्या लेखनाला तात्त्विक अधिष्ठान प्राप्त होऊ शकले नाही मिशनऱ्यांची हिंदुधर्माच्या खंडनाची पद्धतीही एवढे साहाय्य असूनही वरवरचीच राहिली. न्यायमूर्ती रानडेपूर्व साऱ्याच विचारवंतांच्या सर्वच क्षेत्रांतील (लोकहितवादी, फुले, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादी) लेखकांच्या लेखनाचे स्वरूप सखोल, तत्त्वचिंतनात्मक असण्यापेक्षा भावनात्मक, एकेरी स्वरूपाचे आढळते. प्राथमिक स्वरूपाच्या तात्कालिक प्रतिक्रियेतून हे असे होणे स्वाभाविकही असेल.

येथील सामाजिक परिस्थितीत शिरलेला कमालीचा मागासलेपणा, अनर्थकारी रूढींचे वर्चस्व, समाजाच्या अंगोपांगांत शिरलेला निष्ठुर कर्मठपणा, अंधश्रद्धा, सहिष्णुतेचा अभाव, जन्मापासून मृत्यूपर्यंत धार्मिक संकेतांनी जखडले गेलेले व्यक्तिजीवन, सणवार व लग्नमर्तिके यांवर होणारी उधळपट्टी, व्यसनीपणा, डामडौल ढोंग, स्त्रिया व बहुजनसमाज यांच्यातील निरक्षरत्व व त्यांची होणारी सर्व प्रकारची कुचंबणा इत्यादींच्या पृष्ठभूमीवर ख्रिस्ती धर्मात दिसणाऱ्या साधेपणा, समता, सहिष्णुत्व, कर्मकांडाचा अभाव इत्यादी गोष्टींकडे तुलनेने नवशिक्षितांचे लक्ष अधिकाधिक वेधले जाऊन ते ख्रिस्ती होण्याची फार मोठी भीती निर्माण झाली. यातूनच जुन्या-नव्या मूल्यांचा पुनर्विचार व फेरमांडणी होऊ लागली. जुन्या भारतीय संस्कृतीतील मूल्यांशी नव्या मूल्यांची सांगड घालण्याचा प्रयत्न येथील विचारवंतांना यामुळे करावा लागला. हिंदुधर्म न टाकता नवी मूल्ये आत्मसात करण्याचा मार्ग शोधणे निकडीचे झाले.

**बंगाल : राममोहन राय**

महाराष्ट्रापेक्षा बंगालमधील परिस्थिती या बाबतीत अधिक प्रक्षोभक होती. त्यामुळे धार्मिक व सामाजिक सुधारणांची लाट प्रथम उसळली ती बंगालमध्ये. इंग्रजी शिक्षण, मुद्रणालय, वृत्तपत्रे, सतीबंदी, पुनर्विवाह यांसारख्या साऱ्याच नव्या घडामोडी प्रथम बंगालमध्ये सुरू होऊन मग त्या महाराष्ट्रात अवतरल्या. कारण ब्रिटिश संस्कृतीचा विशेष संबंध आला, तो प्रथम बंगालशी. या नव्या घडामोडींचा प्रमुख प्रवर्तक म्हणून राजा राममोहन राय ( १७७२-१८३३ ) या बंगाली जमीनदाराचे नाव घेण्यात येते. हा जुन्या कर्मकांडाला विटलेला, नव्या संस्कृतीचे महत्त्व ओळखणारा, पण त्याचबरोबर औपनिषद विचारमूल्यांची योग्यता जाणणारा गृहस्थ होता. इंग्रजी शिक्षणसंस्था, वृत्तपत्रे, निरनिराळ्या धार्मिक-सामाजिक चळवळी इत्यादींचा पुरस्कार करणारा पहिला भारतीय पुरुष राजा राममोहन रायच. राममोहनच्या विचारसरणीवर ॲडम स्मिथच्या व्यक्तिवादी अर्थशास्त्राचा, बेंथमच्या उपयुक्ततावादाचा व फ्रेंच राज्यक्रांतीतील स्वातंत्र्य, समता, बंधुता इत्यादी तत्त्वांचा प्रभाव पडलेला आहे. नव्या-जुन्या तत्त्वांचा समन्वय करणाऱ्या ब्रह्मसमाजाची त्याने १८२८-मध्ये स्थापना केली. या समाजाच्या तत्त्वप्रणालीत मूर्तिपूजा व कर्मकांड यांपेक्षा अंतःकरणशुद्धतेला व विवेकाला अधिक महत्त्व होते. ईश्वराचे पितृत्व व मानवाचे भ्रातृत्व ( Fatherhood of God and Brotherhood of Man ) या तत्त्वाला प्राधान्य देण्यात आले होते. स्त्रीपुरुषसमानता हा या तत्त्वाचाच एक स्वाभाविक आविष्कार होता.

**प्रार्थनासमाज**

याच प्रकारच्या तत्त्वप्रचारासाठी दादोबा पांडुरंग यांनी १८४४-मध्ये ‘ मानवधर्मसभा ’ नावाच्या संस्थेची स्थापना केली. या संस्थेची तत्त्वे पुढीलप्रमाणे होती —

( १ ) ईश्वर एक व तोच पूज्य,

( २ ) नीतिपूर्वक सप्रेम ईश्वरभक्ती हाच धर्म,

( ३ ) मनुष्यमात्राचा पारमार्थिक धर्म एकच होय,

( ४ ) प्रत्येक मनुष्यास विचार करण्याचे स्वातंत्र्य आहे,

( ५ ) नित्य-नैमित्तिक कर्मे विवेकास अनुसरून असावी.[१]

यातूनच पुढे १८४८-मध्ये 'परमहंससभे'ची निर्मिती झाली. या सभेचे कार्य लोकमताच्या भीतीने गुप्तपणे चाले. ही सभा फार दिवस कार्य करू शकली नाही; तत्रापि या संस्थेतूनच कालांतराने ( १८६७-मध्ये ) महाराष्ट्रात बंगालमधील ब्रह्मसमाजाची प्रार्थनासमाज ही शाखा निघाली. न्या. रानडे, भांडारकर यांसारखी पुरोगामी सुधारणावादी विचारांची मंडळी या समाजाची सदस्य होती. समतेची नवी बीजे महाराष्ट्रात या निरनिराळ्या संस्थांच्याद्वारे पेरली गेली. स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह इत्यादींचे प्रवर्तन प्रार्थना समाजाने केले. शुद्धाचरण करावयाचे, लोकनिंदेचा बाऊ बाळगावयाचा नाही, अंतःकरणपूर्वक प्रार्थनेने मनःशुद्धी व अंतःकरणपूर्वक पश्चात्तापाने पापाचे क्षालन होते, सत्कर्म हाच परमेश्वरचिंतनाचा खरा मार्ग, अशा प्रकारची शिकवण या समाजाने दिली. आपली शिकवण वा धर्म नवा नसून भारतीय शुद्ध तत्त्वज्ञानाचा व महाराष्ट्रीय संत-कार्यांचाच आपण मागोवा घेत असल्याचे या समाजाच्या कार्यकर्त्यांनी आवजून जाहीर केले. प्रार्थनेची पद्धती व तंत्र खिस्ती वळणाचे असले, तरी संतसाहित्याच्या आधारेच त्यांनी आपली शिकवण समाजात प्रसृत करण्याचा प्रयत्न केला. उपनिषदे, वेद, बुद्ध इत्यादींचे सार स्वीकारणार की परंपरागत रानटी रूढीना चिकटून राहणार, असा डॉ. भांडारकरांचा तत्कालीन समाजाला प्रश्न होता. बंगालमधील ब्रह्मसमाज ज्याप्रमाणे हिंदुधर्मातून फुटून वेगळा राहण्याचा प्रयत्न करीत होता, तसा प्रकार येथे होऊ न देण्याबद्दल रानडे-भांडारकरांनी खबरदारी घेतली. स्वतःला ते 'हिंदु-प्रॉटेस्टंट' म्हणवून घेत. प्रार्थनासमाज हा कालयोग्य सुधारणा घडवून आणण्यासाठी निर्माण झालेली हिंदुधर्माची एक शाखा होय, अशीच त्याच्या महाराष्ट्रीय प्रवर्तकांची भूमिका होती.

## लोकहितवादी

इंग्रजी शिक्षणामुळे व मिशनरी चळवळीमुळे ही जी समाजसुधारणांची लाट महाराष्ट्रात आली व तिला जे संस्थात्मक स्वरूप आले, त्याच्या आधी या नव्या प्रकारच्या सुधारणांच्या आवश्यकतेची व स्वसमाजातील वैगुण्यांची तीव्रतेने जाणीव महाराष्ट्रात प्रथम कोणाला झाली असेल, तर ती गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांना. राममोहनांप्रमाणे त्यांनी स्वतंत्र संस्थानिर्मिती केली नाही, किंवा भांडारकर-रानडे यांना जो प्रार्थनासमाजाचा आधार पुढे प्राप्त झाला, तसा कोणताही आधार लोकहितवादींना नव्हता. त्यांनी एकाकीपणे नव्या जागृतीच्या बाल्यावस्थेत अप्रिय, पण पथ्यकर बोल

१. दादोबा पांडुरंग, संपादक व लेखक, अ. का. प्रियोळकर, पृ. २४५.

समाजाच्या कानी घालण्याचे कार्य १८४८ ते १८५०-पर्यंत केले आणि विविध प्रकारच्या सुधारणांना आपल्या परीने साहाय्य केले. सामाजिक क्षेत्रातील त्यांचे कार्य मुख्यतः पाखंडखंडनाचे होते. 'नवे कालमान ओळखा, जुन्यातील टाकाऊ भाग सोडून द्या, ज्ञानमार्गाची कास धरा, उद्योगी व्हा, मन हेच ईश्वरी शास्त्र माना, बुद्धिरेव बलीयसी,' अशा प्रकारचे विचार त्यांच्या 'शतपत्रां'त ठायीठायी विखुरलेले आहेत.

## ज्योतीराव फुले

लोकहितवादी हे उच्चवर्गीय समाजातील अव्वल जागृतीचे प्रतीक मानिले, तर ज्योतीराव फुले यांना बहुजनसमाजातील अव्वल जागृतीचे प्रतीक मानावयास हवे. लोकहितवादीचा ज्योतीराव फुले यांच्या कार्याला पाठिंबा होता. फुले यांनी मुलींच्या व अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी शाळा काढल्या ( १८५१-५२ ), भ्रूणहत्येला प्रतिबंध करण्याच्या कामी पुढाकार घेतला (१८६३), पुनर्विवाहासारख्या सुधारणाना उचलून धरिले ज्या-ज्या क्षेत्रात पददलितत्व आढळले, तेथे-तेथे दलितांना हात देण्यासाठी फुले कळवळ्याने धावून गेले. या बाबतीत लोकनिंदेचा माराही त्यांनी धैर्याने सहन केला. लोकहितवादी व फुले या दोघांचाही तत्कालीन ब्राह्मणवर्गावर कटाक्ष दिसतो. त्या काळच्या समाजाचे धुरीणत्व ब्राह्मणांकडे असल्याने साऱ्या सामाजिक दोषांचे खापर त्यांनी या वर्गावर फोडले. यात एकांगीपणा असला, तरी व्यक्तिद्वेषाचा भाग नव्हता व समाजसुधारणेची जिवंत तळमळ होती. तसे पाहिले, तर फुले यांच्या कार्याला पुष्कळ ब्राह्मणमित्रांचे साहाय्य झाले होते. विशिष्ट व्यक्ती किंवा जातच नव्हे, तर तत्कालीन समाजातील साऱ्याच प्रकारच्या विचारवंतांवर नवसंस्कारांचा प्रभाव कसा पडला होता, ते पहावयाचे झाल्यास खिस्ती धर्माविरुद्ध प्रचार करणाऱ्या व 'वेदोक्त-धर्म-प्रकाश' नावाचा ग्रंथ लिहिणाऱ्या विष्णुबुवा ब्रह्मचारीनीही सामाजिक विषमते-विरुद्ध कडकपणे लिहिले असून सामाजिक व आर्थिक समतेचा पुरस्कार केलेला आहे, हे लक्षात घ्यावे लागते.

## विधवाविवाह

नव्या विचारांची ही लाट इंग्रज राजवट येथे येऊन सुमारे वीस वर्षे झाल्यानंतर म्हणजे साधारणतः १८४०-पासून सुरू झाली. १८४०-पूर्वी समाजसुधारणा व धर्मांतर यांची गल्लत केली जात होती; पण १८४०-नंतर स्वधर्मात राहून सुधारणा घडविण्याचा प्रयत्न होऊ लागला. त्यासाठी जुन्या शास्त्रांतील धर्मवचनांचा आधार शोधण्यात येऊ लागला. सामाजिक सुधारणांच्या पहिल्या कालखंडात विशेष विवाद्य ठरलेली सुधारणा कोणती असेल, तर ती पुनर्विवाहाची. १८४०–४२-च्या सुमारास लोकहितवादी वगैरेंनी पुनर्विवाहाला प्रेरक असे लेखन करण्यास प्रारंभ केला होता. १८४२-मध्येच बेळगावी दोन ब्राह्मण बालविधवांचे विवाह घडून आले. बाळशास्त्री जांभेकर यांनी या विषयाला अनुकूल असे पूर्वी लिहिले होतेच. पण या बाबतीत विशेष पुढाकार घेतला, तो विष्णु-शास्त्री पंडित यांनी. १८५६-मध्ये विधवाविवाहाला मान्यता देणारा कायदा झाला.

१८६२-मध्ये ' पुनर्विवाहोत्तेजक ' मंडळ लोकहितवादींनी काढिले. विष्णुशास्त्री पंडित हे या मंडळाचे चिटणीस होते. पुनर्विवाहाच्या शास्त्रीयतेबद्दल शंकराचार्यांच्या अध्यक्षतेने पुणे येथे १८७०-मध्ये कडाक्याचा वाद झाला. विष्णुशास्त्री पंडितांबरोबर न्या. रानडे यांच्यासारख्या मंडळींनीही पुनर्विवाहाला अनुकूल वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केला. पुनर्विवाहालाच नव्हे, तर सर्वच पुरोगामी सामाजिक आंदोलनांना न्या. रानडे यांचा पाठिंबा होता. या चळवळींना सुसंघटित व तात्त्विक स्वरूप त्यांनीच प्राप्त करून दिले. न्या. रानडे यांचे साऱ्याच प्रकारच्या सुधारणांकडे सारखेच लक्ष होते; किंबहुना, साऱ्या सुधारणा परस्परावलंबी असल्याचे त्यांनी कालांतराने प्रतिपादनही केले आहे.[1] तत्त्वतः कोणत्या प्रकारचा बदल हवा होता, हे स्पष्ट करिताना त्यांनी स्वातंत्र्य, युक्तिवाद, समानता, सहिष्णुता इत्यादी गोष्टींचा जो नंतरच्या काळात उल्लेख केला आहे,[2] तोच उल्लेख स्थूल मानाने रानडेपूर्व काळातील सर्व सुधारकांना अभिप्रेत होता. न्या. रानडे यांचे कर्तृत्व या कालखंडाच्या उत्तरार्धात ( १८५०-नंतर ) सुरू होऊन पुढच्याही ( १८७४-नंतरच्या ) कालखंडाच्या पूर्वार्धाला व्यापून राहिले आहे. सामाजिक सुधारणांपुरताच विचार करावयाचा झाल्यास राष्ट्रीय सभेच्या बरोबरीने पुढे सामाजिक परिषदांना महत्त्व प्राप्त झाले. १८०० ते १८७४-पर्यंतच्या एकंदर कालखंडातील १८५०-पर्यंतचा काळ प्राधान्याने सामाजिक जागृतीचा व वैचारिक स्वरूपाच्या वाङ्मयनिर्मितीचा दिसतो. १८५०-नंतरच्या कालखंडात सामाजिक सुधारणांच्या जोडीला असलेली धार्मिक आंदोलने मागे पडून त्यांची जागा राजकीय विचाराने घेतली. या धार्मिक, सामाजिक, राजकीय वा सांस्कृतिक हालचालींना व प्रचारप्रसाराला मुद्रणसंस्थेचे फार मोठे साहाय्य झाले. मुद्रणसंस्था व वृत्तपत्रसंस्था या दोन संस्थांचे ज्ञानप्रसारदृष्ट्या शिक्षणसंस्थांपेक्षाही अधिक महत्त्व आहे. कारण शिक्षणसंस्थेप्रमाणे यांची कक्षा मर्यादित नाही. छपाईची कला ही विज्ञानाने आधुनिक

1. You cannot have a good social system when you find yourself low in the scale of political rights, nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on reason and justice. You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religious ideals are low and grovelling, you cannot succeed in social, economical and political spheres.

Miscellaneous Writings, Justice Ranade, Page 231–232.

2. The change which we should all seek is thus a change from constraint to freedom, from credulity to faith, from status to contract, from authority to reason, from unorganized to organized life, from bigotry to toleration, from blind fatalism to a sense of human dignity.

Miscellaneous Writings, Justice Ranade, Page 116–117.

संस्कृतीला दिलेली फार मोठी देणगी आहे. मागासलेल्या भारतीय परिस्थितीत ज्ञानक्षुधा प्रदीप्त होत असता येथील जनतेला ती वरदानाप्रमाणे वाटल्यास नवल नाही.[1] मुंबईस १७६०-च्या सुमारास छापखाना असल्याची माहिती उपलब्ध असली,[2] तरी पहिले मराठी पुस्तक मोडी लिपीत १७९३-मध्ये छापले गेले.[3] डॉ. केरी याने १७९८-पासून कलकत्त्याजवळ छापखाना काढला होता. १८१०-पासून मुंबई इलाख्यात लोकांनी मराठी पुस्तके छापण्यास प्रारंभ केला. पुढे देवनागरी लिपीचा अधिक प्रचार होऊन बॉम्बे नेटिव्ह स्कूल बुक व स्कूल सोसायटीने १८२२-पासून सुरू केलेल्या छापखान्यात देवनागरीत सर्रास मुद्रण होण्यास सुरुवात झाली.

**वृत्तपत्रांचा उदय**

वृत्तपत्र हे मुद्रणसंस्थेचे अपत्य असल्याने हळूहळू इंग्रजी भाषेतून भारतातही ते अवतीर्ण झाले. पहिले वृत्तपत्र बंगालमध्ये १६८० साली ' दि इंडियन गॅझेट ' या नावाने निघाले. बंगाल-मद्रास-नंतर मुंबईमध्ये इंग्रजी वृत्तपत्रांचा जन्म झाला. मुंबईमध्ये १७९०-पासून ' बॉम्बे हेरल्ड ', ' बॉम्बे कूरिकर ' यांसारखी इंग्रजी वृत्तपत्रे निघू लागली. देशी भाषेत प्रथम वृत्तपत्र काढण्याचा मान बंगालकडे जातो ( बंगाली समाचारदर्शन, इ. स. १८१८ ). मुंबई प्रांतात देशी वृत्तपत्र प्रथम १८२२-मध्ये सुरू केले, ते एका पारशी गृहस्थाने गुजराती भाषेत.[4] व्यापारवृद्धी व वृत्तपत्र यांचे जिव्हाळ्याचे नाते लक्षात घेता या क्षेत्रात मुंबईतील व्यापारी पेशाशी निगडित असलेल्या जमातींनी आघाडी मारावी, हे स्वाभाविक होते. मराठी वृत्तपत्रांची सुरुवात झाली, ती त्यानंतर दहा वर्षांनी. १८३२-मध्ये ' दर्पण ' नावाचे मराठी वृत्तपत्र बाळशास्त्री जांभेकर यांनी मुंबईस सुरू केले. हे इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत निघत असे. दोन्ही भाषांतील मजकूर एकच असे. तत्कालीन वृत्तपत्रसृष्टीचे स्वरूप पाहिल्यास ती प्राधान्याने माहितीपत्रे व मतपत्रे असल्याचे दिसते. इंग्रजी पत्रातील उतारे, मद्रास-कलकत्त्याकडील बातम्या, सरकारी नेमणुका, येणाऱ्या-जाणाऱ्या बोटींची व उतारूंची माहिती इत्यादी मजकूर तत्कालीन वृत्तपत्रांतून येत असे. जेम्स

१. " छापण्याची युक्ति न निघती, तर वर्तमानपत्रे व नियमित काळीं निघणारीं पुस्तकें वगैरे न होतीं.... हल्लीं पृथ्वीवर एका महिन्यांत जितके कागद छापले जातात, तितके हातानें लिहावयाचे असते, तर कोट्यवधी मनुष्यें लागतीं ...परमेश्वरानें ही अप्रतिम व अत्युत्तम कला, विद्या, स्वातंत्र्य, सौजन्य, संपत्ति इत्यादि उत्तमोत्तम गोष्टी उत्तरोत्तर वाढाव्या म्हणून पाठविली. "

अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह, कृष्णशास्त्री चिपळूणकर, पृ. १९२.

2. Printing Press in India, A. K. Priyolkar, Page 30.

3. Ibid, page 72.

४. वृत्तपत्रांचा इतिहास, जोशी-लेले, पृ. २७१.

हिकीच्या संपादकत्वाने बंगालमध्ये १७८० साली निघालेल्या 'बंगाल गॅझेट' याचे स्वरूप काहीसे शिवराळ होते; त्या मानाने देशी भाषांतील वृत्तपत्रे अतिशय सोज्ज्वळ दिसतात. कारण वृत्तपत्र हा व्यवसाय म्हणून चालविण्यापेक्षा ते व्रत म्हणून चालविण्याचा बाणा बाळशास्त्री वगैरे मंडळीत होता. बाळशास्त्री यांना तर हे व्रत चालविताना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. छापील वस्तू हातात धरणे हे त्या काळी ओवळेपणाचे मानण्याची रीत होती. वाचकांची संख्याही फार मर्यादित होती. त्यामुळे जांभेकरांना या पत्राचा प्रसार करण्यास बरेच कष्ट पडले. बाळशास्त्री 'ज्ञाना'च्या कल्पनेने कसे भारावून गेले होते, हे मागे सांगितले आहेच. 'दर्पणा'च्या नंतर त्यांनी १८४०-मध्ये 'दिग्दर्शन' नावाचे मासिक काढले. बाळशास्त्र्यांनी आपल्या वृत्तपत्रास 'दर्पण' नाव दिले, ते योगायोगाने नव्हे. बंगालमध्ये 'समाचार-दर्पण' नावाचे साप्ताहिक चालू होते. याच नावाचे एक साप्ताहिक गुजरातीत निघण्याचे १८३२-च्या सुमारास घाटत होते. तेव्हा तत्कालीन लोकांना वृत्तपत्राचे कोणते स्वरूप अभिप्रेत होते, हे या नावावरून सूचित होते. आपल्या 'दर्पणा'चा उद्देश जांभेकरांनी खालीलप्रमाणे सांगितला आहे—

"स्वदेशीय लोकांमध्यें विलायतेतील विद्यांचा अभ्यास अधिक व्हावा आणि या देशाची समृद्धि व येथील लोकांचे कल्याण याविषयी स्वतंत्रतेने व उघड रीतीने विचार करण्यास स्थळ व्हावें, या इच्छेने दर्पणाचा जन्म झाला. शिवाय जाहीर खबरा आणि विलायतचे आणि बंगालच्या पत्रांचे कांहीं कांहीं अंश लिहिले जातील. तसेच या देशातील, विलायतेतील व दुसरे देशांतील मोठमोठीं वर्तमानेहि लिहिलीं जातील. कोणीं साहेब लोकांनीं व या देशचे लोकांनीं हिंदुस्थानांतील लोक, धर्म आणि विद्या यासंबधी कांहीं लिहून पाठविले असतां तेहि दर्पणांत छापले जाईल. मनोरंजन करणे, चालते काळाचीं वर्तमाने कळविणे आणि योग्यतेस येण्याचे मार्ग दाखविणे या गोष्टींची 'दर्पण' छापणारास मोठी उत्कंठा आहे; म्हणोन या गोष्टी साध्य होण्याविषयीं जितका प्रयत्न करवेल तितका ते करतील. कोणा एकाचा पक्षपात किंवा नीचपणा या दोषाचा मळ 'दर्पणा'स लागणार नाहीं. कारण दर्पण छापणारांचे लक्ष निष्कृत्रिम आहे."

जांभेकर-शताब्दी-स्मारक-ग्रंथ, खंड २, पृ. ४–५.

वृत्तपत्रपूर्वकालातील बातमी कळण्याची दवंडी किंवा कर्णोपकर्णी प्रसृत होणाऱ्या अफवांसारखी साधने पाहिली, म्हणजे बातमीदृष्ट्या वृत्तपत्रांच्या निर्मितीची महती कळून येते. पद्धतशीर व सत्य हकीकत कळण्याची वृत्तपत्रांनी सोय केल्याने जनतेचा किती तरी फायदा झाला. वृत्तपत्रीय जाहिरातींमुळे व्यापारवृद्धीस चालना मिळाली, सामान्य वाचकाला आपले मत बनविण्यास व विचार प्रकट करण्यास एक महत्त्वाचे साधन उपलब्ध झाले. सरकारलाही लोकांची मने व अडचणी सरकारी अधिकाऱ्यांच्या

मदतीशिवाय वृत्तपत्रद्वारा स्वतंत्रपणे आकलन करिता येऊ लागल्या. जनतेची मते कळावी व तिच्या मनातील असंतोषाला वाचा फुटून तिचा दंश कमी व्हावा, राज्यकर्ते व प्रजा यांना एकमेकांच्या निकट येण्याची संधी मिळावी, म्हणून राज्यकर्त्यांनी मुद्रणसंस्थेला उत्तेजन दिले.[1] पण मुद्रणसंस्थेचे जे एक महत्त्वाचे अंग वृत्तपत्र, त्याचे अंगभूत सामर्थ्य जसजसे प्रकट होऊ लागले, तसतशी त्याच्यावर मर्यादित का होईना, पण नियंत्रण घालण्याची जरुरी राज्यकर्त्यांना वाटू लागली. यामुळे १८२५-पासूनच मुंबई प्रांतात वृत्तपत्रांवर नियंत्रणे आली. पण १८३५-पासून म्हणजे मराठी वृत्तपत्रसृष्टीच्या प्रथमावस्थेतच सर चार्लस् मेटकाफने वृत्तपत्रांवरील नियंत्रणे रद्द केल्याने १८५७-पर्यंत वृत्तपत्रांना सरकारी नियंत्रणाची विशेष झळ लागली नाही. अव्वल इंग्रजीतील वृत्तपत्रेही सामान्यतः राजनिष्ठच होती. राजकारणापेक्षा सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील घडामोडींचे दिग्दर्शन करण्यावर व ज्ञानदानावरच मराठी नियतकालिकांचा भर होता, हे दर्पण, प्रभाकर, इंदुप्रकाश, ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, दिग्दर्शन, उपदेशचंद्रिका इत्यादी तत्कालीन वृत्तपत्रांच्या आणि मासिकांच्या नावांवरूनही स्पष्ट होते.

### वृत्तपत्रांचे स्वातंत्र्य

बंगालसारख्या प्रांतात मात्र हा वृत्तपत्रस्वातंत्र्याचा व पर्यायाने उच्चार-स्वातंत्र्याचा ( Freedom of Expression ) प्रश्न चर्चिला गेला व राजा राममोहन रायसारख्या विचारवंतांनी या बंधनाबद्दल तीव्र नापसंती व्यक्त केली; एवढेच नव्हे, तर ही अन्याय्य बंधने दूर व्हावी म्हणून ब्रिटिश पार्लमेंटकडे त्यांनी अर्ज केला. या अर्जाचा तादृश काही उपयोग झाला नसला, तरी नव्या राजवटीत जनतेला मिळालेले आचार, विचार व उच्चार यांचे स्वातंत्र्य, त्याची महती व हे स्वातंत्र्य वा हक्क टिकवून धरण्याची व राज्यकर्त्यांच्या अन्यायाविरुद्ध प्रतिकार करण्याची प्रेरणा भारतीय जनतेला प्रथम मिळाली, ती या वृत्तपत्रसंस्थेच्या स्वातंत्र्याच्या निमित्ताने. या स्वातंत्र्याची महती येथील जनतेला किती वाटत होती, हे राजा राममोहन राय यांनी

1. That the press may, in a long succession of ages, cause the natives to throw off our yoke is possible and even probable, but it will in the first place destory the superstitions and the prejudices of the natives and remove the pressing dangers created by the entire and marked separation between them and their conquerors and this effect is certain while the other is problematical. The establishment of printing presses, therefore, is highly desirable.

एल्फिन्स्टनचे विचार.

आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, कु. भि. कुलकर्णी, पृ. ३३-वरून.

मुद्रणस्वातंत्र्याच्या हिरिरीने केलेल्या पुरस्कारावरून दिसून येते.[१]

महाराष्ट्रात जरी वृत्तपत्रस्वातंत्र्याचा प्रश्न नसला, तरी राज्यकर्त्यांबद्दलच्या तक्रारीत सूर वाढत होताच आणि सरकारवर वेळप्रसंगी निर्भीड टीकाही. मराठी वृत्तपत्रांतून प्रकट झालेल्या संपादकांच्या वृत्तीत जी निर्भय, स्पष्ट, बाणेदार स्वतंत्र वृत्ती आढळते, तिचे अग्रदूत म्हणून भाऊ महाजन यांच्याकडे बोट दाखविण्यास हरकत नाही. अव्याहत वीस वर्षे खपून त्यांनी मराठी नियतकालिक-वाङ्मयाचा स्वतंत्रपणे पाया घातला. जांभेकरांच्या 'दर्पण-दिग्दर्शनां'शी त्यांचा काही संबंध असावा. १८३१-मध्ये त्यांनी स्वतःचे 'प्रभाकर' नावाचे साप्ताहिक काढले. त्यांनीच १८५३-मध्ये 'धूमकेतु' हे साप्ताहिक व १८५४-मध्ये 'ज्ञानदर्शन' नावाचे त्रैमासिक सुरू केले. राजकीय, धार्मिक, सामाजिक वा सास्कृतिक अशा सर्वच बाबींवर त्यांनी सडेतोडपणे लेखन केलेले आहे. लोकहितवादींची गाजलेली 'शतपत्रे' यांच्या 'प्रभाकर'मधूनच प्रसिद्ध झाली. मराठी वृत्तपत्रसृष्टीला तिच्या प्रारंभापासून पुढे सतत दीर्घकाल विद्वान, व्यासंगी, बहुश्रुत, तळमळीच्या व्यक्तींचे साहाय्य लाभलेले होते. विष्णुशास्त्री चिपळूणकरपूर्वकालीन वृत्तपत्रे व नियतकालिके यांच्याशी संबंद्ध असलेल्या जांभेकर, भाऊ महाजन, विष्णुशास्त्री पंडित, कृष्णशास्त्री चिपळूणकर, लोकहितवादी, बाबा पदमनजी, न्या. रानडे, मंडलिक, रामचंद्र भिकाजी गुंजीकर इत्यादी नावांचा या संदर्भात उल्लेख केला, तरी पुरे आहे.

**प्रांजळ मत प्रकटन**

या मंडळींनी धर्मांतर, स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, जातिभेद, लोकशाही, जनतेची दुःखे, त्यांचे हक्क, राज्यकर्त्यांचे अन्याय, अर्थकारण, सांस्कृतिक घडामोडी इत्यादी विविध व वैचित्र्यपूर्ण बाबींवर प्रांजळ मतप्रकटनास साहाय्य केले. जनतेची

---

१. पौरस्त्य प्रौढ भाषांतून किंवा परदेशी नियतकालिकांतून व पुस्तकांतून भाषांतरित केलेल्या ज्ञानाच्या साहाय्याने जनतेचा जो मानसिक विकास चालू आहे, त्याला व एकंदर ज्ञानप्रसाराला सरकारी निर्बंधांमुळे पूर्ण आळा बसेल देशाच्या निरनिराळ्या भागांत सरकारी अधिकाऱ्यांनी केलेला अन्याय व चुका सरकारच्या ताबडतोब नजरेस आणण्याचे कार्य स्थगित होईल. न्यायी राज्यकर्त्यांच्याही दृष्टीने ही गोष्ट अनिष्ट आहे. या संदर्भात ते पुढे म्हणतात:—

Every good Ruler, who is convinced of the imperfection of human nature and reverences the Enternal Governor of the world, must be conscious of the great liability to error in managing the affairs of a vast empire; and therefore he will be anxious to afford to every individual the readiest means of bringing to notice whatever may require his interference to secure this important object. The unrestrained liberty of publication is the only effectual means that can be employed.

वृत्तपत्रांचा इतिहास, जोशी-लेले, पृ. १७५–१७६-वरून.

चिकित्साबुद्धी व जिज्ञासा वाढवून तिला बहुश्रुत केले आणि तिच्यात वास्तवदृष्टी निर्माण केली. व्यक्तिमताला पूर्वी महत्त्व नव्हते व ते पद्धतशीरपणे इतरांना कळविण्याचे साधनही नव्हते. ते वृत्तपत्रे व नियतकालिके यांनी उपलब्ध करून दिले. एकाच प्रश्नाच्या निरनिराळ्या बाजू खंडनमंडनांच्या द्वारा प्रकट होऊ लागल्याने कोणत्याही प्रश्नाचा चौरसपणे विचार करण्याची वृत्ती वाढीस लागली. या वृत्तीतून नवा आशय व नवे आविष्कारतंत्र मराठी निबंधवाङ्मयाला प्राप्त झाले. मराठी वृत्तपत्रसृष्टी व निबंध-वाङ्मय यांचे जिव्हाळ्याचे नाते सुपरिचितच आहे. या कालातील वृत्तपत्रीय गद्य सामान्यतः जरी साधे व आशयनिष्ठ असले, तरी वृतपत्रांतील अग्रलेख, स्फुटे, पत्रे चर्चा, परीक्षणे इत्यादींमुळे निबंधवाङ्मयात हळूहळू निरनिराळे प्रकार निर्माण झाले. खंडनमंडनाच्या अभिनिवेशामुळे भाषेत ओज आणि उत्कटता आली. खेळकर, खोडकर लेखनपद्धतीलाही प्रसंगी उत्तेजन मिळाल्याने उपरोध, उपहास, वक्रोक्ती, मिष्किलपणा इत्यादी विनोदाची दालनेही सुसज्ज होऊ लागली. ज्ञानाच्या आदान-प्रदानात पूर्वी असलेले गुरुशिष्यांचे प्रौढ गंभीर नाते कमी होऊन त्यात नव्या प्रकारचा खेळकरपणा व प्रांजळपणा आला. खंडनमंडनाची ईर्ष्याही निर्माण झाली. याही क्षेत्रात मिशनऱ्यांनी केलेले कार्य महत्त्वाचे आहे. १८४२-मध्ये स्वमतप्रतिपादना साठी त्यांनी 'ज्ञानोदय' नावाचे वृत्तपत्र काढले. यातील हिंदुधर्मविरोधी मतांचे खंडन करण्यासाठी १८४४-मध्ये मोरभट दांडेकरांची मासिक 'उपदेशचंद्रिका' निघाली. मिशनऱ्यांच्या चळवळीला आळा घालण्यासाठीच निघालेली आणखी दोन वृत्तपत्रे म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी काढलेले 'विचारलहरी' ( १८५२ ) व बापू सदाशिवशेट यांनी काढलेले 'सद्धर्मदीपिका' ( १८५५ ) ही होत. वृत्तपत्रसृष्टींत पुण्याचे 'ज्ञानप्रकाश' ( १८४९ ) व मुंबईचे 'इंदुप्रकाश' ( १८६२ ) यांचे स्थान महत्त्वाचे आहे. या दोन वृत्तपत्रांभोवती अनुक्रमे पुणे व मुंबई येथील विचारवंत कार्यकर्त्री मंडळी गोळा झाली होती. तत्कालीन विचारवंतांना व पुढील काळातील कार्यकर्त्यांनाही एखादे वृत्तपत्र स्वतःच्या हाताशी असावे असे वाटत होते, हे राजा राममोहन राय, लोकहितवादी, न्या. रानडे, दादाभाई नवरोजी, टिळक, आगरकर, गांधी इत्यादींच्या वृत्तपत्रसृष्टीशी असलेल्या संबंधावरून स्पष्ट होते. या साऱ्या वृत्त-पत्रांनी प्रजेला स्वतःच्या हक्कांची जाणीव करून दिली, स्वावलंबनाचे धडे दिले, राज्यकर्त्यांच्या मर्यादा व त्यांचे पक्षपाती धोरण उघडे केले, राज्यकर्त्यांकडून होणाऱ्या अन्यायाच्या विरुद्ध सनदशीर पद्धतीने कशी चळवळ करिता येईल, याचे दिग्दर्शन केले, राष्ट्रीयतेचे भरणपोषण केले, 'स्व'ची जाणीव करून दिली, मिशनऱ्यांचे हल्ले परतवून लावण्यास साहाय्य केले, आपल्या उज्ज्वल प्राचीन संस्कृतीची ओळख करून दिली, स्वदेशी व्यापाराला उत्तेजन दिले, परकीय राजवटीपासून होणाऱ्या अर्थशोषणाची कल्पना आणून दिली, सुधारणांची महती पटविली आणि हे सारे करीत असता मराठी गद्यशैली लवचीक व ढंगदार बनविली.

## मासिकांचे कार्य

वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यात वृत्तपत्रांइतकेच मासिकांनाही महत्त्व आहे. मासिकांच्या द्वारा मुख्यतः धम, नीती, तत्त्वज्ञान, इतिहास, प्राचीन मराठी कविता इत्यादींचा ऊहापोह होऊ लागला, आणि या प्रकारची जिज्ञासा तृप्त करणाऱ्या मासिकांची संख्या उत्तरोत्तर वाढतच गेली. इ.स. १८२५ ते १८३९-पर्यंत मराठीत फक्त तीनच मासिके होती; १८६६-पासून त्यांची संख्या वाढत जाऊन १८७१ ते १८७५-पर्यंत ती अठरा झाली. गंभीर विषयांबरोबरच कथा, कादंबरी, नाट्य, काव्य या ललितवाङ्मयालाही मासिकांनी उत्तेजन दिले. उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेतर्फे १८५० मध्ये 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिक निघू लागले. निबंध, गोष्टी, संवाद, इतिहास, चरित्रे, वर्णने इत्यादी सर्व प्रकारच्या लेखनाला यात वाव मिळे. मासिकांचे निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांच्या विकासाला कसे साहाय्य मिळत होते, याची या एका मासिकाच्या उदाहरणावरूनही सहज कल्पना येते. 'पुणें पाठशाळा पत्रका'तून (१८६१) विविध विषयांवर माहितीपर लेख येत. माधव चंद्रोबा डुकले यांनी आपल्या 'सर्वसंग्रहा'तून (१८६०) प्राचीन मराठी कवितेच्या प्रकाशनास प्रारंभ केला होता. १८६७ साली निघालेल्या 'विविधज्ञानविस्तार' मासिकाने तर दीर्घकाल ललितवाङ्मय, वैचारिक लेख, भाषाशास्त्र, व्याकरण, काव्य, ग्रंथपरीक्षणे इत्यादी सर्वच प्रकारच्या वाङ्मयाला उत्तेजन दिले. विशिष्ट वाङ्मयाभिरुची निर्माण करण्यात 'विविधज्ञानविस्तारा'चा फार मोठा हात आहे. या मासिकाला जो एका सुप्रतिष्ठित संस्थेचा दर्जा पुढे प्राप्त झाला, त्याला रामचंद्र भिकाजी गुंजीकर या आद्य संपादकांचे श्रम पुष्कळच कारणीभूत आहेत.

वृत्तपत्रे व मासिके यांनी अंगीकारिलेले हे कार्य अधिकाधिक प्रमाणात करण्याची जबाबदारी उत्तरोत्तर वाढण्याजोग्या घटना भारतीय राजकारणात व जीवनात घडत गेल्या. समाजातील सर्व थरांतील लोकांची स्वतःच्या हक्काची जाणीव वाढीस लागली. शासनसंस्थेच्या साम्राज्यशाही व आर्थिक शोषणाच्या धोरणाचे दुष्परिणामही जनतेच्या नजरेसमोर अधिकाधिक येऊ लागले. सत्ताधाऱ्यांचा सत्तामदही वृद्धिंगत होऊ लागला. राज्यकर्ते व प्रजाजन यांच्यामधील पूर्वार्धातील गोडीगुलाबीचे धोरण संपुष्टात आले, आणि १८५७-च्या एतद्देशीय लोकांच्या उठावामुळे भारताचा राजकीय नकाशाच बदलून गेला. पण त्याची पूर्वतयारी १८५०-पासूनच सुरू झाल्याचे १८५०-नंतरच्या विविध घटनांवरून दिसते.

राज्यकर्त्यांच्या दृष्टीने १८२० ते १८५०-पर्यंतचा कालखंड येथील जनतेत विश्वास निर्माण करून त्यांना स्वतःच्या संस्कृतीपेक्षा इंग्रजी संस्कृती श्रेष्ठ वाटेल असे धोरण आखण्याचा होता. येथील जनता नव्या संस्कृतीने भारावलेली होती. नव्या संस्कृतीचे अनुकरण करण्याकडे सुशिक्षितांचा कल होता. नवे ज्ञानविज्ञान आत्मसात करण्याच्या बाबतीत इंग्रज राजवटीचे साहाय्य होऊन त्यायोगे भारतीय जनतेची

सर्वांगीण प्रगती होईल, या विचाराने इंग्रजी राजवटीला दवी वरदान मानण्यापर्यंत सुशिक्षितांची मजल गेली होती. परंतु ब्रिटिशांची राजवट येथे स्थिर झाल्यानंतर तिचे साम्राज्यवादी स्वरूप हळूहळू उघड होत चालले. भारतीय जनता व ब्रिटिश राज्यकर्ते यांच्या हितसंबंधांतील विरोध अधिकाधिक स्पष्ट होऊ लागला. व्यक्ति-स्वातंत्र्य, लोकशाही व जनतेचे हक्क इत्यादी विचारांचे बाळकडू इंग्रजी राजवटीनेच येथील नवशिक्षितांना दिले होते. पण या विचारसरणीचा प्रत्यय राज्यकर्त्यांच्या वर्तनातून येईना; उलट, त्यांचे पक्षपाती धोरण मात्र अधिकाधिक प्रमाणात उघड होऊ लागले. ब्रिटिशांचे अर्थकारण प्रारंभकालात येथील व्यापाऱ्यांना सोयीचे वाटले होते; तेच आता येथील व्यापारवृद्धीच्या आड येत असल्याची बोचक जाणीव त्यांना होऊ लागली. सामान्य जनतेला या नव्या राजवटीत हिंदुधर्मावर गंडांतर येईल की काय, अशी भीती पूर्वीपासून वाटत होतीच; १८५०-मध्ये धर्मांतरामुळे वारसाहक्काला बाध येत नसल्याचा कायदा झाल्याने वरील भीतीत भरच पडली. लॉर्ड डलहौसीच्या संस्थाने खालसा करण्याच्या धोरणामुळे येथील सरंजामी वर्गही संतप्त होत चालला होता. १८४९-मध्ये कारण नसता सातारचे राज्य इंग्रजांनी खालसा केल्याने एकंदर महाराष्ट्रीय जनतेला मोठा धक्का बसला. सारांश, समाजातील साऱ्याच थरांचा ब्रिटिश राजवटीविषयीचा भ्रम या-ना-त्या कारणाने १८५०-नंतर निरास पावू लागल्याचे आढळते. हा भ्रमनिरास होण्यास वस्तुतः १८४०–४१-पासूनच सुरुवात झाली होती. इंग्रजी राज्य हा शाप असून येथील जनता अधिकाधिक बुभुक्षित व दरिद्री होत चालल्याची जळजळीत जाणीव दादोबा पांडुरंग यांचे बंधू भास्करराव तर्खड यानी बॉबे गॅझेटला १८४१-मध्ये लिहिलेल्या पत्रात प्रकट केली आहे.[1] स्वतः दादोबा पांडुरंग 'इंग्रज सरकारात चाकरी करणे दिवसानुदिवस फारच कठीण काम होत चालले आहे,' असे स्वानुभवाचे कडवट उद्गार जीवनाच्या उत्तरार्धात काढताना दिसतात.[2] परंतु इंग्रजी राजवटीबाबतच्या तक्रारींचा सूर विशेषत्वाने चढू लागला तो १८५३-च्या सुमारास, कंपनीला नवी सनद मिळण्याच्या वेळी. जनतेच्या हक्कांचे संरक्षण करण्यासाठी १८५२-मध्ये 'द बॉबे असोसिएशन' नावाची संस्था मुंबईतील काही प्रमुख भारतीयांनी स्थापन केली होती. बंगालमध्ये या प्रकारची संस्था याआधीच १८५१-मध्ये निघाली होती. १८५३–५४-मध्ये सनदी नोकर तयार करण्याच्या ( Indian Civil Service )

1. "Oh unhappy fate! India has been got hold of by a race of demons who would never be satisfied until they have despoiled her of all her precious things and reduced her sons and daughters to total beggary."

Bombay Gazette, 20/8/1841, page 173.

२. दादोबा पांडुरंग, संपादक अ. का. प्रियोळकर, पृ. ४२७.

परीक्षांना प्रारंभ झाला. या परीक्षा मुख्यतः भारतात नोकरी करणाऱ्यांसाठी असल्या, तरी त्यांत इंग्रजी परंपरा व रीतभात यांवर अधिक भर देण्यात येत असे. त्याविरुद्ध येथील जनतेने सरकारकडे तक्रार गुदरली. शिवाय, या परीक्षा इंग्लंडमध्येच घेतल्या जात असल्याने येथील विद्यार्थ्यांना ते फार गैरसोयीचे होते, म्हणून त्या येथे घेण्यात याव्या, अशीही मागणी येथील लोकांतर्फे सरकारकडे करण्यात आली. १८५०-नंतर झालेल्या पुढे दिलेल्या काही घडामोडीही महत्त्वाच्या आहेत.

## काही महत्त्वाच्या घडामोडी

१८५१-मध्ये मुंबईस कापसाची पहिली गिरणी निघाली. १८५१-मध्येच ' स्वदेशी प्रदर्शन ' भरले. याच वर्षी पुण्यास पहिली मुलींची शाळा निघाली. फुले यांच्या अस्पृश्योद्धाराच्या कार्याला जोर चढला तो १८५३-मध्ये. याच सुमारास, म्हणजे १८५३-मध्येच, हिंदुस्थानातील पहिली आगगाडी मुंबई ते ठाणे धावू लागली. याच वर्षी कलकत्ता ते आग्रा आठशे मैलांचे तारायंत्रांचे दळवळण लॉर्ड डलहौसीच्या कारकीर्दीत सुरू झाले. १८५५-पर्यंत दळवळणाचा विस्तार ३०५० मैल झाला. यामुळे भारतात एक नवेच युग सुरू झाल्याचे मानण्यात येते. पोस्ट, रेल्वे व तारायंत्र ही तीन सामाजिक सुधारणांची महत्त्वाची साधने होत, असे राज्यकर्ते मानीत. १८५०-नंतरच्या काळातच वाफेच्या एंजिनावर चालणारी जहाजे अस्तित्वात आली. १८५४-मध्ये ' नवनीत ' प्रकाशित झाले. १८५४-सालीच नागपूरकर भोसल्यांचे राज्य खालसा झाले. १८५३–५४-मध्ये सरकारी विद्याखात्याची पुनर्घटना झाली. १८५६-मध्ये विधवाविवाहाला मान्यता देणारा कायदा झाला. वृत्तपत्रीय कार्याला व सामाजिक आंदोलनांना जोर चढला, आणि स्वोन्नतीसाठी सर्व क्षेत्रांत स्वावलंबनाचे प्रयत्न सुरू झाले, ते याच कालखंडात. १८६०-नंतर निरनिराळ्या प्रकारच्या संस्था, प्रार्थनासमाज, सत्यशोधक-समाज, आर्यसमाज, सार्वजनिक सभा इत्यादींचा उदय झाला. कायदे-मंडळाची स्थापना १८६१-मध्ये झाली.

## आणखी दोन घटना

या घटना आपापल्या परीने महत्त्वाच्या खऱ्या, परंतु १८५०–१८६०-च्या दरम्यान घडलेल्या दोन अतिशय महत्त्वाच्या घटनांपैकी एक म्हणजे १८५७ साली झालेली मुंबई विद्यापीठाची स्थापना व दुसरी म्हणजे ज्याला १८५७-चे ' स्वातंत्र्ययुद्ध ' असे मानण्यात येते ती. येथील सैनिकांच्या जोरावर नानासाहेब पेशवे, तात्या टोपे, झाशीची राणी लक्ष्मीबाई, बहादुरशाह इत्यादींनी ब्रिटिश सत्तेविरुद्ध सशस्त्र उठाव करण्याचा प्रयत्न केला. या उठावाचे पुढारी प्राधान्याने महाराष्ट्रीय असले, तरी त्यांचे कार्यक्षेत्र महाराष्ट्राबाहेर होते, आणि या लढायांपासून येथील जनता व सुशिक्षित समाज सामान्यतः अलिप्तच राहिला होता. एवढेच नव्हे, तर हा उठाव सुशिक्षितांना आपत्ती-

सारखा वाटत होता, असे तत्कालीन सुशिक्षितांच्या प्रतिक्रियेवरून दिसते.[1] या उठावाने ब्रिटिश सत्तेचा लोप होण्याची काही काळ शक्यता निर्माण झाली होती; पण या लढायांमुळे तत्कालीन वाङ्मयावर वैचारिकदृष्ट्या काही संस्करण झाल्याचे आढळत नाही. १८५७-च्या उठावाचा बीमोड झाल्याने राजकीयदृष्ट्या कंपनी-सरकारची सत्ता लोप पावून राणीचे राज्य निर्माण झाले, येथील जनता निःशस्त्र झाली, ब्रिटिश पार्लमेंटच्या प्रत्यक्ष आधिपत्याखाली भारत गेला आणि सरंजामी राजवट पुन्हा येथे निर्माण होण्याची शक्यता कायमची लोपली, असे काही महत्त्वाचे परिणाम भावी राजकीय परिस्थितीच्या दृष्टीने झालेले दिसतात. १८५१-मध्येच दुसरा बाजीराव मृत्यू पावला होता. १८५८-मध्ये मोगल बादशहाचा शेवटचा अंश बहादुरशहा याचाही निकाल लागला. एका जुन्या जगाचा राजकीयदृष्ट्या अशा प्रकारे शेवट झाला; तरी संस्थानांच्या रूपाने त्याचे अवशेष येथे दीर्घकाल शिल्लक राहिले. या अवशिष्ट सत्तांशांचा महाराष्ट्रियांना अभिमानही वाटत होता. हे मल्हारराव गायकवाडांच्या पदच्युतीच्या वेळी निर्माण झालेल्या खळबळीवरून स्पष्ट होते. १८५७-नंतरही संस्थानांच्या रूपाने शिल्लक राहिलेल्या या सरंजामी सत्तांनी जुन्या संस्कृतीला व तिच्या अध्वर्यूंना ( हरिदास, शास्त्री, पुराणिक, वैदिक, लावणीकार, कीर्तनकार, कुस्तीगीर इत्यादींना ) दीर्घकाल आश्रय दिला. जुन्या संस्कृतीची व सत्तेची अभिमानस्थले या दृष्टीनेच या संस्थानांकडे अगदी अलीकडेपर्यंत पाहिले जात होते. या संस्थानिकांपैकी काहींनी कादंबरीनाटकां-सारख्या आधुनिक वाङ्मयप्रकारांना उत्तेजन व आश्रय ही दिलेली दिसतात. 'मुक्ता-(क्त)माला', 'रत्नप्रभा' यांसारख्या कादंबऱ्या लिहिणाऱ्या हळबेशास्त्र्यांना गायकवाडसरकारचे वर्षासन होते. आरंभीच्या कादंबऱ्यांत आढळणारे मध्ययुगीन वातावरण या संस्थानी वातावरणाशी मिळते-जुळते आहे. अर्वाचीन मराठी रंगभूमीचा प्रारंभही १८४३-मध्ये सांगली संस्थानाच्या अधिपतींच्या आश्रयानेच झाला. पुढेही दीर्घकाल मराठी नाटकमंडळ्यांना निरनिराळ्या संस्थानिकांचा आश्रय होताच.

### असंतोषाला प्रारंभ

१८६०-नंतरच्या राजकीय परिस्थितीचा विचार करिता वातावरण उत्तरोत्तर कसे तापत गेले, हे दादाभाई नवरोजींच्या कार्यावरून व उद्गारांवरूनही स्पष्ट होते. दादाभाईंना व्यापारक्षेत्राचा चांगला अनुभव असल्याने या क्षेत्रातील ब्रिटिशांची पिळवणूक त्यांच्या पूर्णपणे लक्षात आली होती. १८६६-मध्ये त्यांनी इंग्लंडमध्ये 'ईस्ट इंडिया असोसिएशन' नावाची संस्था स्थापन करून इंग्रज राजवटीचे अर्थ-

१. 'हा मतिभ्रममूलक जो स्फोट झाला आहे, ते एक आमच्या राष्ट्रावर मोठे अरिष्टच आलें आहे, असे मानल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.'

रावसाहेब मंडलिक यांचे उद्गार.

विष्णू कृष्ण चिपळूणकर : काल व कर्तृत्व, ग. त्र्यं. माडखोलकर, पृ. २३०.

शोषणात्मक स्वरूप तपशीलवारपणे उघड केले, आणि पूर्वीच्या एककल्ली, अनियंत्रित राजवटीपेक्षा इंग्रजी राजवट अधिक बरी, हे मान्य करूनही हिंदी जनतेवर होणाऱ्या अन्यायांचा प्रतिकार करण्यासाठी चळवळ उभारण्याची आवश्यकता प्रतिपादिली. या चळवळीचे स्वरूप अर्थातच सनदशीर होते. पुणे येथे स्थापन झालेल्या 'सार्वजनिक सभे'चा उद्देशही लोकांवर होणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या अन्यायांची दाद लावून घेणे हाच होता. अर्जविनंतीद्वारा प्रयत्न करूनही या अन्यायांची दाद नीटपणे लागत नसल्याचा अनुभवही हळूहळू जनतेला येत गेला व त्यातूनच ब्रिटिश राजवटीबद्दलची असंतोषाची भावना वृद्धिंगत होत गेली. या असंतोषाचा अग्नी उत्तरोत्तर प्रज्वलित करण्यास स्वदेश, स्वधर्म इत्यादींचे इंधन सज्ज होतेच. त्यास पुढे विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी स्वभाषाभिमानाची जोड दिली. भारतीय संस्कृती, भारतीय वाङ्मय व भारतीय इतिहास यांबद्दलचा अभिमानही या असंतोषाबरोबर वाढीस लागला. वाङ्मयीन-दृष्ट्या विचार करिता यामुळे ऐतिहासिक पुरुषांची चरित्रे, नाटके, काव्ये, कथा यांना अधिक बहर आला. राष्ट्रीय भावनेच्या आविष्कारासाठी या ऐतिहासिक व पौराणिक कथावस्तूंचा विपुल प्रमाणात वापर झाला. मराठ्यांचा स्वाभिमान फुलविणाऱ्या अनेक घटना मराठ्यांच्या इतिहासात सुदैवाने उपलब्ध होत्याच. गतकालीन वैभवाची स्मृतीही ताजी होती. भावनात्मक आवाहनासाठी साऱ्यांचा हुकुमी वापर पुढील लेखकांनी केलेला आहे. चिपळूणकर-टिळक-परंपरेने त्याला एक वेगळेच अधिष्ठान पुढे प्राप्त करून दिले आणि राष्ट्रीय शाहिरी पद्धतीच्या वाङ्मयाने सामाजिक आशयात्मक वाङ्मयाला काही काळ मागे टाकले. चिपळूणकर-टिळकाच्या काळाचा हा विचार येथेच सोडला, तरी या कालखंडाची पूर्वतयारी आधीच्या काळात कोणत्या प्रकारे होत होती, त्याची यावरून कल्पना येते.

## दक्षिणा प्राइझ कमिटी

१८५८-नंतर वाङ्मयनिर्मितीच्या कार्याला प्रत्यक्षपणे साहाय्य करण्यासाठी निर्माण झालेली सरकारी संस्था म्हणजे 'दक्षिणा प्रैझ कमिटी'. ही १८५१-मध्ये स्थापन झाली. मराठी वाङ्मयाला उत्तेजन देण्याचे पूर्वीचे काम एकदम बंद करणे सरकारला अनिष्ट वाटले. शिवाय, मराठ्यांची विद्यावर्धनाची जी परंपरा श्रावण-दक्षिणेच्या रूपाने पेशवाईत चालू होती व ज्या दक्षिणेची रक्कम वाढत-वाढत दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत दहा लाखांपर्यंत गेली होती, तिचा विनियोग कसा करावयाचा, हा इंग्रज राज्यकर्त्यांपुढे प्रश्न होता. काही काळ थोड्याफार प्रमाणात दक्षिणा देण्याची पद्धती प्रत्यक्षपणे चालू ठेवण्याचा उपक्रम इंग्रज राज्यकर्त्यांनी केला. पण पुढे विशिष्ट जमातीला ही रक्कम या प्रकारे न वाटता विद्यावर्धनाचे उद्दिष्ट व्यापकपणे सफल करण्याच्या दृष्टीने हीतील काही रक्कम कॉलेजच्या निर्मितीसाठी व काही विद्यावेतनाच्या स्वरूपात खर्च केली जाऊ लागली. या रकमेचा काही भाग ग्रंथोत्तेजनाच्या कामी खर्च करण्याच्या उद्देशाने जी संस्था निघाली, तीच 'दक्षिणा प्रैझ कमिटी'

तिला हे विशिष्ट नाव का मिळाले असावे, याचाही उलगडा वरील कारणपरंपरा लक्षात घेता होतो. याआधी १८४९-मध्ये दक्षिणी भाषेत पुस्तके प्रसिद्ध करणारी एक मंडळी स्थापन झाली होती. रंजन, बोध व व्यवहारज्ञान हे या मंडळीचे उद्दिष्ट होते. त्यापूर्वी १८४८-मध्ये 'मराठी ज्ञानप्रसारक मंडळी' या नावाची मंडळी मुंबईच्या 'स्टयूडंटस लिटररी असोसिएशन'ची शाखा म्हणून कार्य करीत होतीच. व्याख्याने, निबंधवाचन, चर्चा इत्यादी प्रकारचा कार्यक्रम या शाखेने आरंभिला होता. 'ज्ञानप्रसारक' नावाचे एक मासिकही ही संस्था चालवीत होती. भास्कर दामोदर पाळंदे, विश्वनाथ नारायण मंडलिक, लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे इत्यादी तत्कालीन बऱ्याच प्रमुख विद्वानांचे लेख या मासिकात येत. पुण्यास याच सुमारास 'कल्याणोन्नायक मंडळी' नावाची संस्था मोरेश्वरशास्त्री साठे व कृष्णशास्त्री चिपळूणकर वगैरेंनी काढली होती. याशिवाय 'ज्ञानप्रकाश' नावाची आणखी एक सभा पुण्यास होती. पण या सर्वात वाङ्मयनिर्मितीला प्रेरक ठरणारी संस्था अर्थात 'दक्षिणा प्रैझ कमिटी' हीच.[1]

## कमिटीचे धोरण व कार्य

दक्षिण प्रैझ कमिटीचे प्रारंभीचे धोरण भाषांतरित ग्रंथांना उत्तेजन देण्याचे होते, व प्रारंभीची यादी पाहिल्यास तीत इतिहास, चरित्र, व्यवहारशास्त्र इत्यादी विषयांनाच प्राधान्य आहे. १८५१ ते १८५५-पर्यंत कमिटीकडे एकूण ९९ पुस्तके आली. त्यांपैकी ४६ कमिटीला पसंत पडली. यांपैकी प्रत्येक ग्रंथकाराला शंभर ते दोनशेपर्यंत रक्कम बक्षीस म्हणून देण्यात आली. बक्षीस मिळविणाऱ्या लेखकांच्या यादीत कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेश सदाशिव लेले, गंगाधर रामचंद्र टिळक वगैरेंची नावे आढळतात.[2] १८५८ ते १८६६-पर्यंतची या संस्थेची माहिती उपलब्ध नाही. १८६६-च्या पुढच्या माहितीवरून ललितवाङ्मयाला उत्तेजन देण्याचे धोरण कमिटीने अंगीकारिलेले दिसते. शालेय ग्रंथांची जबाबदारी आता शिक्षणखात्याकडे गेली होती. त्यामुळे सर्वसामान्य माणसाचे रंजन व उद्बोधन करणाऱ्या पुस्तकांना उत्तेजन देण्याकडे कमिटीचा कल होऊ लागला होता. लालित्याकडे ओढा असणारी पुस्तके १८६०-नंतरच्या कालखंडात निर्माण होऊ लागण्याचे हे एक कारण. वाढत्या शिक्षणप्रसाराने वाढलेली रंजनात्मक वाचनाची भूक हेही याचे आणखी एक कारण आहे. भाषांतरापेक्षा स्वतंत्र ग्रंथांना उत्तेजन देण्याचे धोरण कमिटीने नंतर अंगीकारिले. अशा स्वतंत्र ग्रंथाना चारशे रुपयांपर्यंत बक्षीस देण्याचे कमिटीने जाहीर केले शिवाजीसारखी ऐतिहासिक व्यक्ती व गंगानदी-सारखा धर्मश्रद्धेचा विषय स्वतंत्र काव्यलेखनविषय म्हणून कमिटीने निवडले.

---

१. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (द्वितीय आवृत्ती), पृ ६३–६४.
२. आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, कृ. भि. कुलकर्णी, पृ. ६२.

विषयांच्या निवडीवरून एतद्देशीयांचा अनुनय करण्याचे धोरण सरकारने पूर्णपणे सोडले नसल्याचे स्पष्ट होते. श्री. चिंतामणिपेठकर व बापूसाहेब कुरुंदवाडकर यांच्या 'गंगावर्णना'मागे किंवा म. मो. कुंटे यांच्या 'राजा शिवाजी'च्या लेखनामागे दक्षिणा प्रैझ कमिटीच्या बक्षिसांच्या योजनेची प्रेरणा आहे. काव्याबरोबर कादंबरी हा प्रकारही बक्षिसासाठी या कमिटीने नियोजित केला होता. ब्रिटिशपूर्व संस्कृती व ब्रिटिश संस्कृती यांच्या संघर्षाचे तरुण हिंदू मनावर होणारे संस्करण योग्य प्रकारे चित्रित करणाऱ्यास हे बक्षीस देण्यात यावयाचे होते. कादंबरीच्या विषयावरून राज्यकर्त्यांची वाङ्मयविषयक अपेक्षा सूचित होते. या बक्षिसाला योग्य अशी कादंबरी पुढे आली नाही. काव्यप्रांतातील बक्षिसे मिळविण्यासाठी अहमहमिका लागावी व त्यासाठी ठेवलेल्या बक्षिसांची विभागणी करण्याचा प्रसंग यावा; पण कादंबरीक्षेत्रातील बक्षीस मिळविण्यासाठी कोणी पुढे येऊ नये, यावरून तत्कालीन लेखकांना पद्यलेखन करणे हे गद्यलेखनापेक्षा सोपे व सोयीचे वाटत असावे, असे अनुमान निघते.

### पद्यांचा उपयोग

मराठी काव्याची परंपरा जुनी असल्याने गद्याच्या मानाने पद्याची निर्मिती इंग्रजी राजवटीतही अधिक व्हावी, हे स्वाभाविक होते; किंबहुना, पद्याने गद्याचाही काही प्रांत या काळात अडविला होता. तत्कालीन कादंबऱ्यांमधूनही पद्याने चंचुप्रवेश केल्याचे आढळते. व्यसनांचे दुष्परिणाम, आगगाडी, राणीचा हीरक-महोत्सव, मासिकांची, वृत्तपत्रांची वर्गणी व प्रसिद्धीचा वार, दारिद्र्य, सामाजिक चळवळी, राष्ट्रसभा इत्यादी विषयही त्या काळी पद्यबद्ध झालेले आहेत. कोणतीही प्रासंगिक घटना पद्याश्रयी झाली की कविता होते, अशी तत्कालीनांची समजूत असावी. हरि केशवजी, ज्योतिबा फुले, दादोबा पांडुरंग, विष्णुशास्त्री पंडित यांच्यासारख्या सामाजिक क्षेत्रातील विचारवंतांनीही आपले विचार पद्यबद्ध केले आहेत. तत्कालीन पिढीची ही एक लकबच दिसते. पद्याची पाठांतरसुलभता हेही गद्यविचार पद्यग्रथित करण्याचे कारण असावे. अर्थात या प्रकारच्या पद्यलेखनातून काव्यगुणांची अपेक्षा करणे अप्रस्तुतच. संस्कृत परंपरेची कविता अनुवादरूपाने शास्त्रीमंडळींनी मराठीत आणिली होतीच. संस्कृत भाषेचे अध्ययनही आजच्या मानाने त्या काळी अधिक होई. त्यामुळे या वाङ्मयाचा व संस्कृतप्रचुर लेखनाचा आवर्जून आश्रय करणारा एक वर्ग त्या काळी प्रामुख्याने होता. संस्कृत शैलीचे अनुकरण करावयाचे म्हणजे अलंकारांचे स्तोम आलेच.[१] विठोबा अण्णा दप्तरदारांसारख्या सनातनी परंपरेच्या अभिमानी लेखकांनी नव्या

१. "ज्या वाक्यांत किंवा काव्यांत अलंकार नाहींत, त्यांचा रस सपक लागतो. अन्न हे सामान्यतः गोड खरें, परंतु त्याला मिठानें किंवा साखरेने जशी विशेष गोडी येती, तसा अलंकारांच्या योगानें आपणांस विशेष चमत्कारिक रस येतो."

कृष्णशास्त्री राजवाडे, अलंकारविवेक, लेखनकाल, १८५३.

काळात राहूनही जुन्या पद्धतीचेच लेखन केले. भक्तिपर स्तोत्रे, अध्यात्ममंडन, पौराणिक कथा इत्यादी स्वरूपाची कीर्तनकारांना सोयीची अशी पद्येही त्या काळी पुष्कळ प्रमाणात लिहिली गेली. या लेखनात नावीन्यापेक्षा चर्वितचर्वणाचाच भाग अधिक आहे. श्री. पाळंदे यांच्यासारख्या कवींची भक्तिस्तोत्रे प्रार्थनासमाजात गाइली जात.

## जुन्या परंपरा

भक्तिपरंपरेपेक्षा तत्कालीन पिढीला जवळ असलेली परंपरा शाहिरांची होय. प्रभाकर आणि परशुराम हे पेशवेकालीन दोन नामवंत शाहीर १८४३–४४-पर्यंत विपन्नावस्थेत का होईना, पण हयात होते. पेशवाईनंतर बडोदे, इंदूर यांसारखी संस्थानी राज्ये या शाहिरांची व तमासगिरांची आश्रयस्थाने बनली होती. 'शूर मर्दांचा' पोवाडा जरी संपुष्टात आला होता, तरी लावणीचा रंगेल बहर ओसरण्याचे कारण नव्हते. तत्कालीन ऐदी श्रीमंतीला व तदनुषंगिक ख्यालीखुशालीला या प्रकारचे नर्तन-गायनप्रचुर काव्य प्रियतर बनले होते. या प्रकारच्या रचनांसंबंधीची मोहिनी किती दीर्घकाल वाटत होती, हे किर्लोस्करांच्या १८८०-च्या पुढे लिहिलेल्या 'सौभद्रा'-सारख्या पौराणिक नाटकात सुभद्रा व रुक्मिणी यांच्यासारख्यांच्या तोंडी घातलेल्या पदांत लावणीच्या चालींना असलेल्या प्राधान्यावरून जाणवते. हरिदासी धाटणीचीही काही पदे या नाटकात आढळतात. या दोन परंपरा किती दृढमूल झाल्या होत्या, हे यावरून कळते. संतांच्या व शाहिरांच्या परंपरेला अव्वल इंग्रजीत प्राप्त झालेले हे स्वरूप पाहिल्यानंतर उरलेली जुनी परंपरा डोळ्यांसमोर येते, ती पंडिताची. संस्कृताच्या अध्ययनाने व पढीक रसिकतेमुळे हीच परंपरा इतर दोन परंपरांपेक्षा तत्कालीन प्रतिष्ठित लेखकांत अधिक मान्यता पावली होती. 'आर्यापति' मोरोपंत हा यामुळेच त्या वेळच्या बऱ्याच लेखकांचा आवडता कवी ठरला होता. आर्यावृत्तात आणि मोरोपंती थाटात 'गंगावर्णन' नावाचे काव्य लिहिणारे एक तत्कालीन ग्रंथकार बापूसाहेब कुरुंदवाडकर आपल्या काव्याच्या प्रस्तावनेत प्रौढ भारदस्त व संस्कृतप्रचुर भाषेत काव्यलेखन असावे, असे सुचवितात.[1] मोरोपंतांच्या 'केकावली' या एकाच काव्यावर परशुरामतात्या गोडबोले (केकादर्श) व दादोबा पांडुरंग (यशोदा-पांडुरंगी) यासारख्यांनी टीका लिहाव्या किंवा गोविंदराव कानिटकरांसारख्या पुढच्या काळातील आधुनिक अभिरुचीच्या लेखकाच्या 'संमोहलहरी' या काव्यावर 'केकावली'ची छाप दिसावी, यावरून केशवसुतपूर्व काव्यावर मोरोपंतांचा असलेला प्रभाव दृग्गोचर

१. जो शब्दरूपी चित्र बनवितो तो कवी; कविता सोपी असावी, म्हणजे कल्पना क्लिष्ट नसावी, वजनदार असावी; प्राकृत अध्ययन अपक्क, तिच्यातील संस्कृत शब्द काढून टाकले, तर तिचे भाषा हे रूप नष्ट होईल, असा विचार 'गंगावर्णना'च्या शेवटी जोडलेल्या प्रस्तावनेत प्रकट केला आहे.

होतो. पंतांच्या कवितेची महती स्पष्ट करिताना दादोबांनी पंतांच्या व्याकरणशुद्धतेचा आवर्जून उल्लेख केला आहे.[१]

दादोबांनी 'यशोदा-पांडुरंगी'ला लिहिलेली प्रस्तावना तत्कालीन रसिकांची वाङ्मयविषयक भूमिका समजण्याच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. मिल्टनच्या 'पॅरडाइज लॉस्ट'शी या ग्रंथाची त्यांनी तुलना केली आहे. 'केकावली'वर टीका लिहिण्यामागे काव्याचा ध्वन्यर्थ कळावा, विद्यार्थ्यांना शब्दज्ञान व्हावे, वगैरे उद्दिष्टे असल्याचे दादोबा स्पष्ट करतात. अर्पणपत्रिकेवरून व ग्रंथाच्या नावावरून ग्रंथाचा बाह्य उद्देश मृत कन्या व मातापिता यांचे वाङ्मयरूपाने स्मारक करण्याचा दिसतो.[२] तत्कालीन संस्कृत पंडितांचे प्राकृत कवींकडे दुर्लक्षच होते, असे दादोबांनी प्रस्तावनेत केलेल्या निवेदनावरून कळते.[३] याहीपेक्षा प्रस्तावनेतील महत्त्वाचा मुद्दा म्हणजे कोणत्याही ग्रंथाच्या आस्वादास ज्या देशातील तो ग्रंथ असेल, त्या देशाचे डोळे व जीभ असली पाहिजेत हा.[४] तत्कालीन पिढीचा दोन भिन्न संस्कृतींशी संपर्क आल्यामुळे निरनिराळ्या संस्कृतींतून निर्माण झालेले ग्रंथ वाचताना होणारा घोटाळा टाळण्याच्या दृष्टीने दादोबांनी मांडलेला हा मुद्दा महत्त्वाचा होता. 'केकावली'च्या संदर्भातच पुढे न्यायमूर्ती रानडे यानी केलेल्या काही विधानांना प्रार्थनासमाजाच्या दृष्टिकोणाची बाधा झाल्याचा जो आक्षेप 'निबंधमाले'तून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी घेतला, त्यावरून दादोबांनी प्रतिपादिलेल्या वरील सिद्धान्ताची महती अधिकच पटते.

दादोबांची 'यशोदा-पांडुरंगी'ची प्रस्तावना वरील अनेक कारणांनी महत्त्वाची असली, तरी त्यांचे केकावलीवरील भाष्य पारंपरिक मल्लिनाथी स्वरूपाचेच आहे. वाङ्मयाकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोण व नवी रचनापद्धती त्या काळच्या लेखनात ठाशीवपणे जर कोठे प्रतिबिंबित झालेली दिसत असेल, तर ती म. मो. कुंटे यांच्या 'राजा

१ "ऱ्हस्वदीर्घत्वहि अबाधित सांभाळिले, येणेंकरून तर त्यांच्या चातुर्यभरित बुद्धीने आपल्या वाणीस पतिव्रतेचा पाटाव नेसविला."

यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ.१८.

२. वापी, कूप, तडाग अथवा धर्मशाळा बांधून एखादे पूर्तकर्म करावे, तर तितके द्रव्यसाहाय्य आपल्याजवळ नसल्याचे ते नमूद करितात. आपण अब्राह्मण असल्याने वर्णाप्रमाणे आपली वाणीही असंस्कृत असल्याचे नम्रपणे व क्षमायाचनेच्या स्वरात ते सांगतात. पंडितांना आपली टीका मान्य व्हावी, म्हणून तिची भाषा मुद्दाम संस्कृतप्रचुर व प्रौढ ठेविलेली दिसते

३. वामन, मोरोपंत यांची काव्ये पाहणारा दहा लक्षांत एखादा ब्राह्मण सापडेल; निदान लक्षात तरी सापडला तर सापडेल, असे म्हणून आपल्या या बोलण्यात अतिशयोक्ती नसल्याची ते ग्वाही देतात.

यशोदापांडुरंगी, प्रस्तावना.

४. यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ. ४३.

शिवाजी ' या काव्यात. कुंटे यांनी मराठी कवितेच्या रचनापद्धतीत व भाषाशैलीत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला, बोलभाषा व काव्याची भाषा यांतील अंतर कमी करण्याची भूमिका घेतली, रचनाबंध शक्य तितका साधा व वास्तववादी ठेवण्याची खटपट केली. श्री. कुंटे यांची प्रतिभाशक्ती त्यांच्या या उद्देशांना पूरक होण्याइतकी समर्थ नसल्याने त्यांचा हा उद्योग अयशस्वी झाला; त्याची खूप चेष्टाही झाली. या यशापयशापेक्षा श्री कुंटे यांची खरी महती आहे, ती नव्या जाणिवेने नवे प्रयोग करण्यात व त्यांची तात्त्विक बैठक स्पष्ट करण्यात. तत्कालीन काव्यातील सांकेतिक रचनाबंधांचे प्राचुर्य लक्षात घेता कुंटे यांचा हा अयशस्वी, पण धाडसी प्रयोग नजरेत भरतो. त्यांनी या काव्याला या दृष्टीने लिहिलेली प्रस्तावना तर बहुमोल आहे. त्या काळच्या समाजाचे अभिरुचिदृष्ट्या कुंटे यांनी केलेले वर्गीकरण वाङ्मयेतिहासाभ्यासकाला फार उपयुक्त ठरणारे आहे.

## कुंटे यांची मते

कुंटे यांनी तत्कालीन वाचकांचे अभिरुचिदृष्ट्या तीन वर्ग पाडले आहेत : ( १ ) संस्कृत काव्याभिमानी शास्त्रीय मंडळी, ( २ ) नव्या अभिरुचीचा इंग्रजी जाणणारा वर्ग व ( ३ ) अशिक्षित जनता. कुंटे यांनी संस्कृत पद्धतीच्या कृत्रिम लेखनपद्धतीवर हल्ला चढवून स्वाभाविक, अकृत्रिम शैलीचा पुरस्कार आपल्या ' राजा शिवाजी ' या काव्यात केला आहे. संस्कृत शैलीला ते ' क्लासिकल ' म्हणतात व क्लासिकल शैलीचे पर्यवसान, ती निसर्गावर मात करू इच्छीत असल्यामुळे, कृत्रिमतेत अपरिहार्यपणे होणार, असा कुंटे यांचा अभिप्राय आहे. खरी कला निसर्गाच्या अनुकरणात असते, असे त्यांचे मत असल्याने त्यांनी या स्वाभाविक शैलीचा अवलंब केला. मराठीकडे पाहण्याचा इंग्रजी शिक्षितांचा दृष्टिकोणही संस्कृताभिमान्यांप्रमाणेच विकृत असतो, कारण ते मराठीकडे मराठीच्या दृष्टिकोणाने न पाहता संस्कृताच्या किंवा इंग्रजीच्या चष्म्यातून पाहतात, असे कुंटे यांचे प्रतिपादन आहे. मराठी शब्द उपलब्ध असता संस्कृताचा आश्रय करणे कुंटे यांना अयोग्य वाटते.[१] बापूसाहेब कुरुंदवाडकरांच्या अगदी उलट असा हा दृष्टिकोण आहे. भावी कालातील स्वाभाविक वास्तव शैलीचा प्रस्ताव मात्र कुंटे यांच्या विचाराने झाला आहे, आणि इंग्रजी राजवटीचे वाङ्मयाभिरुचीच्या दृष्टीने जे वैशिष्ट्य आहे, ते ऐहिकतेच्या व वास्तववादाच्या तात्त्विक पुरस्कारातच. हा वास्तववादी, ऐहिक दृष्टिकोण घेणाऱ्या नव्या विचारांच्या कवींची शैली मात्र जुन्या वळणाचीच राहिली, हे प्रधानांच्या ' दैवसेनी ' किंवा कीर्तिकरांच्या ' इंदिरा ' या काव्यावरून आणि कानिटकरांच्या ' संमोहलहरी ' यावरून उघड होते. महादेवशास्त्री कोल्हटकरांनी ' मुंगी'सारखा नवा विषय घेऊनही रचना मात्र आर्यावृत्तातच केली आहे. नवे रसायन जुन्या बरणीत भरण्याचा हा प्रकार

१. राजा शिवाजी, प्रस्तावना.

दीर्घकाल चालू होता. संस्कृत काव्यांची भाषांतरे करण्यास ज्याप्रमाणे काही लेखक पुढे आले, त्याप्रमाणे इंग्रजी स्फुट कवितांची भाषांतरे करणारे विष्णू मोरेश्वर महाजनींसारखे काही लेखकही दिसतात. पण स्फुट रचनापद्धती व काही इंग्रजी काव्यप्रकारांचा स्थूल परिचय सोडल्यास इंग्रजी कवितांच्या भाषांतरकर्त्यांची रचनापद्धती जुन्या वळणाचीच राहिली.

**कादंबरी**

काव्यावर जुन्याची छाप पडावी, यात नवल नाही; पण इंग्रजी राजवटीत निर्माण झालेल्या कादंबरीसारख्या नव्या ललितलेखनप्रकारावरही संस्कृत शैलीची घनदाट छाया आहे. इंग्रजीतील 'नॉव्हेल' या प्रकाराचे मराठीत नामकरण होताना काही वेळा 'नावल' असा पर्याय योजिला गेला. पण जे नाव लोकप्रिय झाले, ते कादंबरी हेच होय. बाणभट्टाच्या कादंबरीचा संस्कार या वाङ्मयप्रकाराच्या नावातही आहे. वास्तववादी उपयुक्त विचारसरणीच्या त्या काळात कादंबरीवर ठसा उमटला आहे, तो अद्‌भुततेचा व अतिशयोक्तीचा. काव्यातील अद्‌भुतता कमी होऊन ती आता कादंबरीत अवतरल्याचे दिसते. बाणभट्टाप्रमाणे पुराणकथांचाही हा संस्कार असावा. याच्या जोडीला 'शुकबहात्तरी', 'सिंहासनबत्तिशी' इत्यादींसारख्या कथांचा परिणामही या काळाच्या कादंबरीवाङ्मयावर झाल्याने त्यात अद्‌भुततेबरोबर उत्तान शृंगाराच्याही छटा उतरल्या आहेत. या कादंबऱ्या प्राधान्याने प्राथमिक अवस्थेतील अभिरुचीच्या वर्गासाठी लिहिलेल्या असल्याने त्यांचे स्वरूप बहुतांशी अतिशयोक्त, स्वप्नरंजनात्मक व शृंगारप्रचुर असेच राहिले. मुक्ता(क्त)माला, मंजुघोषा, रत्नप्रभा, वसंतमाला, चंपकमाला सुहास्यवदना इत्यादी कादंबऱ्यांची नावे पाहिली, तरी त्यांतील वातावरणाची कल्पना येते. नायिकाची वर्णने, ऋतूंची वर्णने, नगरांची वर्णने, विरहाची वर्णने इत्यादी प्रकारच्या वर्णनांची रेलचेल या कादंबऱ्यांत आढळते. संभाव्यता, वास्तवता, व्यक्तिदर्शन इत्यादी घटक त्यांत अद्यापि अवतीर्ण व्हावयाचे होते. यांतील अद्‌भुततेची जातही बाणाच्या कादंबरीप्रमाणे भव्य नव्हती. या प्रकारचे लेखन करणाऱ्यात शास्त्रीमंडळींचा भरणा विशेष होता. या कादंबरीलेखनाला विटूनच तत्कालीन पिढीतील एक विचारवंत का. बा. मराठे यांनी या प्रकारच्या कादंबरीलेखनाला 'कीड' असे संबोधिले आहे. "जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थलीं मरणासारखा शोक व आनंदस्थलीं स्वर्गासारखा आनंद." हे तत्कालीन कादंबऱ्यांचे उपहासपर वर्णन करणारे लेखक मराठे हे होत.

**मराठे यांची टीका**

का. बा. मराठे यांनी 'नावल व नाटक' या नावाचा निबंध १८७२-मध्ये लिहिला. त्यात वरीलप्रमाणे कादंबरी-लेखनावर त्यांनी टीका केली आहे. तत्कालीन अभिरुचि-संपन्न व्यक्तींची ललितवाङ्मयाकडून काय अपेक्षा होती, हे यावरून स्पष्ट होते. मराठे यांनी या निबंधात तत्त्वतः वास्तववादाचा पुरस्कार केलेला असून स्थल, काल व व्यक्ती

यांच्या वर्णनामध्ये विसंगती असता कामा नये, अशी अपेक्षा प्रकट केली आहे. ग्रीक नाट्यकलेला अभिप्रेत असलेल्या ऐक्यांचाच ( Unity-च्या ) मुद्दा येथे मराठे मांडतात. ज्या काळची माणसे, तसा पोषाख, चालरीत, लकब वगैरे वर्णावी, नावलामध्ये सृष्टीच्या नैसर्गिक स्वरूपाचे वर्णन असावे, मराठी कादंबरीकारांनी डिकन्स व स्कॉट या दोन कादंबरीकारांचा आदर्श समोर ठेवावा, हलकट लोकांचे फारसे वर्णन करू नये, श्रीमतांचा थाटमाटही नसावा, जे खरे असेल तेच जागोजाग वर्णावे, आकृतीचे वर्णन करिताना आत्म्याकडे विशेष लक्ष दिले जावे, खऱ्या पुरुषाचा वृत्तान्त असला तर फारच उत्तम, अशा प्रकारच्या अनेक सूचना या निबंधात त्यांनी केल्या आहेत. हरिभाऊंच्या वास्तववादाची ही एक प्रकारे नांदीच होय..एका बाजूला अद्भुत व दुसऱ्या बाजूला वास्तव यांची सांधेजोड करण्याला ऐतिहासिक कथावस्तू उपयुक्त ठरल्याचे हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवरूनही दिसते. हरिभाऊंच्या काळात राष्ट्रीय भावनेचे ऐतिहासिक कादंबरीनिर्मितीला विशिष्ट साहाय्य झाले. हरिभाऊपूर्व कालात निर्माण झालेल्या ऐतिहासिक कादंबऱ्या दोनच आहेत. त्या म्हणजे मोरोबा कान्होबा यांची 'घाशीराम कोतवाल' ( १८६३ ) आणि रा. भि. गुंजीकर यांची 'मोचनगड' ( १८७१ ). तंत्रदृष्ट्या 'मोचनगड' सरस आहे. शिवकाळावर पुढे अनेक ऐतिहासिक कादंबऱ्या निर्माण झाल्या. ही पहिलीवहिली ऐतिहासिक कादंबरीही शिवकाळावरच असावी, हे लक्षणीय आहे. 'घाशीराम कोतवाला'त मात्र अनेक गोष्टींचे कडबोळे केले आहे. एक ललितकृती निर्माण करण्यापेक्षा अनेक प्रकारच्या माहितीचा संग्रह करणे हे या ग्रंथाचे उद्दिष्ट असल्याचे स्वतः लेखकच प्रस्तावनेत सांगतात.[1] तत्कालीन साऱ्याच ललित व ललितेतर वाङ्मयाचे प्रमुख प्रयोजन माहिती वा बोध हेच असल्याचे 'मंजुघोषा' वा 'मुक्ता( क्त )माला' या लोकप्रिय कादंबऱ्यांच्या प्रस्तावनांवरूनही स्पष्ट होते. मंजुघोषेबद्दल बोलताना 'आवाक्याबाहेरचे काम करू नये व सन्मार्गाने सुख लागते,' हे स्पष्ट करण्यासाठी आपण ही कादंबरी लिहिली, असे रिसबूड सांगतात; आणि मुक्तामालेचे लेखकही कादंबरीचा विषय नीतिपर व उपदेशपर असल्याची ग्वाही देतात. बोधप्रवणता हा काही अव्वल इंग्रजी अमदानीतील वाङ्मयाचाच खास विशेष नव्हे, तो आपल्या साऱ्याच वाङ्मयाचा एक स्थायिभाव असल्याचे अगदी अलीकडच्या काळापर्यंत मानण्यात येत होते. या बोधाबरोबर वाक्यरचना नीटपणे करता येणे, मराठी भाषेची गोडी लावणे वगैरेसारखी जी उद्दिष्टे हरि केशवजी, दादोबा

1. The subjects treated are partly scientific, literary, artistical scriptural, historical, natural and ficticious; calculated, the author trusts, to afford to the vernacular readers instruction and light reading replete with interest and amusement and offering to European linguist ...... information......relating to the social and religious notions......of the Hindu sect.

घाशीराम कोतवाल, प्रस्तावना.

पांडुरंग' हळबेशास्त्री वगैरे मंडळी सांगतात, तीं अव्वल इंग्रजी काळातील खास वाङ्मयीन उद्दिष्टें मानिता येतील. हा उद्देश 'मुक्तमाले'च्या कर्त्यासमोरही होता. हे या कादंबरीच्या प्रस्तावनेतनमूदकेलेआहे.[1]

## ललितवाङ्मयावरील त्रिविध संस्करण

काल्पनिक वा ऐतिहासिक कादंबऱ्यांपेक्षा सामाजिक स्वरूपाचे जे लेखन झाले, त्यात वास्तवता फार मोठ्या प्रमाणात, कधीकधी नको तितकी, प्रतिबिंबित झालेली आहे. बाबा पदमजींनी १८५७-मध्ये लिहिलेले 'यमुनापर्यटन' हे पुस्तक मराठी कादंबरीचा प्रारंभबिंदू कल्पिण्यात येते. हिला कादंबरी-स्वरूपाचे लेखन मानिता येईल किंवा नाही हा प्रश्न विवाद्य असला, तरी हिच्यात प्रतिबिंबित झालेला वास्तववाद एका बाजूने अगदी उघडाबोडका, तर दुसऱ्या बाजूने प्रचारपीडित असा आहे. हिंदुधर्मातील विधवांची दुःखे उघड करण्याच्या निमित्ताने, पण वस्तुतः ख्रिस्ती धर्माची महती पटविण्याच्या उद्देशाने लिहिलेल्या या पुस्तकात अतिरंजितपणा व भडकपणा शिरला आहे. सुधारणावाद, प्रचारात्मकता, वास्तववाद, सामान्यांचे जीवन आणि सामाजिक कादंबरी यांचा ऋणानुबंध सामाजिक कादंबरीच्या जन्मापासूनचा आहे, हे मात्र 'यमुनापर्यटना'वरून दिसते. 'रत्नप्रभे'सारख्या अद्भुत कादंबरीतही पुनर्विवाहाची सुधारणा डोकावते. 'रासेलस'सारखी तत्त्वप्रवण कादंबरी, अनुवादरूपाने का होईना, कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी मराठीत आणिली. अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टींचा अनुवादही त्यांनीच केला. कृष्णशास्त्री चिपळूणकर हे त्या काळी इतर क्षेत्रांप्रमाणे ललितवाङ्मयाच्या क्षेत्रातही अग्रणी मानण्यात येत. तत्कालीन ललितवाङ्मयावर एका बाजूने संस्कृत, दुसऱ्या बाजूने पर्शियन व तिसऱ्या बाजूने इंग्रजी साहित्य कसा प्रभाव गाजवीत होते, हे कृष्णशास्त्री चिपळूणकर या एकाच ग्रंथकाराच्या अनुक्रमे मेघदूत, अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी व रासेलस या तीन कृतींवरून व्यक्त होते. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी वापरलेला 'सुरस आणि चमत्कारिक' हा शब्द तत्कालीन लोकप्रिय ललितवाङ्मयाचे स्वरूप स्पष्ट करून दाखवितो. केवळ सुरस आणि चमत्कारिक वाङ्मयप्रकाराचेच आकर्षण हे अभिरुचीच्या बाल्यावस्थेचे निदर्शक होय. तथापि

१. "पूर्वी आमच्या लोकांस मराठी भाषा शिकणे हे थट्टेसारखे वाटत होते. परंतु हल्लीं ती भाषा शिकून तीत ग्रंथ लिहिणे हे साधारण कृत्य आहे असे नाहीं, अशी बहुतेकाची खात्री झाली आहे. तरी आमच्या लोकांस स्वभाषेंतील पुस्तकें व वर्तमानपत्रे वाचण्याची जितकी गोडी लागावी, तितकी अद्यापि लागली नाहीं, असे वाटते. तर लोकास स्वभाषेतील पुस्तके वगैरे वाचण्याची गोडी लागावी, या हेतूने यथामति हा ग्रंथ तयार केला आहे." मुक्तामाला, प्रस्तावना.

हा दोष मान्य करूनही मराठी भाषेच्या पोषणाचे कार्य या अद्भुत कथासाहित्याने केले, असा कुसुमावती देशपांडे यांचा अभिप्राय आहे.[1] कादंबरीलेखनाचा प्रभाव तत्कालीन स्त्रियांवर पडून त्याही कादंबरीलेखनास उद्युक्त झाल्याचे साळूबाई तांबवेकर यांच्या 'चंद्रप्रभाविरहवर्णना'वरून दिसते. हे पुस्तक १८७३-मध्ये प्रसिद्ध झाले. त्यापूर्वी (इ. स. १८००-पासून) कोणाही महाराष्ट्रीय स्त्रीने गद्यलेखन केल्याचे आढळत नाही. 'पुस्तककर्ती स्त्रीजाति आहे म्हणून प्रथमच वाचण्यापूर्वी या पुस्तकावर रागें भरू नका,' अशी लेखिकेची विनंती आहे. स्त्रीचा ग्रंथ यापलीकडे यात विशेष कौतुक करण्यासारखे काही नाही, असे समीक्षकांचे मत आहे.[2] मराठी कादंबरीच्या हरिभाऊपूर्व वैशिष्ट्यांचा विचार करिताना कथानकाचा शोकान्त शेवट करण्याचा (Tragedy) उपक्रमही सुरू झाल्याचे रहाळकरांच्या 'नारायणराव व गोदावरी' (१८७९) या कादंबरीवरून दिसते.

### नाट्याचा उदय

अव्वल इंग्रजीतील ललितवाङ्मयाचा विचार करिताना काव्य आणि कादंबरी यांपेक्षा नाट्य हा वाङ्मयप्रकार एका दृष्टीने अधिक भाग्याचा मानावयास हवा. कारण इंग्रजी वाङ्मयाच्या अध्ययनाने शेक्स्पिअरसारख्या सर्वश्रेष्ठ नाटककाराचा परिचय आपल्या नाट्यलेखनाच्या प्रारंभकाळातच झाला. शेक्स्पिअरच्या नाट्यकृतींचे इकडील लोकांना प्रारंभी जे आकर्षण वाटले, ते त्याच्या व्यक्तिदर्शनापेक्षा चमत्कृतिपूर्ण कथानकाचेच, हे त्याच्या 'द टू जंटलमेन ऑफ व्हेरोना', 'द मर्चंट ऑफ व्हेनिस' व 'द कॉमेडी ऑफ एरर्स' यांच्या अनुक्रमे 'अवर्णनीय स्नेहभाव अथवा आनंदपूर नगरांतील दोन तरुण गृहस्थ' (१८७०), 'स्त्रीन्यायचातुर्य' (१८७१) व 'भुरळ' (१८७२) या कथात्मक रूपांतरांवरून स्पष्ट होते.[3] शेक्स्पिअरची नाट्यरूपाने पहिली ओळख मराठी रसिकांना झाली, ती महादेवशास्त्री कोल्हटकरांनी १८६७-मध्ये केलेल्या 'ऑथेल्लो' या शोकात्मिकेच्या अनुवादाने. कोल्हटकरांच्या या अनुवादानंतर पाच वर्षांतच 'जूलियस सीझर' या शेक्स्पिअरच्या आणखी एका शोकात्मिकतेचा अनुवाद 'विजयसिंग' या नावाने मराठी रसिकांसमोर आला (१८७२). कादंबरीमध्ये सुखात्मिकतेचे प्राबल्य आढळते, तर स्वतंत्रपणे लिहिलेल्या नाटकांतही शोकात्मिकांना पहिल्यापासूनच कसे प्राधान्य प्राप्त झाले होते, हे वि. ज. कीर्तने यांनी १८६१-मध्ये लिहिलेल्या 'थोरले माधवराव पेशवे' या नाटकावरूनही दिसते. शेक्स्पिअर हा

१. मराठी कादंबरीचे पहिले शतक, भाग १, पृ. ३७.
२. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (आवृत्ती २), पृ. १२८.
३. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका (द्वितीयावृत्ती), पृ. ५१.

त्या काळचा अनुवाददृष्टयाही सर्वांत लोकप्रिय नाटककार ठरला होता.[1] संस्कृत नाटकांचा परिचय येथील शास्त्रीपंडितांना दीर्घकाल असूनही त्यांचा मराठी अनुवाद प्रथम केला गेला, तो इंग्रजी राजवटीतच. कॉलेजांतून अभिजात संस्कृत नाटके प्रयोगरूपाने रंगभूमीवर आणण्याची प्रथा मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतर रूढ झाली. वुइल्यम् जोन्सच्या 'शाकुंतला'च्या अनुवादापासून संस्कृत नाट्यकृतींकडे युरोपीय रसिकांचे लक्ष वेधले होतेच; विद्यापीठातील संस्कृताच्या अध्ययनाने संस्कृत नाट्याच्या अभ्यासाला आणखी उजळा मिळाला.[2] संस्कृत नाटके तुरळक स्वरूपात का होईनात, पण अनेक शतकांनंतर पुन्हा रंगभूमीवर येऊ लागली. संस्कृत नाट्यकृतींच्या मराठी अनुवादांमुळे मध्यंतरीच्या दीर्घ कालखंडात रंगभूमी व नाट्य यांची जी अवहेलना झाली, ती संपून नाट्यकलेला पुन्हा ऊर्जितावस्था आली आणि संस्कृत नाट्यसाहित्याशी नवपरिचित इंग्रजी नाट्याची सांगड घालण्यात येऊ लागली. शेक्स्पिअरसारख्या नाटककाराच्या व्यक्तिदर्शनाचे कौशल्य आत्मसात करण्याचा जरी तो कालखंड नसला, तरी त्याच्या लेखनशैलीचा प्रभाव तत्कालीन नाटककारांवर, कळत-न-कळत, तथापि न होणे अशक्य होते. पल्लेदार गद्याची, नव्या प्रकारच्या खलनायकाची आणि लांबलचक स्वगतांची कल्पना मराठी नाट्यसृष्टीत शेक्स्पिअरच्या परिचयानेच आली असावी. त्या काळचे अनुवादित मराठी काव्य वा कथा पाहिल्यास त्यांचा त्या प्रकारच्या अव्वल दर्ज्याच्या इंग्रजी कलाकृतींशी संबंध आला नसल्याचे दिसते. इंग्रजी कवितांच्या अनुवादांत शेली-कीट्ससारख्या कवींचे अनुवाद नाहीत, आणि कथा-साहित्यात, हरिभाऊंपर्यंत किंवा हरिभाऊंच्या पहिल्यापहिल्या कादंबऱ्यांवरही, रेनॉल्ड्स-सारख्या दुय्यम लेखकाचा प्रभाव आहे. कथासाहित्यातील या परिस्थितीची मीमांसा प्रा. गं. बा. सरदार पुढीलप्रमाणे करतात :—

"मध्यम प्रतीच्या गोष्टींचे तर्जुमे करण्यातच तत्कालीन लेखकांनी संतोष मानला. याचे कारण म्हणजे उच्च वाङ्मयातील रसग्रहण करण्यास लागणारी कलात्मक दृष्टी त्या काळी फारच थोड्या लोकांत होती. बुद्धिमान व सुशिक्षित लोक सरकारी

---

1. Shakespeare appears to have been the most favourite author. In all 18, if not 20, of his dramas have been translated or adapted into Marathi.

Miscellaneous Writings, Justice Ranade, page 29.

या अठरा नाटकांत शेक्स्पिअरच्या प्रसिद्ध शोकात्मिका आहेतच.

२. बहुतेक संस्कृत नाट्यकृतींचे अनुवाद मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतरच झालेले आहेत. परशुरामपंततात्या गोडबोले – वेणीसंहार (१८५७), उत्तररामचरित (१८५९), शाकुंतल (१८६१), मृच्छकटिक (१८६२), नागानंद (१८६५); कृष्णशास्त्री राजवाडे – मालतीमाधव (१८६१), मुद्राराक्षस (१८६७), अभिज्ञान-शाकुंतल (१८६९).

नोकरीच्या मोहात गुंतले होते. इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांचे पूर्ण ज्ञान असलेले लोक मराठी वाङ्मयाच्या वाट्याला येणे शक्य नसल्यामुळे तुटपुंज्या भांडवलावर लेखनव्यवसाय चालविणाऱ्या सामान्य लोकांच्या हातीच कथावाङ्मयाची सूत्रे गेली. " [१]

**रंगभूमीचा आरंभ**

वास्तविक काव्य वा कथा यांच्यापेक्षा प्रेक्षक या नात्याने सामान्य जनतेचा रंगभूमीशी अधिक संबंध येतो. भिन्न रुचीच्या लोकांचे एकाच वेळी समाराधन करणारा हा कलाप्रकार असल्याने सर्वसामान्यांच्या अभिरुचीचा सर्वाधिक परिणाम नाटकावर व्हावयास पाहिजे. परंतु रंगभूमीच्या निर्मितीपासून दीर्घकालपर्यंत वाङ्मयात्मक नाटकाशी रंगभूमीचा संबंध आला नाही. विष्णुदास भावे हे आधुनिक मराठी रंगभूमीचे जनक मानिल्यास त्यांच्या कार्याचा आरंभ १९४३-पासून झाला आहे. भावेप्रणीत पौराणिक नाट्यकृतींत वाङ्मयीन गुणांना महत्त्व नव्हते. या नाटकांना अललडुर्र वा तागडथोम स्वरूपाची नाटकेच मानण्यात येते. ललित, तमाशा वा कीर्तन यांच्या संमिश्रणाने तयार झालेला तो एक साचा होता. पौराणिक कथानकाचा स्थूल आराखडा ठरलेलाच असे, पण भाषणे व संवाद ठराविक नसत. तथापि त्यांत पुष्कळ प्रमाणात सांकेतिकता असे. प्रारंभकाळात रुळले गेले, ते या प्रकारचे नाट्य. त्यानंतर इंग्रजी रंगभूमीच्या परिचयाने 'फार्स' हा प्रकार मराठीत आला. पण फार्समध्ये संवादांपेक्षा घटनांना, कृतींना, अंगविक्षेपांना प्राधान्य असल्याने येथेही नाटकाच्या वाङ्मयात्मक अंगाकडे लक्ष पुरविले गेले नाही. या काळातील रंगभूमीच्या चालकांना अद्‌भुत स्वरूपाचे पौराणिक नाट्य वा विदूषकी चाळ्यांनी भरलेला फार्स ही सर्वसाधारण माणसाच्या रंजनास पुरेशी वाटत होती. त्यामुळे नाटकांचा वाङ्मयीन दर्जा एकंदरीने सामान्यच राहिला. मराठीत 'बुकिश' किंवा 'छापील' नाटकांची पद्धती रूढ झाली, ती १८५१-मध्ये 'प्रबोधचंद्रोदय' या नाटकापासून; आणि हे नाटक मुळातच तात्त्विक स्वरूपाचे आहे. १८५१-नंतरच संस्कृत नाटकांच्या रूपांतरास परशुरामपंत-तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले, रा. भि. गुंजीकर, शिवराम-शास्त्री पाळंदे यांसारखी रसिक विद्वान मंडळी मिळाली, व इंग्रजीच्या अनुवादास वा स्वतंत्र नाट्यलेखनास महादेवशास्त्री कोल्हटकर, वि. ज. कीर्तने यांसारखे अभिरुचि-संपन्न लेखक पुढे आले. यामुळे छापील नाटकांना काही-एक दर्जा १८५१-नंतरच प्राप्त झाला. यापुढल्या काळातही पौराणिक छापाची व सामान्य अभिरुचीची नाटके अर्थात होत होतीच. या पौराणिक नाटकांची संख्या विपुल आहे. ऐतिहासिक कथा-वाङ्मयाच्या मानाने ऐतिहासिक नाटके संख्येने अधिक आहेत. सामाजिक कादंबरी-

१. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका ( द्वितीयावृत्ती ), पृ. ५०.

प्रमाणे सामाजिक नाटकांतही सुधारणांचा पुरस्कार वा धिक्कार आढळतो. 'मनोरमा' (१८७१), 'स्वैरसकेशा' (१८७१) वगैरे नाटके या प्रकारची होत. मात्र प्रचारासाठी सामाजिक, ऐतिहासिक वा पौराणिक नाटकांचा पुढील काळात जितका वापर झाला, तितका या कालखंडात झालेला नाही. या नाटकांवरून हेही दिसते की, नाटकातला विदूषकी प्रकार जर सोडला, तर विनोद व गंभीर नाट्य यांचे मिश्रण करण्याची पुढील कालातील प्रवृत्ती या नाटकांत दिसत नाही. दोन्ही प्रकार अलग-अलगपणे एकाच खेळात दाखविले जात. विनोदावर स्वतंत्र भर असलेला प्रकार 'फार्स' या नावाने ओळखला जाई. पण पुढे 'फार्स'चाही अर्थ बदलला आणि 'नारायणरावाच्या वधा'वर आधारलेल्या नाटकालाही फार्स असे संबोधण्यात येऊ लागले. फार्सच्या तंत्रामुळे पौराणिक नाटकाप्रमाणे भडक घटना आणणे एका बाजूने शक्य होई, आणि दुसऱ्या बाजूने व्यक्तिदर्शनातील सामाजिकतेने वास्तवाबद्दलच्या नव्या जाणिवांचे काही अंशी समाधान करणेही साधे. भावी काळातील वास्तववादी सामाजिक नाटकांची बीजे या फार्समध्येच आहेत. हे फार्स विनोदालाही नवे वळण लावू शकले. एकंदरीने मराठी नाट्यवाङ्मयाच्या निर्मितीचे बरेचसे श्रेय इंग्रजी राजवटीकडेच जाते. ब्रिटिश राजवटीपूर्वी निर्माण झालेल्या तंजावर येथील मराठी नाटकांची इकडे माहिती नव्हती कन्नड रंगभूमीचा काही-एक संस्कार विष्णुदासांच्या नाट्यावर झालेला आहे हे मान्य केले, तरी इंग्रजी नाटकांचे होणारे प्रयोग, विद्यापीठाची स्थापना, संस्कृत नाटकांचे अनुवाद, इंग्रजी नाट्यकृतींशी परिचय व मुख्य म्हणजे नाट्यगृहांची निर्मिती यांमुळेच मराठी रंगभूमी उत्कर्ष पावू शकली. रंगभूमीच्या अभावीच मध्यंतरीच्या काळात मराठीत नाटके निर्माण होऊ शकली नव्हती.[1] मुंबई प्रांतात पहिले नाट्यगृह बांधले गेले, ते १८४२-मध्ये मुंबईस ग्रँट रोड येथे. विष्णुदासांचे नाट्य सांगलीस उभे राहिले, ते १८४३-मध्ये. विष्णुदासांच्या पावलावर पाऊल टाकून १८४९ – ५०-मध्ये 'इचलकरंजीकर नाटकमंडळी'ची स्थापन झाली. विष्णुदास भावे यांनीही १८५१-पासून ठिकठिकाणी दौरे काढण्यास प्रारंभ केला. १८५३-मध्ये ग्रँट रोड बॉंबे थिएटर येथे इंग्लिश फार्सचे प्रयोग होऊ लागले. १८५६-मध्ये पहिला मराठी फार्स रंगभूमीवर आला. या फार्समधूनच पुढे सामाजिक नाटक उमलले. संगीत नाटकांचा प्रारंभ १८७९-मध्ये त्रिलोकेकरांच्या 'नलदमयंती' या नाटकाने झाला.

1. "There were not any original ancient dramatic works in the language for the simple reason that the stage, as a means of popular education and amusement, had no place in the past history of Maharashtra."

Miscellaneous Writings, Justice Ranade, Page 38.

## प्रस्तुत कालखंडाची वाङ्मयीन वैशिष्टये

कविता, कादंबरी व नाटक या तीन प्रमुख ललितवाङ्मयप्रकारांचे इंग्रजी राजवटीच्या पहिल्या सत्तर-ऐंशी वर्षांच्या पूर्वकाळातील स्वरूप याप्रमाणे आहे. इंग्रजपूर्व वाङ्मयाचा एकूण भाग पद्यप्रधान असल्याने इंग्रजी राजवटीत पद्यलेखनात खंड पडण्याचे कारण नव्हते. विषयदृष्ट्या मात्र काव्यात बदल झालेला दिसतो. हा बदल गद्यलेखनाइतका डोळ्यांत भरणारा नाही. कारण इंग्रजी राजवटीचे आगमन गद्याला जितके प्रेरक झाले, तितके काव्याला झाले नाही. पद्याच्या मानाने पुष्कळच अधिक गद्य या काळात निर्माण झाले. कोणता लेखनप्रकार केव्हा बहराला येईल, याबद्दल काही निश्चित नियम सांगता येत नसला, तरी प्रत्येक कालखंडात स्थूल मानाने काही वृत्ती स्थिर होऊन महत्त्व पावतात आणि वाङ्मयनिर्मितीवर त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिणाम होतो. या दृष्टीने पाहता इंग्रजी राजवटीचा काळ भावनेपेक्षा बुद्धीवर, संश्लेषणापेक्षा विश्लेषणावर आणि आध्यात्मिक चर्चेपेक्षा भौतिक घडामोडींवर भर देणारा ठरला. उपयुक्त ज्ञानाचा प्रसार हे या काळाचे ब्रीद होते; आणि यामुळेच इतिहास, भूगोल, विज्ञान, ऐहिक सुखाची महती, सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीचा विचार इत्यादी गोष्टींना या काळात विशेष महत्त्व आले; आणि याला प्रेरक होईल, असेच वाङ्मय प्राधान्याने निर्माण झाले, आणि निबंध, शास्त्र, चरित्र, स्थळवर्णने इत्यादी गद्यवाङ्मयाच्या शाखा पल्लवित झाल्या. या कालखंडातील लोकांना गद्याची पायाभरणी करण्यासाठी दीर्घकाल खटपट करावी लागली. कोश व व्याकरण यांसारख्या भाषेच्या प्राथमिक गरजा भागविण्यासाठी कराव्या लागणाऱ्या धडपडीचे वर्णन मोल्स्वर्थ व दादोबा यांनी अनुक्रमे आपल्या कोशाच्या व व्याकरणाच्या प्रस्तावनांत केले आहे. ग्रंथ पाहणे, लोकांच्या तोंडून शब्द ऐकून त्याचा अर्थ पडताळणे, अर्थान्तरातील गोंधळ काढणे, शब्दांची रूपे ठरविणे अशा प्रकारचे गुंतागुंतीचे, किचकट व जबाबदारीचे काम प्रतिकूल वातावरणात सातत्याने कोशलेखकांनी केले.[१]

व्याकरणाच्या संदर्भात दादोबा पांडुरंग सांगतात की, "ही मराठी आजपर्यंत नियमांत नव्हती, म्हणून हिचे प्रकारहि फार आढळतात...आजपावेतो तिला नियमांत आणण्याविषयीं कोणी प्रयत्नच केला नाहीं, म्हणोन अत्यंत विस्कळित झालेली व व्याकरणरूप फणीने जिला कोणीं विंचरलेच नाही, म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून

1. Our work then, was to reduce a boundless chaos; to collect words from every writing and from every tongue, to admit or reject without fixed or generally satisfactory grounds, for determination, to ascertain significations from the very mouths of the people, and to seize phrases and forms of speech from passengers upon the road, or from boys playing or squabbling in the street.

मोल्स्वर्थच्या मराठी-इंग्रजी कोशाची प्रस्तावना ( १८३१ ).

फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी भाषा, तिला कांहीं तरी नियमांत आणावी आणि दीर्घकालग्रंथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर कांहीं सोडवून कांहींतरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी म्हणून व्याकरण-रचनेचा खटाटोप केला." [1] भाषेला मध्यवर्ती वळण देता-देता शास्त्रीय, ज्ञानदानाला योग्य अशी पाठ्यपुस्तके नव्हती, ती या काळात तयार करून घ्यावी लागली, त्यासाठी भाषांतराचा उद्योग हाती घ्यावा लागला. परिभाषेच्या बिकट प्रश्नाला, लोकांच्या अनास्थेला, अवहेलनेला तोंड द्यावे लागले, लोकांत वाचनाची गोडी निर्माण करण्यासाठी आवर्जून प्रयत्न करावा लागला. ग्रंथकारांना बक्षिसाचे आमिष दाखवून त्यांच्याकडून हवे त्या प्रकारचे हुकुमी ग्रंथलेखन करून घ्यावे लागले. हे कार्य प्रचंड कष्टाचे व खर्चाचे होते. याला संघटित व पद्धतशीर प्रयत्नांची गरज होती. सरकारच्या सूत्रबद्ध प्रयत्नांशिवाय हे होणे अशक्य होते. हे साहाय्य इंग्रजी राजवटीच्या प्रारंभी राज्यकर्त्यांनी दिले व मराठी गद्याची पायाभरणी केली. ज्ञानकेंद्रे व ज्ञानवितरण यांसाठी सर्वांना उपलब्ध झालेल्या सोयी हे या कालखंडाचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणता येईल. या सोयींमुळे नवी ज्ञानदृष्टी व जिज्ञासा निर्माण झाली. या दृष्टीच्या जोरावर झालेली नवी धार्मिक, सामाजिक जागृती व तीतून निर्माण झालेली नवी मूल्ये हे या कालखंडाचे आणखी एक वैशिष्ट्य होय. विचारांची देवाणघेवाण करण्यास लागणारी राजकीय शांतता व व्यवस्था येथे ब्रिटिश राजवटीने प्रथमतः निर्माण केली. एकच्छत्री राजवट व एकाच प्रकारचे काही प्रमाणात लागू होणारे कायदेकानू, दळणवळणाची जलद साधने, परस्परांतील विचारविनिमयाची संधी या अनुषंगाने भारतातील निरनिराळे वर्ग व समूह प्रथमच एकत्र आले आणि त्यांच्या मनात एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेचे बीजारोपण झाले. ही या कालखंडातील प्रक्रियाही फार महत्त्वाची आहे. यामुळे लोकशाही, राजकीय हक्क, कायदेशीर चळवळ, संघटना इत्यादींच्या विचारांना अग्रस्थान प्राप्त झाले. खिस्ती चळवळीमुळे काही नवीन सामाजिक मूल्ये नव्याने येथे आली होतीच; पण खिस्ती धर्माची लाट थोपवून धरण्यासाठी जुनी शास्त्रवचने व साहित्य यांचे नव्याने मंथन झाल्याने प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासालाही याच कालखंडाने नव्याने चालना दिली. नव्या-जुन्याचा परिचय, अनुकरण, दृढीकरण, समन्वय, संघर्ष इत्यादी क्रियांना व तदनुषंगिक विचारांना याच कालात बहर आला. मुद्रणालये, वृत्तपत्रे इत्यादींच्या निर्मितीमुळे विचारांच्या प्रचारप्रसाराची नवी साधने प्राप्त झाली. नव्या आकांक्षा जाग्या झाल्या; जुनी चौकट मोडली.

या साऱ्या धुमश्चक्रीत साहित्याच्या सौंदर्यात्मक अंगाकडे लक्ष जाणे कठीण होते. उपयुक्ततेच्या महतीमुळे ललितवाङ्मयाचा वापरही बोध व प्रचार यांसाठीच मुख्यतः करण्यात येऊ लागला. रंजनाबरोबरच भाषेचा परिचय घडविणे व वाचनाची

१. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (द्वितीयावृत्ती), उतारे, पृ. ४३.

अभिरुची निर्माण करणे हेही ललितवाङ्मयाचे प्रयोजन होऊ लागले. कादंबरीच्या रूपाने काही स्वप्नरंजनात्मक साहित्य निर्माण झाले खरे; पण त्याचबरोबर निबंध, चरित्रे इत्यादी काही नव्या पाश्चात्त्य वाङ्मय-प्रकारांचाही येथे परिचय झाला. स्तिमितावस्थेत व मध्ययुगीन स्थितीत असलेल्या या खंडप्राय वैचित्र्यपूर्ण देशाला नव्या विचारमूल्यांची ओळख करून देऊन आधुनिक विज्ञानयुगाच्या कक्षेत आणणे ही ब्रिटिश राजवटीची प्रमुख कामगिरी, आणि याही कामगिरीला राज्याकर्त्यांच्या मतलबामुळे व परकीयत्वामुळे मर्यादा पडलेल्या. या कालखंडात झालेली वाङ्मयीन प्रगती पाहताना या गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात. युरोपमध्ये जे प्रबोधन ( Renaissance ) अवतीर्ण झाले, त्याची तोंडओळख इंग्रजी राजवटीने भारतीयांना करून दिली व एका नवविचारचक्राचे प्रवर्तन केले. या चक्राच्या गतीत अनेक चढउतार झाले. या साऱ्याच चढउतारांत वेग व दिशा यांचे नियंत्रण राज्यकर्त्यांच्याच हाती दीर्घकाल राहिले. जनतेने ते स्वतःच्या हाती घेण्याचा थोडाफार प्रयत्न या कालखंडाच्या उतरार्धात केला. कालांतराने सरकार व जनता यांतील सहकार्य कमी होऊन उभयताच्या हितसंबंधांतील विरोध वाढत चालला. मराठी वाङ्मयाच्या उत्तेजनाचे पूर्वार्धातील प्रयत्न पुढे संपुष्टात आले आणि राज्यकर्त्यांचे एकंदर धोरणही बदलले. जनतेला वाङ्मयाभिवृद्धीचे कार्य पुढे जसे जमेल तसे स्वतःच करावे लागले. त्याचा विचार हा पुढील कालखंडाचा असला, तरी याचे प्रवर्तन झाले, ते याच कालखंडात. किंबहुना, साऱ्याच आधुनिक मराठी वाङ्मयाचे उगमस्थान याच कालखंडात आहे. या कालखंडातील वाङ्मयाचा साकल्याने विचार करिता त्याच्या विकासास मिळालेल्या अवधीचे अल्पत्वही लक्षात येते.

## गुणवत्तेपेक्षा अपेक्षानिर्मितीस महत्त्व

१८०० ते १८७४ या पाऊणशे वर्षांच्या कालखंडाचे स्थूल मानाने तीन टप्पे कल्पिल्यास पहिली पंचवीस वर्षे जुन्याच जमान्यात जमा होतात. दुसऱ्या पंचवीस वर्षांचा काळ हा सरकारी प्रेरणेने केल्या गेलेल्या प्रयत्नांचा मुख्य काल. यानंतरच्या उरलेल्या पंचवीस वर्षांत जो भाग येतो, तो स्वावलंबनात्मक प्रयत्नांचा. अगदी वेगळ्या दिशेने प्रयत्न सुरू होऊन ते मूळ धरू लागण्याच्या दृष्टीने हा साराच कालखंड कसा अपुरा आहे, याची यावरून कल्पना येते; म्हणूनच या कालखंडाचा विचार करिताना, न्या. रानडे यांच्या मताप्रमाणे, हा कालखंड गुणवत्तेच्या दृष्टीने तेवढा समाधानकारक वाटत नाही. तथापि याच कालखंडात प्रांतातील इतर भाषांच्या तुलनेने मराठी भाषेने केलेली प्रगती विस्मयावह असल्याचा आणि अपेक्षापूर्तीपेक्षा अपेक्षानिर्मितीच्या दृष्टीनेच हा कालखंड महत्त्वाचा असल्याचा जो निष्कर्ष न्या. रानडे यांनी काढिला आहे, त्यात या कालखंडाचे सारे मर्म अचूकपणे साठविलेले आहे —

"अगदी निरपेक्षपणे पाहिल्यास ( या कालखंडातील ) वाङ्मयाचे हे एकंदर चित्र हे मुळीच समाधानकारक नाही, हे खरे. आजची मराठीची प्रगती ही तिजमुळे

भविष्यकालाबद्दल निर्माण होणाऱ्या आशेमुळेच स्वागतार्ह म्हणावी लागते; आतापर्यंत झालेल्या कामगिरीमुळे नव्हे. आपल्या इलाख्यातील इतर भाषाभगिनींचे याविषयीचे सापेक्ष दारिद्र्य लक्षात घेतले, म्हणजेच इतक्या अल्प कालावधीत आपण इतकी मजल गाठली, याचे नवल वाटते." [१]

1. "It is true that the entire picture thus presented to the view is far from satisfactory if one looks at it absolutely. The stage of advance which the language has at present reached is to be hailed more for the promise it holds out for the future than for any accomplished success of the past. It is only when we look at the short interval that we feel surprised at the amount of work that has already been done, especially when the comparative poverty of the sister languages of the presidency is taken into account."

Micsellaneous Writings, Justice Ranade, Page 11.

## प्रकरण तिसरे

# भाषिक वाङ्मय

### कोश आणि व्याकरणग्रंथ

प्राचीन मराठी वाङ्मयनिर्मात्यांनी आपल्या भाषेविषयीचा अभिमान अनेक ठिकाणी व्यक्त करून ठेविलेला आपल्यास पहावयास मिळतो. ज्ञानदेव, एकनाथ, दासोपंत, मोरोपंत इत्यादी कवींचे एतद्विषयक उद्गार मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांस परिचित आहेत. संस्कृत पंडितांच्या मराठीविषयक प्रतिकूल वृत्तीला प्रतिक्रिया म्हणून हा अभिमान प्रकट झालेला होता. त्याचा अर्थ मराठीचा भाषिक दृष्टीने अभ्यास करण्याची पद्धती आपल्यामध्ये रूढ होती, असा घेता येणार नाही. तसे असते, तर मराठीमध्ये कोश आणि व्याकरण या स्वरूपाचे ग्रंथ निर्माण झालेले आपल्यास पहावयास मिळाले असते. कारण या स्वरूपाच्या ग्रंथांची भाषेच्या खऱ्या अभ्यासास अपरिहार्य अशी आवश्यकता असते. किंबहुना, कोणत्याही भाषेचा अभ्यास एका हातात तिचा शब्दकोश आणि दुसऱ्या हातात तिचे व्याकरण असल्यावाचून नीटपणे करिताच येणार नाही. आपल्याकडे पूर्वीच्या काळी संस्कृताचा अभ्यास अमरकोश आणि रूपावली यांच्या पठनाने सुरू होई, याचे कारण तरी हेच होते. तथापि हे सारे एखाद्या परकीय भाषेच्या अभ्यासास जेवढे आवश्यक आहे, तेवढे स्वभाषेच्या किंवा वाङ्मयाच्या ज्ञानास आवश्यक नाही. कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या मराठी व्याकरणावरील निबंधात हाच विचार सांगितला आहे. ते म्हणतात, "ज्याची जी जन्मभाषा नाहीं, त्यास ती येण्यास तिच्या व्याकरणाचा जसा उपयोग होतो, तसा तो ज्याची ती जन्मभाषा आहे, त्यास पडत नाहीं. मराठी लोकांस संस्कृत व इंग्रजी वगैरे भाषा येण्यास त्या त्या भाषांच्या व्याकरणाचें ज्ञान

जसें आवश्यक आहे, तसे त्यांस मराठी भाषा येण्यास तिच्या व्याकरणाचे ज्ञान आवश्यक आहे असे म्हणता येत नाहीं." सामान्यतः स्वभाषेचे ज्ञान ती भाषा बोलणारा आपल्या दैनंदिन व्यवहारावरून किंवा तीमध्ये निर्माण झालेल्या वाङ्मयाच्या वाचनाने करून घेऊ शकतो. त्याकरिता कोशव्याकरणांचा उपयोग तो क्वचितच करितो. म्हणून संस्कृत शिकण्याकरिता मराठी वाङ्मयनिर्मात्यांनी संस्कृतामधील कोशव्याकरणस्वरूपाच्या ग्रंथांचे अध्ययन बहुधा केले असले, तरी मराठीच्या ज्ञानाकरिता अशा ग्रंथांची जरुरी त्यांना भासली नसावी. त्यामुळे या स्वरूपाच्या ग्रंथांचा मराठीमध्ये जवळजवळ अभावच होता, असे अजूनही आपल्यास म्हणावे लागते. याला अपवाद म्हणून काही ग्रंथांचा उल्लेख करिता येईल; नाही असे नाही. परंतु एकंदरीत याबाबतचे आपले दारिद्य्र अमान्य करण्यात अर्थ नाही. प्राचीन मराठीमधील महानुभाव वाङ्मयातील टीप-ग्रंथ हे मराठी भाषेचे कोश होऊ शकत नाहीत. त्यांत आलेले प्रतिशब्द म्हणजे त्या-त्या ग्रंथावरील अर्थनिर्णायक टीपा होत. 'विवेकसिंधू' आणि 'ज्ञानदेवी' यांचेही या स्वरूपाचे काही कोश झाले; परतु विशिष्टग्रंथनिरपेक्ष असा समग्र भाषेचा कोश असे स्वरूप त्यांना अर्थात नव्हते. अलीकडेच प्रकाशित झालेला तंजावर येथील रामकविकृत 'भाषाप्रकाश' हा संस्कृत अमरकोशाच्या धर्तीवरील ग्रंथ मात्र कोश मानिता येईल. व्याकरणविषयक ग्रंथांत महानुभाव पंडित भीष्माचार्य यांच्या 'नामविभक्ति' आणि 'पंचवार्तिक' या ग्रंथांशिवाय इतरांची पुरेशी माहिती नाही. सारांश, प्राचीन मराठीमध्ये भाषेच्या कोश आणि व्याकरण या दोन अंगांविषयी फारच तुटपुंजा असा विचार झाला होता, ही ही गोष्ट स्पष्ट आहे.

## एक

यामुळे जेव्हा परकीयांना मराठी शिकण्याची आवश्यकता वाटली, तेव्हा त्यांच्याकडूनच मराठी भाषेचा शब्दकोश आणि तिचे व्याकरण यांविषयी खटपट सुरू झाल्याचे दिसते. परकीयांना मराठी शिकण्याची आवश्यकता दोन कारणांनी वाटू लागली. पहिले कारण धर्मप्रसाराचे होय. त्याकरिता मराठीचा अभ्यास करून फादर स्टीफन्सने ख्रिस्तपुराण लिहिले. त्यात आरंभी त्याने मराठी भाषेचा मोठा गौरव केला. त्यानेच आपल्या मागून; येणाऱ्या धर्मप्रचारकांना उपयोग व्हावा, म्हणून सासष्टी भागातील बोलीचे व्याकरणही लिहिले. त्यानंतर म्हणजे सतराव्या आणि अठराव्या शतकांत निरनिराळ्या नावांनी या कोकणी बोलीची आणखी काही व्याकरणे लिहिली गेली. एकोणिसाव्या शतकात झालेला मराठीचा सुप्रसिद्ध मोल्सवर्थ-कोश हाही ख्रिस्ती धर्मप्रसाराचा हेतू मनात ठेवून रचिला गेला, असे कोशसंपादकाच्या स्वतःच्या निवेदनावरून स्पष्टपणे कळून येते. कोशकार म्हणतो, "It was undertaken from a desire to promote the propagation of the glorious Gospel and it has been continued by the energy of this desire...."

आरंभी डोळ्यांपुढे असलेला हा उद्देश कालांतराने तितक्या स्पष्टपणे उभा नसावा. त्यापेक्षा वेगळा असा आणखीही एक उद्देश दिसतो. तो म्हणजे इंग्रज राज्यकर्त्यांना राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टीने मराठी प्रजेची भाषा अवगत असणे आवश्यक वाटत असावे. त्याचबरोबर कारभार चालविण्याकरिता एतद्देशीय नोकरवर्गही त्यांना तयार करावयाचा होता. त्याकरिता प्रथमतः मराठी-इंग्रजी व नंतर इंग्रजी-मराठी अशा द्विविध कोशाची गरज त्यांना वाटली. (मराठीमधील पहिले महत्त्वाचे कोशरचनेचे प्रयत्न परकीय राज्यकर्त्यांच्या सक्रिय उत्तेजनाने, किंबहुना प्रेरणेने झाले, असे म्हणावे लागते.) मोल्सवर्थ आणि कँडी या दोन साहेबांनी संपादिलेल्या कोशांमध्ये त्यांनी एतद्देशीय पंडितांचे भरपूर साहाय्य घेतले; किंबहुना, मुख्य परिश्रम त्यांचेच होते. याउलट केवळ एतद्देशीय पंडितांच्या नावाने प्रसिद्ध झालेल्या पंडिती कोशाच्या रचनेमध्ये या साहेबांचे त्यांना संपादनदृष्ट्या साहाय्य होते. परस्परांच्या सहकार्याने तयार झालेल्या या कोशांचे स्वरूप प्रगत अशा पाश्चात्त्य कोशकल्पनांना धरून झाल्याने हे कोश प्रारंभीचे असूनही त्यांचे स्वरूप भरीव आणि शास्त्रशुद्धतेस धरून उतरले. पुढील जवळजवळ शंभर वर्षे हे कोश अधिकृत आणि आधारभूत असे राहिले. याची कारणे त्यांस मिळालेले योग्य संपादकीय मार्गदर्शन आणि त्यात खर्ची पडलेले मराठी पंडितांचे ज्ञान आणि परिश्रम ही होत. त्यांची कल्पना येण्याच्या दृष्टीने या दोन कोशांच्या निर्मितीविषयी अधिक माहिती करून घेणे इष्ट ठरेल.

## आरंभीचे मराठी कोश

गुणदृष्ट्या हे कोश आद्यस्थानी जाऊन बसण्यासारखे असले, तरी कालदृष्ट्या त्यांच्या आधी झालेल्या एकदोन कोशांचा उल्लेख करणे योग्य होईल. यापैकी पहिला इ. स. १८१० या वर्षी बंगालमध्ये सेरामपूर ( Serampore ) येथील खिस्ती मिशनरी मंडळाकरिता डॉ. वुइल्यम केरी ( William Carey ) याने छापून प्रसिद्ध केला. हिंदुस्थानातील युरोपीय लोकांना मराठी भाषा शिकावयाला मदत व्हावी, म्हणून हा रचिला गेला. साहजिकच त्याचे स्वरूप मराठी-इंग्रजी असे द्वैभाषिक कोशाचे झाले आहे. हा कोश पंडित विद्यानाथ ( वैजनाथ शर्मा ) यांच्या मदतीने तयार केल्याचे प्रस्तावनेत नमूद केले आहे. हा कलकत्त्याच्या फोर्ट वुइल्यम कॉलेजमधील मराठीचा प्रमुख पंडित ( The Chief Maratha Pundit ) होता, असेही त्याच्याविषयी सांगितले आहे. मराठी शब्द मोडी ठसे करून छापले असून कोशाची पृष्ठसंख्या ६५२ इतकी आहे. मराठी शब्दाला इंग्रजी प्रतिशब्द देण्याची दृष्टी यात ठेविलेली दिसते. त्या शब्दाविषयीची इतर व्याकरणिक, भाषाशास्त्रीय किंवा वाङ्मयीन माहिती त्यात नाही. दुसरा कोश ले. क. व्हान्स केनेडी ( Vans Kennedy ) या नावाच्या लष्करातील एका साहेबाने मुंबई येथे इ. स. १८२४-मध्ये प्रसिद्ध केला. या कोशाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागात मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द देऊन दुसऱ्या भागात इंग्रजी शब्दांचे मराठी अर्थ दिलेले आहेत. शब्दसंख्या ८०००-पर्यंत आहे.

" एका ' Intelligent ' ब्राह्मणाने अमरकोश मराठीत उतरून दिला व मिस्तर अर्स्किन् या विद्वानाने तयार करविलेले दोन इंग्रजी-मराठी हस्तलिखित कोश व कॅप्टन कॉक याजवळील हिंदुस्थानी मराठी हस्तलिखित कोश त्यास मिळाले. त्यांचे त्यास फार साहाय्य होऊन त्याने ही ग्रंथसिद्धी केली. "[1] हे दोन्ही कोश युरोपियन लोकांस मराठी शिकण्यास साहाय्य व्हावे, या दृष्टीने तयार झालेले असल्याने त्यांना शुद्ध मराठी कोशाचे स्वरूप अर्थातच आले नाही.

## महाराष्ट्रभाषेचा कोश

याच सुमारास म्हणजे १८२५ च्या आगेमागे प्रारंभ होऊन, अनेक पंडितांचे साहाय्य घेऊन, मोठ्या प्रमाणावर शब्दसंग्रह करून कोशाविषयीच्या आधुनिक अपेक्षा लक्षात घेऊन जो एक मराठी-मराठी कोश १८२९ साली प्रसिद्ध करण्यात आला, तोच खरे म्हटले तर मराठीचा पहिला कोश होय. या कोशास 'पंडिती कोश' असे जरी म्हणण्यात आले असले, तरी त्याचे मूळ नाव ' महाराष्ट्र भाषेचा कोश ' हे आहे. प्रस्तावनेमध्ये " बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले यांचे हातून करावयास आरभिला " असा निर्देश असला, तरी " मलपृष्ठावर जगन्नाथशास्त्री क्रमवंत व रामचंद्रशास्त्री जन्हवेकर ही दोन नावे पंडितमंडळात अधिक दाखल " झालेली दिसतात [1] संपादक म्हणून जगन्नाथशास्त्री क्रमवंत याचे नाव पुढे केलेले दिसते. तथापि कोशरचनेमध्ये हे सर्व पंडित मोल्सवर्थ आणि कँडी या साहेबांच्या मार्गदर्शनानेच काम करीत होते. स्वतः मोल्सवर्थसाहेब आपल्या मराठी-इंग्रजी कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत या गोष्टीचा स्पष्टपणे उल्लेख करीत आहेत. तो असा —

From the notice in the text—which...... has been before the public twenty and six years it appears that the title page (prepared by the Secretary, B. N. E. S.) to our Marathi Kosh or Marathi Dictionary in the Marathi Language erroneously says, " Compiled by Pandits in the service of the Bombay Native Education Society. " This Kosh or Dictionary was compiled, from the first word to the last, in our own house, **under the never-intermitted direction and management of our own selves**, and by three Pandits of the B. N. E. S. in conjunction with our own Pandits. The two dictionaries were simultaneously compiled [2]

हा पंडिती कोश पुढे फारसा प्रचारात राहिला नाही, अशी तक्रार दादोबा पांडुरंग आपल्या आत्मचरित्रात करितात. ते म्हणतात — " मोल्सवर्थ आणि कॅंडी यांच्या

१. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ( द्वितीय आवृत्ती ), पृ ३६.

२. मोल्सवर्थ याच्या मराठी-इंग्रजी कोशाची दुसरी आवृत्ती, पृ. २१.

हाताखालीं जे पंडित होते, त्यांनी **दोन मोठ्या** पुस्तकांत मराठी कोश तयार केला आणि तो सुंदर शिळाछापावर छापिला. त्यावरून त्या साहेबांनीं इंग्लिशांत मराठी कोश तयार केला तो प्रसिद्ध आहेच. **परंतु पंडितांचा** कोश कोठे दिसेनासा झाला!" (पृ. ५४) दादोबा पुढे म्हणतात — "हें मोठें अद्भुत कृत्य मराठी भाषेंत त्या वेळेस झालें! परंतु अशा कृत्याचे गुणग्राहक पुढे कोणी झालेच नाहींत."

## पंडिती कोश

या कोशाच्या प्रस्तावनेत काही गोष्टी सांगितल्या आहेत, त्या लक्षात घेण्याजोग्या आहेत. पहिली अशी की, या कोशरचनेची मूळ प्रेरणा एल्फिन्स्टनसाहेबांकडून मिळाली. 'आजपर्यंत या भाषेवर कोशव्याकरण करायास कोणी प्रवृत्त झाला नाही, हें मनांत आणून, सर्व लोकांचे कल्याणार्थ राजकार्यधुरंधर प्रजापालनैकरत हानरबल मौंट स्त्युवर्त एलफिन्स्तन साहेब पात्रण ( Patron ) आणि गवरनर यांणी मुंबइंतील शिक्षाशाळामंडळीस आज्ञा' केली होती. हा प्रयत्न सर जॉन माल्कम हे गव्हर्नर असताना शेवटास गेला. दुसरी गोष्ट अशी: 'महाराष्ट्रभाषा म्हणजे महाराष्ट्रदेशीं राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलायची प्राकृत भाषा' असे आपल्या डोळ्यांपुढे असलेल्या भाषेचे वर्णन त्यांनी केले आहे. तिसरी गोष्ट अशी की, या भाषेचे प्रमाणरूप या पंडितांनी 'पुणें प्रांती'च्या भाषेचे रूप धरिले होते. ते म्हणतात — "देशभाषांचा वर्तनाचा असा नियम आहे कीं, स्वदेशाचे मध्यभागीं शुद्धस्वरूपाने असावें आणि उत्तरोत्तर पर्यन्तभागीं तत्तद्देशांतरस्थ भाषांचे मिश्रणाने संकीर्ण रूपानें असावें. महाराष्ट्रदेशाचा मध्यभाग म्हटला असतां प्रायः पुणे प्रांत होतो. अतएव पुणें प्रांतीं जे शब्द प्रसिद्ध आहेत ते प्रायः सर्व महाराष्ट्रदेशभर प्रसिद्ध असे समजून ते शब्द प्रांतांचे खुणेवांचून लिहिले आहेत". बाकीचे प्रांतिक शब्द जे घेतले आहेत, त्या प्रांतांची नावे व मर्यादा कोशकारांनी स्पष्ट केल्या आहेत. देश (गंगथडी धरून पंढरपूरच्या आसपासचा प्रदेश, कोकण (मुंबईपासून बाणकोटच्या खाडीपर्यंत), राजापूर (बाणकोटच्या खाडीपासून मालवणपर्यंत) आणि वाडी (सावंतवाडीच्या आसपासचा प्रांत) हे ते चार विभाग असून यापलीकडील विभाग लक्षात घेतलेले दिसत नाहीत.

## पंडिती कोशाचे स्वरूप

हा कोश काही प्राचीन मराठी कोशांप्रमाणे काही ग्रंथांपुरता नियत नसून समग्र भाषेतील शब्दांचा संग्रह म्हणून कल्पिला आहे. शब्दांची मांडणी अमरकोशा-प्रमाणे निरनिराळे वर्ग डोळ्यांपुढे ठेवून न करिता अक्षरानुपूर्वीप्रमाणे केली आहे. 'अ'मध्येच 'अं'चा समावेश संस्कृताप्रमाणे केला आहे; पण क्ष, ज्ञ ही जोडाक्षरे असूनही लोकव्यवहारानुसार पृथक वर्ण मानून त्या क्रमाने लिहिले ते आहेत. संस्कृत शब्दांत ह्, ह्व, ह्म, ही अक्षरे हकार प्रथम वर्ण मानून आणि प्राकृत शब्दांत ह्-कार नंतर येतो, असे धरून त्याप्रमाणे शब्दक्रम घेतला आहे. शब्द व्यवहारापेक्षा

ग्रंथामधून घेतलेला असेल, तर 'ग्रं' या संक्षेपाने तसा दाखविला गेला असला, तरी ग्रंथांची नावे उल्लेखिली नाहीत, किंवा त्यांतून अवतरणेही दिली नाहीत. व्यवहारात क्वचित येणाऱ्या संस्कृत शब्दांचा समावेश कोशात केलेला नाही. फारसी, अरबी वगैरे मुसलमानी भाषांतील शब्दावर कोशकारांचा विशेष कटाक्ष आहे. त्यांच्या मताने हे मराठी भाषेत "राजकीय व्यवहाराचे अनुरोधानें आले. म्हणून राजकीय व्यवहारींच शोभतात. इतर साधारण व्यवहारीं सरासरी ते बरे दिसतात. परंतु शास्त्रीय व्यवहारादीसंबंधीं प्रौढ म्हणून जी भाषा तींत तर अगदीच शोभत नाहींत. याकरितां प्रौढ भाषेंत ते शब्द घेऊं नयेत." कोकणी, राजापुरी, वाडी अशा तीन पोटभाषा, वनस्पती, प्राणी, खाद्य वगैरेंचे थोडे-थोडे शब्द यात आले आहेत काही संतकवींच्या काव्यांतील शब्द तुरळक आढळतात. शब्दांची व्युत्पत्ती दहाबारा स्थळे सोडता मुळीच दिली नाही. ऐतिहासिक शब्द नाहीत. इंग्रजी शब्द तेव्हा रूढ नसल्यानें आलेले नाहीत. "शब्दाचे अर्थ व्याख्यारूपाने पंडिती भाषेत दिले असल्याकारणाने क्लिष्ट व बोजड झाले आहेत."[1]

या साऱ्या उणिवा लक्षात घेऊनही या कोशाचे मराठीच्या दृष्टीने फार महत्त्व आहे, यात शंका नाही. अर्वाचीन मराठीच्या प्रारंभकाळातील "सर्वांत मोठा व महत्त्वाचा ग्रंथ. जरुरी, उपयुक्तता व परिश्रम या सर्वांच्या दृष्टीने त्याची सर कोणासही यावयाची नाही. मराठी-मराठी कोश लहानमोठे पाचचार नंतर झाले; परंतु जसा काळाने वडील, तसा अधिकारानेही वडील असलेला हा पंडिती कोशच सर्वांहून श्रेष्ठ ठरेल."[2] इ. स. १८३१-मध्ये जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांच्या संपादकत्वाने या कोशाची एक पुरवणी प्रसिद्ध करण्यात आली. पहिल्या दोन भागांत न आलेले शब्दच अर्थात या पुरवणीमध्ये दिले आहेत.

### मोल्स्वर्थ कोश

या पंडिती कोशाबरोबरच तयार होणारा मोल्स्वर्थ-कँडी यांचा मराठी-इंग्रजी शब्दकोश इ. स. १८३१-मध्येच प्रकाशित झाला. तो बॉम्बे एज्युकेशन सोसायटी (मुंबई शिक्षामंडळी) यांच्यामार्फत प्रसिद्ध करण्यात आला. या पहिल्या आवृत्तीचे काम करण्यास सहा वर्षे लागली. या कोशास सर्वस्वी सरकारची मदत असल्याने खेड्यापाड्यांतून सरकारी हुकुमाने शब्द जमविण्यात आले. त्यांची संख्या चाळीस हजारपर्यंत आहे. या कोशाची दुसरी आवृत्ती इ. स. १८५७-मध्ये प्रसिद्ध झाली; तीमधील शब्दसंख्या साठ हजारांपर्यंत गेली. दुसऱ्या आवृत्तीमध्ये मुख्य शब्द-संग्रहाची ९२० पृष्ठे आहेत. प्रत्येक पृष्ठ १२″×९ ५″ अशा आकाराचे असून प्रत्येक पृष्ठावर तीनतीन स्तंभांमधून शब्दांची मांडणी केलेली आहे. कोशाच्या मोठ्या

१. महाराष्ट्र शब्दकोश, भाग पहिला, प्रस्तावना, पृ. ३६.
२. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, द. वा. पोतदार, पृ. २४.

आकाराची यावरून कल्पना येण्यासारखी आहे. मराठीत रूढ झालेल्या फारसी, अरबी आणि हिंदुस्थानी शब्दांचा बराचसा संग्रह या कोशाने केला आहे व त्यांचे फारसी लिपीमधील रूपही दिले आहे. यावरून मूळ फारसीचे ज्ञान असणारा इंग्रज हा कोश करिताना डोळ्यांपुढे असावा, असे वाटते. फारसी शब्दांचे भलतेच अर्थ ते शब्द मराठीत रूढ होताना करण्यात येत असल्याची तक्रारही कोशाचे संपादक करितात. शब्द देताना त्यांची व्याकरणातील जाती देऊन त्यांच्या लिंगाचा उल्लेख केलेला आहे. त्यांची व्युत्पत्ती देण्याचा प्रयत्नही शक्य तेथे केला आहे. महत्त्वाचा आणि विशेष रूढ अर्थ प्रथम देऊन इतर अर्थ त्यानंतर देण्यात आले आहेत. कोणत्या भाषेतून शब्द आला, ते दिग्दर्शित करिताना महाराष्ट्राच्या कोणत्या विभागात तो विशेष रूढ आहे, हेही सांकेतिक चिन्हाक्षरांनी दर्शविले आहे. सारांश, आधुनिक कालातील कोशविषयक बऱ्याच अपेक्षा पूर्ण करणारा असा हा कोश आहे. तो मराठी शब्दांविषयीची ही माहिती इंग्रजी भाषेमध्ये देतो. यामुळे केवळ मराठी जाणणाऱ्या वाचकास त्याचा उपयोग नाही, हे स्पष्ट आहे.

**कोशकार्याची पद्धती**

या कोशाचे काम कोणत्या पद्धतीने करण्यात आले, याविषयीचे संपादकांचे निवेदन उद्बोधक आहे. ते म्हणतात, “ मराठी प्रदेश तील वेगवेगळ्या विभागांतून शब्द, वाक्प्रचार आणि म्हणी जमा करण्याकरिता आम्ही काही ब्राह्मणांची योजना केली. त्यांना मिळालेल्या शब्दांमधून द्विरुक्तिस्वरूप, किंवा अपभ्रंशस्वरूप, किंवा इतर काही कारणांमुळे घेण्यास अयोग्य असे शब्द गाळून जवळजवळ पंचवीस हजार शब्द उपलब्ध झाले. यांतील काही शब्द घेऊन आम्हां तिघांपैकी एकजण दररोज इतर सहा-सात-आठ ब्राह्मणांबरोबर चर्चा करी. प्रत्येक शब्दाची व्याकरणातील जाती, व्युत्पत्ती, लिंग, प्राथमिक आणि लाक्षणिक अर्थ, त्यांचा प्रचार, त्यांचे अक्षर-लेखन यांविषयी चर्चा होई. काही अर्थांकरिता उदाहरणवाक्ये तयार करण्यात येत. ज्यांची अधिक चर्चा व्हावी असे वाटे, त्यांच्यावर तशा अर्थाची खूण करीत, आणि त्याबाबत बहुतेक सारा विचार झाला असे वाटेपर्यंत त्यांचा विचार होई. निर्णीत झालेल्या गोष्टी लगेच मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांमध्ये नोंदून ठेवण्यात येत. या शब्दांची नोंद अक्षरविल्हयाने झाली की तद्विषयक सर्व कागद निराळे ठेवण्यात येत. हा एक विभाग झाला. दुसऱ्या विभागात एका निवांत खोलीत आमच्यापैकी दुसरा कोणी एका ब्राह्मणास घेऊन पत्रे, पुस्तके, आणि कागद यांच्यामधून उपयुक्त शब्द, त्यांचा नवीन अर्थ, त्यांची नव्या तऱ्हेची योजना, यांचा निर्णय करण्यास अधिकृत असे आधार हे शोधून काढण्याचे काम करीत असे. त्या इमारतीमधील अधिक एकान्तामधील खोलीत आम्हां तिघांपैकी तिसरा आणखी एका विशेष विद्वान ब्राह्मणास बरोबर घेऊन, जमलेल्या माहितीचे बलाबल पाहून, संक्षेप करून सारे लिहून काढी. हे तिसऱ्या विभागातील काम सर्वाधिक महत्त्वाचे आणि परिश्रमाचे असे.

इकडे पहिल्या विभागातील अधिकारी पुढील अक्षर आणि तद्विषयक कार्य यास प्रारंभ करी. शब्द जमा करणारे मधूनमधून आपले शब्द घेऊन येत. त्यांच्या नवीन शब्दांची पुनः पाहणी व चर्चा होई. झालेल्या कामातील चुका दिसून येत, अधिक नेटके प्रतिशब्द किंवा अर्थलापनिका सुचत, अधिक चांगली उदाहरणे तयार होत, अधिक निर्विवाद असे आधार सापडत. हे होत आहे, तो बिनचूकपणा आणि निर्दोषता या कामामध्ये साधे. या पद्धतीने आमचे काम झाले आणि मूळ २५००० शब्दांची संख्या चाळीस हजारांपर्यंत ( पहिल्या आवृत्तीत ) गेली."[1]

या निवेदनावरून कोशरचनेचे हे काम किती साक्षेपाने, किती पद्धतशीरपणे आणि अनेकांच्या सहकार्याने करण्यात आले, याची कल्पना येईल. कोशाची ही कल्पना आणि त्याच्या रचनेची ही सामूहिक पद्धती या दोन्ही गोष्टी आपल्याकडे पूर्वी अज्ञातच होत्या. या वेळी हे जे कार्य झाले, त्याने कोशरचनेचा भरभक्कम पाया घातला गेला. परंतु या सामूहिक कार्यपद्धतीचा वाङ्मयाच्या इतर क्षेत्रांत फारसा उपयोग पुढे बराच कालपर्यंत आपल्याकडून झाला, असे वाटत नाही. त्यामुळे कोशकार्यामध्येही प्रस्तुत कालखंडात पुढे विशेष काही घडले नाही व १८५७-मध्ये मोल्स्वर्थसाहेबाने दुसरी आवृत्ती काढिल्यानंतर विसाव्या शतकारंभापर्यंत असे आणखी कोशही निघाले नाहीत. या संदर्भात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी काढिलेले उद्गार लक्षात घेण्याजोगे आहेत. ते म्हणतात — "आपल्या मराठी भाषेविषयी पाहिले तरीदेखील तिच्या-संबंधाचे मुख्य अचाट काम म्हणजे कोश, हे इंग्रजांनीच आपणांकरिता करून ठेविले आहेत. या कोशांची योग्यता अज्ञानास्तव व दुरभिमानास्तव आमचे लोक फारशी मानीत नाहीत; पण आमची अशी खात्री आहे की, त्यांनी महाराष्ट्र-भाषेवर जे उपकार करून ठेवले आहेत, त्यास पार नाहीं! ते तयार करिताना शास्त्री लोकांचे साहाय्य पुष्कळ घेतले व दोघां साहेबांस ( मोल्स्वर्थ व कॅंडी) त्या कामाबद्दल सरकाराने मोठे बक्षीसही दिले हे खरे आहे; पण एवढ्यावरूनच नाक मुरडण्यास कारण ते कोणते झाले ?" ( निबंधमाला, अंक २ ).

## एकभाषिक मराठी कोश

कोणत्याही भाषेचा कोश हा मूळ एकभाषिक म्हणजे त्या भाषेतील शब्दांचा अर्थ त्याच भाषेतील प्रतिशब्दांनी वर्णिलेला असा साधारणतः आज अपेक्षितो. तसा एक पंडिती कोश निघाल्यावर आणखी निर्माण होण्याची गरज पुढे तीस-पस्तीस वर्षे तरी आपल्यास वाटली नाही. इ. स. १८६३ साली एका मर्यादित उद्देशाने असा आणखी एक एकभाषिक कोश झाला. त्याचे नाव हंसकोश. हंसःप्रमाणेच काही विवेक करून यात शब्द घेतले आहेत. हा बोलीचा किंवा व्यवहारातील भाषेचा कोश नाही. महाराष्ट्रभाषेतील कवितांमधील निवडक व कठीण शब्दांचा हा कोश प्राचीन मराठी

१. मोल्स्वर्थसाहेबाने आपल्या कोशाच्या इंग्रजी प्रस्तावनेत केलेल्या निवेदनावरून.

काव्याच्या अभ्यासाकरिता रचिला गेला. याला आधारग्रंथ म्हणून ज्ञानदेवी, विवेकसिंधू, अमृतानुभव, एकनाथी भागवत, मुक्तेश्वराचे भारत, दासबोध, रामविजय, शिवलीलामृत, मोरोपंती आर्या आणि वामनी श्लोक इत्यादी ग्रंथ घेतले होते. याची एकूण शब्दसंख्या सात हजार आहे. व्युत्पत्ती न देता शब्दाचे मूळ संस्कृत-प्राकृत-वाचक चिन्हांनी दिले आहे. अवतरणे अत्यंत आवश्यक वाटली तेवढी आहेत. बाकी नुसते स्थलोल्लेख आहेत. याचे कर्ते श्री. रघुनाथ भास्कर गोडबोले हे होत. त्याची छपाई अजूनही शिळाछापाचीच होती.

या गोडबोल्यांनीच १८७० साली 'मराठी भाषेचा नवीन कोश' मुंबई सरकारच्या विद्याखात्याच्या हुकुमावरून छापून प्रसिद्ध केला. विद्यार्थ्यांना उपयोगी पडावा, एवढीच दृष्टी त्यात ठेविली होती. आधार म्हणून शास्त्र्यांचा म्हणजे पंडिती कोशच घेतला होता. "ज्यांचा नेहमीच्या भाषणांत उपयोग नाही, असे फार अवघड जे शास्त्रीय संस्कृत शब्द व ज्यांचा अर्थ सहज मनांत येतो असे साधारण शब्द गाळून" हा कोश केला होता. हंसकोशही यात सामील केला होता. शिवाय, अरबी, फारसी व्यावहारिक शब्द यात दिले आहेत. व्युत्पत्ती, अवतरणे किंवा त्यांचे उल्लेख नाहीत. सारांश, सामान्य वाचकांस आणि विद्यार्थ्यांस उपयुक्त व्हावा, एवढीच दृष्टी ठेवून हा कोश निर्माण झाला. राजवाडे यास 'सुग्रह कोश' म्हणतात. त्यांच्या मनात इंग्रजी 'पॉकेट डिक्शनरी' ही कल्पना असावी.

याहीपेक्षा मर्यादित उद्दिष्ट ठेवून या आधी एकच वर्ष म्हणजे इ. स. १८६९-मध्ये बाळकृष्ण मल्हार बीडकर यांनी आपला रत्नकोश प्रसिद्ध केला. हा केवळ मराठी शाळांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडावा, म्हणून तयार केला असल्याने यात फक्त मराठी क्रमिक सहा पुस्तकांतील शब्दांचा संग्रह केलेला होता. इ. स. १८६०-नंतर एकभाषिक मराठी कोश विशिष्ट वर्गासाठी आणि विशिष्ट मर्यादेचे असे तयार होण्यास प्रारंभ झाला, ही गोष्ट या दोन्हीतिन्ही कोशांवरून स्पष्ट होते.

मराठीच्या एकभाषिक कोशांपेक्षा त्या काळाची गरज मराठी–इंग्रजी किंवा इंग्रजीमराठी अशा द्वैभाषिक कोशांचीच अधिक होती. म्हणून असे कोश साहजिकपणेच अधिक निघाले. मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी कोशानंतर त्याच्या आधारे, परंतु त्याच्या मानाने लहान असा एक मराठी-इंग्रजी कोश बाबा पदमनजी यांनी इ. स. १८६३ साली प्रकाशित केला.[1] या कामास सरकारी साहाय्यही होते. पहिल्या आवृत्तीत सुमारे २९,००० व दुसरीत ३१,००० अशी शब्दसंख्या आहे. यातील शब्दक्रम लक्षात घेण्यासारखा आहे. "एका मुळापासून उत्पन्न झालेले साधित किंवा

१. याची दुसरी आवृत्ती इ. स. १८७५-मध्ये निघाली. पदमनजींच्या या कोशाचे नाव A Compendium of Molesworth's Maharathi and English Dictionary असे आहे.

संयुक्त शब्द एका गुच्छांत गुंफिले आहेत. ही रचना शब्द पाहण्यास अवकाश न लागावा व अडचण न पडावी अशा बेतानें वर्णानुक्रमाला जितकी अनुसरून करवेल तितकी केली आहे. प्रत्येक गुच्छाच्या आरंभीं जो शब्द आहे, तो त्यांतील शब्दांचे मूळ आहे, असे सर्वदा समजूं नये कित्येक शब्द सजातीय, कित्येक एकमेकांचे संबंधी, कांहीं संयुक्त आणि कांहीं मिश्र आहेत. तरी त्या सर्वांचा मूळ धातूच्या योगे संबंध आल्यामुळे त्यांचा एकच गुच्छ बांधावा लागला. या व्यवस्थेनें व्युत्पत्ति शिकणारास थोडाफार लाभ होईल." या कोशाआधी १८५१ साली एच्. ए. कॅनन याने एक 'मराठी-इंग्रजी व्होकॅब्युलरी' या नावाचा लहानसा कोश प्रसिद्ध केला होता. त्यात मराठी शब्दांचे मराठी व इंग्रजी अर्थ दिले आहेत. अमेरिकन मिशन-प्रेसने छापिलेला हा कोश मोल्स्वर्थ व केनेडी यांच्या कोशांच्या आधारे तयार केला होता. त्याची पृष्ठसंख्या १५९ होती.

## कँडीचा इंग्रजी–मराठी कोश

मराठी–इंग्रजी कोशाबरोबरच इंग्रजी–मराठी कोश करण्याची कल्पना मोल्स्वर्थने मनामध्ये बाळगिली होती. त्याप्रमाणे त्या कार्यास त्याने प्रारंभही करून दिला, परंतु तो संपूर्ण करण्याचे काम त्याचा सहकारी कँडी याच्या अंगावर पडले. त्याने ते १८४०-मध्ये पुन्हा सुरू करून १८४७-पर्यंत संपविले. जॉन्सनचा इंग्रजी कोश आधाराला म्हणून घेतला. इंग्रजी शब्दाचे निरनिराळे अर्थ इंग्रजीमध्ये प्रथम देऊन, त्या-त्या अर्थास समानार्थक मराठी शब्द नंतर दिले आहेत. मराठी भाषेतील पुष्कळशा वाक्प्रचाराना आणि बोलीतील शब्दाना समानार्थक वाक्प्रचार आणि शब्द मुळातच आढळत नाहीत. प्रस्तुत कोश मराठी शिकणाऱ्या इंग्रज लोकांकरिता केलेला असल्याने एखाद्या शब्दाशी निगडित असलेल्या वाक्प्रचारांचेही भाषांतर करून या कोशात दिलेले आहे. उदाहरणार्थ, Hand या इंग्रजी शब्दाचे हात, हस्त कर, पाणि, पंचा(जा) असे मराठी समानार्थक शब्द देऊन काव्यात येणारे करपल्लव, हस्तकमल हे शब्दही पुढे दिले आहेत. त्यानंतर Back of the hand, Free of the hand, Gone into the hands of या इंग्रजी शब्दप्रयोगांसही पालथा हात, हाताचा सढळ, हस्तगत यांसारखे प्रतिशब्द दिले आहेत. एवढेच नव्हे, तर मराठी पसा, कुडचा, चुळका, बचक या शब्दांचेही अर्थ इंग्रजीतील हॅंड या शब्दाखाली दिले आहेत. हातोहात Hand over hand, एकपक्षीं on one hand आयता Ready to hand, असे शब्दही त्याच hand या शब्दाच्या खाली आलेले दिसतील. Hand curved as to clutch म्हणजे अर्धचंद्र असाही अर्थ त्या शब्दाच्या कक्षेत येतो. याप्रमाणे इंग्रजी शब्दांचे किंवा तत्संबद्ध वाक्प्रचारांचे मराठी समानार्थक शब्द वा वाक्प्रचार तर दिले आहेतच; पण मराठी वाक्प्रचार लक्षात घेऊन त्यांचे अर्थही इंग्रजीमध्ये देऊन या कोशाची रचना केलेली आहे. त्यामुळे मराठी शिकणाऱ्या इंग्रजी माणसाची पुष्कळच सोय या कोशामुळे झाली आहे.

एकभाषिक कोशापेक्षा या द्वैभाषिक कोशामध्ये रचनादृष्ट्या अधिकच अवधान ठेवावे लागले आहे. या कोशाला आरंभी इंग्रजी आणि मराठी या भाषांमधील समान व असमान अशा निरनिराळ्या विशेषांसंबंधी रे. डॉ. स्टीव्हनसन् यांनी लिहिलेला एक निबंध जोडण्यात आला आहे. मोल्स्वर्थच्या मराठी-इंग्रजी कोशाइतके हे काम प्रचंड नसले, तरी कँडीचा हा कोश हीही मराठी भाषेच्या सेवेच्या दृष्टीने एक मोठीच कामगिरी समजावी लागेल.

या कालातील प्रसिद्ध पंडित बाळशास्त्री जांभेकर यांनी प्रो. ऑर्लिबार यांच्या सहकार्याने एक इंग्रजी-मराठी कोश रचिला होता. तो जवळजवळ पूर्ण होऊनही मुद्रित होऊ शकला नाही, असे दिसते.[1]

## पदमनजींचा इंग्रजी-मराठी कोश

कँडीच्या इंग्रजी–मराठी कोशानंतर आणि बहुधा त्याच्याच आधारे बाबा पद्मनजी यांनीही आपल्या मराठी-इंग्रजी कोशाचे भावंड म्हणून एक इंग्रजी मराठी कोश रचिला. त्याची द्वितीयावृत्ती १८७०-मध्ये निघाली. तिच्या प्रस्तावनेमध्ये संपादकाने पहिल्या आवृत्तीचे जनतेने जे स्वागत केले, त्याबद्दल धन्यतेचे उद्गार काढून त्यामुळे आपल्यास प्रस्तुत आवृत्ती काढण्यास कसा उत्साह आला, त्याचा उल्लेख केला आहे. त्यावरून कोशांची उपयुक्तता आणि गरज लोकांना या काळात बरीच पटली असावी, असे वाटते. हा कोश वेब्स्टर, रीड, क्लार्क, रिचर्ड्सन, कँडी, मोल्स्वर्थ, तळेकर, विल्सन यांचे कोश, तसेच बायबल आणि विविध शास्त्रीय ग्रंथ यांच्या आधारे रचिला असल्याचे त्यांनी सांगितले आहे. दुसरी आवृत्ती तयार करिताना करण्यात आलेले मुख्य फेरफार प्रस्तावनेत संपादकाने उल्लेखिले आहेत. त्यांत मराठी पर्याय देताना कोणती दृष्टी ठेविली होती, ते बाबा पदमनजी यांनी स्पष्ट केले आहे. प्रथम सोपी व्याख्या किंवा सोपा शब्द दिला आहे. नंतर त्याहून कठीण व्यवहारातील संस्कृत शब्द; क्वचित ग्रंथातील उच्च शब्द दिला आहे. मुलांस व ज्यांची स्वभाषा मराठी नव्हे अशा शिकणाऱ्यांस सुलभ पडण्याकरिता पहिली योजना केली आहे, व भाषांतर करणारे व ग्रंथ लिहिणारे यांस प्रसंगी साहाय्य मिळावे, म्हणून दुसरी योजना केली आहे. जेथे मराठी उपशब्द मिळाला नाही, तेथे संस्कृत शब्द घातला व जेथे तोही मिळाला नाही, तेथे हिंदुस्थानी घातला आहे. कोशरचनेमध्ये तात्त्विक दृष्टीपेक्षा व्यावहारिक दृष्टी त्या कालात कशी ठेविलेली असे, याचे हे एक उदाहरण आहे. या कोशाआधी श्रीकृष्ण रघुनाथ तळेकर यांनी सरकारी विद्याखात्याच्या वतीने १८६१-मध्ये एक चारशे पानांचा कोश तयार केला होता. पुढील तीस वर्षांत त्याच्या सात आवृत्त्या निघाल्या, यावरून अशा कोशाची गरज इंग्रजी शिकणाऱ्या जनतेस किती भासू लागली असेल, याची चांगली कल्पना येते. १८६४ साली विष्णू परशुराम

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड २, पृ. ६३१.

पंडित यांनीही सरकारी विद्याखात्याकरिता १६८ पृष्ठांचा एक इंग्रजी-मराठी कोश रचिला होता. तो कोश क्रमिक इंग्रजी पुस्तकांमधील शब्दांपुरता मर्यादित होता.

### संस्कृत-मराठी कोश

इंग्रजीच्या अध्ययनास इंग्रजी-मराठी कोशांचा जसा उपयोग होई, तसा संस्कृताच्या अध्ययनास संस्कृत–मराठी कोशाचा होई, हे सांगावयास नको. शास्त्रीपंडितांच्या वर्गाबाहेर इंग्रजीबरोबर संस्कृताचे अध्ययन होऊ लागले, तेव्हा नवीन पद्धतीच्या संस्कृत-मराठी कोशांची गरज साहजिकच भासू लागली. अशा तऱ्हेचा पहिला कोश अनंतशास्त्री तळेकर यांनी १८५३-मध्येच सरकाराकरिता तयार केला. त्याचे नाव 'संस्कृतप्राकृत शब्दकोश' असे आहे. मराठी ही प्राकृत जनांची भाषा म्हणून तिला प्राकृत म्हणण्याचा तो काल होता. हा अमरकोशावर आधारलेला आहे. अमरकोशातील शब्द वर्णानुक्रमे घेऊन प्रत्येक शब्दाचा अर्थ मराठीमध्ये दिला आहे. प्रथम शब्द, पुढे व्याकरण म्हणजे शब्दजाती, आणि नंतर अर्थ येतो. उदाहरणे दिली आहेत, पण फारच थोडी. या कोशातील शब्दसंख्या सुमारे पाचसहा हजार इतकी असावी. याची छपाई शिळाछापाची आहे.

यानंतरचा कोश गोपाळशास्त्री घाटे यांचा. 'सविग्रह संस्कृत कोश आणि मराठी कोश' हे याचे नाव; तथापि नुसते 'विग्रहकोश' असेही त्यास म्हणत. हाही अमरकोशावर आधारलेला असून त्यातील प्रत्येक सामासिक शब्दाचा विग्रह यात दिला असल्याने त्यास हे नाव साहजिकच मिळाले. ७२५ पृष्ठांचा हा संग्रह अमरकोशाच्या अध्ययनाची गरज भागवू शकत होता, असे दिसते. शब्दामधील धातू आणि त्यांची लिंगे इत्यादी व्याकरणविषयक माहितीही त्यात आलेली आहे.

इ. स. १८६५ या वर्षी विष्णू परशुराम पंडित यांनी 'संस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश' प्रसिद्ध केला. त्याचे स्वरूप साहजिकपणेच धातूंपुरते मर्यादित असे होते. आतापर्यंतच्या संस्कृत–प्राकृत ( मराठी ) कोशांमध्ये सर्वांत मोठा असा कोश 'सर्वसंग्रह' या मासिकाचे संपादक माधव चंद्रोबा डुकले यांनी रचिला. त्याचे नाव 'शब्दरत्नाकर' असे होते. हा आकाराने बराच मोठा ( १२″ × ९·४″) असून त्याची पृष्ठसंख्या ४८० इतकी होती. आवासकर कृष्णशास्त्री पेंडसे यांचे साहाय्य डुकले यांनी घेतले होते. वैद्यकशास्त्रातील परिभाषा यात विस्ताराने विवेचली आहे, हा त्याचा एक विशेष होय. याचा प्रकाशनकाल इ. स. १८७० हा आहे. इ. स. १८७२-मध्ये नारो आप्पाजी गोडबोले यांनी गोपाळ जिवाजी केळकर यांच्या साहाय्याने 'संस्कृत व प्राकृत कोश' सिद्ध केला. यात अमरकोश, मेदिनी, हारावली, एकाक्षरी आणि इतर कोश यातील काही ग्रंथांश व शाळेकडील मराठी क्रमिक सहा पुस्तके, नवनीत आणि हितोपदेश यांतील शब्द घेतले होते. मराठीचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस संस्कृत शब्दांचे अर्थ कळण्याच्या दृष्टीने याची रचना करण्यात आली होती, हे स्पष्ट दिसते. अशीच उपयुक्ततेची जरा खालची पातळी स्वीकारून या कालात

इंग्रजी-मराठी कोशांबाबत चांगली कामगिरी बजावणाऱ्या बाबा पदमनजींनीही पुढे म्हणजे १८९१ साली 'शालोपयोगी आणि गृहोपयोगी' 'संस्कृत-मराठी' कोश रचिला.

## वाक्प्रचार व म्हणी यांचे कोश

शब्दकोशांबरोबर वाक्प्रचार आणि म्हणी यांच्या कोशांचाही भाषेच्या अभ्यासास फार उपयोग होतो हे स्पष्टच आहे. किंबहुना, भाषेमधील वक्र प्रयोग म्हणजे हे वाक्प्रचार व ह्या म्हणी होत. भाषेमधील बरेचसे काव्य आणि व्यावहारिक शहाणपण त्यांत सामावलेले असते. म्हणी शब्दकोशात क्वचितच अंतर्भूत होतात आणि वाक्प्रचार झाले, तरी त्यांचे मर्म संपूर्णपणे त्यांमधून विवेचिले जातेच, असे नाही. म्हणून भाषेच्या अभ्यासास याही प्रकारचे कोश आवश्यक आहेत. १८०० ते १८७५ या कालखडात झालेले या स्वरूपाचे कोश आज उपलब्ध नसले, तरी त्या दृष्टीने या कालात काही प्रयत्न झाले होते, एवढे लक्षात घेतले पाहिजे. असा पहिला प्रयत्न 'फुर्डुकवही' या नावाने शिळाछापावर इ. स. १८४२-मध्ये झाला होता. अकारक्रमाने छापिलेला हा म्हणींचा संग्रह आहे. तो प्रकाशित करणाऱ्यांची अपेक्षा "ही फुर्डुके केवळ महाराष्ट्रांतील, यास्तव सुभाषितांचा उपयोग व्युत्पन्नाससुद्धा होईल आणि नीतिसंचय व मनोरंजन घडेल," अशा स्वरूपाची होती. नीतिसंचयाबद्दल फारशी खात्री देता येत नसली, तरी मनोरंजन मात्र होण्यासारखे होते. सदाशिव विश्वनाथ ह्यांनी 'सर्व देशांतील निवडक म्हणी' ह्या नावाने चार हजारांवर म्हणींचा संग्रह इ. स. १८५८-मध्ये प्रसिद्ध केला. 'सर्व देशांतील' असे म्हटले असले, तरी इंग्रजी व मराठी म्हणींचा संग्रह हेच त्याचे मुख्य स्वरूप होते. कृष्णशास्त्री भाटवडेकरांनीही 'म्हणी-रत्नमाला' नावाचा संग्रह प्रकाशित केल्याची नोंद आहे. १८७२-मध्ये गंगाधर गोविंद सापकर ह्यांनी 'मराठी प्रचारांतील म्हणी' म्हणून एक पाउणशे पानांचा संग्रह प्रकाशित केला होता. सारांश, ह्या दृष्टीनेही कोश तयार करण्याची वृत्ती या काळात निर्माण झाली होती. या प्रयत्नांचे स्वरूप मात्र भरदार नव्हते. त्याला मोल्स्वर्थसारख्या साक्षेपी संपादकाची किंवा पंडितवर्गाची म्हणावी तशी जोड लाभली नव्हती. म्हणून हे प्रयत्न आज नामशेष होऊन त्यानंतरच्या कालातील अशा प्रयत्नाकडेच आज तरी आपल्यास लक्ष द्यावे लागते.

## चरित्र-कोश

भाषाविकासापेक्षा वाङ्मयाच्या अभ्यासाला ज्यांचा उपयोग होऊ शकेल, असेही कोश असू शकतात. हंसकोशाचे कर्ते रघुनाथ भास्कर गोडबोले यांनी या दृष्टीने प्रयत्न केले आहेत. त्यांचा काल जरी प्रस्तुत कालखंडाबाहेरचा असला, तरी येथेच त्याचा निर्देश करून ठेवणे योग्य होईल. इ. स. १८७६ साली त्यांनी 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' नावाचा प्राचीन कालातील भारतीय व्यक्ती आणि स्थले यांचा वर्णनात्मक असा ७०० पृष्ठांचा एक कोश प्रसिद्ध केला आणि पुढे १८८१-मध्ये अर्वाचीन कालातील व्यक्ती आणि स्थले यांचा 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश'

(पृ. ५४६) प्रकाशित केला. या कोशांनी मराठीमधील चरित्रकोशांचा पाया घातला. अशा कोशांची उपयुक्तता किती असते, हे वाङ्मयाभ्यासकास सांगावयास नको. त्यांतील अपुरेपणा किंवा चुका लक्षात घेऊनही त्यांचे संदर्भग्रंथ म्हणून मूल्य मान्य करावयास हवे. एकंदर कोशरचनेच्या कार्याविषयी असे म्हणावे लागते की, त्यात खर्ची पडणारी विद्वत्ता आणि परिश्रम यांचे प्रमाण मोठे असूनही वाङ्मयनिर्मितीच्या दृष्टीने मिळावी तशी मान्यता, यश वा कीर्ती त्या कार्याला मिळत नाही. बाबा पदमनजी यांनी इतर लेखनही पुष्कळच केले आणि वादविषय होईल अशा प्रकारचेही केले, म्हणून त्यांचे नाव वाङ्मयामध्ये, निदान वाङ्मयाच्या इतिहासामध्ये बरेच ज्ञात असे राहिले. परंतु रघुनाथशास्त्री गोडबोले यांचे नाव ग्रंथसूचीमध्येच आढळेल, अशी स्थिती आहे. मराठी कोशनिर्मितीला आरंभ उशिरा झाला; परंतु झाला तो चांगला झाला, यात शंका नाही. त्या वेळी झालेल्या कोशांनी आपली गरज जवळजवळ शंभर वर्षे भागविली, हे लक्षात घेतल्यास त्यांचे महत्त्व समजून येते.

## दोन

### व्याकरणनिर्मितीमधील अडचणी

कोशांप्रमाणेच व्याकरणग्रंथांचा प्राचीन मराठीमध्ये प्रायः अभावच होता. जे काही ग्रंथ झाले होते, त्यांची माहितीही लोकांना नव्हती. म्हणून कोशविचाराप्रमाणे व्याकरणविचारालाही इंग्रजी अंमल आल्यावर नव्याने प्रारंभ व्हावा, हे स्वाभाविक होते. आपल्याकडे व्याकरणग्रंथ न होण्याची कारणे काय असावीत, याविषयी दादोबा पांडुरंगांनी काही विचार प्रकट करून ठेवले आहेत. आपल्या व्याकरणास त्यांनी जे 'प्रस्तावन' जोडले आहे, त्यात ते म्हणतात, "ते (व्याकरण) प्रसिद्ध न होण्यास केवळ एकच कारण नसावे, त्याचे प्रसिद्धीस लहानमोठ्या तरी दोनचार अडचणी माझ्या दृष्टीपुढे स्पष्ट दिसतात, यांशिवाय आणखी किती असतील त्या नकळे, अशा कीं प्रथमतः जो कोणी व्याकरणग्रंथ या भाषेत करावयास बसेल, त्यास मुळीं त्याचे नियम बांधावयास कोणताही आधार नाहीं; सर्व जें कांहीं तो करील ते नवे व त्याची कल्पना तोच त्याचा आधार; दुसरे, या भाषेत आंतून गोंधळ किती आहे तो अमळ विचार केल्यावर लगेच ध्यानांत येतो; त्या सर्वांचे पृथक नियम बांधणे हे काम बोलतांना मात्र सुलभ वाटते. परंतु ते करायास गेल्यावर किती अवघड आहे याचा अनुभव यावयास कांहीं उशीर लागणार नाहीं; बरे, यथाशक्ति इतक्या अडचणी सोसायास एखादा सिद्ध झाला असतां, पुढे त्याच्या श्रमाचे फल प्राप्त होईल कीं नाहीं याविषयीं त्यास मोठी भ्रांत. मराठी व्याकरणाची प्रसिद्धि आज दिनपर्यंत झाली नाही, त्यास मुख्य अडचण ही शेवटचीच असावी." दादोबांना वाटलेल्या या कारणांबरोबर स्वभाषेचे ज्ञान आपल्या दैनंदिन व्यवहाराच्या साहाय्याने आणि तीमध्ये निर्माण झालेल्या वाङ्मयाच्या वाचनाने होऊ शकते, त्याकरिता आपल्याच भाषेच्या व्याकरणाच्या अभ्यासाची तादृश गरज नसते, अशी सर्वसामान्य समजूत हीही व्याकरण-ग्रंथरचनेकडे प्रवृत्ती न होण्याचे

कारण असली पाहिजे.

**मराठी व्याकरणरचनेचे पहिले प्रयत्न**

मराठीचे अध्ययन करण्याची जेव्हा परकीयांना आवश्यकता वाटू लागली, तेव्हा मराठी व्याकरणाविषयी पृच्छा होऊ लागली. इंग्रज राज्यकर्ते यावयाच्या आधी पोर्तुगीज लोकांनी मराठीच्या अभ्यासाचा आणि मराठीमधील ग्रंथरचनेचा प्रयत्न केला होता त्यामुळे सोळाव्या शतकाच्या अखेरीपासून आपल्या भाषेने मराठीचे व्याकरण रचण्याचे प्रयत्न त्यांनी विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत केले. इंग्रज लोकांनी धर्मप्रचाराकरिता किंवा प्रजेची भाषा आपल्यास माहीत असली पाहिजे, या कल्पनेमुळे मराठीच्या अभ्यासास एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून सुरुवात केली. त्यांनाही मराठी व्याकरणाची गरज भासली आणि इंग्रजी भाषेमध्ये त्यांनी स्वतःकरिता आणि एतद्देशीयांनी त्यांच्याकरिता मराठीची व्याकरणे रचिली. वुइल्यम केरी याने कलकत्त्याजवळ मिशनरी कार्याचे केंद्र असणाऱ्या सेरामपूर या गावी इ. स. १८०५-मध्ये Grammar of the Mahratta Language तयार करवून घेतले. मराठीच्या इंग्रजी-मधील व्याकरणाची ही नोंद होती. परंतु मराठीचे मराठीमधील व्याकरण होण्यास आणखी वीस वर्षे जावी लागली. मुंबईच्या 'हैंद शाळा-शाळापुस्तक-मंडळी'ने देशी लोकांमधील शिक्षणाचे निरीक्षण करून त्यात काय सुधारणा करण्यासारख्या आहेत, ते सुचविण्याकरिता एक खास कमिटी नेमली होती. तिने आपल्या १८२३-च्या अहवालात "A sketch of Grammar in Maratha and Gujarthee with at least correct paradigms of nouns and verbs" पाहिजे असल्याचा उल्लेख केला आहे. याच 'मंडळी'ने नवीन ग्रंथ करण्यासंबंधीचे जे प्रसिद्धिपत्रक पुढे काढले, त्यामध्ये 'ग्रंथ पाहिजेत त्यांचे विषय आणि नांवे' दिली होती. त्यांमध्ये 'व्याकरण मराठी भाषेचे' असाही निर्देश सापडतो. हैंद शाळा-शाळापुस्तक-मंडळी'च्या दुसऱ्या वार्षिक वृत्तांतात (१८२४–२५) "A Grammar and a Dictionary of the Marat'ha language, in Marat'ha only for the use more particularly of natives, are in course of preparation by the Pundits of the Society" असा मराठी व्याकरणाच्या रचनेविषयीचा उल्लेख आहे. त्याअनुसारे पंडिती कोशाप्रमाणे पंडिती व्याकरणही तयार झाले. परंतु ते हस्तलिखित स्वरूपातच राहिले; मुद्रित होऊन त्याच्या अनेक प्रती निघाल्या नाहीत. "याचा प्रती दूर देशीं जितके पंतोजी गेले त्याणीं एकेक लिहून नेली' असे याविषयी मराठीमधील पहिल्या (दुसऱ्या?) मुद्रित व्याकरणाचे कर्ते गंगाधरशास्त्री फडके यांनी आपल्या प्रस्तावनेत म्हटले आहे. याची एक प्रत इंग्लंडात इंडिया ऑफिसच्या संग्रहात होती. तीवरून आता मुंबई-मराठी-संशोधन-मंडळाच्या वतीने ते मुद्रित होऊन उपलब्ध झाले आहे.

## व्याकरणरचनेचे प्रयोजन

मराठीच्या व्याकरणाच्या रचनेची गरज वस्तुतः मराठी भाषा ज्यांची स्वतःची भाषा आहे, त्यांना तिचा चांगला अभ्यास करिता यावा म्हणून वाटावयास हवी होती. परंतु प्रत्यक्षात तसे झाले नाही. परकी भाषा शिकण्यास व्याकरणाचा उपयोग फार होतो. परकीय इंग्रज लोकांना मराठी शिकण्यासाठी इंग्रजीत लिहिलेल्या मराठीच्या व्याकरणांचा उपयोग होई. परंतु त्यांना जसे मराठी शिकावयाचे होते, तसे आपल्यालाही इंग्रजी शिकावयाचे होते. ते शिकण्यास इंग्रजीचे व्याकरण खरे उपयुक्त होय. परंतु ते कळण्यास व्याकरणाचा परिचय आवश्यक असे. म्हणून प्रथम आपल्या भाषेच्या व्याकरणाचे अध्ययन करण्याची जरुरी भासू लागली. स्वतःच्या भाषेच्या व्याकरणाचे अज्ञान असल्यास परकी भाषेचे व्याकरण कळणे कठीण, आणि मग परकीय भाषाही आत्मसात करणे कठीण असे. या अर्थानेच दादोबांनी आपल्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत म्हटले – "अलिकडे दोनतीन वर्षे झालीं, व्याकरणाची आवड मुलांमध्ये फार वाढत चालली आहे...... व परभाषा शिकण्याकरितां त्याचा उपयोग फार, या सकल गोष्टींचा विचार मनांत येऊन ग्रंथास आरंभ केला." "आपण जी भाषा बोलतों तिचे शब्दज्ञान मुळीं झाले पाहिजे, म्हणजे पुढे त्याचा आधारानें परभाषा त्वरित व शुद्ध रीतीनें ग्रहण करायास येईल." मराठी लोकांस व्याकरणाचीच जाणीव पुरेशी नसल्याने त्यांचे इंग्रजीचेही ज्ञान निर्दोष असत नाही, याची जाणीव इंग्रज लोकांना झाली असल्याचे बॉबे नेटिव्ह स्कूल बुक अँड स्कूल सोसायटीच्या दुसऱ्या रिपोर्टावरून दिसून येते. त्यात म्हटले आहे – "लक्षात घेण्यासारखी बाब अशी की, एतद्देशीयापैकी आपल्यास इंग्रजी येते, असे समजणाऱ्या लोकांचे आपल्या स्वतःच्या भाषेकडे अत्यंत उद्वेगजनक असे दुर्लक्ष्य असते. तसेच असेही निश्चितपणे आढळून आले आहे की, इंग्रजी शिकविण्याची सदोष अशी पद्धत चालू ठेवल्याने आणि स्वभाषेकडे संपूर्ण दुर्लक्ष्य करू दिल्याने या 'इंग्रजी येते' असे समजल्या जाणाऱ्या लोकांमध्ये अशी एक बोली-भाषा निर्माण होते की, जी इंग्लिशही असत नाही, की मराठी, गुजराती वा हिंदुस्तानीही म्हणता येत नाही. या लोकांना शुद्ध व विशिष्ट वाक्प्रचारयुक्त भाषेत लिहिलेले ग्रंथ किंवा त्या भाषेत चालविलेले संभाषणही नीटपणे समजत नाही. म्हणून या सोसायटीपुढे मुख्य उद्दिष्ट असे आहे की, एतद्देशीयांना इंग्रजीचे ज्ञान उत्तम तत्त्वानुसारे करून द्यावे. आणि सध्या तयार होत असलेल्या व झालेल्या पुस्तकाच्या द्वारे मराठी किंवा गुजराती यांचे अधिक व्याकरणशुद्ध व पक्के ज्ञानही त्यांना होईल असे करावे."[१] एवंच, मराठी आणि गुजराती लोकांचे इंग्रजीचे ज्ञान चांगले असावे म्हणून मराठी किंवा गुजराती व्याकरणरचनेंचा उद्योग इकडे सुरू झाला. पुढे १८५७-मध्ये कृष्णशास्त्री गोडबोले यांनी आपले व्याकरण

१. मूळ इंग्रजी उतारा — Second Report of the Bombay Native School Book and School Society, 1824–25, page 16.

रचिले, त्याही वेळी 'परभाषा शिकण्यास स्वभाषेचे व्याकरण बरेच उपयोगी पडते.' असे त्यांनी म्हणून ठेवले आहे. या परभाषांमध्ये संस्कृताचा समावेश करणे एका दृष्टीने युक्त ठरेल. कारण मराठी व्याकरणाच्या अभ्यासाने संस्कृत शिकणे हेही सुकर होईल अशी अपेक्षा व्यक्त करण्यात आली होती.[१] परभाषा शिकण्यास सुकर जावे म्हणून स्वभाषेच्या व्याकरणाचा अभ्यास हवा, या कल्पनेबरोबर आणखीही काही उपयोग या व्याकरणकारांच्या डोळ्यांपुढे असावेत. दादोबा म्हणतात, 'व्याकरणाचा एक म्होटा उपयोग असा कीं, येणेकरून सर्वांची भाषा व लिहिण्याचा मार्ग एक पडतो ' म्हणजे व्याकरणामुळे भाषेस एकरूपता प्राप्त होते. प्रगत समाजाचे दैनंदिन व्यवहार एकमेकांस सुगम व्हावे, म्हणून व्याकरणाची उपयुक्तता आहे, असा ह्याचा अर्थ आहे. हा व्याकरणाचा उपयोग परभाषानिरपेक्ष असा आहे. त्याचा तिसरा उपयोग असा की, आपल्याच भाषेतील शुद्ध कोणते व अशुद्ध कोणते ते व्याकरणाच्या ज्ञानामुळे आपल्यास सांगता येते. याहीबाबत दादोबा म्हणतात, "आपली भाषा शुद्ध येण्यास जरी व्याकरणाचे विशेष अगत्य नाहीं, तरी जो त्याजविषयीं अज्ञान, तो यद्यपि बहुवक्ता आहे, आणि जरीं स्वतः अशुद्ध बोलत नाहीं, तरी दुसऱ्याने बोललें असतां त्यास ते शुद्ध कीं अशुद्ध हे नीट प्रतिपादितां येत नाहीं; त्या वेळेस तो गोंधळांत पडतो." म्हणून पुढे आपल्या लघुव्याकरणात दादोबा 'शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसें लिहावे हे व्याकरण शिकल्याने समजतें,' असेही म्हणून ठेवतात. येथेच खरोखर व्याकरणाचा मूलभूत उपयोग सांगितला गेला पुढे कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी याहीपेक्षा आणखी एक व्याकरणाचा उपयोग सांगितला. ते म्हणतात, 'बोलणे व लिहिणे हीं कलेदाखल येण्यास व्याकरणाचे ज्ञान पाहिजे. ज्यास व्याकरण ठाऊकसुद्धा नाहीं, त्याससुद्धां स्वभाषा साधारण व्यवहारापुरती बोलतां किंवा लिहितां यावयास अडचण पडत नाहीं; परंतु ज्यांस उत्तम वक्ता किंवा प्रौढ ग्रंथकार व्हावयाचे असेल त्यास स्वभाषेच्यासुद्धां व्याकरणाचे ज्ञान फार उपयोगी पडते '[२] भाषेची शुद्धता ही तिच्या सौंदर्याचा एक भाग आहे ही जाणीव या विधानापाठीमागे आहे, असे म्हणावे लागते. व्याकरणाच्या उपयुक्ततेबद्दल आज आवर्जून लिहावे लागत नसले, तरी गेल्या शतकाच्या पूर्वार्धात व काही काल नंतरही त्याची आवश्यकता वाटत होती, असे दिसते. आरंभी-आरंभी तर ते फारच आवश्यक होते, असे वाटते.[३]

१. मराठी व्याकरणावरील निबंध, कृ. चिपळूणकर, निबंध १ पृ. ८.

२. मराठी व्याकरणावरील निबध, आ. दुसरी, पृ. ५.

३. व्याकरणाच्या अनुपयुक्ततेविषयी लोकहितवादींनी पुढील उद्गार काढिले आहेत. 'व्याकरणाचे पंधरा वर्षे अध्ययन केले; त्यापासून अमुक उपयोग होतो, असे मला दाखवून द्यावें. म्हणजे मी वास्तविक म्हणेन. परंतु मी शोध केला आहे, त्यावरून मला तर वाटते कीं, मनुष्यास लांकडें तोडावयाचे कसब शिकवले तर बरे, परंतु हे व्याकरण नको. यांत कांहींच अर्थ नाहीं. केवळ मूर्ख होण्याची विद्या आहे."

महाराष्ट्र शब्दकोश, प्रस्तावना, विभाग ६, पृ १२.

## पंडिती व्याकरण

मराठी अभ्यासकांकरिता मराठीमध्ये रचिले गेलेले गेल्या शतकातील हे पहिले व्याकरण होय. परंतु याच्या अस्तित्वाचे स्मरण लवकरच लोकांस राहिले नाही, असे दिसते. दादोबांसारख्या मराठीच्या पाणिनीस ते रचिले गेले असल्याची माहितीही होती, असे दिसत नाही. आपल्या व्याकरणाच्या प्रस्तावनेमध्ये ते म्हणतात, "जा समयीं कोश झाला, ती एक विस्ताररूपानें व्याकरण करण्याची उत्कृष्ट संधि होती. या समयीं देशोदेशींचे पंडित एकत्र होते, त्या सर्वांचा विचाराने जे जे मराठी व्याकरणाविषयीं नियम बांधले जाते ते सहसा दुसऱ्याचानी सोडवते ना, कां कीं त्यांत बाळशास्त्री घगवे, आदिकरून जे पंडित होते, ते संस्कृतांत प्रवीण व रसज्ञ असून, जांची प्राकृतावर परम भक्ति होती; त्यांतून बाळशास्त्री यांचीं तर स्वतःचीं प्राकृत कवने मोठ्या मान्यतेचीं आहेत. सारांश, हे ब्राह्मण ( मी ) सांगतों ते काम करण्यास निःसंशय मोठा हर्ष मानिते. असो, आता ती अमोलिक संधि गेली म्हणोन शोक मानीतच हातपाय आटोपून निराश असणे हेंही विचार करून पाहिले असतां नीट नव्हे. यथासामर्थ्ये आपणही आपले हातपाय हालवून पाहावे, मग जितके व जसे साध्य होईल तसे होऊ, असा निश्चय करून हा पुढील लहानसा ग्रंथ लिहिण्याकरितां मीं लेखणी उचलली." जे व्हावयास पाहिजे होते, असे दादोबा म्हणतात व झाले नाही, म्हणून खेद प्रकट करितात, ते वस्तुतः झालेले होते. त्याविषयीची माहिती १८३६ साली, म्हणजे दादोबांचे व्याकरण प्रसिद्ध झाले त्याच वर्षी, मुद्रित झालेल्या फडके यांच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत आली आहे. दादोबांनी ही प्रस्तावना लिहिल्यावर व हें व्याकरण छापण्याचे अगोदर 'दोन लहानशीं व्याकरणे छापलीं गेलीं' असा ज्यांचा उल्लेख टीपेत केला. त्यांपैकीच फडके यांचे हे व्याकरण असावे. तरीही पंडितांकरवी व्याकरण करवून घ्यावयास हवे होते, असे आपले विधान त्यांनी कायम का ठेविले ते समजत नाही. कदाचित "दोन व्याकरणे मुद्रित झाली" एवढेच त्यांना माहीत असावे, पण ती पाहण्यात आली नसावी.

## व्याकरणाची रचनाप्रक्रिया

फडके यांच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेत या पंडिती व्याकरणाच्या सिद्धतेविषयी जी माहिती आहे, ती पाहण्यासारखी आहे. तीमध्ये ते म्हणतात, "या सोसैटीचे ( नेटिव एज्युकेशन ) अधिकारी जॉर्ज जारवीस साहेब झाले तेव्हां त्यांनीं या कारखान्यांत चार पंडित नवे ठेवले. एक जगन्नाथशास्त्री, दुसरे रामचंद्रशास्त्री, तिसरे गंगाधरशास्त्री, चौथे बाळशास्त्री घगवे. त्यांत रामशास्त्री याजकडे अत्रत्य शाळांचा चौकशीचे काम होते. त्या कामास ते गुंतले, पुढें आम्हां तीन पंडितांस प्रथमतः मराठी भाषेचे व्याकरण करण्याविषयीं आज्ञा झाली, तेव्हां आम्हा सर्वांस विचार पडला कीं महाराष्ट्र भाषेचे व्याकरण कसें करावें. तेव्हां विचार करितां असें मनांत आलें कीं ही भाषा संस्कृताश्रित होय. तेव्हां संस्कृतांत जसा प्रकृति-प्रत्यय-भाव-विचार असाच या

भाषेंतही आहे. मग संस्कृतव्याकरणाध्ययनबलेंकरून महाराष्ट्र-व्याकरणास आरंभ केला. विभक्ति, लिंगें, वचनें इत्यादि सर्व विषय प्रायः संस्कृताप्रमाणेच मिळूं लागले. मग अनुगम-कल्पना करून एक वर्षांत व्याकरण सरासरी बरेंच झालें. आतां ती प्रथमच आवृत्ति. यामुळें सर्व विषयांचे यथास्थित आकलन झालें नाहीं. तथापि तें राहिल्ये विषयांस सूचक झालें. आजपर्यंत जितके पंतोजी व मुलें तयार झालीं तितकींही याच व्याकरणावरून. याचा प्रती दूरदेशीं जितके पंतोजी गेले त्याणीं एकएक लिहून नेली. पुढें प्रश्नोत्तर-व्याकरण म्हणून रामचंद्रशास्त्री याणीं याच व्याकरणाचा लहानसा संक्षेप मुलांसाठीं केला. त्याचा प्रती हातचा मुलांजवळ बहुत आहेत. या रीतीनें या व्याकरणावरून आज बारा वर्षे काम चाललें. परंतु छापण्याचा उद्योग झाला नाही. याजकरितां प्रतींची न्यूनता, यामुळें फार अडचण पडूं लागली. तेव्हां सर्व लहान-थोरांचा मनांत आले कीं व्याकरण सुधारून छापेल तर बरे. त्याजवरून मला छापण्या-विषयीं ईश्वरें बुद्धि दिली." मराठीमधील पहिले मुद्रित व्याकरण याप्रमाणे फडके यांच्या मताने त्यांचे स्वतःचे ठरले, तरी त्याआधी पंडितांचे मोठे व्याकरण आणि त्यावरूनच प्रश्नोत्तररूपाने संक्षेप करून तयार केलेले रामचंद्रशास्त्री यांचे दुसरे अशी त्याहीआधी दोन व्याकरणे तयार झाली होती, हे उघड आहे.

**पंडिती व्याकरणाचे स्वरूप**

प्राचीन वाङ्मयातील काही अगदीच तुरळक प्रयत्न सोडले, तर हे पंडिती व्याकरण, म्हणजे मराठीचे मराठी व्याकरण रचण्याचा पहिलाच महत्त्वाचा आणि विस्तृत प्रयत्न होय, असे म्हणावयास हरकत नाही. आज मुद्रित स्वरूपात डेमी आकाराची १२६ पृष्ठे याने व्यापिली आहेत. याची २२ प्रकरणे आहेत. शब्दशुद्धी आणि वाक्ययोजना हे व्याकरणाचे दोन भाग होतात हे सांगून (प्र. १) पुढे स्वर, व्यंजने आणि त्यांची स्थाने याविषयी माहिती दिली आहे (प्र. २–४). पाचव्या प्रकरणात अक्षरांच्या बाराखड्या, जोडाक्षरचिन्हे व मोडी लिपीमध्ये काही निवडक बाराखड्या दिल्या आहेत. पुढे अक्षरविचारच दोन प्रकरणांत आला आहे. नंतर शब्दांच्या आठ जाती (प्र. ८) देऊन त्यापुढे सिद्ध आणि साधित शब्द हे भेद सांगितले आहेत (प्र. ९). दहाव्या प्रकरणात लिंगांचे विधान येते. पुढील मोठ्या प्रकरणात निरनिराळ्या स्वरान्त शब्दांची लिंगवचनानुसारे होणारी रूपप्रक्रिया सांगितली आहे (प्र. ११). बाराव्या आणि तेराव्या प्रकरणात विशेषणचर्चा; चौदाव्यात सर्वनामविचार येतो. पंधराव्या एकाच प्रकरणात विभक्त्यर्थविचार, समासविचार, तद्धितविचार, अभ्यस्तशब्दविचार इतका भाग एकत्रित करण्यात आला आहे. पुढील सोळाव्या प्रकरणात क्रियापदरूपांचा विचार सुरू होऊन काळ, शक्य व प्रयोजक रूपे, कृदन्ते यांची माहिती विसाव्या प्रकरणापर्यन्त दिली आहे. शेवटल्या दोन प्रकरणांत क्रियाविशेषण, शब्दयोगी, केवलप्रयोगी आणि उभयान्वयी अव्ययविचार सांगून ग्रंथ संपविला आहे. आरंभी वाक्ययोजना हा व्याकरणाचा दोहोंपैकी एक भाग

असल्याचे सांगूनही आजच्या अर्थाने वाक्यविचार आलेला नाही. वाक्ययोजनेचा त्यांचा अर्थ बहुधा क्रियापदविचार असावा. त्याची त्यांनी दिलेली व्याख्या " वाक्य म्हणजे भाषेचा भाग आहे. जांत क्रियापद असते " अशी आहे. कर्तरि, कर्मणि, भावी या शब्दांनी क्रियापदांचा जो विचार यात आला आहे, तोच वाक्यविचार अशी कल्पना दिसते.

प्रस्तुत व्याकरणामध्ये या पंडितांनी जी सरणी घालून दिली, तिचा आधार पुढील वैयाकरणांस व्हावा, हे साहजिक आहे. या व्याकरणावरून किंवा त्याचा रामचंद्रशास्त्री (जन्हवेकर) यांनी जो प्रश्नोत्तररूप संक्षेप केला, त्यावरून बरेच 'पंतोजी व मुलें' व्याकरण शिकली. तेव्हा पुढील व्याकरणरचनेवर त्याचा स्वाभाविकपणेच परिणाम झाला असला पाहिजे. इंग्रजी व्याकरणाचा ज्याच्यावर परिणाम झालेला नाही, असे हे मराठी भाषेचे आद्य व्याकरण म्हणावयास पाहिजे. 'संस्कृताध्ययनबलेकरून' त्याचा अनुगम करून ते रचिले गेले होते. याची पद्धती ही चर्चा किंवा विचार या स्वरूपाची खरोखर नाही. विधाने आणि उदाहरणे असाच बहुतेक भाग आहे. अर्थात संस्कृताप्रमाणे सांकेतिक शब्दांचा किवा चिन्हांचा उपयोग त्यात केलेला नाही. त्यामुळे ते अगदीच सूत्ररूप असे झालेले नाही, ही समाधानाची गोष्ट आहे. असे असूनही ते अगदी सुगम झालेले नाही. मराठीमधील प्राचीन प्रयत्न पाहता ते पुष्कळच अधिक विस्तृत, तपशिलामध्ये जाऊन विचार करणारे आणि मूलगामी झाले आहे, यात शंका नाही. पण ज्याप्रमाणे पंडितांनी केलेल्या कोशाची स्थिती झाली, त्याप्रमाणेच पडितांच्या या व्याकरणाची झाली. बारा वर्षांमध्ये ते विस्मृतप्राय होऊन दादोबांना तर आपल्या व्याकरणाच्या रचनाकाली त्याच्या अस्तित्वाची दखलही नव्हती. रामचंद्र-शास्त्री यांनी केलेल्या त्याच्या संक्षेप-व्याकरणाचीही तीच गत झाली, यात नवल नाही.

## बाळशास्त्री जांभेकरांचे व्याकरण

यानंतरचे मराठीमधील व्याकरण कोणते, याविषयी काही मतभेद आढळतो. मराठी मधील पंडिती व्याकरण किवा त्याचा जन्हवेकरकृत संक्षेप ही दोन्ही मुद्रित नव्हती; लिखित होती. म्हणून शिळाछापावरले असले, तरी पहिले मुद्रित व्याकरण गंगाधरशास्त्री फडके यांचे होय, असे मत प्रा. प्रियोळकर यांनी पंडिती व्याकरणाच्या मुद्रित प्रकाशनाच्या प्रस्तावनेत प्रकट केले आहे.[1] गंगाधरशास्त्री यांचे हे व्याकरण १ जानेवारी, १८३६-ला प्रकाशित झाले. दादोबांनी आपल्या व्याकरणाची प्रस्तावना लिहिल्यावर आणि ते व्याकरण छापून होण्याच्या आधी दोन लहान व्याकरणे छापिली गेल्याचा टीपेत उल्लेख केला. त्यांपैकी फडके यांचे हे व्याकरण एक असावे. दुसरे कोणते ते स्पष्ट नाही. ते दुसरे व्याकरण बाळशास्त्री जांभेकर यांचे 'बाल-व्याकरण' हेही १८३६-मध्ये प्रथम प्रकाशित झाले, असा उल्लेख प्रा. प्रियोळकर यांनी ' डिती

१. महाराष्ट्र भाषेचे व्याकरण, प्रस्तावना, ८, माडगांवकर-स्मारकग्रंथावलि.

व्याकरणा'स जोडलेल्या १८६७-पर्यंतच्या मुद्रित व्याकरणांच्या यादीत सापडतो. फडके यांनी आपल्या व्याकरणाच्या दुसऱ्या १८३८ साली छापलेल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत बाळशास्त्री जांभेकरांचा आदराने उल्लेख केलेला दिसतो. तो असा — "यांत कुशाग्रबुद्धि असे जे बाळशास्त्री जांभेकर यांसही जा एतदुपयोगी युक्ति सुचल्या त्यांचा संग्रह करून, व जो लेख सिद्ध केला तो त्यांस दाखवून हा ग्रंथ छापिला." पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत हाच मजकूर असावा. या उल्लेखामध्ये बाळशास्त्री यांच्या पुस्तकाचा उल्लेख न करिता 'त्यांना सुचलेल्या युक्तीं'चा आणि 'सिद्ध केलेला लेख' त्यांना दाखविल्याचा निर्देश मात्र आहे. बाळशास्त्री यांच्या व्याकरणाची दुसरी आवृत्ती फडके यांच्या व्याकरणाची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली, त्याच वर्षी (१८३८) प्रसिद्ध झाल्याचे प्रा. प्रियोळकर यांनी दिलेल्या यादीवरून दिसते. या आवृत्तीवरही बाळशास्त्र्यांचे नाव छापलेले नाही, आणि पूर्वीच्या आवृत्ती (एक व अनेक)वरही बहुधा नसावे. तथापि बाळशास्त्री यांनी एक व्याकरण लिहिले असल्याची डॉ. रा. गो. भांडारकर यांची स्मृती होती. बाळशास्त्री यांनी १८३६-मध्ये प्रसिद्ध केलेल्या "भूगोलशास्त्र : गणितभाग" या त्यांच्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर पूर्वीच्या पद्धतीने इंग्रजीत केलेल्या निर्देशात By Ball Gungadhur Shastree, Honorary Native Secretary to the Native Education Society Author of the "Little Grammar" असा स्पष्ट उल्लेख आहे. त्यांनी लिहिलेल्या 'नीतिकथा' या पुस्तकांचाही निर्देश तेथे आहे. या पुस्तकांच्या निर्देशामध्ये काही कालक्रम अभिप्रेत असला, तर बाळशास्त्री यांनी १८३६-च्या आधी दोन-तीन पुस्तके लिहिली, व त्यांत व्याकरण प्रथम लिहिले, असा अर्थ होईल. सारांश, जांभेकर यांचे व्याकरण फडके यांच्या व्याकरणाच्या आधीच प्रसिद्ध झाले असावे.[1]

बाळशास्त्र्यांचे हे व्याकरण बालांकरिता होते. "शाळांताल लहान मुलांस प्रथम व्याकरणातील मुख्य विषयांचे सहज ज्ञान व्हावे या बुद्धीनें हे बालव्याकरण करून मुलांस नजर केले आहे. साहासात वर्षांच्या मुलांसही कळावे म्हणून हे सुलभ शब्दांनी लिहिले आहे. याचा अभ्यास करून मुलांनीं मोठे व्याकरण पाहिले असतां त्यांस सुबोध होईल. नंतर इंग्रजी, संस्कृत किंवा दुसरी कोणती भाषा शिकण्यास त्यांस कांही श्रम पडणार नाहीं, आणि कोणताही विषय ग्रहण करण्याची शक्ति येईल," अशी अपेक्षा प्रस्तावनेमध्ये शास्त्रीबुवांनी व्यक्त करून ठेवली आहे. व्याकरणाचा अभ्यास स्वभाषेच्या

१. जांभेकरशताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड ३, पृ. ६२६.

बाळशास्त्री याचे व्याकरण १८३६ सालीच प्रसिद्ध झाले आणि त्याच्या रचनेमध्ये त्यांना वाथेन या त्या वेळच्या मुंबई सरकारच्या मुख्य सेक्रेटरीचे सहकार्य असल्याचे डॉ. कृ. भि. कुलकर्णी यांनी निदर्शनास आणलेले आहे, तेही लक्षात घेण्यासारखे आहे. —आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, पृ. ८५.

ज्ञानापेक्षा इतर भाषांच्या अध्ययनास उपयुक्त म्हणून करावयाचा, ही दृष्टी येथेही दिसून येते.

हे व्याकरण मूळ लहान आकाराच्या ४८ पृष्ठांचे असून आजच्या डेमी आकाराची १५ पृष्ठे भरतील, एवढ्या मजकुराचे आहे. पंडिती व्याकरणात शब्दशुद्धी आणि वाक्ययोजना हे व्याकरणाचे दोन भाग सांगितले असले, तर 'व्याकरणांत वर्ण आणि शब्द यांचा विचार सांगितला आहे,' असे बाळशास्त्री यांच्या व्याकरणात म्हटले आहे. यात वर्णविचार १–२ पृष्ठांतच संपतो, आणि शब्दविचार अखेरपर्यंत चालतो. शब्दांचा नाम, विशेषण, क्रियापद, अव्यय एवढ्या विभागांत विचार केला आहे. शेवटी वाक्यांतील शब्दांचे व्याकरण चालवून दाखविले आहे. अगदी अखेरीस व्याकरण कसे शिकवावे, याचेही दिग्दर्शन केले आहे. शब्दांचे भेद आजच्या आठां-ऐवजी पाच असल्याचे सांगितले असले, तरी शेवटच्या अव्ययभेदांत चार प्रकार, आज रूढ असलेले, उल्लेखिले आहेत. क्रियापदांचे तीन काळ व पाच अर्थ दिले आहेत. सामान्यरूपाचा उल्लेख केला आहे. विभक्ती आठ दिल्या आहेत. एकंदर शब्दयोजना व रचना खरोखर बालांना कळेल व झेपेल अशीच आहे. 'पंडिती व्याकरणा'तील क्लिष्टता बाळशास्त्री यांनी काढून टाकिली आहे, यात शंका नाही.

### फडके यांचे व्याकरण

फडके यांचे 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' या बालव्याकरणापेक्षा अर्थात मोठे आहे. १८३६-च्या जानेवारीच्या १ तारखेस ते प्रकाशित झाले. कोशरचनेत आणि पंडिती व्याकरणाच्या रचनेतही यांनी भाग घेतला होता ते पंडिती व्याकरण आणि त्याचा रामचंद्रशास्त्रीकृत संक्षेप ही दोन्ही अनुपलब्ध झाल्यावर (ती हस्तलिखितच होती) "प्रतींची न्यूनता यामुळे फार अडचण पडूं लागली. तेव्हा सर्व लहानथोरांचा मनांत आले कीं व्याकरण सुधारून छापेल तर बरे. त्याजवरून मला छापण्याविषयीं ईश्वरे बुद्धि दिली. मग आजपर्यंत व्याकरण पढविण्याचा योगाने मूळचा व्याकरणांतील त्याज्यांश व ग्राह्यांश यांचे विवेचन झाले, व नवीन विषय कोणकोणते पहिजेत तेही समजलें. मग मी ह्या सर्व विषयांचे आकलन करून हा नवीन ग्रंथ फार संक्षिप्त केला." (प्रस्तावना)

हे फडके यांचे व्याकरण 'पुणें प्रांतींची भाषा मुख्य धरून तदनुसार प्रकृतिप्रत्यय-भावविचार' करून लिहिले आहे· ते 'गुरुशिष्यसंवादरूपा'चे आहे. लहान आकाराची (५·७″ × ३·९″) १६५ पृष्ठे त्यात आहेत. साहजिकच जांभेकर यांच्या बालव्याकरणापेक्षा ते अधिक सविस्तर झाले आहे. ग्रंथ "मेहर्बान कपतान पोपसाहेब, मुंबई येथील शिक्षामंडळीचे सक्रतारी, यांस या ग्रंथाचे गुणदोष आणि श्रम यांचे परीक्षक असे जाणून गंगाधरशास्त्री फडके याणीं परम आदरानें नजर केला असे." कृष्णशास्त्री यांचा यावरील अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे. "हे व्याकरण पहिल्यापेक्षा (बालव्याकरणापेक्षा; जांभेकरांचा स्पष्ट उल्लेख कृष्णशास्त्री करीत नाहीत.)

मोठें असून त्यांत विषयसंग्रहही पुष्कळ आहे, व त्या विषयाचें विवरणही बरेच केलें आहे. तथापि या ग्रंथांत कांहीं विषय सोडले आहेत; व ज्यांचें उपपादन केले आहे, त्यांचे ते उपपादन कितीएक अंशीं न्यून आहे; व कितीएक ठिकाणीं दूषणग्रस्तही आहे." पंडिती व्याकरणावरून हे तयार केलेले असल्याने त्यात पंडिती भाषेची झाक आहे व बाळशास्त्र्यांच्या व्याकरणाच्या मानाने ते कमी सुगम आहे. प्रश्नोत्तररूप ग्रंथात विवेचन वा उपपादन नीट होऊ शकत नाही. त्याची "दादोकृत व्याकरणापेक्षां आपलें श्रेष्ठ" अशी वाखाणणी स्वतः गंगाधरशास्त्री करीत असल्याचा उल्लेख के. शि. भवाळकर यांच्या आत्मवृत्तात आढळतो.[1] ते या व्याकरणास गंगाधरी व्याकरण म्हणतात. "या भाषेचा व्याकरणाचा आश्रयानें महाराष्ट्रभाषासमकक्ष गुजराती व हिंदुस्थानी भाषा यांचीं व्याकरणें सहज होतील," असा विश्वासही फडके-शास्त्री यांना वाटत होता.

## तर्खडकरांचे व्याकरण

या व्याकरणाच्या प्रकाशनाच्या आधी लिहून झालेले, परंतु नंतर प्रकाशित झालेले १८३६ सालचे व्याकरण म्हणजे दादोबा पांडुरंग तर्खडकरकृत 'मराठी भाषेचे व्याकरण' हे होय. आपल्या आधीच्या लहान-लहान प्रश्नोत्तररूप व्याकरणांची पद्धती सोडून देऊन व अगदीच नवशिका बालवाचकवर्ग डोळ्यांपुढे न ठेवता लिहिलेला हा व्याकरणग्रंथ आहे. याचीही पहिली आवृत्ती शिळाछापावरची आहे. पृष्ठांचा आकार मोठा म्हणजे ८.५" X ५.४" असा असून अशा जवळजवळ दोनशे पृष्ठांचा हा ग्रंथ आहे. दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत या व्याकरण-रचनेचा आपला हेतू प्रकट करिताना दादोबा लिहितात, 'इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितकें साधेल तितकें करून, आजपावेतों जिला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्न केलाच नाहीं म्हणोन अत्यंत विस्खलित झालेली व व्याकरणरूप फणीने जिला कोणीं विंचरलेच नाहीं, म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी तिला कांहींतरी नियमांत आणावी, आणि दीर्घकाळ ग्रंथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर सोडवून कांहींतरी उकलण्याच्या घोरणांत आणून बसवावी.' दादोबांनीही स्वतः पुणेकर नसता 'महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणें प्रात, त्यांत जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात तिचें अनुसरण केले आहे.' या व्याकरणाची १८५० साली जी द्वितीयावृत्ती निघाली, तीत बरीच नवीन भर पडलेली असून ती जवळजवळ त्यांची प्रमाण आवृत्ती म्हणता येईल. पुढील आवृत्त्या या दुसऱ्या आवृत्तीच्याच थोड्या फरकाने सिद्ध झालेल्या आवृत्त्या आहेत. या दुसऱ्या आवृत्तीत जी रचना दिसते, तीत प्रथमतः खंड, त्यांत भाग, त्यांचे विभाग, त्यांत वर्ग, त्यांमध्ये प्रकरणे, आणि अखेरीस कलमे अशी रचना आढळते. पहिल्या खंडात नुसती दोन

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड २, परिशिष्ट ३, पृष्ठ २०.

कलमेच आहेत. त्यांतील पहिले दीड पान, तर दुसरे दोन ओळींचे आहे. शेवटला खंड म्हणजे नववा खंड हा एकाच कलमाचा, परंतु १४–१५ पृष्ठांचा आहे. मधल्या खंडांतून उपरिनिर्दिष्ट भाग-विभाग-वर्ग-प्रकरण अशी रचना आहे. अथपासून इतीपर्यंत ६३२ कलमे यात आहेत. भाषेची गुंतावळ सोडविण्याचा हा प्रयत्न किती गुंतागुंतीचा झाला आहे, याची काहीशी कल्पना यावरून येईल. दादोबांचा हा प्रयत्न संस्कृताच्या आश्रयाने झालेला नाही. संस्कृताचा अभ्यास दादोबांनी पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनानंतर म्हणजे १८४३-च्या सुमारास केला. त्यांचा व्याकरणाचा शाळेतील अभ्यास काहीसा मिश्र पद्धतीचा झाला होता. त्यांचे मराठी शाळेतील गुरू, रामचंद्र-शास्त्री जन्हवेकर, यांच्याजवळ बहुधा त्यांनीच स्वतः केलेल्या पंडिती व्याकरणाच्या संक्षेपाची एक प्रत असे. त्यावरून 'उगीच नाम, सर्वनाम, क्रियापद, विभक्ति हे शब्द मात्र ऐकून माहीत झाले होते.' वरच्या एकदोन वर्गांस मराठी व्याकरण बापूशास्त्री शुक्ल हे शिकवीत. परंतु कोणत्याही पुस्तकाचा आधार न घेता तोडानेच व्याकरण सांगत. पण त्यांची "व्याकरण सांगण्याची पद्धती इतकी चांगली असे कीं, ते व्याकरणांत काय जे आम्हांस सांगत ते माझ्या मनांत तेव्हाच शिरत असे." पुढे "इंग्लिश स्कुलांत गेल्यावर Guy's Grammar, Lindley Murray यांचे लहान व्याकरण अशीं शिकलों आणि parsing करावयास शिकलो. तेणे करून माझें मराठी व्याकरणाचे ज्ञान दृढ होऊन थोडें वाढले. तेव्हा माझ्या मनांत मराठींत एक सुबोध व थोडे विशद असे व्याकरण करावें असे आले आणि तो ग्रंथ लिहिण्यास सन १८३४च्या अखेरीस प्रारंभ झाला. तो पुढे १८३६-साचा आरंभीं शेवटास नेऊन पुढे गणपत कृष्णाजी यांणीं त्या वेळेस शिलाछापखाना घातला होता, त्याच शिलेवर छापविला आहे."[1] व्याकरण लिहिण्याचा विचार दादोबांच्या मनात १८३३-च्या अखेरीस आला होता. पहिल्याने काही बंद प्रश्नोत्तररूपाने लिहिलेही होते. परंतु त्यांची त्यांनाच ही पद्धती आवडली नाही, म्हणून Lindley Murray या संक्षिप्त इंग्रजी व्याकरणाच्या पद्धतीवर ते रचावे, असे त्यांना वाटले व त्यातून त्यांचे व्याकरण तयार झाले. तथापि अच्‌संधी, हल्‌संधी यांसारख्या संस्कृत परिभाषेचाही उल्लेख ते करितात. पंडिती व्याकरणाची त्यांना माहितीही नव्हती. नंतर काही काल संक्षिप्त व बालव्याकरणेच काम भागवीत होती. दादोबाचे व्याकरण प्रौढांसाठी आणि भाषेची गुंतागुंत लक्षात घेऊन रचिलेले पहिलेच मुद्रित व्याकरण असल्याने मराठीचे पाणिनी म्हणून त्यांचा गौरवोल्लेख होतो, तो अर्थात यथार्थच होय. मराठी व्याकरणाच्या जनकत्वाचा मान कित्येकांनी त्यांना दिला, आणि मराठी व्याकरणाचा पाया घातल्याचे श्रेय त्यांना दिले. त्यांच्या व्याकरणातील अनेक न्यूने पुढे दाखवून देणाऱ्या कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीही त्यांच्या कार्याचा गौरव पुढील शब्दांनी केला आहे. "या ग्रंथांत जे अनेक गुण आहेत,

१. दादोबांचें आत्मचरित्र, पृ. ८६-८७.

त्याबद्दल आम्ही त्यांस मोठ्या संतोषानें चहातों; व त्याच्या योगानें विद्यावृद्धीस जें पुष्कळ साह्य झालें व अद्यापि होत आहे, त्याबद्दल त्या ग्रंथकर्त्यांची प्रशंसा करणे व त्यांचे आभार मानणें अवश्य आहे असे आम्ही समजतों. मराठी व्याकरणरूप विषयास पूर्णता आणण्याविषयीं रावबहादूर दादोबा पांडुरंग यांनी बहुत शोध व पुष्कळ विचार केल्याची साक्ष त्यांचा ग्रंथ स्पष्टपणे देंत आहे. त्या श्रमाने त्यांनीं पुढील ग्रंथकर्त्यांचे श्रम हलके केले यांत संशय नाही. या मदतीबद्दल मराठी व्याकरणकर्त्यांनीं रावबहादूर यांचे उपकार मानणे अवश्य आहे. आम्ही पुढे जे निबंध लिहिणार आहो त्यांत आमचा व दादोबा पांडुरंग यांचा बराच मतभेद पडलेला दिसणार आहे. व त्यांच्या मताविरुद्ध लेख येणार आहेत; परतु तसे झाले तरी त्या ग्रंथकाराचे श्रम व योग्यता आम्ही ओळखीत नाहीं व त्यांच्या गुणांबद्दल योग्य मान देत नाही असे वाचणाऱ्यांनीं अगदीं मनांत आणूं नये."[१]

## दादोबांच्या व्याकरणाचे विशेष

दादोबांनी नुसता तपशिलाचाच विस्तृत असा विचार आपल्या व्याकरणात आणिला, असे नाही. ठिकठिकाणी चर्चा आणि टीपा देऊन अधिक उपपादनही त्यांनी केले होते. पूर्वीच्या वैयाकरणांपेक्षा व्याकरणातील गुंतागुंतीचा, अपवादांचा, वादग्रस्त प्रश्नांचा अधिक सूक्ष्म व खोल असा विचार त्यांनी केला असल्याचा प्रत्यय येतो. मराठीच्या वेगवेगळ्या प्रदेशांतून वेगवेगळे प्रयोग रूढ असल्याची जाणीव त्यांना होती. जुन्या वाङ्मयातील प्रयोग काय होते, याचाही परामर्श ते घेत. इतरांच्या मताची दखल घेण्याची पद्धत त्यांनी स्वीकारिली होती. सारांश, व्याकरणशास्त्रावरील मराठी-मधील एक प्रौढ ग्रंथ म्हणून त्याची योग्यता मोठी आहे. व्याकरणाची मराठी परंपरा त्यांच्या आधी विशेष समर्थ झालेली नसतानाही एवढे प्रौढ स्वरूपाचे व्याकरण दादोबांनी वयाच्या विशीबाविशीत रचावे, ही गोष्ट विशेष कौतुकास्पद गणावयास हवी. त्या व्याकरणाच्या पुढील सहा आवृत्त्या १८७९-पर्यंत निघाल्या, आणि १८८१-मध्ये आपल्या व्याकरणाची पूरणिकाही त्यांनी प्रसिद्ध केली. याचा अर्थ असा की, व्याकरणविषयक विचार त्यांनी सतत चालविला होता. दादोबांची या काळातील व्याकरणाविषयक कामगिरी फार मोलाची झाली, यात शंका नाही.

हे व्याकरण प्रौढांसाठी असल्याने खालच्या वर्गांतील विद्यार्थ्यांस साहजिकच कठीण वाटे. त्यांच्याकरिता दादोबांनी मराठी 'लघु व्याकरण' तयार करून १८६५-मध्ये प्रसिद्ध केले. मराठी विषयाचा अभ्यास महाविद्यालयीन कार्यक्रमामधून गळल्यामुळे प्रौढ किंवा मोठ्या व्याकरणाचीही तादृश गरज वाटेनाशी झाली, व अलीकडे 'आमचे मोठे व्याकरण' अनेकांना त्यांच्या लघु व्याकरणातील उल्लेखावरूनच

१. मराठी व्याकरणावरील निबंध, कृष्णशास्त्री चिपळूणकर, निबंध १.

माहीत असे. या लघु व्याकरणाच्याही अनेक आवृत्त्या निघाल्या. १९५०-मधील आवृत्ती ही ३३-वी आवृत्ती होती.

## अमेरिकन मिशनचे व्याकरण

दादोबांच्या व्याकरणानंतर आणि त्याची दुसरी आवृत्ती निघण्यापूर्वी मुंबईच्या आणि तेथील सरकारी यंत्रणेच्या परिसराबाहेर मराठीचे मराठीमधील एक व्याकरण तयार केले गेले. ते अहमदनगर येथील अमेरिकन मिशनच्यामार्फत मुंबई येथे छापून १८४८-मध्ये प्रकाशित करण्यात आले. ११० पृष्ठांच्या आणि मध्यम आकाराच्या या ग्रंथास दहाबारा पंडितांचा हातभार लागला असल्याचा उल्लेख असला, तरी कर्त्यांचे नाव दिलेले नाही. व्याकरणाची त्यातील व्यवस्था आणि परिभाषा आधीच्या किंवा नंतरच्या व्याकरणांपेक्षा कित्येक बाबतींत वेगळी आहे. शब्दांच्या सात जाती सांगितल्या आहेत व क्रियाविशेषणांचा समावेश विशेषणांमध्ये केला आहे. शब्दयोगी अव्ययांस उपसर्ग म्हटले आहे. सामान्यरूपास कार्यरूप म्हटले आहे. प्रथमा, कर्म आणि संबोधन अशा तीनच विभक्ती कल्पिल्या आहेत. साहजिकच बऱ्याच विभक्तिप्रत्ययाचा समावेश उपसर्गांत केला आहे. शब्दयोगी अव्यये उपसर्गांतच समाविष्ट केली आहेत. विध्यर्थास धर्मार्थ म्हटले असून स्वार्थ हा सामान्यार्थ झाला आहे. या व्याकरणाचा प्रसार सरकारी शिक्षणसंस्थांमधून झाला असावा, असे दिसत नाही. आज ते विस्मृतप्रायच आहे.

## गंगाधरशास्त्री टिळक यांचे व्याकरण

१८५०-मध्ये दादोबांच्या व्याकरणाची दुसरी आवृत्ती निघाली, ती पहिलीपेक्षा अधिक पूर्ण आणि निर्दोष असल्याने तीच खरोखर त्यांचे अधिकृत व्याकरण ठरण्यासारखी झाली. परंतु काही झाले, तरी ते प्रौढबोध व्याकरण होते. शाळांतील आणि नवशिके अशा विद्यार्थ्यांना ते झेपण्यासारखे नव्हते. त्यांची गरज पुरविण्याकरिता व फडके यांचे या स्वरूपाचे व्याकरण बहुधा दुर्मिळ झालेले असावे म्हणून, गंगाधरशास्त्री रामचंद्र टिळक यांनी १८५८-मध्ये आपले ' लघु-व्याकरण ' प्रसिद्ध केले. हे प्रश्नोत्तररूप नाही.मलपृष्ठावर ' Gungadher's Rudiments of Grammar' असे इंग्रजी नावही दिले आहे. ते क्यांडीसाहेब ह्यांनी परशुरामपंत तात्या गोडबोले ह्यांच्या साहाय्याने पुष्कळ श्रम घेऊन शोधिले. ५९ पृष्ठांच्या लहान आकाराच्या ह्या पुस्तकाची मांडणी अगदी सुटसुटीत आहे. " शाळेतील मुलांस जुन्या चालीप्रमाणे व्याकरणांतील कांहीं ढोबळ ढोबळ गोष्टी सांगण्यास टिपणादाखल हा ग्रंथ उपयोगी पडला, तरी मराठी व्याकरणरूप विषयाचे विशेष व्यक्तीकरण होण्यास हा ग्रंथ अगदी योग्य नाहीं. "[1] असेच याविषयी कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या विद्वानाचे मत पडले. याच्या १८५७-पर्यन्त आणखी सहा आवृत्त्या निघाल्या. पुढे १८६३ साली

१. मराठी व्याकरणावर निबंध, कृष्णशास्त्री चिपळूणकर, नि. १, पृ. १०..

'दक्षिणा प्रैझ कमिटी'तर्फे, सेक्रेटरी म्हणून कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांच्या सहीने मराठी व्याकरणग्रंथाविषयी एक जाहिरात देण्यात आली. तीमध्ये व्याकरणविषयक 'उत्तम प्रतीचा ग्रंथ' कोणी तयार केल्यास ग्रंथकर्त्यास उत्कृष्ट प्रतीचे बक्षीस देण्याची तयारी दर्शविली होती. "हा ग्रंथ मराठी भाषेंत असावा व त्यांतील विषयप्रतिपादन करण्याची शैली युरोपियन अर्वाचीन व्याकरणासारखी असावी" अशी अपेक्षा व्यक्त केली होती. आणखी विशेष अपेक्षा व्यक्त करिताना "निरूपण करितांना मूळच्या संस्कृत भाषेतून प्राकृत भाषा, जिला बालभाषा म्हणतात, तिच्या द्वारें व जुन्या मराठी भाषेच्या (ज्ञानदेवीच्या वगैरे भाषेच्या) द्वारें हल्लींची मराठी भाषा कशी निपजली, हे संभवेल व शोभेल तसे दाखवावे. तसेच हल्लींच्या मराठींत फारसी व आरबी शब्द मिसळले आहेत, त्यांचेही प्रकृतिप्रत्ययरूपाने विवेचन या ग्रंथांत असावें. त्याप्रमाणेंच जुन्या मराठी कवींच्या ग्रंथांतील शब्दांची व शब्दरचनेची उपपत्ति होईल, असे नियम या ग्रंथांत असावे" इत्यादी गोष्टींचा उल्लेख केला होता. याकरिता ५०० रु. बक्षीस म्हणून व ग्रंथांच्या विक्रीतून पाचशे असे एकंदर एक हजार रुपये लेखकास मिळावयाचे होते.

## कृष्णशास्त्री गोडबोले यांचे व्याकरण

ह्या जाहिरातीच्या अनुरोधाने आणि बहुधा कृष्णशास्त्री ह्यांच्या मार्गदर्शित्वाने कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांनी 'मराठी भाषेचे नवीन व्याकरण' रचिले. ते १८६७ साली प्रसिद्ध झाले. 'परभाषा शिकण्यास स्वभाषेचे व्याकरण बरेच उपयोगी पडतें' ही व्याकरणलेखनाची दृष्टी याही ग्रंथरचनेमागे होती असे दिसते. ह्या व्याकरणात मराठीचा संस्कृत भाषेशी असणारा निकटचा संबंध सांगण्याचा व दाखविण्याचा विशेष प्रयत्न केलेला दिसतो. दुसऱ्या आवृत्तीमध्ये तर प्राकृत भाषेचे संक्षिप्त व्याकरण आणि संस्कृत-प्राकृत शब्दकोशही ह्या व्याकरणास जोडला आहे. आजवर झालेल्या व्याकरणांपेक्षा हे अधिक विस्तृत आणि तपशील देणारे झाले आहे. दुसऱ्या आवृत्तीमध्ये पद्यविचारही जोडलेला आहे; त्याचे खरोखर व्याकरणामध्ये प्रयोजन नव्हते. आरंभी भाषांचे वर्गीकरण थोडक्यात देऊन मराठी भाषेचे त्यामधील स्थान दिग्दर्शित केले आहे. फारसी आणि अरबी भाषा यांचा मराठी शब्दसंग्रहामधील वाटा हाही या ग्रंथामध्ये विचाराचा विषय झाला आहे. मराठी भाषेची पूर्वपीठिका आणि तिजवर झालेला परकीय भाषांचा परिणाम या दृष्टीने प्रस्तुत व्याकरणामध्ये प्रामुख्याने प्रथमच विचार झालेला दिसतो. जुन्या काव्यातील उदाहरणेही विपुल दिली आहेत. वाक्यविचारही बराच विस्ताराने द्वितीयावृत्तीत आला आहे. सारांश, या नवीन मराठी व्याकरणाने बरीच अधिक मजल गाठली.

## चिपळूणकरांचे व्याकरणावरील निबंध

गोडबोले यांच्या व्याकरणाच्या दोन आवृत्तींच्या मधील कालात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी आपले 'मराठी व्याकरणावरील निबंध' 'शाळापत्रक' या

मासिकातून क्रमशः प्रसिद्ध केले. त्यांना प्रारंभ १८६५ सालीच झाला आणि अधूनमधून असे पंचवीस निबंध शास्त्रीबुवांनी लिहिले. तत्त्वविचाराच्या दृष्टीने दादोबा किंवा गोडबोले यांच्या लेखनापेक्षा हे निबंध अधिक महत्त्वाचे ठरतात. पहिल्या निबंधात व्याकरणाच्या प्रयोजनाविषयी काही विचार त्यांनी मांडिले. दुसऱ्यात मराठी कवितेच्या भाषेचाही विचार व्याकरणामध्ये करावयास हवा, असे सांगून व्याकरण-विचारामध्ये ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करावयास हवा, हे सकारण दाखवून दिले आहे. "मराठी भाषेचे व्याकरण म्हटले म्हणजे तींत त्या भाषेच्या सर्व प्रकारांचे उपपादन पाहिजे," केवल पुण्याच्या भाषेचे नव्हे, असेही मत ते पुढे मांडितात आणि संस्कृताबरोबर प्राकृत अथवा बालभाषेचा विचारही व्हावयास पाहिजे, असे म्हणतात. यापुढे क्रमशः व्याकरणातील एकेक विषय घेऊन आपली मते मांडीत-मांडीत ते वाक्यविचारापर्यंत गेले आहेत. प्रत्येक विषयात आपले स्वतंत्र मत मांडून त्याला पूर्वपरंपरेचा आधार देऊन मुख्यतः दादोबांनी घेतलेल्या भूमिकेशी त्या-त्या बाबतीत आपले मतभेद त्यांनी प्रकट केले आहेत. व्याकरणातील सर्व विषय या निबंधात चर्चिले गेले असले, तरी ते समग्र व्याकरण होऊ शकत नाही, हे विसरता कामा नये. वर्णविचार, शब्दांच्या जाती, लिंगवचनविचार, विभक्ती, विशेषणे, क्रियापदे, आख्यातप्रत्यय, साधित धातू, संयुक्त काळ, अव्यये, साधित आणि सामासिक शब्द, कृदन्त-तद्धिते आणि वाक्यरचना हे सारे व्याकरणातील महत्त्वाचे विचार या निबंधांतून स्पर्शिले गेले आहेत व प्रत्येकामध्ये आपले काही स्वतंत्र मत कृष्णशास्त्री यानी प्रकट करून ठेविले आहे. म्हणून पंडिती व्याकरण, नंतरचे दादोबांचे व्याकरण आणि त्यानंतरचे गोडबोले यांचे व्याकरण यांपेक्षा या निबंधांचे महत्त्व आगळे आहे.

## गुंजीकरांचे व्याकरणविषयक लेख

इ. स. १८६७ साली निघालेल्या 'विविधज्ञानविस्तार' मासिकामधून पहिली पाच-सात वर्षे रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनी जे लेखन केले, त्यात 'मराठी भाषा', 'महाराष्ट्र भाषेमध्ये व्याकरण आणि कोश यांची आवश्यकता', 'भरतखंडांतील भाषांविषयीं', 'मराठी भाषेचे कोश', 'आपल्या भाषेची स्थिति' इत्यादी भाषाविषयक लेख आणि मराठी व्याकरणाविषयीचे काही लेख येऊन गेले आहेत. हे लेख अपुरे व त्रुटित असले, तरी उल्लेखनीय आहेत. त्यांनीच पुढे १८८६-मध्ये लहान मुलांकरिता 'सुबोध व्याकरण' लिहिले, आणि १८८९–९०–मध्ये ८ निबंधांमध्ये जी विस्तृत व्याकरणचर्चा केली, ती कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या चर्चेप्रमाणेच महत्त्वाची आहे. तथापि प्रस्तुत कालखंडाच्या कक्षेबाहेर ती जात असल्याने येथे उल्लेखावरच भागविणे प्राप्त आहे.

## राजवाडे यांची टीका

१८८१-मध्ये दादोबांनी आपल्या व्याकरणास एक पूरणिका जोडून आपल्या

व्याकरणाच्या आधीच्या आवृत्तींमधील त्रुटी, गलती किंवा आवश्यक ती पुस्ती यांचा परामर्श घेतला. या पूरणिकेने प्रस्तुत कालखंडामधील व्याकरणाचे पर्व संपले असे म्हणावयास पाहिजे. या कालातील व्याकरणकार्याविषयी राजवाड्यांचे उद्गार त्यांच्या प्रकृतीस धरूनच आहेत. ते म्हणतात, "सारांश, भाषाशास्त्र माहीत नाही, व्याकरणशास्त्र माहीत नाही, वैदिक भाषा माहीत नाही, पाणिनीय माहिती नाही, प्राकृत भाषांशीं गाढ परिचय नाही, अशा स्थितीत मराठीचे व्याकरण रचिले जाण्याची जितपत शक्यता होती, तितपत ती या सर्व लेखनातून गोचर झाली आहे. सगळेच्च आंधळे!"[1] हे पुष्कळसे खरे असले, तरी त्या-त्या व्याकरणकारांचे ऐतिहासिक महत्त्व कमी होत नाही. पहिले 'पंडित' व्याकरणकार किंवा त्यांपेक्षाही दादोबा यांनी मराठी गद्य भाषेचे नियमन करण्याच्या दृष्टीने जे प्रयत्न केले, त्यांमुळे मराठी ग्रंथलेखनाच्या भाषेला निश्चित असे शुद्धतेचे वळण लागले; त्यामुळे राजवाड्यां-सारख्यांची भाषाही घडत आली, आणि मराठीमधील गद्यवाङ्मयाचे शरीर सुडौल होण्यास फार साहाय्य झाले आहे, हे कोणासही अमान्य करिता येणार नाही. वाङ्मयेतिहासामध्ये वस्तुतः या विषयास फारसे महत्त्व नसतानाही त्याचा या ठिकाणी जो काहीसा विस्ताराने परामर्श घेण्यात आला आहे, त्याचे कारणही असे की, या वेळी भाषेस शुद्धतेचे वळण लावण्याचे जे प्रयत्न झाले, त्यामुळे मराठी गद्य हे हळूहळू का होईना, सकस आणि सुंदर होत गेले, आणि पुढील कालात त्यात जे वाङ्मयाचे अनेक ललित प्रकार निर्माण झाले, त्यांना पेलू शकणारी अशी रूपसंपदा त्या भाषेला प्राप्त झाली. भाषेवरील या वैयाकरणांचे हे उपकार केव्हाही विसरता येणार नाहीत; मग त्यांच्या खांद्यावर उभे राहून आपले हात आज कितीही उंच पोहोचलेले असोत!

## प रि शि ष्ट

### एक

*मरांठीमधील पहिले व्याकरण* — "१८१९ साली गोमंतकात एक मराठी व्याकरण तयार झाल्याचा व ते एका हिंदूने तयार केल्याचा उल्लेख सापडतो. 'सत्संग' (कुंभारजुवे) या मासिकाच्या ३ऱ्या वर्षाच्या, १९०४च्या, ४थ्या अंकात 'महाराष्ट्र भाषाभिवृध्यर्थ प्रयत्न' या मथळ्याखाली पुढील मजकूर सापडतो–"मराठी व्याकरण –सखाराम नारायण वाघ यांनी हे पुस्तक स. १८१९त तयार केले. हे गृहस्थ पोर्तुगीज सरकारचे मुख्य दुभाष होते. त्यांस संस्कृत, मराठी, पोर्तुगीज, लातीन, फ्रेंच व इंग्लिश इतक्या भाषा अवगत होत्या. त्या काळच्या मानाने पाहता हे पुस्तक चांगले झाले आहे. मराठी व्याकरण-ग्रंथात हेच पुस्तक बहुधा पहिले असेल. हा ग्रंथ छापलेला

१. राजवाडेकृत तिङन्तविचार, पृ. १–३.

नाही. " ......रा. पांडुरंगराव पिसुर्लेकर यांनी ' मराठी पहिले व्याकरण ' म्हणून मागे विविधज्ञानविस्तारामध्ये ( सप्टेंबर १९१७ ) सखाराम नारायण कामत यांच्या व्याकरणाचा निर्देश केला, ते हेच पुस्तक होय. परंतु हे पुस्तक मराठीतून होते की काय, याविषयी शंका आहे. ते पोर्तुगीज भाषेतून असण्याचाही संभव आहे. "

मराठी व्याकरणाची कुळकथा, अ. का. प्रियोळकर.

## दोन

मुख्य लेखात ज्यांचा उल्लेख झालेला नाही, आणि १८०० ते १८८१-च्या दरम्यान जी व्याकरणविषयक पुस्तके प्रकाशित झाली, त्यांची यादी खाली दिली आहे:

(१) वेंकटमाधवकृत महाराष्ट्रप्रयोगचंद्रिका, १८२७, सशोधक कृ. श्री. अर्जुनवाडकर

( २ ) मरे यांच्या इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप, रा. ज. वसईकर, शुद्ध करणार बाळशास्त्री जाभेकर, मुंबई, १८३७.

( ३ ) मराठी आणि इंग्रजी क्रियापदांच्या काळाचा परिपाठ, अमेरिकन मिशन, मुंबई १८४०, पृष्ठे ९५, इंग्रजी–मराठी.

( ४ ) शब्दसिद्धिनिबंध, दिवेकर-महाजन-जांभेकर, १८४३.

( ५ ) पद्यात्मक व्याकरण, ले. वामनाजी गोविंद लिमये, शिळाछाप, धारवाड, १८७१, पृष्ठे ३६.

( ६ ) व्याकरणसंबंधीं उपयुक्त संग्रह, भास्कर बापूजी आठल्ये, मुंबई, १८७३, पृष्ठे २७.

( ७ ) व्याकरणसंबंधी सोपे धडे, भाग ३रा, ख्रिश्चन व्हर्नाक्युलर एज्युशकेन सोसायटी, मुंबई, १८७४.

( ८ ) मराठी व्याकरणाची प्रश्नोत्तरावलि, नाना शेलार, पुणें, १८७५.

( ९ ) लघु व्याकरण, गोपाळ जिवाजी केळकर, रत्नागिरी, १८७५, पृष्ठे ८४.

(१०) विद्यार्थिबुद्धिवर्धिनी, शंकर बाळकृष्ण दीक्षित, (मराठी कवितेचे व्याकरणविशेष) अलीबाग, १८७६.

(११) मराठी व्याकरणचंद्रिका, रामचंद्र विष्णू सहस्रबुद्धे, पुणे, १८८२.

## तीन

मराठीची प्रस्तुत कालातील ( १८००–१८८१ )

**इंग्रजीमधील व्याकरणे**

( 1 ) A Grammar of the Mahratta Language, William Carey Serampore, 1805.

( 2 ) A Grammar of the Mahratha Language, Mukbah Muhumud Ebraheem, Bombay, 1825.

( 3 ) An Elementary Marathi Grammar for English Beginners, C. N. Seddon, Bombay, 1831.

(4) The Principles of Marathee Grammar, J. Stevenson, Calcutta, 1833.
(5) A Grammar of the Mahratta Language, James R. Ballantyne, Edinburgh, 1839.
(6) A Grammar of the Marathi Language, E. Burgess, American Mission, Bombay, 1854.
(7) A Grammar of the Marathi Language, H. S. K. Bellairs and Askhedkar, Bombay, 1868.
(8) The Student's Manual of Marathi Grammar, Part I & II, G. R. Navalkar, Education Society Press, 1868 and 1869.
(9) Handbook of the Marathi Grammar, Poona City Press, 1872.
(10) Handbook of the Marathi Grammar, G. J. Kelkar, Bombay, 1875.
(11) Student's Marathi Grammar, G. R. Navalkar
( A New and Enlarged Edition of Student's Manual of Marathi Grammar, 1880 ).

**चार**

प्रस्तुत कालखंडातील ( १८००–१८८१ )

**पोर्तुगीज भाषेतील मराठीची व्याकरणे**

(1) Esquisse Garmmaticale de la langue de Goa, Johannes Gonsalves, 1179.
(2) Arte Canarina de Lingua de Norte, Published in 1858.
(3) Grammatica Marastta,
Published in Rome in 1778, in Lisboon in 1805.
(4) Grammatica Maratha Explicada em Lingua Portugeza, Philippe Neri Pires, Bombay, 1854.
(5) Grammatica Maratha, S. A. Deshpande, Goa, 1875.
(6) Grammatica de Lingua Concani por um Missionario Italiano, Noua Goa, 1859.

**प्रस्तुत प्रकरणी संदर्भग्रंथांची यादी**

( १ ) अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, गंगाधर बाळकृष्ण सरदार, आवृत्ती दुसरी, १९५६.
( २ ) मराठी गद्याचा इंग्रजी अवतार, दत्तो वामन पोतदार, दुसरी आवृत्ती, १९५७.
( ३ ) महाराष्ट्र शब्दकोश, प्रस्तावना, विभाग १.
( ४ ) महाराष्ट्र शब्दकोश, प्रस्तावना, विभाग ६.

( ५ ) मराठी-ग्रंथ-सूची, शं. ग. दाते.
( ६ ) भाषाप्रकाश – रामकवि, सं. शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी गद्य-पद्य-माला – २, पुणे विद्यापीठ, १९६२.
( ७ ) मराठी व्याकरणाची कुळकथा, अ. का. प्रियोळकर, १९३६.
( ८ ) महाराष्ट्र भाषेचे व्याकरण, प्रस्तावना, सं. अ. का. प्रियोळकर, १९५४.
( ९ ) मराठी भाषेचे व्याकरणकार आणि व्याकरणप्रबंधकार, मो. स मोने, १९२७.
(१०) जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, ग. गं. जांभेकर, खंड २ व ३.

## प्रकरण चौथे

# पाठ्यपुस्तकांची भाषांतरे

माउंट स्टयुअर्ट एल्फिन्स्टनच्या प्रेरणेने आणि पुढाकाराने निमाण झालेल्या मुंबईची ' हैदशाळा शाळापुस्तक मंडळी ' या संस्थेचा मुख्य उद्देश म्हणजे लोकांच्या स्वतःच्या भाषेतून त्यांना पाश्चात्त्य ज्ञानाचा परिचय करून द्यावा व त्यांची नैतिक पातळी वर आणावी, हा होता. या काली हे काम फार कठीण होते. शिक्षणप्रसारकार्यातील पहिली अडचण योग्य शालेय पुस्तकांचा अभाव ही होती. अशी पुस्तके तयार करणे व ती शिकविणारे योग्य शिक्षक निर्माण करणे ही दोन्ही कामे एकाच वेळी होणे आवश्यक होते. ही दोन्ही साधने तयार झाल्यावरसुद्धा शिक्षणप्रसाराचा मार्ग तेवढासा सुलभ नव्हता. छापील पुस्तकांबद्दल लोकाच्या मनात बसलेली अढी दूर करण्याचे कार्य, शालेय पुस्तके रचून ती छापण्याइतकेच कठीण होते. ख्रिस्ती धर्मप्रसारकांमुळे छापील पुस्तकांबद्दल लोकांना आपुलकी वाटत नव्हती. छापील पुस्तकांच्या प्रसार-कार्यातील दुसरी मोठी अडचण ही होती की, पुस्तके छापण्यासाठी जी शाई वापरली जाई, तीत चरबीचा उपयोग केला जातो, असे समजल्यामुळे लोकांना हा भ्रष्टाकार वाटत असे व त्यामुळे छापील पुस्तकांना स्पर्श करण्यास ते धजत नसत.

**पहिली छापील पुस्तके**

अशा प्रकारे छापील पुस्तकांबद्दल असलेल्या या विचित्र कल्पना व दुराग्रह लक्षात घेऊन पुस्तक छापण्याच्या कामी शाळापुस्तक-मंडळीला हात घालावा लागला. सर्वप्रथम छापिलेली पुस्तके ' पंचोपाख्यान ' व ' विदुरनीति ' ही होत. ' पंचोपाख्यान '

हे संस्कृत पंचतंत्राचे भाषांतर. "सर्वजनांस व्यवहारनीतीचें ज्ञान व्हावें आणि भाषण-रीतीहि कळावी म्हणोन हा कथारूप ग्रंथ" १८२२-मध्ये तयार झाला. त्यानंतर 'विदुरनीति' या पुस्तकाचा क्रम लागला. छापील पुस्तकांबद्दलचा तत्कालीन लोकांच्या मनातील संशय दूर करण्यासाठी या पुस्तकाची निवड झाली. "महाबुद्धिमान परमसाधू पुण्यकीर्ती विदूर धृतराष्ट्र राजास राजधर्म राजनीति सांगता जाला ती भारतामध्ये उद्योगपर्वी तेहतीसापासून चाळीस अध्यायपर्यन्त श्री. वेद-व्यासानें संक्षेपे वर्णिली. त्यांतील आशय घेऊन महाराष्ट्र भाषेंत हा ग्रंथ केला आहे."

पंचतंत्राचे भाषांतर म्हणून 'पंचोपाख्यान' व महाभारतातील काही भाग म्हणून 'विदुरनीति' लोकांना जवळची वाटतील अशी शाळापुस्तक-मंडळीची कल्पना होती. या पुस्तकांच्या पुष्कळशा प्रती फुकट वाटण्यात आल्या. तसेच, 'कूरिअर' नामक वर्तमानपत्रात खालील जाहिरात दिली गेली.

"वीकावयाकरितां बहुतेक बुके महाराष्ट्र ग्रंथाचीं पंचोपाख्यान व विदुरनीतोचीं आहेत. याची कींमत रुपये ८ इंग्रेजसाहेब लोकांस व गांवचे लोकांस रुपये ३ आणि वीदुरनीति साहेब लोकास रुपये ६ व गांवचे लोकांस रुपये २ प्रमाणे हर कोणास पाहीजे असल्यास कौरीयर हाफिसांत येऊन पांडुरंग दळवी हेड परभु याजवळ मिळेल तारीख ३ आक्टोबर सन १८२३."

## हेतू—उपयुक्त ज्ञानप्रसार

शिक्षणप्रसाराचा प्रारंभ म्हणून पुराणांतील गोष्टी लोकांना वाचावयास दिल्या, तरी तेवढ्याने आपला उद्देश सफल होणार नाही, याची एल्फिन्स्टनला कल्पना होती. उपयुक्त ज्ञानप्रसार करणारी अशी छापील पुस्तके लोकांच्या हाती जावी, अशी त्याची इच्छा होती. देशभाषांचे कोश, व्याकरणे, तसेच गणित, ज्योतिष, सिद्धपदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, भूगोल, इतिहास इत्यादी विषयांवर देशभाषांमधून लहान-लहान पुस्तके निर्माण व्हावी, अशी त्याची कल्पना होती. नीतिविषयक पुस्तकांचा फैलाव होईल तितका थोडाच, असे त्याला वाटे; कारण बालविवाह, बालहत्या, लग्नसमारंभाच्या वेळी केला जाणारा अतोनात खर्च, सतीची चाल, बळी देण्याची पद्धती या सर्वांचे दुष्परिणाम लोकांच्या मनावर ठसवावयाचे आणि त्याच्या जोडीला पाश्चात्त्य शास्त्रीय विषयांची माहिती लोकांना करून द्यावयाची, असा त्याचा दुहेरी हेतू होता. अशी उपयुक्त पुस्तके रचणारी मंडळी भाडोत्री असून भागणार नाही; तर ज्यांना खरोखरीच लोककल्याणाची कळकळ आहे अशा लोकांकडूनच ही पुस्तके लिहवून घ्यावी, अशी त्याची सूचना होती. त्यासाठी लेखकांना काही तरी आमिष दाखवावे लागेल, म्हणून बक्षिसांची पद्धती असावी, असेही त्याने सुचविले. याच संदर्भात एल्फिन्स्टनने

छापखान्याविषयी व्यक्त केलेली मते आजही विचार करण्यासारखी आहेत.[१]

**ग्रंथनिर्मिति-योजना**

एल्फिन्स्टनच्या धोरणानुसारच मुंबईची शाळापुस्तक-मंडळी शालेय पुस्तकांच्या निर्मितीच्या क्षेत्रात काम करू लागली. या मंडळीने नेमिलेल्या खास ग्रंथ-समितीने एक अहवाल तयार केला व त्यात व्याकरणाची चालचलाऊ माहिती करून देणारे छोटेसे पुस्तक, भाषेतील महत्त्वाच्या तीन-चार हजार शब्दांचा लहानसा कोश, काही बोधकथा, नीतिदर्शक वाक्यावळी, व्यावहारिक अंकगणित, हिंदुस्थानचा इतिहास व भूगोल, खगोलाची शास्त्रीय माहिती, पदार्थविज्ञान इत्यादी विषयांवर लहान-लहान शालोपयोगी पुस्तके तयार करण्याबद्दल सूचना दिल्या. शाळापुस्तक-मंडळीने हा अहवाल व 'कलकत्ता स्कूल-बुक सोसायटी'चा अनुभव विचारात घेतला व "ग्रंथाचीं भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसाविषयींचे प्रसिद्धिपत्र" (१८२५) तयार केले. या प्रसिद्धि-पत्रकात कोश, व्याकरण, तसेच गणित, शिल्पकला, ज्योतिष, सिद्धपदार्थविज्ञान, रसायन, शारीर, वैद्यक, देशवृत्तान्त, राजनीती इत्यादी सर्व विषयावरील इंग्रजी पुस्तकाची यादी देऊन त्या पुस्तकांवरून अगर स्वतंत्ररीत्या मराठी भाषेत शालोपयोगी पुस्तके तयार करावी, अशी सूचना दिली. स्वतंत्र अगर भाषांतरित पुस्तके रचणाऱ्याला पुस्तकाची योग्यता व उपयुक्तता पाहून शंभर ते पाच हजार रुपयांपर्यंत बक्षिसे देण्याचे आमिष दाखविले. अशी पुस्तके प्रथमच तयार होत असल्यामुळे त्यांतील विषय व पद्धती यांबरोबर त्यांची भाषा कशी असावी, हासुद्धा एक महत्त्वाचा प्रश्न होता. सार्वत्रिक शिक्षणप्रसारार्थ ही पुस्तके उपयोगात आणावयाची असल्यामुळे जी देशभाषा सर्व लोकांना समजते, ती ग्रंथास द्यावी. "प्रौढ भाषेचे शब्द घालून दाटून अवघड करू नये. आणि जर त्या भाषेत हावेत तसे शब्द मिळत नाहींत तर ते त्यांच्या मूळ भाषेंतून घ्यावे ते असे कि मराठी व गुजराथी यांस संस्कृतांतून आणि हिंदुस्थानीस अस्सल पारशींतून शब्द घ्यावे. कदाचित् देशभाषेंत किंवा मूळ भाषेतही जा अर्थास रूढ अथवा यौगिक शब्द लागत नाहींत तेथें इंग्रजी शब्दही घेतल्यास चिंता नाहीं"[२] या सूचना आजही अत्यंत उपयुक्त अशा आहेत.

1. "That the press may, in a long succession of ages cause the natives to throw off our yoke is possible and even probable, but it will in the first place destroy the superstitions and the prejudices of the natives and remove the pressing dangers created by the entire and marked separation between them and their conquerors and this effect is certain, while the other is problematical. The establishment of printing presses, therefore,...is highly desirable." (G. D. Vol. 2, 1821-23, p. 410.)

२. ग्रंथांची भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसाविषयीचे प्रसिद्धिपत्र, १८२५, पृ. ५.

शालोपयोगी भाषांतरित वाङ्मय निर्माण होण्यात या प्रसिद्धिपत्राचा फार मोठा वाटा आहे. बक्षिसाच्या आशेने पुष्कळ नवीन लेखक निर्माण होऊ लागले व अनेक विषयांवर नवीन ग्रंथ मराठीमध्ये तयार झाले. ग्रंथनिर्मितीचा हा प्रयत्न पुष्कळ अंशी यशस्वी झाला असे म्हणावयास हरकत नाही. यामुळेच या काळात बाळशास्त्री जांभेकर, बापू छत्रे, हरि केशवजी पाठारे वगैरे एतद्देशीय मराठी व जॉर्ज जर्विस, रॉबर्ट मनी, जे. मोल्स्वर्थ, टॉमस कॅंडी, जॉन मॅक्लेनन इत्यादी परदेशस्थ लोकांनी या कामी लक्ष घालून मराठी भाषेचा कोश, व्याकरण, गणित, पदार्थविज्ञान, रसायन, शारीरशास्त्र इत्यादी विषयांसंबंधी ग्रंथ निर्माण केले.

**सदाशिव काशिनाथ छत्रे**

अशा लेखकांत सदाशिव काशिनाथ छत्रे हे एक होत.[1] 'बोधवचने' ही छोटीशी पुस्तिका मुलांना व्यावहारिक नीतिनियम सांगण्यासाठी त्यांनी लिहिली. 'विद्यावंताची गरज सर्वांस लागत्ये,' 'जो मूल विद्याभ्यास करितो, त्यावर सर्व लोक प्रीति करितात.' इत्यादी विद्येची थोरवी सांगणारी वचने, तसेच 'आई, बाप, गुरू, धणी, यांणीं काम सांगतांच करावें, त्यास बयाद सांगूं नये,' 'बायकांचे मंडळींत बसो नये,' 'मिठाई मेवे खाण्याचा जिभेस सवका लावूं नये,' 'कोणाची चहाडी करूं नये,' 'लोंचाचा वेव्हार ठेवूं नये,' वगैरे नीतिनियम शिकविण्यासाठी ही पुस्तिका त्यांनी रचिली. तथापि "गलत्कुष्ठ्यास स्पर्श करावयास भितोस तसा तूं दुसऱ्याच्या धर्मास स्पर्श करावयास भी. प्रतिष्ठित मनुष्यास दुसऱ्याचा धर्म घेण्याहून दुसरी मोठी बेअब्रू नाहीं," यासारखी वचने तत्कालीन ख्रिस्ती धर्मोपदेशकांस फार झोंबली व त्यांनी त्यांवर कडक टीकाही केली.

'बोधकथा' हे ताराचंद दत्त यांच्या Pleasing Tales या पुस्तकाचे भाषांतर होय. मनुष्यामध्ये असणाऱ्या दुर्गुणांमुळे होणारे तोटे व सद्गुणांमुळे होणारे फायदे यांवर आधारलेल्या या कथा छत्रे यांनी मराठीत आणिल्या. मुलांप्रमाणे त्यांच्या आईबापांनाही या कथांत मार्गदर्शन केलेले आढळेल.

'इसप-नीतिकथा' हे Croxall याच्या Aesop's Fables या इंग्रजी पुस्तकाचे भाषांतर. प्रत्येक कथेच्या शेवटी 'तात्पर्य' जोडलेले दिसेल. मूळ कथांत

१. सदाशिव काशिनाथ छत्रे (१७८८–१८३०), मुंबई–व्यंकोबा नाईक यानी छत्रे यांना उत्तेजन देऊन त्यांच्याकडून इंग्रजीचा अभ्यास करविला. काही दिवस इंजिनिअरच्या ऑफिसमध्ये "रैटर" म्हणून काम केले. १८२३-मध्ये शाळापुस्तक मंडळीचे (नेटिव्ह स्कूल-बुक सोसायटी) नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून नेमणूक. १८३०-मध्ये या जागेचा त्यांनी राजीनामा दिला. सरकारी शाळांचे पर्यवेक्षक म्हणूनही यांनी काम केले. ग्रंथ – मराठी बोधवचने, बोधकथा (१८३०), वेताळपंचविशी (१८३०), इसपनीतिकथा (१८२८), बाळमित्र, भाग १ (१८२८), सिंहासनबत्तिशी (१८२४).

जी ग्रीक देवतांची नावे होती, ती काढून त्यांच्याऐवजी हिंदू देवांची नावे छत्रे यांनी दिली आहेत.

बापू छत्रे यांचे नाव ज्या एका शालोपयोगी कथात्मक ग्रंथामुळे अजरामर राहील, तो म्हणजे ' बाळमित्र ' होय. Berquin's Children's Friend या फ्रेंच ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतराचा हा मराठी तर्जुमा आहे. या ग्रंथाला त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेवरून त्यांची शिक्षणविषयक शास्त्रीय दृष्टी, बालमनाचा सखोल अभ्यास, मानसशास्त्रदृष्ट्या मुलांच्या आवडीनिवडी इत्यादी गोष्टींवर चांगला प्रकाश पडतो. " हा ग्रंथ मुलांस पढविल्यानें त्यांस लहानपणापासून अनायासानें बोलायाचा अभ्यास होईल, त्यांचा शब्दसंग्रह वाढेल, त्यांस अनेक व्यवहार, अनेक रीति, नीति समजतील, बुद्धि सदसद्विचारक्षम होईल, त्यांचें हृदय कोमल होईल, मातापितरांचा ठायीं त्यांचा प्रेमा वाढेल, बहिणभावंडांचा ठायीं त्यांची प्रीति वाढेल, ईश्वरीं भक्ति वाढेल, पुढें मोटमोठ्याला विद्या शिकावयास सुगम होतील. सांप्रत त्यांचे हातीं जे ग्रंथ पडतात ते त्यांचे बुद्धींत भरावयास अवघड आहेत. या ग्रंथापासून जसा उपदेश मनांत भरेल तसें अन्य ग्रंथांपासून होणार नाहीं; ते समजुतीस खोल, अभिरुचीस रुक्ष, उपदेशास तीक्ष्ण, मुलांचे चित्तांत वाचण्याविशीं तसी प्रीति उत्पन्न करणार नाहींत. या ग्रंथीं तसें नाहीं. येथें त्यांची भाषा, त्यांचे खेळ, त्याचे उद्योग, त्यांचीं अपेक्षिते, सांगितल्यामुळें त्यास वाचतां वाचतां आवड उत्पन्न होऊन, इकडे त्यांस नकळत सहज चांगले गुण लागावे. म्हणोन यास बाळमित्र नांव योग्य आहे, "[१] ... या शब्दांत त्यानी आपल्या पुस्तकाची भूमिका मांडिली आहे. मुलांसाठी या गोष्टी भाषांतरित केलेल्या असल्यामुळे त्यांनी त्यांची 'भाषाहि बाळबोध योजिली आहे. ' मूळ ' फराशिशी ' अगर ' इंग्रजी ' भाषेतील पुस्तकात 'जो रस झाला आहे तो रस मराठी भाषेंत कसा होईल ? जा भाषेस आज दिवसपर्यंत व्याकर्ण, कोश कोणी केलेच नाहीत; जींत शब्दसंग्रह थोडा, जीची बोलायाची शैली प्रौढ नव्हे ' अशा मराठी भाषेंत ' माझें भाषांतरहि यथामति आहे, ' अशी कबुली जरी त्यांनी दिली, तरी या पुस्तकाच्या भाषेबद्दल प्रसिद्ध व्याकरणकार दादोबा पांडुरंग लिहितात[२]—

' या गृहस्थांनीं पूर्वी मी मराठी शाळेंत असतां Aesop's Fables ( इसपनीतिकथा ) आणि Berquin's Children's Friend या ग्रंथाचें 'बाळमित्र ' या नांवाचें भाषांतर केलें होते व ते ग्रंथ पुष्कळ वर्षेपर्यन्त सर्व मराठी शाळांत चालू होते. हे दोन्ही ग्रंथ फार सुरस झाले होते. तीं भाषांतरे असे त्या वेळेस कोणास वाटत नसे. मराठींत सरस रीतीनें फक्कीकेत लिहिणारे हेच पहिले. त्याच्यामागून आम्हीं सर्व लिहिणारे झालो.... '

१. बाळमित्र, भाग १, प्रस्तावना, सदाशिव काशिनाथ छत्रे.

२. दादोबांचें आत्मचरित्र, पृ. ६०.

महाराष्ट्र भाषेंत शुद्ध रीतीनें वाक्ययोजना करून रसभरित असे पहिले ग्रंथ सदाशिव काशिनाथ छत्रे यांनी रचिले; 'म्हणोन त्यांस गद्यात्मक ग्रंथाचे जनक म्हटल्यासहि चालेल,' या शब्दांत दादोबांनी छत्रे यांच्या भाषेबद्दल गौरवोद्गार काढिले आहेत.

छत्रे यांचे चरित्रकार श्री. बा. ना. देव यांनीही त्यांचे लेखनचातुर्य व मराठी भाषेतील प्रावीण्य यांविषयी म्हटले आहे :

"या वेळी बापूसाहेबांची मराठी भाषेतल्या प्रवीणतेविषयी मोठी ख्याती होती... मूळ विषय मनोरंजक असून बोधकारक व नीतिशिक्षाप्रचुर आहे; त्यात भाषांतरकार पूर्ण रसिक, मार्मिक आणि उत्तम भाषावेत्ते; तेव्हा अशा स्थितीत या दोन पुस्तकांची रूपांतरे इतकी सर्वोत्कृष्ट उतरली आहेत की,... त्यांच्या तोडीची दुसरी पुस्तके फार क्वचित दाखविता येतील असे वाटते. सुबोध, सरळ आणि सुरम्य अशा भाषापद्धतीबद्दल तर त्यांचे अग्रस्थान आजपर्यंत ढळले आहे, असे अद्याप कोणासही वाटत नाही. अशा भाषेचा ही पुस्तके नमुना होऊन बसली आहेत. उत्तम भाषेची गोष्ट निघाली की लोकांस त्यांची आठवण होते... या दोन ग्रंथांची रचना बापूसाहेबांनी अर्वाचीन लेखनपद्धतीप्रमाणे प्रथम केली, म्हणून त्यांस गद्यग्रंथांचे जनक म्हणतात..."[१]

'बाळमित्र' भाग २ (१८३३) हा गेस्फोर्ड नामक गृहस्थाने इंग्रजीवरून मराठीत आणिला. हा भागही पहिल्या भागाइतकाच सुबोध आहे. तो गेस्फोर्ड याने भाषांतरित केला की कोण्या शास्त्र्याने त्याला लिहून दिला, असा संशय येण्याइतके हे भाषांतर सरस झाले आहे.

### बालोपयोगी कथा

छत्रे यांच्या बाळमित्रादी बोधप्रधान कथावाङ्मयाप्रमाणेच, शुद्ध नीतिपाठ देणारी अशी काही पुस्तके एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धात तयार झालेली आढळतात बाळशास्त्री जांभेकरांनी बंगालीवरून 'नीतिकथा' (१८३१) भाषांतरित केल्या. 'बोधकथा' व 'नीतिकथा' एकत्र करून 'नीतिबोधकथा' प्रसिद्ध झाल्या. लहान-लहान वाक्यांत नीतिनियम गुंफून ते मुलांकडून पाठ करवून घेण्यासाठी 'लघुहितोपदेश' (आ. २, १८३८) निर्माण झाला. 'तू आपल्या शेजाऱ्यांवर आपणसारखी प्रीती करीत जा,' 'पाण्यापासून शरीर मात्र स्वच्छ होते, परंतु आत्मा पवित्र होत नाहीं,' इत्यादी खिस्ती तत्त्वज्ञानाची छाप असलेली वाक्ये या पुस्तकात आढळतात. म्हणूनच की काय, बाबा पदमनजींनी या पुस्तकाची 'अरुणोदया'मध्ये वाखाणणी केली आहे.[२] तसेच, विष्णुशास्त्री बापट यांनी

१. विविधज्ञानविस्तार, १९००, पृ. ३१९–२०.
२. अरुणोदय, बाबा पदमनजी, पृ. १७–१८.

'नीतिदर्पण' (१८३७) व 'बालोपदेश-कथा' (१८३८) हे दोन गोष्टीरूप ग्रंथ लिहिले. 'मराठी शाळांवर पढणाऱ्या मुलांस नीतिज्ञान व्हायाजोगे ग्रंथ फार थोडे आहेत, असा अभिप्राय मनांत आणून त्यांस सांप्रतचे राज्यकारभारासंबंधीं नीतिज्ञान होण्याकरिता' 'नीतिदर्पण' हा ग्रंथ लिहिला गेला. तत्कालीन सर्व पुस्तके भाषांतरित असत. हे पुस्तक स्वतंत्र रीतीने लिहिलेले आहे. स्वतंत्र ग्रंथरचनेचा पहिला प्रयत्न या दृष्टीने या ग्रंथाला विशेष महत्त्व आहे. या ग्रंथात 'बामणाची गोष्ट', 'सोनाराची गोष्ट', 'पटेलाची गोष्ट' अशा जातवार व धंदेवार कथा लिहिलेल्या आहेत. या कथांच्या द्वारा सामाजिक व राजकीय विषयांची उपयुक्त माहिती देऊन लोकांना व्यसनांपासून दूर राहण्याचा उपदेश लेखकाने केलेला आहे. त्याचप्रमाणे 'या देशातील गृहस्थांचे मुलास चांगला मार्ग लागून लहानपणापासूनच सदाचरणाकडे लक्ष लागावे' म्हणून बालकास हितोपदेशाच्या गोष्टी 'बालोपदेश-कथा' या पुस्तकात सांगितल्या आहेत.

## रे. फरारचे मार्गदर्शन

तत्कालीन सामाजिक दोषांची जाणीव करून देण्यासाठी व 'कंपनीचे राज्य' झाल्यामुळे लोकांचे कोणकोणते फायदे होत आहेत, हे सांगण्यासाठी 'वाटसराची गोष्ट' (१८३८) व 'जागती जोत' (१८३८) ही दोन पुस्तके रे. फरार नामक ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या मार्गदर्शनाने अनुक्रमे राघो नारायण देवळे व रामचंद्र अमृत दुगल या दोघांनी लिहिली. 'वाटसराची गोष्ट' या पुस्तकात कर्ज काढून लग्न केल्याचे दुष्परिणाम, सरकारने जकात माफ केल्यामुळे झालेले फायदे, बंडखोर व लुटारू लोकांचा बंदोबस्त, देशी व विदेशी नागरांतील फरक, देशी व विलायती गाड्यातील फरक, कापसाची पैदास, रस्ते दुरुस्त करण्याची आवश्यकता इत्यादी विषय कथा-रूपाने चर्चिलेले आहेत. 'जागती जोत' या पुस्तकातसुद्धा 'शेतपोत रीतभात याविषयी संवाद' आहे. या दोन्ही पुस्तकांचा हेतू स्तुत्य होता. मुलांना, विशेषतः शेतकरी मुलांना लिहिणे-वाचणे आलेच पाहिजे, या गोष्टीवर भर दिलेला आहे. 'जागती जोत'मधील प्रभाकर 'पाद्रीचे मराठी शाळेत' गेला व पुढे प्रभाकरपंत होऊन शेतकऱ्यास उपदेश करता झाला; 'लिहिण्याचा उपयोग सर्वोत्तम आहे. प्रथम लिहिणे शिकून व्याकरणाचा अभ्यास केला, तर भाषा शुद्ध बोलतां येते. तूं कदाचित् म्हणशील किं सर्व काय व्याकर्णच शिकत असतात तर त्याचे उत्तर मी तुला असे देतों किं व्याकर्ण शिकल्यावांचून अगदी शुद्ध बोलतो असा कोणी नाहीं'...[1]

## हरि केशवजींचा 'शालोपयोगी नीतिग्रंथ'

उपदेशपर वाङ्मयात भर घालणारा या काळातील आणखी एक ग्रंथ म्हणजे Chamber's Moral Class-Book-चे हरि केशवजी पाठारे यांनी केलेले 'शालोपयोगी

१. जागती जोत, पृ. ४४.

नीतिग्रंथ' (१८४६) हे भाषांतर होय. भाषांतरकाराने अक्षरशः भाषांतर न करिता तारतम्याने अनावश्यक भाग गाळण्याचे धोरण ठेविल्यामुळे मूळ पुस्तकातील ख्रिस्तीधर्मविषयक काही भाग व धर्मसंबंधी गोष्टी भाषांतरातून वगळल्या आहेत. मूळ पुस्तकातील एका गोष्टीमधील जेम्स व रॉबर्ट हे खंडू व महादू, तर दुसऱ्या गोष्टीतील रॉबर्ट व फ्रँक हे राघू व विसू बनले. प्रादेशिक वातावरण निर्माण करण्याच्या दृष्टीने हे ठीकच झाले. उत्कृष्ट भाषांतरकार म्हणून सरकारदरबारी हरि केशवजींना [1] मान्यता मिळालेली असल्यामुळे या ग्रंथाचे काम खास त्यांच्याकडे देण्यात आले होते. त्यांचे हे भाषांतर उत्कृष्ट उतरले आहे.

## सरकारी अधिकाऱ्यांचे प्रयत्न

वर उल्लेखिलेली व इतर उपदेशपर पुस्तके लिहून घेण्यात तत्कालीन सरकारी अधिकाऱ्यांनी अनेक धोरणे सांभाळिली होती. या पुस्तकांचा प्रचार व प्रसार खेड्यापाड्यांत व्हावा, हा एक हेतू असल्यामुळे त्या जीवनाला उपयुक्त अशी माहिती या पुस्तकांत असणे जसे आवश्यक होते, तसेच ही पुस्तके खेडवळ मुलानी वापरावयाची असल्यामुळे त्याची भाषा साधी व सोपी असणे जरूर होते. ही पुस्तके लिहिणारे बहुतेक लेखक संस्कृतज्ञ असल्यामुळे त्यांची भाषा संस्कृतप्रचुर असणे साहजिक होते. ती तशी नसावी, यासाठी सरकारी पातळीवरून प्रयत्न केले जात होते. शाळापुस्तकमंडळीशिवाय खाजगीरीत्या जी पुस्तके तयार होत होती, ती या पुस्तकांपेक्षा सोपी होती. तशा प्रकारच्या सोप्या भाषेतील पुस्तके तयार करवून घेण्याचे सरकारी अधिकाऱ्यांचे धोरण होते. लोकशिक्षणाकडे कळकळीने पाहणाऱ्या वॉथेन नावाच्या एका अधिकाऱ्याने तर 'नीतिदर्पणा'सारखा ग्रंथ स्वखर्चाने छापून प्रसिद्ध केला!

## शाळापुस्तकमंडळ

इंग्रजी अमलाच्या सुरुवातीपर्यंत महाराष्ट्रातील लोकांमध्ये भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाची लालसा मुळीच नव्हती; किंबहुना, ते या ज्ञानाविषयी उदासीन होते. इहलोकीच्या नश्वर वैभवापेक्षा परलोकातील शाश्वत सुखाची विवंचना करण्यातच आमच्यातील

---

१. हरि केशवजी पाठारे (१८०४–१८५८), मुंबई, रे. केनी यांच्या हाताखाली उच्च प्रतीचे इंग्रजी शिक्षण. कॅ. जर्विस यांच्या एंजिनिअरिंग शाळेमध्ये कारकून. बाबा व्यासनामक शास्त्र्यांच्या हाताखाली संस्कृताचा अभ्यास. १८२९-मध्ये ठाणे कोर्टात हेड क्लार्क व मराठी ट्रॅन्स्लेटर. शाळापुस्तक-मंडळीच्या ग्रंथप्रकाशन-समितीचे सभासद १८३१ ते १८५१-पर्यंत. ग्रंथ — सिद्धपदार्थविज्ञानविषयक संवाद (१८३३), रसायनशास्त्रविषयक संवाद (१८३७), इंग्लंडचा वृत्तान्त (१८३८), यात्रिक-क्रमण (१८४१), शालोपयोगी नीतिग्रंथ (१८४६), शिक्षालाभनिबंध, देशव्यवहारव्यवस्था (१८५४). शिवाय, १८५२-मध्ये मराठी ज्ञानप्रसारकसभेचे उपाध्यक्ष असताना सभेच्या वतीने तयार झालेल्या क्रमिक पुस्तकांत सहकार्य.

विचारवंत गढून गेलेले असत. सृष्टीतील अनंत चमत्कारांचा शोधपूर्वक अभ्यास करण्यापेक्षा भक्तियुक्त अंत:करणाने सृष्टिकर्त्याच्या सगुण स्वरूपाचे ध्यान करणेच त्यांना अधिक श्रेयस्कर वाटे. यामुळे एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत हिंदुस्थानातील इतर भाषांप्रमाणे मराठी भाषेतही शास्त्रीय ग्रंथलेखनाचा परिपाठ पडला नाही. १८२२-मध्ये मुंबईची 'हैदशाळा शाळापुस्तक-मंडळी' स्थापन झाल्यापासून ही परिस्थिती पालटली. देशी भाषांच्याद्वारा एतद्देशीय लोकांना भौतिक शास्त्रांचे ज्ञान करून देण्याला सुरुवात झाली. किंबहुना, भौतिक व इतर शास्त्रांचा एतद्देशीयांना परिचय करून देणे हे नव्या शिक्षणाचे एक उद्दिष्ट होते, असे म्हणावयास हरकत नाही. शाळांतील विद्यार्थ्यांना शास्त्रीय विषय शिकविताना पाठ्य-पुस्तकांची उणीव भासू लागली व ती भरून काढण्यासाठी इंग्रजी पुस्तकांच्या आधाराने मराठी भाषेत शालोपयोगी शास्त्रीय ग्रंथ निर्माण होऊ लागले. शाळापुस्तक-मंडळीच्या 'प्रसिद्धिपत्रा'मध्ये ज्या इंग्रजी पुस्तकांची यादी दिली होती, तीत गणित, शिल्पकला, ज्योतिष, सिद्धपदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, शारीर-वैद्यक इत्यादी विषयांवरील पुस्तकांची मराठी भाषांतरे होण्याची अपेक्षा होती व त्याप्रमाणे पुढील काळात ती तयार झाली.

### जॉर्ज जर्विस

अशा पुस्तकांत कॅप्टन जॉर्ज जर्विस[1] यांनी जगन्नाथशास्त्री याच्या साहाय्याने Lord Brougham याच्या A Treatise on the Object, Advantages and Pleasures of Knowledge या ग्रंथाचे 'विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयाचे संवाद' (१८२९) या नावाने केलेले भाषांतर एक होय. यात विद्या मिळविल्याने कोणता फायदा होतो, त्याची उपदेशपर चर्चा करून नंतर विद्येचे शिक्षा-मालाविद्या, जडविद्या व नीतिविद्या असे तीन भाग पाडलेले आहेत. पुढे शिक्षामालाविद्या व जडविद्या 'यांचे सत्यतांतील भेद' सांगितला आहे. तो असा की, 'शिक्षामालाविद्येस

१. जॉर्ज रिस्टो जर्विस (१७९४–१८५१) – १८०८-मध्ये वूलिच येथील रॉयल मिलिटरी ॲकॅडमीमध्ये कॅडेट म्हणून नेमणूक; १८११ – हिंदुस्थानात आगमन; १८२२ – चीफ एंजिनिअरचा ॲसिस्टंट म्हणून नेमणूक; मुंबईच्या शाळापुस्तक-मंडळीशी संबंध व चिटणीस; १८२३–एंजिनिअरिंग इन्स्टिट्यूटची स्थापना; १८४३ – ४९ बोर्ड ऑफ एज्युकेशनचा सभासद; इंग्रजी-मराठी-माध्यमवादात मराठीचा पुरस्कर्ता. 'मराठीचे व्याकरण' तयार करविले – घगवे, क्रमवंत, फडके यांजकडून. ग्रंथ — गणितकृति अथवा गणितमार्ग (आ. २, १८२६), गणित, दुसरा भाग, अपूर्णांक (१८२६), गणित वहिवाटवहि आणि नाण्याचे तपासणीचे वर्तमान (१८२८), शिक्षामाला (१८२७), डमार्गन याचा अंकगणिताचा मूळपीठिका (१८५०), डमार्गन याचा बीजगणिताचा मूळपीठिका (१८४८), कर्तव्यभूमिति (१८२६), आदिकरण-भूमिति (१८४९), विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयांचे संवाद (१८२९).

जड पदार्थांचे स्वभाव आणि सत्ता यांचे आधाराचे प्रयोजन नाहीं. पण जडविद्येस सर्व प्रकारें तें निश्चय पाहिजे.' त्याचप्रमाणे 'असा दुसरा एक त्या विद्यांत भेद आहे तो हा किं, शिक्षामाला ज्या सत्यता दाखविती त्या अवश्य तशाच आहेत, त्या स्वतःसिद्ध आहेत,......परंतु ज्या सत्यता जडज्ञानेकरूनच कळतात......त्या सत्यतांस कर्मनिश्चय वास्तविक आधार आहे; तो कर्मनिश्चय प्रत्यक्षानें आणि अनुभवाने कळतो, त्या सत्यता कदापि केवळ तर्केंकरूनच सिद्ध होत नाहींत.'[1] अशा प्रकारे विषयनिरूपण करून भाषांतरकार शेवटी लिहितो: 'या सर्व ग्रंथावरून हे सिद्ध होते किं विद्येचे हर्ष आणि विद्येचे लाभ हे दोनही जोडफळासारिखे संयुक्त आहेत, कधींही ते एकमेकास सोडीत नाहींत; आणखी ते दुसऱ्या सर्व हर्षाहून परमविरूप आहेत, म्हणोन इतर हर्ष जसे आत्म्यास नीच पदवी देतात तसें न करितां हे त्यास सर्वोत्कृष्ट संतोषी आणि सर्वोत्कृष्ट पवित्र असा करितात; आणिखी आपणास लाभ व्हावा या लक्ष्यानें किंवा आपला स्वधर्म आहे या लक्ष्यानें आपलें मन जा उद्योगानें संतोष आणि पुण्य यांचा मार्गाकडे सरळ जाईल अशा उद्योगांत लावावें. हें सर्व मनुष्यांस अवश्ययोग्य आहे, असेंही सिद्ध होते.'[2]

जर्विसच्या या भाषांतरकृतीची क्लिष्टता व बोजडपणा सहज ध्यानी येण्यासारखा आहे. शास्त्रीय विषयावर तात्त्विक चर्चा करणारा इंग्रजी अमदानीतील प्रारंभीचा ग्रंथ म्हणून या पुस्तकास महत्त्व आहे, एवढेच.

**'सिद्धपदार्थविज्ञान'**

भाषांतरित शास्त्रीय पुस्तकांपैकी हरि केशवजी पाठारे यांचे 'सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद' (१८३३) हे पुस्तक मिसेस मार्सेट यांच्या Conversations in Natural Philosophy या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर होय. 'हरि केशवजी यांची मराठी लिहिण्याची इतकी खुबी होती कीं, हा ग्रंथ इंग्लिश ग्रंथाचें भाषांतर असतांहि तसें त्या वेळेस कोणास वाटलें नाहीं; मुळचाच मराठी ग्रंथ असावा असे बहुतांस वाटावे'[3] या शब्दांत दादोबा पांडुरंगांनी या भाषांतरित ग्रंथाची स्तुती केली आहे. पदार्थविज्ञानशास्त्राची परिभाषा निर्माण करण्याचे अवघड कार्य हरि केशवजींना प्रथमच करावयाचे असल्यामुळे त्यांच्यावर विशेष जबाबदारी होती व ती त्यांनी बव्हंशी यशस्वी रीतीने पार पाडली, असे म्हणावयास हरकत नाही. निर्भेद्यता (Impenetrability), विभाज्यत्व (Divisibility), दार्ढ्य (Density), वैरल्य (Rarity), स्नेहाकर्षकत्व (Attraction of cohesion), सच्छिद्रता (Porosity), लघुपदार्थोर्ध्वगमन (Ascent of light bodies), उच्चलन

१. विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयांचे संवाद, जॉर्ज जर्विस, पृ.३१.
२. विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष, पृ. १५१.
३. दादोबांचे आत्मचरित्र, पृ. ५५.

( Lever ), उच्चालक ( Power ), चालकत्व ( Momentum ), नियताकारत्व ( Elasticity ), टेंका ( Fulcrum ), उच्चाल्य ( Weight ) इत्यादी नवीनच योजिलेले शब्द अर्थपूर्ण आहेत. लेखकासमोर त्या वेळी कोणतीही साधने नसताना व लेखक हे शास्त्र स्वतः शिकलेले नसताना त्यांनी तयार केलेली शास्त्रीय परिभाषा पाहिली की आश्चर्य वाटते.

हरि केशवजींनी केलेले हे भाषांतर जरी शब्दशः असले, तरी प्रसंगानुसार एतद्देशीय वातावरण निर्माण करून शास्त्रीय विषयाचे काटिन्य कमी करण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला दिसतो. उदाहरणार्थ, " What is it that makes the steel buttons on your brother's coat shine ? " याचे रूपांतर ' बरें, देवळास सोन्याचा कळस असतो, तो कशाने चकाकतो ? ' असे केले आहे. अथवा, " we have a convex mirror in the drawing-room, which forms a beautiful miniature picture of the objects in the room, " हे वाक्य ' जगन्नाथ शंकरशेटचे घरांत एक गोलबाह्य आरसा आहे, त्याजमध्ये दिवाणखान्यांतील सर्व वस्तूंची लहान लहान रमणीय प्रतिबिंबें दिसतात, ' या शब्दांत मांडले आहे. शास्त्रीय विषयावरील या ग्रंथात जगन्नाथ शंकरशेट यांचे नाव आणून वास्तवता, जिव्हाळा आणण्याचा भाषांतरकाराचा हा प्रयत्न दिसतो. तत्कालीन पद्धतीप्रमाणे हा ग्रंथ संवादात्मक असून अठरा अध्यायांत विभागलेला आहे. ' अथ प्रथम संवाद पदार्थांचे सामान्य धर्मांविषयीं ' अशी सुरुवात करून ' इति प्रथम संवादः ' या शब्दांत अध्यायाचा शेवट केलेला आढळतो. प्रकरणांचा प्रारंभ व शेवट जुन्या काळानुसार पोथीप्रमाणे केल्याचा हा नमुना आहे. शब्दशः भाषांतर असून परिस्थित्यनुरूप बदल केल्याचे आणखी एक उदाहरण म्हणजे मूळ ग्रंथातील एमिली व कॅरोलिन या विद्यार्थिनींच्या जागी कृष्ण व गोपाळ हे दोन विद्यार्थी आले व त्यांना ' मिसेस बी'ऐवजी ' गुरुजीं'कडून विषयाचे विवरण ऐकविले आहे. मूळ लेखिकेप्रमाणेच हरि केशवजी ग्रंथाच्या शेवटी लिहितात : ' सिद्धपदार्थविज्ञानशास्त्राचे जें कांहीं मला स्वल्प ज्ञान होते, ते म्यां तुम्हास सांगितले, याकरितां आतां या शास्त्राविषयीं आपलें संभाषण समाप्त करावें. तुम्हास जें ज्ञान प्राप्त झाले आहे, तेणेकरून जर तुमचा ठायीं या शास्त्रांत विशेष अभ्यास करावयाची योग्यता आली, तर माझे सांगण्याचे साफल्य होईल. ह्या सिद्धपदार्थविज्ञानशास्त्राचा पठनेंकरून, सिद्धपदार्थयुक्त सृष्टि औदार्याने उत्पन्न करणारा जो प्रभू त्याचे ज्ञान कृपालुत्व इत्यादि गुणाचे ठायीं, मनोवृत्ति परायण झाल्या, तरच त्या पठनापासून सुख होईल, "[१]

वरील शब्दांत व्यक्त केलेली सदिच्छा खरी आहे; तथापि हे व अशांसारखी शास्त्रीय विषयांवरील अन्य पुस्तके निर्माण करण्यातील हेतू वेगळाच होता. तत्कालीन इंग्रज अधिकाऱ्यांच्या मते अशी पुस्तके एतद्देशीय लोकांच्या मनातील पदार्थविज्ञाना-

१. सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद, हरि केशवजी, पृ. ५३७–५७५.

बद्दलचे पूर्वग्रह नाहीतसे करण्यास फार उपयुक्त व्हावी. ही पुस्तके विद्यार्थ्यांच्या हाती देण्यात पुराणोक्त कल्पना घालवून शास्त्रीय पद्धतीने निसर्गातील घटनांचा विचार करावयास लावण्याचा उद्देश, होता हे स्पष्ट आहे.

पहिल्याने उत्साहाच्या भरात पदार्थविज्ञानशास्त्राची माहिती करून देणारे वरील पुस्तक जरी मुलांच्या हाती शालेय पुस्तक म्हणून देण्यात आले, तरी काही काळानंतर असे दिसून आले की, एवढा मोठा पावणेसहाशे पृष्ठांचा ग्रंथ मुलांनी अभ्यासावा, हे त्यांच्या आवाक्याबाहेरचे होते. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन केरो लक्ष्मण छत्रे[1] यांची ' पदार्थविज्ञानशास्त्रातील कितीएक विषयांवर व्याख्याने ' ( १८५२ ) छापिली गेली. हीच व्याख्याने ' पदार्थविज्ञानशास्त्र ' ( १८५७ ) या नावाने प्रसिद्ध झाली. ही व्याख्याने तयार करिताना छत्रे यांच्यासमोर कोणती पुस्तके होती, ते कळण्यास मार्ग नाही. परंतु हरि केशवजी यांचे ' सिद्धपदार्थविज्ञानशास्त्र-विषयक संवाद ' त्यांच्यासमोर असावे असे दिसते; कारण छत्रे यांनी जरी विवरण-पद्धतीने आपले पुस्तक लिहिलेले असले, तरी हरि केशवजी व केरोपंत छत्रे यांच्या लेखनात बरेच साम्य आढळते. छत्रे यांनी हरि केशवजींच्या पुस्तकाचा उपयोग केला असावा, अथवा एकाच इंग्रजी पुस्तकावरून दोघांनीही आपले ग्रंथ तयार केले असावेत. कदाचित विषय एकच असल्यामुळे दोहोत साम्य आले असेल. पण काही वाक्ये दोन्ही पुस्तकांत जशीच्या तशी आढळतात, एवढे खरे. या दोन पुस्तकांची तुलना करिता हरि केशवजी यांचे पुस्तक भाषातरित असल्यामुळे त्यात काही ठिकाणी संदिग्धता आढळते. याचे कारण हे असावे की, भाषांतरकार स्वतः ते शास्त्र शिकलेले नव्हते. परंतु केरोपंत छत्रे स्वतः शास्त्रज्ञ असल्यामुळे त्यांच्या लेखनात संदिग्धता राहण्याची शक्यता फार कमी. या दोन ग्रंथांचे तुलनात्मक विवेचन 'इंदुप्रकाशा'मध्ये पहावयास सापडते.[2] हरि केशवजींनी रसायनशास्त्रावर वेगळा ग्रंथ लिहिला, पण छत्रे यांनी वरील पुस्तकातच पदार्थविज्ञानाबरोबर स्वरशास्त्र, ज्योतिःशास्त्र आणि रसायनशास्त्र यांविषयीसुद्धा माहिती दिली आहे. पदार्थविज्ञानशास्त्रावर लोकहितवादी

१. केरो लक्ष्मण छत्रे ( १८२४–१८८४ ) — एल्फिन्स्टन कॉलेजमधील पहिल्या विद्यार्थ्यांपैकी एक. प्रो. ओर्लेबार व बाळशास्त्री जांभेकर यांचे आवडते शिष्य. १८४०-मध्ये मुंबईच्या वेधशाळेत नोकरी. १८५१ पुणे कॉलेजमध्ये ॲसिस्टंट प्रोफेसर. १८६० अहमदनगर येथील इंग्रजी शाळेत मुख्याध्यापक. १८६२ पुणे ट्रेनिंग कॉलेजचे सुपरिंटेंडंट. १८६५ एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये गणिताचे प्राध्यापक. पुढे डेक्कन कॉलेजमध्ये प्राध्यापक व काही काळ ॲक्टिंग प्रिन्सिपल. १८७९-मध्ये सालीना पाच हजार रुपयांवर निवृत्त. ग्रंथ — पदार्थविज्ञानशास्त्र (१८५२,१८७९), अंकगणित ( १८६० ), भूमापन ( १८६३ ), ग्रहसाधनाचीं कोष्टके ( १८६९ ), पंचांगसाधन-कोष्टके ( १८६१ ), ज्योतिःशास्त्रावर लेख, हवेवरील ग्रंथ, पर्जन्यसंबंधी व्याख्यान ( १८८२ ), कुभ्रमनिर्णय ( १८९६ ).

२. इंदुप्रकाश, पु. २५, अं. ३७, १८८६.

यांनीही ' यंत्रज्ञान ' ( १८५० ) नामक एक पुस्तक लिहिले होते.

## शिल्पशास्त्रीय परिभाषा

शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीच्या या काळात तयार झालेला आणखी एक ग्रंथ ' शिल्पविद्या या विषयाचे निबंध ' ( १८५६ ) हा होय. हे निबंध विल्यम हेन्री बेल याने नारायणशास्त्री जोशी चौलकर यांच्या साहाय्याने तयार केले. हे फक्त तीन निबंध आहेत. त्यांचे सामान्य निरूपण करिताना बेलसाहेब लिहितात, "जो शिल्पविद्येचा भाग यंत्राचीं बीजें आणि स्वभाव यांविषयीं विचार करायला अवधिभूत आहे त्यांत दोन उद्देश आहेत. त्यांचा परस्पर संबंध अति संनिहित आहे. त्या प्रत्येकावरही बळकट लक्ष्य राहिलें पाहिजे. पहिलें उद्देश्य अकृत्रिम शिल्पसाधन किंवा आदिचालक आणि दुसरे यंत्रें किंवा पहिल्या बलास स्वाभिप्रायानुरूप रूपांतरे देणारीं साधनें. या पहिल्या निबंधांत जा सृष्टींतल्या शक्ति आदिचालक रूपाने मिळतात त्यांचा स्वभाव व नियम आणि बलाचे व गतीचे गुण यांचे सामान्यतः वर्णन आहे. यांजवरच पाहणाराने लक्ष्य राखावें. यंत्राचीं बीजें वर्णन करावयास या रीतीचा अनुरोधाने दुसरा निबंध केला आहे." [1] ऊर्ध्वाहतचक्र, पार्श्वाहतचक्र, छिन्नांग, अधराहतचक्र, जलस्थिरविज्ञानीय दमनयंत्र, शूलदंत, नरमळसूत्र, सततसरलगति, गमनापसरण-सरलगति, सततवर्तुलगति, गमनापसरण-वर्तुलगति इत्यादी अनेक पारिभाषिक शब्द या निबंधात आढळतात. ही परिभाषा बेलसाहेबापेक्षा चौलकरशास्त्री यांच्या हातची असणे जास्त संभवनीय आहे. ' सिलिंडराकार'सारखा एकदा धेडगुजरी सामासिक शब्द या निबंधात आढळला, तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे नाही.

शालेय अभ्यासक्रमात समाविष्ट करण्यासाठी शिक्षामंडळीने छापिलेले शास्त्रीय विषयावरील आणखी एक पुस्तक म्हणजे गोविंद गंगाधर फडके यांचे ' यंत्रशास्त्राचीं मूळें ' ( १८५३ ) हे होय. या पुस्तकात ' चलन आणि यंत्रशास्त्र यांचे नियमांचे सविस्तर वर्णन ' आले आहे. पुस्तकाची विभागणी तेरा अध्यायांत केलेली असून शेवटी शब्दपरिभाषा जोडलेली आहे.

' दक्षिणी भाषेंत पुस्तके प्रसिद्ध करणारी मंडळी ' या संस्थेमार्फत शास्त्रीय विषयांवर काही पुस्तके या काळात निर्माण झालेली आढळतात. सखाराम रामचंद्र दीक्षित यांनी विष्णू अमृतराव यांच्या मदतीने रचिलेला ' शास्त्रीय ज्ञानदर्शन ' ( १८५६ ) हा ग्रंथ नमूद करण्यासारखा आहे. हरि केशवजी व कृष्णशास्त्री भाटवडेकर यांच्या तपासणीनंतर हा भाषांतरित ग्रंथ प्रसिद्ध झाला. पुस्तकाच्या शेवटी ' अप्रसिद्ध शब्दपरिभाषा ' जोडलेली आहे. बिंदुस्थान ( Focus ), आगपाणी ( Nitric Acid ), रोगिशाला ( Hospital ), सुरक्षक दीप ( Safty Lamp ), इत्यादी पारिभाषिक शब्द या यादीत आढळतात. वरील संस्थेसाठी ' वर्तमानवाहक

१. शिल्पविद्या या विषयाचे निबंध, विल्यम हेन्री बेल, पृ. ३–४.

विद्युद्यंत्र ' ( १८५९ ) नावाचे एक शास्त्रीय विषयावरील पुस्तक मंडळीचे पंडित कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनी लिहिले. याशिवाय, भाऊशास्त्री थेऊरकरकृत ' वाय्वावरण आणि त्यांतील चमत्कार ' (१८५७), गोविंद नारायण माडगांवकरकृत ' उद्भिज्ज-जन्य पदार्थ ' ( १८५६ ) यांसारख्या पुस्तकांचाही उल्लेख करणे जरूर आहे.

**रसायनशास्त्रविषयक ग्रंथ**

हरि केशवजींनी पदार्थविज्ञानशास्त्राप्रमाणे ' रसायनशास्त्रविषयक संवाद ' ( १८३७ ) मिसेस मार्सेटच्या Conversations on Chemistry या ग्रंथावरून तयार केले. या ग्रंथाची रचना कशी झाली ते खुद्द लेखकानेच ' राजमंत्री स्थानापन्न जेम्स फेरीशसाहेब वास्तव्य मुंबई यांप्रति ' ग्रंथ अर्पण करिताना दिले आहे. ते म्हणतात, ' सिद्धपदार्थविज्ञान जो पूर्वी माझे हातून ग्रंथ झाला तो व हा ग्रंथ आपण इतक्या थोर अधिकारारूढ असतां मला दयेनें, उत्साहानें व आस्थेनें सांगितला व त्याचे जें अवघें मोठें भाषांतर झालें तें पंक्तिशः शोधून शुद्ध करून तर मजवर आपली सर्व प्रसिद्ध कृपा झाली आहे. हे आपले परोपकार मी मनोभावें आठवीत आहे आणि या देशावर सुवर्तमानाचा व सुखाचा सूर्य पूर्ण तेजाने प्रकाशावयास आपल्यासारिख्या प्रकाशितकीर्ति पुरुषांचे यथार्थ स्तुत्य प्रयत्न चालिले आहेत त्यांस ज्ञानकल्याणदायक असें मानून त्याचे आनंदजनक स्मरण वर्तमान व भावी लोकांसही नित्य राहील असा भाव धरून ज्ञानकल्याणप्रवृत्ति करण्याविषयीं अतिकुशल जें शास्त्र त्याचा शुद्धांश अस्मद्देशीय जनास प्राप्त व्हावा या हेतूनें आरंभिलेला व आपल्या साहाय्याने सिद्धीस गेलेला जो रसायन-संवाद भाषांतररूप ग्रंथ आपल्या सकृतज्ञतोद्देशें परम विनयेंकरून अर्पिला असे.'[1] या अर्पणपत्रिकेवरून जेम्स फॅरिश या अधिकाऱ्याने हरि केशवजींना पदार्थविज्ञान व रसायन या शास्त्रांवरील हे दोन्ही ग्रंथ समजावून दिले व मराठी भाषांतर त्यांच्याकडून तयार करवून घेतले, असे दिसते. या वेळी रसायनशास्त्राचे काही प्रयोगही फॅरिशने त्यांना करून दाखविले. अशा या ग्रंथात गुरुशिष्यसंवादरूपाने रसायनशास्त्राची चर्चा केलेली आढळते. गोपाळा, कृष्णा व गुरुजी अशा तीन व्यक्तींमध्ये ही चर्चा आहे. प्रकाश आणि उष्णता अथवा क्लारिक, संयुक्त क्लारिक, वाफेचे यंत्र, इलेक्त्रिसितीचे रसायनरूप व्यापार, आक्सिजन व नैत्रोजन, हैद्रोजन, सल्फर आणि फास्फोरस, कार्बान धातू, आल्केली, मूलरूप पदार्थांचे स्वरूप व रचना, वनस्पतीचे पृथक्करण, जीवरूप पदार्थांची रचना, जीवांचे इंद्रियव्यापार, देहीभवन, पोषण इत्यादी अनेक विषयांचे तपशीलवार विवेचन या ग्रंथात केले आहे. हरि केशवजींनी पदार्थविज्ञानशास्त्राची परिभाषा तयार केली होती, पण तशी रसायनशास्त्राची केलेली दिसत नाही. उलट क्लारिक्-वाहकता, क्लारि-काशय, आक्सीडकरण, आसिडभवन, ग्यासरूपता, निराक्सिजन इत्यादी धेडगुजरी

१. रसायनशास्त्रविषयक संवाद, हरि केशवजी, अर्पणपत्रिका.

समास, ग्यासें, मसला ही इंग्रजी ग्रॅस, मसल या शब्दांची अनेकवचने, वगैरे विचित्र प्रकार आढळतात.

**— आणि त्यातील परिभाषा**

शास्त्रीय विषयाची परिभाषा तयार करण्यास ज्या भाषेत मूळ ग्रंथ लिहिलेला असेल ती परकी भाषा चांगली अवगत असावी लागते. तसेच, मातृभाषेत शास्त्रीय विषयातील नवीन शब्द निर्माण करण्यासाठी संस्कृत भाषेचाही अभ्यास असावा लागतो. हरि केशवजींनी रसायनशास्त्रातील पारिभाषिक शब्द का तयार केले नाहीत, ते कळावयास मार्ग नाही, परंतु या विषयासंबंधी त्यांनी आपले विचार प्रकट केले आहेत. ते लिहितात : “ नवीन संज्ञासंघाताची कोणेके शास्त्रांत प्रवृत्ति करावयास किती आयास लागतील हें तुम्हांस ठाऊकें नाहीं. असे केले असतां सर्व पाठकांस व शास्त्रप्रवर्तकांस पुनः शाळेत जावे लागेल कळलें; जीं नावें कल्पिलीं तीं केवळ नवीन न दिसावीं, याजकरितां त्यांत कित्येक प्राचीन जीं किंचित् दूषित आहेत ती ठेविलीं नसतीं, तर ती अगदी नवी भाषा शिकावयास श्रमाने व स्थिरबुद्धीने थोडके लोक प्रवृत्त झाले असते, आणि शिल्पकर्मकर्ते जे केवळ सामान्यजन, जे शास्त्राध्ययन न करितां संस्कारानें व व्यवहारपद्धतीनें व्यापार करितात, त्यांस त्यांच्या वोळखेचा संज्ञांत केवळ अंतर पडल्यामुळे कांहीं काळ मोठा व्यामोह प्राप्त झाला असता. ”[१] रसायनशास्त्र हा विषयच एकंदरीत एतद्देशीयांना नवीन असल्यामुळे तो विषय व त्याची परिभाषा लोकांना एकदम आकलन होणे कठीण होते. हरि केशवजी म्हणतात त्याप्रमाणे ‘ नवीन युक्ति, विचार परम उपयोगीही असले, तथापि प्राकृत जनाचे बुद्ध्यारूढ व्हावयास बहुत काळ लागत असतो ’ हे खरे आहे.

**‘ अनेक विद्यासंग्रह ’**

वेगवेगळ्या विषयांवर स्वतंत्र अशी पाठ्यपुस्तके तयार होत असतानाच मुलांना अनेक विषयांची एकदम ओळख व्हावी म्हणून ‘ सारसंग्रह ’ ( १८३१ ), ‘ विद्योपक्रमाचा ग्रंथ ’ ( १८४८ ) अशी पुस्तके रचिली गेली. माधवराव मोरोजी व नाना मोरोजी या दोघांनी मिळून ‘ महाराष्ट्र देशांतील मराठी शाळांकरितां ’ ‘ विद्योपक्रमाचा ग्रंथ ’ लिहिला. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे सरकार व पाद्री लोक मराठी व गुजराती शाळा काढीत आहेत, पण त्या भाषांत शालोपयोगी पुस्तकांचा ‘ तोटा ’ आहे. “ यास्तव न्यूनतेची पूर्णता व्हावी म्हणून या ग्रंथाची योजना केली आहे आणि या ग्रंथकर्त्यांनीं जीं पुस्तकें ग्रेट ब्रिटन वगैरे देशांतील विद्यालयांत संमत आहेत त्यांसारिखाच हा ग्रंथ करण्याचा उद्देश धरिला आहे. ”[२] स्कॉटिश मिशनऱ्यांच्या ‘ ज्ञानसंग्रह’नामक पुस्तकातील काही धडे व ‘ दिग्दर्शन ’ मासिकातील काही

१. रसायनशास्त्रविषयक संवाद, हरि केशवजी, पृष्ठ २७८.
२. विद्योपक्रमाचा ग्रंथ, माधव मोरोजी आणि नाना मोरोजी, प्रस्तावना.

उतारे या ग्रंथात घेतलेले आहेत. मकूलकच्या 'कोर्स ऑफ एलिमेंटरी रीडिंग' याप्रमाणे या पुस्तकाची रचना असावी म्हणून त्यात कृतज्ञता, सत्य, सौम्यता, परोपकारबुद्धी इत्यादी उपदेशपर धडे, सूक्ष्मदर्शक यंत्र, भूमिकंप, ज्वालामुखी पर्वत, पृथ्वीचा आकार आणि परिमाण, पर्जन्य, उष्णमापक, सूर्यमंडली, ऋतू, भरती-ओहोटी इत्यादी शास्त्रीय विषयांवरील धडे या पुस्तकात दिलेले आहेत.

**'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह'**

पदार्थविज्ञान, जोतिष, गणित, साहित्य, कला, नीती इत्यादी अनेक विषयांची थोडथोडी माहिती करून देणारा आणखी एक ग्रंथ म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी 'कितीएक इंग्लिश ग्रंथांच्या आधारे' तयार केलेला 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' (१८६१) हा होय. "ह्या ग्रंथांत यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, दर्शनानुशासन, ज्योतिष, प्राणिधर्मविषयकशास्त्र, शारीरक इत्यादी ज्या पदार्थविज्ञानाच्या शाखा आहेत त्यांतील मुख्य गोष्टींचे संक्षेपानें व सोप्या रीतीनें वर्णन केलें आहे. ह्या वर्णनापासून त्या त्या विषयांची मोठी माहिती वाचणाऱ्यांस होईल, असे ग्रंथकाराचे मत नाहीं. पण त्यास आशी अशा आहे कीं ह्या ग्रंथाच्या अवलोकनानें त्या अत्यंत उपयुक्त व चमत्कारिक शास्त्रांचे स्वरूप कांहींसें त्यांस समजून त्यांविषयीं विशेष माहिती करून घेण्याविषयीं त्यांची प्रवृत्ति होईल."[1] शास्त्रीय विषयांबरोबरच वाक्यालंकार, अहिल्याबाईचे चरित्र, ताजमहाल, वेरूळची लेणी, दिमोस्थेनीसचे भाषण इत्यादी उपयुक्त व मनोरंजक विषयही या पुस्तकात आणिलेले आहेत. हा ग्रंथ रचून कोणत्याही विषयावरील विचार मराठीमध्ये सुलभतेने मांडिता येतात, हे कृष्णशास्त्र्यांनी सिद्ध करून दाखविले. कोणास स्थलवर्णनाचा उत्तम नमुना पहावयाचा असल्यास 'वेरूळाजवळचीं लेणीं', 'ताजमहाल', 'हिमालय पर्वत' हे धडे वाचावे. कोणास थोर व्यक्तींचे चरित्र कसे लिहावे हे जाणून घ्यावयाचे असेल, तर त्याने 'अहिल्याबाईचे चरित्र' हा धडा वाचावा. मनुष्याचे मन हलवून सोडण्याजोगे वक्तृत्व मराठीत करिता येईल की नाही, याचा प्रत्यय 'वाक्चातुर्य' या धड्यावरून येईल. 'विद्यानंद', 'योग्य अभिमान', 'मेल्याविषयीं दुःख', 'आंगीं विनय असणे' इत्यादी धड्यांवरून तत्त्वज्ञान, मानसशास्त्र वगैरे विषयांवर मराठी भाषेत ग्रंथरचना करणे तेवढेसे अवघड नाही, असा विश्वास कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' या ग्रंथामुळे निर्माण झाला, असे म्हटले, तर ती अतिशयोक्ती होणार नाही.

**गणितविषयक ग्रंथ**

पदार्थविज्ञान, रसायन, शिल्प या भौतिक शास्त्रांप्रमाणेच गणितशास्त्रावरही या काळात पुष्कळ ग्रंथ निर्माण झाले. 'मुंबईची हैंदशाळा आणि शाळापुस्तक-मंडळी'चे चिटणीस जॉर्ज जर्विस यांच्या देखरेखीने इ. स. १८२३-मध्ये मुंबईला A

---

१. अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह, कृष्णशास्त्री चिपळूणकर, प्रस्तावना.

Seminary for the Instruction of Natives in Engineering या नावाची एक संस्था सुरू झाली. जमिनीची पाहणी करून मोजमाप करणे वा सरकारी इमारती बांधणे या कामासाठी लागणारी एतद्देशीय माणसे तयार करणे हा या संस्थेचा मुख्य हेतू होता. या शाळेत अंकगणित, बीजगणित, भूमिती, चित्रकला, Surveying, Architecture, Practical Mechanics इत्यादी विषय शिकविले जात. विद्यार्थ्यांमध्ये बुद्धीला पटणाऱ्या सत्याचा शोध लावण्याची प्रवृत्ती निर्माण व्हावी, या कल्पनेनेही हे विषय शिकविले जात. इंग्लंडमध्ये ज्याप्रमाणे रेफर्मेशनच्या पूर्वी सर्व विषयांवरील पुस्तके ग्रीक अथवा लॅटिन भाषांत होती, परंतु नंतर त्यांची भाषांतरे लोकभाषांत होऊन ज्ञानप्रसाराला मदत झाली, त्याप्रमाणे येथे होणे आवश्यक आहे, अशी तत्कालीन सरकारी अधिकाऱ्यांची कल्पना होती. पुस्तक समोर असल्याशिवाय शास्त्रीय विषयाचे ज्ञान विद्यार्थ्याला होणे कठीण. म्हणूनच जॉर्ज जर्विस याने जगन्नाथशास्त्री क्रमवंत व रामचंद्रभट अधलेकर यांच्या मदतीने अंकगणित, कर्तव्यभूमिती, आदिकरण भूमिती, बीजगणित, त्रिकोणमिती, क्षेत्रफळ-घनफळ, लाग्रतम इत्यादी विषयांवरील पुस्तके भराभर भाषांतरित केली. या पुस्तकांमुळे मराठी भाषेत पाश्चात्त्य पद्धतीने गणित-विद्येचा पाया घातला गेला. ही पुस्तके तयार करिताना Hutton's Course of Mathematics, Demorgan's Elements of Arithmetic, Demorgan's Elements of Algebra, Pasky's Practical Geometry इत्यादी इंग्रजी ग्रंथांचा उपयोग केला गेला.

**गणिताची परिभाषा**

जॉर्ज जर्विसच्या या प्रयत्नांमुळे गणितविषयक इंग्रजी शब्दांना मराठी पारिभाषिक शब्द या वेळेपासून तयार होऊ लागले. जर्विसने सुरुवातीसच याबद्दल आपली भूमिका स्पष्ट केली होती. 'गणितकृति अथवा गणितमार्ग' या पहिल्याच पुस्तकात तो म्हणतो, "हा गणितमार्ग महाराष्ट्र भाषेंत दाखवितों, त्यांत कित्येक पदार्थांचीं नावें या भाषेंत अप्रसिद्ध आहेत. त्यास संस्कृत शब्देंकरूनच लिहिलीं आहेत व या मुलकाचे व्यवहारांत अनेक भाषांचे शब्द येतात परंतु यांत बहुत करून महाराष्ट्र शब्दच लिहितों."[1] गणितकृतीच्या दुसऱ्या भागातही 'अप्रसिद्ध पदार्थांचीं नावें संस्कृतशब्देंकरून लिहिलीं आहेत.' वहिवाटवहि ( Book-keeping ), सांकळ-रीति ( Chainrule of Three ), रूपभेद ( Reduction of decimals ), घातकर्म ( Involution ), मूलकर्म ( Evolution ), श्रेणी ( Progressions ), सर्कत ( Fellowship ), अपूर्ण बीज ( Fractions ), करणी ( Surds ), गोळ्यांचें राशीचें गणित ( Piles of shots or shells ), भूमितिप्रमाण आणि श्रेणी ( Geometrical Proportion and Progression ), अनंतश्रेणी ( Infinite

१. गणितकृति अथवा गणितमार्ग, जॉर्ज जर्विस, आ. २, पृ. १.

Series) एकवर्ण-समीकरण ( Simple Equations ), वर्ग-समीकरण (Quadratic Equations ), घनादि-समीकरण ( Cubic and Higher Equations ), इत्यादी पारिभाषिक शब्द पाहता गणितासारखे शास्त्रीय विषय मराठी भाषेत आणण्याची जर्विस व त्याचे सहायक पंडित यांची धडपड ध्यानात येते. जर्विसनंतर केरो लक्ष्मण छत्रे यांची गणितावरील पुस्तके वापरात आलीं; परंतु पारिभाषिक शब्द मात्र पुष्कळसे तेच राहिले. जर्विसच्या लेखनातील कृत्रिमता छत्रे यांच्या पुस्तकात आढळत नाही.

**मॅक्लेनन आणि वैद्यक-ग्रंथ**

इंग्रजी अमलाच्या प्रारंभकाळात ज्याप्रमाणे नवीन गणितविद्येचा पाया मराठी भाषेत जॉर्ज जर्विसच्या श्रमांमुळे घातला गेला, त्याचप्रमाणे औषधिविद्या शिकविण्यासाठी डॉ. जॉन मॅक्लेनन्[1] याचे प्रयत्न कारणीभूत झाले. याच्याच श्रमाने १८२६-मध्ये मुंबईला सुरू झालेल्या Medical School for the Instruction of the Native Practitioners या संस्थेतील विद्यार्थीसाठी त्याने 'औषध-कल्पना-विधि' ( १८२८ ) हा वैद्यकग्रंथ लिहिला. या ग्रंथात 'रोगनिवृत्तिपूर्वक शरीरास हितावह जे वनस्पतिधातुजीवसंबंधी पदार्थ त्यांना औषध म्हणतात त्यांते सांगतों,' असे म्हणून पाश्चात्त्य व पौरस्त्य औषधांची माहिती दिली आहे. औषधांची नावे लॅटिन, इंग्रजी, प्राकृत, संस्कृत, हिंदुस्थानी, फारसी व अरबी इतक्या भाषांत दिलेली आहेत. तसेच, निरनिराळ्या रोगांच्या जाती व त्यांची लक्षणे देऊन त्यांवर उपाय सुचविलेले आहेत. 'निदान' ( १८२८ ) नामक आणखी एक ग्रंथ त्याने लिहिला. हाच ग्रंथ 'रोगनिदान' नावाने १८५२-मध्ये प्रसिद्ध झाला. त्याचप्रमाणे त्याने 'शारीर' ( १८५२ ) नावाचा एक ग्रंथ भाषांतरित केलेला आढळतो. "ही विद्या फार मोठ्या कामाची आहे. प्राण कशानें राहातो, मनुष्यें आणि जनावरें कशानें चालतात, पाहातात, ऐकतात व इतर हें मनुष्यांस या विद्येवरून ठाऊक होते व सुप्रकृति ठेवणें, रोग न येऊं देणे, रोगाचे ठिकाण जाणणें व झालेला रोग दूर करणें हेंही या विद्येनें ठाऊक होते."[2] या शब्दांत शारीरविद्येची महती लेखक सांगतो. वैद्यकशाळेकडील विद्यार्थ्यांसाठी निरनिराळी अस्ले, विषे इत्यादींचे वर्णन व परिणाम सांगणारा विषविद्या ( १८५२ ) हाही एक ग्रंथ मॅक्लेननने लिहिला होता.

---

१. डॉ. जॉन मॅक्लेनन् — हा बॉम्बे एस्टॅब्लिशमेंटचा ॲसिस्टंट सर्जन व नेटिव्ह मेडिकल स्कूलचा सुपरिंटेंडेंट होता. १८४४–५५-मध्ये हा जिऑग्रफिकल सोसायटीचा रेसिडेंट मेंबर झाला. १८५०-मध्ये याची बोर्ड ऑफ एज्युकेशनवर नेमणूक झाली. ग्रंथ — निदान ( १८२८ ), औषधकल्पनाविधि ( १८२८ ), शारीर ( १८५२ ), विषविद्या ( १८५२ ), आघातादिजन्य अस्थिविकार ( १८५३ ).

२. शारीर, जॉन मॅक्लेनन, पृ. १.

## भूगोल-खगोल-विषयक पुस्तके

वर उल्लेखिलेल्या भिन्नभिन्न शास्त्रीय विषयांची ओळख लोकांना करून देण्यासाठी जशी पाठ्यपुस्तके निर्माण झाली, तशीच शालेय अभ्यासक्रमात अंतर्भूत केलेल्या भूगोल, खगोल याही विषयांवर काही पुस्तके लिहिली गेली. पेशवाईत तत्कालीन राज्यकर्त्यांना भौगोलिक ज्ञान, विशेषतः हिंदुस्थानाबद्दल, थोडेबहुत होतेच. सवाई माधवरावाला डॉ. फिंडले नामक एक युरोपियन भूगोल शिकवीत असे. परंतु सर्वसाधारणपणे लोकांच्या कल्पना पृथ्वी शेषाच्या मस्तकावर आहे, खंडे नऊ आहेत, समुद्र सात आहेत, अशाच होत्या. लोकांमध्ये रूढ असलेल्या या पुराणमतवादी भौगोलिक व खगोलविषयक कल्पना नाहीतशा करून भूगोल-खगोलांची शास्त्रशुद्ध माहिती त्यांच्यासमोर ठेवण्याचे शाळा-पुस्तकमंडळाने ठरविले. या नवीन कल्पनांचा प्रसार करण्यासाठी भूगोल-खगोलविषयक पुस्तके तयार झाली. जुन्या मूढ कल्पना घालविण्यासाठी लोकांची मने दुखविण्याचे कठीण काम पुस्तकमंडळीला करावयाचे होते. पण ती जबाबदारी अशा नाजूक रीतीने पार पाडावयाची होती की, लोकांना धक्का न देता जुन्या कल्पना उखडून त्या ठिकाणी नवीन शास्त्रशुद्ध कल्पनांचे बीजारोपण व्हावे. यामुळे शाळापुस्तक-मंडळीने पहिल्या दहा वर्षांत भूगोलविषयक पुस्तक तयार केले नाही. या विषयावरील पहिले पुस्तक तयार झाले, ते 'भूगोल आणि खगोल इत्यादिविषयक संवाद' (१८३२) हे होय. मेन्वेअरिंग या युरोपियन माणसाने रामचंद्रशास्त्री जन्हवेकर यांच्या मदतीने ते भाषांतरित केले. 'भूगोल एवं ज्योतिष इत्यादिविषयक कथोपकथन' या इंग्रजी-बंगाली पुस्तकावरून ते रचिले गेले. या पुस्तकाचे मराठी भाषांतर अंधळेपणाने न करिता आवश्यक त्या ठिकाणी फेरबदल केलेले आहेत. उदाहरणार्थ, मूळ पुस्तकात लंडन-कलकत्ता ही शहरे होती, तर भाषांतरित पुस्तकात लंडन-मुंबई अशी जोडी आहे. यापेक्षाही जे महत्त्वाचे फेरफार केले गेले, ते मराठी वाचकांच्या भावना दुखावल्या जाऊ नयेत, या हेतूने केलेले दिसतात. उदाहरणार्थ, मूळ पुस्तकात खाऱ्या पाण्याबद्दल सांगताना अंड्याचा एक प्रयोग दिलेला आहे; पण तो मराठी भाषांतरात आला नाही. तसेच, मुळात असलेले बायबलमधील उल्लेख मराठी पुस्तकात आणिलेले नाहीत. 'डूम्स डे'ची मूळ पुस्तकातील कल्पना भाषांतरात वगळलेली आहे. या पुस्तकातील गोलज्ञ (geographers), चुंबकशलाका (magnetic needle), घूर्णवात (water-spout), भद्राश-भूशलाका (Cape of Good Hope) इत्यादी शब्द नजरेत भरण्यासारखे आहेत. तत्कालीन शालेय पुस्तके बहुतेक संवादरूपाने लिहिलेली असल्यामुळे या पुस्तकातही 'नित्यानंद आणि परमानंद या दोघांचा संवाद' आहे.

भूगोल-खगोलविषयक नवीन धारणा देणारे हे पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर १८३६-मध्ये दादोबा पांडुरंग व नाना नारायण या दोघांनी 'मराठी नकाशाचें पुस्तक' तयार केले. 'या देशांत हा केवळ पहिला उद्योग आहे म्हणोन जरी त्यांत काही दोष

आढळले तरी विशेष आश्चर्य मानायाजोगी गोष्ट नाहीं' अशी सूचना ग्रंथकर्त्यांनी दिली आहे.

यानंतर बाळशास्त्री जांभेकरकृत 'भूगोलविद्या' (१८३६) या पुस्तकाचा वापर सुरू झाला. तसेच, त्यांनी ले. शॉर्टरीड नामक एका युरोपियन माणसाच्या मदतीने 'भूगोलशास्त्र–गणितभाग' नावाचे एक पुस्तक लिहिले. त्यात भूगोलविषयाची शास्त्रीय चर्चा करून लोकांच्या जुन्या कल्पना कशा चुकीच्या आहेत, ते सिद्ध केले आहे. अक्षांशरेखांश, काळमानाची रीत, नक्षत्रमान, दृश्य सौरमान, मध्यम सौरमान, पृथ्वीचा आकार, ध्रुवोत्सारप्रेरणा इत्यादी विषयांची माहिती या पुस्तकात आलेली आहे. विशेष म्हणजे भास्कराचार्यांच्या मताचा विचार करून त्यांचे सिद्धांत कसे चुकीचे आहेत, हे सिद्ध करण्याचा या पुस्तकात प्रयत्न केलेला आढळतो.

याशिवाय महादेवशास्त्री पुराणिक यांचे 'भूगोल खगोल म्हणजे भूगोलविद्येचीं आणि खगोलविद्येचीं मूलतत्त्वें' (१८५४), मे. कँडीकृत 'हिंदुस्थानचे वर्णन' (१८६०), 'भूगोलाचें वर्णन' (१८६३) इत्यादी पुस्तके तयार झाली. सुलिव्हन, थॉर्न्टन, हॅमिल्टन, मक्लक, निकोल्स, रीड, मॉरिस इत्यादी पाश्चात्त्य ग्रंथकारांच्या भूगोलविषयक इंग्रजी पुस्तकांचा उपयोग यासाठी केला गेला.

शाळापुस्तक-मंडळीच्या मूळ कल्पनेप्रमाणे पुढील काळात हळूहळू लोकांच्या भूगोल-खगोलविषयक अशास्त्रीय कल्पना नाहीतशा होण्यास वरील पुस्तकांची बरीच मदत झाली. हिंदू लोकांप्रमाणे मुसलमानांमध्येही अशा खोट्या समजुती होत्या. त्या घालविण्यास ही पुस्तके उपयुक्त ठरली. उदाहरणार्थ, कराचीला १८५४-मध्ये तेथील नॉर्मल क्लासच्या विद्यार्थ्यांनी भूगोल हा विषय शिकविण्यास हरकत घेतली. त्यासाठी शिक्षामंडळीकडे त्यांनी अर्ज केला की, पृथ्वी वाटोळी आहे, ती पश्चिमेकडून पूर्वेकडे फिरते, इत्यादी विधाने कुराणातील विचारांशी जुळती नाहीत; म्हणून अशी विधाने या पुस्तकातून काढून टाकावी. विद्याखात्याच्या कडक धोरणामुळे तसा बदल झाला नाही. अशा प्रकारे सर्व लोकांच्या भूगोलासंबंधीच्या अशास्त्रीय समजुती नाहीतशा करण्यास या पुस्तकांचा फारच उपयोग झाला व त्याबरोबरच भूगोलविषयक परिभाषा निर्माण होऊन ती वापरात आली.

### अर्थशास्त्रविषयक वाङ्मय

इतर शास्त्रांप्रमाणेच अर्थशास्त्रावर काही पुस्तके या काळात निर्माण झालेली आढळतात. लोकहितवादींचे 'लक्ष्मीज्ञान' (१८४९) हे या विषयावरील पहिले पुस्तक होय. लोकहितवादींच्या 'शतपत्रा'तील अनेक विषयांवरील प्रागतिक विचारांशी सुसंगत असेच या पुस्तकातील विचार आहेत. विलफ्टसाहेबाच्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारे हे पुस्तक लिहिलेले आहे. अर्थशास्त्र म्हणजे संपत्तीची उत्पत्ती, वृद्धी व प्राप्ती कशी होते, याचे तात्त्विक विवेचन या ग्रंथात आले आहे. 'मनुष्याच्या उपजीविकार्थ व सुखार्थ जे जिन्नस पाहिजेत व असल्या जिनसाची किंमत होते ते पदार्थ' म्हणजे

लक्ष्मी, अशा व्याख्येने या चर्चेची सुरुवात त्यांनी केली आहे. यानंतर दक्षिणी भाषेत पुस्तके प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या आश्रयाने लिहिलेल्या पुस्तकांत अर्थशास्त्रावर 'देशव्यवहारव्यवस्था या शास्त्राची मूलतत्त्वें' (१८५४) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. "मिसेस मार्सेट म्हणून एक ग्रंथकर्ती झाली, तिच्या ग्रंथाचें कोठें भाषांतर, कोठें भावार्थ असी योजना करून, तसेंच मेस्तर जान् स्टुअर्ट मिल्ल, म्हणून जो या शास्त्रावर उत्कृष्ट अर्वाचीन ग्रंथकर्ता झाला, त्याचे पद्धतीस बहुतेक प्रकरणीं अनुसरून, हा संवादरूप ग्रंथ, महाराष्ट्र भाषेंत अजम हेनरि ग्रीन एसक्वायर पुणें येथील मुख्य शाळेचे प्रोफेसर यांच्या सूचनपूर्वक हरि केशवजी सोमवंशी क्षत्री पाठारे सदर अदालतीचे त्रांसलेटर यांच्या हातून आरंभून विश्वनाथ नारायण मंडलिक एल्फिन्स्टन इंस्टिटयूशनमधील पहिल्या प्रतीचे विद्यार्थी यांजकडून सिद्धीस" गेला. या गुरुशिष्यसंवादरूप ग्रंथात बावीस संवाद असून त्यांमध्ये संपत्तीची मुख्य कारणे, मालाचे रक्षण, उद्योगाची वाटणी, भांडवल, रोजमुरा, लोकसंख्या इत्यादी गोष्टीचे थोडक्यात विवरण केले आहे. हरि केशवजी हे शास्त्रीय विषयावरील ग्रंथ सोप्या भाषेत लिहिण्यामध्ये हुशार असल्यामुळे हे संवादही सरस उतरले आहेत.

**कृष्णशास्त्री चिपळूणकरांचा प्रयत्न**

यानंतर कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी जॉन स्टयुअर्ट मिल याच्या 'द प्रिन्सिपल्स ऑफ पोलिटिकल इकॉनमी' या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर केले. त्याचा काही भाग 'अर्थशास्त्रपरिभाषा, प्रकरण पहिलें' या नावाने १८५५-मध्ये प्रसिद्ध झाला. या विषयाच्या अभ्यासाची आवश्यकता प्रतिपादिताना कृष्णशास्त्री म्हणतात, "अर्थशास्त्राचा अभ्यास फारच आवश्यक आहे असें मानलें पाहिजे. कारण अर्थशास्त्रांत ज्या गोष्टींचें निरूपण केलें आहे, त्या गोष्टी नेहमींच्या व्यवहारांतल्या आहेत व त्या गोष्टींच्या भ्रांतीपासून मोठमोठे अनर्थ होण्याचा संभव आहे. देशांतील संपत्तीचें स्वरूप, तिचीं कार्यें, तिचीं प्रधान व गौण कारणें, तिच्या मर्यादेची कारणें, देशांतील सरकाराशीं तिचा संबंध, परदेशी व्यापाराशीं तिचा संबंध, तिचा क्षय ज्या कारणांनी होतो तीं कारणें, इत्यादि अनेक विषयांचे प्रतिपादन या शास्त्रांत आहे व या विषयाचें यथार्थ ज्ञान होणें लोकांस किती आवश्यक आहे व ह्या शास्त्रांत त्याविषयीं जे सिद्धान्त ठरवले आहेत ते व लोकांत ह्या विषयाविषयीं ज्या समजुती आहेत त्या, ह्यांची तुलना करून पाहिलें असतां लक्षांत सहज येईल." [१] ह्या देशांतील व्यापाराची, शेतकीची व राज्यव्यवस्थेची विशेष तपशीलवार माहिती नसतानासुद्धा मूळ पुस्तकातील विषय समजावून घेऊन एका प्रकरणाचे भाषांतर करण्याचे कठीण काम कृष्णशास्त्र्यांनी केले. 'बाकीचीं प्रकरणें लौकरच प्रसिद्ध करावीं,' अशी इच्छा व्यक्त करून दुसरें प्रकरणही त्यांनी १८५६-मध्ये लिहून तयार केले. पण ते प्रसिद्ध झालेले दिसत नाही.

१. अर्थशास्त्रपरिभाषा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, प्रकरण पहिलें, प्रस्तावना.

"महाराष्ट्र भाषेंत ह्या जातीच्या शास्त्रीय विषयांवर ग्रंथ फारच थोडे आहेत व शास्त्रीय रीतीनें प्रकृत विषयासारख्या विषयांवर विचार करण्याचा प्रघातही लोकांत नाहीं, ह्यास्तव ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं कठीण कठीण संस्कृत शब्दांचा प्रयोग करणें ग्रंथकारास भाग पडलें," [१] या शब्दांत कृष्णशास्त्र्यांनी आपली भूमिका स्पष्ट केली आहे. पहिल्या प्रकरणात धनोत्पत्तीच्या कारणांचा विचार, श्रम, भांडवल, श्रमसंयोग, लहानमोठे कारखाने, जमिनीचे उत्पन्न इत्यादी विषय आले आहेत.

**मराठीमधील पारिभाषिक-शब्दसंग्रह**

महाराष्ट्रात इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून जो नवीन अभ्यासक्रम सुरू झाला, त्याला अनुसरून मराठी भाषेत वेगवेगळ्या शास्त्रांवरील पाठ्यपुस्तके तयार केली गेली. अशा काही पुस्तकांची ओळख वर करून दिली आहे. ही पुस्तके तयार होत असताना प्रत्येक शास्त्राची परिभाषा बनत होती. हे सर्व विषय मराठी भाषेला नवीन असल्यामुळे पारिभाषिक शब्द निर्माण करण्याचे काम फार कठीण होते. तरीसुद्धा जॉर्ज जर्विस, डॉ. मॅक्लेनन, हरि केशवजी, गोविंद नारायण माडगांवकर, कृष्णशास्त्री राजवाडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादी तत्कालीन लेखकांनी मराठी भाषेत शास्त्रीय ग्रंथ लिहिणे तेवढेसे अवघड नाही, हे सिद्ध करून दाखविले. 'The Maratha is merely a spoken language'[२] असे मत व्यक्त करणारा व्हॅन्स केनेडी[3] जर या वेळी हयात असता, तर त्याला तोपर्यन्तची मराठी भाषेतील शास्त्रीय विषयांवरील ग्रंथनिर्मिती पाहून अचंबा वाटला असता. याच्या उलट डॉ. स्टीव्हन्सन[४] या मराठी भाषातज्ज्ञाने शंभर वर्षांपूर्वी आपले मत दिले होते.[५] ते आज सार्थ झालेले दिसेल.

१. तत्रैव.

2. Dictionary of the Marathi Language, Vans Kennedy, Preface, p. 4.

३. व्हॅन्स केनेडी (१७८४-१८७६): ईस्ट इंडिया कंपनीत नोकरी पतकरून १८००-मध्ये लष्करी खात्यात दाखल होऊन मुंबईस आला. निरनिराळ्या भाषा शिकून पेशव्यांच्या तैनाती फौजेत १८०७-मध्ये दुभाषी म्हणून काम. पुढे मुंबई आर्मीचा जज्ज व ॲडव्होकेट जनरल म्हणून १८१७ ते १८३५-पर्यंत काम. १८३५ ते १८४६-पर्यंत मुंबई सरकारचा ओरिएण्टल ट्रॅन्स्लेटर या हुद्द्यावर नेमणूक. मुंबईत मृत्यू.

४. डॉ. स्टीव्हन्सन हा १८२४-मध्ये खिस्तीधर्मप्रसारक म्हणून हिंदुस्थानात आला व १८५४-मध्ये स्वदेशी परत गेला. अनेक भाषांचा याने अभ्यास केला, धार्मिक पुस्तके लिहिली, मराठी भाषेचे व्याकरण लिहिले. तसेच, जुन्या मराठी वाङ्मयावर व भाषेवर त्याने निबंध लिहिले.

5. 'The Marathi is a very expressive language and...is capable of being applied to all purposes of science and literature.
Journal of the Royal Asiatic Society of Great Britain and Ireland, Vol. 7, 1843, p. 9.

## भाषांतराविषयीचे धोरण

नवीन अभ्यासक्रमाला आवश्यक ती शास्त्रीय विषयांवरील पुस्तके भाषांतरित करिताना कोणत्या दृष्टीने प्रयत्न करणे आवश्यक आहे, हे प्रथमपासूनच शाळापुस्तक-मंडळीने ठरविले होते. शाळापुस्तकमंडळीची भाषांतरकर्त्यांना अशी सूचना होती की, इंग्रजी अथवा संस्कृत यामधून मराठी वा गुजराती यांमध्ये भाषांतर करिताना शक्यतो देशी भाषेचा उपयोग करावा. परकी शब्दांचा वापर शक्यतो टाळावा. पण एखादी कल्पना देशी भाषेत व्यक्त करिता येत नसेल, तरच संस्कृत भाषेची मदत घ्यावी [१]

## बाळशास्त्री जांभेकरांचे मत

या मुद्द्यावर बाळशास्त्री जांभेकर 'दर्पण'मधून आपले विचार प्रकट करिताना लिहितात : 'त्यांनीं (कलकत्ता-मुंबईची शाळापुस्तकमंडळी) सर्व लोकांस शिकवायाचें जें मनांत कार्य धरिलें आहे ते साध्य होण्याकरितां जी रीति चालविली आहे ती सर्वांत उत्तम आहे. तीमध्ये दुसरा गुण आहे कीं, जा पदार्थांचे शब्द बोधक देशभाषांत नाहींत, ते शब्द आल्याने तिचा योगानें देशाचा भाषा परिपूर्ण होतात, आणि चांगले रूपास येतात. अशी गोष्ट कांहीं काळाने घडेल हे जांणीं जाणीं येथील शिक्षामंडळीचे पूर्वीचे सक्रतारी कपतान जार्विससाहेब यांणीं दोन वर्षांपूर्वी केलेली लॉर्ड ब्रह्मसाहेबांचे विद्योद्देशाची मराठी आणि गुजराथी भाषांतरे पाहिलीं असतील, ते नाहीं म्हणणार नाहींत. त्या ग्रंथांत गणित, शिल्प, रसायन, दर्शनानुशासन आणि सृष्टिविज्ञानाचे दुसरे भाग यांचे विषय आहेत; म्हणोन वाचणारास नव्या गोष्टी बहुत समजतात आणि नवे शब्दांचा परिचय होतो; जा शब्दांचा अर्थ त्या ग्रंथाचे शेवटीं कोश केला आहे, त्यांत यथास्थित समजायाजोगा लिहिला आहे. परंतु या जातीचे आणि तसेच उपयोगी ग्रंथ मंडळीचे छापखान्यांत बहुत छापले आहेत, आणि दुसरे तयार होत आहेत." [२]

## परिभाषेविषयीचे धोरण

शास्त्रीय विषयांवरील पुस्तकांत वापरल्या जाणाऱ्या परिभाषेविषयीचे धोरण शाळापुस्तकमंडळीप्रमाणेच पुढील काळात सरकारी विद्याखात्यानेही निश्चित केले होते.

1. With respect to translations, whether from English or Sankrit into Maratha and Gujarathee dialects, it ought to be observed that vernacular terms should be used as much as possible. The proper word therefore, should be, at all times, sought for and the display of learning by the introduction of foreign words should be most particularly avoided. But when the idea intended cannot be expressed by a term in either of these dialects, the assistance should be derived from their cognate language the Sanskrit and not from Persian or Arabic. G.D.Vol.63, 1824, p.101.

२. दर्पण, पु. १, कागद ६, १६ मार्च, १८३२, पृ. ४५.

विद्याखात्याशी संबंध असलेले भास्कर दामोदर पाळंदे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, मेजर कँडी, हॉवर्ड इत्यादिकांनी याविषयीची आपापली मते वेळोवेळीं व्यक्त केलेली आढळतात. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात की, इंग्रजी पारिभाषिक शब्द त्यांच्या मराठी अर्थासह देवनागरीमध्ये लिहावे. नाहीतर प्रत्येक भाषांतरकार आपापल्या कल्पने-प्रमाणे त्या शब्दांचे मराठीकरण करील व त्यामुळे वाचकांच्या मनात गोंधळ निर्माण होईल.[1] हे विचार मांडीत असताना त्यांनी काही उदाहरणे दिली आहेत. त्याशिवाय आणखी एक सूचना त्यांनी केली आहे. ती अशी की, भाषांतरकाराने इंग्रजी पुस्तकांचा मराठी तर्जुमा करिताना इकडील वातावरणाला प्रतिकूल असलेला भाग गाळावा. या सर्व सूचना ते दक्षिणा प्राइझ कमिटीचे चिटणीस असताना त्यांनी केल्या होत्या. दक्षिणा प्राइझ कमिटीच्या १८६२–६३-च्या वार्षिक इतिवृत्तामध्ये या प्रश्नावर झालेल्या चर्चेचा सारांश दिलेला आढळतो त्यावरून या बाबतीत कमिटीसमोर दोन मार्ग होते, असे दिसते. एक म्हणजे शास्त्रीय विषयांतील शब्द जसेच्या तसे इंग्रजीमधून मराठीमध्ये आणणे व दुसरा अशा शब्दांचे संस्कृत भाषेच्या मदतीने प्रतिशब्द बनविणे. या वेळी मराठीमधून शास्त्रीय वाङ्मयाची वाढ होण्यास सुरुवात झालेली असल्यामुळे या प्रश्नाचा निर्णय लागणे आवश्यक होते. या संबंधातले विद्याखात्याचे धोरणच अमलात येणे जरूर होते. विद्याखात्याचा प्रमुख हॉवर्ड याने सुचविले होते की, भाषांतरकारांनी शास्त्रीय पारिभाषिक शब्द इंग्रजीमधून जसेच्या तसे उचलावे अथवा संस्कृत भाषेच्या मदतीने प्रतिशब्द बनवावे. अशा शब्दाची यादी प्रतिवर्षी प्रसिद्ध करावी.[2]

1. "I beg to recommend that in Marathi translations of scientific books, English technical terms...should always be given as accurately as posssble in Marathi characters, with their translations. My object in making this recommendation is that the Marathi reader may not be puzzled and confused by finding different names for the same things or classes of things in different books. When there is no settled Marathi equivalent for an English word, as is the case with a large majority of technical scientific terms, the translator is required to choose or make the best word he can, and different translators will often choose or make different words."

D. P. I. Duxina Fund, Vol. 22, 1861–62, p. 169.

2. As regards the question of scientific nomenclature... my opinion is decided that writers should be allowed to use at their discretion, terms borrowed from the English or the Sanskrit just as Germans have the choice between two sets of scientific terms, one home-bred and the other adopted from classical languages. The committee is not now, I think, in a position to issue a decree of prohibition against either of these modes. But it would no doubt be useful from time to time to publish lists of proposed scientific terms for the consideration of authors.

D. P. I. Duxina Fund, Vol. 17, 1863–64, pp. 110–111.

थोडक्यात सांगावयाचे, तर शास्त्रीय परिभाषेच्या बाबतीत लेखकांना स्वातंत्र्य देण्याचे धोरण विद्याखात्याने त्या वेळी स्वीकारिलेले दिसते. पारिभाषिक शब्दांच्या याद्या वारंवार प्रसिद्ध करण्याची हॉवर्डची सूचना प्रत्यक्षात आल्याचे दिसत नाही.

**क्रमिक-पुस्तक-समिती**

मुंबईची हैंदशाळा शाळापुस्तकमंडळी स्थापन झाल्यापासून विविध विषयांवर जी पाठ्यपुस्तके निर्माण झाली, त्यांच्यामागे काही पद्धती नव्हती. तथापि १८५६-मध्ये हॉवर्ड हा विद्याखात्याचा मुख्याधिकारी झाल्यावर क्रमवार अशी काही पुस्तके लिहवून घ्यावी, म्हणून त्याने एक समिती नेमिली. तीत मे. कँडी, डॉ. विल्सन, जॉन हार्कनेस, रे. मिचेल, होप इत्यादी युरोपियन मंडळी व भास्कर दामोदर पाळंदे, गोविंद नारायण माडगांवकर, विनायक वासुदेव कीर्तिकर, विश्वनाथ नारायण मंडलिक व दादोबा पांडुरंग तर्खडकर हे एतद्देशीय सभासद होते. या समितीने मराठी क्रमिक पुस्तके तयार करावयाची होती. जरी समिती नेमली गेली, तरी प्रत्यक्ष काम करणारी एखाद-दुसरीच व्यक्ती असते. या समितीचे काम कसे चालत असे, त्याचा मजेशीर वृत्तांत समितीचे एक सभासद विश्वनाथ नारायण आपल्या रोजनिशीत देतात, तो असा —

" क्लासबुक कमिटीची सभा डायरेक्टरच्या बंगल्यावर भरली होती. डॉक्टर वुइलसन, डॉक्टर हार्कनेस, मि. ग्लॅसगो, मि. हॉवर्ड, रा. गोविंद नारायणजी, रा. दामोदर व मी हजर होतों. पोकळ गप्पांचा सुकाळ होता. शहाणपणाचीं मते प्रतिपादनार्थ निघालीं होतीं. परंतु हातांत लेखणी घेऊन दौतींत बुडविली तेव्हां कागदावर लिहिण्यासारखे फार नाहीं असें आढळलें. " १

**मेजर कँडी याचा भाग**

ही क्रमिक पुस्तके समितीच्याऐवजी शेवटी मे. कँडी यांच्याच हातून पुरी झाली. प्रथम मे. कँडी काही काळ रजेवर गेल्यामुळे क्रमिक पुस्तकांपैकी पहिले पुस्तक दोन भागांत भास्कर दामोदर पाळंदे यांनी तयार केले व पुढील पाच पुस्तके मे. कँडी यांनी रचिली. अशा प्रकारे १८५७ ते १८६१ या काळात ही पुस्तके तयार झाली. ती तयार होत असताना मे. कँडी व दादोबा पांडुरंग किंवा गोविंद नारायण यांच्यामध्ये मराठी भाषेची लेखनपद्धती, वाक्प्रचार, वाक्यरचना, इत्यादी बाबतींत पुष्कळ वाद-विवाद झाले. अशी पुस्तके तयार करण्याचे मे. कँडी यांच्या मनात १८४७-मध्ये ते मराठी ट्रॅन्सलेटर व रेफरी म्हणून नेमिले गेल्यापासून होते. परंतु प्रत्यक्षात ती कल्पना उतरण्यास दहा वर्षे लोटली. ' लहान मुलांकरितां पहिलें पुस्तक ' सोडून बाकी सर्व पुस्तकांवर मे. कँडी यांचे नाव असले, तरी अनेकांकडून धडे लिहवून घेऊन त्यांनी ते

१. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचे चरित्र, गणेश रामकृष्ण हवालदार, भाग १, पृ. ७१.



परशुराम बल्लाळ ऊर्फ परशुरामपंततात्या गोडबोले

१७९९ – १८७४



गोविंद विठ्ठल कुंटे 'भाऊ महाजन'

१८१५ – १८९०



विष्णु भिकाजी गोखले 'विष्णुबुवा ब्रह्मचारी'

१८२५ – १८७१

व्याकरणदृष्ट्या तपासून नंतर क्रमशः ते कोणत्या पुस्तकात घालावयाचे ते ठरविले. या त्यांच्या कामाबद्दल 'बालबोध'कार लिहितात —

"ह्या कामाचीं सगळीं सूत्रें मेझर क्यांडी साहेबांनीं आपल्या हातीं ठेविलीं होतीं. इंग्रजी भाषेतलीं अनेक प्रकारचीं क्रमिक पुस्तकें जमविलीं होतीं. त्यांतील धड्यांची निवड क्याडी साहेबांनीं करावयाची. त्यांचीं मराठी भाषांतरें मंडळीने करावयाचीं. तीं साद्यंत त्यांनी तपासावयाचीं. त्यांतल्या भाषापद्धतीविषयीं आणि परिज्ञानाविषयीं शंका-समाधानें व्हावयाचीं आणि मग तीं छापावयाचीं. असा क्रम असे. . . .त्या मंडळीच्या सांगण्यांत येत असे कीं, हीं मराठी क्रमिक पुस्तके इंग्रजींतल्या क्रमिक पुस्तकांच्या नमुन्यानुसार तयार व्हावीं, अशी त्या साहेबाची फार इच्छा असे. त्यांनीं कधीं एकही वाक्य चालढकलीवर नेलें नाहीं. शब्दशुद्धीवर आणि अर्थस्पष्टतेवर त्यांचा फार कटाक्ष असे."[1]

मुलांच्या वाढत्या वयाबरोबर या क्रमिक पुस्तकांचे काठिन्य वाढत गेले. उदाहरणार्थ, या मालेतील सहाव्या पुस्तकात अर्थशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, भूगर्भशास्त्र इत्यादी विषयांवरही काही धडे दिलेले आढळतात. गद्याप्रमाणे काही पद्यही असे. भास्कर दामोदर पाळंदे अथवा परशुरामपंत गोडबोले यांनी रचिलेले काही पद्य त्यात असेच. पण त्याशिवाय ज्ञानदेव, तुकाराम, रघुनाथपंडित, वामन, मोरोपंत इत्यादिकांची काव्ये व उत्तरामचरित, मृच्छकटिक वगैरे संस्कृत नाटकांच्या मराठी भाषांतरांतील निवडक पदे यांना या क्रमिक पुस्तकांत स्थान दिलेले होते.

ही क्रमिक पुस्तके मकूलकच्या इंग्रजी भाषेतील क्रमिक पुस्तकांचा आदर्श समोर ठेवून रचिली गेली.

**भाषांतरकार मंडळी**

पुण्याच्या पाठशाळेमध्ये भाषांतरकार तयार करण्याचा एक खास वर्ग मे. कँडी यांच्या देखरेखीने चालत असे. हे भाषांतरकार ( Translation Exhibitioners ) परीक्षा घेऊन निवडले जात असत. अशा पहिल्या परीक्षेत कृष्णशास्त्री पहिले आले होते. त्यानंतरच्या परीक्षेत नारायणशास्त्री आपटे, महादेवशास्त्री पुराणिक, नरसिंहशास्त्री ओक वगैरे शास्त्री उत्तीर्ण झाले होते व या भाषांतरकारांकडून मे. कँडींनी चेंबर्स हिस्टरी ऑफ ग्रीस, टेलर्स एन्शण्ट हिस्टरी, सुलिव्हन्स जिऑग्रफी, मरेज इंडिया वगैरे इंग्रजी पुस्तकांची मराठी भाषांतरे तयार करवून घेतली होती. मोठ्या पुस्तकांची भाषांतरे करण्याच्या अगोदर लहान-लहान धडे भाषांतरित करावे, म्हणून मे. कँडी यांनी सर्व-प्रथम मकूलकच्या तिसऱ्या इंग्रजी पुस्तकातील गद्य धड्यांचे भाषांतर तयार करवून घेतले व हे पुस्तक 'वाचनपाठमाला' (१८५०) या नावाने प्रसिद्ध झाले. 'कृष्णा चिपळोणकर पाठशाळेतील एक विद्यार्थी ह्याने इंग्रजी पुस्तकांतील विषय मनांत आणून

१. बालबोध, पु. ३०, १९११, पृ. २४४.

इकडील रीतीप्रमाणे' रचिलेल्या तीन गोष्टींना मे. कँडी यांनी या 'वाचनपाठमाले'त स्थान दिले होते.

**'नवनीत'**

पद्याचा अभ्यास विशेष व्हावा, म्हणून प्राचीन मराठी काव्याकडे विद्याखात्याचे लक्ष गेले. पुणे कॉलेजमधील मराठीचा वर्ग व शिक्षक तयार करण्याचा वर्ग या दोन वर्गातील प्रौढ विद्यार्थ्यांसाठी एक काव्यसंग्रह तयार करण्याची कल्पना प्रथमतः १८५३-मध्ये कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी मे. कँडी यांना दिली. या कल्पनेमुळे मे. कँडींनी परशुरामपंत गोडबोले यांना प्राचीन काव्यातील काही नमुनेदार भाग शोधून त्यांचा एक संग्रह तयार करावयास सांगितले. हा काव्यसंग्रह 'नवनीत' या नावाने १८५४-मध्ये प्रसिद्ध झाला. 'महाराष्ट्र भाषेंतील कवितांचे वेंचे' रसिक जनांपुढे ठेवताना तात्या म्हणतात :

"भाषा सुधारण्यास व मनाची शक्ति वाढविण्यास कविता हें एक मोठें साधन आहे. सांप्रत सर्व विद्या शिकविण्याचे प्रयत्न चालले आहेत, त्यांत कविता शिकविण्याचे साधन कमी आहे, तें अवश्य असले पाहिजे असे बहुतांचे मत आहे. तोच उद्देश हें पुस्तक रचण्याचा आहे.... ज्यांला मराठी भाषेचें ज्ञान चांगले असावे अशी इच्छा असेल त्यांनीं प्राचीन व अर्वाचीन कवींचे प्राकृत ग्रंथ पुष्कळ वाचावे हें आवश्यक आहे. ज्याला ज्या भाषेचे पूर्णज्ञान असते त्याला त्या भाषेच्या कवितांतील नाना प्रकारचे चमत्कार व रस पाहून किती आनंद वाटतो!...मराठी भाषेंत कविता-ग्रंथ, पुष्कळ व मोठाले आहेत; त्यांत छंद व चालीही अनेक प्रकारच्या आहेत. त्यांची गोडी लागून तिकडे तरुणांच्या मनाची प्रवृत्ति व्हावी ह्याकरितां मराठी भाषेंतल्या बहुतेक कवितांतील थोडथोडे वेंचे घेऊन हे एक लहानसें पुस्तक केले आहे. हें मन लावून वाचिले असतां कवितांचे प्रकार व रीती व त्यांतील चमत्कार व रस हीं सर्व थोडक्यांत समजतील. ह्या लहान पुस्तकाचा अभ्यास चांगला झाला असतां मोठाले ग्रंथ पाहाण्यास मार्ग सुलभ होईल. किंबहुना, कविता करण्याची शक्ति प्राप्त होईल."[१]

अशा ह्या काव्यसंग्रहात तात्यांनी तुकाराम, नामदेव, जनाबाई, रामदास, मुकुंदराज, ज्ञानदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत, रघुनाथपंडित, अमृतराय, देवनाथ, रामजोशी यांची काव्ये निवडिली असून शिवाय हिंदुस्थानी भाषेतील काही पदे व दोहरे, संस्कृत भाषेतील काही काव्ये, तसेच आरत्याही घातल्या होत्या. काव्य-संग्रहाला काही कवींची त्रोटक चरित्रेही जोडिली होती. हा 'काव्यामृताचा नवनीत-भेला' लोकांना इतका आवडला की, १८५७-मध्ये या ग्रंथाची दुसरी आवृत्ती निघाली.

१. नवनीत, परशुराम बल्लाळ गोडबोले, प्रस्तावना.

या वेळी भास्कर दामोदर पाळंदे यांनी ' पद्यरचना व कवीचें वर्णन ' या विषयावर दोन निबंध आरंभी जोडले. पाळंदे आपल्या प्रस्तावनेत लिहितात —

" या ग्रंथाची दुसरी आवृत्ति छापणें अवश्य वाटल्यावरून परशुरामपंत यांस पहिल्या आवृत्तींत जे दोष राहिले होते ते नीट करावयास सांगितले. मुख्य दोष हा होता कीं, कवी ज्या ज्या काळीं होऊन गेले त्या त्या काळांच्या अनुक्रमानें त्यांच्या कवितांतील वेंचे जुळले नव्हते.... कितीएक चांगले ग्रंथ न सांपडल्यामुळे त्यांमधून कांहींच उतारे घेतले नव्हते व दुसरेही कांहीं फेरफार करण्यासारखे होते.... जुन्या वेंच्यांत त्याज्य जे अंश होते तेही जितके दृष्टीस पडले तितके काढून टाकले "

तात्यांच्या हयातीत ' नवनीता'च्या १८७३-पर्यंत आठ आवृत्त्या निघाल्या. त्यानंतर नवी आवृत्ती तयार करिताना मे. कॅंडी यांच्या सूचनेने श्रीकृष्णशास्त्री तळेकर व रावजीशास्त्री गोडबोले या संपादकांनी 'मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर ह्यांच्या कवितांत सर्व वेदांत असल्यामुळें त्यांचा अर्थ समजण्यास कठीण पडतो, म्हणून त्यांची कविता ह्या आवृत्तींतून ( १८७८ ) अजीच काढून टाकली.' यावर विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनी कडक टीका केली.[1] मुकुंदराज व ज्ञानदेव या ' कविद्वयाचा निषेध अत्यंत असमंजसतेचा ' असल्याचे त्यांनी सांगितले. इतर अनेकांनीही या बाबतीत आपली मते व्यक्त केली. त्यामुळे १८८६-च्या अकराव्या आवृत्तीमध्ये ज्ञानदेवांना पुन्हा स्थान मिळाले.

जुन्या मराठी काव्याचे महत्त्व नवनीताच्या यशामुळे सरकारी अधिकाऱ्यांना पटल्यामुळे गुजराती प्राचीन काव्याचा असाच एक संग्रह प्रसिद्ध करण्याच्या कल्पनेने मूळ धरले व १८६४-मध्ये दलपतराम डाह्याभाई यांनी ' काव्यदोहन ' हा ग्रंथ तयार केला.

नवनीताचा पहिला भाग लोकांना आवडल्याचे पाहून तात्यांनी अशाच प्रकारचा आणखी एक संग्रह ' नवनीत, भाग २ ' या नावाने १८६३-मध्ये काढिला. तिसरा भाग तयार करण्याची इच्छाही त्यांनी व्यक्त केली होती, पण ती पुरी झालेली दिसत नाही. नवनीतासारख्या काव्यसंग्रहाने मराठी भाषिकांना प्राचीन काव्याची गोडी लाविली, याचे श्रेय परशुरामपंत गोडबोले यांना द्यावे लागेल. तात्यांनी केलेल्या श्रमांचे श्रेय त्यांना देताना विश्वनाथ काशिनाथ राजवाडे लिहितात —

" विष्णुशास्त्री चिपळोणकरांच्या टीकात्मक निबंधांनी इंग्रजीच्या ह्या खग्रासापासून माझा बचाव केला. काव्येतिहाससंग्रहकारांच्या ऐतिहासिक पत्रांनी स्वदेश म्हणून काही आहे हे मला कळले, व परशुरामपंत तात्या गोडबोलें ह्यांनी छापलेल्या काव्यांनी महाराष्ट्र-सारस्वताचा मला अभिमान वाटू लागला. "[2]

१. चिपळूणकर—लेखसंग्रह, भाग २, खंडेराव भिकाजी बेलसरे, पृ. १७—१८.

२. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, संकीर्ण लेखसंग्रह, गोविंद विष्णू विजापूरकर, पृ. ४५.

## शाळापुस्तकमंडळीचे वाङ्मयीन कार्य

इंग्रजी अमदानीच्या सुरुवातीच्या काळात प्रथम मुंबईच्या हैंदशाळा-शाळा-पुस्तकमंडळीच्या देखरेखीने व नंतर विद्याखात्यातर्फे मेजर कँडी याच्या मार्गदर्शनाने जे वाङ्मय निर्माण झाले, ते बरेचसे शालेय स्वरूपाचे असणे अगदी साहजिक होते. त्यातील विविध विषयांवरील पाठ्यपुस्तकांची ओळख मागील पृष्ठांत करून दिली आहे. नव्या राज्यव्यवस्थेमध्ये निश्चित झालेल्या शैक्षणिक धोरणामधूनच हे वाङ्मय निर्माण होत होते. ते निर्माण करणाऱ्या लोकांना प्राचीन गद्याची तितकीशी माहिती नव्हती. त्यामुळे त्यांना प्राचीन गद्यवाङ्मयाच्या परंपरेचा धागा हाती धरून त्यात पाश्चात्त्य विद्येचा धागा गुंफण्याची कामगिरी करता आली नाही. याचा परिणाम म्हणून हे नवे वाङ्मय निकृष्ट प्रतीचे झाले, असा एक आक्षेप या प्राथमिक अवस्थेतील वाङ्मयाबद्दल घेतला जातो. काही अंशी तो खरा आहे. तथापि इंग्रजी भाषेत असलेल्या विविध कला व शास्त्रे यांची ओळख मराठी भाषेतून करून देण्याच्या प्रयत्नांत स्वतंत्र प्रतिभेची व जुन्या भाषिक ऐश्वर्यांची अपेक्षा करणे तितकेसे रास्त होणार नाही. इंग्रजी अमलाबरोबर नवीन पाश्चात्त्य विद्या, कला, गणितादी शास्त्रे व्याकरण-कोश, राजकारण वगैरेसंबंधीचे नवीन विचार इकडे आल्यावर त्यांची लोकांना मराठी भाषेतून ओळख करून देताना भाषेची जुनी धाटणी जाऊन तीऐवजी नवी येणे साहजिक होते.

## प्रमाणभाषेची सिद्धता

लोकोपयुक्त शिक्षणप्रसारार्थ पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीची जी सुरुवात झाली, तीसाठी शाळापुस्तक-मंडळीच्या पदरी असलेली जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बापूशास्त्री शुक्ल, बाळकृष्णशास्त्री सोवनी, गंगाधरशास्त्री फडके इत्यादी मंडळी मुंबईशेजारच्या चौल-अष्टागर प्रांतातून आलेली होती. बापू छत्रे व बाळशास्त्री जांभेकर हे शाळापुस्तक-मंडळीचे चिटणीस कोकणातील होते. गोविंद नारायण माडगांवकर, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग इत्यादी लेखक खास मुंबईकर होते. तसेच पुण्याच्या पाठशाळेतून कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, कृष्णशास्त्री गोडबोले इत्यादी संस्कृत व इंग्रजी जाणणारे भाषांतरकार होते. याशिवाय जर्विस, केपन यांसारखे परभाषीहि होते. या सर्वांच्या हातून ही पाठ्यपुस्तके लिहिली गेली. लेखकांची भाषासरणी ही स्थळ आणि काळ यांनी मर्यादित असते. त्यामुळे भाषेच्या वळणात भिन्नता येते. या भिन्नभिन्न वळणांना प्रामाण्य आणण्याचा फार मोठा यशस्वी प्रयत्न मेजर टॉमस कँडी यांनी केला व त्यातूनच नवी अशी रचना रूढ झाली.

## पुण्याच्या भाषेस मान्यता

वर उल्लेखिलेल्या बऱ्याचशा शास्त्रीमंडळीच्या लेखनात कोकणी प्रकारांचे प्राबल्य असणे अपरिहार्य होते. त्यांच्या भाषेतील एकदेशीपणा त्यांच्या लिहिण्यात व्यक्त होत असे. लिखित भाषेला प्रमाण बनवावयाचे असल्यास त्या भाषिक प्रांताचा जो

मध्यभाग असेल, त्या ठिकाणची भाषा शुद्ध मानून त्याप्रमाणे इतरांनी तिचे अनुकरण करावयास पाहिजे. पंडितमंडळाने 'महाराष्ट्र भाषेचा कोश' रचताना त्यांनी पुणेरी हीच प्रमाणभाषा मानिली. ते कोशाच्या प्रस्तावनेत म्हणतात, 'देशभाषांचे वर्तनाचा असा नियम आहे कीं स्वदेशाचे मध्यभागीं शुद्ध स्वरूपाने असावें आणि उत्तरोत्तर-पर्यंतभागीं तत्तद्देशांतरस्थ भाषांचे मिश्रणाने संकीर्णरूपाने असावें. महाराष्ट्र देशाचा मध्यभाग म्हटला असतां प्रायः पुणे प्रांत होतो. अतएव पुणे प्रांतीं जे शब्द प्रसिद्ध आहेत, ते प्रायः सर्व महाराष्ट्र देशभर प्रसिद्ध असे समजून ते शब्द प्रांताचे खुणेवांचून लिहिले आहेत.'

मराठीचे विद्याकेंद्र पुणे शहर हे पेशवाईत राजधानी ठरून त्यास इंग्रजी अमलातसुद्धा पश्चिम हिंदुस्थानाच्या दुय्यम राजधानीचा मान मिळाल्यामुळे तेथील भाषा शुद्ध व शिष्ट म्हणून अनुकरणीय मानिली गेली; आणि येथील भाषेप्रमाणे मराठीचे लेखन असावे, अशा दृष्टीने मेजर कँडी यांनी आपल्या हाती तपासणीसाठी आलेल्या शेकडो पुस्तकांची भाषेच्या दृष्टीने दुरुस्ती केली. पेशवाई बुडाल्यावर जे कित्येक शास्त्रीपंडित मराठी भाषेच्या उत्कर्षाकडे लागले, त्यांतील बहुतेक कोकणात राहणारे असल्यामुळे त्यांनी लिहिलेल्या पुस्तकांत कोकणी प्रकारांचे प्राबल्य दिसू लागले. त्यांकडे दुर्लक्ष केल्यास लिखित मराठी भाषेत ते प्रकार रूढ होतील या भीतीने मेजर कँडी यांनी बारकाईने ते शोधून त्यांचे उच्चाटन केले. 'मराठी भाषेचे पाणिनी' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दादोबा पांडुरंगांनाही या दोषांची जाणीव होती. ते आपल्या 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत स्पष्टच कबुली देतात : " या व्याकरणांत, महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणे प्रांत, त्यांत जी भाषा राजकीय व विद्वान लोक बोलतात तिचे अनुसरण केले आहे. त्यांत माझा व माझ्या वडिलांचा जन्म कोकणांतला, म्हणून त्यात कदाचित कोंकणी प्रकाराचे यत्किंचित आधिक्य असले तरी मला क्षमा मागायास कांहीं अवकाश आहे. "

### मराठी गद्याचा इंग्रजी अवतार

हे 'कोंकणी प्रकाराचे यत्किंचित आधिक्य' पाठ्यपुस्तकातून काढून टाकण्याचा मेजर कँडी यांनी यशस्वी प्रयत्न केला. 'करतो', 'मारतो' इत्यादी क्रियापदांत इडागम आणून 'करितो', 'मारितो' अशी रूपे वापरणे, 'सोडलेस', 'केलेंस', 'सोडलेत' इत्यादी क्रियापदांत कोंकणी बोलीप्रमाणे येणारा स अगर त काढून 'सोडिले',' केले' अशी स अथवा त यांनी विरहित रूपे वापरणे, 'सोडिल्ये','मारिल्ये' इत्यादी क्रियापदांतील य-कार काढणे, 'चांगल्ये', 'मोठ्ये' इत्यादी विशेषणांतील ये-कार काढून 'चांगल्या', 'मोठ्या' अशी रूपे आणणे, 'त्याणे', 'ज्याणे', 'त्यांणीं' इत्यादी सर्वनामांच्या रूपांतील णे अथवा णीं या तृतीयेच्या विभक्तिप्रत्ययांबद्दल ने अथवा नीं हे प्रत्यय लावून 'त्याने', 'ज्याने', 'त्यांनी', 'ज्यांनीं' इत्यादी रूपे वापरणे 'तिला राणी केली', 'त्या पोराने ह्या मुलीस मारली' इत्यादी वाक्यांची रचना

कोंकणी प्रचारांनुसार कर्मणि प्रयोगात न करिता 'तिला राणी केलें', 'त्या पोराने ह्या मुलीस मारिले' अशी भावे प्रयोगात करणे इत्यादी बरेच बदल मेजर कँडी यांनी घडवून आणिले, व ते पाठ्यपुस्तकांच्या द्वारा मुलांच्या अंगवळणी पाडण्याचा प्रयत्न केला. या बदलांतील पुष्कळसे लिखित भाषेत रूढ झाले. कारण कँडीप्रणीत मराठी भाषेत रचिलेली पाठ्यपुस्तके पिढ्यानुपिढ्या अभ्यासिली गेली. थोडक्यात असे म्हणावयास हरकत नाही की, अव्वल इंग्रजी अमलातील मराठी गद्यग्रंथांची भाषिक घडण ही मे. कँडी यांच्याच श्रमांचे फळ होय !

'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' तो हाच.

**संदर्भग्रंथ**

(१) आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, डॉ. कृ. भि. कुलकर्णी, १९५६.

(२) युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा, डॉ. श्री म पिंगे, १९६०.

प्रकरण पाचवे

# ख्रिस्ती धर्मप्रचारातून निर्माण झालेले वाङ्मय

हिंदुस्थानात जे पाश्चात्त्य ख्रिस्ती धर्मप्रसारक आले, त्यांनी धर्मप्रसार सुलभ रीतीने करिता यावा व एतद्देशीयांना ख्रिस्ती धर्माची तत्त्वे चांगल्या प्रकारे समजावून देता यावी, म्हणून देशी भाषांचा अभ्यास केला व ख्रिस्ती धर्मपर असे अनेक ग्रंथ लिहिले. गोव्याला येऊन राहिलेले फादर स्टीफन्स, फादर क्रुवा वगैरे जेझुइट ख्रिस्ती धर्मप्रसारक, तंजावरचा श्वार्ट्झ, सेरामपूर येथील केरी इत्यादी धर्मप्रसारकांनी आपापल्या परीने ख्रिस्ती वाङ्मय निर्माण केले होते. खुद्द मुंबईत व महाराष्ट्रात मराठी भाषेचा अभ्यास करून मराठी भाषेत अनेक धार्मिक ग्रंथ, शालोपयोगी ग्रंथ, काव्यग्रंथ व नियतकालिके निर्माण करण्याचे श्रेय अमेरिकन-मिशनच्या वतीने आलेल्या धर्मप्रसारकांना दिले पाहिजे. त्याचप्रमाणे स्कॉटिश मिशनरी सोसायटीचाही अशाच प्रकारचे धार्मिक वाङ्मय तयार करण्यात भाग होता.

### अमेरिकन-मराठी-मिशन

महाराष्ट्रात इंग्रजी अंमल सुरू होण्यापूर्वीच ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी मुंबईत १८१३-मध्ये ‘ अमेरिकन-मराठी-मिशन’ची मुहूर्तमेढ रोविली. या मिशनमार्फत ख्रिस्ती धर्माचे व पाश्चात्त्य संस्कृतीचे लोण महाराष्ट्रात फैलावले. या कामात त्यांना कितीतरी अडचणी आल्या. या वेळी इंग्रजी राजसत्तेचे बस्तान हिंदुस्थानात ठीक बसले नव्हते. अशा वेळी लोकांच्या धर्मभावना दुखावल्या तर ते बिथरतील, म्हणून एल्फिन्स्टनप्रभृती इंग्रज मुत्सद्द्यांचा ख्रिस्ती धर्मप्रसाराला पाठिंबा नव्हता. एतद्देशीय लोकांची मतेही त्यांच्या कार्याबद्दल साशंक होती. त्यामुळे ख्रिस्ती धर्मप्रसारकांना

अनेक ठिकाणी अपमान व छळ सहन करावा लागला. तसेच, ज्या मराठी भाषिकांमध्ये त्यांना धर्मप्रसार करावयाचा होता, त्यांच्या भाषेच्या अभ्यासाचाही प्रश्न त्यांच्यासमोर उभा होता. कोशव्याकरणादिकांचे साहाय्य नसतानाही प्रथम त्यांनी मराठी भाषेचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला. थोड्याशा उच्चवर्णीयांमध्ये आपणांला धर्मप्रसार करता आला नाही, तरी दरिद्री व अज्ञानी अशा बहुसंख्य समाजामध्ये मिसळून त्यांच्या अडचणी त्यांनी दूर केल्या, त्यांच्यावर धर्माच्या नावाने होणाऱ्या सामाजिक अन्यायाची त्यांना जाणीव करून दिली, तर आपले धर्मप्रसाराचे काम बरेच सुलभ होईल, असे त्यांना वाटले व त्याप्रमाणे या धर्मप्रसारकांनी आपल्या कामाची आखणी केली. ठिकठिकाणी मुलांमुलींच्या शाळा उघडणे, रोगग्रस्तांच्या औषधपाण्याची सोय करणे, सार्वजनिक ठिकाणी जाऊन छोट्या-छोट्या सभा घेणे व लोकांच्या अडीअडचणी समजून घेणे इत्यादी अनेक मार्गांनी त्यांनी लोकांना मदत केली. या आपलेपणाच्या वागणुकीमुळे बहुजनसमाजाला, विशेषतः दलितवर्गाला, ख्रिस्ती धर्मोपदेशकांविषयी आपुलकी निर्माण झाली व हेच लोक आपले मार्गदर्शक आहेत, अशी त्यांची समजूत झाली. अशा प्रकारे अशिक्षित खेडवळ समाजाला वश करून घेऊन ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याचे अभिनव तंत्र ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी अवलंबिले. वर उल्लेखिलेल्या धर्मप्रसाराच्या अनेक मार्गांपैकी ज्ञानप्रसारार्थ जी पुस्तके निर्माण झाली, त्यांचा येथे आढावा घ्यावयाचा आहे.

**बायबलाचे भाषांतर**

विल्यम केरी याने 'मॅथ्यूचे शुभवर्तमान' (१८०५) या पुस्तकाच्या द्वारे मराठी भाषेत बायबलाच्या भाषांतराची सुरुवात केली व सेरामपूर मिशनतर्फे 'नवा करार' (१८११) व 'ईश्वराच्या अवघ्या गोष्टी' (१८१२) प्रसिद्ध झाल्या. त्यानंतर अमेरिकन-मिशनमधील गॉर्डन हॉल, सॅम्युएल न्यूवेल, होरेशिओ बार्डवेल, जॉन निकोल्स व ॲलन ग्रेव्हज या पाच धर्मप्रसारकांनी मिळून बायबलाचे मराठी भाषातर १८२६-मध्ये छापून प्रसिद्ध केले. हे भाषांतर तयार करण्यात काही मराठी पंडितांचा फार मोठा वाटा होता.[1] तथापि बायबलासारखा मोठा ग्रंथ शाळांमधून मुलांच्या अभ्यासक्रमात ठेवणे शक्य नव्हते त्यासाठी शालेय स्वरूपाची अनेक पुस्तके प्राथमिक अवस्थेत तयार झालेली आढळतात. या पुस्तकासंबंधी ज्ञानोदयकार लिहितात, "मिशनारी शाळांत ज्या रितीने आतां शिकवितात त्याप्रमाणेंच तेव्हां देखील शिकवीत असत. लहान लेंकरांस शिकविण्याकरितां त्यावेळीं मराठींत एक हि पुस्तक नव्हते यास्तव कित्येक पुस्तके स्वतां त्या उपदेशकांनी (गॉर्डन हॉल, न्यूवेल वगैरे) रचिली आणि जो छापखाना त्यांनीं घातला होता (अमेरिकन-मिशन छापखान्याची सुरुवात १८१५-मध्ये मुंबईला झाली.) त्यांत छापून लोकांत त्यांच्या हजारो प्रति

1 Memorial Papers of the American Marathi Mission, पृ ९६.

प्रसिद्ध केल्या. त्यांनी जीं पुस्तके केलीं त्यांतून कित्येक अद्यापि शाळेंत शिकवितात... त्या उपदेशकांनी भूगोल, खगोल, धर्म, नीति इत्यादि विषयांवर पुष्कळ पुस्तकें छापून शाळांत शिकविलीं... त्या उपदेशकांस ह्या विषयांवर पुस्तकें लिहिण्याचें अगत्य होते. कारण त्यांनीं पुस्तकें रचिल्या अगोदर ह्या मुंबई इलाख्यांत तर चुकी-रहीत भूगोलखगोल, नीति, धर्म इत्यादि विषयावर एकहि पुस्तक नव्हते." [1]

## ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी

ही सर्व पुस्तके निर्माण करण्यात अमेरिकन-मिशन व स्कॉटिश मिशन या दोन संस्था प्रमुख होत्या. याशिवाय पुस्तकांच्याद्वारा खिस्ती धर्मप्रसार करण्याच्या उद्देशाने १८२७-मध्ये The Bombay Auxiliary Religious Tract Society नावाची खास संस्था जन्माला आली. याच संस्थेचे १८३२-मध्ये The Bombay Tract and Book Society असे नामांतर करण्यात आले. या संस्थेच्या वतीने तयार होणारी बहुतेक पुस्तके युरोपियन धर्मोपदेशकांनी लिहिलेली होती. ही पुस्तके व्याकरणशुद्ध व्हावी म्हणून जी तपासणीसमिती नेमिलेली होती, तीत मोल्स्वर्थ, स्टीव्हन्सन, मरे, मिचेल, नेस्बिट, विल्सन इत्यादी मंडळी होती. अमेरिकन-मिशनतर्फे महाराष्ट्रात आलेल्या सुरुवातीच्या खिस्ती धर्मप्रसारकांमध्ये रे. गॉर्डन हॉल हा एक होय. याने रचिलेली 'लेकराची पहिली पोथी' (१८१८), 'प्रश्नोत्तरावळी' (१८१९), इंग्लिश भाषणाचे ज्ञान मिळवण्यासाठीं साह्यकारि' (१८१९) 'त्रिभुवनांची गोष्ट' (१८२२), 'खगोलविद्या' (१८२४), 'देवाच्या दहा आज्ञा (१८५५) ही काही पुस्तके होत. प्राथमिक खिस्ती वाङ्मयात खिस्ती धर्माची प्रश्नोत्तररूपाने माहिती देण्याच्या पद्धतीचा अवलंब करून तयार झालेल्या प्रश्नोत्तरा-वली पुष्कळ पहावयास मिळतात. त्यांचे स्वरूप ध्यानात येण्यासाठी पुढील प्रश्नोत्तरे पहावी—

प्रश्न — तुझा उत्पन्न करणारा कोण ?
उत्तर — परमेश्वर.
प्रश्न — देवानें दुसऱ्या कोणत्या वस्तूस निर्माण केले?
उत्तर — त्याने धोडे व डोंगर, ओहोळ व झाडें, जंतू व सूर्य, चंद्र व तारा सर्वप्रकारच्या वस्तु यांस निर्माण केले
प्रश्न — देवाने कशापासून सर्व वस्तु निर्माण केल्या ?
उत्तर — त्यानें शून्यापासून सर्व वस्तु निर्माण केल्या.
प्रश्न — येशू कोण आहे ?
उत्तर — तो परमेश्वराचा येकुलता येक पुत्र ! ज्याने नेमलेल्या काळीं कुमारीचे ठायीं पुरुषसंयोगावांचून अवतार घेतला ! [2] (पृ. ३)

१. ज्ञानोदय, पु. १२, १८५३, पृ. ३४५–३४६.
२ प्रश्नोत्तरावली, पृ. १०.

अशा प्रकारच्या प्रश्नोत्तरावली गॉर्डन हॉलखेरीज 'प्रश्न आणि उत्तर' (१८२३), रे. मिचेलकृत 'मुलांसाठीं प्रश्नोत्तरावली' (१८२८), 'लहान मुलांसाठीं प्रश्नोत्तरावली', रे. विल्सनकृत 'पहिली प्रश्नोत्तरावली' (१८३३), रे. मंगरकृत 'प्रार्थनासंबंधीं प्रश्नोत्तरे' (१८३६) इत्यादी अनेक आढळतात. तसेच, 'देवाच्या दहा आज्ञां'चे स्वरूप हे असे आहे —

(१) माझ्यासमोर तुला दुसरे देव न होवोत।

(२) तूं आपल्यासाठीं कोरीव मूर्ति। व कांहीं आकृती जो वरील आकाशांत। व जी खालील पृथ्वींत व जी पृथ्वीच्याखालील पाण्यांत। ती करूं नको। त्यांच्या पायां पडूं नको। आणि त्याची सेवा करूं नको कां। कीं जो मी तुझा परमेश्वर। तुझा देव। आवेशी देव।

(३) परमेश्वर तुझा देव। त्याचे नाम तूं व्यर्थ घेऊं नको। कां कीं जो त्याचे नाम व्यर्थ घेतो। त्याला परमेश्वर उजळ करणार नाहीं।[1]

या 'आज्ञां'त मूर्तिपूजेविरुद्ध दिसून येणारा प्रचार बहुतेक खिस्ती वाङ्मयात आढळून येतो. तसेच, विरामचिन्हांऐवजी चरणरेषा वापरण्याचा प्रघातही येथे दिसतो.

**'लेंकरांची पहिली पोथी'**

ज्या 'पोथी'च्या पुढील काळात अनेक आवृत्त्या निघाल्या, ती 'लेकरांची पहिली पोथी' (१८१८) गॉर्डन हॉलने प्रथम तयार केली व १८२४-मध्ये डॉ. स्टीव्हन्सन याने ती सुधारली. तीत येशू खिस्ताच्या जन्माबद्दल व इतर काही गोष्टी दिलेल्या आहेत. या 'पोथी'चे स्वरूप असे आहे :

'येशू बोलिला बाळकांस असूं द्या आणि मजजवळ येण्याला त्यांस मना करूं नका कीं आकाशांचे राज्य अशांचे आहे॥

देव सर्व काळ तुझे जवळ आहे॥ जे कांहिं काम तूं करितोस ते देव पाहातो॥ तुझें खरे बोलणें तो ऐकतो॥ तुझे मनांतील विचारहि तो जाणतो॥ यासाठीं तुं कांहिं वाईट काम करूं नको॥ तुं कोणि वाईट शब्द बोलुं नको॥ तुं कोणि वाईट विचार करूं नको॥ देवाची याद तुं सोडुं नको॥ देवाला काळोख आणि उजेड यांचा भेद नाहीं॥ जसे दिवसांत तसे रात्रींत त्याला दिसतें॥'[2]

याच पद्धतीने 'लेकरांची दुसरी पोथी' (१८२८) लिहिली गेली. उपदेशाची भूमिका घेऊन पुस्तककर्त्याने येशूमाहात्म्य वर्णिले आहे :

"देवाची आज्ञा आचरण्याचा नेम आहे. मी त्याची आज्ञा पाळीन कां कीं माझी आशा त्याच्या शब्दावर आहे आणि जे त्याला भीत आहेत त्यांस आनंद होईल. जर आम्ही देवाची प्रीति करितों तर आम्हास आपणाजवळ नेईल. हे देवा,

१. देवाच्या दहा आज्ञा, पृ. १–२.
२. लेंकरांची पहिली पोथी, पृ. १–२.

मला ने आणि मी तुझ्याजवळ धावून येईन. जर मी वांचतों तर मी देवासाठीं वांचतों. जर मी मरतों तर मी प्रभूसाठीं मरतों. वांचतों अथवा मरतों हें प्रभूच्या साठीं मला असो."[1]

अशाच प्रकारे "आपल्या आत्म्याविषयीं उत्तरोत्तर ज्ञान प्राप्त व्हावयाची इच्छा करून" 'आत्म्याविषयीं लेंकराची पहिली पोथी' (१८३६) आणि 'आत्म्याविषयीं लेंकरांची दुसरी पोथी' (१८३७) लिहिलेली आढळते.

### ख्रिस्तीधर्मविषयक पुस्तके

ख्रिस्ती धर्माच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना देण्यासाठी व त्याचा प्रसार करण्यासाठी वरील पद्धतीची अनेक पुस्तके या काळात तयारी झाली. न्यूवेलकृत 'शुभवर्तमान' (१८२४), टॉमस कँडीकृत 'खऱ्या धर्माचीं चिन्हें' (१८२९), 'खरा मार्ग कोणता याचा विचार' (१८३०), 'भाव कोणावर टेवावा याचा विचार' (१८३१), 'येशू ख्रिस्ताने जी प्रार्थना शिष्यास सांगितली तिजवर टीका' (१८३६), 'यिशु खीस्त याचे आवतारकृत्याची बखर' (१८२०), मोल्स्वर्थकृत 'पापपीडितांस शांति' (१८२९), डेव्हिड ॲलनकृत 'शास्त्रांतील उपदेशसार' (१८३०), 'शास्त्राचा सारांश' (१८३४), हेन्री बॅलंटाइनकृत 'शास्त्रांतील मुख्य सिद्धांताविषयीं प्रश्न' (१८४१), जे. कूपरकृत 'मोठा विचार – मरणानंतर काय प्राप्त होईल' (१८२९), जेम्स मिचेलकृत 'उद्धाराचा उपाय' (१८३३), जॉर्ज कॅंडीकृत 'ख्रिस्ती धर्म कसा उत्पन्न झाला आणि कसा पृथ्वीवर वाढला' (१८३२), वाइल्डरकृत 'पवित्र शास्त्रांतील मुख्य विषय' (१८५७) इत्यादी अनेक छोटी-मोठी पुस्तके प्रसिद्ध झाली.

### ख्रिस्त-चमत्कार-वाङ्मय

ख्रिस्ताच्या जीवनातील काही चमत्कारांची वर्णने करणारी पुस्तकेही या काळात लिहिली गेली. उदाहरणार्थ, 'Parables of our Blessed Saviour' (१८२१) अर्थात 'आमचा धन्य उद्धरणार जो यिशु खीस्त याने जे दृष्टांत सांगितले त्यांतून कांहीं काढून या बखरींत लिहिले आहेत.' किंवा Miracles of our Blessed Saviour' (१८२६) म्हणजे "आमचा धन्य उद्धरणार जो येशू खीस्त याने जे चमत्कार केले त्यांतून कांहीं निवडून या वहीमध्ये सांगितले आहेत." यांतील एका चमत्काराच्या वर्णनाचा हा नमुना पहावा —

"...आणि येशू यरूशलेमास जात होता, तेव्हां असे जाले, कीं शोमरोन व गालील यांचेमधून गेला आणि तो येके गांवांत शिरत असतां, दाहा कोढी माणुस त्याला भेटले; हे दूर उभे राहिले, आणि उंच स्वर काढून बोलिले, येशू गुरू, आम्हावर दया कर आणि तो पाहून त्यास बोलिला, तुम्ही जाऊन आपणांस उपाध्यांसीं

१. लेंकरांची दुसरी पोथी, आ. २, पृ. २.

दाखवा. आणि ते जात असतां असे जालें, ते शुद्ध केले गेले. आणि त्यांमधील येक निरोगी जाला असे याने पाहून माघारी मुरडून, मोठे स्वराने ईश्वरास गौरविलें आणि त्याचे पायांजवळ तोंडावर पडून उपकार त्याला मानिला."[1]

**इतर-धर्मकथा**

केवळ खिस्ताच्या जीवनातील चमत्कारांवर आधारलेल्या गोष्टींची पुस्तके खिस्ती धर्मोपदेशकांनी जशी तयार केली, तशी इतर व्यावहारिक कथा घेऊन त्यांत खिस्ती धर्माचा मोठेपणा सांगणारी काही पुस्तके रचिली. मनोरंजक गोष्टींच्याद्वारा खिस्ती धर्मांची तत्त्वे लोकांच्या मनावर ठसविण्याचा हा प्रयत्न होता. अशा कथावाङ्मयात मिसेस फरार हिने लिहिलेल्या 'चमत्कारिक गोष्टी' (१८३४), 'हेनरी आणि त्याचा संभाळणारा गडी संभू ह्यांची गोष्ट' (१८३५) अशा पुस्तकांचा समावेश होतो. हेन्री नावाच्या एका आठ-दहा महिन्यांच्या मुलाला 'पोरपोरका' करून त्याला एका युरोपियन बाईकडे आणविले; पुढे त्याचा सांभाळ संभू गड्याने केला. ही मामुली गोष्ट सांगून मिसेस फरारने खिस्ती धर्माची महती वर्णिली आहे. तसेच, मिसेस कडी हिने 'मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी' (१८३३) लिहिल्या. 'आंबा घेण्याची गोष्ट', 'खादाड पोरांची गोष्ट', 'मुंग्यामाशांची गोष्ट', 'रागाच्या उपायाची गोष्ट', 'जीभ आटोपण्याविषयीं गोष्ट', 'कुणब्याच्या कुटुंबाविषयीं गोष्ट', 'विधवांची गोष्ट' अशा गोष्टी सांगून या कथासंग्रहद्वारा खिस्ती तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन लेखिकेने केले आहे. तत्कालीन सरकारी शाळांमधून वाचल्या जाणाऱ्या 'पंचोपाख्यान' नामक पुस्तकाला उत्तर म्हणून की काय मिशनऱ्यांनी 'नवीन पचोपाख्यान' (१८३७) तयार केले पाच एतद्देशीयांकडून लिहवून घेतलेल्या कथांचा हा संग्रह आहे त्यांतील एक नमुना असा आहे:

"हे माझ्या प्रिया, मी तुला बहुत वेळ सांगितले, कि आपलीं अंतःकरणे फार दुष्ट आहेत, पवित्र आत्म्याच्या साहाय्यावांचून आपणास चांगले होववत नाहीं. तो पवित्र आत्मा आम्हासाठीं मिळवायास आमचा तारणारा जो येशू खीस्त, तो कूसावर मरण पावला आणि जीं लहान मुले जपून चालायास इच्छितात, त्यांचीं वाईट अंतःकरणे दूर व्हावयास आणि त्यांस पवित्र आत्म्याचे साहाय्य मिळवायास, त्यांजला येशू खीस्ताची प्रार्थना वारंवार केली पाहिजे. असे असतां, मुला तूं प्रार्थना करायास विसरतोस, तर तुझ्याने कधीं चांगले होववणार नाहीं आणि जर तूं चांगला होत नाहींस, तर मरणानंतर जेथें दुष्ट मुले जातात ती जागा फार दुःखाची आहे. परंतु तुला त्या वाईट जागेस जाण्याविषयीं माझ्यानें गोष्ट काढवत नाहीं"[2]

१. Miracles of our Blessed Saviour, पृ. २८–२९.

२. नवीन पंचोपाख्यान, पृ. २०–२१.

**यात्रिकक्रमण**

अशा प्रकारचे मिसेस कॅंडी हिचे 'मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी' (१८३३), 'बालमोतांतलें शाळेचे वर्णन' (१८३७), 'सदाचरणाच्या गोष्टी' (१८४८), 'फुलमुनी आणि करुणा ह्यांचा वृत्तांत' (१८५९) इत्यादी अनेक कथासंग्रह या काळात निर्माण झालेले आढळतात. या गोष्टीरूप ग्रंथांत हरि केशवजी यांचे 'यात्रिकक्रमण' (१८४१) सरस आहे. जॉन बनियनच्या Pilgrim's Progress या रूपककथेचे हे भाषांतर आहे. रूपकात्मक व खिस्ती धर्माची तात्त्विक चर्चा असे या ग्रंथाचे स्वरूप असूनही भाषांतर सुंदर वठले आहे. या ग्रंथाची सुरुवात अशी –

"या जगदारण्यांतून जात असतां मी एका ठिकाणीं उतरलो, आणि तेथें एक गुहा होती त्या गुहेत निजलो; ते समयीं मला स्वप्न पडले, त्या स्वप्नांत पाहतो तो एक चिंध्या पांघरलेला मनुष्य आपल्या घराकडेस पाठ करून उभा आहे, त्याच्या हातांत एक पुस्तक आहे, आणि पाठीवर मोठे ओझे आहे. मग तो ते पुस्तक उघडून वाचूं लागला, आणि वाचतां वाचतां रडून कापूं लागला; मग त्यास तो गैहिंवर सांवरेना असे होतांच मोठ्यानें ओरडून म्हणूं लागला कीं, "अहाहा आतां मी काय करूं ?

"अशी त्या मनुष्यास अवस्था प्राप्त होऊन तो आपल्या घरीं गेला, आणि ते दुःख आपल्या स्त्रीस व मुलांस कळूं नये म्हणून ते तसेच जिरवून ठेवूं लागला; शेवटीं ते दुःख फार वाढून त्यास उगे राहवेना. ते समयीं आपल्या स्त्रीस व मुलांस ते आपले संकट सांगूं लागला. कीं 'अगे जिवलग स्त्रीये, अरे माझ्या पोटच्या मुलांनो, मजवर जें दुःखाचे ओझे पडलें आहे तेणेकरून तर मी फार व्याकूळ झालो आहे. तशांत ह्या नगरावर आकाशांतून अग्नि पडून हे जळून जाणार असे मला निश्चित वर्तमान लागले आहे; त्यांत माझा व तुम्ही जीं माझीं जिवलगे त्या तुमचा अगदीं नाश होईल, परंतु जर एकादा आपल्यास मार्ग सांपडला तर मात्र आपले रक्षण होईल."'[1]

**प्रार्थनासंग्रह**

खिस्ती धर्म स्वीकारिल्यानंतर खिस्तभक्तांनी करावयाच्या प्रार्थनेसंबंधी काही पुस्तके या काळात निर्माण झालेली आढळतात. 'भजनाचे मासले' (१८३२) हे या प्रकारचे पहिलेच पुस्तक असावे. यात 'कुटुंबासहित संध्याकाळची प्रार्थना', 'एकांतीची प्रार्थना', 'जेवणाविषयीं प्रार्थना' अशा काही गद्य प्रार्थना देऊन शेवटी दहा कविता जोडलेल्या आहेत. पद्यरचनेचा खिस्ती धर्मोपदेशकांचा हा प्रथम प्रयत्न म्हणूनच या कवितांकडे पहावयाचे. उदाहरणादाखल खालील कविता पहावी :

सुख साधायाचा उपाय ॥ चाल कानडा ॥
तुम्हास मुलां हो सुख व्हावे । तर तुम्ही ईश्वरासच भ्यावे
त्याच्याच स्वाधीन सर्व गोष्टी । ठिकाण तयाचें सारी सृष्टी

१. यात्रिकक्रमण, हरि केशवजी, पृ. १.

तयाचें ईष्टत्व साधा ऐसें। तराया उपाय पुण्य तैसें
येशूनें आम्हास्तव केलें मरून। ते घेता तरावे तयाला स्मरून
ईश्वर तुम्हांस मित्र साधा। सुखाचा समुद्र असें लाधा
व्हा राजी त्याचीच करा भक्ती। पक्षांत अनंत घ्यावी शक्ती.[1]

याखेरीज ॲलन ग्रेव्हजकृत 'गीतांचे नवीन पुस्तक' ( १८३३ ), रे. फरारकृत 'दाविदाचीं गीते' ( १८३८ ), रे. बॅलंटाइनकृत 'देवाचे भजन करण्याचीं गीतें' ( १८४५ ), लेंकरांचीं गायनें' (१८६२), 'बुलबुल' ( १८७४ ) इत्यादी पद्यपुस्तके वापरली जात. खिस्ती गीतकारांत रे. हेन्री बॅलंटाइन याला फार महत्त्वाचे स्थान आहे; कारण त्याच्या पूर्वी जी प्रार्थना-गीते वापरात होती, त्यांतील स्वररचना देशी पद्धतीची होती. प्रार्थना करिताना खिस्ती लोकांच्या डोळ्यांपुढे त्यांचे पूर्वीचे रीति-रिवाज व धार्मिक चाली उभ्या राहत. त्यांची त्यांना आठवण होईल या भीतीनेच ती गीते बाजूला सारून रे. बॅलंटाइनने इंग्रजी भाषेतील उत्तम गीते निवडून ती मराठीत आणिली. त्यांपैकी एक इंग्रजी गीत व त्याचे भाषांतर नमुन्यादाखल खाली दिले आहे.

### ६९ ख्रिस्ताचें रक्त

१ येशूच्या रक्ते भरले, धुण्याचे कुंड जाण,
जे पापी त्यांत घातले, ते होती शुद्ध प्राण.
२ खांबासी मरणारा चोर, त्यामुळें हर्षला,
तेणेची माझा दोष घोर, पुसेल सगळा.
३ हे प्रभू तुझें, रक्तमोल, कधीं न सरणार,
देवाचें सर्व प्रिय कूळ, तूं तेणे खंडणार.
४ हा रक्त ओघ वाहतां, म्यां भावें पाहिला,
तेथूनी स्तुति करितां, उद्धार गायिला.
५ सर्व आयुष्य पावेतों, करीन स्तवनें,
व जेव्हां प्राण सोडितों, अनंत गायनें.[2]

रे बॅलंटाइनप्रमाणे रे. मरे मिचेल यानेही पुष्कळ खिस्तीधर्मपर काव्य रचिलेले आढळते. त्याने 'येशू खिस्त माहात्म्य' या विषयावर अभंगपर असे सहा अध्याय लिहून 'ज्ञानोदय'मध्ये प्रसिद्ध केले होते.

---

१. भजनाचे मासले, पृ. ३७.
२. देवाचें भजन करण्याचीं गीते ( १८५५ ), गीत ६९.

The Blood of Christ
( 1 ) There is a fountain filled with blood,
Drawn from Immanuel's veins,
And sinners plunged beneath that flood,
Lose all their guilty stains.

### शालेय पुस्तके

ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी सुरू केलेल्या शाळांमधून वेगवेगळ्या विषयांवर जी पुस्तके वापरली जात, त्यांचाही उल्लेख येथे करणे आवश्यक आहे. सरकारी शिक्षणसंस्थेच्या शिक्षणक्रमाप्रमाणे यांच्याही शालेय अभ्यासक्रमात लेखनवाचनाबरोबर गणित व भूगोल हे विषय शिकविले जात. महाराष्ट्रातील जुन्या पौराणिक भौगोलिक कल्पना नाहीतशा करून लोकांना शास्त्रीय पद्धतीने विचार करावयास लावण्याचे काम ज्याप्रमाणे शाळा-पुस्तक-मंडळीने प्रारंभापासून केले, त्याप्रमाणे ख्रिस्ती धर्मोपदेशकानीही या विषयांवर पुस्तके लिहून मुलांच्या खगोलभूगोलासंबंधी असलेल्या अशास्त्रीय कल्पना काढून टाकण्याचा प्रयत्न केला. इ. स. १८२४-मध्ये रे. गॉर्डन हॉल याने 'खगोल भूगोल इत्यादिक' हे पुस्तक तयार केले व १८२९-मध्ये रे. ॲलन याने ते सुधारून वाढविले. शाळा-पुस्तक-मंडळीने या विषयावर 'भूगोल खगोल इत्यादिविषयक संवाद' ( १८३२ ) रचण्यापूर्वीच ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी आपले पुस्तक तयार केले होते. जुन्या धार्मिक समजुतींना धक्का देऊन त्या घालविण्याच्या कामात त्यांनी आघाडीवर असणे स्वाभाविकच होते. तथापि 'पृथ्वीचा मोठा गोळा आहे. त्याला परमेश्वरावांचून कोणाचा आधार नाही,' या कल्पनेलाच प्राधान्य दिलेले आढळते. ईशस्तुतीचा या पुस्तकातील नमुना पहावा.

'शास्त्रांत असे लिहिले आहे, कीं जें कांहीं यहोवानें इछिलें ते त्यानें आकाशांत आणि पृथ्वींत आणि समुद्रांत आणि सर्व खोल जाग्यांमध्ये केलें आहे. पृथ्वीच्या पाठीपासून वाफा उठवितो. पाऊसासहित तो विजा घडवितो. तो आपल्या भांडारांमधून वारे आणितो तो आपला वारा सुटवितो आणि पाणी वाहातात.'[१]

मागील पृष्ठ १५८—वरून

( 2 ) The dyıng thief rejoiced to see
That fountain in his day;
And there have I as vile as he,
Washed all my sins away.

( 3 ) Dear, dying Lamb! Thy precious blood,
Shall never lose ıts power,
Tıll all the ransomed church of God
Be saved, to sin no more.

( 4 ) E'er sınce, by faith, I saw the streame
Thy flowing wounds supply,
Redeeming love has been my theme
And shall be till I die.

( 5 ) Then, in a nobler, sweeter song,
I'll sing the power to save,
When this poor lisping stammering tongue
Lies silent in the grave. – Amen.

Hymns of the Faith, No. 94.

१. खगोल भूगोल इत्यादिक, पृ. १२.

यानंतर याच विषयावर रे. बर्जेसकृत ' खगोलविद्या ', मिसेस बॅलंटाइनकृत ' लहान खगोलविद्या ', रे. फेअरबँककृत ' भूगोलविद्या ' इत्यादी पुस्तके लिहिलेली आढळतात.

इतिहास या विषयालाही खिस्ती शाळांत स्थान होते. सुरुवातीला शाळा-पुस्तकमंडळीने तयार केलेला कुशाबा लिमयेकृत ' महाराष्ट्र देशाचे वर्णन आणि इतिहास यांचा प्रश्नोत्तरावलिरूप ग्रंथ ' ( १८४० ) या शाळांत वापरला जाई. त्याशिवाय मिसेस विल्सनकृत ' आशुरी आणि बाबेली लोकांचे वृत्तांतकथन ', ' ग्रेकी लोकांचे वृत्तांतकथन ', ' मेदी आणि पार्शी लोकांचे वृत्तांतकथन ' ही पुस्तके या शाळांत उपयोगिली जात. तसेच, बाबा पदमनजी यांचा ' महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास ' ( १८६६ ) शिकविला जाई. ' इतिहास शिकल्याने ईश्वरी सूत्राचा मार्ग बराच स्पष्ट दिसतो,' ही बाबांची या पुस्तकामागील भूमिका होती.

### क्रमिक पाठ्यपुस्तके

सरकारी विद्याखात्याप्रमाणे खिस्ती शाळांमधून क्रमिक पाठ्यपुस्तकेही वापरात असलेली आढळतात. ती तयार करण्यात बाबा पदमनजी हेच मुख्य होते. हिंदु-धर्माची निंदा व खिस्ती धर्माची स्तुती हे सूत्र या सर्व क्रमिक पाठ्यपुस्तकांत दिसून येते. ' मूर्तिपूजा ', ' मूर्तिपूजक ', ' मूर्तिपूजकांसाठीं आम्ही काय करावे,' ही काही पाठांची शीर्षके आहेत. या पुस्तकातील काव्याचा एक नमुना पहावा :

**पंढरी**

जाऊं म्हणतांची पंढरी । नरकराज हर्ष करी १
धरितां पंढरीची वाट । जरी-मरी घेई पाठ २
करितां चंद्रभागास्नान । देहमळा पडे हान ३
होतां पांडुरंगदर्शन । पडे दृष्टीसी पाषाण ४
दास म्हणे रे केशवा । आम्हा नको रे तुझी सेवा ५[१]

### वि. कों. ओक यांचे खिस्ती लेखन

विनायक कोंडदेव ओक यांच्याकडूनही खिश्चन व्हरनॅक्युलर एज्युकेशन सोसायटीने खिस्ती शाळांसाठी क्रमिक वाचनपुस्तके लिहवून घेतली होती. जरी ओकांसारख्या एका हिंदू गृहस्थाने ही पुस्तके रचिलेली असली, तरी त्यांत एकही धडा असा नाही की, ज्यात खिस्ती धर्मप्रसाराची कल्पना नाही. खिस्ती मंडळींच्या योजकतेपेक्षा ओकांची स्वधर्मनिंदेला कारणीभूत होण्याची तयारी विचित्र दिसते. ओकांनी सरकारी विद्याखात्यासाठी लिहिलेल्या पुस्तकांत व्यक्त होणारी राजनिष्ठा व खिस्ती शाळांसाठी लिहिलेल्या पुस्तकांतील स्वधर्मनिंदा पाहून असे वाटते की, ' अर्थस्य पुरुषो दासः ' हेच खरे. ओककृत पुस्तकातील एक नमुना असा आहे :

१. मुलांकरितां दुसरें पुस्तक, आ. ५, पृ. ७३.

" अशी कल्पना कर कीं, तुला भूक लागली आहे. तुला खायाला पाहिजे आहे; तें तूं आपल्या ममताळू आईपाशीं न मागतां जर एकाद्या दगडापाशीं मागितलेंस, तर तें तुला मिळेल काय ? नाहीं. तुला तें मिळणार नाहीं. त्या दगडास तुझे बोलणे ऐकूंसुद्धां येणार नाहीं. पण पुष्कळ लोक अशा वेडेपणाच्या रीतीने वागतात. म्हणजे त्यांस जें पाहिजे असतें, तें आपल्या आकाशांतील बापापाशीं म्हणजे खऱ्या देवापाशीं ते मागत नाहींत, तर तें ते निर्जीव मूर्तीपाशीं मागतात. ह्याविषयीं देवाच्या शास्त्रात असें लिहिले आहे : राष्ट्राच्या मूर्ति रूपे व सोने आहेत. मनुष्याच्या हाताचे काम आहेत त्यांस मुखे आहेत. त्यास मुखें आहेत परंतु बोलत नाहींत, त्यांस डोळे आहेत परंतु दिसत नाहीं, त्यांस कान आहेत परंतु ऐकूं येत नाहीं, त्यांस नाके आहेत परंतु हुंगतां येत नाही, त्यांस हात आहेत परंतु चांचपवत नाहीं, त्यास पाय आहेत परंतु चालवत नाही, आणि त्यांस आपल्या गळ्यांतून शब्द उच्चारवत नाहीं. " १

क्रमिक पाठ्यपुस्तकांसारखीच मुलांना मार्गदर्शक अशी 'वाचनपाठावलि' ( १८८४ ) डॉ. बिसल व रामकृष्णपंत मोडक यांनी 'ज्ञानोदय' या खिस्ती नियतकालिकातील निवडक वेचे एकत्र आणून तयार केली होती.

## मुलींसाठी वाङ्मय

खिस्ती धर्मोपदेशकानी मुलांप्रमाणे मुलींच्याही स्वतंत्र शाळा उघडून त्यांतून खिस्ती धर्मप्रसार केला होता. महाराष्ट्रात मुलींच्यासाठी शाळा काढून स्त्रीशिक्षणाला सुरुवात करण्याचे श्रेय या मंडळींनाच द्यावे लागेल. इ. स. १८२४-च्या मार्च महिन्यात प्रथमच अमेरिकन मिशनच्या वतीने मुंबईला पहिली मुलींची शाळा स्थापिली गेली. दोन वर्षांच्या अवधीत या शाळेत सुमारे पंचाहत्तर मुली शिकू लागल्या. या शाळेला तत्कालीन सरकारी अधिकाऱ्यांनीही मदत केली होती. त्या वेळचा मुंबईचा गव्हर्नर माउंट स्टयुअर्ट एल्फिन्स्टन याने या शाळेला पाचशे रुपये दिल्याची नोंद आढळते. या शाळेत लेखनवाचन, भूगोलखगोल, गणित, व्याकरण या विषयांखेरीज 'पुढे संसारांत त्यांस उपयोगी पडेल असें शिवणकाम व विणकामहि शिकवीत.' खास मुलींसाठी बाबा पदमनजी यांनी तयार केलेल्या 'स्त्रीकंठभूषण' या पुस्तकातील 'नवरा कसा करावा' यासंबंधीचे मार्गदर्शन असे आहे.

" खिस्ती लोकांनीं लग्न करितांना जो नेम पाळावयाचा तो हाच आहे कीं त्यांनीं आपलीं लग्ने प्रभूकडल्यासीं करावी. यांत केवळ मूर्तिपूजकांसीं लग्न करू नये इतकाच निषेध आहे असे नाहीं, तर जे भक्तिवान खिस्ती आहेत त्यांस नांवाच्या खिस्त्यांशीं ( ते जरी चांगल्या चालीनें चालणारे असले तरी ) शरीरसंबंध जोडण्याची मनाई आहे. प्राचीन काळीं हा नियम मोडून लग्नें होऊं लागल्याने जग दुष्टाईनें भरले आणि जलप्रलयाची तयारी झाली. जर भक्तिमान बायको नांवाच्या खिस्ती

१. मराठी तिसरे पुस्तक, विनायक कोडदेव ओक, आ. २, पृ. २१–२२.

मनुष्यासी लग्न करिती तर तीही त्याच्यासारखी धर्माविषयीं अनास्था करणारी होऊन त्यांचीं लेकरें त्यांच्यासारखींच होतील असा संभव आहे. परंतु जर उभयतां नवरा-बायको खरोखर ईश्वरभक्त आहेत तर तीं एकमेकांस आकाशाच्या मार्गांत चालावयास सहाय्य करतोल, आणि त्यांच्या लेकरांचें पाऊल त्याच्या वाटेत पडण्याची आशा आहे. तुम्ही अविश्वास्यांच्या जोडीचे होऊं नका; का कीं न्यायीपण व अधर्म यांचा काय संबंध ? आणि उजेड व अंधार यांचा काय भागीपणा ? "[1]

## बाबा पद्मनजी

खिस्ती वाङ्मयनिर्मितीमध्ये बाबा पद्मनजी[2] यांचा फार मोठा वाटा आहे. 'अरुणोदय' ( १८७९ ) या आत्मचरित्रात त्यांनी आपली हिंदुधर्मावरील श्रद्धा हळूहळू कशी कमी झाली व डॉ. विल्सन, डॉ. मिचेल इत्यादींच्या सान्निध्यामुळे आपण खिस्तीधर्माकडे कसे आकर्षिले गेलो, ते सांगितले आहे. खिस्ती धर्म स्वीकारण्याच्या अगोदरच त्यांनी वेगवेगळ्या सामाजिक विषयांवर आपले विचार निबंधरूपाने व्यक्त केले होते. रे. ना. वा. टिळक बाबांच्याविषयी लिहितात, 'रे. बाबा पद्मनजी म्हणजे मराठी खिस्ती सारस्वताचे जनक होत. त्यांच्या हातून बनलेली मराठी पुस्तके वजा केली तर आज मराठी खिस्ती वाङ्मय असून नसल्या-

१. स्त्रीकंठभूषण, बाबा पद्मनजी, पृ ८२–८३.

२. बाबा पद्मनजी ( १८३१–१९०६ ) बेळगाव, मुंबई.

बेळगाव येथे कासार-ज्ञातीत यांचा जन्म लहानपणीच प्राकृत धर्मग्रंथांचा अभ्यास ( सु. १८४२ ). यामुळेच 'बेळगांव-मिशन-स्कूल'मधील खिस्तीधर्मा-संबंधी शिक्षणाचा परिणाम फारसा नाही, उलट हिंदुधर्मावरील श्रद्धा वाढली. १८४७–४८-मध्ये मुंबईस 'एल्फिन्स्टन स्कूल'मध्ये शिक्षणासाठी गेल्यावर हिंदु-धर्मग्रंथांचा अधिक अभ्यास. १८४९-मध्ये 'फ्री चर्च विद्यालया'त प्रवेश केल्यावर हळूहळू 'सुधारणुकेस प्रारंभ' शेवटी १८५४-मध्ये 'बाप्तिस्मा.' पुढे खिस्तीधर्मप्रचारक व 'सत्यदीपिका' मासिकाचे संपादक या नात्याने वाङ्मयनिर्मिती (प्रारंभ १८५०-पासूनच). खिस्तीधर्मविषयक आकर्षणाचा व धर्मांतराचा वाङ्मयावर बराच परिणाम.

वाङ्मय: स्त्रीविद्याभ्यास (१८५२), व्यभिचारनिषेधक बोध (१८५४), कुटुंबसुधारणा ( १८५५ ), यमुनापर्यटन ( कादंबरी –१८५७ ), निःशास्त्रवादपरीक्षा ( १८५८ ), निबंधमाला ( १८६० ), वेदधर्मी लोकांचा वृत्तान्त ( १८६१ ), आमचीं भक्तीसंबंधीं पापें वाहणारा उपाध्या ( १८६२ ), मराठी-इंग्रजी कोश(१८६३ ), सुप्रभात ( १८६४ ), महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास ( १८६६ ), पवित्रशास्त्रांतील पहिलें पुस्तक ( १८६६ ), सिद्धान्तरत्नमाला ( १८६६ ), आत्मारामपंत आणि मृत्यु-शिपाई यांचा संवाद ( १८६७ ), स्त्रीकंठभूषण ( १८६८ ), कृष्ण आणि खिस्त यांची तुलना ( आ. ३ १८७१ ), खिस्ती लोकाचे कर्तव्यसार ( १८७२ आ. २ ), नव्या करारा-वरील टीका ( १८७७ ), उद्धारमार्गविज्ञान (१८७८), खिस्तकृत संवाद (१८७९), अधिक माहितीकरिता निबंधवाङ्मयामधील टीप पहावी.

सारखें होईल... ' त्यांनी एकस्यांनी लिहिलेली लहान-मोठी पुस्तके शंभरावर आहेत.[1] त्यांत 'स्त्री विद्याभ्यास निबंध' ( १८५२ ), 'हिंदु लोकांच्या सणाविषयीं निबंध' ( १८५३ ), 'व्यभिचारनिषेधक बोध' ( १८५४ ), 'हिंदुधर्म व खिस्तीधर्म यांची तुलना' ( १८५४ ), 'कुटुंबाची सुधारणा' ( १८५५ ), 'खिस्ती लोकांचें कर्तव्यसार' ( १८५६ ), 'यमुनापर्यटन' ( १८५७ ), 'आमचीं भक्तीसंबंधीं पापें वाहणारा उपाध्या' ( १८६२ ), 'वेदधर्मी लोकांचा वृत्तांत' ( १८६१ ), 'वैदिक हिंदुधर्म' ( १८९२ ) ही काही होत. तसेच, " ज्यांत अक्षय जीवनाचे शब्द आहेत असें जें पवित्र शास्त्र त्याचा ह्या देशात प्रसार होण्यास " त्यांनी मोल्स्वर्थच्या कोशावरून एक मराठी–इंग्रजी कोश ( १८६३ ) तयार केला. या कोशाखेरीज 'शब्दरत्नावलि' ( १८६० ) व 'संस्कृत–मराठी कोश' ( १८६१ ) त्यांनी रचिले. त्यांची धार्मिक मते कोणतीही असली, तरी त्यांची वाङ्मयसेवा कौतुकास्पद आहे.

## ॲबटचे तर्कशास्त्र

खिस्ती वाङ्मयाची पाहणी करिताना आढळणारा एक विशेष ग्रंथ म्हणजे रे. ॲबट याने रचिलेला 'तर्कशास्त्र' ( १८४७ ) हा होय. " सुज्ञांची जीभ ज्ञानाचें चांगलें उपयोग करिते, परंतु मूर्खांचें तोंड मूर्खपण ओकिते " या बोधवाक्याने ग्रंथाची सुरुवात केली आहे. लेखक प्रारंभीच सूचना देतो की, " हें पुस्तक विशेषेकरून ह्या देशांतील खिस्ती लोकांसाठी केले आहे. आणि जी उदाहरणें घेतलीं आहेत तीं बहुतकरून धर्माविषयीं आहेत. परंतु त्यावरून दुसऱ्या लोकांना ही विद्या शिकण्यास कांहीं अडथळा नाही. " या ग्रंथातील काही सिद्धांत पहावे – " ईश्वराशिवाय कोणी जगाला उत्पन्न केले नाहीं. येशू खीस्ताने जगाला उत्पन्न केले. यास्तव येशू खिस्त ईश्वर आहे. " ( पृ. ४ ) तसेच " कृष्ण पापी होता, यास्तव तो ईश्वर नाहीं .. पारमार्थिक माणसें लबाडी कधीं करणार नाहीत. यास्तव खिस्ती शास्त्रकर्ते लबाडी करणारे नव्हते...दुष्कर्मी आणि लबाड यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवायचा नाहीं. यास्तव ब्रह्म्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवायचा नाहीं...जर खिस्ती खरे आहे, तर येशू खिस्त जगद्गुरू आहे." ( पृ. ५ ) मिथ्यावादाचे म्हणून दिलेले उदाहरण : " देव पवित्र आहे, कृष्ण पवित्र नाहीं, यास्तव कृष्ण देव नाहीं." ( पृ. १७ ) त्याचप्रमाणे " ज्याच्या पदरीं पाप आहे, तो ईश्वर नाहीं, कृष्णाच्या पदरीं पाप आहे, यास्तव कृष्ण ईश्वर नाहीं. " ( पृ. ७ ) खिस्ती धर्मोपदेशकांचे हे 'तर्कशास्त्र' हिंदुधर्माची नालस्ती खरून खिती धर्माचा उदोउदो करण्यासाठीच केवळ लिहिले गेले.

## हिंदु-धर्मविरोधी वाङ्मय

खिस्ती धर्माचे श्रेष्ठत्व सिद्ध करण्यासाठी हिंदुधर्मातील वैगुण्ये व दोष दाखविणे आवश्यक होते. यासाठीच काही खिस्ती धर्मप्रसारकांनी हिंदुधर्मग्रंथाचा बारकाईने

१. अरुणोदय, बाबा पदमनजी, पृ. २४७–२४८.

अभ्यास करून त्यांवर टीका केली. अशा मंडळींमध्ये रे. नेस्बिट हा एक होय. याने 'भगवद्गीतेचें सार' ( १८३२ ) काढून गीतेतील सिद्धांत खोडण्याचा प्रयत्न केला व गीता खरी नाही, असा निष्कर्ष काढिला. 'हिंदुशास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणांचें महत्त्व' ( १८३२ ) त्यास न पटून त्याने ब्राह्मणांबद्दल असा शेरा मारिला. 'कोणी मनुष्याने आपली उत्पत्ति अथवा स्वरूप अथवा गुण अथवा पद अथवा अधिकार अथवा कृत्ये याविषयीं वल्गना करावी हें वेडा मनुष्य आपला तृणरूप मुगुट मिरवितो आणि ज्या लहान कोठडींत तो घातलेला असतो तिजविषयीं हा सर्व माझा मुलूख आहे असें मान डोलवून बोलतो त्या वेडेपणापेक्षां वाईट आहे.' (पृ. १०९–११०) त्याचप्रमाणे 'अज्ञान आणि विपरीत बुद्धि या दोहोच्या योगाने भूम्यादि भुतांचें भजन होऊं लागले. आणि आजपर्यंत चालले आहे. ते भजन केवळ व्यर्थ विपरीत आहे आणि त्यांत मूर्खत्व फारच आहे,' असे सांगून हिंदूंनी पंचमहाभूतांची पूजा करूं नये असा उपदेश 'पृथिव्यादि भूताचें भजन' ( १८३५ ) या पुस्तिकेत रे. नेस्बिट यानें केला आहे.

**विल्सनचे प्रचारकार्य**

हिंदुधर्मग्रंथांतील दोष दाखवून त्यांवर निकराचा हल्ला चढविणारा दुसरा खिस्ती धर्मोपदेशक डॉ. जॉन विल्सन हा होय. १८२८ ते १८७५ या सत्तेचाळीस वर्षांच्या येथील वास्तव्यात त्याने खिस्ती धर्मप्रसाराचे विविध प्रकारे कार्य केले. १८३०-मध्ये 'ओरिएण्टल खिश्चन स्पेक्टेटर' या नियतकालिकाची सुरुवात त्यानेच केली. धर्मप्रसार सुलभ रीतीने करता यावा, म्हणून मराठीखेरीज संस्कृत, गुजराती, हिंदुस्थानी, फारसी याही भाषांचे त्याने अध्ययन केले होते. व्याख्यानांच्या द्वारा तो धर्मप्रसार करीत असे. त्याचबरोबर त्याने काही ग्रंथही लिहिले. हिंदुधर्मपक्षपाती व 'उपदेशचंद्रिका' मासिकाचे संपादक मोरभट दांडेकर यांच्या 'हिंदुधर्मस्थापन' ( १८३१ ) या ग्रंथावरून कडाक्याचा वाद होऊन ती 'हिंदुधर्माचे पहिले प्रसिद्धी-करण' ( १८३२ ) या नावाने प्रसिद्ध झाला. विल्सनने दांडेकरांच्या ग्रंथाचे भाषांतर व आपले उत्तर एकत्र छापून प्रसिद्ध केले व फक्त प्रसिद्धीकरणही वेगळे छापिले. डॉ. विल्सन याची वादविवाद करण्याची पद्धती कशी असे, याचा नमुना पहावा.

"हिंदुधर्मोपद्रवाचे कारण मोरभट्टाचे ग्रंथीं असे ध्वनित होते कीं, 'उत्तरोत्तर हिंदु लोकांत विद्या कमी होत चालली आहे.' याजवरून मी असें म्हणतों कीं, बहुत लोकांचा निश्चय झाला कीं, जर खऱ्या विद्येचा प्रसार होईल तर निश्चय हिंदुधर्म लयास जाईल. खऱ्या विद्येच्या व पुराणाच्या सिद्धांतास परस्परें फार विपरीत तत्त्व आहे. ते असे कीं, पृथ्वी गोलाकार असतां पुराणांत पुष्करपत्रासारिखी व कांहीं पटांगणा-सारिखी वर्णिली आहे.....वेदांतही मागल्यासारख्या पुष्कळ चुका आहेत उदाहरण चंद्रापासून पाऊस येतो!"[१]

१. हिंदुधर्माचे पहिले प्रसिद्धीकरण, डॉ. जॉन विल्सन, पृ. ५.

त्यानंतर सातारचे नारायणराव ( स्वदेशधर्माभिमानी ) यांस उत्तर म्हणून डॉ. विल्सनने 'दुसरें हिंदुधर्मप्रसिद्धीकरण' (१८३५) लिहिले. या वेळच्या निवेदनात तो लिहितो :

" मोरभट्ट दांडेकरास जें म्यां पूर्वी उत्तर दिल्हे त्या हिंदुधर्मप्रसिद्धीकरणांत म्यां आपली इच्छा अशी स्पष्ट दर्शविली होती कीं त्याजवर कोणी कधींहि उत्तर दिल्हे असतां त्यास प्रत्युत्तर द्यायास मी सिद्ध आहे. असे म्यां लिहिले होते त्याचे कारण असे आहे कीं जितके विचार मोठे धर्मप्रकरणीं माझे आढळण्यांत आले तितक्याविषयीं जें सत्य तेच मी बोललो असा माझा निश्चय होता. आणखी मला असे कळून आले कीं हिदुधर्मस्थापनेविषयीं कोणी जेवढा प्रयत्न करील तितका त्या धर्मांच्या खोटेपणाच्या अधिक आणि स्वच्छ निर्देशास कारण होईल आणि असे प्रयत्न करणारे आणि जे कोणी पुढे हीं उत्तरे प्रत्युत्तरे वाचतील ते सर्व त्यांतील दोषादोष पाहून ईश्वरी कृपेनें कदाचित् खिस्तीधर्म स्वीकारतील. असा माझा विचार असतां मग माझ्या हिंदुधर्म-प्रसिद्धिकरणास उत्तर स्वदेशधर्माभिमानी म्हणजे नारायणराव याने दिल्हे म्हणून मला त्याचा खेद मानावयास कांही कारण दिसत नाहीं. ते उत्तर कसेहि असो आणि त्याच्या लिहिणाराचे सामर्थ्य कसेहि असो, परंतु मला असे वाटते कीं त्यांतून माझ्या मनांत जो अभिप्राय आहे तो अनायासाने निघतो आणखी त्याची योग्यता सांगितली असतां अवघड प्रसंगीं हिंदुधर्म ज्या स्थानीं आश्रय पावतो त्या स्थानाचा नाश होईल." [1]

याच हिरिरीने त्याने 'पाऊसासाठीं प्रार्थना (१८३३), 'खरा जो खिस्ती धर्म त्यांत कांहीं हिंदु लोकांनीं प्रवेश केला त्याविषयीं वर्तमान' (१८३८), 'भगवान कसा ओळखावा' इत्यादी धर्मविषयक पुस्तके लिहिली.

### मरे मिचेल

रे. जे. मरे मिचेल यानेही बायबलच्या मराठी भाषांतरात सुधारणा करण्याच्या कामाव्यतिरिक्त हिंदूंच्या काही समजुती चुकीच्या असल्याचे दाखविण्यासाठी 'नारळी पौर्णिमा' (१८५१), 'पंढरपूरची यात्रा', 'आळंदीची यात्रा' (१८५५), 'तुकाराम याची गोष्ट', 'शकुन मुहूर्त इत्यादि याविषयी' (१८६२), 'खंडोबाची गोष्ट' (१८७४) इत्यादी पुस्तके लिहिली. या पुस्तकांचे सर्वसाधारण स्वरूप समजण्यासाठी त्यांतील एकाची ओळख करून घेतली, तरी पुरे आहे. 'आळंदीची यात्रा' (१८५५) या पुस्तकात एक कुणबी, साहेब व ब्राह्मण यांचा संवाद देऊन ज्ञानदेवां-विषयीचे आपले मत साहेबाने मांडिले आहे. ज्ञानोबाविषयी आपले मत काय आहे, या कुणब्याच्या प्रश्नाला साहेब उत्तर देतो — "तो साधारण मनुष्य होता. तो बरेच संस्कृत जाणत असे. त्याने भगवद्गीतेवर ज्ञानेश्वरी नामें एक ग्रंथ टीकारूपे रचिला, इतकेंच. जसा तुकाराम, रामदास, वामन पंडित, मोरोपंत इत्यादि कवि होऊन गेले

१. दुसरे हिंदुधर्मप्रसिद्धीकरण, डॉ. जॉन विल्सन, पृ. १–२.

त्यांतीलच तोहि एक होता. तो इतर लोकांपेक्षां कांहीं हुशार आणि विद्वान होता म्हणून वेडे लोक त्यास ईश्वरी पुरुष मानू लागले."[1] पुस्तकाच्या शेवटी येशू ख्रिस्ताचा स्वीकार करा असा उपदेश केलेला आहे.

हिंदुधर्मातील मूर्तिपूजा, जातिभेद, पुनर्जन्म वगैरे अनेक विषयांवर छिद्रान्वेषक बुद्धीने ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी आपले विचार व्यक्त केले. त्यामुळेच 'मत्स्य-पुराण आणि इब्री शास्त्र' (१८४५), 'मूर्तींचा उच्छेद' (१८५०), 'निरनिराळे धर्म' (१८५१), 'पुनर्जन्मनिर्णय' (१८५३), 'सिंहस्थ माहात्म्य' (१८७२), 'हिंदुधर्माविषयीं प्रश्न' (१८७३), 'तुळशीचे लग्न' (१८७४) इत्यादी अनेक छोटीमोठी टीकात्मक पुस्तके या काळात लिहिली गेली.

ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या या प्रयत्नांचा परिणाम काही तरुण मनांवर झाला व त्यामुळेच नारायण शेषाद्रि, रामकृष्ण विनायक मोडक, विष्णु भास्कर करमरकर, बाबा पदमनजी इत्यादी मंडळींनी उघडपणे ख्रिस्ती धर्म स्वीकारिला व त्याचा प्रसार आणि प्रचार ते करू लागले काहींनी जरी उघडपणे ख्रिस्ती धर्म स्वीकारिला नाही, तरी त्यांची हिंदुधर्मावरील श्रद्धा डळमळली व त्यातूनच की काय परमहंससभा निर्माण झाली.

### ख्रिस्ती प्रचाराचा प्रतिकार

या धार्मिक आक्रमणाला तोंड देण्यासाठी व ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या विपर्यस्त टीकेचा हिंदुधर्मावर अनिष्ट परिणाम होऊ नये म्हणून मोरभट दांडेकर, भाऊ महाजन, गंगाधरशास्त्री फडके, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादी विचारवंतांनी त्या काळात प्रयत्न केला. यांतूनच 'चंद्रिका' (१८५४), 'विचारलहरी', 'सद्धर्मदीपिका' (१८५५) यांसारखी काही नियतकालिके जन्माला आली. तसेच प्राचीन मराठी काव्याच्या प्रकाशनामुळे हिंदुधर्माबद्दलची श्रद्धा टिकून राहील या हेतूनेच की काय, 'ज्ञानचंद्रोदय'( १८४०), 'सर्वसंग्रह' (१८६०) यांसारखी नियतकालिके सुरू झाली. त्याचप्रमाणे ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या प्रचारकार्यांना पद्धतशीरपणे तोडीस तोड म्हणून सार्वजनिक व्याख्याने देऊन तोंड देण्याचा जबरा प्रयत्न विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी कसा केला, त्याचा ख्रिस्ती वृत्तांत 'समुद्रकिनारीं वादविवाद' (१८६२) या पुस्तकात पहावयास सापडतो. रे. बॅलंटाइन, जी. बोवेन, वॉलेस, नारायण शेषाद्रि, दाजीबा पांडुरंग, हरि केशवजी इत्यादी मंडळी या वादविवादांत भाग घेत असत. या सभांना हिंदू, पारशी, मुसलमान वगैरे दोनतीन हजारांपर्यंत लोक जमत असत. जुन्या व नव्या करारातील असत्य विधाने व परस्परविरोधी वचने दाखवून बावांनी ख्रिस्ती धर्मावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला. ख्रिस्ताचे चमत्कार शुद्ध गारुड्याच्या खेळाप्रमाणे होते, मारिया योसेफाची बायको असता तिला कुंवार म्हणणे शोभत नाही, ख्रिस्त विषयलंपट होता, दुष्ट होता, ख्रिस्ताचे प्रेषित ठकबाजी करीत, ख्रिस्त

१. रे. जे. मरे मिचेल, आळंदी यात्रा, पृ. २०.

अंतर्ज्ञानी नव्हता, त्याने वाईट स्त्रीशी संभाषण केले, खिस्त उद्धट व असभ्य होता, तो वाईट चालीचा होता, व त्याने आपल्या धर्माचा प्रसार जुलुमाने केला. इत्यादी गोष्टी बावांनी साधार सिद्ध केल्या. त्यांच्या वादविवादाचा एका नमुना पहावा —

बा० — खिस्ताचे सर्व शरीर पवित्र होते काय ?

उ० — पवित्रता मनास असते. देवाच्या इच्छेप्रमाणें वागणे, मनोवृत्ति यथा-योग्य असणें, बरे करायास झटणे, सारांश अंतःकरण शुद्ध असणें याचें नांव पवित्रता. दृश्य वस्तूस पवित्रता नसते. जर अंतःकरण पवित्र तर सर्व शरीर पवित्र असते.

बा० — खीस्ताची सुंता कां केली ?

उ० — यहुदी लोकांची सुंता व्हावी अशी देवाची आज्ञा होती म्हणून त्याची सुंता होणे अवश्य होते.

बा० — त्या संस्काराचा अर्थ काय ?

उ० — यहुदी लोकांनीं दुसऱ्या राष्ट्रापासून वेगळे दिसावे व त्यास देवाने निवडून घेतले असे दर्शवावे असा त्याचा अर्थ आहे.

बा० — उत्प. १७·११ या ओवींत काय सागितले आहे ते वाचून पाहा. देवानें अब्राहामास सागितलें कीं तूं आपले भ्रष्ट मास कापून टाक. ज्यापेक्षां खीस्ताने तो संस्कार पाळिला त्यापेक्षां त्याचें शरीर अपवित्र असावे हे सिद्ध.[१]

या छोट्याशा संवादावरून बाबांनी कसे बिनतोडपणे वाद घातले असतील, याची कल्पना येऊ शकते.

### ज्ञानोदय आणि इतर नियतकालिके

खिस्ती धर्मप्रसारकांनी खिस्ती धर्मप्रसारासाठी नियतकालिकांचाही उपयोग केला. इ. १८४२-च्या जूनमध्ये ‘ज्ञानोदय’ नावाचे नियतकालिक अहमदनगर येथे अमेरिकन मराठी मिशनतर्फे रे. हेन्री बॅलंटाइन याच्या संपादकत्वाने सुरू झाले. पहिले सहा अक मराठीत निघाले व पुढे १८६६-पर्यंत त्यात इंग्रजी-मराठी लेख येत असत. १८६७ ते १८७२-पर्यंत श्री. शाहूराव कुकडे यांनी फक्त मराठीमध्ये ‘ज्ञानोदय’ काढिला. पुढे पुन्हा तो इंग्रजी-मराठी झाला. रे. बॅलंटाइनशिवाय रे. ह्यूम, रे. ॲबट, रे. तुकारामजी, श्री. आनंदराव सांगळे, रे. ना. वा. टिळक इत्यादींनी ज्ञानोदयाचे संपादन केले. “लोकांस खरे ज्ञान दाखवावे, खरे काय आणि खोटें काय याचा शोध कसा करावा, हे लोकांस शिकवावे आणि विशेषेकरून खिस्ती धर्माची प्रमाणें पुढे आणावीं आणि लोकांचे लक्ष त्यांजकडे लागू करून त्या धर्माप्रमाणे चालल्याने किती कल्याण होईल हे दाखवावे.”[२] हा ‘ज्ञानोदया’चा हेतु होता. त्यामुळे

१. समुद्रकिनारीं वादविवाद, पृ. १८२
२. ज्ञानोदय, १ जानेवारी १८४५, पृ. ४.

त्यांत खिस्ती मिशनची माहिती, मिशनऱ्यांची ये-जा, खिस्ताची शिकवण, हिंदुधर्मातील अनिष्ट गोष्टी इत्यादींविषयी भाग बराच असे. शिवाय, त्यात विविध विषयांवरील स्वतंत्र व भाषांतरात्मक लेखही असत. धर्मप्रसाराचा भाग वगळला, तर या नियतकालिकाने केलेले कार्य अनुल्लेखनीय नाही. त्याने हिंदुधर्मातील अनिष्ट गोष्टींवर प्रहार केल्यामुळे हिंदुसमाजसुधारणेला थोडीशी मदतच झाली, असे म्हणावयास हरकत नाही. तसेच 'प्रभोदय' (१८५६) नामक एक नियतकालिक नवख्रिश्चनांमध्ये खिस्ती-धर्माची रुची वाढावी, या हेतूने निघाले होते. यांशिवाय, डॉ. जॉन विल्सनने १८३०-मध्ये इंग्रजीमधून सुरू केलेला 'ओरिएण्टल ख्रिश्चन स्पेक्टेटर', बॉम्बे ट्रॅक्ट आणि बुक सोसायटीच्या विद्यमाने १८६१-पासून प्रसिद्ध होणारी 'सत्यदीपिका', बाबा पदमनजींची 'ऐक्यवर्धक पत्रिका', 'बालबोधमेवा' (१८७३) इत्यादी खिस्ती नियतकालिके आपापल्या परीने खिस्ती धर्मप्रसाराचे काम करीत होती.

### एल्फिन्स्टनचे धोरण

महाराष्ट्रात इंग्रजी अंमल सुरू होत असताना एल्फिन्स्टनने मोठ्या सावधगिरीचे व दूरदृष्टीचे धोरण स्वीकारिले होते. त्याने त्या वेळी जे नवीनच सार्वजनिक शिक्षण-प्रसाराचे कार्य हाती घेतले होते, त्यामागे त्याच्या काही निश्चित कल्पना होत्या. "शासन आणि शिक्षण यांची जी पद्धती आपण चालू केली आहे, तीमुळे एतद्देशीय लोकांत लवकरच असे परिवर्तन घडून येईल की, त्याना खालच्या दर्जाच्या नोकऱ्यां-पाशीच अडकवून ठेवणे शक्य होणार नाही. एवढेच नव्हे, तर त्याची महत्त्वाकांक्षा व कर्तृत्व यांना वाव द्यायला जर आपण अगोदरच मार्ग मोकळा करून ठेविला नाही, तर असा भडका उडेल की, त्यामुळे आपले राज्य उलथून पडेल."[1] त्याचबरोबर नवे पाश्चात्त्य शिक्षण देताना लोकांच्या जुन्या धार्मिक परंपरेचा धागा तोडता कामा नये, असाही त्याचा आग्रह होता. त्यामुळेच नवीन शिक्षणविषयक धोरणाबाबत त्याने धोक्याची सूचना दिली की, "हिंदू लोकांची सुधारणा करण्याच्या आणि त्यांच्या दुराचरणाला आळा घालण्याच्या कामी त्यांच्या धर्मसमजुतींची मदत घेणेच श्रेयस्कर होईल. कारण कायद्यापेक्षा धर्मबंधने बलवत्तर असतात. त्यांची सध्याची धर्ममते कायम राखून आणि शुद्ध करून व त्याबरोबरच त्यांचा सद्विवेक जागृत करून ज्या पूर्णतेच्या दर्जाला त्यांनी यावे, असे आपणा सर्वांनाच वाटते, त्या दर्जाप्रत त्यांना आपल्याला

1. ......The system of government and of education which we have already established must some time or other work such a change on the people of this country, that it will be impossible to confine them to subordinate employments, and if we have not previously opened vents for their ambition and ability we may expect an explosion which will overturn our Government.

Life of M. S. Elphinstone, T. S. Colebrooke, p. 143.

आणिता येईल. उलट, त्यांच्या धर्मावर जर हल्ला करण्यात आला, तर तो यशस्वी झाला, तरी तत्त्वतः आज आपल्याला व्यवहारात प्रत्यक्ष दिसत आहे त्याप्रमाणे त्यांचा सर्वच धर्मविषयीचा आदर डळमळीत होईल व अगदी तामसी धर्ममतसुद्धा जे निर्बंध मानवी विकारांवर घालते, ते उपयुक्त निर्बंध हिंदू लोक झुगारून देतील."[1]

एल्फिन्स्टनच्या या धोरणामुळे शाळा-पुस्तक-मंडळीच्या शाळा खिस्ती धर्माच्या शिक्षणापासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला गेला. खिस्ती धर्माच्या शिकवणुकीबद्दल त्याने आपले विचार स्पष्टपणे मांडिले होते. शिक्षणप्रसाराच्या योजनेत खिस्ती धर्माची थोडीसुद्धा भेसळ करावयास त्याचा कडवा विरोध होता. नवीन शिक्षणाच्या प्रसारामुळे या देशातील लोक धर्मांतराला आपोआप प्रवृत्त होतील, अशी त्याची खात्री होती. त्याचे हे विचार पुढील काळात काही प्रमाणात खरे ठरल्याचे दिसेल. अर्थात जॉर्ज जर्विस, रॉबर्ट मनी, जेम्स मोल्स्वर्थ, फॅरिश, टॉमस कँडी, बेल, हेडरसन, ईझडेल वगैरे पुष्कळ सरकारी व शाळा-पुस्तक-मंडळीच्या अधिकाऱ्यांनी खिस्ती धर्मोपदेशकांच्या धर्मप्रसारकार्याला मदत केलेली आढळते. तसेच, एल्फिन्स्टनच्या कयासाप्रमाणे बऱ्याचशा नवशिक्षितांच्या मनात खिस्ती धर्माविषयी आपलेपणा निर्माण झाल्याचेही आपणांला दिसून येते. म्हणजेच इंग्रजी राजवटीबरोबर खिस्ती धर्माचेही आक्रमण महाराष्ट्रावर झाले, हे नाकारता येणार नाही.

## खिस्ती वाङ्मयाचा भाषाभिवृद्धीस हातभार

युरोपियन खिस्ती धर्मोपदेशकांनी महाराष्ट्रात प्रवेश केल्यावर ज्या लोकांमध्ये खिस्ती धर्माचा प्रचार करावयाचा, त्या लोकांची भाषा शिकून त्याच भाषेतून खिस्ती धर्माची तत्त्वे अनेक मार्गांनी त्यांनी कशी समजावून देण्याचा प्रयत्न केला, ते वर आपण पाहिलेच आहे. डॉ. विल्सन, रे. स्टीव्हन्सन, रे. नेस्बिट, रे. मिचेल इत्यादी खिस्ती पंडितांनी दीर्घोद्योग करून मराठी भाषेचे ज्ञान संपादन केले. या सततोद्योगामुळेच केरीसारख्याच्या हातून मराठी भाषेचा पहिला कोश व व्याकरण ही निर्माण झाली. कोशकार मोल्स्वर्थ यानेही आपल्या कोशनिर्मितीमागे 'A humble desire of promoting the propagation of the glorious Gospel' हाच हेतू कोशाच्या

---

1. " It would be better to call the prejudices of the Hindus to our aid in reforming them, and to control their vices by the ties of religion, which are stronger than those of law. By maintaining and purifying their present tenets at the same time that we enlighten their understandings, we shall bring them nearer to that standard of perfection at which we concur in desiring that they should arrive, while any attack on their faith, if successful, might be expected in theory, as is found in practice to shake their reverence for all religion and to set them free from those useful restraints which even a superstitious doctrine imposes on the passions. "

Official Writings of M. S. Elphinstone, pp. 334-335.

प्रस्तावनेत नमूद केला आहे. या धर्मोपदेशकांनी केलेल्या मराठी भाषेच्या सेवेच्या बुडाशी ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराचा उद्देश तर स्पष्टच होता. एतद्देशीयांमध्ये स्वधर्म-प्रसाराचे एक सुलभ आणि प्रभावी साधन म्हणूनच ते सर्व मराठी भाषा शिकले. मराठी मनावर आपल्या उपदेशाचा परिणाम होण्यासाठी आपणांला मराठी भाषेचाच उपयोग केला पाहिजे, हे ध्यानात घेऊन या सर्व धर्मोपदेशकांनी मराठीचा अभ्यास केला. ख्रिस्ती धर्माचा मोठेपणा लोकांना पटवून देताना ज्या धार्मिक कल्पना लोकांच्या गळी उतरवावयाच्या होत्या, त्या समजण्यासाठी एतद्देशीय लोकांचा शैक्षणिक दर्जा वाढविणे जरूर होते व त्यामुळेच साक्षरताप्रसारासाठी त्यांनी ठिकठिकाणी शाळा काढून लोकांना शिक्षणाची गोडी लाविली व मराठी ख्रिस्ती वाङ्मय निर्माण करून त्याचा प्रसार केला. हिंदुस्थानात आलेल्यांपैकी बरेचसे ख्रिस्ती धर्मोपदेशक चारित्र्यसंपन्न होते. परक्या देशात जाऊन तेथील अडचणींशी सदैव झुंजत राहून त्या देशाच्या जनतेला धर्माच्या पायावर उद्धाराचा मार्ग दाखविण्याचे कठीण काम त्यांनी केले. दुष्काळात त्यांनी ठिकठिकाणी बजाविलेली कामगिरी, स्वधर्मप्रसाराचा स्वार्थ ठेवून का होईना, स्तुत्य होती. समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत पोहोचण्यासाठी त्यांनी विविध मार्गांचा अवलंब केला. मराठी ख्रिस्ती वाङ्मयनिर्मितीचा हेतूही असाच स्वार्थी असला, तरी या धर्मोपदेशकांच्या प्रयत्नांमुळे मराठी वाङ्मयाचे – विशेषतः गद्य – पाऊल पुढे पडण्यास एक प्रकारे मदतच झाली.

## ख्रिस्ती वाङ्मयास हिंदूंचे साहाय्य

या ख्रिस्ती ग्रंथांवर लेखक म्हणून जरी युरोपियन धर्मप्रसारकांची नावे छापिलेली आढळतात, तरी त्यांच्या मदतीला कोणीतरी शास्त्री असत व हे ऋण त्यांनी मान्य केले आहे. रे. ॲबट यासंबंधी लिहितो की, कोणाही युरोपियन धर्मोपदेशकाने लिहिलेले प्रत्येक पान कुणा तरी शास्त्र्याच्या नजरेखालून गेलेले आहेच. मात्र त्याचे नाव पुस्तकावर दिलेले नसेल. हे शास्त्री संख्येने कितीतरी आहेत, पण इतिहासाला त्यांची नावे ज्ञात नसतील. त्यांचे ऋण मान्य न करणे म्हणजे आमचा कृतघ्नपणा ठरेल.[1]

1. " We are indebted to our Hindu friends for our Christian literature than many suppose. To begin with, there is the Shastri, whose name does not appear on the cover of any book, but every page of Marathi that any missionary has written has passed under his scrutinizing eye. Its English idioms have been twisted into Marathi idioms and the whole made fairly presentable to critical Marathi readers. The number of those who have helped in the preparation of Christian books are very many, but they will never be known by name to history. Nevertheless, it would be ungrateful not to acknowledge the debt that will be owed by posterity to the silently working pundit. "

Catalogue of Marathi Chirstian Literature during Eighty Years, 1813-1892, pp. 8-10.

हे जरी खरे असले, तरी मूळ रचना मराठी भाषेचे अपूर्ण ज्ञान असणाऱ्या परक्या लेखणीने केलेली असल्यामुळे तीत अनेक ठिकाणी अनोळखी शब्द आढळतील, तर काही ठिकाणी संस्कृतप्रचुरता दिसेल; कोठे गांवढळ शब्दप्रयोग नजरेला पडतील, तर पुष्कळ ठिकाणी विचित्र वाक्यरचना नजरेला येईल. या संबंधात लोकमान्य टिळक ' महाराष्ट्र भाषेची वाढ ' नामक एका लेखात लिहितात :

" मिशनरी लोकांनीं मराठी भाषेस हातीं धरूनच भाषेचा कोश व व्याकरण करण्याच्या कामीं मदत केली व छापण्याची कला आणि वर्तमानपत्रे यांचाही महाराष्ट्रात प्रचार सुरू केला. पण मिशनरींच्या ग्रंथांत मराठी शिकलेल्या साहेब लोकांनी वापरलेली भाषा खऱ्या मराठी भाषेपेक्षा विचित्र असल्यामुळे मराठी भाषेच्या अभिवृद्धीस मिशनऱ्यांचे व्हावे तसे साहाय्य झाले नाही व मिशनऱ्यांचे घेडगुजरी भाषेतील मराठी ग्रंथ वाङ्मयास कधीही शोभादायक व्हावयाचे नाहीत. किंबहुना, हे ग्रंथ खऱ्या मराठी वाङ्मयाचा भाग कधीही समजला जाईल कीं नाही, याची शंका आहे. " [१]

लोकमान्यांचे हे मत पूर्णपणे स्वीकारणे थोडेसे कठीणच आहे

## मराठी संदर्भवाङ्मय

१. आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, कृ. भि. कुलकर्णी.
२. युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा, श्री. म. पिंगे.

---

१. लो. टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४, पृ. ५००.

प्रकरण सहावे

# नियतकालिक वाङ्मय

## एक

अर्वाचीन मराठी गद्याच्या विकासात ज्याप्रमाणे शालेय क्रमिक पुस्तकांचा बराच हातभार लागलेला आहे, तसाच नियतकालिकांचाही लागला आहे. आपल्या आजच्या जीवनात नियतकालिक वाङ्मय हे तात्कालिक स्वरूपाचे असते. त्याचे जीवन क्रमिक पुस्तकांच्या जीवनाइतकेही नसते. किंबहुना, आज निर्माण झालेले वाङ्मय उद्या टाकाऊ ठरावे, अशीही स्थिती आहे. परंतु हे सारे ज्यांना आपण '**वर्तमानपत्रे**' म्हणतो, त्यांच्यासंबंधीच खरे होय. मराठीमधील आरंभीची नियतकालिके ही खऱ्या अर्थाने **वर्तमानपत्रे** नव्हती. त्यांत क्वचित आणि कोठेतरी **वर्तमान** किंवा त्याचेही **सार** देण्यात येई. बाकी बहुतेक भाग प्राधान्याने ज्ञानसंग्रह आणि ज्ञानवितरण यांचाच असे; म्हणजे त्यांचे स्वरूप क्षणजीवी नसे. ते अगदी शाश्वत स्वरूपाचे नसले, तरी बराच काल उपयोगी पडावे, असे असे. ग्रंथांमध्ये आणि त्यांमध्ये फरक दाखवावयाचा म्हटले, तर अनेक वेळा ग्रंथ हे एकत्र आणि एकाच वेळी हातात पडणारे वाङ्मय असले, तर नियतकालिक वाङ्मय हे हप्त्याहप्त्याने आणि ठराविक कालाच्या अंतराने उपलब्ध होणारे वाङ्मय होते. वाङ्मयाच्या इतिहासामध्ये त्याला जे स्थान मिळते, ते यामुळेच होय. नियतकालिक वाङ्मयाचे स्वरूप हे असे असल्यामुळे या वाङ्मयनिर्मितीमध्ये त्याची भाषा आणि मांडणी, म्हणजेच त्याचे जे बाह्यरूप, त्याकडेही साहजिकपणेच अधिक लक्ष पुरविले जाई. त्यायोगे मराठी भाषेच्या गद्यशैलीस वळण मिळावे, हे स्वाभाविक होते. एका अर्थाने या नियतकालिकांचा मराठी गद्याच्या विकासावर क्रमिक पुस्तकांच्याहीपेक्षा अधिक

अधिक परिणाम झाला, असे म्हणावे लागेल. कारण यांतील वाङ्मय हे बालांकरिता नसून अधिक प्रौढ वाचकांकरिता लिहिले गेले होते. त्याचे विषयही अर्थातच अधिक प्रौढ व गंभीर असत. ते पेलण्यासारखी भाषा योजणे हे अपरिहार्यच होई. ह्याचा भाषेचे सामर्थ्य वाढविण्यास उपयोग झाला. याचबरोबर तिचे आकर्षकत्व वाढविणे अवश्य होते. त्याकरिता लागणारी सजावट व अलंकरण याही गोष्टी स्वाभाविकपणेच क्रमप्राप्त झाल्या. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या भाषेत जे सामर्थ्य, जी प्रौढी आणि जो चटकदारपणा आला, तो काही एकदम आणि स्वयंभूपणे आला, असे नाही. त्याची तयारी या नियतकालिक वाङ्मयाच्याद्वारे जवळजवळ चाळीस वर्षे चालली होती.

## निबंध-वाङ्मयाचा उदय

केवळ भाषाविकासाच्याच दृष्टीने ही नियतकालिके उपकारक ठरली असे नाही. त्यांनी मराठी वाङ्मयाला निबंध या वाङ्मयप्रकाराचीही जोड मिळवून दिली. एखाद्या विषयाचा सांगोपांग व बांधीव असा ऊहापोह करणारे लेखन बरेच विस्तृत असे. परंतु ग्रंथ होण्याइतका पसारा नसणारे लेखन या अर्थाने जो निबंध मराठीमध्ये रूढ झाला, त्याचे मूळ या नियतकालिक वाङ्मयामध्ये आहे. या प्रकाराच्या लेखनाचे जे परिणत स्वरूप निबंधमालेमध्ये व्यक्त झाले आणि म्हणून ज्यास ‘ चिपळूणकरी निबंध ’ असेही कित्येकांनी संबोधिले, तो निबंध या नियतकालिकांच्या द्वारेच घडत आला आहे. या नियतकालिकांमधून आलेले अग्रलेख, स्फुट लेख, हप्त्याहप्त्याने आलेले विस्तृत लेख, काही वेळा पत्ररूपाने असलेले लेख हे सारे या निबंधाची छोटीमोठी भावंडेच होती. हे सारे लेखन बहुधा साप्ताहिकांत आणि क्वचित पाक्षिके आणि त्रैमासिके यांत प्रसिद्ध होत होते. निबंधाबरोबर केव्हा-केव्हा कथा किंवा नाटक यासारख्या ललितस्वरूपाच्या वाङ्मयासही या नियतकालिकांमध्ये स्थान मिळे. क्वचित कवितेलाही त्यांत प्रसिद्धी मिळे. आज ग्रंथस्वरूपाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखनास प्रकाशात येण्यास मागच्या शतकातील नियतकालिकांचे फार साहाय्य झाले आहे.

## नियतकालिकांचे उगमस्थान

वाङ्मयनिर्मितीची अथवा त्याच्या प्रकाशनाची ही तऱ्हा मराठी वाङ्मयास आजवर अपरिचित होती. इंग्रजी अमलाबरोबर ज्या कित्येक गोष्टी आल्या, त्यांत नियतकालिकेही आली. इंग्रज आले नसते, तर आपल्यांत नियतकालिके निघाली नसती, असे जरी म्हणता न आले, तरी त्यांच्या आगमनाने ती लवकर निघाली, यात काही शंका नाही. मुद्रणाची सोय हे नियतकालिके सुरू होण्याचे एक मोठे साधक कारण होय. मुद्रणामुळे लिहिलेल्या मजकुराच्या प्रती सुकरतेने आणि पुष्कळ प्रमाणात उपलब्ध होऊ शकतात, ही गोष्ट नियतकालिकांच्या कार्यास फार प्रोत्साहक ठरते. ठराविक वेळी आणि इष्ट त्या संख्येने एकच मजकूर वाचकांना सादर करिता येणे हे नियतकालिकाचे मुख्य काम आहे. यामुळे मुद्रणपूर्व कालामध्ये नियतकालिकाची

कल्पनाही सुचणे आणि ती अमलात आणणे अशक्यप्राय होते. मुद्रणाची सोय इंग्रजी अमलाबरोबर जशी उपलब्ध झाली, तशी त्यांच्यामध्ये आधीच रूढ असलेली नियतकालिकांची प्रथाही आपल्यास परिचित झाली. मराठीमधील पहिले नियतकालिक म्हणून ज्या 'दर्पण' या पत्राचा उल्लेख करण्यात येतो, त्या पत्राच्या कर्त्यासमोर— बाळशास्त्री जांभेकर यांच्यासमोर—बंगाली भाषेतील 'समाचार-दर्पणा'चे नाव होतेच, व त्या पत्रापुढे इंग्रजी वृत्तपत्रांची प्रथा होती. म्हणून अखेरीस या नियतकालिकांचे मूळ इंग्रजांच्या या देशातील आगमनामध्ये आहे, हे नाकारण्यात अर्थ नाही.

### नियतकालिकांचे प्रेरक हेतू

याचबरोबर आणखी एका अधिक महत्त्वाच्या कारणाकडेही दुर्लक्ष होता कामा नये. इंग्रजी राजवटीबरोबर आणि त्या राजवटीमध्ये सुरू झालेल्या शिक्षणामुळे आपल्या ऐहिक आणि वर्तमानकालिक जीवनाविषयीच्या दृष्टिकोणांमध्ये फरक होऊन त्याविषयी आपल्यास अधिक आस्था वाटू लागली. आपल्या 'दिग्दर्शन' मासिकाच्या पहिल्या अंकाच्या प्रस्तावनेत बाळशास्त्री म्हणतात — "आता यांत परलोकाच्या उपयोगी जें वेदांतशास्त्र ह्याविषयी...काही येथें लिहिण्याचे नाही. त्यावांचून इतर व्यवहारोपयोगी जीं शास्त्रे व विद्या राहिल्या, त्यांचे दिग्दर्शन म्हणजे दिशा दाखवावी असे योजिलें आहे." व्यवहारोपयोगी ज्ञानाच्या बाबतीत आपण फारच मागासलेले आहो, अशी भावना आपल्यातील विचारवंतांच्या मनांमध्ये दृढ झाल्यामुळे हे ज्ञान मिळविणे हा पुढील पन्नास वर्षांमध्ये आपल्या समाजाचा हव्यास होऊन राहिला होता. या कालात जी साप्ताहिके व मासिके निघाली, त्यांच्यापुढे हेच एक ध्येय होते, हे ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, ज्ञानप्रसारक, ज्ञानदर्शन, ज्ञानसंग्रह आणि विविधज्ञानविस्तार इत्यादी नावांवरून स्पष्टपणे दिसून येते. 'ज्ञान' या शब्दाचा नावामध्ये स्वीकार न करिताही निघालेली कित्येक नियतकालिके याच कार्याला वाहिलेली होती. मासिकांमध्ये शास्त्रीय विषयाचा ज्ञानसंग्रह अर्थात अधिक प्रमाणात होई. साप्ताहिकांमध्ये वर्तमानकालीन घडामोडींचा परामर्श व त्यांवरील मतप्रदर्शन अधिक होई. मराठीमधील पहिल्या वृत्तपत्राच्या 'दर्पण' या पाक्षिकाच्या पहिल्या अंकामध्ये संपादकांनी जे निवेदन केले आहे, त्यावरून वृत्तपत्रांच्या उपक्रमामागे असणारे हेतू स्पष्ट होतात. ते म्हणतात —

"यद्यपि या लेखांचीं फळे संसारांतील सामान्य व्यवहारांत उपयोगी नव्हत... तथापि लोकांस लाभ देणाऱ्या गोष्टीही यापासून घडतात. ते असे. त्यांपासून अतिशय दूरचे देशांतील वर्तमानें कळतात. बुद्धिमानाची बुद्धिमत्ता त्यांचे द्वारे सर्व लोकांत प्रसिद्ध होत्ये; उपयोगी बातमी समजण्यांत येते; आणि श्रमसाध्य विद्यादिकांचे विचाराकडे जे चित्त देत नाहींत त्यांचे मनोरंजनही होते... आतां विद्याव्यवहाराचे द्वार असे एक वर्तमान-पत्र पाहिजे, कीं जांत मुख्यत्वें करून एतद्देशीय लोकांचा स्वार्थ होईल, जापासून त्यांचा इच्छा आणि मनोगते कळतील, जवळचे प्रदेशांत आणि परकीय मुलुखांत जीं वर्तमानें होतात तीं समजतील, आणि जे विचार विद्यांपासून उत्पन्न

होतात आणि जे लोकांची नीति, बुद्धि, आणि राज्यनीति ( Political Conditions ) यांचे सुरूपतेस कारण होत, ते विचार करण्यास उपयोगी आणि जिज्ञासु मनांस जापासून मदत होईल. "

## 'ज्ञानप्रकाशा'चा जन्महेतू

१८३२-मध्ये निघालेल्या या वृत्तपत्रात प्रकट केलेली मनीषा १८४९-मध्ये निघालेल्या 'ज्ञानप्रकाशा'च्या पहिल्या अंकामधील निवेदनातही प्रकट झाली आहे. ती अशी – " संक्षेपेंकरून आम्ही त्याचे लाभाचें निरूपण करितों. स्वदेशांतील लोकां-मध्ये असे वर्तमान कळण्याचे द्वार नाहीं. याजमुळे याच देशांत ज्या गोष्टी घडतात त्या या कोपऱ्याच्या त्या कोपऱ्यास कळत नाहींत. मग दूर देशांतील कशाने कळावें ... इंग्रज लोक प्रयत्नेंकरून ...... देशावरचीं वर्तमाने खेळिवतात ती इंग्रजी वर्तमान-पत्रांत नित्य छापिली जातात. त्यांतील उपयोगी गोष्टीचे भाषांतर आम्ही आपले पत्रांत करून छापूं आणि येणेकरून या देशांत काय होत आहे याचे वर्तमान सर्वांस कळेल. येणेकरून पुष्कळ अज्ञान जाईल ...... इंग्रज लोक इकडे राज्य करितात हे लोकांस आश्चर्य वाटते. तेव्हा त्याचा देश व रीति राज्यास परस्परे कळल्यावाचून रयतेचा बंदोबस्त नीट व्हावयाचा नाही. एकोपा होण्याचे व परस्परे अभिप्राय कळण्याचे व कांहीं मजकूर सरकारास समजविण्याचे व छापण्याचे अपकीर्तीचे भयाने लोकानी दुर्गुण टाकण्याचे कारण वर्तमानपत्र आहे. "

## वि.ज्ञा.विस्ताराची प्रतिज्ञा

पाक्षिके किंवा साप्ताहिके यांचा भर समकालीन घटना आणि प्रश्न यावर अधिक असे, मासिकांमध्ये अधिक काल उपयुक्त ठरणाऱ्या ज्ञानसंग्रहावर असे. १८६७ साली निघालेल्या 'विविधज्ञानविस्तारा'मध्ये कोणत्या स्वरूपाचे विषय त्यांत येतील याविषयीची कल्पना संपादकांनी पहिल्या अकाच्या उपोद्घातात पुढे दिल्याप्रमाणे सांगितली आहे. त्यावरून ज्ञानसंग्रह आणि ज्ञानप्रसार यांची गरज त्या वेळीसुद्धा तितकीच वाटत असल्याचे दिसते —

" याच्या परिणामानुसार यांत नानाविध विषयांचा संग्रह केला जाईल. शास्त्रीय विषय, स्त्रियांच्या उपयोगास्तव मनोरंजक असून सन्मार्गवर्ती अशा गोष्टी, रूपके, कविता, विद्यार्थ्यांच्या उपयोगास्तव अन्य भाषेतून घेतलेलीं भाषांतरें, इतिहास, देशज्ञान, विख्यात पुरुषांचीं आजन्म चरित्रें, शरीरसंपत्तिरक्षणार्थ उत्तम वैद्यकाच्या आधारें घेतलेले नियम, नवीन जाहलेल्या पुस्तकांचे गुणावगुणविवेचन, नित्य व्यवहारा-संबंधीं नीतिवादाचे निबंध इत्यादि अनेक विषयांचा संग्रह करणार आहो आणि राजे व रंक, पुरुष व स्त्रिया, लहान व थोर, यांतून कोणाच्याही हातीं हे पुस्तक लागले असतां, ते आपल्या संग्रहीं असावें, अशी पूज्य बुद्धि त्यांच्या ठायीं उत्पन्न करण्याचा निश्चय केला आहे. "

**इतरहेतुसाधन**

काही नियतकालिके यापेक्षा काही वेगळ्या हेतूने आणि धोरणाने काढण्यात आणि चालविण्यात आली होती, असेही दिसते. एक महत्त्वाचा हेतू धर्मसंरक्षण असा होता. इ. स. १८४२ साली निघालेले आणि अमेरिकन मिशनरी मंडळींनी चालविलेले 'ज्ञानोदय' नावाचे नियतकालिक हे खिस्ती धर्माच्या पुरस्कारार्थ निघत असे. पहिल्या अंकातील हेतुनिवेदनामध्ये धर्मपुरस्कार हा हेतू स्पष्टपणे सांगितलेला नसला, तरी पुढे त्या पत्राच्या धोरणात खिस्तीधर्मप्रचार आणि त्याचे समर्थन यांलाच महत्त्व मिळत गेले, असे दिसते. मूळ हेतू 'अनेक प्रकारची विद्या म्हणजे भूगोल, ज्योतिषशास्त्र, सिद्धपदार्थविज्ञान आणि बखर अशा प्रकरणांच्या गोष्टी आणि या देशाचे व इतर देशाचें वर्तमान आणि विशेषेकरून अहमदनगर संबंधी मजकूर छापावा असा बेत आहे,' असा सांगितला आहे. याच निवेदनामध्ये पुढे 'लोकांचा धर्म, नीति, चाल वगैरे यांविषयी आपलें मत सांगावयाचे असेल तर या वर्तमानपत्रावरून सांगण्याची सोय पडेल,' असेही आश्वासन दिले आहे. यातील धर्म म्हणजे खिस्ती धर्म हा अर्थ पुढे स्पष्ट झाला असावा. कारण 'ज्ञानोदय' म्हणजे खिस्तीधर्मपुरस्कार असेच समीकरण लोकाच्या मनामध्ये ठसलेले होते. याच्या उलट प्रतिक्रिया म्हणून हिंदुधर्मपुरस्कारार्थ 'उपदेशचंद्रिका' किंवा 'विचारलहरी' यांसारखी नियतकालिके कार्य करीत होती. 'उपदेशचंद्रिके'ने आपला हेतू आरंभालाच स्पष्ट केला होता, तो असा —

"हिंदुलोकहो, तुम्हांस माहितच आहे की या देशांत पाद्रींचा संचार होऊ लागल्यापासून आपले पवित्र धर्मास धक्का येत चालला आहे. त्यांहीं जागोजाग शाळा घालून व खिस्ती धर्माचीं पुस्तके फुकट लोकांस वाटून या लोकांस बाटविण्याचा महत् प्रयत्न चालविला आहे. व आपले लोकांस आपलें धर्माचे ज्ञान नसते याजमुळे कित्येकास हिंदुधर्माचा कंटाळा येऊन खिस्ती धर्म खरासा वाटूं लागला आहे. तेव्हां हे लोकहो, हा अनर्थ फार विस्तृत होण्याचे पूर्वी तत्प्रतिबंधार्थ कांहीतरी तजवीज या प्रसंगीं योजणे अवश्य आहे कीं नाहीं. माझे मते दरमहा एक पुस्तक काढून त्यात हिंदुधर्माची लोकांस माहितगारी, व खिस्ती लोक आपले धर्मावर दोष देतात, त्याचे खंडन होईल असे करावे ही चागली युक्ति आहे व पाद्री लोक दबले तर अशानें दबतील, यास हरवायास दुसरी युक्ति नाहीं."[1]

इ. स. १८५५-मध्ये निघालेले 'सद्धर्मदीपिका' हे पाक्षिक 'हिंदु लोकांस हिंदुधर्मतत्त्व कळावे व खिस्तीधर्मी जे पाद्री यांचे धर्माचा पोकळपणा त्यांच्या ध्यानांत आणून द्यावा' या उद्देशाने काढण्यात आले होते; तर १८६१-मध्ये काढलेले 'सत्यदीपिका' हे मासिक खिस्ती धर्मग्रंथ आणि मिशनरी लोकांच्या हालचाली याची माहिती देत असे. खिस्ती आणि पारंपरिक हिंदुधर्म या दोंहोपासून वेगळ्या असणाऱ्या

१. अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, पृ. २६४.

प्रार्थनासमाजाने आपल्या 'सुबोधपत्रिके'च्याद्वारे (१८७४) आपल्या धर्ममतांच्या प्रसाराचे कार्य केले. १८७७-मध्ये सुरू झालेले 'दीनबंधू' हे पत्र सत्यशोधक समाजाच्या मतांचा प्रसार करण्याकरिता निघाले. सारांश, या कालातील वर्तमानपत्रे किंवा नियतकालिके यांपैकी काहींची प्रेरणा तरी धर्ममूलक होती, यात शंका नाही.

### मर्यादित उद्दिष्टे

काही नियतकालिकांचे क्षेत्र यापेक्षा मर्यादित असे. १८४० साली निघालेल्या 'ज्ञानचंद्रोदय' या मासिकाने 'कृष्णलीलामृत' हा ओवीबद्ध ग्रंथच क्रमशः छापावयास घेतला होता; व नंतर 'गीता' ही 'प्राकृत वामनी श्लोक, मोरोपंती आर्या, तुलसीदासाचा दोहा, मुक्तेश्वराची ओवी' यांसह सादर करावयास घेतली होती. जुनी मराठी कविता छापून प्रसिद्ध करण्याकरिता पुढे १८६०-मध्ये 'सर्वसंग्रह' मासिकाने केलेला उपक्रम या दृष्टीने अगदीच पहिला नव्हता. 'न्यायाश्रम' (य?) हे मासिक कायदेविषयक माहिती देण्याकरिता प्रवृत्त झाले होते, तर 'चंद्रिका' ही 'महाराष्ट्राने व्यापारादि कृत्ये करून आत्महित साधावे' हे प्रतिपादिण्याकरिता संपादकांनी सुरू केली होती. 'सुमित्र' आणि 'स्त्रीभूषण' या मासिकांचा जन्म स्त्रियांच्या-करिता, आणि 'आनंदलहरी'चा जन्म मुलांकरिता झालेला होता, असे दिसते. एखाद्या ज्ञातीच्या उन्नत्यर्थही मासिक काढले जाई, हे मुंबईमधील क्षत्रिय स्टयूडण्ट्स् सोसायटीने आपल्या समाजाची सुधारणा व्हावी, म्हणून सुरू केलेल्या 'विचारदर्पणा'-वरून समजून येते. नियतकालिके सुरू करण्याचे असे अनेक हेतू असल्याचे दिसत असले, तरी प्राधान्याने समकालीन घडामोडींचे आणि विविध शास्त्रांचे ज्ञान व्हावे, हा हेतूच अधिक प्रभावी होता, हे विसरता येत नाही. इंग्रजीमधील 'सायक्लोपीडिया'च्या धर्तीवर १८६८-मध्ये निघालेले 'विद्याकल्पतरु' हे मासिक या प्रमुख प्रवृत्तीचे द्योतक होते.

### परकीय सरकारास आकांक्षा-निवेदन

या कालातील काही नियतकालिके मराठीबरोबर इंग्रजी मजकुरालाही स्थान देत. विशेषतः साप्ताहिके अशी निघत. 'दर्पण' या पहिल्याच पत्रात तर प्रथम इंग्रजी आणि त्याला जोडून त्याचे मराठी भाषांतर, अशी स्थिती होती. पुढे ज्ञानप्रकाश आणि इंदुप्रकाश याही पत्रांनी या प्रथेचा अंगीकार काही काल तरी केलेला होता. प्रजाजनांची मनोगते, आशाआकांक्षा यांचे ज्ञान राज्यकर्त्यांस व्हावे, ही इच्छा या काहीशा चमत्कारिक प्रथेच्या मुळाशी असावी. ज्ञानप्रकाशाने आपल्या पहिल्याच अंकात 'काही मजकूर सरकारास समजविण्या'च्या हेतूचा उल्लेख करून ठेविलेला होता. 'दर्पणा'चे कित्येक वर्गणीदार हे इंग्रज राज्यकर्त्यांपैकी असत, ही गोष्टही यास पुष्टी देणारी आहे. एवढेच नव्हे, तर आपल्या लोकांचे मत इंग्रज लोकांस कळविण्याकरिता आपण एखादे इंग्रजी पत्र चालविले पाहिजे, असे वाटल्या-मुळेच 'नेटिव्ह ओपिनियन' या वृत्तपत्राचा जन्म झाला होता. या पत्राचा उद्देश

सरकारास साहाय्य करण्याचा होता. "सरकाराचे स्वरूप विराट्पुरुषाच्या स्वरूपासारखे सहस्रशीर्ष, सहस्राक्ष व सहस्रपाद असले, तरी नेटिव्ह लोकांच्या स्वतंत्र मताची त्यास अपेक्षा आहे, सरकारने हातीं घेतलेल्या विषयांवर नेटिव्हांनीं स्वतंत्रपणें चालविलेली चर्चा त्यांस इष्टच आहे. म्हणून जी माहिती फक्त नेटिव्हांसच असू शकेल, ती देऊन सरकारास साहाय्य करण्याचा त्यांचा हेतू होता," असे या पत्राविषयीचे लोकमत होते.

## संपादनविषयक धोरणे

वृत्तपत्रे आणि नियतकालिके काढण्याचे हेतू असे होते, तर ती चालविण्याबाबत काय धोरण राहील, याविषयीही काही कल्पना असत. त्यांवरून वृत्तपत्रे चालविणे हे एक उदात्त असे कार्य आणि कर्तव्य आहे, अशीच भावना असल्याचे दिसून येते. 'दर्पण'कारांनी आपले पत्र काढण्याच्या आधीच जे निवेदन केले होते, त्यात "कोणा एकाचा पक्षपात किंवा नीचपणा या दोषांचा मळ दर्पणास लागणार नाही; कारण कीं दर्पण छापणाराचे लक्ष्य निष्कृत्रिम आहे; म्हणोन हे वर्तमानपत्र जा रीतीनें भले व गुणी पुरुषांस मान्य होईल, त्या रीतीने करण्यास ते दृढ निश्चयाने उद्योग करितील" अशी प्रतिज्ञा केली होती.[1] 'दर्पणा'ने हे धोरण अखेरपर्यंत चालविले होते, असे दिसते. 'दर्पणा'नंतर निघालेल्या मुंबई-अखबार पत्रानेही 'दर्पणा'सारखीच प्रतिज्ञा केली होती. ते म्हणते — "त्यांत कोणाचाच पक्षपात न ठेवतां जे वास्तवीक असेल तेच लिहिले जाईल व जेणेकरून रयतेचे कल्याण होईल तो मार्ग धरण्यात अंतर होणार नाहीं." (वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. २९५) 'ज्ञानोदया'नेही 'ज्या केवळ अयोग्य गोष्टी, त्या पत्र करणारा छापणार नाहीं.'[२] असे आश्वासन दिलेले होते. 'ज्ञानप्रकाश'कारांनीही हेच ध्येय डोळ्यांपुढे ठेविले होते "आम्ही असा नेम केला आहे कीं लबाड गोष्ट व विनाकारण निंदा व स्वधर्मविपरीत भाषण लिहूं नये व जी बातमी लिहूं ती आधारावरून लिहीत जाऊं."[३] या प्रतिज्ञांप्रमाणे सर्वच नियतकालिके सर्वदा वागली असतील, असे अर्थात समजता येत नाही. कारण कालान्तराने या नियतकालिकांत धर्म किंवा सामाजिक वा राजकीय मते यावरून पक्षभेद पडलेच व एकमेकांवर मात करण्याची साहजिकच ऊर्मी येत राहिली. अशा वेळी सर्वांनीच आपली पातळी राखली असेल, हे संभवत नाही.

---

1. "Personality shall not disfigure nor servility stain the pages of the Durpun, which the conductors, actuated by honest intentions, will steadily, temperately, and firmly endeavour to render deserving of the good will and support of every lover of truth and virtue."

जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड २, पृ. ५.

२. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड १, परिशिष्ट ३, पृ. ९०.

३. वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. ३१२.

'ज्ञानसिंधु' या वृत्तपत्राबद्दल 'प्रभाकर'कर्त्याने केलेली तक्रार या दृष्टीने उद्बोधक ठरेल, ती तक्रार अशी —

"आता ज्ञानसिंधूंत छापलेलें पत्र इतके बीभत्स आणि शिव्यागाळ्यांहीं भरपूर आहे कीं ते पत्र आम्ही आपले पत्रांत छापून आमचे पत्रास विटाळ करायास इच्छित नाहीं...असलें बीभत्स पत्र लिहिणे व ज्ञानसिधूंत निर्लज्जपणे छापणे हे युक्त नाहीं. परंतु सांप्रत शिमग्याचा वेध लागलेलाच आहे त्यापेक्षां, असो, फारशी चिंता नाहीं. परंतु शिव्यागाळीपेक्षां नीट युक्तीने बोलावे हें बरे, याचा ज्ञानसागराने नीट विचार करावा."[1] यास उत्तर म्हणूनच बहुधा ज्ञानसिंधुकार म्हणतात — "प्रभाकर-पत्राचा कर्ता आम्हास उपदेश कर्तो त्यास याणे याविषयी ओढून प्रतिष्ठा मिळविण्याचें कारण नाहीं व आम्ही त्याचे दोष काढण्यास किंवा लिहिण्यास भीत नाही. त्यासहि आम्ही आजपर्यंत बहुत वेळ उपदेश केला आहे, तो त्याणे मनांत ठेवून आपल्या पत्रांत काहीं लोकांनीं पाहण्याजोगें छापीत जावे."[2] 'प्रभाकरा'ने लोकहितवादींची शतपत्रे छापिली, त्याबाबत 'ज्ञानप्रकाश' पत्राचे उद्गार नापसंतीचेच आहेत. ते असे — 'लोकसुधारणेची रीती लोकहितवादी मनांत आणतात ते नव्हे. जर बोध करण्याचा असल्यास चांगले युक्तीने व मृदु भाषणाने व ईश्वरावर नजर ठेवून बोलले पाहिजे. यांपैकीं एकही गुण त्याचे लिहिण्यावरून आम्हांस दिसत नाही...त्याजवरून लोकहितवादीस गर्व व विचार किती आहे हे सहज ध्यानीं येईल."[3] साप्ताहिकांप्रमाणे मासिकांबाबतही तक्रार करण्याचे प्रसंग येत, असे दिसते. 'दंभहारक' हे मासिक दंभहरणाचे कंकण बांधूनच निघाले होते, तेव्हा त्याच्या भाषेत तिखटपणा येणे स्वाभाविकच होते. त्य विषयी मालाकार चिपळूणकर 'माले'च्या पहिल्या अंकात लिहितात — "ज्याच्यात्याच्यावर हल्ला करण्याचा जो त्याने बाणा उचलला आहे, तो विचारी मनुष्यास खास आवडणार नाहीं ... आतां आपल्या धर्माच्या तर्फे भांडून त्याच्या प्रतिपक्ष्याचे खंडण करणे हाच जर त्याचा उद्देश असेल, तर तो आमच्या कांहीं लोकांस मानवेल यांत संशय नाहीं व पाद्री बाटे वगैरे लोकांच्या जो तोंडी लागेल त्यानें कांहीं अंशीं जशास तसे केल्यावांचूनही उपाय नाहीं हे खरे आहे तरी या कामींही आमच्या देशबंधूनें आपली इतकी विटंबना करून घ्यावी हे आम्हांस सहन होत नाहीं." मालाकारांचे हे उद्गार पुढे कदाचित त्यांच्यावरच उलटण्यासारखे होते, हे येथे मुद्दाम सांगण्याची आवश्यकता नाही.

### नियतकालिकांतील विषय

या नियतकालिकांचे स्वरूप अधिक लक्षात यावे, याकरिता त्यांमध्ये काय-काय येत असे, किंवा संपादकांची देण्याची इच्छा असे, हे पाहणे युक्त होईल. 'दर्पण' या

१. प्रभाकर, २३ मार्च १८४२.
२. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड १, परिशिष्ट २, पृ ७७.
३. वृत्तपत्रांचा इतिहास, पृ ३००.

पहिल्याच वृत्तपत्राच्या प्रस्तावात (Prospectus) केलेली घोषणा पुढीलप्रमाणे होती [१]— "दर्पणांत जाहीर खबरा आणि विलायतचे व बंगालचे पत्रांचे कांहीं कांहीं अंश लिहिले जातील. तसेच या देशांतील, विलायतेतील व दुसरे देशातील मोठमोठीं वर्तमानेही लिहिलीं जातील. कोणी साहेबलोकांनी व या देशाचे लोकांनीं हिंदुस्थानांतील लोक, धर्म, आणि विद्या यासंबंधी कांहीं लिहून पाठविलें असतां तेही दर्पणांत छापलें जाईल. तसेच विलायतेतील विद्या, कला-कौशल्ये यांविषयींचे व त्यातील जा भागांचा उपयोग या देशांत झाल्यास फार हित आहे त्याविषयींचे लहान लहान ग्रंथ लिहिले जातील. अशा गोष्टींपासून जिज्ञासु पुरुषांस शोध करायास आणि विद्येंत परिश्रम करणारांस विचार करायास विषय मिळतील, परंतु जे शुद्ध मनोरजन मात्र इच्छितात, त्यांचींही हृदये दर्पणामध्ये लहान लहान चमत्कारिक जा गोष्टी असतील त्यांपासून संतुष्ट होतील. मनोरंजन करणें, चालते काळचीं वर्तमाने कळविणे आणि योग्यतेस येण्याचे मार्ग दाखविणें या गोष्टींची दर्पण छापणारांस मोठी उत्कंठा आहे."

**साप्ताहिकांचे स्वरूप**

प्रथम पाक्षिक असणाऱ्या आणि नंतर लवकरच साप्ताहिक झालेल्या या नियत-कालिकाचे स्वरूप मासिकापेक्षा वृत्तपत्रास साजेसे असावे, हे स्वाभाविक होते. म्हणजे असे की, त्यातील मजकूर हा तात्कालिक महत्त्वाचा अधिक असे. दर्पणाच्या पहिल्या वर्षामध्ये आलेल्या विषयांत इंग्लंडमध्ये त्या वेळी मान्य झालेल्या राजकीय सुधारणां-विषयीची (Reform Bill) बातमी, 'या देशावर रुशियनांचा हल्ला होण्याचे भय' ह्या परदेशाविषयीच्या वार्ता, शेतकरी लोकांस सरकारचे उत्तेजन, कंपनी-सरकारच्या तीन इलाख्यांतील जमाखर्चाची याद, या देशाचे लोकांतून मोठ्या सरकारी जागांवरून नेमणुका इत्यादी, येथील राजकीय मजकूर, केनेडीच्या 'प्राचीन धर्म व हिंदुधर्म' आणि पाद्री वुइलसन साहेबाच्या 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरण' या ग्रंथांच्या निमित्ताने धर्मविषयक मतप्रकटन, गिरमाजी अप्पा जोशी आणि बाबू कृष्णामोहन बानरजी यांचे धर्मान्तर, 'जामे जमशीद' या नव्या वृत्तपत्राची माहिती, घगवे आणि चिमाजीराव आपासाहेब यांच्या मृत्यूच्या बातम्या, पुण्यात इंग्रजी शाळा घातली किंवा शिक्षा-मंडळीस सरकारातून मिळणारा पैका कमी केला या शैक्षणिक घटनांचा उल्लेख, ठग किंवा फांसीगार अथवा हिंदुस्थानातील नाचतमाशे या सामाजिक वस्तुस्थितीविषयीचा मजकूर, राममोहन राय व ह्यूझेल साहेब यांच्याविषयीच्या बातम्या आणि पत्रे लिहिणारांस दिलेली उत्तरे इत्यादी विषयांस स्थान मिळाले आहे. यांबरोबरच 'विद्या हे बळ आहे' किंवा 'वाफयंत्राच्या वृत्तांतापासून मनांत आलेल्या गोष्टी' यांसारखे अधिक चिरस्थायी महत्त्वाचे विषयही त्यात येऊन गेले आहेत.

**मासिकांचे स्वरूप**

मासिकांमध्ये आलेले लेख तात्कालिकापेक्षा चिरस्थायी महत्त्व असणाऱ्या

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड २, पृ. ३–४.

विषयांवर लिहिले जात. कित्येक लेख तर शास्त्रीय विषयांवरील व अनेक अंकांमध्ये चालू राहिलेल्या लेखमाला असत. 'ज्ञानप्रसारक' या १८५०-मध्ये निघालेल्या मासिकामध्ये पहिल्या अंकापासूनच पदार्थविज्ञान, रसायन, हवा-प्रकरण, पार्थिव व्यवस्था (Physical Geography), क्षितिरचनाशास्त्र, श्रवणशास्त्र, जीवमात्रशास्त्र (Biology), उद्भिज्जविद्या इत्यादी शास्त्रीय विषयांवरील लेखमाला येत होत्या. 'विविधज्ञानविस्तारा'मध्ये काय-काय येईल, याची संपादकांनी दिलेली कल्पना याआधी आपण पाहिलीच आहे. साप्ताहिके आणि मासिके या दोन्ही प्रकारांच्या नियतकालिकांचा उद्देश वाचकांस तात्कालिक अथवा चिरकालिक महत्त्वाच्या अशा विषयांबाबत 'शाहणे करून सोडण्याचा' होता, हे उघड आहे. त्यांत फरक असेल तर तो एवढाच की, साप्ताहिकांमधील विषय हे त्यातल्या त्यात समकालीन तात्कालिक महत्त्वाचे असत, तर मासिकांमधील विषय चिरस्थायी महत्त्वाचे असत. 'विविधज्ञानविस्तारा'त व्याकरण व काव्यशास्त्र यांवर आलेल्या लेखावरून यास पुष्टिच मिळते.

### नियतकालिकांची प्रकाशनस्थले

नियतकालिकांना प्रारंभ मुंबईत झाला. पहिले पाक्षिक-साप्ताहिक आणि मासिक मुंबईतच निघाले, व पुढेही बरीच नियतकालिके मुंबईतच चालत. मुद्रणाची सोय आरंभी तरी मुंबईमध्येच उपलब्ध असल्याने व छापखान्याच्या साहाय्याविना नियतकालिके नियमितपणे निघणे अशक्य असल्याने तसे होणे हे स्वाभाविक होते. लेखनव्यवसाय करिता येण्यास विद्यासंपादन आवश्यक असे व ते करण्याची सोयही मुंबईमध्येच अधिक होती. पुढे पुण्यामध्ये या दोन्ही गोष्टी उपलब्ध झाल्यावर नियतकालिक काढणे शक्य झाले. मुंबईमध्ये 'ज्ञानसिंधु' चालविणाऱ्या विरेश्वर सदाशिव छत्रे यानीच पुण्यातील पहिले मराठी साप्ताहिक 'मित्रोदय' इ. स १८४४-मध्ये काढिले. 'ज्ञानप्रकाश' निघावयास आणखी पाच वर्षे लागली. 'ज्ञानोदय' १८४२-मध्ये पुण्यामुंबईबाहेर अहमदनगरास निघाला असला, तरी छापण्याच्या वगैरे सोयीकरिता मुंबईसच न्यावा लागला. पुण्यामुंबईखेरीज इतर थोड्या ठिकाणीच वृत्तपत्रे निघू शकली. कोल्हापूर येथे 'वर्तमानसंग्रह' (१८५३) हे पत्र आणि 'सुज्ञानामृत' हे मासिक (१८७४) ही निघाली. सातारा येथे १८५८-मध्ये 'शुभसूचक' निघण्याआधी 'बोधामृत' आणि 'शुभचिंतक' ही पत्रे चालू असल्याचा उल्लेख आढळतो.[1] १८६४-मध्ये 'बेळगांव समाचार' बेळगाव येथे निघाले ठाणे येथे १८६८-मध्ये 'विद्याकल्पतरु' व १८७०-मध्ये 'न्यायदीपिका', १८७२-मध्ये अकोला येथे 'ज्ञानसंग्रह' व १८७०-मध्ये 'वऱ्हाड रिपोर्टर', रत्नागिरी येथे 'बृहत्-संहिता' (१८७३) ही नियतकालिके (बहुतेक सर्व मासिके) निघालेली होती. धारवाड येथे 'ज्ञानाकर' १८६२-मध्ये सुरू झाला होता. महाराष्ट्राबाहेर इंदूर येथे

१. वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. ३१८.

'पूर्णचंद्रोदय' निघत असल्याचा उल्लेखही 'वृत्तप्रकाशा'त आढळतो. बहुतेक सारी अल्पजीवी ठरली, याचे कारण वर उल्लेखिलेलेच आहे.

## मजकुराची विभागणी व मांडणी

"आरंभीच्या वृत्तपत्रांत येणारा मजकूर अग्रलेख, बातम्या, स्फुट सूचना असा नसे. दर्पण–प्रभाकरांसारख्या पत्रांत दीर्घ लेखमाला आलेल्या आढळतात. पण इतर पत्रांत त्यांचा अभाव दिसतो. बातम्यांच्या सदरात मध्ये रेघ घालून तोडलेले तुकडे देत असत. या बातम्या इंग्रजी पत्रांवरून भाषांतरित केलेल्या असत. क्वचित् 'आमच्या पत्र लिहिणारांकडून' (बातमीदारांकडून) अशा शीर्षकाने ठिकठिकाणची बातमीपत्रे आढळतात. हवामा, पंचांग, बाजाराचे निरख ऊर्फ बाजारभाव यांचाही आढळ होतो. यांशिवाय वाचकांची पत्रे येत व 'पत्र लिहिणारांस उत्तरे' या सदरात संपादकीय सूचना असत. संपादकीय अग्रलेख नसे. क्वचित् थोडक्यात पत्रकर्त्यांकडून मतप्रदर्शन केलेले असे. सरकारी कामदारांच्या नेमणुका व बदल्या यांनीही बरीच जागा अडविली जाई. जाहिराती घेण्याची प्रथा फारशी आढळत नाही. क्वचित् एखाद्या जाहिरातीचा आढळ होतो...बरीचशी वृत्तपत्रे शिळाप्रेसवरच निघत. टाइपाचा प्रचार फारसा अद्यापि (१८६०-पर्यंत) झालेला नव्हता. वृत्तपत्राचा वाचकवर्गही फारसा मोठा नव्हता. यामुळे (कदाचित) वर्गणीचे दर भारी होते. प्रभाकर पत्राची वर्गणी वार्षिक १२ रुपये होती....एकंदरीत कमी वर्गणी परवडत नसे. त्या वेळची सर्व वृत्तपत्रे साप्ताहिकच होती. यावरून प्रत्येक अंकाची किंमत कमीत कमी चार आणे सामान्यतः असे."[1]

## मासिकांचा विषय विभाग

मासिकांचे स्वरूप अर्थात भिन्न असे. त्यांत दैनंदिन तर राहोच, परंतु सामान्यतः खबरांना स्थान नसे. जाहिरातीही साहजिक नसत. याला अपवाद असेही, परंतु तो अगदी त्या मासिकाशी किंवा त्यातील विषयाशी निगडित असणाऱ्या एखाद-दुसऱ्या बातमीचा किंवा जाहिरातीचा असे. त्याच्याशी संबंध नसणाऱ्या खबरा व जाहिराती येत नसत. बहुतेक सारे लेख असत व त्यांतील कित्येक एकापेक्षा अधिक अंकांमधून येत. याचे कारण एकंदर मासिकाचा पृष्ठसंख्येच्या दृष्टीने आवाका लहानच असे, हे होय ललितवाङ्मय एकंदरीने कमीच, तथापि क्रमशः केव्हा गोष्ट अथवा नाटकही त्यात येऊन जाई. ज्ञानप्रसारकामध्ये 'विक्रमोर्वशीय' नाटक (भाषांतर) आणि 'जिपोलीची गोष्ट' हीसारखी दीर्घ कथा येऊन गेली. साप्ताहिकापेक्षा मासिकांची वर्गणी अर्थात कमी असे, तरी त्या कालाच्या मानाने अधिकच म्हणावयास हवी. ज्ञानप्रसारकाच्या प्रत्येक अंकास चार आणे पडत. मुद्रणाचे काम हे खर्चाचे असे, हेच कारण मासिकांना लागू होते.

१. वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. ३१८–३१९.

# दोन

# वृत्तपत्रे

### पहिले मराठी वृत्तपत्र —‘दर्पण’

मराठीमधील पहिले वृत्तपत्र ‘दर्पण’ होय. त्याचे इंग्रजी नाव The Bombay Durpun असे होते इंग्रजी नावही असण्याचे कारण असे की, ते इंग्रजी आणि मराठी अशा दोन भाषात निघत असे. किंबहुना, त्याचे मूळ इंग्रजी असून मराठी भाषांतर हे नतरचे असे. “या देशचे लोकांत विलायती विद्यांचा अभ्यास वाढावा आणि तेथील ज्ञान प्रसिद्ध व्हावे अशा नात्यानें या वर्तमानपत्राचा उद्योग मुख्यत्वें आरंभिला आहे खरा, परंतु ज्यांस इंग्रजी भाषा येत्ये त्यांस मात्र याचा उपयोग असे न व्हावें म्हणोन योजिले आहे कीं, एक बाजूस इंग्रजी व एक बाजूस मराठी असावें.”[१] म्हणजे असे की “प्रत्येक पृष्ठाच्या पहिल्या कॉलमात इंग्रजी भाषेत मजकूर लिहून त्याच्यासमोर त्याचे मराठी भाषांतर करून छापीत असत.”[२] दर्पणाचा पहिला अंक ६ जानेवारी १८३२ रोजी निघाला. पहिले चार महिने हे पाक्षिक म्हणून काढण्यात आले आणि मे १८३२-पासून ते साप्ताहिक म्हणून निघू लागले आणि शेवटपर्यंत त्याच स्वरूपात चालले. सुमारे तीन वर्षे इतर छापखान्यात ते मुद्रित करून घेण्यात येई; पुढे ते स्वतःच्याच दर्पण छापखान्यात छापण्यात येत असावे. दर्पण पत्राच्या चालक-मालक मंडळीमध्ये रघुनाथ हरिश्चंद्रजी, जनार्दन वासुदेवजी व बाळ गंगाधरशास्त्री असे तिघेजण होते, तथापि संपादक म्हणून बाळशास्त्री जांभेकर यांचीच गणना आहे. “प्रत्येक अंकावर दर्शनी पृष्ठाच्या माथ्यावर उजव्या किंवा डाव्या हाताच्या कोपऱ्यात बाळशास्त्री यांचीच सही आढळते.”[3] इंग्रजी लेखांचे मराठी भाषांतर कोणाचे असे, हे निश्चितपणे कळलेले नाही. इंग्रजी लेखांची भाषा प्रौढ वाटते, तर मराठी भाषांतराची भाषा मात्र तितकी सफाईदार आणि प्रौढ वाटत नाही. मुंबईतील मूळ लोकांच्या भाषेची छाप तिच्यावर पडलेली दिसते. दर्पणाचे संपादकीय धोरण “नेमस्त पण निःस्पृह, लोकहितवादी व प्रगमनशील होते” त्याच्या ग्राहकांत अनेक इंग्रज अधिकारी व मिशनरी लोकही असत. मराठी लोकांचे मनोगत कळण्याकरिता त्याची त्यांना आवश्यकता वाटे. त्या पत्राविषयी दुसऱ्या एका इंग्रजी पत्राचा अभिप्राय पाहता त्याच्या कार्याची महती कळून येते. तो असा[४] – “दर्पण हे इंग्रजी व मराठी भाषांत प्रसिद्ध होणारे प्रतिष्ठित व उपयुक्त पत्र आहे. त्यातले स्वतंत्र लेख आणि इतर पत्रांतून निवडून घेतलेला मजकूर, एतद्देशीय लोकांना

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड २, पृ १.
२. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड १, परिशिष्ट ३, पृ. ६७.
३. वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. २८८.
४. दर्पण-संग्रह, पृ. २४.

माहिती देणे, त्यांना नवीन वळण लावणे व जुन्या भ्रामक समजुती नष्ट करणे या दृष्टीने योग्य आहेत. त्यांचा संपादकीय दृष्टिकोण आम्हांला नेहमीच पसंत असे असे नाही; तथपि त्यांचे विषयप्रतिपादन समतोल बुद्धीने केलेले असते, व सर्व मतांच्या व्यक्तींना आपले विचार प्रदर्शित करण्याला सारखाच वाव दिला जातो." पहिल्याच वर्षी 'जात' या विषयावर दर्पणात वाद सुरू झाला असता संपादकांनी कोणाचीही बाजू न घेता निष्पक्ष भूमिका घेतलेली होती. एखाद्या लेखकाने मर्यादातिक्रम केल्यास 'पत्र लिहिणाऱ्यांस उत्तरे' या सदराखाली त्यास समज देण्यात येई. 'दुरुत्तरे किंवा एका पत्र लिहिणारानें दुसऱ्याचीं वर्मे काढावीं हे आमचे मनास येत नाहीं, आणि असे ज्या पत्रात असेल तीं सर्व पुढील पत्रीं छापलीं जाणार नाहींत.'[1] या शब्दानी इशारेही दिले जात. बाळशास्त्री जांभेकरांनी[2] हे पत्र संपादण्याचे कार्य "मोठ्या मनोत्साहाने कांहीं दरमहा न घेतां पत्करिले होते" असे दादोबा

१. दर्पण, २७ जुलै, १८३२

२. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, मूळ गांव पोंभुर्ले; जन्म इ. स. १८१२. प्राथमिक शिक्षण व संस्कृत अध्ययन कोकणात मूळ गावी. १८२५-मध्ये मुंबईस आगमन व बापू छत्रे यांच्याकडे राहून नंतरचे पुढील शिक्षण; १८३०-मध्ये 'बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'चे 'नेटिव्ह सेक्रेटरी' म्हणून नेमणूक; १८३२-मध्ये अक्कलकोटच्या युवराजाचे शिक्षक; १८३४-मध्ये एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्ये 'पहिले ॲसिस्टंट प्रोफेसर'; १८४२-मध्ये त्याच संस्थेमध्ये 'ॲक्टिंग प्रोफेसर'; १८४०-मध्ये जे. पी.; १८४१-पासून १८४५-पर्यंत दक्षिण विभागांचे शाळातपासनीस –सुपरिटेंडंट. १८४५-मध्ये अध्यापनशाळेचे – नॉर्मल स्कूलचे डिरेक्टर; मृत्यू १७ मे १८४६. जांभेकरांची मराठी ग्रंथरचना — (१) नीतिकथा, (२) सारसंग्रह, (३) इंग्लंड देशाची बखर, भाग १ व २, (४) भूगोलविद्या, गणितभाग, (५) बालव्याकरण, (६) भूगोलविद्येचीं मूलतत्त्वें तयार करण्यात साहाय्य, (७–८) मरे यांच्या इंग्रजी व्याकरणाचा संक्षेप आणि शब्दसिद्धिनिबंध यांच्या रचनेमध्ये साहाय्य, (९) समीकरणाविषयींचीं टिपणे, (१०) शून्यलब्धिगणित व मूलपरिणति-गणित, (११) हिंदुस्थानाचा इतिहास (एल्फिन्स्टनच्या ग्रंथावरून व इतर अनेक ग्रंथांचा उपयोग करून), (१२) हिंदुस्तानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास, (१३) मानसशक्तींविषयीचे शोध (अपूर्ण), (१४) इंग्रजी-मराठी धातुकोश (पूर्ण), (१५) शून्यलब्धिमूलपरिणति-गणितावर विस्तृत, परंतु अपूर्ण ग्रंथ; दोन्ही कालोदरात नष्ट, (१६) 'पुनर्विवाह प्रकरण' पोथी छापण्यात साहाय्य, (१७) संध्येचे भाषांतर हाती घेतले होते, (१८) ज्ञानेश्वरीचे संपादन. याशिवाय 'दर्पण' या पहिल्या मराठी वृत्तपत्राचे १८३२ ते १८४०-पर्यंत आणि 'दिग्दर्शन' या पहिल्या मराठी मासिकाचे १८४० ते १८४५-पर्यंत संपादन.

पांडुरंग म्हणतात. निरपेक्ष समाजसेवा म्हणूनच त्यांनी हे केले. दर्पणाला प्रथमपासूनच वजन प्राप्त झाले होते. स्वतः बाळशास्त्री यांस राजमान्यता व लोकमान्यता लाभलेली असल्याने तिचा फायदा दर्पणालाही मिळाला. त्या वेळचे गव्हर्नर क्लेअर यांनी दर्पण हे नियतकालिक उद्बोधक व व्यवस्थित रीतीने चालविले जात असल्याचे आपले मत व्यक्त केले होते. मराठीमधील या पहिल्याच वृत्तपत्राने वृत्तपत्रसंपादनाचा एक उच्च आदर्श घालून दिलेला होता. त्याने घालून दिलेली पातळी नंतरच्या वृत्तपत्रांना त्या प्रमाणात राखता आली, असे वाटत नाही. हे पत्र आठ वर्षांवर अधिक काल चालले. तें जून १८४०-च्या अखेरीस बंद पडले त्याचे कारण जाहीर झाले नाही, परंतु ते 'तसेंच पुढे चालविण्यास कांहीं अडचणी आल्या'चा' उल्लेख ते बंद पडल्यावर लवकरच सुरू झालेल्या 'मुंबई अखबार' या पत्राच्या जाहिरातवजा प्रस्तावनेमध्ये आलेला आहे. "भारी वार्षिक वर्गणी (रु. २४), अत्यंत मर्यादित साक्षरता, ज्ञानलालसा व वाचनाभिरुची, आणि सर्वसाधारण हलकी आर्थिक स्थिती यांमुळे खप साहजिकच अतिशय थोडा; शिवाय, जाहिरातीचे उत्पन्नही केवळ नावाला," या कारणांनी त्याचा व्यवहार आतबट्ट्याचा झाला असणार, अशी कारणे जांभेकरांचे चरित्रकार देतात.[1] तथापि 'लैबल केस त्यावर होऊन ते नष्ट झालें,' असे केशवराव भवाळकर हे आपल्या आत्मचरित्रामध्ये स्पष्टपणे लिहितात.

## मुंबई अखबार

दर्पण पत्र बंद पडल्याबरोबर लगेच 'युनायटेड सर्व्हिस गॅझेट' नामक साप्ताहिक लागोलग ता. १ जुलै १८४०-पासून दुसऱ्या मंडळींनी सुरू केले. हे पत्र इंग्रजी होते. त्याच्या जोडीला 'मुंबई अखबार' हे नाव धारण करून ४ जुलैपासून एक मराठी पत्र सुरू करण्यात आले. त्याच्या जाहिरातवजा प्रस्तावनेमध्ये पुढीलप्रमाणे निवेदन करण्यात आले आहे –

"दर्पण वर्तमानपत्र आतापर्यंत इंग्रजींत जो मजकूर तोच मराठींत छापत आला. तसेच पुढें चालविण्यास कांहीं अडचणी आल्यामुळे व महाराष्ट्र वाचणारे यांस फार थोडी खबर यांत येती, तेणेकरून त्यांचा मनोगत पूर्ण होत नाहीं, सबब ही प्रस्तावना प्रसिद्ध केली जात्ये जे ते पत्र आजपासून प्रसिद्ध होणार नाहीं. परंतु सरकारास आणि साहेब लोकांस जाहीर होण्याजोगे जे जे ह्या देशाच्या कल्याणाचे विषय आहेत ते नवीन एक इंग्रजी वर्तमानपत्र "युनायटेड सार्व्हिस गॅझेट" म्हणून या नांवाचे होणार आहे. दर्पणाचा आरंभ झाल्यापासून एतद्देशीय लोकांतून बहुतांस वर्तमानपत्र वाचण्याची गोडी फार लागली आहे, व मराठी भाषेत पत्र असावे व सर्वांस पृथ्वीवर नवलविशेष मजकुर होतो तो सर्व प्रसिद्ध कळावा म्हणून बहुतेकांची इच्छा आहे. याजकरितां 'मुंबई अखबार' या नांवाचे एक फक्त मराठी भाषेत, त्यांत इंग्रजी लिपी

---

१. जांभेकर–शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड ३, परिशिष्ट ३, पृ. ६९.

नाही असे वर्तमानपत्र दर शनिवारीं छापावें असा सिद्धांत केला आहे... या नव्या महाराष्ट्र वर्तमानपत्रांत हल्लीं दर्पणांत जो मजकूर असतो, त्यापेक्षा बहुतेक चमत्कारिक खबरा व कलाकुशळाचे विषय यांत प्रसिद्ध केले जातील व चांगल्या सुरेख अक्षरांत निर्मळ कागद निघेल. याशिवाय त्यांत लोकोपयोगी विषयावर पत्रें व संमते छापितील. त्यांत कोणाचाच पक्षपात न ठेवता जें वास्तविक असेल तेच लिहिले जाईल."

यावरून दर्पण पत्रच इंग्रजी व मराठी विभाग वेगवेगळे व स्वतंत्र करून आणि निरनिराळ्या नावांनी चालू होते, असा समज होण्याचा संभव आहे परंतु 'अखबार' पत्राच्या दुसऱ्या अंकातील संपादकीयाने दर्पणकर्त्यांचे आणि अखबाराच्या संपादकाचे तेवढे सख्य नसावे, असे दिसते. त्या संपादकाला कोणीतरी 'पूर्णचंद्रोदय' नावाचे पत्र निघणार आहे, अशी बातमी पत्राने कळविली असता ती बातमी किंवा पत्र न छापता 'अखबार'चा संपादक लिहितो—

"दर्पण पत्राचा कर्ता हा ते पत्र चालू व्हावे अशी आशा करीत होता. परंतु ते दिवस पाहण्याचें त्याचे दैव कोठले? तेव्हा असे पूर्णचंद्रोदय होण्याचे पौर्णिमेचे संधीस खग्रास होतो तसा त्या पत्राचा न झाला तर चांगले!"

'अखबार' पत्रात 'गांवखात्यासंबंधी नेमणुका' या मथळ्याने सरकारी गॅझेटमधील कामगारांच्या नेमणुका, बदल्या यांविषयी माहिती येई. जाहिराती क्वचितच येत. 'पत्र लिहिणारांस उत्तरे' हे दुसरे सदर असे. बातम्या, पत्रकर्त्यांच्या सूचना, टीका सर्व सरमिसळ एकापुढे एक छापीत. याशिवाय हवामान, अपघात, मृत्यू, चोऱ्या, अफगाणयुद्धाची वार्ता, खुनाबद्दल फाशीची वार्ता, कलकत्त्याचे बातमीपत्र, ब्रम्ही राज्यातील हकीकत इत्यादि विषय आलेले दिसतात प्रांतोप्रांतीची इंग्रजी वर्तमानपत्रे घेऊन त्यांतील वार्तांची भाषांतरे दिली जात. पुस्तकावरील अभिप्रायही अग्रलेखाच्या जागी असत. ब्राह्मणांची भोजने, दक्षिणा हेही त्या काळचे चर्चेचे आणि बातमीचे विषय असत. 'अखबार'चा संपादक कोण होता, ते ज्ञात नाही. ते पत्र एक वर्षपर्यंत तरी चालले की नाही, याची शंका आहे. 'प्रभाकर' या पत्राच्या २१ नोव्हेंबर १८४१-च्या अंकामध्ये आलेल्या पत्राचा लेखक म्हणतो, " अहो, तुमचे स्नेही दर्पण व अखबार कांहीं थोडे वर्षे या भरतखंडांत जन्मून आपले तेज थोडा वेळ या पृथ्वीवर पाडून लवकरच नाशाप्रत पावले." [१]

## प्रभाकर आणि धूमकेतु

'मुंबई अखबार' बंद पडल्यावर मराठी भाषेतील तिसरे वर्तमानपत्र 'प्रभाकर' मुंबईसच निघाले. त्याचा पहिला अंक २४ ऑक्टोबर, १८४१-ला प्रसिद्ध झाला. हे पत्र शिळेवर छापले जाई. वर्गणी दरमहा १ रुपया असे. प्रथम ते

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड ३, परिशिष्ट ३, पृ. ७१–७२.

गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यात छापिले जाई. सहाच महिन्यांनंतर स्वतःच्या प्रभाकर छापखान्यात निघू लागले. पत्रावर संपादकाचे नाव नसले, तरी गोविंद विठ्ठल कुंटे ऊर्फ भाऊ महाजन[1] यांनी ते चालविले होते. महाजन यांनी ते १८६२-पर्यंत म्हणजे २०-२१ वर्षे चालविले. समकालीन वृत्तपत्रांमध्ये हेच दीर्घायुषी ठरले. भाऊ महाजन हे दर्पणकर्त्यांप्रमाणेच बाळमित्रकार छत्रे यांच्याजवळ शिक्षणाकरिता राहिले होते. १८४१ सालीच एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमधून वरच्या वर्गात शिकून ते बाहेर पडले होते. 'प्रभाकर' पत्राने आपल्या चटकदार शैलीने बरीच लोकप्रियता मिळविली होती. त्या काळचे इंग्रजी शिकलेले विद्वान मुख्यत्वे यात लिहीत. लोकहितवादींची 'शत-पत्रे' प्रभाकरामधूनच प्रथम प्रसिद्ध झाली. ते 'पुरोगामी' महाराष्ट्रियांचे तत्कालीन मुखपत्र होते. इंग्रजी राज्यपद्धतीवर यात प्रथमच टीकेला सुरुवात झाली. "हिंदुस्थानातून द्रव्य जाते ते बंद झाल्याशिवाय देशाची बरी गत नाहीं"; "इंग्रज अंमलदार हजारों रुपये पगार खाऊनहि लक्षावधि रुपये लांच खातात"; "नेटिव लोकांस इंग्रज लोक तृणप्राय मानतात" इत्यादी राज्यकर्त्यांविरुद्ध असणारी स्पष्ट विधाने 'प्रभाकर'मधूनच येऊ लागली. मराठी लेखकाचे लेखन शुद्ध करणाऱ्या कँडीसाहेबावर टीका याच पत्रामधून आली. या तिखटपणामुळे आणि चुरचुरीत-पणामुळे ते पत्र साहजिकपणेच लोकप्रिय झाले. अर्थात त्याला नेहमीच तोल राखता आला नसल्यास तेही स्वाभाविकच म्हणावे लागेल. 'दर्पण'कारांची प्रौढता आणि नेमस्तपणा 'प्रभाकर'कर्त्यांमध्ये नव्हता. तरी यातील लेखांची इंग्रजी भाषांतरे टीकेसाठी म्हणूनच का होईना, 'टाइम्स' या इंग्रजी पत्रामध्येही येत. पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणावर आणि स्वकीय समाजातील अनिष्ट गोष्टींवर भाऊ महाजनांनी सारखेच टीकास्त्र चालविले होते. विष्णुबोवा ब्रह्मचारी यांच्या विक्षिप्तपणावर जशी त्यांनी टीका केली, तसा मिशनऱ्यांच्या धार्मिक आक्रमणाचाही प्रतिकार केला. इंग्रजी भाषेचा किंवा पाश्चात्त्य ज्ञानाचा अव्हेर न करिताही इंग्रजी शब्दांचा वापर करून मराठी भाषा भ्रष्ट करणाऱ्यांचा त्यांनी समाचार घेतला. सरकारी कारभारातील बारीकसारीक अन्यायांची निर्भयपणे दखल घेतली. 'माला'पूर्व कालामध्ये 'माले'प्रमाणेच वाचकांस वाचनाची चटक लावणारे असे हे पत्र इ. स. १८६२-पर्यंत चालले. त्याचे

---

१. भाऊ गोविंद महाजन (मूळ नाव गोविंद विठ्ठल कुंटे) — मूळ गाव पेण (जिल्हा कुलाबा). जन्म सुमारे सन १८१५; सुमारे १८२३-मध्ये मुंबईस विद्याभ्यासाकरिता आगमन व बापू छत्रे यांच्याकडे राहून पुढील शिक्षण. एल्फिन्स्टन विद्यालयात अध्ययन आणि काही काल अध्यापन करून १८४१-मध्ये शिक्षण संपविले. १८४१-मध्ये प्रभाकर पत्र काढून जवळजवळ वीस वर्षे संपादन; प्रभाकर छापखान्याचे चालकत्व; १८५३-मध्ये 'धूमकेतु' या वृत्तपत्राचा प्रारंभ; १८५४ साली 'ज्ञानदर्शन' नावाचे त्रैमासिक सुरू केले. १८६२-मध्ये मुंबई सोडून नागपुरास प्रयाण; मृत्यु १८९०.

संपादक पुढे मुंबई सोडून आपल्या चिरंजिवांबरोबर नागपुरास गेल्याने ते पत्र बद पडले. 'प्रभाकरा'बरोबर 'धूमकेतु' नावाचे एक साप्ताहिक भाऊ महाजनांनी १८५३-मध्ये काढून काही काल ( सातआठ वर्षे ) चालविले होते ते मुख्यतः 'वर्तमानदीपिका' या जुन्या मताच्या वर्तमानपत्र स तोंड देण्याकरिता चालविलेले असावे. त्यात विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्यावर बरीच टीका येई. बावांच्या 'वेदोक्तधर्मप्रकाश' या ग्रंथातील अनेक दोषस्थळे धूमकेतूच्या टीकेमध्ये दाखवून दिली होती. परंतु उत्तरादाखल विष्णुबोवांचे लेखही 'धूमकेतू'मध्ये येत. बाबा पदमनजींचा 'धर्मांतर करण्याचे कारण' हा लेख इ. स. १८५४-मध्ये या पत्रामध्ये प्रसिद्ध झाला होता.

## ज्ञानसिंधु आणि मित्रोदय

'प्रभाकर' पत्रानंतर तीनच महिन्यांनी 'ज्ञानसिंधु' निघू लागला. ह्याचे संपादन बापू छत्रे यांचे चिरंजीव विरेश्वर सदाशिव छत्रे हे करीत असत. ते पत्र शिळा-छापावर त्यांच्या स्वतःच्या छापखान्यात छापिले जाई. 'प्रभाकरा'स प्रतिस्पर्धी म्हणून त्याची भूमिका असावी आपल्यास उपदेश करणाऱ्या 'प्रभाकर' पत्राच्या कर्त्यास "याणें याविषयीं ओढून प्रतिष्ठा मिळविण्याचे कारण नाहीं व आम्ही त्याचे दोष काढण्यास किंवा लिहिण्यास भीत नाहीं," या शब्दांत ठणकावल्याचे दिसून येते. विरेश्वर छत्रे याच्याजवळ बाळशास्त्र्यांची विद्वत्ता, किंवा भाऊ महाजनांचा बहुश्रुतपणा आणि वादनैपुण्य नसताही आपले पत्र त्यांनी 'प्रभाकरा'शी टक्कर देत काढले व चालविले. 'ज्ञानसिंधु' हे पत्र मुंबईस चालू असतानाच पुण्यामध्येही 'मित्रोदय' नावाचे साप्ताहिक छत्रे यांनी १८४४-मध्ये सुरू केले. हे पत्र पुण्यातील पहिले वृत्तपत्र गणावयास हवे. "हे पत्र लोककल्याणार्थ काढिलें असून यांत विषय सहा घेतले आहेत. संस्कृत भाषेचें ज्ञान होण्याकरिता **काव्य** व छंदाची यती समजण्यास **छंदःशास्त्र** व स्वधर्मावर भक्ति राहण्याकरितां **स्वधर्मोत्तेजन** हे तीन विषय ग्रहण केले आहेत. शिवाय उत्तम वर्तणूक हित होण्याजोगी व्हावी म्हणून संसारचातुर्य, नीति, आणि **देशावरील सांप्रतचीं** वर्तमाने असे तीन विषय ग्रहण केले आहेत." अशी प्रतिज्ञा संपादकांनी पहिल्याच अंकात केली. हा उपक्रम फार दिवस चालला नाही. बहुधा एक वर्षाच्या आतच तो संपला असावा. 'ज्ञानसिधु' मात्र पाच वर्षे तरी चालले असावे. 'सदुक्तिरत्न' नावाचे एक मराठी साप्ताहिक १८४४-मध्ये निघून काही महिन्यांतच बंद पडल्याचा उल्लेख 'ज्ञानसिधु'कारांनी केला आहे. पत्र कोणाशी तरी मुद्दाम दावा साधण्याकरिता काढिले आणि ती 'मनेछा' त्या पत्रकाराने थोड्याच वेळात परिपूर्ण करून घेतली, असा आक्षेपही घेतला आहे. स्वतः 'ज्ञानसिंधु'कारांनाही 'दर्पण' किंवा 'प्रभाकर' यांच्या संपादनाची पातळी राखता आली नसावी, असे वाटते.

## ज्ञानप्रकाश

पुण्यातील पहिले वृत्तपत्र ‘ मित्रोदय ’ हे फार अल्पायुषी ठरल्यामुळे १८४५ ते १८४९-पर्यंत तेथे वृत्तपत्र असे अस्तित्वात नव्हते. १८४९-मध्ये ‘ ज्ञानप्रकाश ’ हे पत्र कृष्णाजी त्रिंबक रानडे यांनी स्वतःच्या संपादकत्वाने सुरू केले. ते १८५६-पर्यंत शिळाछापावरच चालले होते. प्रथम केवळ मराठी असणारे हे पत्र १८६३-पासून इंग्रजी मजकूर देऊ लागले. आरंभी कित्येक वर्षे पत्राच्या नावाखाली नक्षीमध्ये ‘सत्य, सौख्य, ज्ञान ’ शब्द असत. प्रथम साप्ताहिक, मग द्विसाप्ताहिक, काही दिवस सोमवारी केवळ इंग्रजी साप्ताहिक, गुरुवारी केवळ मराठी साप्ताहिक, त्यानंतर पुनः साप्ताहिक, नंतर दैनिक अशी त्याची अनेक अवस्थांतरे झाली. कृ. त्रिं. रानडे यांच्यानंतर त्यांचे पुतणे वामन गोविंद रानडे हे संपादक होते. नंतर बाबा गोखले, दामोदर विद्याधर गोखले, सीतारामपंत चिपळूणकर अशी अनेक नावे संपादक म्हणून आढळतात. संपादकांखेरीज ‘ ज्ञानप्रकाश’ला कृष्णशास्त्री चिपळूणकर, लोकहितवादी गोपाळ हरि देशमुख, केरो लक्ष्मण छत्रे, महादेवशास्त्री कोल्हटकर, केशवराव भवाळकर, मोरो रघुनाथ ढमढरे इत्यादिकांचे साहाय्य प्रारंभीच्या कालात झाले या पत्राचे आरंभीचे धोरण नवीन सुशिक्षित समाजात स्वीकारिल्या गेलेल्या सुधारणांचा पाठपुरावा करण्याचे असे. विशिष्ट राजकीय धोरण असे त्यास नव्हते. विषय व मजकूर मुंबईमध्ये आधीच निघालेल्या वृत्तपत्रांप्रमाणेच असे. म्हणजे मुख्यतः ज्ञानप्रसाराकरिता व समकालीन घडामोडींच्या माहितीकरिता ते चालविले जाई.

## ज्ञानोदय, वर्तमानदीपिका व विचारलहरी

प्रथम १८४२-मध्ये निघाले तेव्हा मासिक, नंतर तीन वर्षांनी पाक्षिक, नंतर साप्ताहिक अशा अवस्थांतरांतून गेलेले ज्ञानोदय हे वृत्तपत्र अमेरिकन मिशनने सुरू करून पहिली पाऊणशे वर्षे चालविले. प्रथम ते अहमदनगरला निघे. नंतर काही काल मुंबईस व नंतर पुनः अहमदनगरास अशी त्याची स्थलांतरे झाली पहिले संपादक रे. हेन्री बॅलंटाइन हे होते. मराठी संपादनाचे काम शाहूराव कुकडे यांच्याकडे असे. या नियतकालिकाचा मुख्य उद्देश खिस्ती धर्मप्रसार हाच होता. म्हणून यात येणाऱ्या मजकुरात मिशनची माहिती, मिशनऱ्यांची ये-जा, खिस्ताची शिकवण, हिंदुधर्मातील अनिष्ट गोष्टी व त्या धर्मावर टीका वगैरे भाग बराच असे. यातील ज्ञानप्रसाराला धर्मप्रचाराचा वास येत असल्याने त्याचा परिणाम हिंदु-धर्मपुरस्कारात, व तो करणाऱ्या वृत्तपत्रांच्या प्रतिक्रिया-निर्मितीमध्ये झाला. या पत्राला प्रथम प्रभाकर-ज्ञानसिंधु यांचा आणि तदनंतर केवळ त्याच्या खिस्ती धर्मप्रचाराला विरोध करण्याकरिता निघालेल्या वृत्तपत्रांचा रोष पतकरावा लागला. अशा वृत्तपत्रांत ‘वर्तमानदीपिके’चा उल्लेख प्रथम करावा लागतो. हे पत्र १८५३-मध्ये निघाले. त्यावर संपादकाचे नाव नसले, तरी बाबा पदमनजींनी भवानी विश्वनाथ कानविंदे यांचा त्यांनी हे पत्र काढिले

असा उल्लेख केला आहे. यापाठीमागे आणखी काही शास्त्रीमंडळी असावी, अशी समजूत होती व लक्ष्मणशास्त्री हळबे आणि केशवशास्त्री गाडगीळ हे त्यांमध्ये असावेत, असे वाटते. 'दीपिके'च्या आधीच १८५२-मध्ये कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी खिस्ती धर्मप्रचाराला विरोध करणारे 'विचारलहरी' नावाचे पाक्षिक काढिलेले होते. त्याच्या मुखपृष्ठावर एका बाजूस 'सद्धर्मोद्धारक' व दुसऱ्या बाजूस 'दुर्धर्मोच्छेदक हे शब्द, आणि 'सत्य' आणि 'शान्ति' हेही शब्द असत. 'विचारलहरी'मधील लेखनाविषयी ते 'हलकट व पोरकट' असल्याचा स्वतः धर्मांतर केलेल्या बाबा पदमनजींचा अभिप्राय ते बरेच परिणामकारक असल्याचे सुचवितो. १८५५-मध्ये बापू सदाशिव शेट यानी काढिलेल्या पाक्षिक 'सद्धर्मदीपिके'चेही ध्येय 'विचार-लहरी'प्रमाणेच होते. खिस्ती वृत्तपत्रांबरोबर होणाऱ्या पूर्वोत्तरपक्षांमुळे या हिंदुधर्म-पुरस्कारक पत्रांमधून वादाची हिरिरी यावी, हे अपरिहार्यच होते.

## इंदुप्रकाश आणि अरुणोदय

'प्रभाकर' पत्र "सुमारे २५ वर्षे इतक्या दीर्घ कालावधीपर्यंत टिकले" असा उल्लेख सापडत असला, (वृत्तपत्रांचा इतिहास, पृ. ३०२) तरी ते भाऊ महाजन १८६२ साली मुंबई सोडून नागपुरास गेल्यावर बहुधा अस्त पावले असावे. 'प्रभाकरा'च्या अस्ताच्या सुमारासच 'इंदुप्रकाश' सुरू व्हावा, हा योगायोग लक्षात घेण्यासारखा आहे. त्यातील मजकूर इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषांत असे. सुरुवातीचे मराठी विभागाचे संपादक जनार्दन सखाराम गाडगीळ हे होते. एक प्रमुख उत्पादक म्हणून लोकहितवादींचा त्याच्याशी संबंध आला होता. परंतु त्यापेक्षा एक कर्ते समाजसुधारक विष्णुशास्त्री पंडित ह्याच्या संपादकत्वामुळे 'इंदुप्रकाश' हा महाराष्ट्रास विशेष परिचित झाला. त्यांनी आपल्या संपादकीय कारकीर्दीत प्रामुख्याने विधवाविवाहाच्या पुरस्कारार्थ लेखन केले. बालविवाह, केशवपन, जरठकुमारीविवाह, स्त्रीशिक्षण इत्यादी प्रश्नांचीही चर्चा इंदुप्रकाशामध्ये विस्ताराने येई. विष्णुशास्त्र्यांच्या लेखनात अभ्यास व कळकळ ही भरपूर असत. इ. स. १८७०-च्या पुनर्विवाहावरील प्रसिद्ध वादामध्ये सुधारक पक्षाचे पुढारीपण पंडितांच्याकडेच होते. साहजिकच 'इंदुप्रकाश' हे सुधारकांचे मुखपत्र ठरले. मुंबई विद्यापीठाच्या बहुतेक सर्व पहिल्या पदवीधरांचा या पत्राशी लेखक-संपादक या नात्याने सबंध आला. न्या. मू. रानडे, न्या. मू. चंदावरकर, न्या मू. तेलंग यांनी त्यात आपापल्या कालात लेखन केले. त्यामुळे सरकारदरबारीही त्याचे वजन होते. 'इंदुप्रकाशा'ला लाभलेल्या विद्यापीठीय विद्वानांच्या साहाय्यामुळे त्याची संपादकीय पातळी आधीच्या वृत्तपत्रांच्या तुलनेने खूपच उंचावलेली होती. धोरण एकंदरीत नेमस्तपणाचेच असे. आरंभाला ते या पत्राच्या यशाला कारणीभूत झाले असले, तरी कालान्तराने त्यामुळेच त्याच्या लोकप्रियतेला ओहोटी लागली. परंतु हा काळ बराच पुढचा आहे. प्रस्तुत कालखंडामधील हे पत्र आधीच्या पत्रांपेक्षा पुष्कळच अधिक प्रगत स्वरूपाचे होते, यांत शंका नाही. 'इंदुप्रकाशा'नंतर चार वर्षांनी १८६६-

मध्ये ठाणे येथे निघालेले ' अरुणोदय ' नावाचे पत्र जहाल राजकीय विचारांचे होते. मात्र जहाल-मवाळ हे भेद स्पष्ट होण्यापूर्वीपासूनच त्यामध्ये राजकारण आणि परकीय सत्तेला विरोध यांविषयी विवेचन येई. हे पत्र काशिनाथ धोंडो फडके यांनी काढिले होते. विद्वत्तेपेक्षा आवेश आणि भावना यांवरच यात अधिक भर दिलेला असे. जवळजवळ ४५ वर्षेपर्यंत तेजस्वी बाण्याने हे पत्र चालविण्यात आले होते. याच पत्राच्या जोडीने पुढे ' हिंदुपंच ' हे विनोदी, व्यंगचित्रप्रधान पत्र प्रसिद्ध होई.

## ' नेटिव्ह ओपीनियन '

प्रथम फक्त इंग्रजीमध्ये निघालेले हे पत्र रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांनी १८६४-मध्ये काढिले. परंतु नंतर दोनच वर्षांनी केवळ मराठी जाणणाऱ्याकरिता त्यात मराठी मजकूरही देण्यात येऊ लागला. रावसाहेब मंडलिकांनी हे स्वमतप्रतिपादनार्थ काढिले. ' इंदुप्रकाशा'चा सामाजिक सुधारणेचा पुरस्कार रावसाहेबास सम्मत नव्हता. रावसाहेब इतरत्र इंग्रजी लेख लिहीत. एका पत्राने त्यांचा लेख छापण्याचे एकदा नाकारल्यामुळे रागावून रावसाहेबांनी स्वतःचे पत्र काढिले. त्यामुळे प्रथम ते इंग्रजीतच निघे. ' नेटिव्ह ' लोकाचे मत इंग्रज राज्यकर्त्यांच्या कानावर घालावे, हा त्याचा मूळ हेतू. पत्राचे स्वरूप पोक्त, भारदस्त असे. त्यातील लेख अभ्यासपूर्ण असल्याने त्याला वजनदारपणा प्राप्त झाला होता. रावसाहेबांच्या नावामुळे सरकारात आणि परदेशातही ' नेटिव्ह ओपीनियन'चे नाव परिचित झाले होते. रावसाहेब मंडलिक हे या पत्राचे उत्पादक आणि चालक असले, तरी पुष्कळशी संपादकीय जबाबदारी नारायण महादेव ऊर्फ मामा परमानंद यांच्याकडे असे. त्यांच्या " भारदस्त, समतोल, निश्चित, सुबोध आणि मार्मिक " लेखनशैलीमुळे ' नेटिव्ह ओपीनियन'ला लवकरच चांगली प्रतिष्ठा लाभली. मामा परमानंद पुढे आपल्या प्रार्थनासमाजाच्या मुखपत्रात, ' सुबोधपत्रिके'त लिहावयास लागले. ' नेटिव्ह ओपीनियन ' १९०६-पर्यंत चालू होते.

## ' सुबोधपत्रिका '

' ज्ञानोदय ' ह्या पत्राने ज्याप्रमाणे खिस्तीसमाजाचे आणि धर्माचे मुखपत्र म्हणून कार्य चालविले होते, तसेच १८६७ साली निघालेल्या प्रार्थनासमाजाने आपले कार्य करण्याकरिता १८७३ साली ' सुबोधपत्रिका ' हे पत्र सुरू केले. त्याचा उद्देश समाजाचे हेतू सिद्धीस नेणे, आपल्या धर्मसंबंधी मतांचा प्रसार करणे व त्यांवरील आक्षेपांना उत्तर देणे असा होता. समाजकारण, विशेषतः धर्मकारण, हेच ' पत्रिके'चे क्षेत्र असे. पण मराठीबरोबर इंग्रजी मजकूरही देण्यात येई. राजकारण अजिबात टाळले जाई असे नाही; पण समाज व धर्म यांबाबतच्या सुधारणा यांविषयीच खरा जिव्हाळा असल्याने यांविषयीची चर्चा प्राधान्याने येई. आरंभी न्या. मू. रानडे, डॉ भांडारकर, सर नारायण चंदावरकर, मामा परमानंद यांचा लेखक म्हणून त्याच्याशी संबंध असे. ' पत्रिके'चे क्षेत्र मर्यादित असल्यामुळे तिचे आवाहनही मर्यादित लोकसमूहासच असे. एका

संस्थेचे पाठबळ असल्याने ‘ ज्ञानोदया’प्रमाणेच ‘ पत्रिका ’ ही दीर्घायुषी ठरली.

## दीनबंधू

प्रार्थनासमाजाप्रमाणेच सत्यशोधक-समाजाने आपले मुखपत्र म्हणून १८७७-मध्ये ‘ दीनबंधू ’ हे साप्ताहिक सुरू केले. या समाजाचे मूळ प्रवर्तक श्री. ज्योतीराव फुले यांच्या प्रेरणेने कृष्णराव भालेकर यांनी ते सुरू केले. सत्यशोधक-समाजाचा मतप्रचार करणे हे अर्थात त्याचे उद्दिष्ट राहिले. प्रार्थनासमाजाच्या मुखपत्रात मराठी समाजाच्या वरच्या वर्गांच्या प्रश्नांचा व दुःखांचा परामर्श घेतला जात असला, तर ‘ दीनबंधू’मध्ये दलित, मागासलेल्या समाजातील प्रश्नांचा आविष्कार व उच्चार होई. ‘ सुबोधपत्रिके’प्रमाणे हेहि पत्र दीर्घायुषी झाले.

## किरण

केसरी-मराठा ही पत्रे निघाल्यामुळे वृत्तपत्रांच्या इतिहासात एक निराळा कालखंड सुरू झाला असे म्हटले, तर त्याची पूर्वसूचना १८७७-मध्ये निघालेल्या ‘ किरण ’ या पत्रामुळे मिळाली होती, असे म्हणता येईल. केसरी-मराठा पत्रांच्या संस्थापकांपैकी एक महादेव बल्लाळ नामजोशी यांनी हे पत्र केशवराव साठे आणि अण्णासाहेब पटवर्धन यांच्या साहाय्याने काढिले., हे पत्र अल्पकाळच टिकले असले, तरी तेवढ्या कालातीलसुद्धा त्याची कामगिरी उल्लेखनीय ठरते. ठिकठिकाणच्या बातमीदारांकडून बातमीपत्रे मागवून ती यात विस्ताराने देण्यात येत. इ. स. १८७७–७८-चा दुष्काळ व १८७८-मधील देशी वृत्तपत्रांवर निर्बंध घालणारा कायदा यांसंबंधाने ‘ किरण’ने सडेतोड टीका केली. दुष्काळविषयक जरूर ती आकडेवारी आणि त्याची सविस्तर बातमी यात देण्यात येई, व त्याची खरी जबाबदारी कोणावर आहे, याचेही स्पष्ट विवेचन करण्यात येई. वृत्तपत्रावरील निर्बंधांचा कायदा झाला असताना सर्व बोजा स्वतः पतकरून आपल्या बातमीदारांस त्याने अभय दिले होते. ‘ मात्र बातमीचे खरेपणाबद्दल काळजी घेणे अवश्य आहे,’ असा इशाराही दिला होता.

## इतर वृत्तपत्रे

येथवर उल्लेखिलेल्या वृत्तपत्रांखेरीज पुण्यामुंबईत आणि त्यांबाहेरही कित्येक वृत्तपत्रे निघाली व त्यांतील कित्येक दीर्घायुषी झाली. पुण्यातील ‘ लोककल्याणेच्छु ’ ( १८७१ ) पत्राचे नाव त्यातील ‘ गोल्या घुबड ’ याच्या पत्रांमुळे स्मरणीय ठरले. मुंबईचे ‘ सत्यप्रकाश ’ ( १८७७ ) हे बेने इस्रायल समाजाचे मुखपत्र होते. ‘ बेळगांव समाचार’ ( १८६४ ) हे बेळगाव येथील पत्र, धुळे येथील ‘ खानदेशवैभव ’ (१८६७), कोल्हापूरचे ‘ ज्ञानसागर ’ ( १८७१ ), सातारा येथील शुभसूचक (१८५८), रत्नागिरी येथील ‘ सत्यशोधक ’ ( १८७१ ), सोलापूरचे ‘ कल्पतरु ’ ही पत्रे दीर्घायुषी ठरली. महाराष्ट्राबाहेर इंदूरला ‘ पूर्णचंदोदय ’, देवासला ‘ वृत्तलहरी ’ आणि धार येथे ‘ वृत्तधारा ’ अशी पत्रेही काही काल चालली. यांशिवाय ‘ सूर्योदय ’ (ठाणे ),‘ नासिक-वृत्त’ ( नासिक ), ‘आर्यावर्त’ ( धुळे), ‘बोधसुधाकर’ ( सातारा ), ‘सत्यसदन’

(अलिबाग), 'देशसुधारणेच्छु' (गोवा), 'पुणें-वैभव', 'वेंगुर्लेवृत्त', 'वृत्तप्रकाश', 'ज्ञानचक्षु' इत्यादी वृत्तपत्रेही प्रस्तुत कालखंडामध्ये निघून काही काल कार्य करून विराम पावली. याचा अर्थ असा की, प्रस्तुत कालखंडाच्या अखेरीस वृत्तपत्रांची अभिरुची मराठी समाजामध्ये पुष्कळच प्रमाणात दृढमूल झाली होती व वर्तमान समजून घेणे आणि आपली विविध विषयांची मते बनविणे हीं समाजास एक आवश्यक अशी गरज वाटू लागली होती. याकरिता जे लेखन झाले, त्यामुळे मराठी गद्यशैली बनण्यास फार साहाय्य होऊन गद्याचे सामर्थ्यही वाढत गेले, आणि मराठीमधील एका प्रभावी वाङ्मयप्रकाराने निश्चित असे स्वरूप धारण केले. या प्रक्रियेत वृत्तपत्रांप्रमाणेच उपकारक ठरलेली व त्यांपासून फार भिन्न नसणारी नियतकालिके म्हणजे मासिके हीही सहभागी होती. म्हणून त्यांचाही परामर्श येथे घ्यावयास हवा.

## तीन

## मासिके

### मराठीमधील पहिले मासिक – 'दिग्दर्शन'

मराठीमधील पहिल्या वृत्तपत्राप्रमाणेच पहिल्या मासिकाचे जनकही बाळशास्त्री जांभेकर हे होत, अशी समजूत होती.[1] याचा पहिला अंक १८४०-च्या मे महिन्याचा निघाला. वृत्तपत्रापेक्षाही ज्ञानप्रसाराच्या उद्दिष्टाची साधना मासिक पुस्तकाच्याद्वारे अधिक चांगल्या प्रकारे होण्यासारखी आहे, असे वाटल्यामुळेच जणू काही 'दिग्दर्शन' हे मासिक सुरू करण्यात आले. आणि त्याचा परिणाम म्हणून पुढील महिन्याच्या अखेरीपासून 'दर्पण' हे वृत्तपत्र बंद पडले. 'दिग्दर्शन' मासिकाचे उद्दिष्ट पहिल्या अंकातच स्पष्ट केलेले होते. "दिग्दर्शन म्हणजे मराठी भाषेत सर्व विषयांचा संग्रह" असे प्रथम म्हणून "हे लहान पुस्तक महिन्यास एक छापणार. या पुस्तकात

१. या मासिकाचे संपादक रा. ब. राघोबा जनार्दन हे होते. ते काढण्याच्या संकल्पाविषयीची जाहिरात इंग्रजीमध्ये 'दर्पणा'च्या १० जानेवारी, १८३९-च्या अंकामध्ये आपल्या नावाने त्यांनी दिली होती, व सर्व पत्रव्यवहार मात्र 'दर्पणा'च्या संपादकाच्या नावाने करावा, असे म्हटले होते. (अर्वाचीन मराठी वाङ्मय, षष्ठ खंड, सं. गं. दे. खानोलकर पृ. ७१,). मे १८४०-च्या अंकाच्या पहिल्या २ प्रती सरकारकडे पाठविताना लिहिलेल्या पत्रात आपल्या सहीखाली Editor of "Dig-Darshan" असा उल्लेखही ते करितात (अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक, पंचम खंड, सं. गं. दे. खानोलकर पृ. २५). हे मासिक १८४३-मध्ये राघोबा जनार्दन यांच्याकडून विकत घेऊन काही काळ भाऊ महाजन यांनी चालविले. हे लक्षात घेऊन यापुढील मजकूर ध्यानात घ्यावा. —संपादक

बातमीचें सार, व भूगोल, इतिहास, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र व साधारण विद्या यांविषयी थोडथोडा मजकूर, दुसऱ्या ग्रंथांतून घेतलेला, किंवा नवा लिहिलेला छापला जाईल व प्रसंगोपात्त समजूत पडण्याकरिता दगडावर छापलेले नकाशे, चित्रें वगैरे यांत असतील." [1] दिग्दर्शन हे नावही दर्पणाप्रमाणे बंगाली दिग्दर्शन मासिकावरून घेतलेले असावे. दर्पणाप्रमाणे दिग्दर्शन मासिकावरही संपादकांचे नाव छापलेले नव्हते. आतील सर्व लेखही निनावीच आहेत. यातील बराच भाग शास्त्रीबुवांच्या हातून उतरला असावा, असे त्यात आलेल्या शास्त्रीय विषयांच्या लेखमालांवरून वाटते. आपले धोरण म्हणून 'व्यवहारोपयोगी शास्त्रे व विद्या यांची दिशा दाखवावी; परलोकाच्या उपयोगी जें वेदान्तशास्त्र त्याविषयी कांहीं लिहावयाचे नाहीं,' असे पहिल्याच अंकात सांगण्यात आले होते. "आम्ही जे लिहिणार त्यांणेकरून त्या त्या विद्यांचे परिपूर्ण ज्ञान होईल असे समजू नये. कारण, समग्र विषय कळणे तर थोर थोर ग्रंथ पढायास पाहिजेत. तथापि एथे जितका विस्तार करण्यांत येईल त्याणेकरून वाचणारांचे मनोरंजन होऊन त्यांस त्यांची गोडी लागावी आणि त्यांणी त्या विषयांचे ग्रंथाचा अभ्यास करावा असा आमचा मनोरथ आहे. कला, कौशल्यें व कसबें यांविषयीं जें कांहीं लिहूं त्याचा उपयोग व्यवहारांत कोणास झाल्यास आमच्या श्रमाचें सार्थक होईल." [2] तसेच, "हा उद्योग तर बाळबोधार्थ मुख्यत्वे आहे." [3] हेही त्याच वेळी स्पष्ट केले, आहे. मासिक एकंदरीत तीन वर्षे चालले; परंतु अंक मागे पडत-पडत १८४२-चा डिसेंबर महिन्याचा अंक १८४४-च्या मार्चमध्ये निघाला. मासिकाची अनियमितता आणि पुरेशा लोकाश्रयाचा अभाव हे ते बंद पडण्याचे कारण असावे. बाळशास्त्र्यांवरील मृत्युलेखात शास्त्रीबुवांच्या या दुहेरी ( दर्पण–दिग्दर्शन ) वाङ्मयसेवेचे व्हावे तसे चीज येथील लोकांकडून झाले नाही, असे विधान ज्ञानोदयकर्त्यांनी केले आहे. ( were not properly appreciated nor properly supported by the Native Community ).

दिग्दर्शनामध्ये रसायनशास्त्र, सिद्धपदार्थविज्ञान, ज्योतिषशास्त्र, इतिहास व भूगोल यांविषयी लेख, चीनचे वर्णन, मुंबईचे वर्णन, सूक्ष्मदर्शक यंत्र, कागदाची उत्पत्ती, मोती, मोडी व बालबोध अक्षरांचे ताम्रपट, हिंदुस्थानाचा नकाशा इत्यादी विविध विषयांवरील लेख अथवा लेखमाला येऊन गेल्या आहेत. यांशिवाय साधारण विषय म्हणून एक सदर त्यात येई. त्यात सोडा पौडर, जनावरांच्या गोष्टी, आशा, कासव, तपकिरीचे व्यसन असेही विषय येऊन गेले आहेत. मधूनमधून वर्तमान म्हणूनही

१. जांभेकर–शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड ३, परिशिष्ट ३, पृ. ८३.
२. तत्रैव, पृ. ८६.
३. तत्रैव, पृ. ८६.

काही बातम्या दिल्या आहेत. एकंदर भर साध्या-सोप्या भाषेमध्ये ज्ञानसंग्रह करून ते लोकांस सादर करण्यावर आहे. नवीन ज्ञानातच जी काही वेधकता असेल, तेवढीच त्या लेखनात असे. भाषेत किंवा लेखनशैलीत ती आणण्याचा प्रयत्न नाही. तशी अपेक्षा करणेही बरोबर होणार नाही.

**ज्ञानचंद्रोदय ( कार्तिक १७६२ ते वैशाख १७६६ )**

१८४०-मध्येच वर्षअखेर डिसेंबरमध्ये मराठीमधील दुसरे मासिक निघाले. त्याचे संपादक पांडुरंग बापू जोशी पावसकर हे होते. मासिकात प्रथम ' कृष्णलीलामृत ' हा ओवीबद्ध ग्रंथ छापावयास घेतला होता, असे दिसते. नंतर संस्कृत भगवद्गीता मराठी कवींच्या समश्लोकींसह क्रमाने येत होती. जुनी मराठी कविता छापून काढण्याचा हा पहिला उपक्रम असल्याचा उल्लेख मागे येऊन गेलाच आहे. सुमारे साडेतीन वर्षे चालून ते विराम पावले. तेवढ्या अवधीत विक्रमचरित्र, राधाभुजंग, गोपीगीत, सीतास्वयंवर, भक्तलीलामृत इत्यादी प्रकरणे त्यात होऊन गेली. मराठीमधील क्रमाने तिसरे मासिक ' ज्ञानोदय ' आहे हे खरे; परंतु नंतर लवकरच ते पाक्षिक झाले व पुढे तर साप्ताहिक झाले, हे याआधी स्पष्ट केलेलेच आहे.

**उपदेशचंद्रिका**

आरंभी काही काल मासिक स्वरूपात निघणारा ' ज्ञानोदय ' सोडल्यास ' उपदेशचंद्रिका ' हे मराठीमधील तिसरे मासिक होय. मोरभट्ट दांडेकर हे याचे संपादक होते. " ब्राह्मणाने हिंदुधर्म स्थापायाकरितां पुढे येऊन आणि त्यासंबंधी ग्रंथ छापून वादाचा प्रारंभ केला, अशी ही गोष्ट प्रथम मोरभटानेच केली असे आम्हांस वाटते. "[१] असे बाळशास्त्री जांभेकर त्यांच्याविषयी म्हणतात. ते शाक्त होते, असे बाबा पदमनजी सांगतात.[२] हे मासिक १८४४-मध्ये निघाले. इ. स. १८४३-मध्ये उद्भवलेल्या शेषाद्रिबंधूंच्या धर्मान्तरविषयक चळवळीची प्रेरणा या मासिकास मिळाली असावी. शेषाद्रिप्रकरण संपुष्टात येताच हेही बंद पडले, असे दिसते. " दोन तीन वर्षांनी ' चंद्रिके'चा अगदीं खग्रास झाला "[3] असे ' ज्ञानोदय 'कार पुढे म्हणतात. मोरभटांचा ख्रिस्तीधर्मविरोध त्या धर्माच्या अभ्यासावर आधारलेला नव्हता. बाबा पदमनजींना धर्मान्तरापासून निवृत्त करण्याकरिता त्यांच्या नातलगांनी मोरभटांना त्यांच्या घरी पाठविले असता " मला इंग्रजी येत नाहीं, व मी नवा करार वाचला नाहीं, माझे इंग्रजी शिकलेले मित्र इंग्रजी बुकांतून जें मला सांगत त्यावर विश्वास ठेवून मी लिहीत असे, "[४] असे पदमनजींना मोरभटानी सांगितल्याचे ते सांगतात. ' उपदेशचंद्रिके'ची प्रतिज्ञाच

१. जांभेकर-शताब्दी-स्मारक ग्रंथ, खंड ३, परिशिष्ट ३, पृ. ९४.
२. अरुणोदय, पृ.१२५.
३. १ जानेवारी १८५६.
४. अरुणोदय, पृ. १२५.

खिस्ती धर्ममतखंडनाची होती, हे आपण मागे पाहिलेच आहे. तीमधील विवेचनाची तर्कशुद्धता अथवा पातळी यांपेक्षा परधर्मीयांच्या हिंदुधर्मावरील हल्ल्याचा प्रतिकार करण्याचा पहिला प्रयत्न म्हणूनच त्याकडे पाहिले पाहिजे. 'उपदेशचंद्रिके'मध्ये बाळशास्त्री यांचेही कांही लेख होते, ही बा. ना. देव यांनी दिलेली माहिती बरोबर असल्यास तिचा दर्जा आणि विवेचन, अधूनमधून का होईना, प्रतिष्ठासंपन्न असले पाहिजे, असे अनुमान करिता येते. धर्मकार्याकरिता केलेला कळकळीचा प्रयत्न म्हणून समकालीनांमध्ये त्याविषयी आदर वागत असावा, असे वाटते.

## मराठी ज्ञानप्रसारक

परंतु मासिक या दृष्टीने पहिला चिकाटीचा आणि सातत्याचा प्रयत्न म्हणून १८५० साली निघालेल्या 'मराठी ज्ञानप्रसारका'चाच उल्लेख करावा लागेल. हे मासिक 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे'द्वारा काढण्यात व चालविण्यात आले होते. ही सभा इ. स.१८४८-मध्ये स्थापित झाली होती. या सभेत वेळोवेळी जे निबंध वाचले गेले आणि व्याख्याने दिली गेली, त्यांचा संग्रह 'मराठी ज्ञानप्रसारका'मध्ये करण्यात येई. त्यात शास्त्रीय, सामाजिक, क्वचित राजकीय आशयाचे लेख व चरित्रे, देशवर्णने, इतिहास, लोकस्थिती यांसंबंधीचे लेख येत. एल्फिन्स्टन महाविद्यालयातील होतकरू विद्यार्थ्यांनी अभ्यासपूर्वक लिहून वाचलेल्या निबंधांना यात स्थान मिळे. केव्हा दीर्घकथा, केव्हा नाटक हीही क्रमशः येत. या मासिकाच्या आधारानेच विनायक जनार्दन कीर्तने, महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर, भास्कर दामोदर पाळंदे, गोविंद नारायण माडगांवकर इत्यादी लेखकांनी लेखनक्षेत्रामध्ये पदन्यास केला. पुढे १८६७-मध्ये 'विविधज्ञान-विस्तार' मासिक निघेपर्यंत सतरा वर्षे जवळजवळ नियमितपणे ज्ञानप्रसाराचे काम त्याने केले, ही गोष्ट त्या कालाच्या मानाने कौतुकास्पद म्हणावी लागते. संपादक म्हणून कोणा एकाचे नाव देण्याची प्रथा त्या वेळी नव्हती, असे दिसते; तथापि या ज्ञानयज्ञाचे बरेचसे श्रेय गोविंद नारायण माडगांवकर यांना देणे उचित होईल.

## त्रैमासिक ज्ञानदर्शन

आपल्या वृत्तपत्रीय कार्याला जोडूनच 'ज्ञानदर्शन' या नावाचे एक त्रैमासिक भाऊ महाजन यांनी इ. स. १८५४-मध्ये काढिले आणि तीन वर्षेपर्यंत चालविले. ते काढण्याचा हेतू पुढील शब्दांत सांगण्यात आला आहे. "मराठी भाषेत विद्यांच्या विषयांवर व त्यांत विशेषेकरून पश्चिम देशांतील विद्यांच्या विषयांवर फारच थोडे ग्रंथ आहेत व कित्येक विषयांवर तर अजून मुळींच जाहाले नाहींत; तेव्हां अशा विषयांची लोकांस माहितगारी होण्याकरितां कांहींतरी साधन उपस्थित केलें असतां त्यापासून उपयोग पडेल असे मनांत आणून, हे त्रैमासिक पुस्तक काढण्याची योजना केली आहे." वृत्तपत्रीय चटकदार लेखन करण्याची चटक लागलेल्या भाऊ महाजनांचे लक्ष प्रौढ, ज्ञानप्रधान वाङ्मयनिर्मितीकडेही होते, आणि स्वधर्म-स्वभाषा यांचा रास्त

अभिमान बाळगूनही पाश्चात्त्य विद्यांची साधना आपण केली पाहिजे, अशी त्यांची दृष्टी असे, असा याचा अर्थ होता. 'प्रभाकर', 'धूमकेतु', 'ज्ञानदर्शन' अशी तीन नियतकालिके भाऊ महाजन हे एका काळी चालवीत होते, हे लक्षात घेतल्यास त्यांच्या एतद्विषयक कर्तृत्वाची कल्पना येईल. अशा या पुरुषाने १८६२-मध्ये मुंबई सोडून नागपुरास प्रयाण केल्यावर या क्षेत्रात काही कामगिरी केल्याची माहिती उपलब्ध होऊ नये, किंवा मुळातच काही केली नसावी, ही गोष्ट आश्चर्यजनक आहे.

## पुणे-पाठशाळापत्रक

यानंतरचे लक्षात घेण्याजोगे मासिक म्हणजे 'पुणे-पाठशाळापत्रक' हे होय. आरंभी हे एका शिक्षणसंस्थेचे नियतकालिक म्हणून निघत असे. पुढे ते 'शाळापत्रक' या नावानेच निघू लागले. हे इ. स. १८६१ साली निघाले. याचे पहिले संपादक श्रीकृष्णशास्त्री तळेकर हे होते. पहिली तीनचार वर्षे यात मुख्यतः शिक्षणविषयक लेख येत. मराठी शाळांतून भाषा, व्याकरण व इतर विषय कसे शिकवावे, शिक्षकांच्या अध्यापनातील अडचणी कोणत्या, ठिकठिकाणच्या शाळामास्तरांनी पाठविलेली आपापल्या शाळांची वृत्ते, शिक्षकांच्या नेमणुका, त्यांच्या तक्रारी, सरकारी शिक्षणाधिकाऱ्यांकडून आलेल्या वार्ता व निवेदने इत्यादी मजकूरच प्रथम त्यात येई. पुढे त्याचे क्षेत्र मराठी भाषा आणि वाङ्मय असे व्यापक स्वरूपाचे झाले. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे व्याकरणविषयक लेख त्यामधून जसे क्रमशः आले, तसे 'रासेलस' या डॉ. जॉन्सनच्या इंग्रजी तात्त्विक कादंबरीचे भाषांतरही आले. नवीन पुस्तकाची परीक्षणे हा आणखी एक विशेष त्या मासिकाचा होता. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपले लेखनाचे धडे या मासिकात प्रथम गिरविले. त्यांचे 'संस्कृतकविपंचक' शालापत्रकातच प्रसिद्ध झाले. शेवटली चार वर्षे 'शालापत्रक' विष्णुशास्त्र्यांनीच चालविले होते त्याआधी त्यांचे वडील कृष्णशास्त्री आणि त्याआधी केरोपंत छत्रे अशी विद्वान मंडळी या मासिकास संपादक म्हणून लाभली असल्याने ते त्या कालातील एक अव्वल दर्जाचे मासिक म्हणून मान्यता पावले होते. अखेरीस 'सर्वसंग्रह' या जुन्या मराठी काव्याच्या प्रकाशनास वाहिलेल्या मासिकास मिळणारा आश्रय काढून घेतल्यामुळे विष्णुशास्त्र्यांनी सरकारी शाळाखात्यावर जी कडक टीका केली, त्यामुळे त्या खात्याचा रोष होऊन १८७५-मध्ये ते बंद पडले. दरम्यान विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी मराठी भाषा आणि वाङ्मय यांस वाहिलेली 'निबंधमाला' काढिलेली असल्याने शालापत्रकाचेच कार्य पुढे चालू राहिले.

## विविधज्ञानविस्तार

१८६७-च्या सुमारास 'ज्ञानप्रसारक' बंद पडला आणि त्याची पताका 'विविधज्ञानविस्तारा'ने उचलिली. नावावरून त्यांची उद्दिष्टे सारखीच होती, हे स्पष्ट होते. गेल्या शतकात निघालेल्या मासिकात हेच सर्वांत दीर्घायुषी ठरले. त्याची धुरा पहिली

पाच-सात वर्षे रामचंद्र भिकाजी गुंजीकर[1] यांनी वाहिली. संपादक म्हणून त्यांचे नाव मात्र त्या मासिकावर घालण्यात येत नसे. त्यात येणाऱ्या विषयांबद्दल संपादकांची कल्पना काय होती, हे आपण याआधीच पाहिले आहे. 'विस्तारा'च्या पहिल्या अंकाच्या मुखपृष्ठावर ते मासिक 'कुलस्त्रिया व गृहस्थ' यांच्याकरिता असल्याचा उल्लेख आहे. आरंभीच्या सात वर्षांत त्यांत गुंजीकरांचे पुष्कळच लेखन प्रसिद्ध झाले आहे. त्यात त्यांचे गणित, ज्योतिष, आरोग्य या विषयांवरील लेख, स्त्रिया, स्त्रीधर्म, कुटुंबशिक्षा इत्यादींविषयीचे व नीत्युपदेशपर लेख, नाटककाव्यकादंबरी या ललितवाङ्मयग्रंथांची परीक्षणे व इतर ग्रंथांवरील अभिप्राय, मोचनगड ही ऐतिहासिक कादंबरी, शाकुंतल व रोमियो-ज्यूलियट या नाटकांची भाषांतरे इत्यादी त्यांचे लेखन 'विस्तारा'मधूनच प्रसिद्ध झाले आहे. लघुलिपी, काव्यविचार, बंगाली व्याकरण, काही मराठी व्याकरणविषयक विचार हे विषयही पहिल्या ५–७ वर्षांतच येऊन गेले. गुंजीकरांच्या लेखनामुळे त्याला आरंभापासूनच प्रतिष्ठा लाभली व गुंजीकरांनी 'विस्तार' सोडल्यावरही ती कायम राहिली. गुंजीकरांनी आपला मराठी भाषाविषयक अभिमान आपल्या लेखांत पुरेपूर प्रकट केला आहे. स्वभाषाभिमानाचा पोत चिपळूणकरांच्याही आधीपासून 'विस्तारा'मध्ये गुंजीकरांनी पाजळला होता, असे दिसते. प्रस्तुत कालखंडातील 'विस्तारा'ची कामगिरी अल्पकालीन असली, तरी तिने पुढील मासिक पुस्तकांवर आपल्या कामगिरीचा ठसा ठेविला, यात काही शंका नाही.

### दंभहारक

'विस्तारा'नंतर आणि निबंधमालेपूर्वी निघालेल्या 'दंभहारका'चा उल्लेख येथे करावयास पाहिजे. त्याच्या नावावरून त्याचे उद्दिष्ट प्रकट होत आहे. त्यामुळे 'विस्तारा'च्या मानाने त्यामध्ये अप्रिय व कटू लेखन येणे ही गोष्ट अपरिहार्य होती.

---

१. रामचंद्र भिकाजी गुंजीकर, मूळ गाव जांबोटी (जि. बेळगाव), जन्म १८४३, मराठी शिक्षण जांबोटी, इंग्रजी शिक्षण बेळगाव, नंतर मुंबई, १८६४ प्रवेश-परीक्षा, १८६६-मध्ये एल्फिन्स्टन हायस्कुलांत शिक्षक, १८८८-पर्यंत मुंबईत नोकरी, १८८८ ते १८९२ हुबळी येथील शाळेत हेड मास्तर, १८९२-मध्ये अॅ. डे. ए. इन्स्पेक्टर म्हणून नेमणूक, १८९८-मध्ये सेनानिवृत्त, मृत्यु १९०१. वाङ्मयीन कामगिरी: १८६७ साली 'विविधज्ञानविस्तार' हे मासिक काढले. पुष्कळसे संपादनकार्य गुजीकर करीत; सात वर्षांनी 'विस्तारा'चा संबंध सोडला. 'दंभहारक' मासिक १८७१-मध्ये काढले, ते १८७५-पर्यंत चालले. त्यात बरेच लेखन; विविध प्रकारचे स्फुट लेखन; पुस्तके — (१) मोचनगड (ऐतिहासिक कादंबरी), (२) (गोदावरी) अपूर्ण कादंबरी, (३) अभिज्ञानशाकुंतल (भाषांतर), (४) रोमकेतु-विजया (रोमियो आणि ज्यूलियट याचे रूपांतर), (५) विद्यावृद्धीच्या कामीं आमची अनास्था (व्याख्यान), (६) सरस्वतीमंडळ, (७) भ्रमनिरास, (८) सौभाग्यरत्नमाला, (९) कौमुदीमहोत्साह (परब यांच्या सहकार्याने), (१०) रामचंद्रिका, (११) सुबोधचंद्रिका (भगवद्गीता) (१२) कन्नडपरिज्ञान.

याही मासिकात गुंजीकर लेखन करीत. खिस्तीधर्मविरोधी आणि स्वभाषाभिमान व्यक्त करणारे लेखन बहुधा त्यांचेच असावे. 'विस्तारा'चे दुसरे लेखक हरि महादेव पंडित हेही दंभहारकात लिहीत व अगदी गुंजीकरांच्या पद्धतीने लिहीत. विविधज्ञानविस्ताराच्या प्रौढ व भारदस्त स्वरूपाशी न जुळणारे, परंतु परकीयांचे हल्ले 'यथा यक्षः तथा बलिः' या न्यायाने परतविण्याकरिता आवश्यक असणारे खरमरीत लेखन करण्याकरिता दंभहारक हे मासिक काढले असावे, असे दिसते. चिपळूणकरांनी आपल्या निबंधमालेच्या पहिल्याच अंकामध्ये दंभहारकाविषयी प्रकट केलेला अभिप्राय यापूर्वी पाहिलेलाच आहे. त्या मालेवरील 'दंभहारका'चा अभिप्राय पाहिल्यास त्यातील लेखनाच्या स्वरूपाची कल्पना येण्यासारखी आहे. 'निबंधमाले'विषयी 'दंभहारक' म्हणतो, "भाषा शुद्ध व सरळ असली, तरी किताबासहित कर्त्याचे नाव प्रसिद्ध करण्याइतकी प्रौढता व रसिकता तींत नसून विचाराविषयी धरसोड व मळमळीतपणा फारच दिसून येतो. कसेंही असो. पण आलीकडच्या किताबी विद्वानांस देशभाषेचा स्वप्नांतही विटाळ सोसत नाही, अशा दुष्काळांत हे चिपळूणकर बी. ए. स्वभाषेचा जीर्णोद्धार करण्यास पुढे सरसावले आहेत. केवढा हा चमत्कार." निबंधमालेस मळमळीत म्हणणारी रुची किती तिखट असेल, याची काहीशी कल्पना आपल्यास यावरून येईल. निबंधमालेनेही पुढे 'दंभहारका'चे कंकण बांधून लेखन केले, हा 'दंभहारका'चा विजय म्हणावा लागेल. 'दंभहारका'ने 'माले'ची केलेली स्तुती लक्षात घेता निबंधमाला ही 'दंभहारका'चेच धोरण पुढे चालविणारी ठरली, असे दिसते. 'दंभहारका'ने 'माले'ची मुक्तकंठाने केलेली स्तुती आणि तिजविषयीची अपेक्षा पुढील उताऱ्यावरून स्पष्टपणे कळून येते.

"मालेस आम्ही सर्व मासिक पुस्तकांत पहिली जागा देतों. अलीकडच्या किताबी विद्वानांत आणि खुशामती मन्वंतरांत मालेसारखे खरे स्वदेशाभिमानी, स्पष्टवादी आणि निःस्पृह पुस्तक निघेल, असे कोणाच्या स्वप्नींदेखील नव्हते, कारण तिला देखील पहिल्याने दंभहारकाचा स्पष्टवक्तेपणा अगदीं रुचला नाही; पण अलिकडेस तर तिणे थट्टेची व दूषणीय वाग्बाणांची ज्यांच्यात्यांच्यावर अगदीं रेलचेल करून सोडली आहे. याहूनही चांगल्या व वाजवी प्रकाराविषयीं दंभहारकास तिणे जे दूषण दिले होते, ते तिच्याच अलीकडील पांचसात अंकांवरून अगदीं अल्प विचाराचे होते, असे आतां पदरांत घेणे तीस भाग पडेल. असो. वाजवी रीतीने पाहिले तर स्वतंत्र गोष्टींचे विवेचन आणि लोककल्याणाच्या संबंधे बरेवाईट जगास कळविणे म्हटले म्हणजे असा वाचालतेचा प्रसंग कोणावरही आलाच पाहिजे. लोक सुधारण्याच्या प्रामाणिक व खऱ्या उद्देशाने जे काम आम्हीं हातीं धरले आहे त्यासही साह्य न मिळतां सर्वत्र दूषणांचा भडिमार चालत असे. तरीही आम्हीं अवसान न सोडतां तसेच चालल्याने लवकरच परमेश्वराने आमची पाठ राखण्यास आम्हांहून विशेष गुणी मालेस निर्माण केले आणि कित्येक गोष्टींत तिचे धैर्य, सत्यप्रीति, आणि निःस्पृहता हीं उघड झालीं हे पाहून आम्हांला आनंद झाला... निराश्रयामुळें कधीं दंभहारकास राम म्हणणे भाग

पडल्यास खऱ्याचें दास्य व खोट्याची वस्तादगिरी पतकरून माला त्याचाही भाग चालवील असा आता आम्हांला पूर्ण भरंवसा आहे." (दंभहारक, वर्ष ५, पृ. ११३–११५) 'दंभहारका'वर राम म्हणण्याचा प्रसंग दुर्दैवाने लवकरच आला, पण 'निबंधमाले'ने त्याने अंगीकारिलेले कार्य पुढे पाच वर्षे चालविले.

ज्ञानसंग्रह, ज्ञानप्रसार आणि लोकसुधारणा या हेतूंनी चालविलेल्या मासिकांखेरीज काही मर्यादित उद्देशाने काढिलेल्या मासिकांचा उल्लेख या प्रकरणाच्या प्रास्ताविकात केला आहेच. त्यातील 'सर्वसंग्रह' या मासिकाचे कार्य विशेष लक्षात घेण्यासारखे झाले. जुनी मराठी कविता छापून प्रसिद्ध करण्याचे पूर्वी १८४०-मध्ये ज्ञानचंद्रोदयाच्याद्वारे सुरू होऊन थांबलेले काम या मासिकाने १८६० ते १८६७-अखेर चालविले. हे काम माधव चंद्रोबा डुकले यांनी मुख्यतः अंगावर घेतले होते. त्यांचे बंधू डॉ. अनंत चंद्रोबा यांचे त्यांना साहाय्य असले, तरी खरे महत्त्वाचे साहाय्य परशुरामपंततात्या गोडबोले यांचे होते. मराठी कवितेच्या छपाईत विरामचिन्हांचा उपयोग या प्रयत्नात प्रथमच झाला. या मासिकामध्ये मुख्यतः मोरोपंतांचे आर्याभारत, मंत्रभागवत, ब्रह्मोत्तरखंड, मदालसोपाख्यान, सप्तशती, भगवद्गीता (अनुवाद) इत्यादी काव्ये, मुक्तेश्वरी भारताची तीन पर्वे अशी कविता प्रसिद्ध झाली. प्राचीन मराठी कवितेचा परिचय व तिचा अभ्यास करण्याची प्रवृत्ती या दोन गोष्टी या मासिकाने साधल्या. त्याला प्रथम सरकारी मदत असे; परंतु ती पुढे बंद पडली. त्यानंतरही हे कार्य पुढे चालविण्याचा माधव चंद्रोबा यांचा संकल्प सिद्धीस गेला नाही व ते मासिक बंद पडले. पुढे 'दंभहारका'मध्ये सोहिरोबा वगैरे कवींची कविता क्रमशः प्रसिद्ध होई; परंतु त्या मासिकाबरोबर तोही प्रयत्न तेथे थांबला. प्राचीन मराठी कवितेबद्दल निर्माण झालेली आस्था मागे राहिली.

## समारोप

प्रस्तुत कालखंडातील नियतकालिकांच्या कार्याकडे केवळ वाङ्मयीन दृष्टीने पाहून चालणार नाही. त्यांचे मुख्य उद्दिष्ट आणि कार्य ज्ञानप्रसाराचे होते; साहित्य-निर्मितीचे नव्हते. हे ज्ञान ऐहिक, जीवनोपयोगी असावे, या गोष्टीवर विशेष कटाक्ष होता. त्यामुळे वैचारिकदृष्ट्या उच्च असे तत्त्वज्ञानस्वरूपाचे वाङ्मय निर्माण होत नव्हते. आपल्याकडे ते भरपूर आहे, आता जरूर आहे ती व्यवहारोपयोगी ज्ञानाची, अशी दृष्टी दिसते. या ज्ञानाचा पूर्वी अभाव असल्याने ते सारे दुसरीकडून, म्हणजे इंग्रजीतून मराठीमध्ये, आणण्याचा प्रकारच रूढ झाला. त्याची पातळीही प्राथमिक दर्जाची रहावी, हे स्वाभाविक होते. कारण त्याला इकडची अशी काही परंपरा नव्हती. मराठीमध्ये शास्त्रीय ज्ञान, म्हणजेच विज्ञान, आणण्याच्या या प्रयत्नात विज्ञानाची परिभाषा निर्माण करण्याचे प्रयत्न झाले. परंतु पुढे शिक्षणाचे माध्यम इंग्रजी झाल्यामुळे या काळाच्या परिभाषेस रूढ होण्यास वाव मिळाला नाही; आणि आज सारे पुन्हा नव्याने करण्याचा प्रसंग आला आहे. ज्ञानप्रसार किंवा ज्ञानवितरण

हेच ध्येय असल्याने यातील लेखनशैलीस लालित्याचा स्पर्श फारसा झाला नाही. पुष्कळ वेळा ती रूक्ष, निरलंकृत अशीच राहिली. 'प्रभाकरा'सारखे वृत्तपत्र सोडल्यास असे शैलीचे गुण वृत्तपत्रीय लेखनातही कमी प्रमाणातच आढळतात. मात्र त्यातून समाजदर्शन बरेच झाले. म्हणून या कालखडातील वृत्तपत्रीय वाङ्मयाचे महत्त्व साहित्यापेक्षा समाजदर्शनाच्या दृष्टीनेच अधिक आहे. त्यात वाङ्मयविचार फारच थोडा होता आणि वाङ्मयाभिरुची संपन्न करण्याच्या दृष्टीने त्यांचा तादृश उपयोग झाला नाही. ही दृष्टी अखेरीस शालापत्रक आणि विविधज्ञानविस्तार यांच्यामध्ये व्यक्त होऊ लागली, व त्याचाच परिणाम म्हणून भाषा आणि वाङ्मय यांच्या अभिवृद्धीकरिता निबंधमाला निघाली. तिची भूमिका तयार करण्याचे कार्य प्रस्तुत कालखंडातील नियतकालिक वाङ्मयाने केले.

## उपयुक्त संदर्भवाङ्मय


( १ ) एक शतकापूर्वींची मराठी वृत्तपत्रे, लेखक : त्र्यं. शं शेजवलकर, किर्लोस्कर, नोव्हेंबर, १९३७.

( २ ) मराठी नियतकालिकांचा इतिहास, लेखक : रामचंद्र गोविंद कानडे, १९३८.

( ३ ) रामचद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख, खंड पहिला – प्रस्तावना, अ. का. प्रियोळकर, १९४२.

( ४ ) बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर, शताब्दी-स्मारक-ग्रंथ, खंड १ ते ३. लेखक : गणेश गंगाधर जांभेकर, १९५०.

( ५ ) वृत्तपत्रांचा इतिहास खंड १ ( १७८० ते १८८० ), लेखक : वि. कृ. जोशी व रा. के. लेले, १९५१.

( ६ ) मराठी मासिकांची शंभरी, लेखक : बा. द. सातोस्कर, अमृत, १९५८–५९.

( ७ ) मराठी नियतकालिकांची सूची, सं. दाते-काळे-बर्वे, १९६९.

प्रकरण सातवे

# कथा-कादंबरी

## एक

### कथा-वाङ्मयाचा आरंभ

अर्वाचीन मराठीतील कथारचनेचा आरंभ तंजावर येथील सर्फोजी राजे यांनी सक्खन पंडिताकरवी इ. स. १८०६-साली केलेल्या 'बालबोध-मुक्तावलि' या इसापनीतीच्या भाषांतराने झाला. सामान्यतः कथा-वाङ्मयाची गोडी समाजातील सर्व थरांना सर्व काळी असतेच; यास्तव या रचनेने सूचित होणाऱ्या विशेषांचा अन्वयार्थ नीटपणे समजावून घेतला पाहिजे. 'प्राचीन' आणि 'अर्वाचीन' या विशेषणांनी मराठीत केवल कालिक-भेद सूचित होत नाही. 'प्राचीन' वाङ्मय म्हणजे मुद्रणपूर्व कालातील वाङ्मय आणि 'अर्वाचीन' वाङ्मय म्हणजे मुद्रणाच्या कालातील वाङ्मय होय. म्हणूनच 'प्राचीन' वाङ्मय हे बहुतांशी पाठांतराच्या आणि तत्संबद्ध प्रसाराच्या सोयीसाठी पद्यात लिहिलेले आढळते. जे एरवी गद्यात सांगता आले असते, सांगणे सुलभ आणि सोयीचे झाले असते, तेही मुद्रणपूर्व कालात पद्यात बांधिले गेले. म्हणूनच प्राचीन वाङ्मयात 'कथा-रचना' असूनही तिचा मागोवा हा अर्वाचीन कथारचनेच्या विचारात फारसा आवश्यक ठरत नाही. रचना-विशेषाच्या दृष्टीने ही बाब संपूर्णतया सत्य असली, तरी कथावाङ्मयाच्या अंतरंगाच्या दृष्टीने मात्र विवाद्य ठरेल. कारण 'प्राचीन' मराठीतील काय, किंवा अन्य भाषांतील काय, कथावाङ्मयाचा उद्गम झाला, तो धार्मिक वा नैतिक शिकवणुकीचे प्रभावी साधन म्हणून. अर्वाचीन मराठीतील कथावाङ्मयाचा उगमही अशाच स्वरूपाच्या हेतूशी निगडित झालेला आहे, हे पुढील विवेचनात आढळून येईल. आणखी एक विशेष म्हणजे सक्खनपंडिताची

'बालबोध-मुक्तावलि' महाराष्ट्रापासून दूर असलेल्या तंजावरी प्रकटली; एवढेच नव्हे, तर सुरुवातीचे आणखी चार कथाग्रंथही पंडित वैजनाथशर्मांनी कलकत्त्याजवळील सेरामपूर मिशनकरवी प्रसिद्ध केले. अर्वाचीन मराठी कथावाङ्मयाचा हा प्रथमाविष्कार महाराष्ट्राबाहेर दक्षिणेत आणि उत्तरपूर्वेस व्हावा, याचा अर्थ स्पष्ट आहे. मुद्रणाच्या सोयी जेथे प्रथम उपलब्ध झाल्या, तेथेच अर्वाचीन मराठीचा जन्म झाला. म्हणजेच मुद्रणसुलभता हा अर्वाचीन वाङ्मयाच्या स्वरूपाचा आणि निर्मितीचा वादातीत घटक आहे. सक्खनपंडित हा सर्फोजी राजाचा आश्रित, तर वैजनाथपंडित हा सेरामपूर येथील मिशनच्या शैक्षणिक कार्यातील सहायक ही अंगेही लक्षणीय आहेत. अर्वाचीन मराठीतील सुरुवातीची वाङ्मनिर्मिती ही कोणाच्या तरी आश्रयाने झालेली आहे, हे त्या वाङ्मयाच्या स्वरूप-दर्शनात लक्षात ठेवावयास हवे. मिशनऱ्यांचा उघड वा अप्रत्यक्ष हेतू धर्म-प्रसाराचाच होता, आणि सर्फोजीसारखे संस्थानिक-जहागीरदार हेही इंग्रजांचे अधिराज्य मानूनच आपले अस्तित्व टिकवू शकत होते, हे ध्यानी घेता अव्वल इंग्रजीतील सुरुवातीची रचना ही स्थूलमानाने राजाश्रयी वा राजधर्माश्रयी होती, हे लक्षात येईल.

## बोध हा हेतू

राजाश्रयी आणि राजधर्माश्रयी अशा लोकांच्या प्रयत्नानेच अव्वल इंग्रजीतील वाङ्मयनिर्मितीचा आरंभ झाला, याची अनेक उदाहरणे आपल्याला सापडू शकतात. उपरोक्त वैजनाथशर्मा हा फोर्ट विल्यम कॉलेजात शास्त्री होता, त्याचप्रमाणे मुंबई प्रांतातही बापू छत्रे, हरि केशवजी यांच्यासारखी एतद्देशीय मंडळी किंवा कॅप्टन जर्व्हिस कॅण्डी यांच्यासारखी इंग्रज मंडळी ही शिक्षणक्षेत्रातील नोकर होती. त्याचप्रमाणे मिसेस फरार, बाबा पदमनजी, रे. नारायण शेषाद्रि यांच्यासारख्या व्यक्ती किंवा बुक अँड ट्रॅक्ट सोसायटीसारख्या संस्था या मिशनरी किंवा खिस्ती धर्माच्या प्रसाराला वाहिलेल्या होत्या. आरंभीच्या वाङ्मय-निर्मात्यांच्या या विशिष्ट स्वरूपामुळे त्यांनी निर्माण केलेल्या वाङ्मयाचे स्वरूप हेही अपरिहार्यपणे, पण स्वच्छ रीतीने ठरून गेले. शिक्षणक्षेत्राशी संबद्ध व्यक्तींचा वा संस्थांचा 'बालबोध' हेतू हा आपल्या विद्यार्थ्यांच्या मनावर हेतुपूर्वक काही नीतिबोधाचा संस्कार करण्याचा, तर मिशनरी प्रसारकांचा हेतू सामान्य नीतीच्या आश्रयाने वा मिषाने आपल्या धार्मिक उद्दिष्टांचा पाठपुरावा करण्याचा होता. साहजिकच या कालातील निबंधात्मक किंवा वैचारिक वाङ्मयच नव्हे, तर कथात्मक वाङ्मय हेही मूलतः ढोबळ मानाने बोधवादाकडे झुकल्या स्वरूपाचे राहिले. अशा शालेय वा बोधयुक्त निर्मितीची बूज वाङ्मयीन दृष्टीने कशी करावयाची आणि का करावयाची, हे प्रश्न क्वचित बुचकळ्यात पाडणारे असले, तरी वाङ्मयेतिहासातील अर्वाचीन कथेचे प्रारंभीचे स्वरूप समजून घेण्याच्या दृष्टीने या रचनेकडे शक्य तेवढे तपशीलवार आणि सहानुभूतीने पाहणे आवश्यक आहे. कालिक अनुसंधानाने पाहताना या संदर्भात आणखी एक मुद्दा सहजी ध्यानात येण्यासारखा

आहे. तो हा की, अव्वल इंग्रजीच्या कालखंडात स्थूलमानाने इ. स. १८५७-पर्यंत शिक्षणाचे माध्यम मराठी होते, मराठीत ग्रंथरचना करण्याला विशेष प्रोत्साहन देण्याकडे सरकार किंवा सरकारी प्रेरणेच्या शिक्षामंडळ्या यांचा कल होता, तोपर्यंत शालेय किंवा बालबोध रचनेवरच लेखकांचा भर होता. ललितवाङ्मयाची वेगळी सुरुवात झाली, ती सरकारी धोरणात बदल झाल्यावर, मुंबई विद्यापीठाची स्थापना झाल्यानंतरच्या काळात; आणि जसजसे हे प्रयत्न अधिकाधिक स्वावलंबी आणि स्वयंप्रेरित होऊ लागले, तसतसे वाङ्मयाचे परपुष्ट आणि आश्रयार्थी स्वरूप क्रमाक्रमाने कमी कमी होत जाऊन, त्याला स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व आणि स्थान मिळू लागले.

# दोन

## बोधकथा

### आरंभीचे ग्रंथपंचक

महाराष्ट्राबाहेर निर्माण झालेल्या पहिल्या पाच कथात्मक ग्रंथांपैकी इसापनीतीचे मराठी भाषांतर 'बालबोधमुक्तावलि' (१८०६) हा ग्रंथ कालानुक्रमाने पहिला होय. तंजावरच्या सर्फोजीराजांना डेनिश मिशनरी रे. श्वार्त्झ यांच्याकडून शिक्षण मिळाले होते. त्यांनी छापखाना काढून विविध ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांपैकी सक्खनपंडिताकरवी तयार करण्यात आलेला 'बालबोधमुक्तावलि' हा ग्रंथ होय. सुरुवातीच्या अनेक ग्रंथां-प्रमाणे हा शिळाछापावर मोडीत छापण्यात आला होता, यापेक्षा त्याच्याविषयी अधिक माहिती मिळत नाही उरलेले चार ग्रंथ कलकत्त्याच्या फोर्ट मिशन कॉलेजातील शास्त्री वैजनाथपंडित यांनी तयार केले व ते सेरामपूर मिशनच्या छापखान्यात छापून प्रसिद्ध करण्यात आले. या कामी वैजनाथपंडितांना तेथील मिशनरी डॉ. विल्यम केरी यांचे उत्तेजन होते. वैजनाथपंडित हा मूळचा नागपूरकर भोसल्यांच्या कलकत्ता येथील वकिलाचा आश्रित. संस्कृत पंडित म्हणून डॉ. केरीबरोबर फोर्ट विल्यम कॉलेजात काम करीत असतानाच वैजनाथपंडितांनी मराठीत रचना केली. त्यांच्या कथाग्रंथांत 'सिंहासनबत्तिशी' (१८२४), 'पंचतंत्र' (१८१५), 'हितोपदेश' (१८१५) व 'राजा प्रतापादित्याचे चरित्र' (१८१६) यांचा समावेश होतो. हे सर्व ग्रंथ कमी-अधिक प्रमाणात भाषांतरित आहेत. त्यांपैकी पंचतंत्र व हितोपदेश हे उघडपणेच संस्कृत अभ्यासकांच्या प्रारंभीच्या वाचनातील ग्रंथ होत. 'सिंहासनबत्तिशी' हा पहिला ग्रंथ 'बालबोधमुक्तावली'प्रमाणेच मोडीत छापिलेला आहे. त्यातील वाक्य-रचनेचा एक नमुना पुढीलप्रमाणे आहेः—

"अट्ठाविसावे पुतळीनें म्हट्ल अहो भोजरज् असा साहसी ज राजा असे तो या सिंहासनावर् बसाया योग्य. भोजराज् हे गोष्ट अयकून् त्या दिवसीं निघून राहेला."

या वाक्यांतील शब्दांतील अन्त्य 'अ' काही ठिकाणी उच्चाराप्रमाणे अर्धा ठेवण्याची प्रवृत्ती, त्याचप्रमाणे 'ऐकून' या आजच्या रूढ रूपाच्या ठिकाणी 'अयकून्' लिहिण्याची पद्धतीही लक्षात घेण्याजोगी आहे. 'निघून राहेला' ही घाटणी नागपूरकडील वळण सुचविते. यांपैकी शेवटचा प्रयोग फक्त बदलून केलेलो रचना याच ग्रंथाच्या इ. स. १८२४-मधील 'कूरियर'-आवृत्तीत आढळते. याच संदर्भात हे सांगावयास हरकत नाही की, सुरवातीस एकाच ग्रंथाची अनेक भाषांतरे किंवा आवृत्त्या प्रकाशित झालेल्या आढळतात. त्यांपैकी 'सिंहासनबत्तिशी' हा एक प्रमुख कथाग्रंथ असून त्याच्या अव्वल इंग्रजीत १८१४, १८२४, १८३४, १८५५, १८६१, १८७५ सालच्या अशा विविध प्रकाशकांच्या सहा आवृत्त्या प्रसिद्ध झालेल्या असून त्यांत किरकोळ शाब्दिक किंवा भाषिक बदलांच्या पलीकडे विशेष फरक आढळत नाहीत. पंचतंत्र, हितोपदेश यांच्याही वैजनाथपंडिताशिवाय इतर कांही आवृत्त्या नंतरच्या काळात प्रसिद्ध झाल्या आहेत. भाषेच्या दृष्टीने गद्यलेखनात सुरुवातीला जाणवणारे व पुढे काही काळ चालू असलेले विशेष ध्यानात यावेत, म्हणून 'सिंहासनबत्तिशी'च्या इ. स. १८६१-च्या आवृत्तीतील एक गोष्ट पुढे दिली आहे —

"एके दिवशीं विक्रमराजा अरण्यांत शिकारीस गेला होता, तेथे यम आणि वरुण हे देव त्याचे सत्त्व पाहावयास आले; यम वाघाचे रूप धरून पाठीमागे लागला, आणि वरुण रोडक्या गाईचे रूप धरून भयाने घाबरा घाबरा राजाजवळ धांवत आला आणि म्हणाला, राजा! मी तुला शरण आल्ये तर तूं माझें रक्षण कर. ते ऐकून विक्रमास दया आली, आणि तरवार घेऊन त्या गाईभोवतीं फिरूं लागला. वाघ गाईवर राहून राहून झडपा मारितो आहे, अशा संधींत मोठा पर्जन्य येऊन बहुत चिखल झाला त्यांत ती गाई फसली; तेव्हां वाघ भूमीवर पुच्छ आपटून मोठा भयंकर शब्द करीत घटकेघटकेस चवताळून तिजवर येत असे, आणि विक्रमराजा त्याचे शस्त्राने निवारण करीत असे. याप्रमाणे राजाने पावसांत उभा राहून सर्व रात्र काढली; प्रातःकाळ होतांच यम आणि वरुण हे दोघेही देव प्रगट होऊन बोलले, राजा! आम्ही देव, तुझें सत्त्व पाहावयास आलो होतों. तर तुझें सत्त्व पाहून प्रसन्न झालो, आतां तुझ्या इच्छेस येईल तो वर माग. राजा म्हणाला तुमच्या प्रसादाने मला सर्व आहे, उणे कांहीं नाहीं. तर हे मागतो कीं, आपली कृपा असावी. ते ऐकूण त्याणी स्वर्गींची कामधेनु दिल्ही, ती घेऊन राजा उज्जनीस येत असतां मार्गी एका दरिद्री ब्राह्मणाने मागीतली, तेव्हां ती कामधेनु विक्रम राजा त्या ब्राह्मणास देता झाला; अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवसीं सिंहासनाजवळ आला तेव्हां सुलोचना एकुणतिसावी पुतळी बोलली हे भोजराजा मीही एक कथा सांगत्ये ती ऐक."

**बाळमित्र**

इसापनीतीचे आणखी एक भाषांतर 'इसपनीतिकथा' (१८२८) या नावाने करणारे बापू छत्रे हे अव्वल इंग्रजीतील आरंभीचे एक शैलीदार कथालेखक होत.

प्रारंभी ते एंजिनीयरच्या ऑफिसात 'रैटर' होते. (बहुशः तेथूनच जार्व्हिसच्या द्वारा ते शिक्षणखात्याकडे वळले असावेत.) त्यांच्या इंग्रजीच्या ज्ञानाबद्दल रा. ब. दादोबा पांडुरंगप्रभृतींनी गौरवोद्गार काढिलेले आहेत. बापू छत्रे यांचे नाव मुख्यत्वेकरून लक्षात राहते, ते 'बाळमित्र' भाग १ या रूपांतरामुळे. बार्किन्सच्या 'चिल्ड्रन्स फ्रेंड' या मूळ फ्रेंच ग्रंथाचे इंग्रजीवरून सरकारी विद्याखात्याने दोन भागांत रूपांतर करवून घेतले. त्यांपैकी प्रस्तुत पहिला भाग हा छत्र्यांच्या नावावर असून दुसरा गेस्फोर्डच्या नावावर आहे. पहिल्या भागावर काही काळ छत्र्यांच्याबरोबर कॅण्डीचाही उल्लेख होत होता, असे दिसते. याची दुसरी आवृत्ती कोणा नारायण विश्वनाथशास्त्र्यांनी दुरुस्त केली होती, असे दिसते. तथापि इ. स. १८७८-च्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत श्रीकृष्णशास्त्री तळेकर यांनी असे नमूद केले आहे की, "एतद्देशीय वाचणारे लोक हे बाळमित्र भाग १ याच्या 'तपासून शुद्ध केलेल्या'पेक्षां जुन्या प्रती पसंत करितात, असे समजुतीत येऊन मी ... मूळग्रंथाची आवृत्ति काढिली आहे." मात्र स्वतः छत्रे यांनी आपल्या प्रस्तावनेच्या अखेरी "ह्या भाषेत आज दिवसपर्यंत व्याकरण आणि कोश हे कोणी केलेच नाहींत व विद्वान लोकांचे चित्त कधीं रमलेच नाहीं. ह्या भाषेंत शब्दसंग्रह थोडा असून भाषणाची शैलीही प्रौढ नाहीं. तशांत माझें भाषांतरही यथामति आहे." अशी नम्र भूमिका घेतली आहे.

'बाळमित्रा'ची भाषा आजच्या वाचकास खूपच वेगळी व जवळजवळ इंग्रजी (मिशनरी) वळणाची वाटेल – 'मुले जीं स्वतंत्र व्हावयास इच्छितात' यासारख्या मथळ्यांतूनही हे इंग्रजी वळण स्पष्ट होते. 'माझ्या लाडक्या मुला', 'तुला त्यांतले कारण सांगायास मला प्रयोजन नाहीं', 'मजकरितां तूं इतके दुःख पावलास ना', 'त्याची अब्रू झाकावी म्हणून ती फार खराबींत आली' यांसारखे शब्दप्रयोग व वाक्यरचना ही आज खटकतात हे खरे; पण अव्वल इंग्रजीच्या सुरवातीस बापूंसारखे 'फकीकीनें' लिहिणारे झाले नाहीत. सर्वसाधारणपणे भाषेत कोठेही संस्कृतप्रचुरता येऊ द्यावयाची नाही, या मे. कॅण्डीच्या धोरणाची छाप बापू छत्र्यांच्या रूपांतरावर दिसते. स्वरूपदृष्ट्या 'बाळमित्र' हा कथासंग्रह उपदेशपर लिखाणाच्या स्वरूपाचा असून त्यात अगदी चुटकेवजा गोष्टीपासून नाटुकल्यापर्यन्तचे सर्व प्रकार आहेत. 'थोराचे हृदय', 'बापाची समजी', 'तरवार', 'दाणे टिपणारी पोर', 'धाकटा किनऱ्या' इत्यादी एकांकी पण अनेक-प्रवेशी नाटुकली या संग्रहात आहेत. या नाटुकल्यांत नाट्य किंवा समरप्रसंग इत्यादींपेक्षा संवादरूप कथनाचाच भाग अधिक आहे. काही वेचे कथा आणि निबंध यांच्या सीमेवरील आहेत (उदा. वर्षांचे तीन मुख्य काल). सर्वांत लहान चुटकेवजा गोष्ट पुढीलप्रमाणे आहे —

## चिमणी

गोदावरीबाई म्हणून एक शाहाणी भली आणि मायाळू बायको होती. तिची वडील मुलगी गंगा म्हणून होती; तिनें एके दिवशीं कांहीं अन्याय केला, म्हणून आईनें

तीस ममतेनेंच धमकाविलें. ते आईचे मायाळू शब्द ऐकून आणि आपला अन्याय स्मरून गंगा रडूं लागली. ते पाहून तिची लहान बहीण चिमणी तीन वर्षांची होती तिनें हळूच माघारून येऊन एका हातानें परकराचा पदर घेऊन आपल्या बहिणीचीं आसवें पुसिलीं व दुसरे हाताने आपले तोंडांतला खडे साखरेचा तुकडा तिणे तिचे तोंडांत घातला.

मला असे वाटते कीं, कोणी चांगल्या चितार्‍याने याविषयी चित्र काढलें असतां काय वेधक होईल !

'बाळमित्रा'चा हेतूच मुलांस वळण लावण्यासाठी गोष्टीरूप उपदेश करण्याचा असल्यामुळे त्यातील गोष्टींच्या स्वरूपाविषयी अन्य अपेक्षा करिता येणार नाही. त्याचप्रमाणे अव्वल इंग्रजीच्या काळचे भाषाप्रयोग म्हणून रचनेचे स्वरूप समजावून घेता येते. परंतु रूपांतरात अनेक वेळा चांगले कौशल्य दाखवूनही काही उघड खिस्ती वळणाचा भाग छत्रे यांना टाळता आला नाही, असे दिसते. 'संताजी. . .दंडासारिखा भुईवर पडून आपणास इतका योग्य पुत्र दिला म्हणून देवाचा स्तव करूं लागला' यासारख्या वाक्यांत किंवा सामान्यतः परमेश्वरविषयक उल्लेख करण्याच्या पद्धतीतच हे वळण उघड दिसते. मूळ लेखकाची ही पद्धत असावी, असेही समर्थन सुसंगत होणार नाही. कारण छत्र्यांनी रूपातराच्या इतर भागांतून मराठी वातावरण आणण्याचा पुष्कळ चांगला प्रयत्न केला आहे.

बापू छत्र्यांच्या इसपनीतिकथांच्या रूपांतराची भाषा बाळमित्रापेक्षा अधिक बालबोध वळणाची वाटते. या कथांतील एक गमतीचा भाग असा की, कथांची तात्पर्ये ही मूळ कथांपेक्षाही अधिक विस्तृत झाली आहेत. दोन मांजरांच्या सुप्रसिद्ध गोष्टीचे तात्पर्य पुढीलप्रमाणे दिले आहे —

**तात्पर्य**—एखाद्या पदार्थाकरितां भांडून लोक न्यायाधीशाकडे निवाडा करावयास जातात. तेथे वकील असतात त्यांस ती सवड फावते. हे लोक भांडून थकतात, आणि वकिलास लाभ होतो. न्याय ह्या शब्दाचा अर्थ विचार करून पाहिला असतां केवळ नीतिच होय. तोच न्याय मनुष्यांच्या आपत्तीस कारण होतो. ह्या भरंवशाने ओढलेले किती एक भिकेस लागले. कितीकांनीं हट्टास पेटून कर्ज काढून आपणांस संकटांत पाडिले. त्यांच्या मनांत कीं आपल्याबरोबर दुसर्‍याचीही विपत्ती व्हावी. तर अशा लोकांनीं पैसा खर्च करून विपत्तींत पडावे, त्यापेक्षां चार शहाणे, भले मनुष्य घेऊन तंटा कां चुकवूं नये.

**गेस्फर्डकृत बाळमित्र – भाग २**

स. का. छत्र्यांच्या नावावर 'बाळमित्र' – भाग १ या ग्रंथाखेरीज 'इसपनीतिकथा' या ग्रंथाप्रमाणेच 'वेताळपंचविशी' हाही ग्रंथ आहे; पण तो दुर्मिळ आहे. छत्र्यांच्या बरोबरीने आठवणारा कथाकार म्हणजे ले. टी. गेस्फर्ड. याने 'बाळमित्र' भाग २ हा ग्रंथ तयार केला. पुढे तो मेजर कॅण्डीने सुधारला, असे

पुढील आवृत्त्यांवरून दिसते. बाळमित्र ( भाग २ ) या ग्रंथाच्या भाषेवरून तो कोणी केवळ परक्या मराठी भाषिकाने संपूर्णतया तयार केला असेल, असे वाटत नाही, इतका भाषेच्या बाबतीत छन्यांशी सांधेजोड साधणारा बाळमित्राचा दुसरा भाग ' मराठी ' वळणाचा उतरलेला आहे. पहिल्या भागाप्रमाणेच कथा-निबंधाकडे झुकणारा उपदेशात्मक बोधवादी चुटक्यांचा भाग आणि छोटी नाटुकली या दुसऱ्या भागातही आहेत. एकूण लहानमोठी एकवीस प्रकरणे या ग्रंथात आहेत. यांपैकी ' प्रतापशिंग ' या कथेतील त्याच नावाचा फलटणीचा सरदार हा जुगारीच्या नादाने सरकारी पैसा खर्च करतो, व नंतर त्याचा मित्र त्याची निर्भर्त्सना करून त्याला संकटातून वाचवितो अशी सरळ जुगाराच्या दुष्परिणामांची पण आनंदपर्यवसायी कथा सांगितली आहे; तर ' एक लहान हरणी, जिचे नाव यमुना ' या वळणाच्या मथळ्याच्या दोन-अंकी ' नाटकात ' गंगा आणि विनायक या बहीण-भावंडांची हरिणी चुकते, ती त्यांच्या परिचयाच्या लक्ष्मणाने चोरलेली असते, पण तो कबूल करीत नाही. नंतर लक्ष्मणाच्या हातून बापाची हिऱ्याची अंगठी हरवते, ती विनायकाला सापडते व तो ती अंगठी लक्ष्मणाला देतो. त्यावरून पश्चात्ताप होऊन लक्ष्मण हरिणी परत आणून देतो, असे कथानक रंगविले आहे. इतर काही कथांस पात्रांच्या नावांचेच मथळे आहेत, तर काही ठिकाणी स्पष्टपणे ' करनकरी स्वभावाचे वर्णन ', ' दुष्ट मुलगी ', ' लहान जुगारी ' असे विषय किंवा बोधदर्शक सरळ मथळे दिलेले आढळतात. शालेय विद्यार्थिवर्ग डोळ्यांपुढे ठेवूनच केलेली ही रूपांतरित रचना आहे, हे भाषेप्रमाणेच कथा-विषयांच्या स्वरूपावरूनही पुनःपुन्हा प्रत्ययास येते.

**हरि केशवजींचे यात्रिक-क्रमण**

जॉन बन्यनच्या ' पिल्ग्रिम्स प्रोग्रेस ' या धार्मिक रूपकवजा कथेचे भाषांतर हरि केशवजींनी इ. स. १८४१ साली ' यात्रिक-क्रमण ' या नावाने केले. या जाड शिळा-छाप ठशाच्या पावणेचारशे-पानी ग्रंथात मुळाप्रमाणे ' इहलोकापासून परलोकास ' केलेले हे यात्रिकक्रमण ' स्वप्नाच्या रूपकाने कथिले असे ' अशी ग्वाही मथळ्यातच देण्यात आली आहे. सबंध ग्रंथभर विखुरलेली धर्मग्रंथामधील अवतरणे मुळात कोठे आहेत, हे दर्शविणारे परिशिष्ट शेवटी जोडण्यात आलेले आहे. या कादंबरीचा नायक ' ख्रिस्ती ' हा ' दुराग्रही ', ' चलमति ' वगैरेंचा सल्ला न मानिता, ' सुवार्तिका'दिकांच्या सल्ल्यानुरूप इहलोकातील मोहांना झुगारून प्रवासाला निघतो. प्रवासातील अनेकविध संकटांना आणि मोहांना तोंड देत-देत, कधी-कधी फसून, पुन्हा योग्य मार्गाला लागून अखेरीस तो इष्ट स्थळी पोहोचतो. ख्रिस्ती ' शास्त्रा'चा पाठपुरावा करणारी ही रूपककथा ' शास्त्रा'तील अनेकविध अवतरणांप्रमाणे अनेक कथोपकथांचा आधार घेत चित्रित करण्यात आली आहे. या ग्रंथातील भाषा ही ख्रिस्ती मिशनरी वळणाची होणे अपरिहार्य होते. तिचा एक नमुना पुढीलप्रमाणे –

" मग त्या गावींच्या नियमाप्रमाणे त्यास दंड करावयास बाहेर आणिलें, प्रथम

त्यास छड्या मारिल्या, मग बुक्क्या मारिल्या, मग त्याचें मांस सुऱ्यांनीं कापिलें, नंतर त्यास दगड मारिले, मग तरवारीनें भोसकिलें, शेवटीं त्यास जाळून त्याच्या शरिराची राखाडी केली, याप्रमाणे त्या विश्वासुकाचा परिणाम झाला. "[1]

**चेम्बर्सं 'मॉरल टेल्स '**

हरि केशवजींनी चेम्बर्सकृत 'मॉरल टेल्स'चे भाषांतर (शालोपयोगी) नीतिग्रंथ म्हणून इ. स. १८४६ साली केले. ह्या ग्रंथात एकूण ३८ वेगवेगळी प्रकरणे आहेत. त्यांपैकी २९ प्रकरणे निबंधवजा असून त्यांचे विषय 'जीवजंतूंविषयीं वागणूक', 'आप्ताविषयीं वागणूक', मिताहार, शरीरसंपत्तीचे स्थान, परोपकारबुद्धी, सौम्यता, सत्य, शौर्य, स्वदेशप्रीती यांसारखे आहेत. ज्यांना गोष्टी किंवा कथात्मक भाग म्हणता येईल, त्यांपैकी अनेक इसापनीतीतील कथा आहेत. उदा. मुलगे आणि बेडूक, लावी पक्षीण आणि धान्याचें शेत, दरबारींचा उंदीर आणि ग्राम्य उंदीर इ. याहून वेगळ्या असलेल्या गोष्टींपैकी एक नमुन्यादाखल पुढे देत आहे —

**हरक्युलिस् आणि गाडेकरी – कल्पित गोष्ट**

" एक गांवढळ गडी ओंड चिखलट गल्लींतून गाडा हाकून नेत होता, तो चाके चिखलांत रुतून अडकला, असा कीं बाहेर काढावयास घोड्यांचा उपाय चालेना. तेव्हां तो हेल काढून रडत बसला आणि पूर्वींच्या ग्रीक लोकात हरक्युलिस् म्हणून एक शक्ति देणारा देव असे, त्याचा त्याने धावा केला कीं आपण येऊन मला सहाय व्हावे. त्या देवाने अभ्रातून खालीं पाहून त्यास सांगितलें कीं आळशी सोध्या-सारिखा पडून राहिला आहेस तसा राहूं नको, उठून घोड्यांस बळकट फटके मार, चाकांस आपल्या खांद्याचा नेटावा दे, आणखी तो असे म्हणाला कीं, माझे साह्य-प्राप्तीचा उपाय काय तो हाच – "

हरि केशवजींच्या रचनेतील या कथात्मक रचनेकडे पाहिले असता चटकन ध्यानात येते की, या रचनेत शालेय क्रमिक पुस्तकांच्या पलीकडे काही नाही आणि जे आहे त्यावरही अपरिहार्य खिस्ती वळणाचा ठसा आहे.

**उपदेशपर गोष्टींची काही पुस्तके**

आरंभीच्या कथात्मक वाङ्मयात निर्माण झालेल्या उपदेशपर आणि नीतिपर ग्रंथांपैकी विष्णुशास्त्री बापटकृत 'नीतिदर्पण' (दु. आ. १८३७) आणि 'बालोपदेश-कथा' (दु. आ. १८३८) हे दोन होत. यांपैकी 'नीतिदर्पण' या पुस्तकात सुरुवातीला 'इंग्लिश लोक आणि महाराष्ट्र लोक यांचा प्राचीन आणि नवीन वृत्तांत' हा वर्णनात्मक भाग आलेला असून पुढील चार गोष्टींत परस्परविरोधी तुलनात्मक भाग आला आहे. सुबुद्धि हा इमानेइतबारे नोकरी करून पदवीस चढला, तर दुर्बुद्धि हा लाच खाऊन संकटात पडला. धनंजयशेठने प्रामाणिकपणाने वागून लढाईतसुद्धा सरकारी खजिना

---

१. यात्रिक-क्रमण, पृ. २०७–२०८.

सांभाळला, म्हणून त्यास मान व बक्षीस ही मिळाली; तर घेलाशेठने सुरतेच्या नगरशेठची चोरी केली, म्हणून त्याला अटक व शिक्षा झाली; जमनादास सोनार सद्बुद्धीने काम करणारा, म्हणून त्याचा गौरव झाला; तर भिकुभाई लोकांस फसविणारा, खोटे रुपये पाडणारा, म्हणून संकटात पडला. रामजी पाटील सरकारी खजिन्यावरील भिल्लांचा हल्ला परतवून गावच्या मुलांच्या शिक्षणाची सोय करणारा, तर धोंडिबा पाटील आणि कोंडोपंत कुलकर्णी शेतकऱ्यास नाडून धुरी देणारे म्हणून अटकेत पडलेले, असा सुरुवातीच्या गोष्टीचा थाट आहे. पुढील चारपाच गोष्टींत जुवा, कैफ, व्यभिचार, लग्नपद्धती यांच्यासंबंधीचे गोष्टीरूप वर्णन आहे या कथांची रचना उघडपणेच नीत्युपदेशासाठी करण्यात आली असल्याने त्यांच्यातील कृत्रिमता उघडपणे जाणवते. तथापि या गोष्टींतून एक लहानसा धागा आढळतो, तो महत्त्वाचा आहे. तो म्हणजे इंग्रजी राजवटीच्या सुरुवातीच्या काळातील समाजस्थितीचे काहीसे वर्णन या गोष्टींतून आपोआप आले आहे. त्यातील लाचखाऊपणाचे वर्णन किंवा मालकमपेठेस बदलून गेलेल्या हरिपतांचा गवंड्याच्या मुलीशी संबंध येऊन त्याने 'सासऱ्याला' कंत्राटे देण्याचा केलेला उद्योग यातील वर्णनात आलेला भाग हा लोकहितवादींच्या लाच, व्यभिचार या विषयांवरील पत्रांशी पुष्कळ प्रमाणात जुळता आहे. त्या दृष्टीने हा कथासंग्रह लक्षणीय ठरण्याजोगा आहे.

### बालोपदेशकथा

विष्णुशास्त्री बापटांचा दुसरा संग्रह 'बालोपदेशकथा' हा 'मराठी शाळांवर पढणाऱ्या लहान मुलांस शिक्षोपदेश व्हावा म्हणून परमप्रीतीनें नजर केलेला' आहे. यात १५ भागांत छोटेछोटे उपदेश असून त्यांचे विषय 'कठोर भाषण करूं नका', 'अपंगांची निंदा करूं नका', 'मलीनपणानें राहूं नका', 'शिक्षकांच्या आज्ञेचे पालन करीत जा' यांसारखे आहेत. इतर सात भागातही उपदेशच असले, तरी त्या उपदेशांच्या जोडीला साध्या दृष्टान्तवजा कथा आलेल्या आहेत. कष्ट करून आईला पैसे पाठविणाऱ्या मुलास राजाकडून मोहोराचे बक्षीस मिळते. 'अरे चांगल्या मुला, ईश्वराने ह्या मोहोरा तुझ्या सदाचरणाच्या फळरूपी दिल्या आहेत.' या पद्धतीची वाक्यरचना या गोष्टींत असून त्यांच्या अखेरीस तात्पर्यही दिलेले आढळते ते असे —

"सारांश—दुसऱ्याची निष्कपटाने चाकरी करावी, म्हणजे त्यास आपली करुणा येत्ये आणि तो आपल्या सर्व कुटुंबाचे संरक्षण करितो."

विष्णुशास्त्र्यांच्या अगोदर सरकारी प्रकाशनाद्वारे 'बोधकथा' (दु. आ. १८३१) आणि 'नीतिकथा' (ति. आ. १८३८) ही दोन पुस्तके निघाली होती. ही दोन्ही पुस्तके एकाच ग्रंथाची भाषांतरे असून दोन भागांची नावे मात्र वेगळी ठेविली असल्याचा खुलासा 'नीतिकथे'च्या प्रस्तावनेत केला आहे. या ग्रथात मूळ 'बंगालीपेक्षा कितीएक कथा अधिक लिहिल्या आहेत.' या ग्रंथापासून 'मराठी शाळांवर

पढणाऱ्या मुलांस नीतिज्ञान व्हावें,' अशी इच्छा असल्याचे प्रस्तावनाकारांनी सांगितले आहे. 'मराठी शाळांवर पढणाऱ्या मुलांस' हा शब्दप्रयोग बापटांच्या पुस्तकाप्रमाणे याही पुस्तकात आलेला दिसतो, त्यावरून हे सारे ग्रंथ सरकारी प्रेरणेने शिक्षण विभागाच्या दप्तरखात्यातूनच तयार झालेले आहेत, हे उघड होते. नीतिकथा हे पुस्तक लहानसरच ( ५४ पृष्ठांचे ) आहे. यातील कथांचे स्वरूपही चुटकेवजा गोष्टींचे असून रचनादृष्ट्या कथा आणि उपदेशपर निबंध यांच्या सीमा एकमेकींत मिसळून गेल्या आहेत हे पुढील कथेवरून स्पष्ट होईल —

## आळशी मुलगा

कोणी एक आळशी मुलगा एके शहाण्यास म्हणतो, " महाराज, मला फार दुःख झाले आहे, मी एके दिवशीं फार उशीरपर्यंत निजून राहून शाळेस जाण्याचा वेळ गेल्यावर आईबापांस सांगितले कीं आज वेळ झाला म्हणून आतां शाळेंत जात नाहीं, उद्यां जाईन; परंतु माझी लबाडी त्यांस समजली आणि त्यांनीं पंतोजीजवळ जाऊन शाळेतील मुले आणून त्यांच्या हाताने धरून शाळेत पाठविले. नंतर पंतोजीनें मला शिक्षा केली. याकरितां आईबापांचा कांहींतरी सूड उगवावा असा बेत करीत आहे, परंतु सिद्धीस जात नाहीं." असे त्या मुलाचे बोलणे ऐकून शहाणा उत्तर करितो, " अरे बाबा, तूं केवळ मूर्ख आहेस, असे माझे ध्यानांत खचित आले; कां कीं मूर्ख जंवपर्यंत बोलत नाहींत तंवपर्यंत त्यांचे गुणदोष कांहीं कळत नाहीत; परंतु बोलिले म्हणजे सर्व समजतात. अरे मूर्खा लहानपणापासून जांणी तुझे बरेच केले त्या आई-बापांस तूं शत्रूसारखीं मानतोस हा तुझा केवळ मूर्खपणा सांगावा. तर तूं विद्या शीक. म्हणजे शत्रू कोण आणि मित्र कोण हे तुला समजेल.

सारांश, मुले लहानपणीं विद्याभ्यासाविषयीं आळस आणि आईबापांचा द्वेष करितात तेणेकरून त्यांचे फार अकल्याण होतें, म्हणून आईबापांनीं असे होऊं देऊं नये. जे लोक मुलांवर अतिशय प्रीति करून त्यांचा विद्याभ्यास होऊं देत नाहींत, ते त्यांचे शत्रू जाणावे.

### मिशनरी वळणाची रचना

उपदेशपर कथांचा एक गट हा सरकारी विद्याखात्यातून तयार होऊन बाहेर पडत होता व त्याचे स्वरूप मुख्यतः नीत्युपदेशाचे होते. त्याचप्रमाणे दुसरा गट हा बुक ॲण्ड ट्रॅक्ट सोसायटी व तत्सम मिशनरी संस्था वा व्यक्ती यांच्याद्वारा तयार होत होता. मिसेस फरारसारख्या स्त्रियांच्या नावावर यातील काही रचना आहे, तिचा उल्लेख इतरत्र केला आहे. त्याचप्रमाणे वि. को. ओकांनी बुक ॲण्ड ट्रॅक्टसाठी रचना केल्याचेही नमूद केले आहे. याशिवाय लेखकाच्या नावाचा उल्लेख नसलेले काही संग्रह आढळतात. अशा प्रकारच्या संग्रहांत शास्त्रातल्या गोष्टी ( दु. आ. १८४० ), कापर देशाची मुलगी इची गोष्ट ( १८४५ ), देवप्रीतीची प्राचीन गोष्ट

( १८७३ ) यांचा उल्लेख करावा लागेल. याच गटात पडणारी आणखी रचना कथा-कादंबरीरचना म्हणून प्रसिद्ध झालेली आहे. ती करणारांत गोविंद शंकर बापट यांचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. बापटांनी ' इलिझाबेथ ' अथवा ' सिबिरिया देशांतील हद्दपार कुटुंब ' ( १८७४ ), पाल आणि व्हर्जिनिया ( १८७५ ) हरि आणि त्रिंबक ( १८७५ ), दिनार्बस अथवा रासेलस या गोष्टीचा उत्तरार्ध ( १८८५ ) ही पुस्तके तयार केलेली आहेत. त्यांपैकी पहिली तीन सरकारी विद्याखात्याकडून प्रसिद्ध झालेली आहेत. या गोष्टींत खिस्ती वळण उघड नसून नीतीपरतेला प्राधान्य आहे. या अनुवादांपैकी ' हरि आणि त्रिंबक ' हा ग्रंथ, कदाचित पुष्कळ दिवस शाला-खात्याच्या आश्रयात समाविष्ट असल्यामुळे, प्रसिद्धी पावलेला होता.

## तीन

## शृंगारकथा

### डॉ. रामजी गणोजी (१८१४–१८६२) कृत ' स्त्रीचरित्र '

पंचतंत्र-हितोपदेशांतील उपदेशापर कथांतील पशुपक्ष्यांची लकब घेऊन शुकबहात्तरीसारखी शृंगारिक कथा आली. त्याच शृंगारिक कथेतील नीत्युपदेशाचा हेतू तत्त्वतः मनात धरून मराठीतील शृंगारकथेची वाटचाल सुरू झाली. ही वाटचाल करणारा पहिला ग्रंथ ' स्त्रीचरित्र ' ( १८५४ ) हा होय. या ग्रंथाचे लेखक डॉक्टर रामजी गणोजी हे सैन्यात नोकरी करीत होते. सैन्यातील डॉक्टरांच्या ( युरोपियन ? ) हाताखाली काम करिता-करिता त्यानीही वैद्यविद्या हस्तगत केली. नोकरीच्या निमित्ताने त्यांचा सिंध प्रांतात मुक्काम होता. नोकरीतून मुक्त झाल्यावर मुंबईत स्वतःचा शिळाछाप छापखाना काढून त्यांनी स्वःतचे ग्रंथ प्रसिद्ध केले. त्या सर्व ग्रंथांत रसायनशास्त्रविषयक तीन भागच सुमारे १८०० पृष्ठांचे आहेत. स्त्रीचरित्राचे एकूण चार भाग असून त्यांची पृष्ठसंख्या १२००-वर आहे. नारायणबोध हाही गोष्टीवजा ग्रंथ असून त्याची पृष्ठसंख्या ४६० आहे. म्हणजे डॉक्टरांचे कथात्मक वाङ्मयच जवळजवळ १७०० पृष्ठांचे आहे. अव्वल इंग्रजीच्या कालातील हे प्राचंड्य आश्चर्योत्पादक आहे.

' स्त्रीचरित्र ' या नावाच्या कथासंग्रहात मुख्यत्वेकरून स्त्रियाच्या शृंगारविषयक चारित्र्याच्या ( ? ) विविध गोष्टी संकलित केल्या आहेत. या सर्व गोष्टी ' गुलसनोवर ', ' गुलबकावली ' किंवा अरबी-फारसी कथार्ची उघड व सरळ भाषांतरे होण्याच्या आधीच्या आहेत. अर्थातच या संकलनात शुकबहात्तरीपासून अरबी कथेपर्यंतच्या विविध संग्रहातील अनेक गोष्टी भाषांतरित वा रूपांतरित स्वरूपात आलेल्या असून हाच फारसी वळणाचा मराठी कथेतील प्रथम आविष्कार म्हणावा लागेल. या कथांची बैठक डॉक्टर-मजकूर कोणा प्रीताईस गोष्टी सांगत आहेत, अशी असून त्यांत अरबी

कथेप्रमाणे एकीमधून एक अशा रीतीने निघणाऱ्या साखळीवजा कथांची मालिका आहे. डॉक्टर-मजकुरांनी स्वतःच कथानिवेदकाची भूमिका घेतली असल्याने त्यांत अव्वल इंग्रजीतील मामलेदार व त्याची कन्या, भूतकालातील राजे-रजवाडे या सर्वांची खिचडी झाली आहे. मामलेदाराच्या मुलीवर भाळलेल्या शिप्याला दळण दळावयास लावल्याची एक कथा आहे. (तीवरून अलीकडे 'लोककथे'वर आधारलेल्या म्हणून सांगण्यात येणाऱ्या 'दळण'कथांचे मूळ सापडते.) स्त्रीचरित्राच्या पहिल्या भागात 'पद्मावती' राजकन्येची तस्वीर पाहून मोहित झालेल्या राजपुत्राला उपदेश करण्यासाठी म्हणून जो उपक्रम केला आहे, तो उघडपणे अरबी भाषेतील सुरस कथांचा प्रास्ताविक भाग आहे, तर पुढे आलेल्या काही कथा या सरळपणे 'बागोबहार'-मधील तीन-चार कथांचे सलग तर्जुमे आहेत. फिरस्त्या राजपुत्राची पत्नी पुरुषवेषाने त्याच्या शोधास निघाली असता तिच्यावर एखाद्या राजकन्येने भाळून लग्न करणे आणि नंतर उभयतांनी राजपुत्राचा 'संसार' करणे हेही अरबी-फारसीतून आलेले अंग होय. सदर स्त्रीचरित्राच्या तिसऱ्या भागात आलेली गरीबदास सौदागराची गोष्ट ही सरळपणे बहुपरिचित असलेल्या 'अलीबाबा आणि चाळीस चोर' या गोष्टीचे रूपांतर आहे. राजकन्येची नूरी पक्षीण होण्याची जादू गुलबकावलीतून आलेली आहे. स्वतःच्या सावत्र मुलाशी व्यभिचार करू इच्छिणाऱ्या राण्याही या स्त्रीचरित्रात आलेल्या आहेत. गलबते फुटणे, निर्जन बेटावर जाण्याची पाळी येणे, रानटी लोकांच्या तावडीतून सुटणे सोबती सौदागरांनी फसविणे हा सगळा मालमसाला पाहिला, म्हणजे डॉक्टर रामजी गणोजींनी सिंधच्या मुक्कामात पुष्कळ इराणी किस्से साठवून ठेविले होते, हे उघड दिसते. या सर्व कथांच्या अंती संस्कृत-प्राकृत-फारसी पद्धतीने उघडपणे अनीतीचा निषेध आणि नीतीचा गौरव केलेला आहे. त्या अर्थाने ह्या 'नीतिकथा' म्हणता येतील. पण वस्तुतः, त्या सर्व कथा अधिकउण्या प्रमाणात अतिरिक्त शृंगारलोलुपतेच्या, भ्रष्टाचाराच्या आणि फसवाफसवीच्या कथाच आहेत. त्यांच्या स्वरूपाबद्दल अर्थातच संकलनकाराला दोष देणे युक्त होणार नाही. पुढे सुट्यासुट्या स्वरूपात आलेल्या कथामालिकांची ही वानगी आहे, एवढेच.

'स्त्रीचरित्र' या ग्रंथाच्या मानाने 'नारायणबोध' हा आपल्या मुलाला उपदेश करण्यासाठी लिहिलेला ग्रंथ थोडा सोज्ज्वळ आहे. त्याचे स्वरूपही काहीसे निबंध-कथा-मिश्रणाचे आहे. 'जारकर्मापासून हानि', 'विश्वासघात केल्यापासून दुर्दशा' यांसारख्या मथळ्यांच्या गोष्टींत प्रथम किंवा शेवटी निबंधवजा भाग देऊन जोडीला एकेक कथा देण्याचा उपक्रम लेखकाने केला आहे. यांतील कथाही उपर्युक्त स्त्री-चरित्रापेक्षा फारशा वेगळ्या आहेत, असे नाही. तथापि त्यांतील हेतू अधिक स्पष्ट आणि प्रधान असल्यामुळे त्यांचा परिणाम 'स्त्रीचरित्र'कथांहून वेगळा होतो, हे मान्य केले पाहिजे.

## अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी

डॉ. रामजींनी सुरू केलेल्या 'स्त्रीचरित्रा'तील अरबी-फारसी वळणाच्या कथांतील अग्रेसर ग्रंथ म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी भाषांतरित केलेला 'अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' (१८६१–६५) हा होय. थोरल्या शास्त्रीबोवांनी प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याच्या आधीच संस्कृत-शास्त्री वळणाचे रसिक विद्वान म्हणून ख्याती मिळविली होती. धर्मपर लेख, व्याकरणचर्चा, पद्य इत्यादी क्षेत्रांत कार्य केले होते. तथापि शास्त्रीबुवांच्या रसिक आणि शैलीदार लेखणीचा सर्वांत प्रभावी आविष्कार म्हणून या अरबी गोष्टींचाच उल्लेख करावा लागेल. संस्कृत काव्य-नाटकांच्या अध्ययनाने आलेल्या शृंगारिक शैलीला अरबी गोष्टींत फार मोठा वाव होता. तिचा पुरेपूर उपयोग शास्त्रीबोवांनी केलेला दिसतो. स्त्रियांच्या चारित्र्याविषयी संशय आल्याने दर दिवशी नवी बायको करून तिला ठार मारणाऱ्या बादशहाला प्रधानकन्येने आपल्या कथा-कथनाच्या कौशल्याने कसे स्तिमित केले, ते सांगण्याच्या मिषाने या कथा सांगण्यात आल्या आहेत. साहजिकच या कथांतील अनेकांतून शृंगाराचा गहिरा आविष्कार झाला आहे तथापि सिंदबाद खलाशाच्या सफरी किंवा अलीबाबा आणि चाळीस चोर यांसारख्या बहुपरिचित कथानकांतून शृंगारेतर अशा विस्मयकारक, अद्‍भुतघटनाप्रधानतेच्या सामर्थ्याचाही पुरेपूर प्रत्यय आला आहे. अशा अद्‍भुतघटनाप्रधानतेचे सामर्थ्य जितके धक्का देणाऱ्या किंवा थक्क करणाऱ्या घटनांत असते, तितकेच ते अशा घटनांचे मनोज्ञ वर्णन करणाऱ्या चपखल भाषा-शैलीत असते. शास्त्रीबोवांचे खरे वैशिष्ट्य नेमके अशा भाषाशैलीत आहे. ते इतके की, नावाने मुसलमानी वातावरणाच्या वाटणाऱ्या कथाही शास्त्रीबुवांच्या भाषेमुळे आपला परकीपणा विसरावयाला लावतात. संस्कृत आणि अरबी-फारसीमधील शृंगारवर्णनाच्या किंवा सौंदर्यदर्शनाच्या पद्धतीतील काही आश्चर्यजनक साम्येही या कामी उपयोगी पडू शकतात. बाणभट्टाच्या कादंबरीतील शुकनास पोपट आणि

चिपळूणकर, कृष्णशास्त्री हरि (१८२४–१८७८), पुणे.

अलंकार, न्याय, धर्म, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, इंग्रजी, संस्कृत, मराठी इत्यादी भाषा व त्यांतील वाङ्मय यांचे अध्ययन. पुणे-पाठशाळेत उप-प्राध्यापक, भाषांतरकार, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपल, वार्ताहर, संपादक या नात्यांनी कार्य. लेखन — 'विचारलहरी' पाक्षिक (१८५२) या स्वतःच्या नियतकालिकातून धर्मादिविषयक लेख. 'शालापत्रका'चे संपादक असताना त्यात लेखन. ग्रंथ-परीक्षणे व व्याकरणावरील निबंध (पुस्तकरूपाने प्रकाशन, १८९३), संस्कृत भाषेचे लहान व्याकरण (१८५९), अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी (१८६१), रासेलस (१८७३), साक्रेतिसाचें चरित्र (१८५२), अर्थशास्त्रपरिभाषा (१८५५), पद्यरत्नावलि (१८६५), (यांतच 'मेघदूता'चें भाषांतर समाविष्ट), अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह (१८६१).

अरबी-फारसी कथावाङ्मयातील नूरी किंवा तोता, संस्कृत वाङ्मयातील मदिरा आणि इराणी क्षेत्रातील इरा, संस्कृतामधील संभोगशृंगार आणि अरबी-फारसी वळणातील दर्दभरी इश्क, दण्डीचे प्रवासी दशकुमार आणि अरबीतील त्यांचे सहप्रवासी यांच्यातील साधारणता ही शास्त्रीबुवांसारख्या जाणत्या संस्कृतज्ञाला पदोपदी उपकारक ठरते, याचा अनुभव त्यांच्या इतरांहून वेगळ्या दिसणाऱ्या या भाषांतरात येतो. त्या मानाने त्यांनीच भाषांतरित केलेली 'रासेलस' ही तत्त्वप्रधान कादंबरी जशी तुलनेने, भाषासौष्ठव असूनसुद्धा, फिकी वाटते, त्याचप्रमाणे याच मसाल्यावर आधारिलेली इतर भाषांतरेही अयशस्वी वाटतात. शास्त्रीबोवांच्या बरोबरीनेच कोणा भास्कर सखारामांनीही अरबी गोष्टींचा अनुवाद इ. स. १८६३-मध्ये केला होता, पण त्यांच्या ग्रंथसूचीतील उल्लेखापलीकडे अधिक विवेचनाची आवश्यकता वाटत नाही. थोरल्या शास्त्रीबोवांच्या भाषांतराने निर्माण केलेली पकड मात्र एवढी जबरदस्त होती की, अरबीच्या पाठोपाठ फारसी भाषेतील ( ताकभाते ) गोष्टी आल्या; एवढेच नाही, तर महाराष्ट्र भाषेतील गोष्टींचीही 'सुरस' आणि मनोरंजक अशी दोन पुस्तके झालेली आढळतात.

### अरबी-फारसीतून आलेले काही ग्रंथ

अरबी-फारसी भाषांतील कथासंग्रहांपैकी प्रथमतः मराठीत उघडपणे आलेला ग्रंथ म्हणजे कृष्णराव माधवराव प्रभू यांनी इ. स. १८५४-५५-मध्ये सात भागांत अनुवादिलेला 'हातिमताई चरित्र' हा सुमारे ४५० पृष्ठांचा ग्रंथ होय. हा अनुवाद डंकन फोर्बसच्या इंग्रजी भाषांतरावरून केलेला आहे. दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेत पूर्वसूत्र देताना लेखक ग्रंथाचे स्वरूप थोडक्यात असे देतात की, "हसन बानू म्हणून एक स्त्री होती. तिचा पण असा होता की, माझे सात प्रश्नांचीं उत्तरे जो आणील त्यांसी मी लग्न करीन. मुनीर नांवाचा एक राजपुत्र होता, त्यास ती मिळवून देण्याकरितां, हातिम इमनचा राजा याने सात प्रश्नांचीं उत्तरे आणण्याचे काम पत्करले." या ग्रंथाच्या प्रत्येक भागात एकेका प्रश्नाचे उत्तर आणण्याचे काम विभागलेले दिसते. हसनबानूचे प्रश्न हे कूटप्रश्नांसारखे आहेत. उदाहरणार्थ, दुसरा प्रश्न 'चांगले करा आणि पाण्यावर टाका' असा असून त्या प्रश्नाशी संबद्ध मुख्य गोष्ट दरोडेखोरीत आयुष्य गेलेला वृद्ध पापी मनुष्य रोज नदीत दोन भाकरी टाकावयास सुरुवात करतो व त्यायोगे तो वाचतो, अशा आशयाची आहे. या मुख्य कथेच्या पोटात कोणा हारिथाच्या मुलीचे प्रश्न आहेत, त्या निमित्तेकरून राक्षसाची वस्ती आहे, चिनी व्यापारी आहेत आणि हसनापरी नावाची राजकन्याही आहे. अशाच इतर भागांतही मुख्य प्रश्नाच्या अंगभूत निर्माण होणाऱ्या उपप्रश्नांच्या मालिका व तत्संबद्ध गोष्टी आहेत. या सर्व गोष्टींचे स्वरूप प्रायशः एकाच धाटणीचे आहे.

### दुर्दैवी मुराद व दैववान सलाउद्दीन ( १८६२ )

ही वि. ना. भागवतांनी इंग्रजीवरून भाषांतरिलेली आणखी एक गोष्ट असून

ती बादशहा व वजीर वेषांतराने हिंडत असता त्यांनी ऐकिली अशी प्रस्तावना आहे. सदर गोष्टीला एक तात्पर्यही असून 'नशीब नव्हे, तर शहाणपणा किंवा मूर्खपणामुळें सर्व कांहीं घडतें,' असा त्याचा आशय आहे. मुराद आणि सलाउदीन यांना दोन बरण्या मिळाल्या होत्या. देवावर विश्वास असल्याने मुरादाने आपली बरणी राणीला विकली नाही; सलाउदिनाने विकली, व त्या पैशावर व्यापार करून तो श्रीमंत झाला. सलाउदिनाच्या शहाणपणाने इस्तंबूल शहर रोग आणि आगी यांच्यापासून बचावले. त्याचे फातिमेशी लग्न झाले व बादशाही सुभा त्याने नाकारला, ही दैववान सलाउदिनाची गोष्ट. पण ही दुय्यम असून देवावर अवलंबून राहणारा मुराद अनेक आपत्तींत व संकटांत कसा सापडला, त्याच्यावर न केलेल्या गुन्ह्यांचे आळ कसे आले, व्यापारात तो यहुद्याकडून कसा फसविला गेला, इत्यादी कहाण्या यात अधिक विस्ताराने आल्या आहेत. या कहाण्यांतील काही घटना अन्य भाषांतरित कथांतून आलेल्या आहेत.

'बाहारदानीष' भाग १-२ (१८६६-६७) हाही कथासंग्रह याच परंपरेतील म्हणावा लागेल. नारो अप्पाजी गोडबोले या काशकानी प्रसिद्ध केलेल्या या संग्रहावर भाषांतरकर्त्याचे नाव नाही. या संग्रहात एकूण तेरा गोष्टी असून तो अपूर्ण आहे. या कथासंग्रहाची सुरुवात, बाहारवार सुलतानाने घेतलेली एक तुती, सुलतानाची बायको मेहेरपरवर आपल्या सौंदर्याचे वर्णन करू लागली, तेव्हा हसली व बहारवरबानूच्या अप्रतिम सौंदर्याबद्दल बोलली, अशा प्रकारचे म्हणजे अरबी-फारसी साखळी-कथांच्या आरंभी पुष्कळदा येते, त्यापैकीच आहे. नंतर सुलतानास बाहारवरबानूच्या लोभापासून परावृत्त करण्यासाठी त्याचे वजीर त्याला स्त्रियांच्या दुराचरणाच्या एकीहून एक वरचढ कथा सांगतात. अशा सुमारे १०-११ गोष्टी सांगून झाल्यावरही सुलतानाचा बेत फिरत नाही, असे पाहून अप्राप्त अशा शहाजादीच्या प्राप्तीसाठी यत्न, त्यांत संकटे आणि त्यांतून निर्माण होणारी नव्या कथांची साखळी, असे या संग्रहाचे स्वरूप आहे. अर्थातच पहिल्या भागातील कथांचे स्वरूप सहेतुक, पण उघडपणे उत्तान व्यभिचार-कथांचे आहे. या व्यभिचारासाठी क्वचित मांजरीचे रूप घेऊन प्रियकराकडे जाणाऱ्या व जादूने क्षणात हजारो कोसांचे अंतर काटणाऱ्या वजीरपत्नीसारख्यांच्या वर्णनाने अद्भुताचा शिडकावाही भरपूर प्रमाणात झाला आहे, तर उत्तरभागात उघडपणेच घटनांना प्राधान्य असल्यामुळे त्या घटनांत अद्भुताचा वापर जास्त केल्यामुळे व्यभिचार आणि अद्भुत यांच्या प्रमाणाचा भाग पूर्वार्धाच्या तुलनेने उलटा झाला आहे, इतकाच काय-तो फरक. एरवी, सर्व कथा वाचताना विशिष्ट मादक गहिरेपणाची अतिरिक्तता ही जाणवत राहते.

याच गटातील आणखी तीन महत्त्वाच्या कथा म्हणजे डेविड हाइम याने रूपांतरित केलेली 'गुल व सनोवर' (१८६९), वि. स. नवलकरकृत 'गुलबकावली' (१८७३) व गो. भि. पटवर्धनकृत 'गुलिस्तां' (१८८४) या होत. सुंदर स्त्री, तिच्या प्राप्तीसाठी निकराचे प्रयत्न, तिच्या विरहाने होणारी दयनीय अवस्था, तिच्यासाठी भांडणे,

व्यभिचार-संशय इत्यादी समान भाग सर्वांत आहेत. त्यातल्या त्यात 'गुलबकावली'च्या कथानकाची छाया या कालातील इतर ग्रंथांवर अधिक दिसते.

सिर्कस्तानचा राजा जलनसंग याला पाचवा पुत्र ताजहलमुख याच्या दर्शनाने अंधत्व येईल, असे ज्योतिषांनी सांगितले, म्हणून त्याला अरण्यात ठेविले. पण तो दृष्टीस पडून राजा अंधळा झाला. तेव्हा राजाची दृष्टी 'गुलबकावली'च्या फुलाने येईल, असे कळल्यावरून चौघे राजपुत्र आणि ताजहलमुख हे स्वतंत्रपणे त्या फुलाच्या शोधास निघाले. चौघे गणिकेचे गुलाम झाले. ताजहलमुखाने गणिकेच्या दासीकडून तिचे रहस्य समजावून घेऊन तिला द्यूतात जिंकिले व चौघा भावांची सुटका केली. नंतर गुलबकावलीच्या फुलाच्या शोधात असता ताजहलमुखाचा राक्षसकन्या मेमुदा हिच्याशी विवाह झाला. आपल्या सासूच्या साहाय्याने तो अनेक संकटांतून गुल-बकावलीच्या महालापर्यंत पोहोचला. तेथे तिच्या दर्शनमात्रेच लुब्ध झाला. गुलबकावलीचे त्याने आणिलेले फूल कपटाने त्याच्या भावांनी घेतले व आपलाच हा पराक्रम म्हणून राजाची कृपा संपादन केली. 'गुलबकावली' ही अंगठीची अदलाबदल करून गेलेल्या ताजचा शोध करण्यास निघाली इकडे ताजहलमुख आपली पहिली पत्नी मेमुदा व तिची आई यांच्यासह वेगळे नगर वसवून राहिला, तेव्हा सिर्कस्तान ओस पडू लागले. तेव्हा बाप-लेकांची भेट होऊन दिलजमाई झाली. त्याच वेळी गुलबकावली अभिसारिकेच्या वेषाने येऊन ताजला भेटली व आनंदीआनंद झाला.

नवलकरांच्या या रचनेत संस्कृतप्रचुर भाषाशैली व तज्जन्य किंचित बोजड कृत्रिमता आहे, तर डेविड हाइम याच्या रचनेत फारसी वळण अधिक प्रमाणात आहे.

**विदग्ध-स्त्रीचरित्र**

रसिकप्रिया अथवा डिकॅमेरॉन (१८७९) या रावजी वासुदेव साठे यांच्या अनु-वादांत बोकॅशिओच्या कथांपैकी त्यांतल्या त्यांत कमी शृंगारिक म्हणता येतील अशा गोष्टी घेतल्या असून त्यांतील भाषेतही इंग्रजीतील सदर कथांच्या तुलनेने पुष्कळच संयम दाखविण्यात आला आहे, हे या कथांचे मूळ स्वरूप ध्यानात घेता विशेषत्वे लक्षात येणारे आहे. विदग्धस्त्रीचरित्र (१८७१) हा चिंतामण दीक्षित जोशी यांचा ग्रंथ कादंबरी म्हणून उल्लेखिलेला असला तरी त्याचे स्वरूप पुष्कळ प्रमाणात 'स्त्री-विषयक' शृंगार-कथांच्या संकलनाचे असून त्यांतील कथानकाचा एकसूत्रीपणा नाममात्र आहे. वसंतकलिका नामक स्त्रीने आपल्या पतीस कसे फसविले, व आपले व आपल्या उपपतीचे मनोरथ पूर्ण कसे केले व इतके करूनही पतीने आपली द्रव्य-हानी मनात न आणिता बायकोने आपल्यास मोठ्या संकटातून पार केले, असे समजून तिचे अतिशय आभार मानून तिजवर पहिल्यापेक्षा अधिक प्रीती केली, हा लेखकाच्या शब्दात या ग्रंथाचा सारांश. पण या सारांशापेक्षा त्यात वसंतकलिकेचे इंद्रजाल दाखविण्याच्या निमित्ताने आलेल्या विविध व्यभिचारकथा हेच याचे खरे स्वरूप होय. फुलांनी पिवळ्याजर्द झालेल्या शेतात शृंगार करिता यावा, म्हणून पिवळे वस्त्र मागणाऱ्या

पाटलाच्या लेकीची गोष्ट यात आहे. पती दूरदेशी गेलेल्या स्त्रीने सासूला आलेला पाहुणा रातांधळा आहे काय, असे विचारून केलेला शृंगाराचा संकेत आहे व त्या संकेतानुरूप झालेल्या शृंगाराचे 'रसिक' वर्णन 'सुरतं तदेव सुरतं कृच्छ्राल्लब्धं यदन्य-नारीषु' या शब्दांत केले आहे. पंढरपूरच्या वाटेवरील पुराणिक व विकेशा विधवा यांच्या भोगाचे वर्णन आहे (तुलना: पद्मनजी – यमुनापर्यटन). आपल्या बायकोच्या सौंदर्यावर खूष राहून तिचा व्यभिचार डोळ्यांआड करणाऱ्या सोनार कोष्ट्यांची गोष्ट आहे; व तीतून अखेरीस येणाऱ्या कलिकेच्या शृंगाराची दीर्घ कथा आहे. तिचीही सुरुवात 'चमत्कारिक गोष्टीं'तील "हे पाणी गोड आहे काय?", "पाणी दूर नाहीं—हातांत आहे. तांब्या तोडाला लावण्याचा मात्र अवकाश," अशा संभोगसूचक सवालजबाबातून झालेली आहे परंतु एवढ्या शृंगारवर्णनाने समाधान झाले नाही म्हणूनच की काय, चित्रध्वज नगरीतील भाट राजाचे वर्णन करतो, त्यातही शृंगारो-पमांची लयलूट आहे —

"हे राजा, तुझें कुल महाराष्ट्र देशाच्या स्त्रियांच्या कुचांप्रमाणें उंच आहे, तुझा विनोद लाट देशाच्या स्त्रियांच्या शब्दाप्रमाणे मृदु आहे, तुझें मन चेदि देशाच्या स्त्रियांच्या नाभीप्रमाणे गंभीर आहे, तुझी बुद्धि आभीर देशाच्या स्त्रियांच्या नितंबाप्रमाणें विशाल आहे, तुझी तरवार गौड देशाच्या स्त्रियांच्या केसांप्रमाणे काळीभोर आहे, तुझा रणप्रसंग कर्नाटक देशच्या स्त्रियांच्या रतिप्रसंगाप्रमाणें उद्दाम आहे."

एकूण दीक्षितांनी संस्कृतातील सर्व शृंगार-भांडार मराठीत आणिले आहे.

### शृंगारशेखर (१८८१)

हा बा. ना. राव यांचा ग्रंथ 'कादंबरी' म्हणून उल्लेखिला असला, तरी त्याचे स्वरूप कथा आणि कादंबरी यांच्या मिश्रणाचे आहे. आनंदपूरचा राजपुत्र शृंगार-शेखर हा शिकार करिताना एकटाच वाघाच्या मागून दूरवर जंगलात जातो. त्याचा घोडा मरून पडतो. नंतर तो पंधरा दिवसांनी ब्रह्मदेशातील शांतिपाल राजाकडे पोहोचतो. या राजाची मुलगी सौंदर्यलतिका ही सहा महिन्यांपूर्वी अचानक नाहीशी झालेली असते व तिचा शोध चार दिवसांनी येणारा राजपुत्र लावील, असे स्वप्न राजाला पडलेले असते. शृंगारशेखर शोधाला बाहेर पडतो व तो अनेक प्रसंगांतून व संकटांतून बाहेर पडून अखेर सौंदर्यलतिका मिळवून तिच्याशी लग्न करितो आणि आनंदीआनंद होतो, ही कादंबरीची (मुख्य) कथा होय.

शृंगारशेखर सौंदर्यलतिकेच्या शोधाला बाहेर पडल्यापासून त्याच्यावर आलेल्या प्रसंगांतून लेखकांनी अनेक सुट्या गोष्टी सैलपणे गुंतविल्या आहेत. शृंगारशेखरावर सुरुवातीला शहरात संकट येते, ते कूटप्रश्न व त्यांची चातुर्यदर्शक उत्तरे यांच्या घडणीने सोडविले आहे. शृंगारशेखर एका वृद्धाच्या झोपडीत पोहोचला असता तेथे त्या वृद्धाने चोरीच्या कौशल्याची गोष्ट सांगितली आहे. वाटेत व्यापारी भेटतो, तो व्यापारी कौशल्याची गोष्ट सांगतो. नंतर एका सारवानाच्या उंटाच्या चोरीची गोष्ट येते.

त्या निमित्ताने बिरबलाचा व त्याच्या मुलीचा उल्लेख व त्यात बिरबलाच्या मुलीच्या चातुर्याची गोष्ट आली आहे. अशा विविध गोष्टींत वातावरणाची भेसळ झाली असून शिवाय अरबी-फारसी वळणाच्या सुरस कथांची घडणही या ग्रंथाला आली आहे. या घडणीतूनच केवळ चातुर्याच्या आणि उन्मादक शृंगाराच्या तऱ्हांची पखरण झालेली आढळते. कादंबरीच्या घडणीचा हा प्रकार इ. स. १८८१ सालीही चालू होता, हे लक्षणीय आहे.

## मिश्र स्वरूपाचे कथासंग्रह

नीतिकथा, दंतकथा, ऐतिहासिक कथा, शृंगारिक कथा यांचे स्वतंत्र संग्रह निघत असता या सर्व प्रकारांची सरमिसळ असलेले असेही काही संग्रह अव्वल इंग्रजीत प्रसिद्ध झालेले आढळतात. अशा प्रकारच्या चमत्कारिक गोष्टींचे शंभरापासून अडीचशेपर्यंत पृष्ठांचे आठ भाग नारो अप्पाजी गोडबोले या प्रकाशकांनी प्रसिद्ध केले. या संग्रहात मेढीचे वजन तिला खाऊपिऊ घालूनही न वाढण्याच्या गोष्टीसारख्या (बादशहा-) बिरबलाच्या चातुर्यकथा आहेत; ‘कमले कमलोत्पत्तिः श्रूयते न तु दृश्यते’ यासारख्या कालिदासाच्या समस्यापूर्तींच्या भोज-कालिदासांच्या कथा अथवा चुटके आहेत, ‘कुन्तीसुतो रावणः कुम्भकर्णः’ किंवा ‘गौरीमुखं चुम्बति वासुदेवः’ किंवा ‘सिंदूरबिन्दुर्विधवाललाटे’ यांसारख्या कूटसदृश वाटणाऱ्या संस्कृतानुकारी वा संस्कृत अंतर्लापिकांचा उलगडा आहे; श्राद्धासारख्या धार्मिक विधीची माहिती आहे; सकृद्दर्शनी अगदी साध्या किंवा निरर्थक वाटणाऱ्या उपदेशाचा विस्मयकारक प्रत्यय देणाऱ्या ‘अकलेचे दुकान’सारख्या चातुर्यकथा आहेत; जादूरूपांतराच्या अद्भुत-कथा आहेत आणि शृंगारकथांची तहान भागविणाऱ्या मचूळ व्यभिचारकथाही आहेत. गोडबोले यांनी प्रकाशित केलेल्या चमत्कारिक गोष्टींचे स्वरूप मूलतः विविध प्रकारच्या संकलनाचे आहे. वेल्सने कादंबरीला दिलेले ‘गारुड्याची पोतडी’ हे नावच या संकलनाचे यथातथ्य वर्णन करू शकते. हे संकलनाचे काम १८६५ ते १८८९-पर्यंत चालू होते. याच काळात ‘मनोवेधक गोष्टी’ याही नावाचे ३–४ संग्रह त्यांनी प्रकाशित केलेले दिसतात. या संमिश्र स्वरूपाच्या संकलनाबरोबरच ‘बाहारदानीष’ अथवा ‘फार्शीभाषेतील चमत्कारिक गोष्टी’ यांचेही दोन भाग (१८६५ ते ६७) या काळात प्रसिद्ध करण्याची कामगिरी याच प्रकाशकांनी केली आणि त्यापाठोपाठ ‘लवकुशाख्यान बखरी’च्या (१८६१) धर्तीच्या पाच पौराणिक बखरीही प्रकाशात आणिल्या. पण या दोन्ही उद्योगांचे स्वरूप संमिश्र कथांहून काहीसे वेगळे असल्याने त्यांचा विचार स्वतंत्रपणे केला आहे.

गोडबोल्यांच्या पठडीत बसतील अशा प्रकारच्या इतरांच्या निर्मितीपैकी ‘चमत्कारिक न्यायाच्या व अकलेच्या गोष्टी’ (१८६७) हा त्र्यंबक नारायण राज-माचीकर यांचा संग्रह लक्षात राहण्यासारखा आहे. सुमारे २०० पृष्ठांच्या या संग्रहात पन्नास गोष्टी देवनागरीतील उर्दू भाषांतरासह देण्यात आल्या आहेत. हा एक या

संग्रहाचा विशेष म्हणता येईल. यांतील बहुतेक सर्व गोष्टी बादशहाबिरबलांच्या नावे दिलेल्या आहेत. त्यांतील काही सुपरिचित व अनेक संग्रहांतून आलेल्या व येणाऱ्या आहेत. त्यांत अत्तराच्या वासावरून जाराचा शोध लावण्याची किंवा दाढीला कापूस लागला, असे ( खोटेच ) सांगून कापूसचोराचा शोध करण्याची चातुर्याची बाब आहे. तशीच 'काली' शब्दावर कोटी करून युक्तिवाद जिंकण्याची क्षुल्लक बाबही आहे. 'बादशहा आणि बिरबल यांच्या गोष्टी' ( १८६९ ) याही नावाचा एक संग्रह स्वतंत्रपणे झालेला आढळतो. आणखी एक लक्षात घेण्याजोगा संग्रह गोविंद मोरोबा कार्लेकर या पुढील कालात अनेकविध रचना करणाऱ्या लेखकाचा असून त्याचे नाव 'चातुर्यकथासंग्रह' ( १८८४ ) असे आहे यात एकूण बारा गोष्टी असून त्यांत बिरबलाच्या पाचसहा गोष्टी आहेत. त्यांपैकी बिरबलाचा काटा काढण्यासाठी स्वर्गातील बातमी आणण्याची युक्ती बिरबलाने न्हाव्यावरच उलटविली, ही गोष्ट काहीशी परिचित आहे, तर 'कमअस्सलका अस्सल, अस्सलका कमअस्सल, बाजारका कुत्ता, गादीका गद्धा,' अशांसारख्या कूटोक्तीवर आधारलेली गोष्ट ही बिरबलाच्या नावावर टाकिलेली दिसते. 'अक्कल विकणारा दुकानदार' हा गोडबोल्यांच्या 'चमत्कारिक गोष्टीं'त येऊन गेलेला आहे; तर 'वर मागण्याचें चातुर्य' हे संस्कृतामधून उतरले आहे. खानावळवाल्याची खोडकी मोडण्यासाठी जेवत राहणारा प्रवासी ही इंग्रजीतील चुटक्यांवरून तयार केलेली गोष्ट आहे. वैद्य-कारकुनांच्या चातुर्याच्या गोष्टी या दंतकथांवरून रचिलेल्या दिसतात. यांतील काही गोष्टी अव्वल इंग्रजीतील कालमानाला शोभणाऱ्या आहेत, सर्वच केवळ भूतकालीन किंवा अद्‌भुत नाहीत, हा या संग्रहाचा विशेष म्हणता येईल.

## नाट्यकथांचे अनुवाद व छाया

शेक्स्‌पिअरच्या नाटकांवरून किंवा लॅम्ब्च्या नाट्यकथांवरून काही अनुवाद या काळात तयार झालेले दिसतात. त्यांत 'द मर्चंट ऑफ व्हेनिस'चे तीन ( विलक्षण न्यायचातुर्यपंडित, १८६८, म्हाताऱ्या व्यापाऱ्याची गोष्ट – ओक (?), व स्त्रीन्यायचातुर्य – पारकर, १८७१ ), 'द कॉमेडी ऑफ एरर्स'चे दोन ( भुरळ – १८६१ मोहोनी, १८७६– पारकर ), 'द टेमिंग ऑफ दि श्रू' (पंडित–१८६७) 'द टू जन्टलमेन ऑफ व्हेरोना' ( अवर्णनीय स्नेहभाव –१८७०, स्त्रियांचे नेत्रकटाक्ष – मराठे, १८८५) इत्यादी आढळतात. यांपैकी शेवटचे दोन लॅम्ब्वरून केल्याचा उल्लेख आहे. पहिला अनुवाद हा विस्तृत असून दुसरा अगदी थोडक्यात करण्यात आला आहे. 'विलक्षण न्यायचातुर्य'कर्त्या पंडितांनी शालकचंद—शायलॉक, बसंतसिंग—बसॅनिओ या पद्धतीने पात्रांच्या नावात आद्याक्षरांचे साम्य ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. एकंदर पद्धती रूपांतराची असली, तरी घटनाप्रसंगात फरक करण्यात आलेला नाही. अनुवाद एकंदरीत सामान्य आहेत. प्रत्यक्ष अनुवादाप्रमाणेच काही 'स्वतंत्र' म्हटलेल्या कथांतही शेक्स्‌पिअरची छाया दिसते. 'सुंदर-सुंदरी' (ग. स. साठे, १८८५ ) हे त्याचे उदाहरण.

या कथेत अगदी सारख्या दिसणाऱ्या जुळ्या बहीणभावांची गोष्ट असून तीत सुरुवातीला गलबत फुटून विलग झालेल्या बहीणभावांपैकी बहिणीने पुरुषवेष घेतल्याने निर्माण झालेले प्रेमप्रकरण 'अद्भुत' वळणाचे असले, तरी अखेरीस बहीणभाऊ दोघेही पुरुषवेषात एकत्र येतात, तेव्हा झालेला घोटाळा हा शेक्स्पिअरच्या नाटकातील 'मिस्टेकन् आयडेंटिटी'च्या पद्धतीचा आहे. त्यावरून हीही कथा शेक्स्पिअरवरून रचिलेली आहे, असे वाटते.

अनेकविध, विशेषतः नाट्याच्या, रचना मोठ्या प्रमाणात करणारे या काळातील एक लेखक द. वा. जोगळेकर यांचा 'शृंगारसुंदर आणि मनोवेधक स्त्रीपुरुषांच्या चमत्कारिक गोष्टींचा संग्रह' (१८८३) हा अनेक दृष्टींनी लक्षात राहणारा आहे. या संग्रहाची रचना ही अरबी-फारसीच्या परंपरेतील साखळी-कथांचीच असली, तरी यांतील इतर लक्षणीय भाग महत्त्वाचे आहेत. त्यांपैकी एक म्हणजे या संग्रहातील काही कथा, [उदा. 'भानुमतीची गोष्ट' (पृ. १ ते ३६), 'कमलाक्ष राजा व कलावती यांची गोष्ट' (पृ. ११९ ते १५३), 'कज्जेदलाल स्त्रीची गोष्ट' (पृ. १९५ ते २१०)] या अनुक्रमे 'मुक्तामाला', 'मंजुघोषा' व 'द टेमिंग ऑफ द श्रू' यांचे नावे बदलून दिलेले अनुवाद आहेत. आपल्या आधीच्या मराठीतच झालेल्या कादंबऱ्यांच्या गोष्टी तयार करून 'संगृहीत' करण्याचा भाग हा येथे 'नवीन' दिसतो. इतर गोष्टींत 'सुकन्या आणि च्यवन' ही पौराणिक कथा आलेली आहे. बाकीच्या गोष्टींत 'शामशेट सोनार व त्याची स्त्री' ही बोकॅशिओच्या गोष्टींपैकी दिसते. काही गोष्टी आधीच्या संग्रहांतून येऊन गेलेल्या फारसी वळणाच्या किंवा बिरबल-बादशहा-छापाच्या आहेत. जोगळेकरांचा हा ग्रंथ फार मोठ्या प्रमाणावर खऱ्या:अर्थाने 'संग्रह' किंवा 'संकलनात्मक' स्वरूपाचा आहे. मात्र कोठेही मूळ आधाराचा उल्लेख केलेला नाही. कदाचित असे संकलन करण्यात आधार देण्याची आवश्यकता नाही, अशी समजूत असावी. मात्र जोगळेकरांचे कथन हे पुष्कळ प्रमाणात मूळ वृत्तांताशी इमान राखणारे आहे, आणि त्याचबरोबर ते पुष्कळ प्रमाणात आकर्षकही आहे. पूर्वीच्या काही संकलनांतील तुटक आणि त्रोटक शैलीच्या तुलनेने हे ध्यानात येते.

## चार
## ऐतिहासिक कथा-कादंबऱ्या

रा. ब. मोरोबा कान्होबा विजयकर[1] (१८१३–७१) यांनी लिहिलेला 'घाशीराम कोतवाल' (१८६३) हा ग्रंथ कालानुक्रमाने पहिला ऐतिहासिक कथासंग्रह म्हणावा

१. विजयकर, मोरोबा कान्होबा (१८१३--१८७१) मुंबई. सरकारी नोकर, शेवटी स्मॉल कॉज जज्ज. जीवनात कर्ते सुधारक. लेखन — घाशीराम कोतवाल (१८६३), विधवाविवाहावरील व्याख्यान (१८७०).

लागेल. सामान्यतः कादंबरी म्हणून या ग्रंथाचा उल्लेख केला जातो. परंतु वस्तुतः तो कादंबरी या प्रकारात पडेल की नाही, याबद्दल खुद्द लेखकालाही शंका वाटत होती, हे इंग्रजी प्रस्तावनेवरून उघड आहे.[1] घाशीराम या एकाच व्यक्तीला अठ्ठावीस 'गोष्टींतून' लेखकाने स्थान दिले आहे खरे, पण ते स्थान अनेक गोष्टींत केवळ श्रोत्याचे आहे व काही प्रश्न त्याच्या तोंडी असले, तरी त्या प्रश्नांना 'पुढे काय?', 'हे कसें' यापलीकडे अधिक आशय नाही. निरनिराळ्या प्रकरणांना (इंग्रजी अनुक्रमणिकेत यांना Sections म्हटले आहे,) मराठीत 'गोष्टी' म्हटले आहे, तरी त्यांत गोष्टीही बहुतांशी नाहीत. शास्त्रीय, चरित्रात्मक, हरहुन्नरी किंवा केवळ वर्णनात्मक असा भाग अनेक 'गोष्टीं'त आला आहे. दक्षिणा प्राइझ् कमिटीच्या या पुस्तकावरील अभिप्रायात 'Calculated to afford instruction' (उपयुक्त माहितीपर) म्हणून जो उल्लेख आहे, तोच बहुतांशी बरोबर आहे. या माहितीच्या जोडीला लेखकाचा न्यायखात्यातील हुद्दा, रावबहादुरी, न्या. रानड्यांचा स्नेह आणि पुनर्विवाह करून कर्ता सुधारक होण्याची त्याने दाखविलेली धडाडी इत्यादी वाङ्मयबाह्य उपाधींचे वजनच या पुस्तकावर चांगुलपणाचे बहुत शिक्के पडण्यास कारणीभूत झाले असावे. निरनिराळ्या शास्त्रीय आणि उपयुक्त माहितीशिवाय या ग्रंथात गोष्टींच्या जवळ येणारा असा पुष्कळसा चुटकेवजा भाग आहे झोपेत चालणाऱ्या लोकांविषयीचे किंवा हत्तींच्याकडून करावयाच्या कामाविषयीचे चुटके ही या प्रकारची उदाहरणे म्हणता येतील. प्रत्यक्ष कथात्मक म्हणता येईल, असा गोष्टीवजा भाग ५–६ प्रकरणांत आला आहे. त्यांपैकी एका पोराच्या आईपणाविषयीचा दोन बायकांमधील तंटा किंवा विजापूरच्या समशेरखान कोतवालाने अबीराच्या चोरीचा शोध लाविल्याची गोष्ट याचे स्वरूप सुपरिचित असून ते बादशहा-बिरबलछाप गोष्टींच्या किंवा चातुर्य-कथेच्या जातीचे आहे. त्यांचा घाशीराम कोतवालाशी संबंधही नावापुरताच असून घाशीराम अक्कलशून्य होता, हे दाखविण्यासाठी लेखकाने तो योजिला असला, तरी त्याला ऐतिहासिक आधार नाही. उरलेल्या कथांपैकी काही कथा या अरबी-फारसी संग्रहांतून उतरलेल्या दिसतात. उदा. बोलणाऱ्या हिरामण पोपटाची गोष्ट. घाशीरामाची मुलगी ललितागौरी हिला मूल होत नव्हते. सर्व उपाय झाल्यावर तिला 'सत्संग' घडावा, म्हणून गोऱ्यागोमट्या 'शाक्तां'च्या सेवेत ठेविल्यावर तिला योग्य वेळी मुलगा झाला व नंतर घाशीराम आपल्या जावयाबद्दल फुशारकी मारू लागला. अशा आशयाच्या गोष्टीचा शेवट अस्सल व्यभिचारकथेला साजेसा आहे. त्यावरून ह्याही कथेची जातकुळी समजू शकते. किमयेबाबत घाशीरामाची झालेली फसवणूकही याच वळणात जमा होण्याजोगी आहे. घाशीरामाच्या कारकीर्दीचा जो दुर्लौकिक झाला होता, त्यामुळे त्याच्या काळच्या

1. Though from the variety of topics introduced in the volume it may be a question whether it can properly be classed as a novel...

वातावरणाशी सुसंगत वाटेल, अशी एकच सुरवातीची गोष्ट या संग्रहात आहे. अरबी ग्रंथ विकणारांशी घाशीरामाने केलेली दगलबाजी व तीबाबत इंग्रज अधिकाऱ्याकडून त्याने न्याय मिळविण्यासाठी केलेली युक्ती याबाबतची गोष्ट ही अर्धी ऐतिहासिक वातावरणाची व अर्धी चातुर्यकथा-वळणाची म्हणावी लागेल. ललितात घाशीरामाची झालेली फजिती ही वातावरणामुळे स्वकीय वाटते. एकूण, सामान्यतः असे म्हणावे लागेल की, या संग्रहाला अनेक-विद्या-संग्रह असेच नाव शोभण्यासारखे आहे. त्यातील ' घाशीराम कोतवाल ' हा नावापुरताच ऐतिहासिक आहे.

### मोचनगड

' घाशीराम कोतवाल ' नावापुरता ऐतिहासिक आहे, तर त्याच्या नेमका उलट रा. भि. गुंजीकर ( १८४३-१९०१ ) यांचा ' मोचनगड ' ( १८७१ ) हा नावापुरताच काल्पनिक आहे. ' मोचनगडा 'चा नायक गणपतराव हा आपल्या जोडीदारासह दोन वर्षे तुरुंगात खितपत पडला होता. ते दोघे भित फोडून बाहेर पडले. गणपतराव व त्याची पत्नीही गंगूबाई अनेक संकटांत सापडली. शेवटी शिवाजीमहाराजांनी किल्ला घेतल्यावर चौकशी होऊन या उभयतांचा जीवनक्रम सुखी झाला. ही लहानशी कथा सांगतांना गुंजीकरांनी प्रत्यक्षतः शिवाजीमहाराजांना फार उशिरा कथानकात गोवले आहे. कथेचा बहुतेक भाग गणपतराव व गंगूबाई यांच्यावरील संकटांनी व्यापला आहे. त्यात दुष्ट वासना धरणारा सटवाजीराव शिलेदार आहे. प्रथमतः त्याची सहायक होऊन नंतर पश्चात्ताप पावलेली कोयना मोलकरीण आहे. सटवाजीरावाची फटफजिती करून गणोबाला व गंगूबाईला हरतऱ्हेने उपयोगी पडणारा पोऱ्या दौलत्या आहे. त्यांची ही कथा वाचताना अनेक वेळा हरिभाऊ आपट्यांच्या नंतरच्या काळात गाजलेल्या ' उषःकाल ' कादंबरीची आठवण होते, गणोबा – नानासाहेब, गंगूबाई – चंद्राबाई, दौलत्या सावळ्या इत्यादी पात्रयोजनेचे व काही प्रसंगांचेही साम्य वाटते. मोचनगड या कादंबरीतील आणखी एक मनोज्ञ विशेष म्हणजे वातावरणनिर्मिती. कादंबरीच्या अखेरीला आलेल्या शिवाजीमहाराजांच्या नावाखातर नव्हे, तर अव्वलपासून अखेरपर्यंत मराठेशाहीच्या आरंभीच्या परिस्थितीचा जो ठसा गुंजीकर उमटवू शकले, त्याच्यासाठी तिला ऐतिहासिक म्हटले पाहिजे. गुंजीकरांच्या या विशेषाचे कौतुक वाटते, ते सरमिसळीने अद्‌भुतरम्यता निर्माण करण्यात इतर लेखक गुंतले होते, तेव्हा हे विशुद्ध वातावरणाची कथा निर्माण करू शकले याचे. दौलत्यासारख्या पात्राच्या निर्मितीने गुंजीकरांनी विनोदी पात्र-रचनेचाही नवा पायंडाच पाडला, असे म्हणावयास हवे.

### हंबीरराव व पुतळीबाई

गुंजीकरांच्या खालोखाल उल्लेखिता येईल, अशी आणखी एक ऐतिहासिक कादंबरी म्हणजे विष्णू जनार्दन पटवर्धनकृत ' हंबीरराव व पुतळीबाई ' (१८७३) ही होय हंबीरराव हा नानासाहेब पेशवे यांचा आश्रित व पुतळीबाई ही त्याची दुसऱ्या संबंधाची पत्नी. या पत्नीच्या संबंधात हंबीररावाची पहिली पत्नी सुंदराबाई व तिचा

नातलग सुभानराव हे संशय निर्माण करितात. त्यामुळे हंबीरराव पुतळीबाईला माहेरी घालवून देतो आणि नंतर तिच्याविषयीचा त्याचा संशय नाहीसा होतो. आणि शिवाय, तिच्यामुळेच हंबीररावाचे प्राण वाचतात, ही काल्पनिक कथा इ. स. १८५७-च्या युद्धाशी सुसंगतपणे जोडण्यात आली आहे. ब्रह्मावर्तात नानासाहेब पेशव्याच्या मनात आलेले बंडाचे विचार, त्याने दिल्लीच्या बादशहाशी केलेला पत्रव्यवहार, कानपूर, अलाहाबाद इत्यादी ठिकाणांचा उठाव, सुरवातीला देशी फौजांना मिळालेले यश आणि अखेरीस त्यांचा पराभव होऊन नानासाहेबाला झालेली अटक आणि त्याची हंबीररावाच्या युक्तीने सुटका होऊन नेपाळात पलायन इत्यादी ऐतिहासिक किंवा तत्सदृश घटनांचाही या कादंबरीत समावेश करण्यात आला आहे. इ. स. १८५७-च्या उठावानंतर केवळ अठरा वर्षांनी ही कादंबरी लिहिली गेली; तथापि ग्रंथकर्त्याने आपल्याला ' बंडाविषयीची विशेष माहिती असण्याचा संभव नाही, हे प्रस्तावनेतच सांगून टाकिले असून ही माहिती ' कांहीं त्या वेळचे वर्तमानपत्रातून व कांहीं त्या वेळचे संबंधाने झालेले ग्रंथांतून ' घेतली असल्याचा खुलासा केला आहे. कादंबरी दक्षिणा प्राइझ्-कमिटीच्या बक्षिसाच्या जाहिरातीवरून लिहिली गेली. या साऱ्या पार्श्वभूमीत ग्रंथकर्त्याची इंग्रजी राजवटीच्या कालातील ' राजनिष्ठा ' आणि पेशव्यासंबंधाने किंवा स्वराज्यासंबंधाने वाटणारी ' आपुलकी ' यांमुळे ओढाताण होण्याचा संभव खूप होता. तरी ग्रंथकर्त्याने इंग्रजांविषयी या कादंबरीत प्रतिकूल मजकूर लिहिला आहे, हे विशेष जाणवते. नानासाहेब पेशवे हा आपल्या बापाप्रमाणे, रावबाजीप्रमाणे, ब्राह्मण-भोजनांत गुंग झाला होता, हे दाखविण्यात चूक झाली असून ती द. प्रा. कमिटीच्या सभासदांनी दाखवून दिली आहे. त्याचप्रमाणे लॉर्ड कॅनिंगसंबंधीचे प्रतिकूल उद्गार चुकीचे आहेत, असे मत टॉमस कॅण्डी आणि इतर काही सभासद यांनी काढिले आहेत. तथापि एकंदरीत ऐतिहासिक कादंबरी या नात्याने सुरुवातीच्या काळात ' हंबीरराव व पुतळीबाई ' ही पुष्कळ चांगल्या प्रतीची कृती वाटते. मोगल बादशहाच्या वाड्यात हंबीरराव गेला असताना बादशहाच्या ताजबी या सुनेने एकदम त्याच्यावर लुब्ध होऊन त्याला आपल्या महालात आणण्याची व्यवस्था करणे व राजकाजावर लक्ष देऊन हंबीररावाने तिची इच्छा पुरी करणे किंवा पुतळीबाईवर किटाळ आणण्याकरता तिचा सवतीने नानासाहेबांच्या भावाच्या महालात तिची चोळी टाकण्याचे कारस्थान करणे अशा प्रसंगी काही प्रमाणात शृंगारकथांच्या पठडीची छाया पडल्यासारखी वाटते; परंतु सामान्यतः ही कादंबरी भोवतीच्या अद्भुतरम्य निर्मितीत वेगळेपणाने उठून दिसणारी आहे. मोगलांशी बोलताना फारसी-उर्दू भाषा वापरण्याचा प्रयोग आणि एकट्या सुभानरावाच्या तोंडी कुणबाऊ भाषा घालण्याचे धोरण ही मात्र खटकतात.

### शिक्षक

द्वा. ना. रणदिवे यांनी लिहिलेल्या ' शिक्षक ' ( १८८३ ) या कादंबरीत लॉर्ड डलहौसीच्या संस्थाने खालसा करण्यासाठी दत्तक नामंजूर करण्याच्या धोरणाचा भाग

पार्श्वभूमी म्हणून आला आहे. रावराजे ज्याला दत्तक घेणार होते, त्या बाळासाहेबाशी सेनापतिकन्या सुंदरा हिचा विवाह ठरलेला असतो. पण दत्तक मंजूर होणार नाही हे कळल्यावर तो विवाह मोडतो व बाळासाहेब देशोधडीला लागतो, हा या कादंबरीचा मुख्य भाग. पण कादंबरीचे लेखक सरकारी नोकर असल्यामुळे बहुशः धोरण म्हणून त्यानी बाळासाहेबाचे शिक्षक व त्याच्या जीवनातील पाठिराखे नारायणराव यांना प्रमुख स्थान देऊन कादंबरीला नावही 'शिक्षक' असे दिले. कादंबरी अपूर्ण आहे.

**रानडे : 'शिलादित्य'**

नाट्यकथार्णवाचे कर्ते शंकर मोरो रानडे यांनी लिहिलेली शिलादित्य (१८७९-१८८४) ही कादंबरीही वातावरणाच्या दृष्टीने ऐतिहासिक म्हणावी लागेल. किंबहुना, कथानकापेक्षाही वातावरणनिर्मिती हाच या कादंबरीचा अधिक महत्त्वाचा विशेष असल्याने अनेक इंग्रजी व संस्कृत ग्रंथांच्या आधारे रचिलेल्या या कादंबरीत कोणतीही निश्चित ऐतिहासिक व्यक्ती वा घटना नसूनही तिला अन्य प्रकारात घालता येणार नाही. या कादंबरीत कथानक आठव्या शतकातील (शके ७०१) आंध्रप्रदेशातील असून हिंदू राजाच्या कारकीर्दीतील छळाला कंटाळून बंड करावयाला निघालेल्या जैन-बौद्ध लोकांची हकीकत यात दिली आहे. शिलादित्य हा महाराष्ट्रीय शिपाई धर्ममताने जैन असून तोच या कादंबरीचा नायक आहे. जैनधर्मी भद्रमणी याची मुलगी त्रिवेणी ही नायिका. जैन यती जीर्णतत्त्व व जरठकर्ण हे भद्रमणी, वसुभद्राचार्य व कार्तिकशंभू इत्यादी प्रतिष्ठितांकरवी एक व्यूह रचितात. शिलादित्यही त्यात सामील होतो. व्यूह यशस्वी होणार नाही, अशी भविष्यसूचक चिन्हे पाहूनही शिलादित्य राजगृहाच्या भुयारातून दारूचा स्फोट करण्याचा बेत सोडीत नाही व त्यात पकडला जातो. ही 'राजकीय' कथा, आणि त्रिवेणीशी लग्न करून आपल्या कार्याला तिच्या बापाचे व पैशाचे पाठबळ मिळवू इच्छिणारा कार्तिकशंभू, त्रिवेणीवरील प्रेमामुळे स्वतः जैन नसून जैनांना मदत करणारा वसुभद्राचार्य व या दोघांना बाजूला टाकून पराक्रमी शिलादित्याशी विवाह करणारी त्रिवेणी — यांच्या प्रणयकथेचे चित्रण हा कथात्मक आकर्षणाचा भाग या गोष्टी शिलादित्य कादंबरीत आहेत. त्यामुळे तिची रचना काही अंशी पुढच्या काळात गो. ना. दातारांनी अनुवादिलेल्या रेनॉल्ड्सच्या काही कादंबऱ्या-सारखी झाली आहे. पण रानड्यांचे खरे बळ आठव्या शतकातील वातावरणाचे वेगळेपण दाखविण्यासाठी योजिलेल्या मृच्छकटिकादी नाटकांतील आणि महाराष्ट्रीय भाषेतील विशिष्ट शब्दप्रयोगाच्या सूचक उपयोगात आहे. मुसलमानपूर्व कालातील वातावरणाचे यशस्वी चित्रण इतक्या प्रमाणात नंतरच्या काळातही कोणाला साधलेले दिसत नाही. शिलादित्य कादंबरीच्या दोनच भागांचा उल्लेख ग्रंथसूचीमध्ये असून तेवढ्यात कादंबरी पुरी झाल्यासारखे मात्र वाटत नाही.

हरि विनायक बर्वे पनवेलकर यांनी 'रिचर्डाचे चरित्र' (१८७४) या नावाने स्कॉटच्या आयव्हॅनोचे भाषांतर या कालात केलेले आढळते.

## पौराणिक बखरी

अव्वल इंग्रजीत मल्हार रामरावाच्या ऐतिहासिक बखरीहून वेगळ्या ठरणाऱ्या अशा सुमारे वीस पौराणिक बखरींची नोंद आढळते. या बखरींतील बहुसंख्य बखरी या रामायण-महाभारतांच्या कथांवर किंवा उपकथांवर रचिलेल्या आहेत. त्यांपैकी सर्वांत जुनी ( १८४५ ) बकासुराची बखर रामचंद्रशास्त्री ( जोशी ? ) यांची आहे. नीलकंठशास्त्री थत्ते यांनीही काही बखरी लिहिल्या आहेत. पुष्कळशा बखरींवर फक्त प्रकाशकाचे ( गोडबोले ) नाव आहे. रामचंद्रशास्त्री जोशी यांच्या 'श्रीमद्भागवताच्या संक्षिप्त बखरी'त ( १८५४ ) १२ स्कंध व ३३५ अध्याय यांचा सारांश गद्यरूपाने दिला असून प्रत्येक अध्यायास एकेक परिच्छेद देण्यात आला आहे व त्या परिच्छेदाचा शेवट ठराविकपणे ' इतकी कथा या अध्यायात आहे, ' या वाक्याने केला आहे. असे जरी असले, तरी प्रथम परिच्छेदांत कथात्मक भाग फारसा नसून तात्त्विक किंवा नीतिपर भागच अधिक आलेला आहे. त्या मानाने थत्ते-डोंगरे यांची ' विराटपर्वाची बखर ' ( १८६२ ) ही अधिक कथनपर आहे. प्रस्तावनेत लेखकांनी " मूळचा अभिप्राय व कथाभाग न सुटता यथास्थित व सविस्तर " रचना केल्याचे सांगितले आहे. तथापि याही कथनाचा सारा थाट आणि घाट संस्कृतप्रचुर भाषांतराचा आहे, हे पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल —

" ...... त्याच संवत्सरात कोणे एके दिवशी देवगर्भासारिखी जिची कांति, देवतेसारिखीच केवळ संचार करणारी अशी द्रुपदात्मजा जी द्रौपदी इते अवलोकन करून कीचकनामा विराटाचा सेनापती कामाग्नीने संतप्त होत्साता सुदेष्णेप्रत येऊन हास्य करीत होत्साता तिजप्रत भाषण करितो, हे भामिनी, मी ही विराटराजाचे गृहीं कधीं पूर्वी पाहिली नाहीं. जशी मदिरा आपले गंधाने उन्मत्त करिते, तशी ही आपल्या रूपेकरून मला उन्मत्त करिती जाहाली !" ( पृष्ठे ४३—४४ )

अर्थातच हे पौराणिक बखर-गद्य ' बखर ' या शब्दापलीकडे कोणत्याही अर्थाने ऐतिहासिक बखरीशी निगडित नाही. मुद्रणाने गद्यकथनाची सोय व आवश्यकता निर्माण केल्यानंतर रामायण-महाभारतांचे गद्य अवतार घडविण्याचा हा संस्कृत परंपरेतील शास्त्रीमंडळींचा प्रयत्न आहे एवढेच. त्याला त्यांनी संस्कृत पारिभाषिक ' इतिहासोद्भव ' या शब्दाच्या आधारे बखर म्हणण्याचा प्रयत्न केला असावा, किंवा कोणत्याही भूतकालीन कथनाला ' बखर ' म्हणतात, असा समज तरी झाला असावा. मात्र या पौराणिक बखरीत एक विशेष असा आढळतो की, जेथे रामकथा किंवा महाभारतकथा किवा भागवत यांचा विस्तृत आवाका न घेता त्यांतील उपाख्यानेच सांगण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे, तेथे कथन थोडे अधिक प्रमाणात साधले आहे. या प्रकारचे उदाहरण म्हणून ' नलराजाची बखर ' ( १८५७ ) या पुस्तिकेचा उल्लेख करिता येईल. ३"×६" या छोटेखानी आकाराच्या तीस पृष्ठांच्या मोडी पुस्तिकेत नलाची कथा धावत्या शैलीने सांगितली आहे. त्याचप्रमाणे ' लहुअंकुशाची बखर '

( १८६१ ) या मोठ्या आकाराच्या ( ६" × ७" ) सोळा पृष्ठांच्या ( मोडी ) पुस्तिकेत सीतात्यागापासून पुढचे कथानक असेच थोडक्यात सांगण्यात आले आहे. ' वालिवानराची बखर ' ही लहानशी म्हणजे अवघी तेरा पृष्ठांची आहे. रामायण-महाभारतांखेरीज उल्लेखण्याजोग्या बखरींपैकी ' काशीखंडाची बखर ' हीही आहे. एक बखर किरात-आख्यानावरील आहे. ' बाबाजीची बखर ' आणि ' चंद्रहास्य राजाची बखर ' यांचाही उल्लेख करावयास हवा.

## पाच

## अद्‌भुतरम्य कथा-कांदबरी

### ' मुक्तामाला ' आणि ' रत्नप्रभा '

अव्वल इंग्रजीतील कथा-कादंबरी-वाङ्मयातील प्रधान प्रवृत्तीचे दर्शन घडविणारी प्रातिनिधिक कादंबरी म्हणून ' मुक्तामाले'चा उल्लेख केला पाहिजे. मुक्तामालेचे कर्ते हळबे ( १८३१–१९०५ ) हे मूळचे वाईचे, संस्कृत शास्त्र्यांच्या परंपरेतील. त्यांचा मुंबईस ' इंदुप्रकाश ' या वृत्तपत्राशी संबंध आला रा. ब. दादोबा पांडुरंगादींनी स्थापिलेल्या ' परमहंस-सभे'चेही ते सभासद होते स्वतः ' चंद्रिका ' नामक मासिक पुस्तक काढीत असल्याचा उल्लेख त्यांनी ' रत्नप्रभे'च्या प्रस्तावनेत केला आहे. त्यातच प्रथमतः ' रत्नप्रभा ' कादंबरीचा बराचसा भाग फुटकळ रीतीने प्रसिद्ध झाला होता. पण पुढे ' मुक्तामाला ' ही कादंबरी प्रथमतः ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाली. तिला चांगला राजाश्रय व लोकाश्रय मिळाला. त्यावरून उत्तेजन येऊन ' रत्नप्रभा ' कादंबरी मुळापेक्षा ' बराच फेरफार ' करून ग्रंथरूपाने प्रकाशात आली. साहजिकच मूळ लेखनक्रमाने रत्नप्रभा आधीची असली, तरी लौकिकदृष्ट्या आधी 'मुक्तामाला' आणि नंतर ' रत्नप्रभा ' हाच क्रम राहिला.

' मुक्तामाला ' ( मुक्तमाला ) या कादंबरीची नायिका मुक्तामाला ही शांतवर्मा या जहागिरदाराची मुलगी. तिच्या जन्माआधी शांतवर्म्याने शुक्लाक्ष नावाचा आप्त मुलगा पाळून त्याला आपल्या ओळखीने जयपूरच्या राज्यात हुद्द्याची जागा मिळवून दिली होती. मुक्तामालेचा जन्म झाला नसता, तर शांतवर्म्याची जहागीरही शुक्लाक्षास मिळावयाची; पण या मुलीच्या जन्माने तो बेत फिसकटला, म्हणून गुप्तपणे त्याचा दुष्टावा सुरू झाला. मुक्तामालेचे लग्न यथाकाल राज्यातील दुय्यम प्रधान धनशंकर याच्याशी झाले. त्या वेळचा राजा ' भयानक ' आणि त्याचे गदाधरपिंगाक्षप्रभृती सचिव

१. हळबे, लक्ष्मण मोरेश्वर. ( १८३१–१९०५ ) वाई, मुंबई

जुन्या पद्धतीने संस्कृताचे अध्ययन. वृत्तीने सुधारक. ' चंद्रिका ' ( १८५६ ) मासिकाचे संस्थापक, ' इंदुप्रकाशा'चे आरंभीचे व्यवस्थापक. लेखन : मुक्तामाला ( १८६१ ), रत्नप्रभा ( १८६६ ) या कादंबऱ्या, ' मराठी ज्ञानप्रसारक ' मासिकांत कवितालेखन.

यांचा जुलमी कारभार चालू होता; त्यास शुक्लाक्षाची साथ मिळाली. राज्यातील जुने जाणते लोक बंड करून भयानकाची उचलबागडी करण्याच्या तयारीत होते. याचा फायदा घेऊन नाचरंग-शिकारी यांच्या नादात भयानक आणि त्याचा परिवार राजधानीतून बाहेर गेला असताना शुक्लाक्षाने त्यांच्यावर हल्ला करवून, आपण निवडक लोकांनी त्यांची सुटका केल्याचा देखावा केला व कटाची चौकशी करण्याच्या निमित्ताने त्या कटाचा आळ धनशंकरावर घालून त्याला कैदेत टाकिले. नंतर ही बातमी मानभावीपणे मुक्तामालेचा पिता व आपला मूळ आश्रयदाता शांतवर्मा याच्या कानी घालून धनशंकराची मुक्तता करण्याचा प्रयत्न करण्याचे ( खोटे ) वचनही दिले. शांतवर्म्याची संपत्ती आणि जहागीर पदरात पडण्यास अजून मुक्तामालेची अडचण होती. ती दूर करण्यासाठी तिच्या रूपाची वाखाणणी त्याने स्त्रीलंपट भयानक राजापाशी केली. पण त्याचा हेतू मुक्तामाला ही भयानकास प्राप्त करून देण्याचा नसून तिचा नाश करण्याचा होता. नवऱ्याच्या कैदेची बातमी ऐकून शोकविव्हल झालेली मुक्तामाला शुक्लाक्षानेच सहेतुकपणे पाठविलेल्या एका पंचाक्षऱ्याच्या नादी लागली पंचाक्षरी-बोवालाही मुक्तामालेचा मोह पडून त्याने तिला एका गुहेत नेले. तेथून तिची दैवयोगाने अचानक सुटका झाली व मागावर असलेल्या शुक्लाक्षापासून तिला धनशंकराच्या नोकराने सोडविले. प्रवासात ती एका मुसलमान राजाच्या कैदेत पडली. त्या वेळी मुक्तामाला पुरुषवेषात असल्याने तिच्यावर मुसलमान राजकन्या मोहित होऊन प्रेम करू लागली. तेथून तिची कशीबशी सुटका झाली, तो पुनः ती शुक्लाक्ष आणि स्थानिक अधिकारी भद्राक्ष यांच्या तावडीत सापडली. भद्राक्षालाही ती हवीशी झाली. भद्राक्ष व शुक्लाक्ष हे दोघेही मुक्तामालेचे शत्रूच, पण त्यांचे हेतू भिन्न; म्हणून भद्राक्षाने तिचा शुक्लाक्षाच्या हेतूप्रमाणे नाश केल्याचे सांगून तिला एका निर्जन बेटावर बंदोबस्तात ठेवले. शांतवर्म्याचा आश्रित आणि मुक्तामालेला बहीण मानणारा सोमदत्त तिच्या शोधासाठी निघाला होता. तो कैदेत पडून तेथून सुटला असता वादळात सापडला व त्याचमुळे अवचित मुक्तामाला असलेल्या बेटाला लागला. उभयतांची भेट झाल्यावर सोमदत्ताने मुक्तामालेची सुटका केली. प्रवासात त्यांच्यावर संकटे आली. दरम्यान मुलीचा शोध लागत नाही, म्हणून शांतवर्मा कुटुंबासह तीर्थयात्रेला निघाला होता. धनशंकरही युक्तीने कैदेतून सुटून बैराग्याच्या वेषाने हिंडत होता. ही सर्व मंडळी योगायोगाने एकत्र आली आणि शेवट गोड झाला. याच सुमारास भयानकाच्या राज्यातील जाणत्या माणसांची बंडाळी यशस्वी होऊन भयानक व त्याचे मंत्री यांचा पाडाव झाला आणि नंतर धनशंकराला मूळचा अधिकार प्राप्त होऊन, त्याला व मुक्तामालेला संकटात पाडणाऱ्या दुष्टांचे पारिपत्य होऊन मूळच्या आनंदात भर पडली.

सुमारे १७५ पृष्ठांच्या कादंबरीचे कथानक हे असे आहे. हे कथानक नऊ 'भागां'त मांडण्यात आले असून प्रत्येक भागाच्या आरंभी त्या-त्या भागाचा

ढोबळ सारांश देणारा सुभाषितवजा श्लोक दिला आहे. यांपैकी बहुसंख्य भागांची सुरुवात निसर्गवर्णनाने होते. मुक्तामाला, घनशंकर, भद्राक्ष, शुक्लाक्ष, भयानक इत्यादी व्यक्तींचा परिचय करून देताना आरंभीच त्यांचा सुष्ट-दुष्टपणा हळब्यांनी सांगून टाकिला आहे; आणि या त्यांच्या स्वभावात अखेरपर्यंत फरक पडत नाही. कारण उघडच आहे. हळबेशास्त्र्यांनी व्यक्तिस्वभाव हे स्थिर असल्याचे गृहीत करून मुक्तामालेच्या पहिल्या भागातील प्रास्ताविकात म्हटले आहे की, "ईश्वरी नियमास अनुसरून जे लोक नीतीने वागतात, त्यांस कितीहि संकटे प्राप्त झालीं तरी, तीं सर्व दूर होऊन त्यांस शेवटी सुखच होते, ही गोष्ट स्पष्टपणे ध्यानांत येण्याकरिता एक इतिहास लिहितों. त्यावरून लोकांची वरील सिद्धांताविषयीं खात्री होऊन ते आपली वाईट वर्तणूक असल्यास, ती नीट करण्याविषयी झटूं लागतील असे वाटते." या प्रास्ताविकानुसार मुक्तामाला, घनशंकर आणि शांतवर्मा यांजवर संकटांमागून संकटे आली; आणि त्या सर्वांतून त्यांची सुटकाही झाली. अर्थातच अशी संकटपरंपरा निर्माण होणे व तिचा निरास होणे, म्हणजेच घटनाप्रधानता, हा या कादंबरीच्या रचनेचा विशेष अपरिहार्य झाला.

परंतु 'मुक्तामाला' ही कादंबरी घटनाप्रधान असली, तरी तो तिचा खास विशेष नव्हे. मुक्तामालेचा आणि तिने निर्माण केलेल्या युगधर्माचा वैशिष्ट्यनिर्देशक शब्द 'अद्भुतरम्यता' हा आहे. मुक्तामालेतील बहुसंख्य घटना या योगायोगावर किंवा अपघातावर आधारलेल्या आहेत, हे त्या अद्भुतरम्यतेचे एक अगदी वरवरचे अंग आहे. मुक्तामालेचे कथानक 'भूतकालीन' असले, तरी त्या भूतकालाची निश्चित आणि निःशंक व्याप्ती सांगता येत नाही; इतकी कालविषयक संमिश्रता त्या कथानकात आहे. तंत्रदृष्ट्या मुक्तामालेचे स्वरूप गद्यातील अभिजात (किंवा कृत्रिम) महाकाव्याच्या वळणाचे आहे. म्हणजे संस्कृतपद्धतीची रचनाशैली हे मुक्तामालेच्या अद्भुताचे एक महत्त्वाचे अंग आहे. त्याचा आणखी प्रत्यय शांतवर्मा, शुक्लाक्ष, पिंगाक्ष यांसारख्या विशेषनामांच्या योजनेतही येतो. कथानकाचे स्थल 'जयपूर' व त्याच्या आसपासचा प्रदेश हे असले, तरी त्या विशिष्ट निर्देशांपलीकडचे कोणतेही प्रादेशिक वैशिष्ट्य त्यात नाही. उलट, स्थलवर्णनात संस्कृत पद्धतीचा सर्वसमावेशक यादीवजा भाग अधिक आहे. राजा आणि त्याचे दरबारी यांच्या वर्णनांवर रावबाजीच्या काळातील घटनापरिस्थितीची छाप अधिक आहे. भयानक राजाच्या स्वारीच्या तयारीचा तपशील देताना बखरीतील मजकुराप्रमाणे "तमासगिराचे ताफे दोन, वारांगना गाणाऱ्या व नाचणाऱ्या मिळून पंधरा, पन्नास पैलवान, बहुतेक थट्टेबाज लोक" इत्यादी भाग आला आहे. तो बहुशः हळबेशास्त्र्यांच्या वेळच्या वृद्धमुखांतून किंवा लोकहितवादींच्या पत्रांतून येणाऱ्या रावबाजींच्या कारकीर्दीच्या हकीकतीवरून घेतलेला दिसतो; तर मुक्तामाला विधवा झाली असावी, या कल्पनेने निघालेली तिच्या केशवपनाची गोष्ट ही खुद्द शास्त्रीबोवांच्या काळातील चर्चाविषय झालेली अशी होती.

ती आणिताना मुक्तामालेच्या बापाचे नांव 'शांतवर्मा' हे क्षत्रियत्वसूचक असून क्षत्रियांत केशवपनाची चाल नव्हती, याचाही विसर पडलेला दिसतो. एवंच संस्कृत किंवा पौराणिक वळणाची रचनाशैली, ऐतिहासिक वातावरणाची बोलकी छाया आणि वर्तमानकालीन सामाजिक प्रश्न यांच्या सरमिसळीने मुक्तामालेच्या 'अद्‌भुतते'चे रसायन तयार झालेले आढळते. यात भर म्हणून मुक्तामालेने वेषांतरासाठी पठाणाचा पुरुषवेष घेणे व त्यामुळे तिच्यावर मुसलमान राजकन्या मोहित होणे हा आणखी भाग आला. तो संस्कृत आणि पर्शियन अशा दोन्ही प्रकारच्या वाङ्मयात आढळणारा होय.

मात्र असे असूनही 'मुक्तामाला' ही अद्‌भुतरम्य वळणाच्या कादंबऱ्यांतील केवल कालानुक्रमेच नव्हे, तर गुणानुक्रमेही अग्रेसर कादंबरी ठरली, ती तिच्यातील आणखी काही गुणांमुळे. मुक्तामालेतील संमिश्र वळणे ही भिन्नभिन्न असली तरी पुष्कळशी सुसंगत आहेत. भाषेचे एकूण स्वरूप संस्कृतनिष्ठ असले तरी त्या वेळच्या मानाने ते बोजड वाटणारे किंवा कृत्रिम नाही. ही वैशिष्ट्ये 'विचित्रपुरी'कर्ते जोरवेकर आणि 'मंजुघोषा'कर्ते रिसबूड यांच्यासारख्या नंतरच्या लेखकांच्या तुलनेने चटकन जाणवतात. आणखी एक विशेष म्हणजे तत्कालीन सुधारकांत मोडणाऱ्या हळब्यांच्या 'मुक्तामाला' या नायिकेच्या चित्रणात तिच्यावरील संकटातून निर्माण होणारा, एक स्त्रीविषयक खास जिव्हाळा आहे. त्या जिव्हाळ्यामुळे मुक्तामाला ही केवळ सांकेतिक वर्णनांची संकटग्रस्त सुंदर तरुणी अशी ठोकळेबाज नायिका न होता तिचे चित्रण अद्‌भुत वातावरणातही जिवंत आणि सहानुभूतियुक्त वाटते.

**'रत्नप्रभा'**

'रत्नप्रभा' कादंबरीतील नायिका रत्नप्रभा ही प्रवासी नायक विलासानंद याच्या दृष्टीस पडते. उभयतांचे प्रेम जमते. रत्नप्रभेच्या प्राप्तीसाठी विलासानंद तिची पालक मावशी ऋव्यादा हिचा परिचय करून घेतो. पण त्या परिचयातून ऋव्यादा आपली विषयेच्छा पुरी करून घेऊ इच्छिते. नंतर विलासानंद व रत्नप्रभा संकेतानुरूप पळून जात असता अपघात होऊन त्यांची ताटातूट होते व द्रव्यलोभी ऋव्यादा रत्नप्रभेचा विवाह म्हाताऱ्याशी लावून देते. विलासानंद बऱ्याच कष्टानंतर रत्नप्रभेला शोधीत तिच्या सासरी कनकपूरला येतो. तेवढ्यात ती विधवा झालेली असते. तिची युक्तीने गाठ घेऊन तो तिला पुनर्विवाहाचा विचार पटवून गुप्तपणे पुनर्विवाह करितो. रत्नप्रभा विलासानंदाबरोबर पळून जाण्याचा तयारीत असता तो बेत, संकेत फुटून फिसकटतो व ती कैदेत पडते. तिला कैदेत टाकणारी सासू, नणंद व सहायक पुराणिक यांची दुष्ट कृत्ये विलासानंदास कळून तो मित्राच्या साहाय्याने त्यांचा परिस्फोट करतो. त्यांना शिक्षा होते व नायक-नायिकांचे मीलन होते. स्थूलमानाने नायक-नायिका यांची भेट, संकटे, सुटका व मीलन या ठराविक कथानकाची व:पुष्कळ प्रमाणात मुक्तामाले-सारखी वाटणारी ही कादंबरी काही बाबतींत तिच्यापेक्षा वेगळी आहे. रचनादृष्ट्या मुक्ता-

मालेची सफाई रत्नप्रभेत नाही. त्यामुळे मूळ रचना मुक्तामालेच्या आधीची, हे प्रस्तावनेतील विधान पटते. विलासानंद प्रथमतः प्रवासास निघतो, त्या वेळी त्याच्या प्रथम पत्नीने, चंपकवल्लरीने केलेला शोक किंवा तत्सम वर्णने ही मुक्तामालेतल्यासारखीच आहेत. रत्नप्रभेच्या कथानकाचा काळ शके १५२४ किंवा इ. स. १६०२ असा दिला आहे. पण त्याचा कोणताही ठसा या कथेच्या वातावरणावर नाही. संस्कृतामधील काव्य-न्यायाची कल्पना हळबेशास्त्र्यांच्या मनात वावरत असावी, असे मानण्याला जागा आहे. कारण रत्नप्रभा ही नायकाशी पुनर्विवाह करते त्या वेळी नायकाचीही पत्नी मरण पावलेली असते. तिच्या म्हणजे चंपकवल्लरीच्या हकीकतीतही तिने नाकारलेला क्रूरकर्मा तिचा पाठलाग करून तिला संकटात पाडतो व त्यातच तिचा मृत्यू घडतो. ही हकीकत रत्नप्रभेवरील संकटाशी समांतर व पूरक वाटावी, अशी आहे. रचनापद्धतीत आलेल्या या विशेषाचा धागा या कादंबरीत उल्लेखिलेल्या पुनर्विवाहाच्या प्रश्नाशी एका परीने निगडित आहे. पण हा प्रश्न मात्र कादंबरीच्या कथेशी एकजीव झालेला नाही. कारण सुधारकपक्षातील हळबेशास्त्र्यांनी आपल्या कालात वादविषय झालेला पुनर्विवाहाचा मुद्दा नायक विलासानंद याच्या तोंडून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला असला, तरी तो कथानककालाशी शोभणाऱ्या रीतीने आलेला नाही. "तुझा व माझा पुनर्विवाह व्हावा, याखेरीज दुसरा मार्ग उरला नाहीं · पुनर्विवाह करणे ही गोष्ट अगदीं शास्त्रास सोडून आहे असें नाहीं, लोकांत प्रचार नाहीं एवढीच काय ती नड. या गोष्टींत आपण पातक केले असे विचारी लोक म्हणणार नाहीत, व तसे मानण्यास शास्त्राचा आधारही नाहीं," (प. आ. पृ. १११) इत्यादी विचार उघडपणे अव्वल इंग्रजीतील आहेत; एवढेच नव्हे, तर ते मांडण्यात बाबा पद्मनजीच्या 'यमुनापर्यटना'तील मांडणीची छाप आहे. कारण रत्नप्रभेच्या पुनर्विवाहाचा मुद्दा पटविण्यासाठी भोवती निर्माण केलेल्या वातावरणातही यमुनापर्यटनाप्रमाणे 'व्यभिचारी' वर्तनाच्या पार्श्वभूमीचा उपयोग केला आहे. रत्नप्रभेची सासू "महामाया बाईचीं कृत्यें मोठीं अघोर व भयंकर आहेत. आपली कन्या रेणुकाबाई हिची फजिती होऊं नये म्हणून एका दासीस, एक वर्ष झालें, ठार मारिली. रेणुकाबाईने दोन वेळ पोटचीं पाडलीं तीं अजी छपवून टाकिलीं. स्वतांहि स्वारी या कामांत प्रवीण होती. ...पुराणिक बाबा विद्वान् खरे, परंतु त्यांचा उपदेशाचा व हा जो दुसरा अनर्थ आहे तो लिहिवत नाहीं..." (पृ. १६९) इत्यादी वर्णनात नागपूर-पंढरपूर येथील ज्या हकीकती पद्मनजींनी सांगितल्या आहेत, त्यांचा स्पष्ट अनुवाद दिसतो. रत्नप्रभा आणि विलासानंद यांचा संकेत ठरल्याचे कळल्यावर तिची मावशी ऋव्यादा ही भाचीचा उल्लेख "लिहिणें वाचणें शिकून चवचाल झालेल्या आतांच्या काळच्या पोरी ह्या" असा करते, तोही कथानकाच्या कालापेक्षा लेखकाच्या काळाला उद्देशून असल्याप्रमाणे आला आहे. एकंदरीत स्वकालीन वैचारिक आंदोलन आणि संस्कृत वळणाचे पूर्वकालीन कथानक यांचा संकर रत्नप्रभेत झाला आहे. त्यामुळेच मुक्तामालेत्ता

गौरव रत्नप्रभेला लाभू शकला नाही.

## रिसबुडांच्या कादंबऱ्या

मुक्तामालेची प्रतिकृती म्हणून ओळखिली जाणारी, लोकप्रियतेत तिची बरोबरी करणारी (नववी आवृत्ती, १९०६), 'मंजुघोषा' (१८६६) आणि इतर दोन कादंबऱ्या या सोलापूर येथील 'हेडकारकून' नारो सदाशिव रिसबूड यांनी लिहिल्या. यांपैकी 'वसंतकोकिला' ही लेखकाच्या हातून पुरी होण्यापूर्वीच त्याला मृत्यू आल्याने ती लेखकाचे बंधू के. स. रि. यांनी पुरी केली. 'मंजुघोषा' या कादंबरीचा नायक वसंतमाधव हा चिनी डॉन या मनुष्याकडून कळीचे विमान घेऊन आपला मित्र प्रधानपुत्र आनंदघन व स्त्री आनंदवल्लरी यांसह निघाला असता विमानातून ती दोघे पडून वसंतमाधव एकटाच अमरपुरास पोहोचतो. तेथे सावकारपुत्र भालचंद्र याच्याकडून मंजुघोषेची माहिती मिळून, तो विरहव्याकुळ होतो व आपल्या कळीच्या विमानाच्या साहाय्याने तिच्या महालाच्या गच्चीवर उतरतो. उभयतांचा गांधर्वविवाह होतो. पण राजकन्येच्या सावत्रमातेच्या क्लृप्तीने वसंतमाधव पकडला जातो. नंतर युक्तीने सुटका होऊन वसंतमाधव व मंजुघोषा यांच्या विमानाला अपघात होऊन ती वेगवेगळ्या ठिकाणी फेकली जातात. इकडे आनंदवल्लरी व आनंदघन ही भटकत असतात. या सर्वांची योगायोगाने भेट होऊन आनंदीआनंद होतो व मंजुघोषेच्या बाबतीत आपल्या द्वितीय पत्नीच्यामुळेच केलेल्या अन्यायाबाबत तिच्या बापाला पश्चात्ताप होतो. अशातः आणि वरवर पाहता या कथेचा तोडवळा मुक्तामालेशी जुळता दिसतो हे खरे. फरक वाटतो तो अद्भुततेच्या प्रमाणाचा आणि भडकपणाचा. पण हा केवळ प्रमाणभेदाचा भाग नाही. हळबेशास्त्र्याच्या मुक्तामालेवरील संकटे अचानक आलेली असली, तरी ती सर्व पृथ्वीवरील आहेत. ती लौकिकातील अतिशयोक्ती आहे पण मंजुघोषेच्या बैठकीतच पृथ्वीवरील वातावरणापेक्षा अंतराळाचा आणि लौकिकापेक्षा अलौकिकाचा भाग नुसता अधिकच नव्हे, तर वेगळा आहे. हा वेगळेपणा कोठून आला, याचा उलगडा रिसबुडांची प्रस्तावना आणि ऐतिहासिक अनुसंधान यांनी करिता येतो. "आपल्या म्हणजे हिंदू लोकांच्या आयुष्यामध्यें अतिशय मोहक सद्गुण किंवा दुर्गुण हे दोन्हीही आढळत नाहींत, व हीच नाव्हल्सारखे ग्रंथ करण्यास हल्लीं अडचण होते," असे प्रस्तावनेत रिसबुडांनी म्हटले आहे. असे अतिशय मोहक म्हणजे बहुशः चटकन आणि सहजी ध्यानात येण्याइतके भडक गुण वा विकार यांचा आविष्कार करणाऱ्या अरबी गोष्टी, बहारदानीष या जातीच्या कथा रिसबुडांच्या रचनेच्या आधीच मराठीत आल्या होत्या. त्यांची छाया मंजुघोषेवर पडलेली दिसते. स्वतंत्र महालात एकटीच ठेविलेली मंजुघोषा ही 'गुलबकावली'च्या नायिकेचा देशी अवतार आहे. तिचे नुसते वर्णन ऐकून विरहव्याकुळ होणारा वसंतमाधवही त्याच कुळीतील होय. स्वतःच्या स्त्रीची आठवण एकदम बाजूला टेवून ह्या नव्या 'साहसा'त येण्याची वृत्तीही 'मुक्तामाले'च्या वळणातील नव्हे. मंजुघोषेत फारसी-अरबी

वळणापेक्षा निराळेपणा आहे तो वसंतमाधव राजपुत्राला एखादी जादू अथवा तत्सम वस्तू सहायक न होता त्याऐवजी आलेल्या कळीच्या विमानात. पण यातील विमान हे नावापुरतेच आहे. तशी नाममात्र घड्याळे आणि वाल्शीटेही आहेत. मंजुघोषेमधील स्थलवर्णनात मात्र काही प्रमाणात संस्कृतावलंबी पंडितकवींच्या पद्धतीची यादीवजा रचना आहे. त्यात स्थल-काल-ऋतुमान यांची पंडिती पद्धतीची सरमिसळही आहे. भाषेच्या बाबतीतील मंजुघोषेच्या कर्त्यांची कृत्रिमता आणि अनुप्रासांची हौस ही 'नावल आणि नाटक यांविषयींचा निबंध' लिहिणाऱ्या रा ब. मराठ्यांपासून टीकाविषय झाली आहे; तथापि ज्या पद्धतीने या अनुप्रासांवर "खाष्ट" टीका करण्यात आली, तिला पात्र व्हावी इतकी ती अलंकारप्रचुरही नाही, आणि अतिरिक्त कृत्रिमही नाही.

**'विश्वासराव' (१८७०)**

रिसबुडांची दुसरी कादंबरी 'विश्वासराव' ही नावावरून सामाजिक असावी, असा काहीजणांचा ग्रह झाला होता. तथापि ही कादंबरीही मंजुघोषेच्या वळणाची आहे. तिच्यापेक्षा कमी अद्‌भुत आहे. विश्वासराव हा सरदारपुत्र प्रवासानिमित्त उत्तर हिंदुस्थानात गेला असता तेथील राजकारणात सापडतो. दुष्ट प्रधानांच्या कारस्थानांतून राजाला आणि राज्याला सोडवितो आणि या प्रयत्नात अर्थातच त्यालाही एका सुंदर पत्नीचा लाभ होतो. वस्तुतः, ही कथा अधिक प्रमाणात मुक्तामालेशी तुलनीय आहे, पण रिसबुडांच्या तीन कादंबऱ्यात ही कादंबरी सर्वांत कमी ठाऊक दिसते. कारण मंजुघोषेच्या नामसाधर्म्याने तिला मुक्तामालेची जवळीक आणि लोकप्रियता मिळवून दिली, तर 'वसंतकोकिला' ही तिच्या अतिरिक्त अद्‌भुततेमुळे आणि दोन भावांनी ग्रंथ पुरा करण्याच्या घटनेमुळे लक्षात राहण्याजोगी झाली. वसंतकोकिलेतील अतिरिक्त अद्‌भुततेचे बीज उघडपणेच 'बहारदानीष' अथवा 'पर्शियन भाषेतील सुरस अणि चमत्कारिक कथा' आणि 'गुलबकावली' यांच्यामध्ये सापडणारे आहे. क्वचित खुद्द कादंबरीच्या कथेचाही काही ठसा असण्याची शक्यता आहे. या कथेतील कुसुमचाप हा राजपुत्र आपल्या मध्वनाथ या 'शापित' पोपटाच्या मार्गदर्शनाने चालणारा आहे. हा मध्वनाथ पोपट अनेक शास्त्रे पढलेला आहे. तो शरिराची स्थूल, सूक्ष्म आणि कारण ही शरीरे, मानवाच्या जागृत्, स्वप्न, सुषुप्ती या तीन अवस्था यांसारख्या तत्त्वज्ञानाच्या आणि अध्यात्माच्या परिभाषेतील बाबींची माहिती कुसुमचापाला सांगताना आढळतो. त्याच्याकडूनच कुसुमचापाला गौडबंगाल्यातील मणिपूर शहराच्या वसंतकोकिला या राजकन्येची व तिच्या सौंदर्याची माहिती आणि तिची अप्राप्यता वर्णन करून सांगतो. राजकन्येच्या अप्राप्यतेची आणि सौंदर्याची ही कथा बहारदानीषमधील बहारवरबानूच्या कथेच्या प्रकाराची आहे. त्या राजकन्येपर्यंत पोहोचताना अनेक तऱ्हांच्या जादूच्या आणि संकटांच्या प्रांतातून त्याला जावे लागते. अर्थात इतक्या सगळ्या अडथळ्यांच्या वर्णनानंतर कुसुमचापाला वसंतकोकिलेविषयी

अधिक ओढ लागते. त्यांतून तो तिच्यापर्यंत पोहोचतो आणि उभयतांचा विवाह होतो, हा या कादंबरीमधील मुख्य कथाभाग होय. वसंतकोकिलेतील पहिला अर्धाअधिक भाग हा मध्वनाथाच्या कथनांचा असून त्यात हा मूळचा सावकारपुत्र चंद्रकांत प्रवासात असता जादूच्या प्रदेशात सापडून पोपटाच्या स्वरूपात कसा गेला व त्या रूपातच वसंतकोकिलेच्या संनिध गेला असता तिचे दौत्य पतकरून कुसुमचापाकडे कसा आला, हा पूर्वानुसंधानाचा वृत्तांत आला आहे. या रचनाशैलीत बाणाच्या कादंबरीसारखा भाग म्हणता येईल तो हा. बाकीचा जादूविषयक भाग हा फारसीच्या अनुकरणाचा असला, तरी त्याला शाक्त वातावरणाचे रूप देऊन क्वचित वेगळेपणा आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. या कादंबरीतील आणखी एक भाग म्हणजे मध्वनाथाच्या तोंडी असलेले ज्ञान किंवा तत्त्वज्ञानविषयक विचार. मुख्यतः हे विचार सांगण्याच्या मिषाने रिसबूडबंधूंनी अनेक सुपरिचित सुभाषितांची पखरण कादंबरीत केली आहे. ना. स. रिसबुडांच्या पहिल्या दोन कादंबऱ्यांतही अनेक पद्यांचा उपयोग करण्यात आला असून त्यांत कटाव, श्लोक इ. अनेक प्रकार आले आहेत. मंजुघोषेच्या अखेरच्या भागात तर स्वतःचे व कृतीचे नाव चरणाच्या आद्याक्षरात घालण्याचाही प्रयोग केला आहे. गद्यरचनेतील ही पद्ययोजना म्हणजे गद्य सुप्रतिष्ठित होण्याच्या काळातील पद्याची बूज राखण्याची युक्ती दिसते. वसंतकोकिलेच्या भाषेत आणि वर्णनात संस्कृत शब्दांचा आणि संकेतांचा, प्रतीकांचा उपयोगही भरपूर प्रमाणात केला आहे.

मुक्तामाला-वळणाची अद्‌भुतरम्य रचना करणाऱ्या लेखकांत बहुसंख्य लेखक हे एकेका कथेतच दमछाक झालेले असले, तरी एकीहून अधिक कथांना स्पर्श करणारे जे थोडे आहेत, त्यांपैकी ग. वि. कानिटकर व गो. वि. कानिटकर हे दोन बंधू (?) होत. या दोघांच्या मिळून सात पुस्तकांतील पाचांच्या नावात 'मनोरंजक'— 'मनोवेधक' हे विशेषण आवर्जून आलेले आहे. यांचे ग्रंथ अनुक्रमे (१) 'मनोवेधक मधुसूदन व रूपसुंदरी' (१८७२), (२) 'मनोरंजक राजहंस-विजया' (१८७६), (३) 'हिरालाल' (१८७३); (४) 'मनोरंजक सुशिक्षित स्त्रीचरित्र' भाग १–२ (१८७२-७३), (५) 'मनोरंजक भद्रायु—कीर्तिमालिनी' (१८७६),(६) 'मनोरंजक सुदर्शन—शशिकला' भाग १ (१८७७), (७) 'अद्‌भुत चमत्कारसंग्रह' (१८७८) हे होत. पैकी पहिले तीन ग. वि कानिटकर यांचे व पुढचे चार गो. वि. कानिटकर यांचे आहेत.

ग. वि. कानिटकरांनी आपल्या दोन कादंबऱ्यांच्या प्रस्तावनांत काही विचार व्यक्त केले आहेत. एकीत ते म्हणतात, 'केवळ पोटासाठीं नच मी लिहिला ग्रंथचि माना। होउनि सर्वां बोध मतीमल झडवुनि पावे माना.' दुसरीत त्यांचे म्हणणे असे की, "आमच्या वाचकांमध्ये स्त्रियांची संख्या बरीच असल्यामुळें कविता वगैरे सामील न करतां सर्व पात्रांचीं भाषणें शुद्ध मराठी ठेविलीं आहेत. त्यावरून त्यांस

समजण्यास हरकत पडणार नाहीं." बोधमतित्वाचा आणि स्त्री-वाचकांचा हा उल्लेख 'मनोरंजक राजहंस-विजया' या कादंबरीत स्त्री-शिक्षणाविषयी जे अनुकूल उद्गार आहेत, त्यांच्या संदर्भात लक्षणीय आहे. मात्र असे असूनही ग. वि. कानिटकरांच्या कथानकात त्यांच्या उपरोक्त धोरणाच्या दृष्टीने अनुकूल असे काही आढळते. मधुसूदन-रूपसुंदरीच्या कथेत रूपसुंदरीच्याविषयी संशय आल्याने राजा तिला विकावयास काढतो व मधुसूदन सावकारपुत्र तिला विकत घेऊन तिच्याशी लग्न करतो. नंतर त्यांच्यावर जी संकटे येतात, त्यांत रूपसुंदरीच्या स्वरूपावर मोहित होऊन तिला ठेवून घेऊन मधुसूदनास हाकलून देणारा राजा आहे. त्यातून सुटका झाल्यावर त्यांच्यावर हल्ला करून त्यांना पळविण्याऱ्या जंगली टोळ्या आहेत. अनेकदा भेट व ताटातूट, त्यात राक्षसांचाही उपयोग होऊन शेवटी आनंदीआनंद आहे. या कथेच्या तुलनेने राजहंस आणि विजया ही नंतरची कथा थोडी कमी भडक आहे. भुवनपूरचा राजा राजहंस आणि विजया यांचा विवाह मोठ्या नाट्यमय पद्धतीने सुरुवातीस दाखविला आहे. नंतर राजा द्यूतात मग्न होतो व त्यामुळे शेजारच्या राजाकडून पराभूत होतो. नंतर विजया व राजहंस यांची ताटातूट होते. राजहंस दुसऱ्या राजाच्या येथे हुशारीने मोठ्या पदवीस चढतो व तेथील राजकन्या पद्मावती त्याच्यावर मोहित होऊन त्याच्याशी लग्न करिते. कालांतराने विजयेचीही भेट होऊन सर्व एकत्र येतात. विजयेचा मुलगा वसंतसेन व तिला आश्रय देणाऱ्या धनपाळाची मुलगी चित्रकला यांचा विवाह होऊन कादंबरी संपते. या कथेतील रचनेवर काही प्रमाणात नल-दमयंती-आख्यानाची छाप पडलेली दिसते. सुरवातीला विजया 'कमळण' या नावाने पत्र लिहून राजहंसाला आपले मनोगत कळविते, तो भाग 'स्त्री-वाचकांची' दखल घेणाऱ्या लेखकाच्या दृष्टीने लक्षात ठेवण्याजोगा आहे. ही कमळण लिहिते — 'मी उंच कुळांतील कमळणी असून माझे तारुण्य अगदीं भरात आलें आहे. यास्तव हे चतुर भ्रमरा! तूं मज समागमे विवाह करून सुखानें विषयसुखाचा उपभोग घे.' अर्थातच अशा पत्राने आरंभ होणाऱ्या कथानकात 'हास्यवदन चेहेरा, सुवर्णासारिखी कांति' इत्यादी सांकेतिक वर्णनांची रेलचेल आहे हे सांगणे नलगे

कानिटकरद्वयाच्या उरलेल्या ग्रंथांचा नमुना वरील मासल्याप्रमाणेच असावा, असे वाटते.

**'प्रभवमालिनी व कलावती' (१८६८)**

ही 'एक स्वदेशकल्याणेच्छु' यानी लिहिलेली कादंबरी. 'कलावती' ही कुलंग-देशची राजकन्या चंद्रकांत राजाने बदीत टाकलेली, पण तेथील राजपुत्र विजयध्वज याच्यावर प्रेम करणारी स्त्री होती. कलावतीचा भाऊ प्रतापसिंह हा चंद्रकांताच्या सेनापतीशी संधान बांधून कलावतीच्या सुटकेच्या प्रयत्नात असतो, तर स्वतः सेनापती प्रतापसागर हा राजकन्या प्रभवमालिनींचा अभिलाष धरून असतो व त्यासाठी विश्वासनिधि या दुसऱ्या सरदारावर राजकन्येविषयी कुवासना बाळगल्याचा आळ

आणून त्याला फासावर लटकविण्याचा बेत करितो. प्रत्यक्षतः प्रतापसिंह हल्ला करितो त्या वेळी सेनापतीच्या फितुरीने चंद्रकांताचा पाडाव होण्याच्या मार्गावर असतो; पण राजकन्या प्रभवमालिनी पुरुषवेषाने लढाईत पराक्रम करिते. त्याचप्रमाणे सेनापतीच्या कारस्थानाने दूरच्या जंगलात कैदेत पडलेला विजयध्वजही युक्तीने आपली सुटका करून घेऊन लढाईत भाग घेतो. अखेरीस सेनापतीच्या पक्षाचा पाडाव होऊन कलावती व विजयध्वज आणि प्रभवमालिनी व विश्वासनिधि यांचा विवाह होऊन शेवट गोड होतो. अशा प्रकारच्या या कादंबरीत कथानकाच्या वातावरणाशी सुसंगत नसलेल्या अशा भाषाप्रयोगांची योजना आढळते. दोन्ही नायिका राजकन्या असल्या, तरी त्यांपैकी एकीचा नवरा 'सव्वा रुपयाची शेरणी वाटीन,' अशी सामान्यजनाची भाषा बोलणारा आहे. त्याचप्रमाणे कलावतीचा भाऊ प्रतापसिंह लढाईवर जाण्यापूर्वी आईचा निरोप घेतो, तो शहरात शिकावयास निघालेल्या मध्यमवर्गीय मुलाने आईचा निरोप घ्यावा, अशा प्रकारच्या भाषेतील आहे. विजयध्वजाला जंगलात घेऊन जाणाऱ्या मारेकऱ्यांच्या तोंडी ग्रामीण भाषा घालण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे.

**'विचित्रपुरी'**

विचित्रपुरी (१८७०) ही केशव लक्ष्मण जोरवेकर यांची कादंबरी संमिश्र वळणाची म्हणावी लागेल. या कादंबरीचे पुष्पशीलादी चार नायक कलकत्ता विद्यापीठाचे एम्. ए. आहेत. त्यांनाही एक विमान मिळालेले आहे. प्रवासात 'मंजुघोषे'प्रमाणे अपघात व त्या अपघातातून अपरिहार्यपणे येणारे पुष्कळसे अद्भुत-रम्य प्रसंग आहेत. हे सर्व घडत असताना तिच्यात भुताखेतांवरील विश्वास, नरबळी देण्याची चाल इत्यादिकांचा उपहासही केलेला आहे. नायकाच्या वर्णनात किनखाबी पायजमे आणि बूट, रेशमी सदरे आणि त्यांवर वास्कुटे, कमरेला तरवार आणि हातांत पोच्या, गळ्यात मोत्यांचे कंठे असा सर्व तऱ्हेचा सरमिसळपणा आहे. जो प्रकार पोषाखाचा, तोच एकंदर वातावरणाचा आहे. कालातील अद्भुतता, मराठशाही व इंग्रजी सुधारणा या सर्वांची सरमिसळ झालेली आहे. पण एवढे पुरेसे नव्हते म्हणूनच की काय, कादंबरीच्या नंतरच्या आवृत्त्यांत लेखकाने संबंध कादंबरीवर आध्यात्मिक (?) रूपक बसवून ते स्पष्ट करण्याचा प्रयत्नही केलेला आढळतो. यांपैकी काही सुख्या भागावर लक्ष केंद्रित करून टीकाकारांनी या कादंबरीचा गौरव केलेला आढळतो.

**'सुहास्यवदना'** (१८७०) हे वामन कृष्ण देशमुख यांच्या कादंबरीचे आणि तिच्यातील नायिकेचे नाव. सुहास्यवदना आपल्या चुलतभावाच्या लग्नाकरिता चालली असता तिच्यावर हल्ला होतो. त्यातून तिची सुटका शिकारीसाठी आलेला चित्रसेन करतो. चित्रसेन व त्याचा भाऊ संपाती आणि त्यांचा मार्गदर्शक मित्र विद्याधरशास्त्री सुहास्यवदनेला आपल्या गावी नेतात. सुहास्यवदनेची खुशाली बापाला कळविण्यात आल्यावर तो तिला चुलतभावाकडे पोहोचविण्यास सांगतो. तिच्यावर डोळा ठेवणारे संपाती आणि शास्त्रीबोवा चित्रसेनाला दूर करण्याचा प्रयत्न करितात. पण

चित्रसेनाला भेटलेला एक पदभ्रष्ट राजा चंद्रमणी आणि त्याचा नोकर फागू यांच्या शहाणपणाने शास्त्रीबोवा व संपाती यांचे सर्व बेत विफल होतात; व शेवटी सर्व राज्ये एक होऊन ती सुहास्यवदनेसह चित्रसेनाला मिळतात.

'**चंपकमाला**' ( १८७१ ) ही अण्णा मार्तण्ड जोशी व विनायक पर्शराम बाबरे यांनी लिहिलेली कादंबरी मंजुघोषेच्या वळणाची आहे. शृंगारपूरचा राजपुत्र मदनविलास व प्रधानपुत्र शशिकांत हे विद्याभ्यासाऐवजी शस्त्रविद्येचे शिक्षण घेऊन अचानक प्रवासास जातात. अरण्यात भिल्लाचा पाहुणचार घेतात. तेथे त्यांना कोणा चंद्रकांताकडून कमळपूरची हकीकत कळते व ते तिकडे जाण्यास निघतात. कमळपूरची शोभा पाहताना मदनविलासाच्या कानी तेथील राजकन्या चंपकमाला, अवघी वय तेरा-चौदाची, पण संस्कृत नायिकेच्या सौंदर्याची खनी असलेली, हिची माहिती येते व तेवढ्यानेच तो 'माराच्या शरमारानें व्याकुळ' होतो. त्रिपुरसुंदरीच्या यात्रेत उभयतांची ( परस्पर ) दृष्टिभेट होते व त्यामुळे चंपकमालेची तल्खली होऊ लागते. राजाच्याही नजरेस मदनविलास पडतो. तेव्हा तो त्याच्याबद्दल चौकशी करितो. दरम्यान वाघाच्या शिकारीत आपले कौशल्य दाखवून तो जणू चंपकमाला जिंकण्याच्या 'परीक्षे'तील सर्व पायऱ्या उत्तीर्ण होतो. त्या उभयतांचा विवाह ठरतो, तेव्हा साहजिकच प्रधानपुत्र शशिकांत याचाही तेथील प्रधानकन्या रोहिणी हिच्याशी विवाह होतो. ही दोन्ही जोडपी गोदावरीच्या तीरी परत-प्रवासात पोहोचली असता नावा फुटून ताटातूट व विरह होतो; आणि नंतर पुनश्च परस्परभेट होऊन कादंबरीचा ठराविक शेवट होतो.

या कादंबरीतील पहिल्या चार भागांतील घटना या सरळ क्रमाने घडतात. त्यांचा भर अर्थातच वर्णनावर आहे. त्यातील नाट्याचा अभाव भरून काढण्यासाठीच की काय, पाचव्या भागातील नावा फुटण्याचा व ताटातुटीचा प्रसंग निर्माण करण्यात आलेला आहे. सर्वत्र वर्णने अतिशय लांबलचक, कंटाळवाणी आणि सांकेतिक आहेत. या वर्णनांवरून लेखकद्वयावर संस्कृत नाटकांची छाया पडलेली स्पष्ट होते. चंपकमाला व मदनविलास यांच्या विरहाचा व त्रिपुरसुंदरीच्या यात्रेतील दृष्टि-भेटीचा प्रसंग हा मृच्छकटिकातील संबंधित कथाभागाचा अनुवादसा वाटतो. त्याचप्रमाणे काही वेळा 'शाकुंतला'च्याही छायेत लेखक होते, हे स्पष्ट दिसते. बागेत असता चंपकमाला, आपली सखी कामदा हिला म्हणते —

चंपक — कामदे, ह्या वेलीजवळ आल्यें नाहीं तों, हा मेला कोण कानाजवळ गुंगुं करून चौफेर घिरट्या घालीत आहे ! ह्याला का गुंगण्याला दुसरे स्थळ नाहीं ?

कामदा— खरेंच बाईसाहेब, त्याला गुंगण्याला आतां दुसरें ठिकाण कोठून असणार ? त्या बिचाऱ्याची जागा जी सरोवरांतील सुंदर सुगंधित कमळीण, ती सूर्यास्तानंतर प्रफुल्लित होणार, म्हणून तो तें स्थळ मुक्त होईपर्यंत आपला वेळ वियोगांत न जातां कालक्षेप व्हावा म्हणून..."

कदाचित शाकुंतलाच्या छायेमुळे चंपकमाला व मदनविलास यांच्या प्रथम-मीलनानंतर द्वितीयमीलनाचा प्रसंग साधण्यासाठी नावा फुटून ताटातूट करण्याची युक्ती लेखकांनी वापरली असावी. भाषेवरही संस्कृत वळणाची छाप असून ती शब्दयोजनेपुरतीच मर्यादित नसून परंपरित रूपकांच्या योजनेपर्यंत जाणारी आहे. उदा. "माझ्या देवा, तुझ्या सद्भाग्यवेलीला ज्या इच्छाझऱ्याची गरज लागली आहे, ती आतांच्या बोलण्यावरून दृढ होण्यासारखी असून, तुझ्यावर आलेल्या प्रीतीच्या कळीला आजवर जें कोमेजण्याचे भय होते, ते फार करून कमी झालें." या प्रकाराप्रमाणेच भाषेत अनुप्रासांसाठीही क्लिष्ट आणि कृत्रिम रचना करण्याचा हव्यास दिसतो. रा. ब. मराठ्यांच्या निबंधातील टीकेला खाद्य पुरविणारी ही कादंबरी आहे.

'**विलासिनी**' (१८७१) ही रामचंद्र आबाजी राजे यांची कादंबरी बऱ्याच प्रमाणात 'मुक्तामाले'च्या कथानकाशी साम्य असलेली आहे. रत्नपूरची गादी वीर-सेनाने सावत्र आईच्या आग्रहामुळे आपला सावत्र भाऊ सुमित्र याला दिली. त्याने जुने कारभारी काढून नवे नेमिले. तेव्हा शांतनिग्रहासारखे जुने मुत्सद्दी विशालपूरचा मांडलिक राजा विचारशील याच्या साहाय्याने बंडाचा बेत करू लागले. सुमित्राने फक्त सोमकांत हा जुना अधिकारी कामावर ठेविला होता, कारण त्याची सुंदर पत्नी विलासिनी हिच्यावर त्याचा व त्याच्या अनेक हस्तकांचा डोळा होता. रत्नपूरचा खरा वारस वीरसेनाचा मुलगा वीरकांत हा राज्यातील अदाधुंदीला कंटाळून यात्रेला निघाला होता. त्याचा फायदा घेऊन वीरकांताची पत्नी रूपवती हिच्याविषयी सुमतीच्या मनात संशय निर्माण करून तिलाही बाहेर पाठविण्यात आले. मांडलिक विचारशील याच्याशी बोलणे करण्यात अयशस्वी झाल्याच्या निमित्ताने सोमकांताला कैदेत टाकण्यात आले. नतर विलासिनीला वश करण्याचे प्रयत्न झाले. विलासिनीच्याबाबत स्पर्धा होऊन सुमित्राचा वध त्याचाच मुलगा दुर्मती याने केला. विलासिनी आपल्या नवऱ्याला मिळू नये, अशी दुर्मतीची बायको भानुमती हिची इच्छा होती. म्हणून तिने तिला दूर करण्याचा प्रयत्न केला. तिला लालबागेत कैदेत ठेवण्यात आले. वीरकांत व रूपवती यांनाही अटक करून अरण्यात नेण्यात आले. कारस्थानांवर कारस्थाने होऊन अखेरीस त्या सर्वांतून वीरकांत-रूपवती व सोमकांत-विलासिनी यांची सुटका होऊन दुर्मतीचा पराभव झाला व राज्य वीरकांताला मिळाले. या कथानकात मुक्ता-मालेपेक्षा कितीतरी पटींनी अधिक गुंतागुंत निर्माण करण्यात आली आहे विलासिनीची अभिलाषा धरणारे बाप-लेक व त्यांचा सहायक दुर्वीर्य हे आहेत. दुर्वीर्य व दुराचार हे दोघे राज्याधिकाराच्या बाबतीत स्पर्धक आहेत. दुराचाराचा भानुमतीशी कुसंबंध आहे. म्हणजे या कथानकातील गुंतागुंत ही राजकीय स्पर्धेइतकीच, किंबहुना त्याहून अधिक व्यभिचार व व्यभिचारलालसा यांवर अधिष्ठित अशी आहे. लालबागेतील अटकेचा प्रसंग, जंगलातील लोकांत लागलेली विलासिनी व रूपवती यांविषयीची स्पर्धा हे भागही त्या वातावरणाशी जुळते आहेत. भडक घटनाप्रधानतेमुळे कादंबरी

पुष्कळच बिघडली आहे.

इ. स. १८७२ साली रा. ब. का. बा. मराठे यांनी आपल्या 'नावल व नाटक' याविषयीच्या निबंधात " मुक्तामाला'-वळणाच्या कादंबऱ्यांतील दोष दाखवून अशा प्रकारच्या रचनेची कीड वाढल्याबद्दल तक्रार केल्यानंतर या टीकेची दखल घेणारी एक कादंबरी झाली. **'सुवर्णमालिनी'** (१८७४) या कादंबरीचे लेखक जनार्दन सखाराम शास्त्री आणि दामोदर बापूजी नाईक यांनी आपल्या प्रस्तावनेत पुढील विचार मांडिले आहेत —

"हे पुस्तक करण्याचा मूळ उद्देश हाच कीं, मुक्तमाला नांवाचे पुस्तक झाल्यापासून अलिकडेच जेवढीं कल्पित गोष्टींचीं पुस्तके झालीं तेवढीं सर्व एकाच पद्धतीचीं आहेत असे पुष्कळ विद्वान लोकांच्या तोंडून ऐकले आणि कित्येक पुस्तके तर स्त्रियांस वाचण्यास बिलकूल उपयोगी नाहींत इतकेंच नाहीं, तर त्यांत कवि-लाघवाच्या अघटित कल्पनांची सीमाच झाली आहे. कित्येक पुस्तककर्त्यांनीं तर प्राचीन काळापासून सर्व कलांविषयीं परम विख्यात अशा आमच्या हिंदुस्थान देशांतील लोकांच्या पदरीं इतके नादानपणाचे ओझे बांधले आहे कीं, कांहीं काळाने सर्व देश-भर तोच ठसा उमटेल काय अशी शंका उत्पन्न होते. असो. सांप्रत मनोरंजक व आबाल स्त्रीपुरुषादिकांस वाचण्यालायक अशा प्रकारचे एखादें पुस्तक करावे अशी इच्छा होऊन हे लहानसे पुस्तक सुज्ञ जनांपुढे सादर करीत आहों." अशा विचारांनी प्रेरित झालेल्या लेखकांच्या कथेचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे :

अमरावतीचा राजपुत्र धैर्यशील व प्रधानपुत्र चारुदत्त हे आपला व्यापारी मित्र गुलाबचंद याला भेटण्यास निघाले असता त्यांच्या राज्यावर डोळा असलेल्या क्रूर-सेनाच्या हल्ल्यात ते सापडतात व केवळ एका नोकरानिशी वाचतात. तेथून रानावनातून प्रवास करीत ते गुलाबचंदाकडे पोहोचतात, तो त्याच्या पेढीचे दिवाळे वाजल्यामुळे गुलाबचंद त्यांना भेटत नाही. म्हणून उभयता श्रीपुरास येतात. तेथे त्यांच्या तस्बिरी-वरून त्यांच्यावर प्रेम करू लागलेल्या पुरुषवेषधारी सुवर्णमालिनी (जगमोहन) व मालती या भेटतात. धैर्यशील व सुवर्णमालिनी (जगमोहन) ही घोड्यांच्या व्यापारात नाव व पैसा कमावतात. त्याच वेळी जगमोहनवर श्रीपूरची राजकन्या मन-मोहिनी ही लुब्ध होऊन तिचे लग्न ठरविले जाते. तेव्हा जगमोहन ऊर्फ सुवर्णमालिनी ही पेचात पडते व त्या वेळी सुवर्णमालिनी व मालती ही आपल्या वेषाचे रहस्य आपल्या प्रियकरांना सांगून त्यांचा सल्ला घेतात. जगमोहन-मनमोहिनी व धैर्यशील-सुवर्ण-मालिनी यांचे विवाह एकाच दिवशी ठरविले जातात. प्रथम जगमोहन-मनमोहिनींचा विवाह होऊन नंतर सुवर्णमालिनी-धैर्यशीलांचा होतो व त्यामुळे सुवर्णमालिनी आपले रहस्य मनमोहिनीस सांगून तिलाही धैर्यशीलाची पत्नी बनविते. नंतर त्या राज्यात धैर्यशील उच्चपदावर चढतो. त्याच्यापुढे एक विचित्र खटला येतो. गुलाबचंद एका व्यापाऱ्याकडे उतरला असता त्याची स्त्री गुलाबचंदाकडे कुवासना प्रकट करते.

गुलाबचंद ती नाकारतो. तेव्हा ती बाई आत्महत्या करते. तिच्या खुनाचा आळ गुलाबचंदावर येतो. या खटल्याच्या निमित्ताने तिन्ही मित्रांच्या भेटी होतात व नंतर तिघे तीन राज्यांचे धनी होतात.

मुक्तामालेवरील टीकेस उत्तर द्यावयास निघालेल्या या लेखकांची कथा नेमकी त्याच वळणावर गेली आहे, हे उपर्युक्त कथनावरून स्पष्ट होईल. संकटे, वेषांतर, शृंगारवर्णने इत्यादिकांत मुक्तामाला-वळणातील पुष्कळ सवंग व खुद्द मुक्तामालेतही नसणारे भाग या कादंबरीत आहेत. ही पारंपरिकता केवळ कथानक व घटना यांच्यापुरतीच मर्यादित नसून व्यक्तिवर्णन व रसपरिपोष यांबाबतही तशीच आढळते. इतकेच नाही, तर प्रसंगी ती अधिक सांकेतिक व उत्तान होते, असेही दिसते. सुवर्णमालिनीचे पुढील वर्णन हे संस्कृतामधील नायिकावर्णनाचा शुद्ध अनुवाद आहे, हे उघड दिसेल —

"राजकन्या सुवर्णमालिनी हिचें नांव तर तिच्या स्वरूपास अगदीं अक्षरशः शोभत होते. तिचे चालणें गजगति असून कटि सिंहास लाजविणारी व नाक तर केवळ चांफेकळीप्रमाणे रम्य होते. तिच्या कोमल गालांवर गुलाबी छटा मारीत असून दांत शुद्ध हिरकणीप्रमाणें शोभत होते. आरक्त ओठांनी तर पोंवळ्याच्या रंगास अगदीं हीनत्व आणले होते. जिच्या पाणीदार डोळ्यांची चंचलवृत्ति पाहून मृगांनीं अरण्यसेवन केले कीं काय असा भास होई. भिवयांनीं तर मदनाच्या धनुष्यवक्रतेस अगदीं उणेपणा आणला होता. जिचे नील कुंतल व सरळ केशांचा भांग पाहून त्रिवेणीसगमच दुभंग झाला आहे कीं काय असा भास होई..." (पृष्ठ २८–२९) या नायिकावर्णनाप्रमाणेच जगमोहनाच्या वेषातील सुवर्णमालिनी व मनमोहिनी यांच्या भेटीच्या प्रसंगाच्या वर्णनात "अबला-अबलांची गांठ पडल्यावर तेथे सबल रंग तो काय होणार!" (पृ. ९१) असा शृंगारवर्णनाचा ढंगही आहे. एकूण 'सुवर्णमालिनी'च्या प्रस्तावनेचा व प्रत्यक्ष कथनाचा परस्परसंबंध हा केवळ ग्रंथाच्या बांधणीचा आहे!

**'चंद्रप्रभाविरहवर्णन' (१८७३)**

या कादंबरीचा या कालखंडात न चुकता उल्लेख केला जातो, तो मुख्यतः हिचे लेखन साळूबाई भ्र. भाऊसाहेब तांबवेकर या महाराष्ट्रीय स्त्रीने केले म्हणून. खुद्द लेखिकेनेच 'हे पुस्तक तूं स्वतः केले असे कोणी म्हणणार नाहीं. एखाद्या विद्वान् गृहस्थानें करून तूं निमित्याला पुढे झालीस असा आरोप' येण्याची शक्यता प्रस्तावनेत उल्लेखिली आहे. कारण 'एक तर मी स्त्री; दुसरें असें कीं पुस्तक करण्यास जी सामोग्री पाहिजे ती मुळींच मजजवळ नाहीं,' असे बाईचे म्हणणे. जाता-जाता 'स्त्रिया विद्वान् असाव्यात हेच युक्त आहे,' असा स्त्रीशिक्षणाविषयीचा आपला अभिप्रायही त्यांनी व्यक्त केला आहे.

या कादंबरीची नायिका चंद्रप्रभा ही प्रधान रघुनाथराव दादासाहेब यांची कन्या. दक्षिण हिंदुस्थानातील इंद्रपुरीचा राजा मणिभद्र याच्या दरबारात एक फकीर येऊन



भास्कर दामोदर पाळंदे

१८३२ – १८७४

" मय कौन है ? और मय आपके पास किस वास्ते आया हूं ? और मेरे हातमें ये पंजरा है उसमे ये दोन पंछी, एक मैना और एक नूरी ये कौन है ? " असे प्रश्न विचारितो. त्यांची उत्तरे चंद्रप्रभा आपल्या बापाला सांगून त्याची अडचणीतून सुटका करिते व जादूच्या साहाय्याने पिंजऱ्यातील पक्ष्यांना पुनः मानवी स्त्रियांचे रूप प्राप्त करून देते. नंतर या हुषार चंद्रप्रभेचा विवाह तिच्या इच्छेनुरूप, राजाच्या मध्यस्थीने नगरच्या कृष्णरावाशी होतो. पुढे चंद्रप्रभा भावाच्या मुंजीसाठी व कृष्णराव बहिणीला स्थळे शोधण्यासाठी भिन्न स्थळी गेले असता. चंद्रप्रभेला विरह अनावर होतो. ती तो पद्यातून व्यक्त करिते. कृष्णराव अवलियाच्या वेषाने येतो, तेव्हा दोघेही पद्यांत विरहावस्था व्यक्त करितात. नंतर उभयतांचे मीलन होते.

कादंबरीच्या या कथेत अद्भुतरम्य शृंगारकथेचा सर्वांगीण मसाला योजिण्यात आला आहे. इंद्रपुरीच्या सुरुवातीच्या वर्णनात 'मूनलाइट'सुद्धा सर्व काही आहे फकिराच्या प्रश्नात अरबी-फारसी ढंग हा भाषेपासून जादूच्या देहांतरापर्यंत आहे. चंद्रप्रभेसाठी देशोदेशीच्या राजपुत्र प्रधानपुत्रांच्या तस्बिरा जमविण्यात आल्या आहेत. चंद्रप्रभेला स्थळ पाहण्याविषयी रघुनाथराव व सीताबाई याचे संभाषण सुरू होते, तेव्हा त्यातच त्यांच्या भर दिवसाच्या शृंगाराची माहिती व त्यावरून सीताबाईची तिच्या मैत्रिणींनी केलेली थट्टा आहे (" चावडीवर दरोडा आणि गावात सांगू नका. . .तोंड का इतके सुकून गेले. . . " ) तेव्हा चंद्रप्रभेच्या फलशोभनाच्या प्रसंगानंतर तिची अनिवार थट्टा आली आहे, हे सांगणे नको. अर्थातच जेथे मैत्रिणींत इतकी उघड थट्टा होते, तेथे एकांतातील विरहवर्णनात चंद्रप्रभेच्या तोंडी

चढतां माद मदंगीं तेणें आली असे मला सुस्ती ।
जी शृंगारा उचिता न्यून नसे ती मसीं करीं कुस्ती ॥
प्रेमालिंगन देउनि चुंबुनि अधरोष्ठ शांतवी तु मला ।
रतिसुख देउनी वचनीं राही सारांश हाचि ध्यास मला ॥

यासारखी विरहिणीची पद्ये आहेत, यात आश्चर्य नाही.

एकंदरीत चंद्रप्रभाविरहवर्णनात शृंगाराची बूज साळूबाई तांबवेकरांनी संस्कृतज्ञ पुरुषशास्त्र्याइतकीच उघडपणे राखली आहे. अर्थातच हा गुण किंवा दोष त्या वेळी अवतीभोवती रचिल्या जात असलेल्या एकंदर कथावाङ्मयाच्या अनुकरणाचा आहे व अशा तऱ्हेच्या कथालेखनात 'बाई' म्हणून आपण पुरुषापेक्षा कमी नाही, हे त्यांनी यथास्थित दाखवून दिले आहे. खास स्त्रीलेखनाची म्हणता येतील, अशीही काही स्थळे आहेत. सीताबाई किंवा चंद्रप्रभा यांच्या मैत्रिणींनी केलेल्या थट्टेतील भाषेचा ढंग खास बायकी आहे. त्याचप्रमाणे चंद्रप्रभेच्या विवाहाच्या आणि फलशोभनाच्या वर्णनातील तपशीलही लक्षणीय आहे.

**'प्रेमबंधन' (१८७४)**

नारायण दामोदर योगी, हेडक्लार्क, निसबत एज्यु. इन्स्पेक्टर, मध्यभाग

यांची ही कादंबरी मुक्तामालेचे अद्‌भुतरम्य वळण आणि काही ऐतिहासिक छटा व नव्या सामाजिक परिस्थितीच्या छाया यांच्या संमिश्र वळणाची निदर्शक अशी रचना आहे. या कादंबरीत दादासाहेबांच्या वाड्यातील तारा गाणारीण व मौलादिन खाँ यांच्या बैठकीने कथानकाची सुरुवात होते. दादासाहेबांस पहिल्या कुटुंबापासून फक्त मुलीच झाल्याने ते मित्रांच्या सल्ल्याने द्वितीय विवाहाचा विचार करितात. सुरुवातीला प्रतिकूल असलेली प्रथमपत्नी रमाबाई हीच रामशास्त्र्यांची लेक मैना हिला पसंत करिते व तिजपासून भाऊ व वेणू ही आवळी-जावळी मुले होतात यांपैकी वेणू ही या कथेची नायिका.

दादासाहेबांचे मित्र बापूसाहेब याच्याकडून अमरपूरचा मांडलिक संभाजी पवार याचा अपमान झाल्याने तो सूड घेण्याच्या विचारात असतो. सर्व मंडळी वनविहाराला गेली असता पवारांचा अचानक हल्ला होतो व त्या गडबडीत वेणूचा नियोजित वर नारायण हा नदीच्या प्रवाहातून वाहत जातो, तो पवारांच्या हाती लागतो. त्यांच्याकडे तो नाव कमावतो. आणि घरी ठावठिकाणा न कळविता फक्त खुशाली कळवितो. निपुत्रिक पवारांच्या मनात नारायणाला वारस करण्याचे असते. वेणू १३ वर्षांची झाली, त्या सुमारास पवारांच्या वतीने अमरपुरावर हल्ला करण्याची तयारी करण्यास आलेला नारायण तिची सुटका करून तिला पवारांच्या गावी नेतो. वेणूला नारायणाची ओळख पटली नाही. अखेरीस अमरपुरावर हल्ला करून यशस्वी झाल्यावर सलोखा होऊन वेणू व नारायण याचा विवाह होऊन त्यांना राज्यही मिळते.

या कादंबरीच्या सुरुवातीचा गाण्याच्या मैफलीचा भाग व त्याच्या आधीचा त्या मैफलीकडे निघालेल्या मित्रांचा संवाद ही पूर्णपणे अव्वल इंग्रजीतील वातावरणाची निदर्शक आहेत. रस्त्याने स्त्रिया वगैरे पाहत रात्री मौज करावयास निघालेली मंडळी लोकहितवादींच्या शतपत्रांतील संबंधित वातावरणाची आठवण करून देतात. त्याच-प्रमाणे दादासाहेबांच्या दुसऱ्या विवाहाची चर्चा हीही पुष्कळ अंशी तत्कालीन सामाजिक वातावरणाचा परिपोष करणारी आहे.

कादंबरीच्या तिसऱ्या-चौथ्या भागांत अव्वल इंग्रजीच्याऐवजी ऐतिहासिक काळाचा प्रत्यय येऊ लागतो. मांडलिकाचा अपमान झाल्याने त्याने मुख्य राज्यावर हल्ला करण्याचा प्रकार हा पुष्कळ प्रमाणात यशवंतराव होळकरांच्या पुण्यावरील स्वारीची आठवण करून देणारा आहे, तर संभाजी पवारांनी नारायणाला वारसा देण्याचा विचार घोरपड्यांच्या पदरच्यांना 'घोरपडे'पण येण्याची उत्तरपेशवाईतील घटना नजरेसमोर आणितो.

अमरपूर व तेथील राजा कुलदीप ही नावे कादंबरीतील ऐतिहासिक वातावरण बिघडवितात. बापूसाहेब, दादासाहेब यांचा वनविहार कोणत्याही काळात शोभणारा असला, तरी त्यातून निर्माण होणारी नारायणरावाच्या वाहत जाण्याची घटना व त्याची पुढील हकीकत ही काहीशी अद्‌भुतरम्य वातावरणाची आहे. त्याचप्रमाणे नारायण-

वेणू यांचे 'प्रेम' व तत्संबद्ध वर्णने हीही संस्कृत परंपरेतील अतएव अद्भुतरम्य घराण्यातील आहेत.

एवंच कलाकृती या नात्याने कादंबरी फारशा वरिष्ठ दर्ज्याची नसली, तरी तत्कालीन लेखकांच्या दोलायमान अवस्थेची व तज्जन्य संमिश्र किंवा घेडगुजरी रचनेची घडण दाखविणारी या दृष्टीने महत्त्वाची आहे.

**'मित्रचंद्र' ( १८७९ )**

ही पांडुरंग गोविंद पारखीशास्त्री यांची कादंबरी अद्भुतरम्य वळणातील सुसंगत आणि सुसंबद्ध अशा थोड्याशा कादंबऱ्यांपैकी एक होय. सौराष्ट्रातील कांतिनगरचा राजपुत्र मित्रचंद्र आणि प्रधानपुत्र मित्रराज यांच्या नजरेस आले की, प्रधान चित्रकेतू हा लाच खातो. म्हणून त्यांनी हळूहळू सर्व कारभार ताब्यात घेतला. त्यामुळे चित्रकेतू आणि कांतिनगरचा द्वेष करणारे चार शेजारी राजे यांचे सूत जमले. चित्रकेतूची द्वितीय पत्नी चंद्रप्रभा ही सावत्र मुलगा म्हणून मित्रराजाचा द्वेष करी. मित्रचंद्र गर्भाधानाच्या समारंभासाठी सासुरवाडीस जाण्याच्या वेळी मेजवानीच्या निमित्ताने मित्रचंद्र व मित्रराज यांना विषप्रयोग करण्याचा बेत प्रधान व चंद्रप्रभा यांनी केला. पण तो मित्रराजाची पत्नी लीलावती हिने ऐन वेळी या उभयतांना कळवून विफल केला. प्रवासात असताना शेजारच्या चौकडीने मित्रचंद्र व मित्रराज याच्यावर हल्ला केला, पण तो फसला. सासुरवाडीस पंधरा दिवस राहून मित्रचंद्र परत निघाला. परतीच्या प्रवासात मित्रचंद्राच्या सासऱ्याच्या राज्यातील मोहनाजी पाटलाला वश करून घेऊन मित्रचंद्र व परिवार यांना स्थलदर्शनाच्या निमित्ताने निबिड अरण्यात नेण्यात येऊन तेथे त्यांच्यावर अचानकपणे हल्ला करण्यात आला. त्यात मित्रराज कैदी झाला व मित्रचंद्र अचानक निसटला. येथून पुढे मित्रचंद्र व मित्रराज यांच्या कथानकाचे धागे विलग झाले आहेत व कांतिनगरमधील कारस्थानांचाही एक धागा काही काळ वेगळा राहिला आहे.

मित्रचंद्र निसटतो तो जंगलातील नरमांसभक्षकांच्या तडाख्यात सापडतो. तेथून युक्तीने सुटका करून घेऊन समुद्रात शिरतो तो जंबुद्वीपातून सुवर्णद्वीपास पोहोचतो. तेथे कृपासागर नावाच्या व्यापाऱ्याच्या साहाय्याने उत्कर्षाला चढून प्रधान होतो. त्यामुळे तेथील प्रधान त्याचा द्वेष करितो व तो राणीचा व त्याचा वामसंबंध असल्याची कंडी उठवून पुराव्यासाठी युक्तीने राणीची अंगठी मित्रचंद्राला देऊन ती राजाच्या नजरेस आणितो. त्यामुळे मित्रचंद्र कैदेत पडतो.

इकडे मित्रराजाची सुटका त्याचे मित्र प्रयासाने करितात. तोवर कांचीतील राज्य चौकडीच्या ताब्यात जाते. राजपत्नी कमलनयना व राजस्नुषा कलावती यांच्यावर चौकडीचा डोळा असतो. कुंटिणीच्याद्वारा प्रयत्न करूनही त्या वश होत नाहीत, ही हकीकत मित्रराजाला कळताच तो व त्याचे मित्र कुंटिणीचा वेष घेऊन त्यांची सुटका करितात आणि नंतर मित्रचंद्राचा शोध घेतात. मित्रचंद्राचा पत्ता लागतो,

पण राजाकडून सुटका कशी करवावी, हा प्रश्न पडतो. त्या वेळी राजाच्या शिवभक्तीचा फायदा घेण्याठी मित्रराज बोवा बनून मित्रांकरवी ( शिष्य बनवून ) जाहिरात करितो. राजाची भेट प्रथमतः टाळून नंतर नोकरांच्याकरवी दुर्बुद्धि प्रधानाच्या कारस्थानाचा उच्चार करवून मग मित्रचंद्राची सुटका करितो. नंतर मित्रचंद्र सासऱ्याकडून कुमक मिळवून आपले राज्य जिंकतो व दुष्टांना शासन करितो.

या कादंबरीचा ' उत्तरभाग तर बराच चांगला साधला आहे. ' असा दक्षिणा प्राइझ कमिटीचे रावजीशास्त्री गोडबोले यांचा अभिप्राय असून तशाच आशयाचा उल्लेख विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीही केला आहे. स्त्रियांचे स्वभावदर्शन पुरुषांपेक्षाही हुबेहूब वठले आहे, असे मत वि. मो. महाजनींनी दिले आहे. पारखीशास्त्री हे संस्कृताचे अभ्यासक म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या रचनेवर संस्कृताची छाया आहे हे सहजी ध्यानात येते. पण त्यांचा विशेष सांगण्याचा गुण म्हणून हे म्हणता येईल की, संस्कृत वळणाशी पुष्कळदा संबद्ध असणारी संगती बिघडविणारी अद्‌भुतता या कादंबरीत नाही. उत्तरभागातील कारस्थानांची रचना गुंतागुंतीची असूनही पुष्कळ सफाईदार उतरली आहे. याचे एक कारण म्हणजे कथासूत्राचे वेगवेगळे धागे आलटून-पालटून वेगवेगळ्या भागांत देण्याचे पारखीशास्त्री यांचे धोरण होय. मित्रराज आणि त्याचे मित्रमंडळ यांचा दोन वेळा वेषांतराच्या युक्तीसाठी उपयोग बहुशः नाटकांतील रचनापद्धतीचा निदर्शक असावा.

**' पीयूषभाषिणी व मदिरामंजिरी '** (१८८३) ही वासुदेव रामचंद्र मोहोनी पैठणकर यांची कादंबरी दोनतीन कारणांनी लक्षणीय ठरते. एक तर उपर्युक्त नावाच्या दोन राजकन्यांची – बहिणींची – हकीकत सांगताना विरोधाच्या तंत्राचा उपयोग करण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे. पीयूषा ही सदाचरणी, शुद्धहेतुक. ती पांड्यदेशाचा राजपुत्र विद्याभ्यासी याला आपला पती म्हणून निवडते. त्याची वाराणसीत सेवा करून त्याला प्रसन्न करून घेते व विवाहित होते. ही सरळ सदाचरणी स्त्रीची कथा असून ती मदिरामंजिरीच्या घटनापूर्ण व अंती दुर्वर्तनाने भरलेल्या हकीकतीला पार्श्वभूमी म्हणून उपयुक्त ठरणारी आहे. दुसरे, मदिरामंजिरीच्या पतिशोधात जी साहसे येतात, त्यांत जादूटोण्यापासून, विषयलालसेपर्यंतचे अनेक भाग आहेत. ते मंजुघोषा-गुलबकावलीच्या वळणाचे आहेत. तिला पळविणारा गोसावी आहे. त्याच्याजवळ जादूचे ( कळीचे ) विमान आहे. तराफ्यातून समुद्रप्रवास करण्याची सिदबादी कल्पना आहे व अशा हकीकतीसाठी आवश्यक असलेली आणखी एक मंजुभाषिणी नावाची आप्त राजकन्याही आहे. या जादूच्या प्रांतातून मदिरामंजिरी सुटते, ती गोविंदराव नावाच्या एका विषयी माणसाच्या हाती लागते. त्याच्याकडून नादी सावकारपुत्र तिला पळवितो. त्याच्यापाशी असलेले द्रव्य संपल्यावर उपजीविकेसाठी नाचगाणे शिकून ती शराबेग नायकीण होते व त्या वेषातच यात्रेला निघालेल्या पीयूषा-महीपाल यांच्या नजरेस पडते.

पीयूषेच्या यात्रेत अचानक हल्ला आल्याने तिची व नवरा आणि मुलगा यांची

ताटातूट होते. येथपासूनचे प्रसंग मुक्तामालेची आठवण करून देणारे आहेत. अखेरीस धर्मशाळेत बाप व मुलगी यांची भेट होणे, दुष्टांना शासन होणे इत्यादी भागांतही मुक्तामालेचे अनुकरण दिसते. एकूण, विरोधाच्या तंत्रावर सुरू झालेली ही लक्षणीय कथा जादू, संमिश्र वातावरण, गुंतागुंतीचे घोटाळे या सर्वांमुळे बिघडत गेलेली आहे, असे वाटते.

**'क्लेशविमोचन' (१८८४)**

व्यं. आ. परब यांची ही कादंबरी म्हणजे मोहोनींच्या कादंबरीची अधिक बिघडविलेली विस्तृत आवृत्ती आहे. प्रस्तावनेत परबांनी जादूविरुद्ध खूप टीका केली आहे आणि सबंध कादंबरीभर जादूचाच उपयोग केला आहे. शिवाय, काही कथन प्रथमपुरुषी, काही तृतीयपुरुषी असे करिताना इतका घोटाळा केला आहे की, कथानकाची व पात्रांची संगती लावताना मुष्कील होते. सुरुवातीला 'मी' (कमलाक्ष) वसंतकाळी एका शहरात फिरत असता देशमुखांकडे पाहुणा म्हणून जातो. तेथे प्रधानपुत्राच्या विवाहानिमित्त वधूवरांनी स्वतःला पसंत करण्याची 'नवी चाल' व विवाहाची जुनी चाल यांवर जी उलटसुलट चर्चा होते, ती अव्वल इंग्रजीच्या वातावरणास शोभणारी आहे. त्याच वेळी यमुना 'मी'ला भेटून त्याच्यावर लुब्ध झाल्यामुळे ही जोडी कैदेत पडते व मारवाड्याची स्त्री माणकबाई ही मैत्रीण यमुनेला भेटून तिची कानउघाडणी करिते. हे कथनही तत्कालीन वाटणारे आहे. नंतर कैदेतून सुटका होणे, जादूचा पोपट, त्याची रूपांतरे इत्यादींतून अद्‌भुतता येते. सुटका झाल्यावर अरण्यात बैरागी, हरिणी वगैरे भेटतात. ही हरिणी म्हणजे सुवर्णकेतकी राजकन्या. तिची व तिच्या बहिणीची हकीकत ही पुष्कळ प्रमाणात पीयूषभाषिणी व मदिरामंजिरी यांच्यासारखी आहे. यमुनेला मिळालेला पोपट हाही चतुरसिंग प्रधानाचा पुत्र राजकन्येचे चुंबन घेण्याचा प्रयत्न केल्याने शापित झालेला आहे. या सगळ्या इंद्रजालातून मुक्त होऊन सुवर्णकेतकी व यमुना यांची प्राप्ती झालेला कमलाक्ष (मी) राज्यावर बसतो, ही एक कथा. तिच्या जोडीला अजमीरचा राजपुत्र रूपसुंदर व सावकारपुत्र विश्वासराव यांच्या कथा आल्या असून त्यांनाही मूळच्या एकेका बायकोच्या जोडीला कथानकात आणखी एकेक सुंदरी मिळाली आहे. कमलाक्षाचा शोध करावयास निघालेली ही जोडीही अनेक संकटांत पडून अखेर त्यांतून मुक्त होते. त्यांच्या कथेचे वळण हेही पुष्कळ प्रमाणात मोहोनींच्या उपर्युक्त कादंबरीशी जुळते व काही घटनांच्या बाबतीत ते 'मंजुघोषे'चे अनुकरण करणारे आहे.

**'मदनमंजरी' (१८८५)**

ही अण्णाजी गोविंद इनामदार यांची कादंबरी तोंडवळ्याने काही प्रमाणात पारखीशास्त्र्यांच्या 'मित्रचंद्रा'ची आठवण करून देणारी आहे. विदर्भदेशाची राजकन्या मदनमंजरी उपवर झाल्यावर ती सख्यांसह वसंतऋतूत उपवनात गेली असता सौराष्ट्राचा राजा वज्रकेतू तिची अभिलाषा धरतो व मागणी घालतो. ती नाकारली जाऊन

तिचा विवाह कांबोजच्या भद्रसेनाशी होतो. जहाजातून कांबोजला जात असता वज्रकेतू तांडेलाला वश करून घेतो व तिचा पती भद्रसेन व वीरमणी (प्रधानपुत्र) हे वेगवेगळ्या ठिकाणी वाहत जातात. येथून कथानकाचे तीन वेगवेगळे धागे होतात. त्यांतील एक धागा मदनमंजरीच्या छळाचा, दुसरा धागा भद्रसेनाच्या पर्यटनाचा व त्यातील संकटांचा. या सर्वांतून ती अखेरीस सुखरूप बाहेर पडून शेवट सुखान्त होतो, हा भाग नेहमीप्रमाणे अर्थात आहेच. मदनमंजरीला वश करण्यासाठी कुंटिणींची योजना, अन्न तोडणे वगैरे प्रकार 'मित्रचंद्र' कादंबरीप्रमाणेच आले आहेत. भद्रसेनावर चोरीचा व खुनाचा आळ येऊन तो फाशी जावयास निघतो. तेव्हा ऐन वेळी तेथे प्रधानपुत्र वीरमणी पोहोचून त्याची सुटका करितो. पण या दोहोंपेक्षा अधिक विस्तृतपणे कथा आली आहे ती वीरमणीची. वीरमणीच्या कथेत अनेक लहान गोष्टींची मालिका आहे. त्यांत चोरांच्या तावडीत सापडलेला वीरमणी तेथून आपली सुटका करून घेतो व जाताना त्यांची बहीण पद्मावती मिळवितो, ही कथा आहे. तिला वश करण्यासाठी सांगितलेली पतिप्रेमाची एक कथा (कळीच्या घोड्यासह) आली आहे. वीरमणीला भेटलेला विजयशेट याचा पुत्र चूडामणी त्याच्याबरोबर भद्रसेनाच्या शोधाला निघतो, तेव्हा सांगितलेली मित्रप्रेमाची एक 'शृंगारकथा' आहे. पद्मावतीने बोवाचा वेष घेऊन केलेल्या भ्रमणाची हकीकतही आहे. एकंदरीत ही कादंबरी विनाकारण लांबवलेली व कंटाळवाणी अशी झाली असून गुंतागुंतीची साहसकथा म्हणून मित्रचंद्राची भ्रष्ट नक्कल आहे.

**'मंजुळा' (१८८५)**

ग. ना. गांगण यांची अ. कृ. सोमण यांनी प्रसिद्ध केलेली मंजुळा ही २८ पृष्ठांची लहानशी गोष्ट आहे. ही रिसबुडांच्या 'वसंतकोकिले'ची छोटीशी आवृत्ती आहे. चंद्रपुरीचा राजा चंद्रकेतू याचा मुलगा मुरारराव. तो राजाकडे आलेल्या सुताराकडून कळीचा घोडा घेतो आणि उड्डाण करितो. त्याला उतरण्याची कळ माहीत नव्हती; म्हणून अचानक बंगालमधील जादूविद्या जाणणाऱ्या मंजुळेच्या प्रदेशात तो उतरतो. मंजुळेच्या पणाप्रमाणे राक्षसाचे तीन सोनेरी केस आणि तीन बिकट प्रश्नांची उत्तरे मिळवून उभयता विवाहित होतात व परत यावयास निघतात. इकडे भावाच्या शोधास निघालेल्या चंपावतीस पंजाबमधील राजाने जादूने पळवून बंदीत टाकिलेले असते. तिची कळीच्या घोड्याच्या साहाय्याने मुरारराव सुटका करितो व नंतर सारे ठीक होते. अशा आशयाच्या कथानकातील 'वसंतकोकिले'ची छाया सुस्पष्ट आहे. त्याचप्रमाणे वर्णनातील सांकेतिकता व उत्तानपणा हीही या लहानशा गोष्टीत सुटली नाहीत. उदा० चंपावतीचे वर्णन — "तिची कटी पाहून सिंहिणी आपल्या मनांत लज्जित होऊन, आपला गर्वहरण झाल्याकारणाने आपापल्या गुहेकडे आपला मार्ग काढीत आहेत. ती तांबूल भक्षण करी त्या वेळेस तिचे ओंठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणे दिसत असत," अशा प्रकारचे आहे; तर मुराररावाच्या तोंडी

मंजुळेबाबत पुढील वाक्य आहे. "अरे पण हीणे आपल्या उरस्थळीं हे काय लपविलें आहे! मला वाटते हा चक्रवाक पक्षाचा जोडाच असावा!"

**'राजपुत्र राजहंस' (१८८५)**

अ. के. दप्तरदारकृत कादंबरीचा नायक राजहंस राजाच्या सरदारांनी पकडलेल्या हरिणांना सोडून देतो; म्हणून राजा या आपल्या पुत्राला अरण्यवासात पाठवितो. तेथे त्याला एक हरिणी, साप व बेडूक हे मित्र मिळतात. त्यांच्यासह तो एका नगरात जातो व तेथील सावकाराच्या मदतीने राजदरबारात मोठी नोकरी मिळवितो. तेथे राजपुत्राची मित्रमंडळी – ही सर्व शापित अवस्थेत असतात, पण हवे तेव्हा मनुष्यरूप घेऊ शकतात – राजहंसाला मदत करतात. बेडूक तळ्यातील अंगठी काढून देतो. साप राजाचे विष शोषून घेतो. नंतर तो राजा विरक्ती येऊन आपले राज्य राजहंसाला देतो व तेथील सैन्याच्या मदतीने तो आपल्या मूळ राज्यावर स्वारी करितो व सफल होतो. मग ओळख पटून शेवट गोड होतो. या लहानशा कथेत रूपांतराच्या घटनांनाच प्राधान्य आहे. फक्त अखेरच्या भागात राजहंस अरण्यवासात गेला, तेव्हा ऋतुमती झालेली त्याची पत्नी तारामती ही झुरत होती असा उल्लेख व तोही मूळच्या कथाभागाहून तुटक असा आला आहे.

अद्‌भुतरम्य परंपरेतील आणखी काही कादंबऱ्या आणि कादंबरीकार यांचा फक्त ओझरता उल्लेख करणे हेच या काळातील वाङ्मयाच्या दुर्मिळत्वामुळे किंवा अनुपलब्धतेमुळे अपरिहार्य ठरते. बाबा गोखल्यांच्या 'राजा मदन' (१८६५) या कादंबरीची आठवण ती या काळातील एकुलती-एक शोकपर्यवसायी कादंबरी म्हणून केला जातो. रेनॉल्ड्सच्या कथांचे दोन अनुवाद अनुक्रमे 'वज्रेश्वरी' (सीमूस्ट्रेस) व 'वीरपत्नी' (सोल्जर्स वाइफ) झालेले आढळतात. फोर्बसच्या '**रासमली**'वरून 'जगदेवराव पवार' या नावाची एक कादंबरी तयार करण्यात आली आहे. या काळच्या मराठी लेखकांत मोशे दानिएल तळकर (बागोबहार), बहाईक योसेफ तळकर (गुल आणि सनोवर यांची गोष्ट), डेविड हाइम (प्रियकांत आणि सुशीला), आब्राहाम दानिएल कुरूलकर (मनमोहिनी) ही बेने इस्रायल मंडळी होती, हेही लक्षणीय आहे.

## सहा

## सामाजिक कथाकादंबरी

### बाबा पद्मनजीकृत 'यमुनापर्यटन' (१८५७)

अव्वल इंग्रजीतील कथा-कादंबऱ्यांचे प्रमुख वळण 'अद्‌भुतरम्य' असले, तरी त्या वळणाच्या निदर्शक 'मुक्तामाला' या कादंबरीच्या आधीच वेगळ्या वळणाची 'यमुनापर्यटन' ही कादंबरी बाबा पदमनजींनी इ. स. १८५७ साली प्रसिद्ध केली 'यमुनापर्यटन' ही कालानुक्रमाने मराठीतील पहिली स्वतंत्र कादंबरी. तिचे लेखक

बाबा पदमनजी हे इ. स. १८५४ साली खिस्ती झाले होते. पण त्यांची हिंदू बायको त्यांजकडे येण्यास तयार नव्हती. या निमित्ताने खटला उद्भवला. त्याच्या खर्चाची तरतूद करण्यासाठी बाबांनी प्रस्तुत कादंबरी लिहिली, अशी या कादंबरीच्या जन्माची गोष्ट आहे.

'यमुनापर्यटना'ची नायिका यमुना ही मिशनऱ्यांच्या शाळेत शिकलेली गरिबाची मुलगी. तिचे लग्न सुस्थितीतील विनायकाशी झाले ते त्याच्या आईने वचन दिले होते म्हणून. हे लग्न झाले, तरी तिला मनोमन सुख वाटत नव्हते. या कुटुंबाच्या शेजारचा तरुण गृहस्थ शिवराम वारल्यावर त्याच्या पत्नीने केशवपनाच्या भीतीने विहिरीत जीव दिला. ही हकीकत कळल्याने यमुनेच्या मनात निरनिराळे विचार येऊ लागले. नंतर ती नवऱ्याबरोबर प्रवासास निघाली. वाटेत तिचा मुक्काम पडला, तेथे वेणू नावाची एक तरुण विधवा होती. तिच्यावर कामाचा बोजा होता आणि खाण्यापिण्याचे हाल होत होते. तिच्या दुःस्थितीत यमुनेने तिला येशूचा उपदेश ऐकविला व तिला थोडाफार विरंगुळा मिळवून दिला. पुढे हे जोडपे नागपुरास आले. तेथे विनायकाचा मराठा मित्र दौलतराव याची मामेबहीण विधवा होती. ब्राह्मणांप्रमाणे उच्च मराठ्यांनीही पुनर्विवाह त्याज्य ठरविल्याने तिला मोकळीक नव्हती. तिच्या विनोदनासाठी येणाऱ्या पुराणिकाने 'गोपी-आख्यान' लाविले, आणि (त्यामुळे) नंतर ती विधवा हजार दीडहजारांचा ऐवज घेऊन त्या पुराणिकांबरोबर पळून गेली. नागपुराहून विनायक व यमुना ही पंढरपुरास आली. तेथली घरमालकीण विकेशा विधवा ही रात्री केसाचा टोप घालून बदकर्मास बाहेर जात असे. तिला पाळत ठेवून विनायकाने पकडले, तेव्हा तिने आपल्या दोन लग्नांची व बदकर्माची कहाणी उभयतांना सांगितली. पंढरपुराहून साताऱ्यास येताना वाटेत एक भिक्षेकरी विधवा भेटली. तिच्या निमित्ताने गड्याने कुमार्गाला लागणाऱ्या विधवांच्या गोष्टी यमुनेला सांगितल्या. साताऱ्यास जगन्नाथ सोनाराकडे विनायक-यमुना उतरली. तेथे पुत्रजन्मोत्सवानिमित्त पुनर्विवाहाच्या इष्टानिष्टतेवर वाद होता. त्यात पुनर्विवाहपक्षाची सरशी झाली. सातारा सोडून जेजुरीस येताना विनायकास गाडी भडकून इजा झाली व तीतच त्याचा अंत झाला. मरतेसमयी यमुनेने त्याला बाप्तिस्मा दिला. यमुनेच्या केशवपनाचा प्रश्न ताबडतोब पुढे आला नाही, पण पुढे ती भाषा सुरू झाली, तेव्हा तिला 'पवित्र शास्त्रा'च्या वाचनाने धीर आला. गुरुचरित्रादिकांच्या वाचनाने यमुनेला केशवपनास तयार करण्याचे प्रयत्न झाले. पण यमुना वळली नाही. तिचा सासराही तिला अनुकूल होता. गावातून दडपण आणण्याची तयारी झाली, तेव्हा यमुना ही पंढरपुरात भेटलेली विधवा व तिचा मुलगा शिवराम यांच्या साहाय्याने विनायकाच्या खिस्ती मित्राकडे गेली. सासऱ्यानेही यमुनेला आर्थिक मदत केली. नंतर यमुनेने एका शीलवान खिस्ती गृहस्थाशी पुनर्विवाह केला व शिवरामही खिस्तसेवक झाला.

बाबा पदमनजींच्या 'यमुनापर्यटना'ची उपर्युक्त कथा लक्षात घेता ध्यानात येते

ते हे की, ही यमुनेच्या द्विविध-पर्यटनाची हकीकत आहे. यमुनेने आपल्या पतीसमवेत सुरू केलेला प्रवास हे भौगोलिक पर्यटन, आणि मिशनऱ्यांच्या शाळेत शिकलेली यमुना अनेक अनुभवांतून जाताना इतरांना येशूचा तारणाचा उपदेश करीत-करीत स्वतः ख्रिस्तचरणी लीन झाली, हे तिचे वैचारिक पर्यटन. रे. बाबा पदमनजींना सांगावयाची आहे, ती मुख्यतः दुसऱ्या पर्यटनाची कथा. त्यासाठी पहिल्या भौगोलिक पर्यटनाचा साधन म्हणून उपयोग केलेला आहे. या भौगोलिक पर्यटनामुळे यमुनेच्या डोळ्यांपुढे अनेक दृश्ये बाबांना उभी करिता आली. त्या दृश्यांच्या अनुभवांतून यमुनेच्या मनाचा 'विकास' तारणाच्या दिशेने झाला. अर्थातच तारणाच्या बरोबरीने, किंबहुना त्यापेक्षा अधिक छाप पडते, ती विधवांच्या अनेक हकीकतींतून निर्माण होणाऱ्या विधवांच्याविषयीच्या सहानुभूतीची. विधवांचा प्रश्न आणि धर्मांतराचा प्रश्न या दोहोंची सांधेजोड म्हणा की गल्लत म्हणा, बाबांनी या पुस्तकात केली आहे. त्यामुळेच या पुस्तकाला एक प्रकारे ख्रिस्तीप्रचाराचे स्वरूप आले; आणि बहुशः याच कारणामुळे वाचक आणि वाङ्मयविवेचक यांच्या मनात या पुस्तकाच्या स्थानाविषयी शंका उद्भवली.

ही शंका 'यमुनापर्यटन' ही कादंबरी आहे, की नाही येथपर्यंत गेली आहे. यमुनेच्या पर्यटनात तिला दिसलेली दृश्ये सुटी-सुटी आणि प्रायः स्वतंत्र आहेत; त्यांना जोडणारा 'यमुना' हा एकच धागा आहे आणि 'कथारचने'च्या दृष्टीने तो क्षीण वाटणारा आहे. तथापि या कालखंडात कथा आणि कादबरी यांच्यात रचनेच्या दृष्टीने पुष्कळ देवाणघेवाण होत असे. अनेक कथांच्या एकत्रीकरणातून कादंबरी किंवा तत्सदृश रचना करण्याचे प्रयोग सलगपणे हरिभाऊंच्या 'मधली स्थिती' या कादंबरीपर्यंत चाललेच होते. दशकुमारचरित, पंचतंत्र-हितोपदेशादी कथांची संस्कृत परंपरा, अरबी-फारसी गोष्टींची परंपरा आणि धार्मिक ग्रंथांतील कथांची परंपरा या सर्वांत या पद्धतीची रचनाशैली अभिप्रेत आहे. तीच बाबांनी स्वीकारिली आहे. म्हणूनच अनेक विधवांच्या कथा सुट्या-सुट्या असल्या, तरी यमुनेवरील संस्कारांच्या एकहेतुकतेमुळे बाबांच्या रचनेला कादंबरी म्हणणेच योग्य ठरेल.

प्रचारकी स्वरूपास्तव 'यमुनापर्यटना'ला दुय्यम स्थान देण्याचा विचार करतानाही हे लक्षात ठेविले पाहिजे की, आपल्या या कथेत अतिशयोक्ती नसल्याचे पदमनजींनी दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत आग्रहाने सांगितले आहे. त्यांचा तो दावाही खरा असावा. कारण हिंदूंची पवित्र म्हटलेली तीर्थक्षेत्रे अनाचाराचे आगर झाल्याचा उल्लेख नंतर पन्नासपाऊणशे वर्षांनी लिहिलेल्या रानडेचरित्रात न. र. फाटकांनीही केला आहे. बाबांनी विधवांच्या स्थितीचे चित्र रेखाटणारी ही कादंबरी इ. स. १८५७ साली लिहिली, यालाही एक विशिष्ट अर्थ आहे. इ. स. १८५६ साली विधवा-विवाहाचा कायदा पास झाला होता. त्यासंबंधीची पुरवणी पहिल्या आवृत्तीस जोडण्यात आली असून शिवाय प्रस्तावनेदाखल रा. ब. दादोबा पांडुरंग यांचा

‘विधवाश्रुमार्जन’ हा संस्कृत निबंध मराठी तर्जुम्यासह देण्यात आलेला होता. या सर्वांचा अन्वयार्थ हाच की, विधवा-विवाहाच्या प्रश्नाला तोंड लागले असताना विधवांच्या दुःस्थितीच्या हकीकतींतून एक सुसंगत कथा सांगण्याचा प्रयत्न बाबा पदमनजींनी हेतुपूर्वक केला. त्यांच्या दृष्टीने ही सुसंगती ख्रिस्तीधर्मस्वीकारात परिणत होते. हे परिणमन कोणाला पटो वा न पटो, पण त्यात लेखकाचा निश्चित दृष्टिकोण आणि त्याचा आविष्कार आहे, यात शंका नाही.

बाबांनी पतकरिलेल्या दृष्टिकोणानेच त्यांच्या कथेची आणि रचनेची शैली ठरविली आहे. अनेक विधवांच्या हकीकती प्रथमतः एकत्र आणून आणि नंतर स्वतः यमुनेला त्या परिस्थितीतून जावयास लावून बाबांनी एका प्राथमिक पद्धतीने का होईना, इष्ट प्रमेयाची मांडणी केली. ती करिताना आजूबाजूला घडत असलेल्या हकीकतींबरोबरच युक्तिवादासाठी येणारे हवाले आणि उतारे उद्धृत केले. प्रायः अशिक्षित आणि पददलित असलेल्या स्त्रियांची हकीकत सांगताना भाषा शक्य तितकी सोपी ठेविली. तिच्या सोपेपणाची एक बाजू म्हणजे छोटी-छोटी आणि किंचित मिशनरी वळणाची वाटणारी वाक्ये. हे वळण अशा प्रकारचे होण्याला आणखीही एक कारण असावे. बाबांनी पाळकदीक्षा घेऊन ख्रिस्ती प्रचारकाचे काम प्रत्यक्षतः नंतर पतकरिले असले, तरी त्याची तयारी ते करीत होतेच. शुद्ध ख्रिस्तीधर्मप्रचाराचे वाङ्मयही त्यांनी उदंड लिहिले. त्या वळणाची सिद्धता होत असल्याची यमुनापर्यटन ही वानगी होती.

हा प्रचारकी भाग वगळून विचार करिताना ‘यमुनापर्यटना’चा एक विशेष डोळ्यांत भरतो. तो म्हणजे कथानकाच्या साध्या, सरळ स्वरूपात आविष्कृत झालेला वास्तववाद. मराठीतील पहिली स्वतंत्र कादंबरी वास्तववादी असावी, ही एक लक्षात घेण्याजोगी गोष्ट आहे. क्वचित विधवांच्या अनाचाराचे वर्णन करिताना हा वास्तववाद अति-वास्तववादाकडे झुकल्यासारखा वाटतो, हे खरे. पण त्याचे कारण अनाचाराचे वर्णन करण्यात विशेष रस हे नसून कथारचनेच्या आरंभीच्या काळात जाणवणाऱ्या अडचणी आणि तज्जन्य अशा अभिव्यक्तीतील अपरिहार्य उणिवा होत.

बाबा पदमनजींच्या यमुनापर्यटनाच्या पाठोपाठ ‘एक नास्तिक मनुष्य ख्रिस्ती झाला याविषयी हकीकत’ (१८५८) नावाची पुस्तिका ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटीने प्रसिद्ध केली. त्यानंतरच्या वर्षी (१८५९) मिसेस् मुलेन्स या युरोपियन बाईच्या मूळ इंग्रजी कथेचे ‘फुलमुनी आणि करुणा’ हे भाषांतर प्रसिद्ध झाले. या कादंबरीतील फुलमुनी आणि प्रेमचंद्र हे ख्रिस्ताच्या शिकवणीप्रमाणे वागणारे सुखी जोडपे असून त्यांच्या सुखी संसाराच्या पार्श्वभूमीवर ‘करुणा’ या संकटग्रस्त स्त्रीची करुण कहाणी सांगितली आहे. प्रथमतः करुणेला मडम आपली स्थिती पाहून मदत करील, असे वाटते; पण फुलमुनी तिला फुकट मदत करण्याऐवजी काम करून पैसे मिळविण्याचा उपदेश करिते. करुणेचा थोरला मुलगा चोरी करिताना मृत्यू पावला, धाकटा बुटलेराची नोकरी करू लागला. हळूहळू करुणेला फुलमुनीचा उपदेश पटू लागला

व अंती तिने खिस्ताचा मार्ग स्वीकारिला. ही कथा मिसेम मुलेन्सला सांगावयाची आहे. कथेच्या निवेदनात गतिमानता फारशी नाही. फुलमुनी आणि करुणा, त्याचप्रमाणे फुलमुनीची मुलगी सुंदर आणि राणी यांच्या चित्रणात विरोधाचा उपयोग करण्यात आला आहे. पण त्याचाही हेतू कलात्मक चित्रणाच्या उठावदारपणापेक्षा खिस्ती प्रचाराचाच आहे. लेखिकेच्या मतानुसार "कांहीं काळानें त्या (देशी बायका) इंग्लिश बायकांप्रमाणें होतील. खिस्ती धर्म जसजसा वाढत जाईल त्याप्रमाणे ह्या गोष्टी प्रत्ययास येतील." अर्थातच बाबा पदमनजींसारखा देशी प्रचारक आणि मिसेस मुलेन्स यांत फरक आहे. तो हाच की, बाबांची दृष्टी फक्त ईश्वरोपासनेच्या दृष्टीने खिस्ती परिवर्तनाची आहे, तर मिसेस मुलेन्सला साऱ्या समाजाचे केवळ धार्मिक दृष्ट्या खिस्तीकरणच नव्हे, तर त्याच्या जोडीला सांस्कृतिक आणि आचारविचार-दृष्ट्या सर्वस्वी युरोपीकरण झालेला समाज पहावयास मिळावा वा मिळेल, अशी अपेक्षा दिसते.

## मिसेस फरार

नाशिक येथील मिशनरी सी. पी. फरार यांच्या या पत्नी पहिल्या मराठी निबंधाच्या लेखिका म्हणून परिचित आहेत. त्यांनी आपल्या धर्मप्रचाराच्या हेतूसाठीच केलेल्या ग्रंथांत चार कथात्मक ग्रंथ आहेत. 'हेन्री आणि त्याचा संभाळणारा गडी संभू ह्याची गोष्ट' (१८३५), 'चमत्कारिक गोष्टी' (१८३५), 'बालबोध गोष्ट' (१८३८), 'यात्रेकयाचा वृत्तांत' (१८३८) हे ते चार ग्रंथ होत. यांपैकी 'चमत्कारिक गोष्टी' या पुस्तकात एकूण चौदा गोष्टी आहेत. प्रत्येकीला 'पर्व' असे म्हटले असून यांपैकी नऊ पर्वे किंवा गोष्टी (५ ते १३) खिस्ताच्या दहा आज्ञांशी निगडित अशा असून संबंधित आज्ञा ठळक ठशात छापण्यात आल्या आहेत. उरलेल्या गोष्टींपैकी काही कथा सांगणारी मडम व तिचा नोकर शेरीबाई ह्यांच्यासंबंधीच्या आहेत. भाषा "हे खिस्ता, मला चोरीच्या बुद्धीपासून दूर राख" अशी बायबल-इंग्रजी वळणाची आहे. या गोष्टींना 'चमत्कारिक' म्हणण्यात परमेश्वरी 'चमत्कारा'कडे लक्ष वेधण्याचा हेतू असल्यास न कळे. या ग्रंथाच्या मानाने 'यात्रेकऱ्याचा वृत्तात' या ग्रंथात कथात्मक आकर्षण थोडे अधिक आहे. राजापूर प्रांतातील राघोजी जाधव हा संताजी पाटलाचा सल्ला न मानता यात्रेला जावयास निघतो. वाटेत नाशिकजवळ त्याचा मित्र, जावई व बायको ही जरीमरीने मरण पावतात. राघोजी स्वतः आजारी पडतो, तेव्हा मिशनरी लोकांच्या मदतीने दवाखान्यात पोहोचून तो बरा होतो. तेथे असताना त्याला बटाट्याची लागवड, विलायती गवत, मेंढ्या पाळणे, मुलींचे शिक्षण, विलायती नांगर इत्यादी अनेकविध विषयांची साहेबाकडून माहिती मिळते. साहेबाकडे मेहनत करून तो नांगर मिळवितो. नंतर तो परत आल्यावर त्याचा पाटलाच्या प्रौढ लेकीशी म्होतूर होतो व तो आपल्या लेकीचाही म्होतूर ती मोठी होईपर्यंत थांबवतो. याही ग्रंथातील भाषा व विचार उघडउघड खिस्ती वळणाचे आणि हिंदुधर्मावर व चालीरीतींवर टीका करणारे

असले, तरी कथन पुष्कळसे सहज आहे. ख्रिस्ती प्रचारात केवळ धार्मिक परिवर्तनावर भर नसून सामाजिक चालीरीती व आर्थिक सुधारणा यांकडेही मिशनऱ्यांचे लक्ष किती होते, याची ही कथा निदर्शक आहे. मिसेस फरारसारख्या युरोपियन बाईने मराठीवर मिळविलेले प्रभुत्वही लक्षणीय आहे.

**‘ अवलिया ’ ( १५८९ )**

‘ अवलिया ’ ही विनायक बाळकृष्ण दामले यांची कादंबरी अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. ‘दुर्मिळ’ म्हणून नोंदली गेल्यामुळे तिची पुरेशी दखल घेतलेली आढळत नाही. श्रीधर नावाचा मानी स्वभावाचा मुलगा लहानपणी बायको-मित्रांशी आढ्यतेने वागतो. त्यामुळे धास्तावलेली पत्नी सगुणा गर्भाधानाच्या वेळी घाबरून जाते. श्रीधराच्या मनात त्यामुळे तिच्याविषयी आणि आपला मित्र महादेव यांच्याविषयी संशय निर्माण होतो. सगुणा खंगू लागते. श्रीधराचा बाप नारायणशास्त्री एकाएकी अदृश्य होतो. नंतर झुरणारी सगुणा माहेरी जाते. त्याच वेळी आलेला एक अवलिया श्रीधरला छेडतो. सगुणेच्या माहेरी तिची आप्त वैद्यीण तिच्या रोगाचे निदान ‘कामज्वर’ असे करिते. अवलियाच्या युक्तीने श्रीधरचा भ्रमनिरास होतो. वैद्यिणीच्या शहाणपणाने सगुणा बरी होते. नंतर नवराबायकोची भेट होते. कालांतराने ‘अवलिया’ प्रकट होतो. हा अवलिया म्हणजे श्रीधराचा मित्र व दत्तक गेल्यामुळे नात्याची ओळख पुसटलेला मेहुणा महादेव. सर्वांच्या भेटी होऊन संसार सुखी होतो.

या कादंबरीला या काळातील एक निखालस सामाजिक कादंबरी म्हणून बरेच वरचे स्थान द्यावे लागेल. अद्‌भुतरम्य युगाचा म्हणण्यापेक्षा नाटकातील वेषांतराच्या युक्तीचा उपयोग, एवढाच काय-तो थोडासा वेगळा वाटणारा भाग. या कादंबरीतील वातावरण कोठेही स्वकालीन समाजस्थितीशी विपरीत अशा घटनाप्रसंगांनी कलुषित झालेले नाही, हा तिचा एक लक्षणीय विशेष आहे. एवढेच नव्हे, तर या कादंबरीत घटना अशा मोजक्याच आहेत आणि सारा भर आहे तो श्रीधराच्या मानसिक आंदोलनांच्या चित्रणावर. कादंबरीच्या पहिल्या पिढीत स्वभावलेखन आणि मनोविश्लेषण यांना इतके महत्त्व देणारी ही बहुशः एकुलती-एक कादंबरी म्हटले, तरी चालेल.

अर्थातच ही कादंबरी सर्वस्वी निर्दोष अशी म्हणता येणार नाही. कथानिवेदन कदाचित उत्कंठा राखण्यासाठी असेल, पण काहीसे विस्कळित झाले आहे. श्रीधरने महादेवाला विहिरीत ढकलण्याच्या घटनेचे कथन फार पुसट असून त्यांचा नात्याचा संबंध गुपित ठेवण्याची युक्ती फारशी प्रभावी ठरलेली नाही. वैद्यिणीच्या भूमिकेतील स्त्रीने सगुणेच्या ‘ कामज्वरा’चे निदान करिताना व नंतर योजिलेली भाषाही थोडीशी सैल आहे. तिने सांगितलेली गोविंदाची ऊर्फ महादेवाची गोष्ट ही अतिरिक्त शृंगारिकतेकडे

झुकणारी आहे. ती गोष्टही कथेची उपकथा म्हणून व्यवस्थितपणे न घालता जवळ-जवळ सुटी गोष्ट म्हणून आलेली आहे. दामल्यांनी आपल्या लहानशा प्रस्तावनेतच आपल्या 'अल्प शक्तीबद्दल' आणि तज्जन्य 'पुष्कळशा चुकां'बद्दल लिहून ठेविले आहे. या लेखकाची ही एकुलती-एक कादंबरी आहे. हे ध्यानात घेता वर सांगितलेले दोष क्षम्य ठरण्यासारखे असून अव्वल इंग्रजीतील एक चांगल्यांपैकी सामाजिक कादंबरी म्हणून तिचा विशेष उल्लेख करणे योग्य ठरेल.

'दैवसेनी'या रूपांतरित काव्यामुळे अधिक परिचित असणारे बजाबा रामचंद्र प्रधान यांनी दोन कथात्मक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकी एकाचे नाव 'दोन गोष्टी' (१८८१) आणि दुसऱ्याचे 'सद्गुणी स्त्री' (१८८२). कदाचित हे दोन्ही ग्रंथ एकच असावेत, अशी शंका येते. कारण 'सद्गुणी स्त्री'च्या दुसऱ्या आवृत्तीच्या (१८८८) प्रस्तावनेत असा उल्लेख आढळतो की, "सद्गुणी स्त्री या गोष्टीचा पूर्वार्ध एका गृहस्थाने लिहून 'ज्ञानसंग्रह'नामक मासिक पुस्तकात प्रसिद्ध केल्यावर तिचा उत्तरार्ध...प्रधान यांनी लिहून त्याच मासिक पुस्तकात प्रसिद्ध केला. (ती) दुसऱ्या एका लहानशा गोष्टीसह १८८२ सालात छापविली होती." 'सद्गुणी स्त्री' दुर्गा लग्नाला आली, तेव्हा तिचा बाप कापडाचा व्यापारी माधवराव याने लग्नासाठी जमविलेला पैसा व दुकानातील इतर रोकड चोरीस गेली. नंतर माधवराव मक्त्याची कामे घेऊ लागला, पण त्यांतही त्याला खोट येऊन घेणेकऱ्यांनी दिवाणी तुरुंग दाखविला व दुर्गा मावशीकडे गेली. मावशीच्या घरी येणारा सावकार दुर्गीवर लुब्ध झाला व दुर्गीच्या बापाची सुटका करवून दुर्गीशी लग्न करण्याची गोष्ट त्याने काढिली. पण मावशीच्या कुटुंबाने नकार देऊन सावकाराचा रोष टाळण्यासाठी स्थलांतर केले. मंडलेश्वरास गेल्यावर तेथील एका बळवंतरावाशी दुर्गीच्या कुटुंबाचा परिचय झाला लग्नाचे ठरले. एवढ्यात बळवंतरावाचे सर्वस्व चोरीला गेले. तरी दुर्गीने त्याच्याशी लग्न केले. दारिद्र्यातही दुर्गीला आनंदी पाहून बळवंतरावाला तिच्या वर्तनाविषयी संशय आला व तो परदेशी गेला. दैवी उपायाच्या नादी लागून दुर्गा एका अपरिचित गृहस्थाबरोबर गावाबाहेरील ठिकाणी गेली. तेथे त्या गृहस्थाने आपली इच्छा प्रकट करताच ती मूर्च्छित पडली. नंतर ती शुद्धीवर आली, तेव्हा तिला कळले की, तो अपरिचित गृहस्थ म्हणजे वेषांतरित बळवंतरावच. त्याने चोरी होऊन सर्वस्व गेल्याची बतावणी केली, तीही दुर्गीची परीक्षा पाहण्यासाठी. याच वेळी दुर्गीच्या आईबापांची भेट होऊन कथेचा शेवट होतो. ही लहानशी गोष्ट रूपांतरित असावी, असा कयास आहे. एरवी तिच्यातील चित्रण पुष्कळच सुसंगत आणि वास्तववादी आहे. अखेरच्या भागात योजिलेली वेषांतराची युक्ती आणि सुखान्त हा अर्थातच प्रस्तुत कालखंडातील अद्भुततेचा वारसा असे म्हणावयास हवे.

**'शिरस्तेदार' (१८८१)**

'बालबोध'कर्ते विनायक कोंडदेव ओक यांची शिरस्तेदार ही सुमारे

पन्नास पृष्ठांची स्वतंत्र कथा वि. का. राजवाड्यांनी आपल्या 'कादंबरी' या निबंधात गौरवून उल्लेखिल्यामुळे चटकन लक्षात येणारी आहे. या कथेत एक सामान्य कारकुनापासून शिरस्तेदारीपर्यंत चढत गेलेला गृहस्थ लाचखाऊपणामुळे तुरुंगात पडतो व नंतर आत्मकथनाच्या स्वरूपात आपले अनुभव सांगतो. ओकांच्या या कथेतील निवेदन साधे आणि सरळ असून त्यातील खरे आकर्षण आहे ते या कथेतील वास्तववादी वातावरणाच्या निर्मितीत. ओकांची आणखी एक कथा 'आनंदराव' ( १८८२ ) ही रूपांतरित आहे. अमृतराव देशमुख या मोडकळीला आलेल्या इनामदाराच्या दोन मुलांपैकी आनंदराव थोरला. त्याला बापाच्या इच्छेप्रमाणे शिकून 'मास्तर' व्हावयाचे नव्हते. म्हणून त्याने घड्याळजीकडे नोकरी धरिली. घरची स्थिती खालावली. तशातच त्याला डोळ्यांचा आजार होऊन घड्याळजीकडचे काम करवेना; म्हणून त्याने सतारियाकडे नोकरी धरली. तेथून तो सतारी दुरुस्त करिता-करिता उत्तम सतारिया होऊन त्याची कीर्ती झाली. या रूपांतरित कथेतही ओकांनी 'इनाम-कमिशन'च्या भक्ष्यस्थानी पडलेली इनामदारी, तुकारामाच्या अभंगांतील अवतरणे इत्यादिकांच्या साहाय्याने स्वकीय वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु गोष्टीचे एकंदर वळण ख्रिस्ती धर्तीचे आहे, हे जाणवते, आणि त्यात आश्चर्य वाटावयास नको. या कालखंडात ओकांच्या नावावर 'कारंजे आणि ढग', 'लांडग्याची गोष्ट', 'राणीची गोष्ट' यासारखी ७-पासून १६ पृष्ठांपर्यंतची १०–११ चोपडी आहेत. ती सर्व मेथॉडिस्ट ख्रिस्ती लिटररी सोसायटीने प्रसिद्ध केलेली आहेत. त्यांतील वळणाचा परिणाम ओकांच्या एकंदर लेखनावर होणे अपरिहार्य होते.

**'वधूदर्पणमाला' ( १८८२ )**

भानु केशव गांगनाईक यांनी इ. स. १८८२-च्या सुमारास 'वधूदर्पण-माला' सुरू केली. या मालेत बंगालच्या 'नॅशनल इंडियन असोसिएशन'ने मिस मेरी कार्पेंटरच्या स्मरणार्थ प्रसिद्ध केलेल्या कार्पेंटर ग्रंथावलीपैकी 'मेजो बोऊ' (पंडित शिवनाथशास्त्री ) व 'सुरुचि कुटिर' ( द्वारकानाथ गंगोपाध्याय ) या दोन कादंबऱ्यांची रूपांतरे अनुक्रमे 'सद्गुणी सून' आणि 'आनंदीबाई' या नावांनी गांगनाईक यांनी आपल्या मालेत दिली. यांशिवाय 'हिराबाई आणि ताराबाई' ही एक स्वतंत्र कादंबरी या मालेत आहे. श्री. गांगनाईक हे इ. स. १८९०-च्या सुमारास बडोद्याच्या सहविचारिणी सभेचे चिटणीस होते.

वधूदर्पणमालेतील तीन कादंबऱ्यांपैकी 'हिराबाई आणि ताराबाई' ही कादंबरी प्रथमतः प्रसिद्ध झालेली व तेवढीच या लेखकाची स्वतंत्र कृती आहे. या कथेत हट्टी, उधळी, अशिक्षित ताराबाई आणि समंजस, काटकसरी, शिक्षित हिराबाई या दोन बहिणींची कथा साध्या विरोधाच्या पद्धतीने सांगितलेली आहे. प्रथमतः ताराबाईची कथा सांगून तिच्या मूर्खपणाने व स्वतंत्र बिऱ्हाड करण्याच्या हट्टाने तिच्या नवऱ्याचे व तिचे नुकसान कसे झाले, हे सांगितले असून नंतर हिराबाईचे त्याच कुटुंबातील

धाकट्या मुलाशी लग्न झाल्यावर तिच्या शहाणपणाने कुटुंबाची आर्थिक स्थि कशी सावरली, नवऱ्यालाही तिने उद्योगी बनवून व्यसनातून कसे सोडविले व स्वतः मुलींच्यासाठी शाळा चालवून नाव कसे मिळविले, याची हकीकत देण्यात आली आहे. या पुस्तकावर सर विल्यम वेडरबर्न, पंडिता रमाबाई, केसरी, नेटिव्ह ओपीनियन इत्यादींनी अनुकूल अभिप्राय दिले, ते मुख्यतः त्यातील उपदेशपर, नीतिप्रधान आणि स्त्रीविषयक दृष्टिकोणास अनुलक्षून आहेत. उर्दूप्रमाणे या पुस्तकाच्या भाषेत थाटमाट नाही, हे एका अभिप्रायातील विधान चिंत्य आहे.

'सद्गुणी सून' आणि 'आनंदीबाई' या दोन अनुवादित कथांचा विषयही मुख्यतः दोन शिक्षित आणि समंजस तरुण मुलींनी आपल्या कुटुंबांना कसे वळण लाविले, याबद्दलचा आहे आणि त्याची मांडणी 'हिराबाई'च्या कथेशी जुळती आहे. यांपैकी 'सद्गुणी सून' या कथेला कोकणची पार्श्वभूमी घेण्यात आली असून तेथील खेड्यातील माधवभट्ट या पुराणिकाच्या चार मुलांपैकी परशुराम या दुसऱ्या मुलाची बायको 'रमा' ही सदगुणी सून होय. तिने पाचपंचवीस माणसांच्या एकत्र कुटुंबाचा गाडा, त्यातील हेवेदावे, रुसवेफुगवे यांना तोंड देऊन व्यवस्थित चालविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याप्रमाणे सासरा-सासू यांची शुश्रूषा करणे, दीर नणंदा यांच्या संसाराला वळण लावणे इत्यादी कामे व्यवस्थित करून दाखविली आहेत. नणदेच्या पुनर्विवाहाचा मार्ग सुकर केला आहे. तिचा नवरा हाही सुशिक्षित, सुधारणेस अनुकूल असून त्याच्या तोंडी तत्कालीन सुधारकाची विचारसरणी घालण्यात आली आहे

'आनंदीबाई' ही डॉ. विश्राम या प्रार्थनासमाजी डॉक्टरांनी मुलीप्रमाणे पाळलेली मुलगी. शिकलेली, शिवणकाम करणारी. तिचा विवाह नगरहून अनाथ म्हणून आलेल्या आणि स्वतःच्या हिमतीवर शिकून नाव काढिलेल्या मुलाशी पूर्वपरिचयानंतर डॉक्टरांनी लावून दिलेला होता. विवाहानंतर काटकसरीने राहून मुंबईतील एका दरिद्री वस्तीत घर खरेदी करून तेथे आसपासची सर्व वस्ती सुधारण्याची कामगिरी आनंदीबाई व तिचा पती करितात. आनंदीबाईला विवाहाच्या केलेला उपदेश हा 'सुबोधपत्रिके'त छापलेला व एका प्रत्यक्ष विवाहाच्या वेळी वेळी करण्यात आलेलाच उपदेश होय, असा खुलासाही लेखकाने केला आहे.

श्री. गांगनाईक यांच्या तिन्ही कादंबऱ्यांची विशेष हा की, त्यांतील वातावरण अस्सल मराठी व बालबोध वाटते. सर्व कथांत कसलीही भडक घटना व भाषेचा पसारा ही नाहीत. कथाप्रवाह जवळजवळ चरित्रात्मक संथ पद्धतीने जातो. या पद्धतीमुळेच या कथांतील उपदेशपर आणि उघडउघड सुधारणावादाचा पुरस्कार करणारा भाग निबंधाच्या निकटचा असूनही फारसा उपरा किंवा विसंगत वाटत नाही. या कथेतील ही उपदेशपरता जिव्हाळ्यातून निर्माण झाली असली, तरी तिच्यात मिशनरी पद्धतीचा आग्रह दिसत नाही. कलादृष्ट्या गांगनाइकांची रचना फारशी वरच्या दर्जाची नसली, तरी साधी सरळ कुटुंबकथा या नात्याने ती पुष्कळ प्रमाणात

वाचनीय उतरली असून, पुढील काळातील वास्तववादी कलात्मक रचनेची पूर्वसूचना म्हणता येईल, इतपत लक्षणीय खासच आहे.

**म. वि. रहाळकरकृत 'नारायणराव आणि गोदावरी' (१८८४)**

ही कादंबरी लिहिताना लेखकाला आपल्या कादंबरीत तत्कालीन रचनेहून वेगळेपणा आहे, याची पूर्णपणे जाणीव होती. सामान्य लोकांतही " संसारात घडणारे अनेक चमत्कारिक प्रसंग घडून येतात... तेव्हा जगांतील व्यवहारात घडणाऱ्या गोष्टींचे चित्र जर कादंबरीच्या रूपाने लोकांस दाखविणे आहे तर जशा गोष्टी घडल्या असतील तशाच गोष्टींचेंही वर्णन समयविशेषीं केले पाहिजे...इंग्रजी भाषेंतील पॉप्युलर टेल्सच्या गोष्टीच्या धर्तीवर प्रस्तुत कादंबरींतील गोष्ट आहे. " ही लेखकाने प्रस्तावनेत स्पष्ट केलेली भूमिका प्रत्यक्ष कथनात बहुतांशाने व्यवस्थितपणे पार पाडिली आहे.

गोदावरी ही कंजूष त्र्यंबकभटाची मुलगी. दुसऱ्या पत्नीच्या ( राधाबाईच्या ) आहारी जाऊन ' बाइल्या ' झालेल्या त्रिंबकभटाने तिला ' सर्वगुणसंपन्न ' विधुर गोपाळरावाला द्यावयाचे ठरविले. गोपाळरावाचा विषयलंपट मित्र केशवराव हा मध्यस्थ झाला, कारण त्याचा गोदावरीवर डोळा होता. पण गोदावरीने धीटपणा केला व तिचा नारायणराव या अनुरूप वराशी विवाह झाला. गोपाळरावाकडून घेतलेले मुलीचे पैसे परत द्यावे लागल्याने त्रिंबकभटाला धक्का बसून तो वारला. गोदावरीवर डोळा असलेल्या केशवरावाने नारायणरावाची ऐन पावसाळ्यात बदली करविली व गोदावरीला वश करण्याचा प्रयत्न केला. एका गरजू स्त्रीमार्फत गोदावरीचे कपडे मिळवून ते एका ढोंगी पुराणिकाला दिले व ते आपल्या प्रिय पात्राचे, असे त्या पुराणिकाने नारायणरावाला परक्या ठिकाणी सांगितले. त्यामुळे नारायणरावाच्या मनात गोदावरीविषयी संशय येऊन त्याने तिला विष दिले. गोदावरी मरण पावल्यावर सर्व कारस्थान उघडे पडून नारायणरावाला वस्तुस्थिती कळली. पण फार उशिरा.

रहाळकरांच्या कादंबरीच्या उपर्युक्त कथानकात संशयाचे वातावरण व तज्जन्य घटना-प्रधान रहस्यमयता असली, तरी ती कादंबरीच्या अखेरच्या भागातच मुख्यत्वेकरून आहे. सुरुवातीला गोदावरीच्या माहेरचे वातावरण व तिचा सुखी संसार यांचे वर्णन करिताना रहाळकरांनी हरिभाऊंच्या युगाची पूर्वसूचना दिली आहे. किंबहुना, कादंबरीचे कथानक पुष्कळ प्रमाणात हरिभाऊंच्या ' मधली स्थिती ' कादंबरीशी जुळते आहे विशेषतः, गोदावरी आणि सरस्वती व केशवराव व चकणा गोविंदराव या व्यक्ति-रेखांत फार साम्य आहे. त्याचप्रमाणे सावकारपुत्र व गोपाळराव याला लुबाडण्यात केशव-रावाने केलेली कारस्थानेही चकण्या गोविंदरावाच्या कारस्थानांशी जुळती आहेत वेश्या-दारूच्या व्यसनांचा प्रकारही समान आहे. त्यामुळे अशी शंका येते की, रहाळकरांच्या या कथेचे स्फूर्तिस्थानही हरिभाऊंप्रमाणेच रेनॉल्ड्सच्या ' ओल्ड लंडन'मध्ये असावे. या कादंबरीच्या उत्तरभागावर मात्र शेक्सपिअरच्या ऑथेल्लोची दाट छाया आहे, आणि

त्यामुळेच ही कादंबरी पूर्णपणे वास्तववादी न होता अखेरी-अखेरीला काहीशी भडक, नाटकी व अद्‌भुतसदृश वाटू लागते. कादंबरीचा शोकान्त शेवटही त्या दृष्टीने लक्षणीय आहे. शेक्स्पिअरच्या नाटकांची भाषांतरे या काळात झालेली होती व महादेवशास्त्री कोल्हटकरांचे 'ऑथेल्लो' चांगलेच गाजले होते, हे ध्यानात घेतले, म्हणजे रहाळकरांच्या रचनेची संगती बरोबर लागते.

## सात

अव्वल इंग्रजीतील कथा कादंबरीचे स्वरूप उपलब्ध ग्रंथांच्या आधारे पाहिल्यानंतर प्रथमतःच कोणती गोष्ट जाणवत असेल तर ही की, या कालातील पुष्कळसे ग्रंथ दुर्लभ किंवा केवळ नाममात्र उरल्यामुळे त्यांच्यासंबंधी निश्चितपणे विधाने करणे काही प्रमाणात धोक्याचे ठरणारे आहे. काही ग्रंथांचा उल्लेख प्रा. सरदारांनी 'ब्रिटिश म्यूझियम' किंवा 'इंडिया ऑफिस' यांमध्ये असलेले म्हणून केलेला आहे व सदर ग्रंथ शं. ग. दात्यांच्या समावेशक सूचीतही आढळत नाहीत. पण निदान या ग्रंथांची ग्रंथ म्हणून नोंद तरी आढळते. आणखी काही कथात्मक साहित्य या नोंदीच्याही पलीकडे गेले असावे, असे मानण्याला आधार आहे. 'चंद्रिका' या मासिकामध्ये (पुस्तक १, अंक ८–९, १८५४) एक नीतिपर कादंबरी आढळली. 'बोधसागर' नावाच्या आणखी एका मासिक पुस्तकात (अंक ४ ते ८, १८४९) काही गोष्टी आढळल्या. अशा मासिकांतून लुप्त झालेल्या कथा-कादंबऱ्यांची इयत्ता कोणती, हा प्रश्न फारसा महत्त्वाचा नसून अव्वल इंग्रजीतील हे कथासाहित्य आज नोंदिलेलेही नसल्याने विवेचनाच्या कक्षेतून वगळावे लागते, हाच भाग महत्त्वाचा आहे.

## दोन विभाग

उपलब्ध कथा-कादंबऱ्यांच्या रचनेचे कालानुक्रमी स्वरूप आणि प्रकाशनव्यवस्था हाही एक विचारार्ह मुद्दा आहे. प्रस्तुत विभागात रचनेच्या दृष्टीने दोन पोटविभाग स्पष्टपणे जाणवतात. १८०६ ते १८५७ हा एक पोटविभाग आणि १८५७ ते १८८५ हा दुसरा पोटविभाग. 'कादंबरी'ची सुरुवातच १८५७ साली झालेली आहे. म्हणजे पहिला पोटविभाग हा निव्वळ कथारचनेचा विभाग आहे, तर दुसरा कथा-कादंबरीचा विभाग आहे. ही विभागणी मुंबई विद्यापीठाची स्थापना व प्रांतातील शिक्षणविषयक धोरणातील बदल यांच्याशी जुळती आहे, ती केवळ काकतालीयन्यायाने नव्हे, हे उघड आहे. पहिल्या विभागातील रचना ही बहुतांशी सरकारी विद्याखाते आणि 'बुक ॲण्ड ट्रॅक्ट सोसायटी'सारख्या ख्रिस्ती प्रचारकी संस्था यांच्याद्वारा प्रकाशात आलेली आहे, तर दुसऱ्या विभागात ख्रिस्ती संस्थांच्या कार्यात सातत्य राहिले असले, तरी सरकारी विद्याखात्यापेक्षा खाजगी प्रकाशनांनी अधिक वाटा उचललेला दिसतो. हा केवळ वाङ्मयव्यवहाराचा प्रश्न नसून तो त्याच्या स्वरूपाशी निगडित आहे. कारण पहिल्या विभागात शालोपयोगी आणि नीतिपर रचनाच मुख्यतः झालेली दिसते, तर दुसऱ्या विभागात ज्यांनी नीतीचा उल्लेख केला, त्यांच्याही

रचनेत नीत्युपदेश मवाळलेला किंवा नाममात्रच असून अधिक भर मनोरंजनावर आणि कथात्मक आकर्षणावर आहे, असे तुलनेने दिसते. तोच प्रकार काही प्रमाणात रचनाकारांच्या विभागणीतही आढळतो. पहिल्या विभागातील रचनाकार हे विद्याखात्याचे नोकर किंवा किमानपक्षी आश्रयापेक्षी आणि धार्मिक प्रचारक अधिक प्रमाणात आहेत. दुसऱ्या विभागातील रचनाकारांत रेल्वेचे, पोस्टाचे नोकर, सुखवस्तू रसिक इत्यादी पेशांतील मंडळीही धर्मप्रचारक, संस्कृत शास्त्री, विद्याखात्याशी संबद्ध अधिकारी यांच्या बरोबरीने आलेली आढळतात. पूर्वकालातील लोकांनी अनेकविध रचना केल्याचे आढळत असले, तरी ती रचना बहुतांशी शालेय अभ्यासक्रमाशी निगडित असलेल्या विषयासंबंधीची आहे; तर उत्तरकालातील रचनाकारांनी नाटक, काव्य, निबंध, प्रवासवर्णन इत्यादी अन्य वाङ्मयीन प्रकारांकडे लक्ष वळविले आहे, असे आढळते.

### दोन-तीन वळणे

खुद्द कथा-कादंबऱ्यांच्या स्वरूपाकडे नजर टाकल्यास त्यात आपल्याला दोन-तीन वळणे स्पष्ट दिसतात. त्यांपैकी क्रमाने पहिले नसले, तरी पूर्वसंगतीच्या संदर्भात अग्रक्रमाने उल्लेखिणे आवश्यक असलेले वळण म्हणजे प्राचीन वाङ्मयातील गद्यरचनेशी सांधेजोड साधण्याचा प्रयत्न करणारे 'बखरी'चे वळण म्हणावे लागेल. 'बखर' या शब्दाचा इतिहाससंबद्ध घटनांचे वर्णन करणारे लिखित हा अर्थ संकुचित ठरून तो शब्द व्यापक अर्थाने वापरला जाऊ लागला. ऐतिहासिक बखरी याच कालात मल्हार रामरावाने सजविल्या असल्या, तरी या प्रकरणाशी संबद्ध नसल्याने वगळल्या आहेत या विभागात समाविष्ट होणाऱ्या बखरी या बहुतांशी पौराणिक आहेत. महाभारत, रामायण आणि भागवत यांच्यातील कथा किंवा कथाभाग निवडून ते गद्यात सांगणे एवढेच या बखरींचे कार्य. ते करीत असताना कथारचना किंवा निवेदनचातुरी यांचा फारसा उपयोग न करिता सामान्यतः कथानकाचा आराखडा थोडक्यात सांगणे एवढेच ह्या बखरींची रचना करणाऱ्या 'शास्त्री' बखरकारांचे उद्दिष्ट दिसते. कदाचित महाकाव्याच्या व्याख्येत रामायण-महाभारतांना उद्देशून 'इतिहास' हा शब्द वापरला जातो, त्याच्याच अनुसंधानाने तत्संबद्ध कथानकांना 'बखरी' हे नाव देण्याची कल्पना शास्त्रीमंडळींना सुचली असावी मुद्रणाच्या सोयीमुळे पद्यातील ग्रंथ गद्यात आणि शक्य-तो थोडक्यात आणण्याच्या हेतूने या 'पौराणिक बखरी' रचिल्या असणेही शक्य आहे. कथात्मक रचना या नात्याने त्यांचा उल्लेख करणे आवश्यक असले, तरी त्यांचे स्थान महत्त्वाचे मानिता येत नाही.

### मिशनरी वळण

या काळातील दुसरे महत्त्वाचे वळण 'मिशनरी वळण' म्हणून उल्लेखिता येईल. सक्खनपंडित किंवा वैजनाथशास्त्री ही शास्त्रीमंडळी कथा-वाङ्मयाची आद्य निर्माती असली, आणि त्यांच्या रचनेत इसापनीती किंवा पंचतंत्र-हितोपदेश यांसारखी एतद्देशीय वा तत्सम परंपरेची ग्रंथसामग्रीच प्रथमतः आली असली, तरी त्यातून

निर्माण झालेल्या वळणाला, अधिक्षेपाच्या नव्हे तर यथार्थतेच्या दृष्टीने 'मिशनरी वळण' असे नामाभिधान रास्त वाटते. कारण केवळ नीतिवादी किंवा उपदेशपर कथारचना असो, की खुद्द मिशनरी आणि त्यांच्या गोटातील मंडळी यांनी उघड तारणाच्या उद्दिष्टाने केलेली धार्मिक नीतिपर रचना असो, त्या रचनेत मांडणीचा एक समान धागा आढळत जातो. मिसेस फरार, बाबा पदमनजी, मिसेस मुलेन्स यांच्यासारखी प्रत्यक्ष खिस्ती प्रचारक मंडळी, हरि केशवजी, बापू छत्रे, वि. को. ओक, गोविंद शंकर बापट यांच्यासारखी खिस्ती नसलेली, पण नीत्युपदेशपर रचना करणारी विद्याखात्याशी निगडित असलेली मंडळी आणि स्वतंत्रपणे बोधपर रचना करू इच्छिणारी मंडळी यांचा परस्पराशी काही संबंध लौकिकात असो वा नसो, त्यांच्या रचनेतील भडकपणाचा अभाव, भाषा सोपी आणि परिचयाची वापरण्याची दृष्टी, घटना-प्रसंगात दैनंदिन जीवनाशी निगडित भागांना प्राधान्य देण्याची प्रवृत्ती आणि या सर्वांतून एका बाजूने निर्माण होणारी अकृत्रिमता, तर दुसऱ्या बाजूने उपदेशाचे किंवा नीतीचे तात्पर्य कथेशी न चुकता जोडण्याच्या धडपडीतून निर्माण होणारी कृत्रिमता ही अंगे सर्वांच्या रचनेत प्रमाणभेदाने पण सलगपणे आढळतात. विशिष्ट धार्मिक किंवा शालेय बोधवादी उद्दिष्ट डोळ्यांपुढे ठेवणारी ही रचना वस्तुतः कथा-कादंबरीच्या क्षेत्रात दुय्यम ठरावयास हवी होती; पण तिला या कालविभागात एक स्वतंत्र आणि मानाचे स्थान प्राप्त झाले. हे स्थान केवळ संख्येने पुष्कळ अशा मिशनऱ्यांच्या निर्मितीने किंवा प्रचाराच्या चिवटपणामुळे प्राप्त झालेले नव्हे; तर या वळणामुळे मराठी कथा-कादंबऱ्यांची जादू-टोण्याच्या, राक्षस-पऱ्यांच्या, राजेरजवाड्यांच्या, जमिनीवर क्वचितच पाय टेकणाऱ्या अद्भुतरम्य वळणातून, तशा वातावरणातून सुटका होऊन, वास्तवाच्या परिचित भूमीवर सामान्य माणसाला आरोग्यदायी वाटणाऱ्या इहस्थ वातावरणात मराठी कथा-कादंबरी उभी राहिली, स्थिरावली आणि विकसित झाली, म्हणूनच होय.

### अद्भुतरम्य वळण

यानंतरचे तिसरे वळण म्हणजे या कालखंडातील कथा-कादंबऱ्यांचे प्रातिनिधिक म्हणून ओळखले जाणारे 'मुक्तामाले'चे किंवा अद्भुतरम्य वळण होय. हे अद्भुतरम्य वळण अनेक घटकांनी बनलेले आहे. त्यातील सर्वांत महत्त्वाचा घटक म्हणजे संस्कृत काव्यनाटकांचा होय. मराठीतील कथात्मक वाङ्मयाच्या एका प्रकाराला 'कादंबरी' हे नाव रूढ झाले, ते मुळी बाणभट्टाच्या एका कल्पित ग्रंथावरून. बाणाची कादंबरी आणि दण्डीचे दशकुमारचरित ही मराठीतील अद्भुतरम्य परंपरेची आद्य-सामग्री. त्यांच्या रचनेतील साऱ्या लकबा अद्भुतरम्य कथा-कादंबऱ्यांनी आपल्या म्हटल्या. त्यांच्या जोडीला अरबी-फारसीतून उमटलेल्या कथाही आल्या. संस्कृत आणि अरबी कथांच्या घडणीत पौरस्त्य घडणीतला एक समान, गहिरा आणि लोलुपतेचा भाग आहे, हे सहजी ध्यानात येऊ शकते. यात आणखी भर पडली, ती पाश्चात्त्य

वाङ्मयातील बोकॅशिओपासून शेक्स्पिअरपर्यंतच्या लेखकांच्या रचनेतील अनुवादांची किंवा अनुकरणांची. अशा संमिश्रतेला अन्यत्र कोठेही मिळणार नाही, असा अवसर या अद्भुतरम्य रचनाप्रकारात मिळतो. कारण अद्भुततेची निर्मितीच मुळी भिन्न-भिन्न स्थलकालांतील संभवनीय घटनांच्या असंभवनीय एकत्रीकरणातून होत असते. या तऱ्हेच्या अद्भुततेच्या निर्मितीला हातभार लावणारी मंडळी कोणती हे पाहिले, म्हणजे या रचनेची संगतीही पुष्कळशी लागू शकते. अव्वल इंग्रजीच्या आरंभी पेशव्यांचा आश्रय सुटल्यामुळे मोकळी होऊन गरजू ठरलेली शास्त्रीमंडळी हीच इंग्रजी राज्यकर्त्यांची विद्याखात्यातील सहायक मंडळी होती. त्यांचे 'बालबोध' रचनेचे 'मोला'चे काम संपताच या मंडळींनी आपल्या शास्त्री परंपरेस अनुसरून संस्कृतामधील 'काव्यशास्त्रविनोदा'च्या दालनाचे दरवाजे खुले केले आणि तत्सम प्रवृत्तीची अन्य ठिकाणची रचनाही आपुलकीने आपलीशी केली. तीतूनच प्राधान्याने हे अद्भुतरम्यतेचे युग उभारले गेले.

**त्या वळणांचे परस्परसंबंध**

अशा रीतीने तीन वळणांनी निर्माण झालेली या विभागातील कथा-कादंबऱ्यांची रचना ही सर्वांशाने परस्परांपासून अलग आहे, असे मात्र म्हणता येणार नाही. किंबहुना, या तिन्ही वळणांतील रचनेमधील संगती शोधणे हे फारसे अवघड किंवा अशक्य नाही. मुद्रणाची सोय झाली, म्हणून येनकेन प्रकारेण 'ग्रंथकार' हा किताब आपल्याला मिळावा, म्हणून खटपट करणारे थोडेसे लोक याही विभागात आढळतील, पण त्यांचा अपवाद वगळता, कोणत्याही कारणाने आणि निष्ठेने वाङ्मयनिर्मितीकडे वळलेल्या लोकांच्याकडे लक्ष दिल्यास त्यांच्या रचनेतील भिन्न वळणेही एकाच काल-खंडातील परिस्थितीचा परिपाक आहेत असे आढळून येईल. इंग्रजांची राजवट सुरू होणे ही केवळ राजकीय घटना नव्हती. कृषिसंस्कृतीवर औद्योगिक आणि यांत्रिक संस्कृतीने प्रस्थापित केलेल्या वादातीत श्रेष्ठत्वाची आणि विक्रमाची ती निशाणी होती. त्यातून घडणारी स्थित्यंतरे ही सुरुवातीच्या काळात अनेक भल्या-भल्या बुद्धिमंतांना स्तिमित करीत होती. तेव्हा हे घडत आहे याची पुरेशी कल्पना नसलेला, भांबावलेला सामान्य माणूस प्रथमतः जेत्यांचा आणि त्यांच्या जीवनपद्धतीचा अंधळेपणाने मागोवा घेऊ लागला. त्यातून मिशनरी प्रचाराला मुक्तद्वार मिळाले. यापुढची जीवनाची घडी ही अपरिहार्यपणे ख्रिस्ती वळणाची असली पाहिजे, असे ज्यांना प्रामाणिकपणे वाटले, त्यांनी लौकिकात ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेला असो को नसो, त्यांच्या वाङ्मयाविष्कारात, त्यातील कथारचनेत असो की नीत्युपदेशात असो, उघड वा आडवळणाने 'ख्रैस्त्य' येऊ लागले. एका पिढीनंतर जेव्हा यंत्रयुग आणि ख्रिस्ती विचारसरणी यांतील सीमारेषा स्पष्ट होऊ लागली, तेव्हा वैचारिक क्षेत्रात ख्रिस्ती धर्मप्रचाराविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली. पण ही प्रतिक्रिया धार्मिक बाबींपुरती झाली, तरी जीवनमानातील होऊ लागलेले बदल आणि त्यांची संगती व त्यातील स्वीकार्य-

अस्वीकार्यता यांचा निर्णय स्पष्टपणे व लवकर होणे शक्य नव्हते, म्हणूनच एकीकडे काहीतरी विचार, नीत्युपदेश, हेतू हवा आहे असे स्पष्टपणे वाटणारे लेखकसुद्धा अद्‌भुतरम्यतेकडे वळले. पण तेही अशा पद्धतीने की कोणी नीत्युपदेशाचा अर्थच अतिशय व्यापक, उदार आणि क्वचित गोलमाल करून टाकिला (प्रास्ताविक भाग, मुक्तामाला), कोणी प्रचलित जीवनाच्या चित्रणाचा भाग वगळून स्वकालीन उपदेश राजेरजवाड्यांतील राजपुत्र, प्रधानकन्या यांच्या तोंडी घालून टाकिला. कोणी अज्ञात काळ, भूतकाळ आणि वर्तमानकाळ याची सरमिसळ खिचडी करून त्यातील सदोषता कथारचनेबाबतच्या 'अल्पमति'त्वाशी जोडून सुटका करून घेतली. सारांश, अद्‌भुतरम्य रचना झाली, तर ती काही कलेच्या विशिष्ट दृष्टिकोणाने निर्माण होणाऱ्या स्वप्नरंजनाच्या पुरस्कारास्तव आलेली नव्हे, तर परिस्थितीच्या स्वच्छ निदानाच्या अभावी निर्माण होणाऱ्या दोलायमान, संभ्रान्त अवस्थेतून स्फुरणाऱ्या भाष्याची व सुटकेची सांधेजोड म्हणूनच झालेली आहे.

अर्थातच त्याबरोबरच हेही मान्य केले पाहिजे की, कलेच्या संबंधीच्या काही कल्पना या अद्‌भुतरम्य पद्धतीच्या रचनेच्या बुडाशी आहेत. त्यांपैकी एक कल्पना कादंबरीला सुरुवातीला मिळालेल्या एका नावातून स्पष्ट होते. रा. ब. का. बा. मराठ्यांनी आपल्या निबंधात गोवलेले 'नावल' हे ते नाव होय. शब्द आला तो मुळात इंग्रजी 'नॉव्हेल' या शब्दाच्या अनुकरणातून उच्चारसाम्याने, हे खरे. पण नंतर 'नवलपूर्ण' ते 'नावल' असे स्पष्टीकरणही करण्यात आले. अर्थातच कथारचना म्हणजे नवलपूर्ण रचना ही कल्पना रचनाकारांनी मनाशी बाळगिली होती, हे स्पष्ट आहे; आणि नवल-पूर्ण म्हणजे हरघडीच्या, दैनंदिन जीवनात घडते त्याहून वेगळे, हा अर्थही लक्षणीय आहे. साहजिकच अशा नवलपूर्णतेचा शोध वास्तवाबाहेरच कोठे तरी लागावयाचा, या जाणिवेनेही मुक्तामाला-युगातील अद्‌भुततेचे स्वरूप ठरविले, हे उघड आहे. याच्याशी सुसंगत असे दुसरे विचार स्वतःचे फारसे शिक्षण झालेले नाही म्हणणाऱ्या ना. स. रिसबुडांपासून कै. म. गो. रानड्यांपर्यंत अनेकांनी व्यक्त केले आहेत. आम्हा हिंदू लोकांच्या आयुष्यात सांगण्यासारखे काही फारसे घडत नाही, ही तक्रार रिसबुडांनी आपल्या एका कादंबरीच्या प्रस्तावनेत मांडून एका परीने अद्‌भुतरम्यतेची एक कैफियत सादर केली आहे, तर 'रत्नप्रभा' कादंबरीच्या परीक्षणात युरोपियन लोकांच्या जीवनात असलेल्या प्रेमासारख्या भावनांचे उत्कट प्रदर्शन व चित्रण आपल्याकडे होऊ नये, याची मीमांसा कै. रानड्यांनी केली आहे. जीवनातील सांगण्या-सारखे कांही तरी हे चाकोरीच्या, रटाळ म्हटल्या गेलेल्या दैनंदिन जीवनक्रमातही असू शकते. पण ते टिपण्याला कलावंताची सूक्ष्म नजर ('दिव्य दृष्टि') असावी लागते, ह्याचा प्रत्यय हरिभाऊंसारखा कलावंत उदयाला येण्याच्या आधीच्या काळात फारसा आढळला नाही, तर त्यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. प्रस्तुत युगातील रचना एकंदरीने सुमारच होण्याचे आणखीही एक कारण आहे. ते का. बा. मराठ्यांनी

आपल्या निबंधात सूचित केले आहे. पोरेबाळेदेखील नावले-नाटके लिहून पैसे मिळवू लागली, इतकी नावला-नाटकांची कीड झाली, अशा आशयाचे उद्गार रा. ब. मराठ्यांनी कांदबऱ्यांची रचना पन्नासच्या आत असताना काढिले. तेव्हा ही कीड त्यांना संख्यावाचक स्वरूपाची नसून गुणवाचक स्वरूपाची वाटली, हे स्पष्ट आहे. आरंभीच्या कालातील सरकारी उत्तेजनाच्या भरीमुळे ग्रंथरचना करण्याचा हव्यास वाढला, असे मानण्याला अंतर्गत पुरावाही आढळतो. उघड दिसणाऱ्या अगदी नजीकच्या आधीच्या कथा-कांदबऱ्यांच्या नकला, किंवा त्यातल्या त्यात गाजलेल्या कृतींच्या छाया असलेली निर्मिती झालेली दिसते, ती अक्षर-प्रेरणेपेक्षा अर्थ-प्रेरणेने झाली, हे सांगण्याचीसुद्धा आवश्यकता नाही.

## कथेतून कादंबरीचा उगम

कथा-कादंबऱ्यांचा एकत्रित आढावा घेताना आणखी एक विचार नमूद करावयास हवा. कथा आणि कादंबरी हे सर्वस्वी स्वतंत्र आणि भिन्न व प्रत्येकी स्वयंपूर्ण वाङ्मयप्रकार आहेत. कथेचे तंत्र निराळे आणि कादंबरीचे निराळे, हे आज मान्य झालेले विचार असले, तरी ते प्रस्तुत-कालातील वाङ्मयाशी सुसंगत नाहीत. अनेक कथा मिळून एक कादंबरी होत नाही किंवा एका कादंबरीतून अनेक कथा तयार करिता येणार नाहीत, हा तंत्रविचार पुस्तकी पांडित्याचा ठरावा, असे पुरावे या कालात मिळतात. एकतर दशकुमारचरित किंवा अरबी गोष्टी किंवा पंचतंत्र-हितोपदेश या पद्धतीच्या साखळीच्या रचनेची विपुलता या काळात आढळते. दुसरे, अनेक कादंबऱ्यांतून सुट्या कथांची सांधेजोड करण्याची पद्धतीही स्वीकारिलेली दिसते. तिची सुरुवात 'यमुनापर्यटना'पासूनची आहे. तेव्हा कथांच्या गुंफणीतून कादंबरीच्या रचनेकडे वळावयाचे, हा या कालातील बहुविध कांदबऱ्यांचा एक विशेष म्हणावा लागेल. हा प्रकार रचनाकारांच्या 'आखूड' समजुतीतून उद्भवलेला असो, की त्यांच्या पुढील धर्मकथांच्या वा कलाकथांच्या आदर्शांमधून उद्भवलेला असो, मराठी कांदबरी ही कथेतून स्फुरलेली, वाढलेली आहे, हे ऐतिहासिक सत्य नाकारिता येणार नाही.

### उपयुक्त संदर्भवाङ्मय


(१) अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका, गं. बा. सरदार.

(२) प्रदक्षिणा (आवृत्ती दुसरी, मराठी कादंबरी, वि. बा. आंबेकर).

(३) मराठी कांदबरीचे पहिले शतक, कुसुमावती देशपांडे.

## प्रकरण आठवे

# काव्य

### एक

आधुनिक कवितेच्या प्रारंभाचा विचार करिताना परशुरामपंततात्या गोडबोले यांचे नाव प्रथम पुढे येते. इंग्रजी राजवटीत मराठी वाङ्मयाचा पाया घालताना व्याकरण, कोश, छंदःशास्त्र, पाठ्यपुस्तके इत्यादी उपकरणांच्या निर्मितीचे जे-जे सरकारी, निमसरकारी अथवा बिनसरकारी प्रयत्न झाले, त्या-त्या सर्वांना तात्यांचा प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष हातभार लागला होता. तात्यांनी ज्या अभिजात संस्कृत नाटकांची भाषांतरे केली आहेत, ती इ. स. १८५७-मध्ये मुंबई विद्यापीठाची कायद्याने स्थापना होईपर्यंत व त्यानंतरही काही काळ त्यात मराठीला दुय्यम भाषा म्हणून स्थान होते तोपर्यंत अभ्यासक्रमात पाठ्यपुस्तके म्हणून अंतर्भूत होती. या भाषांतरित नाटकांच्या अभ्यासाचा ठसा, पुढे नावारूपास आलेल्या नंतरच्या पिढीतील लेखकांच्या शैलीवर उमटला आहे. शिवाय, इ.स. १८५४-मध्ये तात्यांनी प्राचीन मराठी कवींच्या काव्याचे मंथन करून महाराष्ट्राच्या रसिकजनांना 'मधुर-काव्यामृता'चा आस्वाद चाखविला. 'नवनीत' काढण्याच्या त्यांच्या या बहुमोल व उपयुक्त नीतीमुळे प्राचीन व अर्वाचीन मराठी कवितेचा सांधा बेमालूम रीतीने सांधला गेला. तेव्हा अशा रीतीने ज्या कर्तृत्ववान पुरुषाने जुन्या व नव्या वाङ्मयाची परंपरा अखंडित ठेविली, त्याचा इ. स. १७९९–१८७४ हा आविर्भावकाळ अलीकडील मराठी वाङ्मयाचा प्रारंभ-काळ म्हणून मानण्यास हरकत नाही.

महाराष्ट्रात इ. स. १८१८ साली जुन्या मराठी सत्तेचा अस्त होऊन नवीन इंग्रजी राजवट सुरू झाली. परंतु इंग्रजांच्या आगमनापूर्वीपासून गोमन्तक

पोर्तुगीजांच्या ताब्यात होते, मराठवाडा निजामच्या आधिपत्याखाली होता, वऱ्हाडचे हस्तांतर कधी मराठ्यांकडे, कधी निजामाकडे, तर कधी इंग्रजांकडे होत होते; आणि माळवा, बुंदेलखंड, नागपूर, गुजरात व तंजावर येथील मराठी राज्ये नामोहरम झाली असली, तरी इंग्रजांच्या पंखाखाली त्यांची परतंत्र संस्थाने कायम होती. या परिस्थितीचा दुष्परिणाम असा झाला की, राज्यकारभाराच्या दृष्टीने महाराष्ट्र कायमचा खंडित राहिला. त्यामुळे नव्या इंग्रजी राजवटीत त्याच्या भिन्नभिन्न विभागांचा विकास एकाच छत्राखाली एकाच वेळी एकसारखा झाला नाही. या प्रतिकूल परिस्थितीचा साहित्यावरही विपरीत परिणाम झाला. इंग्रजी राजवटीच्या आरंभाबरोबरच पश्चिम महाराष्ट्रातील आधुनिक कवितेचा प्रारंभ झाला, तर विदर्भातील आधुनिक कवितेचा प्रारंभ, त्यानंतर नागपूरचे संस्थान खालसा झाल्यावर जवळजवळ अर्धशतकाने झाला आणि मराठवाड्यातील आधुनिक कवितेचा तर अगदी अलीकडे म्हणजे गेल्या पाचपन्नास वर्षांत झाला.

## जुन्या शाहिरी परंपरेचा शेवट

इ. स. १८१८-मध्ये मराठेशाहीचा अन्त झाला आणि पुढील पाव शतकात, तिच्या ऐन अमदानीत ऐश्वर्याचा व नानाविध विलासांचा मनमुराद सुखोपभोग घेतलेल्या जुन्या शाहिरी परंपरेचाही अस्त झाला. स्वकीयांची सत्ता नष्ट होऊन परकीयांची गुलामी महाराष्ट्रीयांच्या नशिबी येताच त्यांच्या समाजात विलक्षण स्थित्यंतर घडून येत होते. ही उलथापालथ अनेक बाजूंनी व अनेक प्रकारांनी होत होती. हा महाराष्ट्राच्या जीवनातील संक्रमणाचा काळ होता. हे संक्रमण यथावकाश होत होते. जुने हळूहळू लोप पावत होते आणि नवे हळूहळू त्याची जागा घेत होते. अशा रीतीने राज्यक्रांतीमुळे विस्कटलेली जुनी घडी नव्याने बसण्यास जवळजवळ तीन तपांचा अवधी लागला. या संक्रमणकाळातच प्रभाकर व परशराम हे शाहिरी परंपरेतले दोघे शेवटचे शाहीर होऊन गेले. ज्या प्रभाकर दाताराने आपल्या तारुण्यात पुण्याची वैभवशाली पेशवाई पाहिली होती, त्यालाच आपल्या वार्धक्यात 'मुंबईतील काही शोकी मंडळी', 'साष्टी-कलेक्टर हापिसातील मंडळी', 'अव्वल इंग्रजीतील प्रिंगलसाहेबाचे मोजणी-हपीस' किंवा 'विकाजी व पेस्तनजी शेट'[1] अशा बकाली मुंबईतील लुग्यासुंग्या मंडळींवर आलतूफालतू कवने केवळ पोटासाठी रचावी लागली; आणि या पालटलेल्या निष्ठुर मनूस उद्देशून पिळवटलेल्या आतड्यांनी आर्त वाणी काढावी लागली —

कुंकवावाचुन कपाळ ! मंगळसूत्रावांचुन गळा !
तसा सैन्यसमुदाय उदासिंत रंग दिसे वेगळा !
विपरित आला काळ, मेरुला गिळिलें मुंग्यांनीं,

१. प्रभाकरकृत पदे, पोवाडे व लावण्या, पृ. ८९.

पंडितांस जिकिलें सभेमधि मदांध भंग्यांनी.
भिमास अणिलें हारीस रणीं अशक्त लुंग्यांनीं,
कुबेरास पळविलें अकिंचन कसं तेलंग्यांनीं !
जाळें राघवमाशास अडविले असंख्य झिंग्यांनीं.
जर्जर झाला विष्णुवहन बदकांचे दंग्यांनीं.[1]

मात्र हे अदृष्ट कशामुळे ओढवले याची मीमांसा त्याला करिता आली नाही. 'लाल शरीर, टोपी, अंगी आठ प्रहर अंगरखा' अशा इंग्रेजांचाच हा कावा आहे, अशी त्याची आलंबाल खात्री होती. परशराम शिंप्यास तर पंधरा दिवस अगोदर आपल्या मरणाचे स्वप्न पडले होते. तो इतर शाहिरांप्रमाणे चंगीभंगी नव्हता; उलट, सदाचारी व निर्लोभी होता. पेशवेसरकार त्यास जहागिरी देत होते; परंतु 'माझ्या सुईदोऱ्यास हयाती असो' असे म्हणून त्याने ती नाकारिली होती. त्याने तरुणपणात स्वराज्याच्या आनंदाचा अनुभव घेतला होता. आता परराज्यात

मोठमोठे उमराव धारकरि जबर चहूंकडे दरारा
राव्यापरि पिंजऱ्यांत कोडले माघेणीचा चंदीचारा.[2]

ही शूर सरदारांची दयनीय दशा त्याला डोळे उघडे ठेवून बघवेना. इंग्रजी राज्यामुळे सारा समाज ढवळून खालपासून वरपर्यंत जी प्रचंड उलथापालथ झाली, तिचे त्याने अतिशय हृदयद्रावक वर्णन केले आहे

जुने कायदे अगदि मोडले जधिपुन झाली इंग्रेजी
कांदा, भाजी एक्या मोले तुप, साकर, मैदा, सोजी,
तुरक स्वार पलटणे पायदळ, रथ चाले मुंग्यांच्या परी
जिकडे बदली तिकडे जावें घेउन कुटुंबकबिला बरोबरी.
राजधान्या अगदीच बुडाल्या राजांचे झाले फर्जी
चवरि, अब्दागिरि टांगुन ठेविल्या, छत्रि अणुन अपलि घरी शिरीं,
नाही विलायत कोणि पाहिली या मुलखावर जरब कशी ?
एक चपराशी चकती पाहुन रयत थरथरी बकरि जशी ![3]

परंतु प्रभाकराप्रमाणेच परशरामालाही या देशावर विलायतच्या इंग्रजाची जरब कशी बसली, या घटनेची मीमांसा करिता आली नाही. त्या काळी नव्यानेच चढत-वाढत असलेल्या 'ममई'वर परशरामाचा एक पोवाडा आहे. त्यात त्याने मुंबईतील सबगोलंकाराचा उल्लेख केला आहे.[4]

१. प्रभाकरकृत पदे, पोवाडे व लावण्या, पृ. ६९.
२. परशराम कवीच्या लावण्या, पृ. ६५, ६६, ६७.
३. परशराम कवीच्या लावण्या, पृ. ६५, ६६, ६७.
४. परशराम कवीच्या लावण्या, पृ. ६५.

प्रभाकर इ. स. १८४३-मध्ये वारला व परशराम त्यानंतर एक वर्षाने म्हणजे इ. स. १८४४-मध्ये मरण पावला. दोघे स्वतंत्रतेत जन्मले होते; परंतु दोघांचे मृत्यू मात्र परतंत्रतेत झाले. त्यांच्यानंतर शाहिरांची परंपरा चालविण्यास परशरामाचा चेला बाकेराव पुढे आला होता. त्याला गायकवाड सरकाराचे वर्षासन होते. परंतु आता शाहिरी कवनाला आश्रय देणाऱ्या उदार राजेरजवाड्यांची व सरदारदरकदारांची स्थिती अतिशय शोचनीय झाली होती, आणि तिचा यथेच्छ आस्वाद घेणाऱ्या शिपायांचा व सैनिकांचा श्रोतृसमुदायही बेकार झाला होता. राजे व सरदार आता आपल्या उरल्या-सुरल्या जहागिऱ्या कशा टिकविता येतील, या विवंचनेत होते आणि शिपाई व सैनिक पोटापाण्याची सोय व्हावी, म्हणून एखादा नवा व्यवसाय शोधीत होते. शिवाय, अकल्पित ओढवलेल्या गुलामीमुळे सर्वसाधारण रयतेलाही शाहिरी लावण्यांमधील उच्छृंखल व अनिर्बंध इश्काचा वीट आला होता व छंदीफंदी तमाशांचा उबग आला होता. तसे पाहिले, तर एकूण शाहिरी साहित्यात पराक्रमाचे पोवाडे कमी आहेत; मात्र रंगबाजी लावण्यांची नुसती रेलचेल आहे. स्वतः रावबाजी रंगेल होते. तेव्हा 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने शृंगारिक लावण्यांची निपज मुबलक व्हावी, हे क्रमप्राप्तच होते. परंतु त्यात कर्तव्यपराङ्मुख मराठेशाहीच्या पुढील अधःपाताची बीजे खोलवर रुजत होती, हे कठोर सत्य दृष्टीआड करिता येत नाही. तेव्हा साहजिकच नव्या युगात शाहिरांची बूज राहिली नाही. प्रत्येक वस्तूचा एक काळ असतो; तो काळ लोपला की ती वस्तूही लोपते. शाहिरी कवनांचाही एक काळ होता; तो काळ लोपताच शाहिरी कवन लुप्त झाले. अशा रीतीने प्राचीन महाराष्ट्रसारस्वतातील शाहिरी परंपरा येथेच खंडित झाली.

### जुन्या भक्तिपरंपरेचे अवशिष्ट नवे रूप

याप्रमाणे जुनी शाहिरी परंपरा नव्या युगाच्या प्रभावात नाहीशी झाली. परंतु जुनी भक्तिपरंपरा मात्र आपले शुद्ध अधिष्ठान ढळू न देता तशीच टिकून राहिली. ती तशी का टिकली, याला अनेक कारणे आहेत. एक तर ती पूर्वीपासूनच लोकाश्रयावर अवलंबून होती. शाहिरी कवितेप्रमाणे तिला राजाश्रय किंवा नायकापाइकांचा आधार नव्हता. दुसरे असे की, शाहिरी परंपरेप्रमाणे तिचा ढासळत्या राजकारणाशी साक्षात संबंध नव्हता. ती चिरजीवी राहण्याचे आणखी एक कारण असे की, भक्तिरसाला स्वतंत्र अस्तित्व आहे. शाहिरांच्या लावण्यांना व पोवाड्यांना अनुक्रमे शृंगार व वीर या दोन रसांची पाठबळे होती. इंग्रजी साहित्याच्या संपर्काने आधुनिक मराठी कवितेत अधिष्ठित झालेल्या प्रेमगीतांना व राष्ट्रीय कवनांना त्याच रसांची पाठबळे असल्यामुळे ते जुने शाहिरी कवितेचे प्रकार या नव्या प्रकारांत पूर्णतया एकरूप झाले. परंतु भक्तिकाव्य हे मात्र पूर्वीप्रमाणेच स्वतंत्र राहिले. कारण जुने भक्तिकाव्य हे नव्या गूढवादी काव्यप्रकाराशी सदृश असले, तरी हा नवा काव्यप्रकार नसून मुळात आपलाच आहे, हे सत्य या बाबतीत लक्षात घेणे आवश्यक आहे. कालानुसार त्याच्या

आविष्कृतीत व अभिव्यक्तीत नवेपणा व निराळेपणा आला आहे, एवढेच काय ते. मनुष्य हा स्वभावतः अपूर्ण असल्यामुळे त्याला परमेश्वराच्या अस्तित्वावर जरी नाही, तरी तत्सदृश कोण्यातरी नैसर्गिक अशा प्रबल शक्तीच्या कल्पनेवर विश्वास ठेवावा लागतो. त्याशिवाय त्याच्या जीवनाला पूर्णता प्राप्त होत नाही. शिवाय, शृंगार व वीर हे अनुक्रमे रती व उत्साह या स्थायी भावांवर अधिष्ठित आहेत. या स्थायिभावांची उत्कटता वयोमानानुसार कमी जाणवते. भक्तिरसाची गोष्ट वेगळी आहे. त्याच्या मुळाशी असणारा 'निर्वेद' ही स्थायी भावना नसून ती एक मूलभूत अंतःप्रेरणा आहे.

## वेदान्तपर काव्यग्रंथ

महाराष्ट्रात इंग्रजी राज्यक्रांती झाली, त्या सुमारास राजाश्रित शाहिराचाच बोलबाला होता. त्यांच्या चलतीच्या जल्लोशात भक्तिपरंपरेचे अस्तित्व जाणवत नव्हते. तो जल्लोश थांबताच ते आता नव्या स्वरूपात जाणवू लागले. जुन्या भक्तिपरंपरेत ज्ञानोबा व एकोबा यांचे अजरामर ओवीबद्ध आध्यात्मिक ग्रंथ होते, नामदेव व तुकाराम यांचे भावमधुर अभंग होते, रामदासांचे व्यावहारिक निरूपण होते आणि मध्वमुनीश्वर व अमृतराय यांचे अमृताहून सरस गीतगुंजन होते. या भक्तिगीतांना महाराष्ट्र 'पदे' किंवा 'भजने' या नावांनी ओळखतो. या पालटलेल्या नव्या युगात ज्ञानोबा, एकोबा व समर्थ रामदास यांच्या विचारांचे व शैलीचे अनुसरण करून निरंजन रघुनाथ यांनी 'स्वात्मप्रचीति', 'साक्षात्कार', 'आत्मबोध-प्रकाशिनी' इत्यादी आध्यात्मिक ग्रंथ रचिले आहेत; नारायण ऊर्फ हंसराज यांनी वेदान्तासारख्या अतिशय गहन विषयावर सर्वांना सहज समजेल अशा सरळ शैलीने सोप्या व साध्या भाषेत लहानमोठे मिळून एकूण अकरा ग्रंथ लिहिले आहेत; आणि बाबा उसपकर ऊर्फ पूर्णदास यांनी 'पंचीकरण', 'पूर्णसार', 'ज्ञानधन' इत्यादी परमार्थपर ग्रंथ केले आहेत. या साधुपुरुषांप्रमाणे आत्माराम मोरेश्वर छत्रे या गृहस्थांनी 'आत्मबोध', 'श्रीमद्गणेशलीलामृत' इत्यादी ग्रंथांत तात्त्विक व पौराणिक रचना साधण्याचा यशस्वी यत्न केला आहे. छत्र्यांप्रमाणेच राजकवी गणपत हरिहरराव कुरुंदवाडकर यांनीही आपल्या कुलदैवतावर 'गणेश-पुराणआर्या' हा ग्रंथ सिद्ध केला आहे. त्यात त्यांनी शब्दचमत्कार साधण्यासाठी महाकवी मोरोपंताच्या धाटणीचा अवलंब केला आहे —

आतां निर्विघ्नपणे जाया हा ग्रंथ विप्र, संतांते
नमितो त्यांसह भावें आर्याचार्या मयूरपंताते.

पंतोच्छिष्टचि सारे उपमायमकें; सुवेष, सुरसत्त्व
लिहिलें ग्रंथीं परि म्यां स्तविला श्रीमद्गणेश सुरसत्त्व.

प्रभुपदि एकादशशत आर्या त्रिगुणहि समर्पिल्या भावें
निर्गंधा दूर्वा त्या आवडती तेविं या मला ठावें.

परशराम बल्लाळ गोडबोले यांनी 'नामार्थदीपिका' या नावाची प्राकृत आर्याबद्ध विष्णुसहस्रनामाची 'व्याख्या' केली आहे आणि स्तोत्रकार भास्कर दामोदर

पाळंदे यांनी ‘ गीतासुधा ’ ही गीतेवर ‘ टीका ’ केली आहे. वर उल्लेखिलेल्या साधुपुरुषांनी ग्रंथलेखनाशिवाय पदे, भजने, आख्याने अशा प्रकारची पुष्कळशी फुटकळ रचनाही केली आहे. ती बहुतेक अमुद्रित आहे. त्यांच्या ग्रंथांत व पदांत बहुधा शरिराचे विनाशित्व, आत्म्याचे अमृतत्व, जिवाशिवांचे मेलन इत्यादी नेहमीचे विषय आहेत. त्यांच्या एकंदर कवितेचे स्वरूप परमार्थप्रतिपादनपर अथवा पुराणकथनपर असून तिचा अनुरोध अध्यात्मसाधनेकडे किंवा भक्तिमार्गाकडे आहे. ही परमार्थप्रवण कविता नव्याजुन्यांच्या ज्या संधिकालात निर्माण झाली, त्या काळात तिचे पुष्कळ चाहते होते. परंतु काळाच्या अनिरुद्ध ओघात जनतेची अभिरुची बदलली. त्यामुळे आता या विषयावरील या प्रकाराची कविता इतिहासजमा झाली आहे.

### भक्तिपर पदे

या वेदान्तविषयक ग्रंथांपेक्षा त्या काळी जी भक्तियुक्त पदे जन्मास आली, ती आज घटकेसही समाजात प्रिय आहेत. या सुश्लिष्ट व उत्कृष्ट भक्तिगीतांच्या प्रणेत्यांत कऱ्हाडचे विठोबा अण्णा दप्तरदार ( १८१३–१८७३ ) हे अग्रेसर आहेत. अण्णांनी जुन्या पठडीप्रमाणे शास्त्राध्ययन केले होते. ते संस्कृत भाषेत पारंगत होते. त्यांनी अनेक संस्कृत ग्रंथ रचिले आहेत. त्यांचे वक्तृत्व अस्खलित व रसाळ होते, व वेदान्तनिरूपणात व कथाकीर्तनात त्यांचा हातखंडा होता. अण्णांची मराठी कविता तोलात कमी भरेल; परंतु मोलात अधिक ठरेल. त्यांच्या ‘ पदसंग्रहा’च्या आजपर्यंत अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत, हीच एक घटना त्यांच्या भावमधुर गीतांची साक्ष देण्यास पुरेशी आहे. अण्णांची ‘ श्रीरंगा, दे मजला सत्संगा ’ व ‘ उत्तम जन्मा येउनि रामा ’ ही पदे एके काळी हरिदासांच्या मुखाने बृहन्महाराष्ट्रात कर्णोपकर्णी झाली होती. त्यांच्या ‘संन्यासी अर्जुना’चा तोंडवळा पुरातन आहे, परतु त्यांचे ‘ प्रणयी मन ’ मात्र नित्यनूतन आहे. त्यात सूक्ष्म मनोविज्ञान आहे व सूचक नाट्य आहे. ‘ आनंदाचा कंद उभा हा भक्तिसखा गोविंद ’ हा त्यांचा भक्तिभावयुक्त कटाव म्हणजे मूर्तिमंत नादमाधुर्य आहे. तो ऐकत असताना —

वाटे कीं नयनांत भरावे
हुंगावे दृढ आलिंगावे
कीं चुंबावे......

या पंक्ती कानांवर पडल्या, म्हणजे श्रोता खरोखरच क्षणभर आपले देहभान विसरतो.

### पाळंदे, कीर्तिकर

अण्णांच्या पदांप्रमाणे एके काळी भास्कर दामोदर पाळंदे ( १८३२-१८७४ ) यांच्या ‘ रत्नमाले’तील स्तोत्रे महाराष्ट्रात प्रसिद्ध होती. त्यांतली काही स्तोत्रे परवापर्यंत क्रमिक पुस्तकांत समाविष्ट होती. त्यामुळे त्यांचा प्रसार विशेष होता. पाळंदे स्वतः प्रार्थनासमाजात नव्हते, परंतु प्रार्थनासमाजाच्या भाविक सभासदांना उपासनेच्या समयी उपयोगी पडावी, म्हणून त्यांनी ही ‘ रत्नमाला ’ गुंफून दिली होती, असे

'निबंधमाले'त आहे.[1] 'रत्नमाले'तील स्तोत्रे सर्व धर्मांच्या अनुयायांना उपयुक्त व्हावी, म्हणून त्यांत कोणत्याही एखाद्या विवक्षित दैवताचा उल्लेख टाळला आहे; आणि सर्व धर्मांना समान असे जगच्चालक प्रभू, ईश्वर इत्यादी शब्द हेतुपुरस्सर योजिले आहेत. पाळंद्यांचे वृत्तरचनेवर असाधारण प्रभुत्व होते. परशुरामपंत-तात्या गोडबोले यांच्या 'नवनीत' या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीला 'पद्यरचना' व 'मुख्य मराठी कवींचे वर्णन' हे दोन निबंध जोडण्यात आले होते. ते निबंध आणि 'वृत्तदर्पणां'त उदाहरणे म्हणून जे श्लोक घालण्यात आले होते, ते श्लोक पाळंद्यांच्याच घटलेल्या लेखणीतून उतरले होते. 'रत्नमाले'तील वृत्ते कशी म्हणावी, हे सर्वांना समजावे, म्हणून त्यांवर 'भुजंगप्रयात' किंवा 'पृथ्वी' असा वृत्ताचा नामनिर्देश न करिता 'सदा सर्वदा योग तूझा घडावा' किंवा 'सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो' अशा त्यांच्या सर्वपरिचित चरणांचा 'चाली' म्हणून निर्देश केला आहे. रत्नमालेतील 'प्रभो! प्रणतवत्सला', 'आस ही तुझी', 'दयासिंधो' इत्यादी स्तोत्रे महाराष्ट्रात सर्वत्र प्रसृत आहेत. ती मूलतःच प्रसादमधुर आहेत. मात्र त्यांची संख्या फुगण्यास त्याच-त्या अक्षरांची फिरवाफिरव आणि त्याच-त्या चरणांची पुनरावृत्ती कारण झाली आहे. त्यांच्यात 'घ्या हो, घ्या हो त्याच्या नामा' अशा नाममाहात्म्याच्या हिंदू कल्पना आल्या आहेत त्या खिस्तीधर्मानुयायांना कशा वाटतील, हा प्रश्न आहे. 'रत्नमाले'च्याच धर्तीवर कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर (१८४९–१९१७) यांनी प्रार्थनासमाजासाठी आपली 'भक्तिसुधा' रचिली आहे. तीत स्तोत्रांपेक्षा पदांचा भरणा अधिक आहे. कीर्तिकर स्वतः प्रार्थनासमाजी होते. 'मराठी भाषेचे पाणिनी' दादोबा पांडुरंग तर्खडकर हेसुद्धा परमार्थपर कविता करीत. अव्वल इंग्रजीतील 'परमहंसभेचे' ते एक संस्थापक होते. या 'सभे'साठी त्यांनी अभंगांच्या स्वरूपाची काही फुटकळ कविता केली होती. याच 'सभे'ला पुढे 'प्रार्थनासमाज' हे नाव मिळाले.[2] अव्वल इंग्रजीतील एक प्रसिद्ध गद्यलेखक व भाषांतरकार हरि केशवजी पाठारे यांनी इ. स. १८४१-मध्ये स्कॉटिश मिशन सोसायटीसाठी Bunyan's Pilgrim's Progress या सुप्रसिद्ध इंग्रजी ग्रंथाचे 'यात्रिक-क्रमण' हे मराठी भाषांतर केले आहे. या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय 'प्रपंच साधून परमार्थ साधणे' हा आहे; आणि तो एका स्वप्नकथेच्या रूपकाने विशद केला आहे. मूळ इंग्रजी ग्रंथात मधूनमधून येशू खिस्ताला अनुलक्षून स्तोत्रे आहेत. हरि केशवजी यांनी त्यांचे पद्यबद्ध सुंदर मराठीकरण केले आहे. ते प्रासादिक आहे. ते वाचताना वामनपंडितांच्या श्लोकरचनेचे स्मरण होते. —

१. निबंधमाला, आ. ३, पृ. ३४२.
२. मासिक मनोरंजन, दिवाळी अंक, १९१०.

आश्चर्य हे थोर दिसेंच लोकीं । माते कसें रक्षियलें विलोकीं
त्या घोर विघ्नांतुनियां मला हो । नेलें दुरी हाचि अतुल्य लाहो
इशूने मला रक्षिलें पामराला । तयाच्या कृपें शोक सारा विराला
तयावीण मी गुंततों पाशबंधें । म्हणूनी तया गातसे मी प्रबंधें ॥

## गर्दे आणि खांडेकर

पाळंदे, कीर्तिकर, तर्खडकर व पाठारे यांच्या भक्तिपर कवितेमागे नव्या 'सुधारलेल्या' धर्मसंप्रदायाची प्रेरणा होती. कदाचित संक्रमण-काळातील जुन्यानव्याच्या संघर्षाने ती उत्पन्न झाली असावी. परंतु नारायण धोंडदेव खांडेकर व खंडो कृष्ण ऊर्फ बाबा गर्दे यांची स्तोत्रे व गीते सर्वस्वी परंपरागत श्रद्धेतून उत्स्फूर्त झाली आहेत खांडेकरांची काही स्तोत्रे 'अर्वाचीन कविते'त आढळतात. त्यांच्या रचनेत पदलालित्य हा प्रधानगुण असून नीतिविषयक उदात्त विचारांच्या कोंदणामुळे त्यांच्यातील 'भक्तिरसा'चे तेज विशेष फाकले आहे. गर्दे यांनी लेखनाच्या प्रारंभ-कालात गोल्ड्स्मिथच्या 'डिझर्टेड व्हिलेज'चे 'विजनपुरी' हे भाषांतर केले होते. या भाषांतरात मुळातील अर्थ तंतोतंत आला नाही; तथापि मूळ भाव कोठे जाऊ न देता तो साररूपाने जेवढा आणता येईल, तेवढा आणण्याचा गर्दे यांनी प्रयत्न केला आहे. हे चिमुकले पण मधुर काव्य मुळातच करुण आहे. क्वचित कोठेकोठे शृंगाराची बहारदार छटा आहे. मूळ इंग्रजी खेड्याचे नाव Auburn आहे. गर्दे यांनी त्याला 'आभरण' असे नाव दिले आहे. इंग्लंड हा औद्योगिक देश होऊ घातला असताना तेथील खेड्यांची जी स्थिती होती, तीच आता आपल्या देशातील खेड्यांची होणार होती. कदाचित ही वस्तुस्थिती पाहूनच गर्दे यांना हे भाषांतर करण्याची स्फूर्ती झाली असावी.

गरीबांची हिसकूनि घेति भूमी । दया कोठुनि असणार द्रव्यकामीं ?
जिथें होत्या झोपड्या गरीबांच्या । उंच दिसती बंगले जागिं त्यांच्या

परंतु गर्दे यांच्या या भाषांतरापेक्षा त्यांच्या प्रज्ञेची परिणती झाल्यावर गीतेतील कल्याणकारक तत्त्वज्ञानाचा घराघरातून प्रसार व्हावा, म्हणून गर्दे यांनी 'गीतापंचदशी' व 'गीतामृतशतपदी' हे जे दोन गीतसंग्रह प्रसिद्ध केले, त्यांमुळे त्यांचे नाव मराठी वाङ्मयात चिरस्थायी झाले आहे. या दोन्ही संग्रहांतील गीते शुद्ध भक्तिभावामुळे जशी सरसरमणीय झाली आहेत, तशीच ती सखोल व उदात्त विचारसरणीमुळे स्मरणीय झाली आहेत. 'चञ्चलं हि मनः' किंवा 'तदहं भक्त्युपहृतमश्नामि' या 'गीते'तील श्लोकांवर अनुक्रमे आधारलेली त्यांची 'हे मन चंचल मोठें' किंवा 'अर्जुना ! इतर मज कांहीं । भक्तीविण अवडत नाहीं' ही गीते तात्त्विक असली, तरी त्यांच्या 'किर्लोस्करी' चालीमुळे एके काळी सर्वांच्या जिभांवर नाचत होती. शंकर दाजीशास्त्री पदे यांनी श्रीमच्छंकराचार्यांच्या चर्पटपंजरी-आदी स्तोत्रांची भाषांतरे केली आहेत. त्याचप्रमाणे हरिदास गोविंद व नारायण कृष्णबुवा सुपेकर यांनी काही आख्यानपर कविता व पदे रचिली आहेत. ही साहित्यसामग्री अनेक वेळा वृत्तीच्या

निमित्ताने सिद्ध होत असते, हे या ठिकाणी लक्षात घेणे आवश्यक आहे. ती वृत्ती समाजातून लुप्त झाली, म्हणजे साहजिकच या प्रकारची साहित्यसामग्री उपेक्षित व दुर्मिळ होते. गीते ही भावनेवर अधिष्ठित असतात. भावनेची उत्कटता ही तात्पुरती असते. तेव्हा साहजिकच गीते ही त्रुटित व सुटसुटीत असतात. ती गेय असल्यामुळे मनोहर व श्रवणमधुर असतात. तेव्हा वैचारिक ग्रंथांपेक्षा त्यांचा प्रसार अधिक व्हावा, यात काही आश्चर्य नाही. सारांश, संक्रमणकाळात जे वैचारिक भक्तिग्रंथ निर्माण झाले, ते काळाच्या ओघात दृष्टीआड झाले; परंतु भक्तिगीते मात्र कायम राहिली व यथाकाल नवीन गूढगीतांत ती परिणत झाली.

## दोन

## राज्यक्रांतीमुळे घडलेले परिवर्तन

जुन्या मराठी राजवटीच्या ल्याबरोबर बहिर्मुख शाहिरी परंपरा लुप्तप्राय झाली, आणि ‘ निर्वेद ’ या अंतःप्रेरणेवर अधिष्ठित असलेली अंतर्मुख भक्तिपरंपरा पुढे नव्या इंग्रजी राज्यात अखंडित राहिली, परंतु तिच्यात पूर्वीचा जोर राहिला नाही. तो जोर दिवसानुदिवस कमीकमी होण्यास इंग्रजी राजवटच कारण झाली मराठेशाहीची अवाढव्य इमारत खचून तिच्या जागी इंग्रजीचा नवा पाया घातला गेला. त्या मधल्या संक्रमणकाळात या दोन जुन्या काव्यपरंपरांत धुगधुगी होती. परंतु इंग्रजांचे नवी विटी नवे राज्य सुरू होताच ती धुगधुगीही मंदावत चालली. इंग्रजी राजवटीचा प्रभाव केवळ राजकारणापुरताच मर्यादित नव्हता. तो थोड्याच अवधीत धर्म, समाज, व्यापार, व्यवहार यांच्यापर्यंत पसरला. त्याचा परिणाम असा झाला की, नव्याने निर्माण झालेली बौद्धिक जागृती जुन्या भोळ्याभाबड्या भाविकतेला ‘अंधश्रद्धा ’ हे नाव देऊन तुच्छ लेखू लागली. त्यामुळे साहजिकच भक्तिपरंपरेचा जुना जोम कायम राहिला नाही. शिवाय, इंग्रजी राज्याबरोबर या देशात अनेक राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व औद्योगिक फेरबदल घडून आले. या प्रचंड उलथापालथीत प्राचीन मराठी कवितेला पुढील पन्नास-पाऊणशे वर्षांत हळूहळू नवे इंग्रजी वळण मिळत गेले. ते इतके की, तिच्या अंतरंगाचा नीट बोध व्हावा, म्हणून तिला प्राचीन व अर्वाचीन अशी भिन्नस्वभावदर्शक दोन विशेषणे मिळाली. ही दोन विशेषणे केवळ ‘ काव्य ’ या साहित्यप्रकाराबाबतच चरितार्थ झाली. कारण मराठी साहित्यात प्राचीन काळापासून फक्त काव्य हाच एक साहित्यप्रकार रूढ होता. बाकीच्या साहित्यप्रकारांचा संभव इंग्रजी राजवटीतील आहे.

इंग्रजी राज्यक्रांतीपूर्वीची प्राचीन मराठी कविता आणि राज्यक्रांतीनंतरची अर्वाचीन कविता यांच्या बाह्यस्वरूपात व अंतःस्वरूपात जमीनअस्मानांचा फरक आहे. प्राचीन कवितेत संतांच्या साहित्यापासून तो शाहिरांच्या साहित्यापर्यंत

प्रतिपाद्य विषय, तदन्तर्गत रस व भाषाभिव्यक्ती यांच्यात वारंवार बदल झाले असले, तरी त्यांचा गाभा येथूनतेथून भारतीय संस्कृतीचा आहे. अर्वाचीन कवितेची प्रकृती देशी असली, तरी तिच्यावर इंग्रजी संस्कृतीची जबरदस्त छाप आहे जुने बहुतेक सर्व साहित्य पद्यबंधात्मक आहे. अर्वाचीन काळात गद्यलेखनाची परिपाठी पडल्यामुळे पद्यबंध हा केवळ कवितेपुरता सीमित झाला आहे.

## नवे पंडित कवी

इंग्रजी राजवट सुरू झाल्यावर महाराष्ट्राच्या सुदैवाने त्यास एल्फिन्स्टनसारखा प्रजाहिततत्पर गव्हर्नर लाभला. त्याने येथील जनतेच्या शिक्षणाविषयी जे धोरण पतकरिले व ज्या गोष्टी केल्या, त्यांची माहिती वाचकांस झालेली आहेच. त्यांचा मराठी वाङ्मयाभिवृद्धीस काय आणि कसा उपयोग झाला, याची कल्पना मागील प्रकरणांत मिळाली आहेच. पुढील काळात जी वाङ्मयनिर्मिती झाली, ती पुष्कळशी सरकारी प्रेरणेने व पारितोषिकांच्या प्रलोभनाने झाली होती. या नव्या युगाची पहिली प्रातिनिधिक परंपरा ‘ पंडितकवीं’ची होय. हे ‘ पंडित कवि ’ संस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांत निपुण होते. त्यांनी भाषांतर करिताना पद्यासाठी संस्कृत ग्रंथ व गद्यासाठी इंग्रजी ग्रंथ निवडिले आहेत. या कवींना ‘ शास्त्री ’ म्हणत. यांपैकी बहुतेक शास्त्री सरकारी विद्याखात्यात नोकरीस होते. तेव्हा त्यांनी त्या खात्यास आवश्यक असलेल्या ग्रंथ-निर्मितीचे कार्य केले. मुद्रणकलेमुळे आता गद्यलेखनाची परिपाठी रूढ होत होती; किंबहुना, गद्याची घटनाच नव्याने होत होती. मुंबईकर मंडळीचा कल गद्यरचनेकडे विशेष होता, तर पुणेरी पंडितांचा ओढा पद्यरचनेकडे अधिक होता. या पुण्यपत्तनस्थ पंडितांनीच आधुनिक पद्यरचनेचा पाया घातला.

## परशुरामपंततात्या गोडबोले ( १७९९–१८७४ )

या पंडितकवींत परशुराम बल्लाळ, उपाख्य परशुरामपंततात्या गोडबोले हे वयाने ज्येष्ठ होते. हे पुण्याच्या पाटशाळेत पढले नव्हते, परंतु यांचे जे वाङ्मयकार्य आहे, त्याच्या सबाह्यान्तर स्वरूपावरून यांची गणना पंडितकवींच्या परंपरेत करणे आवश्यक आहे. तात्यांचे वाङ्मयीन कार्य त्रिविध आहे. तात्यांनी प्राचीन कवींच्या काव्यांचे संपादन, नीतिशिक्षणपर कवितांचे लेखन व संस्कृत साहित्यातील अभिजात नाटकांचे मराठीकरण केले. माधव चंद्रोबा डुकले यांनी प्राचीन कवींच्या कवितेला वाहिलेले ‘ सर्वसंग्रह ’ या नावाचे मासिक चालविले होते. तात्या प्राचीन कवितेचे मर्मज्ञ व रसज्ञ होते. ते ‘ सर्वसंग्रहा’चे संपादन करीत. तात्यांनी प्राचीन कवींच्या काव्यांचे मंथन करून इ. स. १८५४-मध्ये महाराष्ट्रीय रसिकांना ‘ नवनीत’-भेला सादर केला, तो आजमितीलाही पूर्वीइतकाच साजूक, नाजूक व रुचिकर आहे. याच्या पहिल्या आवृत्तीच्या आरंभी पाळंदे यांनी ‘ पद्यरचना ’ व ‘ कविवर्णन ’ हे दोन निबंध जोडले होते. दुसऱ्या निबंधात प्रत्येक कवीविषयी थोडक्यात अभिप्राय होता. पाळंद्यांच्या दृष्टीने सर्वच कवी सारखे नव्हते. काहींना त्यांनी कमी लेखले आहे, ते

बरोबर आहे. तात्यांचा प्राचीन कवितेचा व्यासंग लक्षात घेऊनच विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी म्हटले आहे की, "यांनी मराठी कवितेच्याप्रीत्यर्थ जे श्रम केले, ते जर केले नसते, तर तिचे ज्ञान आमच्या लोकांस आज कितपत असते, याचा संशयच वाटतो." तात्यांनी होतकरू कवींना शुद्ध पद्यलेखनाचे पाठ देण्यासाठी सर्वांना समजेल, असे लहानसे 'वृत्तदर्पण' रचिले. त्यात उदाहरणादाखल घातलेले अनेक श्लोक पाळंद्यांनी रचिले होते. मोरोपंत हा तात्यांचा अतिशय आवडता कवी होता. सवडीच्या वेळी ते मोरोपंतांची काव्ये वाचीत बसत. मोरोपंतांच्या काव्याचा अर्थ अडल्यास अनेक विद्वान त्यांच्याशी पत्रव्यवहार करीत. मोरोपंतांविषयीचा त्यांचा आदर 'केकादर्शा'त प्रकट झाला आहे. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांची 'यशोदापांडुरंगी' ही टीका 'केकावली'वरच लिहिण्यात आली आहे. परंतु ती बोजड व पाल्हाळिक आहे. तात्यांच्या केकादर्शातील टीका ही केवळ कवीचा भावार्थ दाखविण्याच्या दृष्टीने सरळ व सुंदर आहे. पंतांच्या 'आर्यें'चा आदर्श समोर ठेवून तात्यांनी 'नामार्थदीपका', 'कादंबरीसार', 'बालबोधामृत' आणि 'मराठ्यांच्या इतिहासावरील सोप्या आर्या' ही काव्ये लिहिली. यांपैकी 'नामार्थदीपिके'ची माहिती यापूर्वी भक्तिकाव्यात आली आहे. 'कादंबरीसारा'त बाणाच्या संस्कृत कादंबरीचे मराठी सार आहे. 'बालबोधामृत' हा पद्यात्मक ग्रंथ विद्याभ्यास करणाऱ्या मुलांच्या हिताकरिता तात्यांनी मुद्दाम रचिला आहे. त्याच्या प्रस्तावनेत ते म्हणतात – "विद्येपेक्षां नीतीची योग्यता मोठी आहे. कोणी विद्या शिकून मोठा झाला, पण त्याला नीति ठाऊक नाहीं व तो नीतीनें वागत नाहीं, तर मग त्याची कोठे प्रतिष्ठा नाहीं. तिची त्यास गोडी लागावी म्हणून 'आर्या'छंदांत नीतीचा सारांश सोप्या शब्दांनीं व सुरस करवला तितका करून लिहिला आहे." या नीतिपर पद्यग्रंथात कर्तव्यकर्म, विद्याभ्यास, स्वच्छता, वडिलांचा मान, सत्य, न्याय इत्यादी निरनिराळे ३६ विषय असून एकूण २६१ आर्या आहेत. हा ग्रंथ नीतिपर असल्यामुळे त्यात 'काव्या'पेक्षा 'पद्य' अधिक आहे. त्यामुळे त्यांची जन्मजात अभिज्ञता या शालोपयोगी वाङ्मयात दिसत नाही. या प्रकारचे वाङ्मय ज्या विद्यार्थिवर्गाच्या हाती पडावयाचे, त्याचा अधिकार लक्षात घेऊन त्यांना अत्यंत सुलभ रीतीने ज्ञानलाभ व्हावा, म्हणून तात्यांनी ते हेतुपुरस्सर सरळ साध्या व सोप्या सरणीने लिहिले आहे.

तात्यांची साहित्यप्रियता व अभिजात रसिकता शाकुंतल, वेणीसंहार, मृच्छकटिक, उत्तररामचरित, नागानंद आणि पार्वतीपरिणय या त्यांच्या संस्कृतातून मराठीत आणिलेल्या नाटकांत प्रत्ययास येते. त्यांपैकी 'वेणीसंहारा'चे व 'मृच्छकटिका'चे प्रयोग रंगभूमीवर होत असत. तात्यांनी बहुतेक नाटकांत गद्याच्या ठिकाणी गद्य व पद्याच्या ठिकाणी पद्य, असे धोरण ठेविले आहे. मात्र क्वचित श्लोकांबद्दल ओव्या, अभंग, साक्या, दिंड्या, लावण्या व पदे या अस्सल मराठी छंदांची योजना केली आहे. 'मृच्छकटिका'तील "वसंतसेना नायकिणीचा वाडा तो पाहुनी ।

जाहला दंग विदूषक मनीं" ही लावणी तात्यांच्या प्रतिभेची द्योतक आहे. त्यांच्यासमोर अस्तगत झालेल्या पेशव्यांच्या एखाद्या वाड्याचे तर ते वर्णन नाही ना, असे ती लावणी ऐकताना वारंवार वाटते. या सर्व नाटकांत तात्यांचे 'उत्तररामचरित' हे नाटक विशेष लोकप्रिय आहे. याला कारण कदाचित त्यातील पाषाणालाही पाझर फोडणारा करुणरस असावा —

हा हा देवी हृदय फुटते, देह माझा गळाला,
वाटे शून्य त्रिभुवन मला, अंतरात्मा जळाला,
या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें
मोह व्यापी फिरफिरुन, मी काय आतां करावें ?

ही तात्यांची मराठी मंदाक्रान्ता मूळ संस्कृत मंदाक्रांतेइतकीच हृदयद्रावक ठरेल. तात्यांनी उत्तररामचरित आणि त्याचा कर्ता भवभूती यांच्यासंबंधी जे उद्गार काढिले आहेत, ते अगदी यथार्थ आहेत —

वाणी भवभूतीची करुणरसाचीच होय हे खाणी
आणी जी श्रोत्यांच्या दृढ हृदयांच्याहि लोचनां पाणी.

### कृष्णशास्त्री राजवाडे

तात्यांचे अनुकरण करून कृष्णशास्त्री केशव राजवाडे[1] यांनी पाच संस्कृत नाटकांना मराठी वेष चढविले आहेत. पण तात्यांना काव्यनाटकांची जी जात्याच आवड होती, तिचे अस्तित्व राजवाड्यांच्या ठिकाणी आढळत नाही. तसेच, त्यांच्या 'ऋतुवर्णना'त फक्त वसंत, वर्षा व शरद या ऋतूंचेच वर्णन आहे. त्यापेक्षा पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी यांचे नामाप्रमाणे सार्थ असलेले 'षड्ऋतुवर्णन' अधिक सरस व सुंदर असल्याची ग्वाही 'दक्षिणा प्रैज कमिटी'चे त्या काळचे 'सेक्रेटरी' रावजीशास्त्री गोडबोले व सरपंच कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी 'षड्ऋतुवर्णना'च्या आरंभी दिली आहे. राजवाड्यांचे 'गंगावर्णन' प्रसिद्ध नाही. ते ज्यास 'सणाचे वर्णन' म्हणतात, त्या त्यांच्या पुस्तकाचे नाव 'उत्सवप्रकाश' असे आहे. या त्यांच्या स्वतंत्र काव्यात पाडव्यापासून रंगपंचमीपर्यंतच्या अठरा सणांचे वर्णन प्राचीन

१. कृष्णशास्त्री राजवाडे, जन्म १८२०, शिक्षण पुण्यातील संस्कृत पाठशाळेत. न्याय, अलंकार, वेदान्त व धर्म या शास्त्रांचे अध्ययन, पुढे त्याच पाठशाळेत १८४१-मध्ये साहित्य व अलंकारशास्त्र यांचे उप-गुरू. १८५६ शिक्षणखात्याच्या भाषांतरविभागात नेमणूक; वाङ्मय — ( १ ) अलंकारविवेक, १८५३; ( २ ) मालती-माधवाचे भाषांतर, १८६१; ( ३ ) मुद्राराक्षसाचे भाषांतर, १८६७; ( ४ ) कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल नाटक, ( मराठी भाषांतर १८६०-मध्ये केले, प्रकाशन १८६९ ); ( ६ ) महावीरचरित ( भाषांतर ), अप्रकाशित; ( ७ ) ऋतुवर्णन १८७१, ( ८ ) उत्सवप्रकाश ( काव्य ), १८७४; मृत्यू ६ ऑगस्ट, १९०१.

पुराणे, इतिहास व दंतकथा यांच्या आधारे विस्ताराने केले आहे. नागपंचमीच्या वर्णनात 'शिराळशेट व बाजीराव' यांची आख्यायिका आहे. उत्सवप्रकाशातील पद्यरचना सामान्य असून काही पद्यांत उत्तान बीभत्स शृंगार आणि काही पद्यांत बाष्कळ व बालिश विनोद आहे. राजवाड्यांची रचना सामान्यतः खडबडीत व दाटर असली, तरी प्रसंगवशात ती कोमल व रसार्द्र झाली आहे. उत्सवप्रकाशामध्ये शिमग्याच्या वर्णनात त्यांनी वारवधूचे शब्दचित्र रेखाटले आहे, ते चालते व बोलते आहे. तद्वत 'ऋतुवर्णना'त प्रसंगानुरोधाने त्यांनी शृंगार, वीर व करुण यांचा आविर्भाव साधला आहे, तो अतिशय हृदयंगम आहे. वानगीदाखल वर्षावर्णनातील हा विप्रलंभ पहा —

कुरंगाच्या मागे हळुहळु मृगी जात असता
सगर्भा, मेघांचे ध्वनित सहसा ती परिसतां
भिई, पोटाखाली त्वरित हरिणाच्या शिरतसे,
प्रिये! पाहोनी हे मन बहुत माझें द्रवतसे.

राजवाड्यांची विशेष कामगिरी 'अलंकारविवेक' या त्यांच्या साहित्यविषयक संक्षिप्त पुस्तकात दिसते. काव्यनाटकांस पोषक व सहायक असा मराठी भाषेतला बहुधा हाच पहिला प्रयत्न असावा.

### कृष्णशास्त्री चिपळूणकर

परशुरामपंततात्या गोडबोले व कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या कवितापेक्षा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची कविता विशेष रेखीव, रसाळ व रमणीय आहे. शास्त्रीबुवांच्या नावावर एकाही संस्कृत नाटकाचे भाषांतर नाही. परंतु अनेकांच्या भाषांतरांवरून त्यांचा साफसफाईचा हात फिरला आहे. कविकुलगुरू कालिदासाने आपल्या 'मेघदूत' या खंडकाव्यात उज्ज्वल कल्पनाशक्तीच्या साहाय्याने मानसिक सृष्टी रचून तिचे तात्त्विक सृष्टीप्रमाणे हुबेहूब वर्णन केले आहे. शास्त्रीबुवांनी तीच किमया 'मेघदूता'च्या आपल्या मराठी रूपांतरात बेमालूमपणे करून दाखविली आहे. कालिदासाचे मेघदूत मंदाक्रांता वृत्तात आहे. ते वृत्त मुळातच करुण आहे. परंतु शास्त्रीबुवांचे 'मेघदूत' साकीसारख्या प्राकृत छंदात असूनसुद्धा त्याच्यात मुळामधला कारुण्याचा ओलावा उतरला आहे. साकीच्या शेवटी पालुपदाप्रमाणे असणारे दोन अर्धचरण गाळून शास्त्रीबुवांनी तिला सुटसुटीत व स्वभावसुंदर रूप दिले आहे. हतभागी यक्ष मेघालाच आपला दूत मानितो आणि 'श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षिते दृष्टिपातम्' या श्लोकात आपल्या विरहिणी प्रेयसीच्या अनुपम लावण्याची स्तुती करितो. ती तशीच्या तशीच शास्त्रीबुवांच्या अमृतमधुर मराठी वाणीत वेचक शब्दांनी व्यक्त झाली आहे —

कोमल वेलेमधें भासते अंग तुझें सुकुमार,
तसा पिसाऱ्यामधें शिखींच्या दिसे तुझा कचभार.

हरिणबालकाजवळ उमगती चंचल काळे डोळे
मंद नदीच्या लहरीमाजी तव भृकुटींचे चाळे.

जगन्नाथपंडिताच्या 'भामिनीविलासा'च्या आधाराने शास्त्रीबुवांनी 'विरहिविलाप' रचिला आहे. तो मुळाहून अधिक सरस व सुंदर आहे. मुळात वसंततिलका वृत्त आहे. शास्त्रीबुवानी तिच्या जागी करुणरसाला पोषक अशी शिखरिणी योजिली आहे. मेघदूत व विरहिविलाप या दोन्ही काव्यांत पुरुषाचा विप्रलंभात्मक स्त्रीविरह आहे तो शास्त्रीबुवांच्या जन्मजात रसिकतेमुळे अत्युत्कट झाला आहे. मूळ भामिनीविलासात केवळ कल्पनांचे रंग आहेत, परंतु विरहिविलापात त्याच्या जोडीस भावनांचे तरंगही आहेत —

तुझे जाणे प्राणेश्वरि, परिसुनी स्वर्गभुवनीं
अलाफाते शंका त्यजुनि करिती कोकिल वनीं;
निमाली चिताही सकल कमलांची अजि अहा
कशी आतां चंद्रा अतुल सुषमा लाधलि पहा !

हे 'चिन्ता शशाम सकलाऽपि सरोरुहाणाम्' या श्लोकाचे रूपांतर आहे. या रूपान्तरातले रमणीय रंग वाचकाच्या मनात हे कल्पनाचित्र आहे की जिवंत काव्य आहे, असा सुखद संभ्रम उत्पन्न करितात, आणि—

बसोनी पर्यंकीं दयितगुण गातां निजमुखे
दिने नाहीं झालीं बहु निरखुनीयां तुज, सखे !
न कां आजी देशी प्रतिवचनही एक मजला ?
असा कां माझ्याशीं अवचित अबोला धरियला ?

यासारखे त्यातले स्मृतितरंग रसिकांच्या तरल मनोवृत्तीस वारंवार उच्छृंखल करितात. चिपळूणकरांची वाणी सरस व सालंकृत आहे. ती ज्याप्रमाणे उपमा, रूपक व व्यतिरेक यांसारखे सहजसाम्यावर आधारलेले सुंदर अलंकार आपल्या सुरेख शरिरावर मिरविते, त्याचप्रमाणे 'परपुरुष', 'निर्गुण' इत्यादी शब्दांवरले श्लेषही सहजतया साधते. महाराष्ट्रात असे घर क्वचित असेल की, त्यात शास्त्रीबुवांच्या अन्योक्ती प्रचलित नाहीत. 'अप्रस्तुतप्रशंसे'साठी 'अन्योक्ति' हे नवे नाणे शास्त्रीबुवांनी स्वतःच्या खास टंकशालेत पाडले आहे. कदाचित इंग्रजी साहित्यातील 'ॲलेगरी' ( Allegory ) वरून त्यांना हे नवे नाव स्फुरले असावे. 'पद्यरत्नावलि' या आपल्या कवितासंग्रहाच्या इंग्रजी अनुक्रमणिकेत त्यांनी 'अन्योक्ती'करिता ( Allegory ) हाच शब्द योजिला आहे. 'पद्यरत्नावली'त एकूण २० 'अन्योक्ती' आहेत. त्यांच्याविषयी स्वतः चिपळूणकर सांगतात —" सुभाषितशार्ङ्गधर म्हणून एक संस्कृत ग्रंथ आहे. त्यात कालिदास, भवभूती, बिल्हण, श्रीहर्ष वगैरे कवींचे अनेक सुंदर व रसिक श्लोक एकत्र जमवले आहेत. त्या ग्रंथांच्या आधारे ही अन्योक्तिघटित पद्ये प्रायः रचिली आहेत." मेघदूत, विरहिविलाप व अन्योक्तिकलाप ही

चिपळूणकरांची सुरस काव्ये मूळ संस्कृत काव्यांचे भावानुवाद आहेत. तेव्हा ती स्वतंत्रपणे काव्येच आहेत, असे समजण्यास प्रत्यवाय नाही. चिपळूणकरांचे ग्रंथ भाषांतरित आहेत असे वाटतदेखील नाही, असे जे सर्वसाधारण मत आहे, ते काही खोटे नाही. याविषयी स्वतः चिपळूणकरच पद्यरत्नावलीच्या इंग्रजी प्रस्तावनेत म्हणतात —

" These pieces are not, however, a strict and exact rendering, but a free adaptation for the general Marathi reader."

'पद्यरत्नावली'तील 'विद्याप्रशंसा' व 'प्रश्नोत्तरावलि' ही काव्ये स्वतंत्र, परंतु सामान्य आहेत. मात्र 'विद्याधनप्रशंसे'त चिपळूणकरांच्या कल्पनाशक्तीची अल्पशी चुणूक दिसते. नव्या इंग्रजी राजवटीत त्यांच्या काळी ज्या वैज्ञानिक सुधारणांचा एतद्देशीयांच्या जीवनात प्रवेश झाला होता, त्या सुधारणांवर भिन्नभिन्न कल्पना बसवून त्यांनी ते सामान्य काव्य थोडेफार सजविण्याचा प्रयत्न केला आहे —

क्षुद्रा पशुपक्ष्यांची काय कथा ? पांचहीं महाभूते
ज्ञानबळे आकळुनी केले मनुजे स्वदाससम त्यांते.
विसरुनि परस्परांचा विरोध जल, वन्हि सेविती त्याते,
दासापरि वश होउनि करिती त्याच्या समस्त कृत्यांते
त्याची वस्त्रे विणितीं, रथ ओढिति, लोटतींहि नौकांते,
बहु सांगणे कशाला ? करिती तो सांगतो तयां ते ते.
मोठे मोठे तरुवर मोडी, फोडीहि जी शिलाराशी
विद्युल्लता, नरे ती केली संदेशहारिका दासी.
विद्येच्या सामर्थ्ये केला रवि चित्रकार मनुजाने,
होउनि अंकित वायुहि तुष्ट करी त्यास सुस्वरे गाने !

या शेवटच्या आर्येत चिपळूणकरांनी 'फुताग्रफी' आणि 'अयोनियन हार्प' या त्या काळी अद्‌भुत व कुतूहलोत्पादक वाटणाऱ्या वस्तूंवर सुरस व चमत्कारिक कल्पना केल्या आहेत. चिपळूणकर हाडाचे रसिक असल्यामुळे त्यांनी घेतलेले सामान्य विषयही रसात बुचकळून काढिले आहेत, असे वाटते. 'अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' या आपल्या भाषांतरित ग्रंथाच्या प्रस्तावनेच्या शिरोभागी त्यांनी 'सुवाङ्मयेन गीतेन' या सर्वश्रुत संस्कृत सुभाषिताचा अनुवाद दिला आहे, तो त्यांच्या जातिवंत रसिकतेची साक्ष देतो --

उत्तम भाषण, गायन किंवा बरवा विलास तरुणीचा
रमवी चित्त न ज्याचें, पशु किंवा मुक्त तो मनुज साचा.

चिपळूणकरांनी भावानुवादाकरिता 'मेघदूता'सारखे रोमांचकारी खंडकाव्य पसंत केले आणि 'भामिनीविलासा'तील एका लहान भागाचे भाषांतर केले किंवा 'सुभाषितशार्ङ्गधरा'तील स्फुट श्लोकांचे रूपांतर केले, यावरून त्यांच्यासमोर इंग्रजीतील

फुटकळ रचना व विषयवैचित्र्य असावे, असे वाटते. 'चंद्राविषयी' इत्यादी त्यांच्या अन्योक्तींचे 'To the Moon', 'To the Cloud' या इंग्रजी कवितांच्या मथळ्यांशी जे साम्य आहे, ते वरील विधानाचा पाठ पुरावा करील. संस्कृत, इंग्रजी व मराठी या तिन्ही भाषांत असाधारण गती असताना चिपळूणकरांनी अगोदर गद्यलेखन केले व त्याकरिता इंग्रजी ग्रंथ निवडिले, आणि नंतर पद्यलेखन केले व त्याकरिता संस्कृत कवी पसंत केले ते का, असा प्रश्न साहजिकच समोर उभा राहतो. याचे कारण बहुधा मराठी पद्याला जशी प्राचीन परंपरा होती, तशी ती गद्याला नव्हती, हे होय. ते नव्यानेच निर्माण करावयाचे होते. तेव्हा इंग्रजी गद्यग्रंथांचे भाषांतर जनतेला रुचेल; परंतु इंग्रजी पद्याचे भाषांतर जनतेला रुचणार नाही, कारण ते प्राचीन परंपरेशी विसंगत राहील, ही वस्तुस्थिती त्यांच्यापुढे असावी. 'पद्यरत्नावली'च्या शेवटी त्यांनी 'मराठी कवितेतील व्याकरणाचे विशेष' हा प्राचीन कवितेचा अभ्यास करून लिहिलेला उपयुक्त निबंध जोडला आहे, त्यावरून ही गोष्ट अधिक उघड होईल. भाषांतराकरिता इंग्रजी पद्य निवडण्याच्या बाबतीत त्यांच्यापुढे कदाचित त्यांचे सहपाठी महादेव गोविदशास्त्री कोल्हटकर यांचे उदाहरण असावे. महादेवशास्त्र्यांनी 'मेहेरबान दैरेक्तर ऑफ पब्लिक इन्स्त्रक्शन' यांनी केलेल्या नवीन इंग्रजी पुस्तक-मालेतील कवितांवरून 'प्राकृत कवितेची पुस्तके' तयार केली. त्यांतील 'मुंग्यांवरील आर्या,' 'कज्जेकफावतीवरील आर्या' इत्यादी नव्या व निराळ्या विषयांवरील कवितांची त्या काळी बरीच चेष्टा झाली.[1] कारण ती काव्ये संत, पंत व तंत यांच्या पूर्वपरंपरेशी सर्वथैव विसंगत होती. कोल्हटकरांच्या कवितेची जनतेने थट्टा केली. परंतु 'ऑथेल्लो'चे त्यांचे गद्य भाषांतर मात्र अत्यंत लोकप्रिय झाले; कारण ती लेखनशैली मराठीला सर्वस्वी नवीन व निराळी होती. इंग्रजी कवितेचा मराठी साहित्यात राजरोस प्रवेश होण्यास व ती त्यात सामावण्यास इ. स. १८८५ साल उगवावे लागले. यावरून पद्याच्या प्रवेशाच्या मार्गात कशी अडचण होती, ते स्पष्ट होईल.

### गणेशशास्त्री लेले

परशुरामतात्या गोडबोले व कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा कित्ता समोर ठेवून गणेश सदाशिवशास्त्री लेले यांनी 'रघुवंश', 'शिवाजीचरित्र', 'हिंदु लोकांचे सण', 'गंगाचरित्र', 'कृष्णाकुमारी', 'अमरुशतक' ही काव्ये रचिली आहेत; आणि 'जानकीपरिणय', व 'विद्धशालभंजिका' या अप्रसिद्ध नाटकांची भाषांतरे केली आहेत याशिवाय 'शिवस्तुति', 'सीमंतिनीचे आख्यान', 'महिम्नस्तोत्र', 'तुकोजी होळकर' इत्यादी किरकोळ काव्ये लिहिली आहेत. परंतु यांपैकी एकाही रचनेत गोडबोल्यांचा गोडवा किंवा सुगमपणा नाही, की चिपळूणकरांचा नवेपणा किंवा रसाळपणा नाही. लेल्यांचे बहुतेक वाङ्मय 'दक्षिणा प्रैज कमिटी'साठी निर्माण झाले

१. दंभहारक, वर्ष ५, पृष्ठ ७४.

आहे. आधी कमिटीने कवितेसाठी विषय सुचवावयाचा किंवा जाहीर करावयाचा, आणि मग लेले यांनी लेखनप्रपंच करावयाचा, असा प्रकार फार आहे. निरनिराळ्या आख्यानक कवितांत तेच-ते श्लोक पुनःपुनः घालावयाचे व आख्यानकांची संख्या फुगवावयाची, ही मध्ययुगीन रघुनाथ, विठ्ठल आदी कवींची वहिवाट होती. लेले यांच्या 'रघुवंशा'त व 'शिवाजी-चरित्रा'त तेच-ते श्लोक पुनरावृत्त करण्याचा हाच प्रकार आढळतो —

जे काव्ये रचिती मनोज्ञ सुकवी, पावावया तद्यशा
आहे मंदमती तथापि करितों आतां प्रयत्ना अशा,
जीं कां उंच नरास लभ्य सुफळें, तीं तोडण्या ठेंगणा
बाहू उर्ध्व करी, तयास हसती, तैसेचि हेही म्हणा.

'रघुवंशा'च्या प्रास्ताविकातला हा श्लोक 'शिवाजीचरित्रा'त पुन्हा तसाच्या तसा घालण्यात आला आहे. 'रघुवंशा'च्या सातव्या सर्गात अजराजा भोजनगरीत प्रवेश करितो, त्या वेळचे वर्णन आहे; तेच वर्णन 'शिवाजीचरित्रा'त शहाजी लखूजी जाधवाकडे विवाहास येतो, त्या प्रसंगी तसेच्या तसेच पुनरुक्त केले आहे. 'शिवाजी-चरित्र' हे काव्य लेले यांनी ग्रँण्ट डफ्‌चा इतिहास समोर ठेवून लिहिले आहे, असे दिसते. कारण त्यात 'विजापूर', 'नेताजी पालकर', 'कालियानी' (म्हणजे कल्याण) इत्यादी विशेषनामांचे लेखन इंग्रजी उच्चारांनुसार केले आहे.

लेल्यांच्या कविताकृतींत त्यातल्या त्यात रघुवंश ही कविताकृती उत्तम आहे. तीमध्ये दशरथमृगया या नावाचा नवमसर्ग समश्लोकी भाषांतर करून घातला आहे; आणि मुळाप्रमाणेच वृत्तवैचित्र्य व यमकरचना साधण्याचा पुष्कळ अंशी सफल प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणे अन्य सर्गांत प्रसंगाप्रसंगाने शृंगार, वीर, करुण इत्यादी रसांचे उद्भावन साधण्याची पराकाष्ठा केली आहे. दिलीप व वसिष्ठाश्रमातील नंदिनी, रघूचा पारसीकांवरचा विजय, इंदुमती व सुनंदा, अज व इंदुमती यांचा विवाह, दशरथाचा वसंतोत्सव, रामाचा सीतात्याग व अग्निवर्णविलास इत्यादी या काव्यातील कथाविभागांचे व प्रसंगांचे चित्र चितारताना लेल्यांच्या लेखणीला स्वाभाविक स्फुरण चढले आहे —

पायांना अळिता स्वतां नरपती लावी स्त्रियांच्या जईं,
त्याचे व्यग्र बहूत होय मन ते, न स्वस्थ राहे तईं,
कां कीं रम्य नितंबयुक्त जघनें, जेथील वस्त्रे ढिलीं
झालेली निरखून तैं नृपतिची दृष्टी बहू वेधिली.

हे कामातुर अग्निवर्णाचे मनोवर्णन हुबेहूब नाही काय? 'रघुवंश' आणि 'कृष्णाकुमारी' या लेल्यांच्या काव्यांचे समालोचन मोती बुलासा यांनी केले आहे. ते म्हणतात – "लेल्यांचे रघुवंशाचे मराठी भाषान्तर वाचताना, कालिदासाच्या कवित्वाचा भाषांतररूप का होईना, पण ठसा मनावर उमटत नाही. लेल्यांनीं कृष्णा-

कुमारी हे काव्य साकी वृत्तात रचिले आहे. कृष्णाकुमारीच्या ऐतिहासिक चरित्रात सहृदय वाचकांना रडवितील असे किती तरी धीरोदात्त व करुण प्रसंग आहेत, परंतु लेल्यांना हा काव्यविषय यशस्वितेने रेखाटता आला नाही." [1] 'रसप्रबोध'कर्ते बलवंत कमलाकर माकोडे यांच्या आग्रहाने लेले यांनी 'अमरुशतक' या मुक्तक-संग्रहाचे मराठी पद्यात्मक भाषांतर केले आहे. माकोड्यांचे वास्तव्य ग्वाल्हेर, इंदूर, धार, देवास, उज्जयिनी इत्यादी ठिकाणी माळव्याच्या परिसरात असे. ते प्राचीन संस्कृत कवितेचे व मध्ययुगीन हिंदी व उर्दू कवितेचे भोक्ते होते. ही बहुतेक कविता उत्तान शृंगारिक आहे. अलंकारविवेचनाच्या नावाने त्या प्रकारचा अनिर्बंध व स्वच्छंद शृंगार 'अमरुशतका'तील मुक्तकांत ओसंडत आहे, म्हणून कदाचित माकोड्यांनी त्याचे भाषांतर करण्याची सूचना लेल्यांना केली असावी. हे भाषांतर पद्यशः नाही; तात्पर्यार्थ मनात आणून तो प्राकृतात बांधिला आहे. चार नायक व आठ नायिका यांच्या रतिरंगाची व हावभावांची विविध चित्रे या संग्रहातील मुक्तकांत विखुरलेली आहेत लेल्यांनी भाषांतरिलेल्या 'जानकीपरिणय' या नाटकाच्या पाचव्या अंकात, रामाच्या वधार्थ खराने विराध या नावाचा राक्षस पाठविला, त्या राक्षसाचा व शूर्पणखेचा शृंगार आहे. तो अंक शृंगार व हास्य याच्या मिश्रणाने चित्ताकर्षक झाला आहे. 'विद्धशालभंजिका' या त्यांच्या भाषांतरित नाटकाचे संविधानक गुंतागुंतीचे आहे. लेल्यांच्या भाषांतरात त्याचा किचकटपणा आणखी वाढला आहे. मात्र मधूनमधून कल्पनानावीन्याने नटलेली काही रचना त्यात आहे. वानगी म्हणून ही ही शिखरिणी पहा —

चकोरांनो ! तुम्ही सकल मिळुनी एकचि करा,
पिवोनी टाका रे ! त्वरित अवघ्या या विधुकरां.
जयाच्या योगाने विरहिजनजीवित्वची सरे
असे जे तत्तेज स्फुट विलय पावेलचि बरें.

लेल्यांच्या उर्वरित वाङ्मयाची कल्पना या विवेचित वाङ्मयावरून येऊ शकेल. लेल्यांच्या कवितेविषयी सुविख्यात काव्यविवेचक वामन दाजी ओक म्हणतात : "रा. लेले यांनीं काव्यनाटकांचीं भाषांतरे केलीं आहेत. तीं यद्यपि बरीं निपजलीं आहेत, तरी त्यांवरून ते उत्तम कवी आहेत, असे त्यांचे वर्णन करणे साहस होय. त्याची कविता चांगली आहे. परंतु सुधारणा करण्यास बरीच जागा आहे." [2] एकदा

१. सुविचारसमागम, पुस्तक १, मे १८९८ ते एप्रिल १८९९.
२. विविधज्ञानविस्तार, एप्रिल, मे, जून, जुलै, पुस्तक १२, १८८१.

भाषांतराची सवय लागली, म्हणजे मग स्वतंत्र प्रतिभा कशी कुंठित होते, याचे प्रत्यंतर लेले यांच्या प्रचंड उद्योगावरून पटते.

### पांडुरंगशास्त्री पारखी

या पंडितपरंपरेतील कवींत पाडुरंग गोविंदशास्त्री पारखी [1] हे वयाने सर्वांहून कनिष्ठ होते. त्यांच्या नावावर 'षड्ऋतुवर्णन', 'कृष्णाकुमारी' व 'बोधामृत' ही तीन काव्ये आहेत. त्यांपैकी पहिली दोन 'दक्षिणा प्रेंज कमिटी'च्या जाहिरातीने स्फुरली आहेत. पारख्यांचे पहिले काव्य जितके प्रसिद्ध आहे, तितकी दुसरी दोन नाहीत. 'बाणभट्ट' हा पारख्यांचा अत्यंत आवडता संस्कृत कवी होय. त्याच्या काव्यावर त्यांचा एक स्वतंत्र संशोधनपर निबंध आहे. पारख्यांची रचना प्रगल्भ, प्रौढ व पांडित्यप्रचुर आहे. तिच्यात तत्सम शब्दांचा भरणा विशेष आहे, आणि ती विविध शब्दालंकारांनी मंडित आहे. तसेच, तिच्यात क्लिष्ट श्लेषांवर भर विशेष आहे. त्यामुळे अर्थबोधाच्या दृष्टीने ती सर्वसाधारण वाचकांस जड वाटते. आपल्या या अभ्यासजड लेखनशैलीचे पारख्यांनी 'षड्ऋतुवर्णना'च्या आरंभी समर्थन केले आहे: "अलीकडे कवितेचे स्वरूपहि निराळे झाले आहे. तिला वाटूं लागले आहे कीं आपले लोक जसे राज्यकर्त्यांच्या रीतीभातीचे अनुकरण करतात, त्याप्रमाणे आपणहि त्यांच्या स्त्रियांचे अनुकरण करावें, म्हणजे अंगांत साधा झगा अडकवला कीं झाले. आपली आर्यजननी जशी सुवर्णालंकारविरहित झाली आहे, तसेच आपणही व्हावे. आपल्या प्राचीन कवींच्या सरस व सालंकार कविता कोणीकडे आणि हल्लींच्या कोणीकडे!"

पारख्यांनी 'षड्ऋतुवर्णना'त सहाही ऋतूंची व त्यांतील मुख्य-मुख्य सणांची मोठी रसाळ व चटकदार वर्णने केली आहेत. ती करिताना त्यांचे संस्कृत भाषेचे मार्मिक ज्ञान, पद्यरचनाचातुर्य, कल्पनाशालित्व व रसज्ञत्व प्रकट झाले आहे. त्यांची भाषा संस्कृतप्रचुर आहे आणि वृत्तयोजना विविध, विषयानुकूल व मधुर आहे.

१. पांडुरंग गोविंद पारखी : (१८४४–१९११) जन्म कडूस, पुणे जिल्हा; लहानपणी संस्कृत व्याकरण, व्युत्पत्ती, अलंकार वगैरेंचे अध्ययन; पुढे स्वप्रयत्नाने इंग्रजीचे ज्ञानसंपादन; बरेच जीवन शिक्षक या नात्याने; अखेरची काही वर्षे पुणे-आनंदाश्रमात शास्त्री म्हणून काम. वाङ्मय – (१) मित्रचंद्र (कादंबरी), १८७९, (२) षड्ऋतुवर्णन (काव्य), १८८२, (३) बोधामृत (काव्य), १८८४, (४) बाणभट्टचरित्र, १९०५, (५) कादंबरीसार, १९०८, (६) हर्षचरित्र, १९११, (७) हंसिका (नाटक), (८) कृष्णाकुमारी (काव्य).

कवितेच्या ओघात मधूनमधून त्यांनी नवीन कल्पनांची पेरणी केली आहे, याची साक्ष हे चार चरण देतील –

चपलनयनभंगें प्रेम एकास दावी,
पर मधुरवचें ती स्नेहपाशांत गोंवी;
सुरतरससुखाचा स्वाद अन्यास लावी;
सकपटचल वेश्याचित्त एकत्र केवी !

ह्यात त्यांनी शिमग्यात नृत्य करणारी वारवधू अंतर्बाह्य साकार केली आहे.

## इतर पंडित कवी

या पंडितपरंपरेतील कवींत 'कुमारसंभव'कार कृ. शा. दातार, भामिनीविलास-कार गंगाधरशास्त्री मंगरूळकर आणि 'रसप्रबोध'कार बलवंत कमलाकर माकोडे यांचा समावेश केला पाहिजे. 'कुमारसंभवा'च्या अर्पणपत्रिकेत दातारांनी स्वतःस थोरल्या चिपळूणकरांचे 'अतिनम्र सेवक व विद्यार्थी' म्हटले आहे. दातारांनी या काव्याच्या सतरा सर्गांपैकी फक्त पहिल्या सहा सर्गांचे भाषांतर केले आहे. मराठीत शब्दांची उणीव आहे, आणि जे शब्द आहेत, त्यांच्या अंगी अर्थ दाखविण्याची शक्ती कमी आहे, म्हणून दातारांनी आपल्या भाषांतरात संस्कृत शब्द वैपुल्याने वापरले आहेत. मात्र पद्यात साकी व आर्या या मात्रावृत्तांचा आणि वसंततिलका या अक्षर-गणवृत्ताचा सढळ वापर केला असून दोन ठिकाणी दिण्डीही योजिली आहे. यौवनात पदार्पण केलेल्या पार्वतीचे वर्णन वाचले, म्हणजे दातारांच्या उत्कृष्ट भाषाशैलीची कसोटी पटेल —

पुष्प नसोनी मदनाचें जें अस्त्रचि जिंकायाचें,
तें तारुण्य तयेच्या शरिरीं उदय पावलें साचें.
कूचें भरतां रंग रेखलें चित्र शोभतें जैसें,
सूर्यांशूंनीं विकसित होतां विलसे पंकज जैसें,
चालत असतां भूवरि सुंदरि टाकि पाउलें जेव्हां
स्थळकमळें तीं चालति ऐशी शोभा भासे तेव्हां.
तिच्या पदांच्या अभ्युन्नत अंगुष्ठनखांची कांती
पडे तिणें ती भूवरि वसती झाली वाटे चित्तीं.

गंगाधरशास्त्री मंगरूळकर हे नागपूरचे विख्यात सावकार दाजी बुटी यांचे आश्रित स्नेही होते. त्यांनी पंधरासोळा संस्कृतप्राकृत ग्रंथ रचिले आहेत. ते बहुतेक अद्यापि अप्रसिद्ध आहेत. 'भामिनीविलासा'तील 'स्तनाभोगे' आणि 'मधुरसा' या श्लोकांची भाषांतरे त्यांच्या निर्दोष रसमय रचनेची साक्ष देतील —

गंडापासुनि सुटला कुटिल अलक भासतो स्तनावरि हा –
जैसा शशिबिंबांतुन लोंबतसे सर्प मेरुगिरिवरि हा.

किंवा

अधर गोड तुझा मदिरेहुनी
म्हणुनि दे वदनीं मम ठेवुनी
निजकरे धरिं हा कर सुंदरी
मग पडे मम भीति धरेवरी.

माकोड्यांची कविता साधारण प्रतीची आहे.

सरसा, सालंकारा, सुपदन्यासा, सुवर्णमयमूर्ती
पाहुनि तव ह्या लोकीं मोहसमुद्रीं न कोण गे ! भ्रमती ?

या श्लिष्ट 'कविताप्रशंसे'वरून त्यांची शब्दार्थचमत्काराभिरुची व्यक्त होईल. त्यांची प्रसिद्धी 'रसप्रबोध' या त्यांच्या साहित्यशास्त्रविषयक ग्रंथामुळे विशेष आहे.

**नीतिशिक्षणपर कविता**

गोडबोले, चिपळूणकर आणि पारखी यांचा मूळ पिंड पंडितकवींचा. परंतु शिक्षणखात्याशी संबंध असल्यामुळे व त्या काळच्या शिक्षणपद्धतीत नीतिशिक्षणाला विशेष स्थान असल्यामुळे त्यांनी नीतिविषयक कविता लिहिली आहे. त्या कवितेच्या धाटणीवर विनायक कोंडदेव ओक, शिवराम रामकृष्ण नित्सुरे, मोरो गणेश लोंढे व हरि कृष्ण दामले या शिक्षककवींनी पुष्कळ शालोपयोगी कविता रचिली आहे. ती प्रामुख्याने उपदेशपर आहे. तिच्यात सद्विचार, सत्यभाषण आणि शुद्ध वर्तन यांचे नीतिपाठ आहेत. यांपैकी ओक व लोंढे दीर्घायुषी होते आणि दोघेही अखेरच्या घटकेपर्यंत अविश्रांत व अव्याहत लिहीत होते. निर्णयसागर मुद्रणालयाने चालविलेल्या 'बालबोध' या मुलांच्या मासिकाचे ओक सतत ३४ वर्षे संपादक होते. या मासिकातील सारा मजकूर ते स्वतः एकटेच लिहीत. त्यात त्यांच्या चारशेहून अधिक कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. ओकांच्या एकंदर लेखनाचे स्वरूप लक्षात घेतल्यास त्यांस मराठीमधील बालवाङ्मयाचे आद्यप्रवर्तक म्हणावे लागेल. त्यांची लेखनशैली सरळ आहे आणि भाषा सुबोध व मनोरम आहे. नीतिबोध हा त्यांच्या लेखनाचा आत्मा आहे. क्वचित नीतिबोधास भक्ती, ज्ञान व विरक्ती यांची जोड मिळाली आहे. कदाचित त्या काळच्या गृहशिक्षणाचा व शालेय शिक्षणाचा हा प्रभाव असावा, किंवा संतकवींच्या काव्याच्या परिशीलनाचा हा परिणाम असावा. या युगात निर्माण झालेली बोधकविता सत्य व शिव आहे; मात्र तिचा आविष्कार सुंदर नाही. कारण तत्कालीन कवींना सौंदर्यान्वेषक नवीन दृष्टी नव्हती. शिवाय, आपण शिक्षक आहो व मुलांना प्रत्येक गोष्ट शिक्षकाच्या भूमिकेवरून शिकविणे हा आपला जन्मसिद्ध अधिकार आहे, ही सुंदर काव्याविष्काराच्या आड येणारी चुकीची जाणीव त्यांना फार मोठ्या प्रमाणात होती.

### वि. कों. ओक[1]

'पुष्पवाटिका' या नावाच्या कवितासंग्रहात ओकांच्या[1] दहा वेचक कविता आहेत. त्यांपैकी काहींना संस्कृत व इंग्रजी कवितांचा आधार आहे. संस्कृत व इंग्रजी कवितांचा आधार घ्यावयाचा व कवितालेखन करावयाचे, ही त्या काळची एक सर्वसामान्य प्रवृत्ती होती. 'अन्योक्तिपंचक' व 'कवितारत्नमाला' या ओकांच्या कवितांना संस्कृताचा आधार आहे. स्वदेशाभिमान ही कविता सर वॉल्टर स्कॉटच्या Breathes there the man with soul so dead? या पोवाड्यावरून स्फुरली आहे.

'रामशास्त्र्याची निःस्पृहता' व 'प्रेमबंधन' या ओकांच्या स्वतंत्र कविता उल्लेखनीय आहेत. प्रेमबंधनाचे जाळे सर्वत्र पसरले आहे, हे सांगताना ते म्हणतात –

ही गाय वासराच्या मार्गे मार्गे पहा कशी धांवे
कोणी तया दुखवितां कोपा अत्यंत ती खरी पावे.
धान्याचे कण वेचुनि ही चिमणी आपुल्या पिलांला दे,
तेणे तिच्या मनीं बहु संतोष दिसे खरोखरी नांदे.

'पुष्पवाटिके'च्या प्रस्तावनेत ते म्हणतात —

"रसभरित काव्याच्या योगाने मनास एक प्रकारची भूल पडते. तिजपासून उत्पन्न होणारा आनंद केवळ रसिकांच्या मात्र अनुभवास येतो. तेव्हां कोणत्याहि

१. विनायक कोंडदेव ओक — जन्म १८४० हेदवी येथे. शिक्षण थोडेसे मराठी आणि इंग्रजी तीन इयत्ता; स्वकष्टाने मराठी भाषा चांगलीच कमाविली; आठ रुपये पगाराच्या शिक्षकीपासून वाढत-वाढत १०० रु. पगाराच्या अॅ. डे. ए. इन्स्पेक्टरच्या जागेपर्यंत वाढत गेले. मुलांकरिता बालबोध नावाचे मासिक सतत ३४ वर्षे चालविले आणि त्यात ४०२ चरित्रे, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय विषयांवरील निबंध, आणि इतर विषय ८५० एवढे वाङ्मय लिहिले. छोटीमोठी अशी जवळजवळ पन्नास पुस्तके लिहिली. मुख्य ग्रंथ : चरित्रे — पीटर द ग्रेट, शिकंदर, आल्फ्रेड द ग्रेट, टॉमस मनरो, ग्लॅड्स्टन, दिनकरराव राजवाडे, ड्यूक ऑफ वेलिंग्टन, वॉरन हेस्टिंग्ज, अमीर अबदुल रहमान, जावजी दादाजी, सॅम्युअल जॉन्सन, लिंकन् यांची चरित्रे. इतिहास — हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास, हिंदुस्थान-कथारस, शिपायांच्या बंडाचा इतिहास, रोमचा इतिहास, इतिहास-तरंगिणी, फ्रान्सांतील राज्यक्रांतीचा इतिहास. बालवाङ्मय — मुलांचे कल्याण, मुलांस थोडासा बोध, मुलांस उत्तम बक्षीस, लघुनिबंधमाला, मधुमक्षिका, पुष्पवाटिका (कविता), फुलांची परडी, इसापनीति, कठीण शास्त्रांतील सोप्या गोष्टी. इतर — महाराष्ट्र-वाङ्मय, स्त्रियांची परवशता, सांप्रतच्या लेखकांचें कर्तव्य, प्रपंचरहस्य, सोपें व्याकरण, आनंदराव, शिरस्तेदार, इत्यादी. मृत्यू १९१५.

एखाद्या काव्यास केवळ बरेवाईट म्हणण्याचा अधिकार त्यास आहे, अरसिकांस नाहीं." पुढे त्यांनी एका सर्वश्रुत संस्कृत श्लोकाचा अनुवाद दिला आहे —

इतर ताप सहस्र लिही मना रुचति साहिन ते चतुरानना
अरसिकांप्रति काव्यसमर्पण मम शिरीं न लिही, न लिही पण.
भक्तिरसा परमेश्वर, तैसे कवितारसा तुम्हीं पात्र
पात्र खरे म्हणुनि करीं अर्पीया सिद्ध हें सुमनपात्र.

कदाचित ओकांच्या 'बालबोधकविते'वर 'प्रौढ टीका' होत असावी, म्हणून त्यांनी वरील उद्गार काढिले असावे. ओक हे मोरोपंतांच्या कवितेचे भोक्ते होते. मोरोपंतांच्या कवितेवर आंग्लकवितानुकरण करणाऱ्यांकडून जी टीका होई, ती कशी अनुचित आहे, हे त्यांनी 'मोरोपंताचा विलाप' या भावकवितेत मोरोपंतांच्या मुखाने वदविले आहे. मात्र ओकांनी 'बालबोधा'च्या बालवाचकांचा अधिकार लक्षात घेऊन मोरोपंतांच्या प्रौढ भाषासरणीचे अनुकरण केले नाही, हे इष्टच झाले.

## लोंढे यांची कविता

लोढ्यांची कविता बोधशतक, बोधमाला इत्यादी लहानसहान पुस्तिकांत संगृहीत झाली आहे. त्या पुस्तिकांतील कवितांचे विषय पाहिले, म्हणजे त्यांची नामे सार्थ आहेत, असे वाटते. लोढ्यांची कविता उपदेशपर असली, तरी ती सजविण्याची त्यांची शैली प्रसंगविशेषी आकर्षक आहे. त्यामुळे मनोरंजन आणि मनोबोधन या दोन्ही दृष्टींनी त्यांची कविता विद्यार्थ्यांप्रमाणे प्रौढांनाहि प्रिय व्हावी, अशी आहे. या दृष्टीने 'रायगडावर काय आहे ?' ही त्यांची एकूण नऊ भागांत लिहिलेली कविता खरोखर वाचनीय आहे. त्यांचा 'ओढा' पाहिला म्हणजे टेनिसनच्या 'ब्रुक'ची आठवण येते.

## नित्सुरे यांची 'विद्याधनप्रशंसा'

शिवराम रामकृष्ण नित्सुरे यांच्या नावावर 'विद्याधनप्रशंसा' एवढे एकच काव्य आहे. मराठी साहित्याचा आढावा घेताना त्या काव्याची न्यायमूर्ती रानडे यांनी प्रशंसा केली आहे —

"There have consequently appeared several poems in Marathi, some of which have gained not only popularity, but have also proved valuable additions to the Marathi Literature."

नित्सुरे यांनी या काव्यातील काल्पनिक कथाभागाला स्वतःच्या मनाने पौराणिक वातावरणाची डूब दिली आहे. धनाढ्य कुबेर व अकिंचन शंकर यांचे भांडण असते, ही गोष्ट भोळे शंकर दुष्ट वासुकीला सांगतात, आणि वासुकी संतापाच्या भरात कुबेराच्या सुवर्णनगरीला आग लावितो. शेवटी बुद्धिमान मांत्रिक व्यास हा वासुकीस हाकलून लावितो. अशा रीतीने या काव्यात नित्सुरे यांनी बुद्धीच्या धनाची प्रशंसा साधली आहे. या काव्यातला काही भाग असंभवनीय कोटीतला असल्यामुळे

अलीकडील वाचकांना रुचण्यासारखा नाही. यासाठी नित्सुरे यांनी 'वाचकांनीं काव्याच्या कथाभागाकडे लक्ष देऊं नये, फक्त कथेचे तात्पर्य व कथारचना यांकडे लक्ष द्यावें,' अशी प्रस्तावनेत विनंती केली आहे. कवितेचा बराचसा भाग संस्कृत साहित्यातील सुभाषितांनी सजला आहे. कवितेत वृत्तवैचित्र्य असल्यामुळे व रचनेत प्रवाह असल्यामुळे कथेत एक प्रकारचे नादमाधुर्य उत्पन्न झाले आहे. क्वचित अर्थान्तरन्यासाच्या रूपात सार्वत्रिक अनुभव व्यक्त झाले आहेत —

बहू सोयरेधायरे, मित्र लोकीं । परी संकटीं एक नाहीं, विलोकीं,
सुखासाठिं ते सर्व आले मिळोनी । विपत्काळ येतांच जाती पळोनी.

अशा तऱ्हेचे अर्थान्तरन्यास या काव्यात सर्वत्र विखुरलेले आहेत. त्यामुळे त्यास अर्थवत्ता प्राप्त झाली आहे. आगीत एक लहान मूल सापडते, त्याची आई विलाप करिते इत्यादी काव्यातील प्रसंग सहृदयांच्या डोळ्यांस आसू आणतील, इतपत करुण आहेत. नित्सुरे यांची 'इंग्रजी कलाकौशल्ये' ही लावणी तत्कालीन देशी उद्योगधंद्यांच्या नष्टचर्यास कारण झालेल्या त्या वेळच्या सरकारी धोरणावर टीका म्हणून लिहिण्यात आली आहे. पण ती टीका चटकदार झाली आहे. हरि कृष्ण दामले यांचे 'पार्वतीप्रकोप' हे काव्य थोरल्या चिपळूणकरांच्या प्रशंसेस प्राप्त झाले होते. या काव्यास कवीने प्रथम 'पार्वतीप्रताप' हे नाव दिले होते, परंतु शास्त्रीबुवांनी ते नाव बदलले व त्याऐवजी 'पार्वतीप्रकोप' हे नाव दिले, ते शास्त्रीबुवांच्या रसज्ञतेचे व मर्मज्ञतेचे द्योतक आहे.[1] चिपळूणकरांनी शालापत्रकात या काव्याचे समालोचन केले होते. दामल्यांच्या भाषेत ओध आहे, रचनेत गोडवा आहे आणि वर्णनात संयम आहे. या काव्यात द्वितीय पंक्तीचा अन्वय तृतीय पंक्तीतील शब्दांशी करण्याची नवीन पद्धती आढळते. ती महादेव मोरेश्वर कुंटे यांनी इंग्रजीवरून उचलिली आणि 'राजा शिवाजी' या आपल्या काव्यात तिचा अवलंब केला. दामल्यांना ती पद्धती कुंट्यांच्या काव्यावरून सुचली असावी.

### पांडित्यप्रचुर कविता

पांडित्य हा ज्यांचा व्यवसाय नव्हता, तरी ज्यांनी पांडित्यप्रचुर कवितालेखन केले आहे, असे या कालखंडातले आणखी दोघे कवी म्हणजे गणपतराव हरिहर पटवर्धन ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर आणि सर टी. माधवराव हे होत. यांपैकी बापूसाहेब हे कुरुंदवाडच्या छोट्या पातीचे अधिपती होते. ते मोठे विद्याव्यासंगी होते. त्यांचा संस्कृत सारस्वताचा अभ्यास सखोल होता आणि पंतांच्या मराठी कवितेचा त्यांचा व्यासंग प्रदीर्घ होता. 'गणेशपुराण', 'भट्टवंशवर्णन' व 'गंगावर्णन' ही त्यांची काव्ये मोरोपंती वळणाची आहेत. यामुळेच बहुधा विनायक कोंडदेव ओक यांनी त्यांना 'सांप्रतचे मोरोपंत' म्हणून संबोधिले असावे. त्यांच्या गणेशपुराणाचा

१. विविधज्ञानविस्तार, सप्टेंबर १८८२.

उल्लेख मागे भक्तिपरंपरेत आला आहे. त्यांची भट्टवंशवर्णन व स्ववंशवर्णन ही काव्ये 'रत्नावली'त प्रकाशित झाली होती. त्यांतील पहिले काव्य पेशव्यांवर आहे आणि दुसरे पटवर्धनांच्या घराण्यावर आहे. 'गंगावर्णन' या त्यांच्या काव्यास 'दक्षिणा प्रैज कमिटी'ने दुसऱ्या क्रमांकाचें पारितोषिक दिले होते. या काव्याच्या प्रस्तावनेत बापूसाहेब म्हणतात—

"जो शब्दरूपी चित्र बनवितो तो कवि. कविता सोपी असावी, म्हणजे कल्पना-प्रविष्ट नसावी. सागवानी लाकूड व त्यावरलें वेलबुटीचें काम, त्याप्रमाणें ती वजनदार व सुंदर असावी. प्राकृत कवितेत संस्कृत शब्द आणूं नयेत हे कांहीं अंशीं खरें असले, तरी एक वर्षाचे मुलास मातेचा हात न धरता चालतां येत नाहीं, ही वस्तुस्थिति लक्षांत घेतली पाहिजे. काव्याचें वजन कायम राहावें असें वाटत असेल, तर साधारण मनुष्यानें ग्रंथ करूं नयेत."

मोरोपंतांचे अनुसरूण करून बापूसाहेबांनी आपली सर्व काव्यरचना आर्याबद्ध केली आहे. मोरोपंतांच्या कवितेप्रमाणेच ती प्रौढ, प्रगल्भ व सालंकृत आहे. अर्थात अर्थ लावण्याच्या दृष्टीने ती काहीशी कठीण असल्यास नवल नाही. परंतु क्वचित ती प्रासादिक आहे. तिचा मासला म्हणून येथे 'आगगाडी'चे वर्णन उद्‌धृत करितो —

ओढाया या गाडिस वृषभ नको, तेवि अश्वही नलगे
ज्याला अग्नीच म्हणे, "घटिकेनें दोन योजने चल गे!"
नाना यंत्रीं संयुत ठेविति ऐसा पुढेंचि रथ एक
जोडिति त्यांते एकामागें दुसरा, असे रथ अनेक.
वेगें असूनि ऐसा ज्यामाजी क्लेश लेशही नाहीं
जें सुख नृपासि मिळते सेवावें तेचि तेथ हीनांहीं.
असती मुख्य द्रव्यें रथ हा चालावयासि अग्नि-जल
कोण न जाणे त्यां? परि तत्त्वज्ञानाशिवाय काय फल?

'गंगावर्णना'त मधूनमधून बापूसाहेबांच्या प्रतिभेच्या ठायी वसत असलेल्या कल्पनाचमत्कृतीचेही दर्शन घडते —

व्हाया स्वकान्ति अधिका चंद्रेंही यन्मुखासि चाटावें
ऐशा नागरललना राहति नेसूनि जेथ पाटावें
ज्योत्स्नाभ्रमासि दे स्मित ज्यांचें चतुरां नरांसही दिवसां
त्यांते रात्रीं पाहुनि न कसा होईल चंद्रमा हिवसा?

काशी येथील स्त्रियांच्या सुंदरतेचे हे वर्णन कल्पनेच्या कोंदणांत हिरकणीप्रमाणे चमकत आहे. 'गंगावर्णना'च्या शेवटी बापूसाहेबांनी 'कोणत्या भाषेंतील काव्यें चांगलीं' हा निबंध जोडला आहे. त्यात त्यांनी संस्कृत आणि इंग्रजी भाषा यांची तुलना केली आहे व संस्कृत भाषेचे पारडे अनेक दृष्टींनी अधिक वजनाचे असल्याचे ठरविले आहे. कारण संस्कृतभाषेला उत्तम व्याकरण आहे, तिच्यात समास व संधी

यांची सोय आहे, तिचे शब्दभांडार अमर्याद आहे आणि तिच्यात एका शब्दाला अनेक प्रतिशब्द आहेत.

राजा सर टी. माधवराव हे मुख्यतः राज्यकार्यधुरंधर व समाजसुधारक होते. मोरोपंतांच्या कवितेवर त्यांची विशेष भक्ती होती. ते फावल्या वेळी कविता रचीत. त्यांच्या विचारांवर इंग्रजी विचारांची पुसट छाप आहे. त्यांनी विविध विषयांवर अनेक लहानलहान कविता लिहिल्या आहेत, अनेक संस्कृत सुभाषितांचा मराठी अनुवाद केला आहे. आणि इंग्रजी वाङ्मयात प्रचलित असलेल्या पद्धतीप्रमाणे आपल्या कुटुंबियांना व इष्टमित्रांना अनुलक्षून कविता रचिल्या आहेत. माधवरावांची सारी रचना फुटकळ आहे. 'गृहिणीच्या अलंकारा'त त्यांचे स्त्रीदाक्षिण्य दिसते. त्यात जुन्यानव्या विचारसरणीतील चांगल्या गोष्टींचा संगम आहे —

सद्वर्तन, पतिनिष्ठा, सस्मितवदन, स्वकान्तहितमनन,
नियमितधनसंतुष्टा सलील वाणी, सदैव शांत मन,
कोमलता, भूतदया, आदर, लज्जासुगंध, सत्कार,
वाचन, गायन कांहीं, निर्धन बंधूजनांस उपकार,
बालकलालनपालन, निर्मलता, जागरूक गृहभरणें,
ज्ञानी सारे म्हणती, समजा कीं हींच अंगनाभरणें.

## पंडितपरंपरेचे कार्य

आधुनिक कवींच्या आरंभीच्या या पंडितपरंपरेचे संस्मरणीय व महनीय कार्य हे की, तिने सर्वसाधारण मराठी वाचकवर्गास अभिजात संस्कृत साहित्यातील काव्य-नाटकांतला नवरस चाखविला, आणि भक्तिपरंपरेचा जो पुराणरथ आध्यात्मिक व पौराणिक चाकोरीतून रे रे करीत चालला होता, त्याला नवीन मार्ग दाखविला. प्राचीन मराठी कवींनी केवळ रामायण, भारत व भागवत या बृहत्कथांचेच अनुवाद केले आहेत. श्रीहर्षाच्या 'नैषधा'च्या आधाराने रचिलेल्या रघुनाथपंडितांच्या 'दमयंतीस्वयंवरा'चा एकमेव अपवाद वगळला, तर त्यांनी दुसऱ्या कोणत्याही कवीच्या काव्य-नाटकाला स्पर्श केला नाही. परंतु पंडितपरंपरेतील कवींनी कालिदास, भवभूती, शूद्रक, बाण, विशाखदत्त, जगन्नाथपंडित इत्यादी प्रतिभासंपन्न श्रेष्ठ कवींच्या ललितवाङ्मयाची मराठी रसिकांना ओळख करून दिली. भारवी आणि माघ यांसारख्या क्लिष्ट लेखन करणाऱ्या कवींकडे त्यांचे लक्ष गेले नाही. यावरून त्यांची वैदर्भी रीतीविषयीची अभिजात अभिरुची प्रत्ययास येते. पंडितपरंपरेपासूनच बालोपयोगी व शालोपयोगी कथाकवितांच्या लेखनाचा श्रीगणेशा झाला. विद्यार्थ्यांसाठी हेतुपुरस्सर निर्माण करण्यात आलेल्या या साहित्यात बराचसा भाग 'अवसरपठिता वाणी'चा अनुवाद आहे. कारण त्या वाणीत काव्यापेक्षा नीतीचा भाग अधिक आहे. किंबहुना, नीति-शिक्षण हा तिचा आद्य व एकमेव हेतू असून तो मनावर ठसावा, एवढ्यापुरतीच त्याला काव्याची जोड दिली आहे. कल्पित कथेपेक्षा ही अनुभवसिद्ध नीतिपद्ये मनुष्य-

जीवनात मार्गदर्शक म्हणून अधिक उपयुक्त व उपकारक असतात. पंडित-परंपरेतील कवींद्वारा मराठीत आलेले हे सुसंस्कृत ललितवाङ्मय व शिक्षाप्रद शालेय वाङ्मय पुढे पुष्कळ काळपर्यंत महाराष्ट्रभर अभ्यासक्रमात समाविष्ट असल्यामुळे पुढील लेखकांच्या लेखनसरणीला त्याचेच वळण लागले. पंडितपरंपरेतील सर्व कवी संस्कृतभाषाविशारद असल्यामुळे त्यांच्या लेखनाने मराठी भाषेला सुरुवातीपासून शुद्ध, सोज्ज्वळ व सुंदर स्वरूप प्राप्त झाले. परंतु पंडितकवींचे बहुतेक वाङ्मय हे आधारित, अनुवादित, भाषान्तरित किंवा रूपान्तरित असल्यामुळे त्यात आत्मतेजाचा व स्वयं-प्रत्ययाचा अभाव आहे. पंडित-कवींचा हा भाषान्तराचा उपक्रम पुढे फार काळ राहिला नाही. कारण मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातून मराठी भाषा व मराठी वाङ्मय यांच्या अभ्यासाला अर्धचंद्र मिळाला आणि संस्कृतसाहित्याच्या अध्ययनाला मान देण्यात आला. त्यामुळे मूळ संस्कृत काव्ये व नाटके यांच्यासमोर मराठी भाषेची मातब्बरी राहिली नाही. साहजिकच आहे, दूध मिळाल्यावर त्याची तहान ताकाने कोण भागवील ?

## दक्षिणा प्रैज कमिटी

पंडितपरंपरेचे पुष्कळ वाङ्मय ‘ दक्षिणा प्रैज’च्या आमिषामुळे व ‘ मेहेरबान् दायरेक्तर ऑफ पब्लिक इंस्त्रक्शन् ’ यांच्या ‘ खास हुकुमा’मुळे तयार झाले होते त्यामुळे ते हुकमेहुकूम स्वरूपाचे निपजले आहे (त्यात जिवाला झोंबेल असा जिव्हाळा नाही.) ‘ दक्षिणा प्रैज कमिटी’ने कवितेचा विषय जाहीर करावयाचा आणि उमेदवार कवींना तो घ्यावयास लावावयाचा, हा साराच प्रकार जसा चमत्कारिक तसाच अस्वाभाविक होता. ‘ कमिटी’ने ‘ गंगा ’ हा विषय दिला, त्यावर चितामणिपेठकर, बापूसाहेब कुरुंदवाडकर, कृष्णशास्त्री राजवाडे आणि बाळकृष्ण मल्हार हंस यांनी काव्ये रचिली. यांपैकी पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेठकर यांचे ‘ गंगावर्णना ’ हे काव्य इंग्रजी शैलीचे अनुकरण करून लिहिण्यात आले आहे. हंसांची ख्याती त्यांच्या काव्यरचनेपेक्षा ‘ वामनपडित ’ व ‘ मोरोपंत ’ या त्यांच्या समालोचनपर निबंधांमुळे विशेष आहे. ‘ शिवाजी ’ या काव्यविषयावर गणेशशास्त्री लेले, बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर, महादेव मोरेश्वर कुंटे, केशव लक्ष्मण जोरवेकर व एकनाथशास्त्री करंबकर यांची काव्ये आहेत. आध्यात्मिक कविता लिहिणारे आत्माराम मोरेश्वर छत्रे यांनीही ‘ श्रीशिवछत्रपति-कथाब्धिमंथन ’ या नावाचे काव्य लिहिले आहे. यांपैकी कुंटे यांचा ‘ राजा शिवाजी ’ इतिहासप्रसिद्ध शिवाजीप्रमाणेच आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासात अनेक दृष्टींनी क्रांतिकारक व युगप्रवर्तक आहे. जोरवेकरांच्या ‘ शिवराजलीले’तील काही भाग सुंदर आहेत. परंतु काही अत्यंत हास्यास्पद आहेत. त्यांना औचित्याचा विवेक नाही —

आगगाडीची ट्रेन चमू मानूं
अग्रभागीं ते यंत्र तिचे ‘ तानू ’

शत्रुकिल्ला पाहता:स्टेशनाला
उभी राहे, दे विजय सज्जनाला.

या ‘ दिंडी’त तानाजी मालुसरे हा कोंडाणा सर करण्यास निघतो, त्या वेळेचे जे वर्णन आहे, ते किती हास्यास्पद आहे! कुंटे यांच्या ‘ राजा शिवाजी’प्रमाणेच इंदूरचे एकनाथशास्त्री करंबकर यांचा शिवाजी शूर, वीर, साहसी व देशाभिमानी आहे. शिवाजीमहाराजांना राजगुरु दादोजी कोंडदेव उत्तेजन देतात —

घे तूं तूंच नृपा! पुढार चल, हो तूं तूंच हो मोहरा,
भाला भोसकुनी उडीव पटला त्यांच्या त्वरेने बरा;
कांहीं संकट या महीवर महा येतां दयालु प्रभू
कांहींही करुनी उपाय बरवा ही तारितो नित्य भू.
हिंदूंचे चिरनाम राहिल असे सत्कृत्य लोकीं करा,
हिंदूंचा चिर धर्म राहिल असा उद्योग कांही करा,
हिंदूंचा विलसेल नित्य महिमा ऐशा बला दाखवा,
हिंदू ‘ धन्य ’, ‘ सुखी ’ सदोदित असे सर्वांमुखीं गाजवा.

वर दिलेल्या या नमुन्यावरून सुसंस्कृत शास्त्रीपंडित आणि अन्य जन यांच्या कवितेकडे पाहण्याच्या दृष्टिकोणात व अभिरुचीत कसा फरक असतो, ते स्पष्ट होईल. ‘ कृष्णाकुमारी ’ हा कवितेचा विषय गणेशशास्त्री लेले, पांडुरंगशास्त्री पारखी आणि गोविंद वासुदेव कानिटकर यांनी घेतला आहे. षड्ऋतू व सण यांवर राजवाडे व पारखी यांची काव्ये आहेत. पुढे सरकारने ‘ दक्षिणा प्रैज ’ बंद केल्यावर हे ‘ कवितेचे कारखाने ’ आपोआप थांबले. मात्र कमिटीने बक्षिसांना जे विषय दिले होते, ते बहुतेक ऐतिहासिक असल्यामुळे यापुढे ऐतिहासिक कविता लिहिण्याची प्रवृत्ती अधिकाधिक बळावली. पुराणांतील कथा निवडून तिच्यावर पौराणिक काव्य रचावयाचे, ही प्रवृत्ती भक्तिपरंपरेपासूनच चालू होती. तिच्यात ही एक नवीन भर पडली. संस्कृत साहित्याचे भाषान्तर करण्याची प्रवृत्ती यापुढे क्षीण झाली; मात्र ती सर्वस्वी नष्ट झाली नाही. गोविंद गोपाळ टिपणीस यांनी ‘काव्यरत्नावली’तून अनेक संस्कृत काव्यांची भाषान्तरे केली आहेत. परंतु ती सामान्य आहेत.

**पौराणिक कथा**

भक्तिपरंपरेतील पौराणिक आख्यानकांत गणेश रामचंद्र दातार यांचे ‘ गोकर्ण-यात्रा ’ धुंडिराज नारायण वैद्य यांचे ‘ श्रीसत्यनारायण ’, त्र्यं. वि. गोडबोले यांचे ‘ ऋष्यशृंगोपचरित्र ’ आणि लक्ष्मण मोरेश्वर असीरकर यांचे ‘ कपोतचरित्र ’ या काव्यांची भर पडली. यांपैकी त्र्यंबक विश्वनाथ गोडबोले व असीरकर यांची काव्ये वाचनीय आहेत. ‘ कपोतचरित्रा’तील एकपत्नीव्रताच्या स्तुतीचा भाग खरोखर अतिशय हृद्य व आस्वाद्य आहे.

## नाटकी कविता

या कालखंडातील आणखी एक नवीन काव्यप्रवृत्ती ' नाटकी कविते'ची होय. इ. स. १८४३-मध्ये पौराणिक आख्यानांच्या आणि हरिदासी कथाकीर्तनांच्या धर्तीवर सांगलीचे विष्णुदास अमृत भावे यांनी ' नाटकी कविता ' लिहिण्याचा सूत्रपात केला. त्यांची कविता ' नाट्यकवितासंग्रह ' या पुस्तकात संकलित करण्यात आली आहे. ही कविता गेय व तालबद्ध आहे. मात्र ती गाण्याची पद्धती आता काळाच्या ओघात नष्ट झाली आहे. ती कविता ज्या काळी व ज्या परिस्थितीत निर्माण झाली, त्या काळाची व परिस्थितीची कल्पना करूनच त्या कवितेकडे पाहिले पाहिजे. ही कविता सूत्रधार वाद्याच्या साथीत तालासुरावर म्हणावयाचा, आणि नट तिच्यातला भावार्थ लक्षात घेऊन हावभाव करावयाचा. तेव्हा कवितेचा हा नाटकी प्रकार कवित्वाच्या खऱ्या कसोटीवर उतरण्याचे कारण नाही. मात्र या कवितेला ऐतिहासिक महत्त्व आहे, हे विसरता येत नाही. पुढे या प्रकारची कविता सोकर बापूजी त्रिलोकेकर यांनी लिहिली. त्यांनी नलदमयंती, हरिश्चंद्र व सावित्री ही पौराणिक गद्यपद्यात्मक नाटके लिहून नाटकी कवितेचे एकांगी स्वरूप पालटून टाकिले. त्यांचा हा प्रयत्न वासुदेव नारायण डोंगरे व शंकर मोरो रानडे यांना फार आवडला. त्रिलोकेकर यांनी नाटकी कवितेचे रूप बदलण्याचा प्रयत्न केल्यावर मग तिच्यात अनेक प्रकारच्या सुधारणा होऊन तिला अगदी वेगळे असे 'संगीत नाटका'चे स्वरूप मिळाले.[1] हे स्वरूप मिळण्यास प्रामुख्याने अण्णासाहेब किर्लोस्कर व गोविंद बल्लाळ देवल यांचे श्रम कारणीभूत झाले. त्यांच्या अनुक्रमे ' सौभद्र ' व ' शारदा ' या परिपक्व नाटकांतही ' लग्नाला जातो मी द्वारकापुरा ' व ' सांगतों मी जाऊन भुजंगाला ' या पदांसारखी ' नाटकी कविता ' अवशिष्ट आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे. या पद्यांत काव्यापेक्षा नाट्यच अधिक आहे.

पंडित परंपरेतल्या कवींनी त्या काळच्या परिस्थितीत त्यांना जेवढे शक्य होते तेवढे नवे वळण मराठी कवितेला लावण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला. त्यांनी पेरलेल्या या बीजास नवशिक्षित पदवीधर कवींच्या काळी फुले आली आणि टिळक व केशवसुत या प्रतिभाशाली कवींच्या काळी फळे आली.

## तीन

## नवशिक्षित कवींची परंपरा

पंडितकवी संस्कृत साहित्यातील अभिजात काव्यनाटकांना मराठी वेष चढवीत असतानाच मराठी कवितेवर इंग्रजी पेहेराव चढविण्याच्या उद्योगास नवशिक्षित कवींनी प्रारंभ केला. मराठी कवितेला अभिजात सुसंस्कृत वळण लावण्याचा

१. बालबोध, जून १९०९.

प्रयत्न पुण्याच्या ब्राह्मणी वातावरणात झाला, तर तिला विलायती पोषाखाच्या तऱ्हा व चाली शिकविण्याचा उद्योग मुंबईच्या अठरापगड संमिश्र वातावरणात झाला. पुण्यास पेशव्यांची राजवट चालू असतानाच मुंबईस ईस्ट इंडिया कंपनीचा कारभार सुरू होता. तेथे हळूहळू इंग्रजी भाषा व वाङ्मय यांच्या प्रसारास सुरुवात झाली होती. या प्रसारकार्यास खिस्ती मिशनऱ्यांचा हातभार लागत होता. पुणेरी पंडितांची संस्कृत ग्रंथांची मराठी रूपांतरे प्रगल्भ व सुरस होती. परंतु प्राचीन मराठी कवितेत आणि संस्कृताच्या या मराठी रूपांतरात प्रकृतिदृष्ट्या फारसा फरक नव्हता. पुढे मुंबई विद्यापीठाची स्थापना होऊन त्यात संस्कृत भाषा व साहित्य यांच्या अध्ययनास व अध्यापनास आरंभ झाल्यावर तर मूळ संस्कृत ललितवाङ्मयासमोर त्याची ही मराठी रूपांतरे अगदीच नीरस व बेढब वाटू लागली विद्यापीठात संस्कृत साहित्याच्या बरोबरीने, किंबहुना त्याहूनही अधिक प्रमाणात इंग्रजी भाषा व वाङ्मय यांच्या परिशीलनास प्रतिष्ठा प्राप्त झाली होती; कारण ती राज्यकर्त्यांची व राज्यकारभाराची भाषा होती. व्यावहारिकदृष्ट्या ती अधिक उपकारक व उपादेय होती; शिवाय, त्या भाषेत जे विविध वाङ्मयप्रकार आहेत आणि जे विषयवैचित्र्य आहे, ते संस्कृतात अभावानेच आहे. इंग्रजी वाङ्मय विशेष अलंकृत नसतानाही आपल्या सहजतेने अंतःकरणास वेध लाविते, हे सत्य नवशिक्षितांच्या लक्षात आले होते. तेव्हा त्यांना अशा प्रकारचे साहित्य आपल्याकडे असावे, असे साहजिकच वाटून ते इंग्रजी काव्याचे व नाटकांचे अनुकरण व अनुसरण करू लागले. हे रूपांतरित साहित्य हळूहळू त्या काळच्या नियतकालिकांत प्रसार पावू लागले. त्याने आपला असा एक खास वाचकवर्ग निर्माण केला. कालांतराने त्या साहित्यातील कवितेचे स्वरूप कायमचे रूढ होऊन बसले. मनू बदलतो, त्याबरोबर मनुष्य बदलतो आणि त्याबरोबर त्याचे साहित्यही बदलते. इंग्रजी राज्य झाल्यामुळे येथील राजकीय परिस्थिती, सामाजिक आचारविचार, विद्या व कलाकौशल्ये आणि उद्योगधंदे या सर्वांत न भूतो न भविष्यति असा फरक पडत होता. पाश्चात्त्यांच्या धर्मांची, तत्त्वज्ञानाची आणि शास्त्रांची नित्य नवीन माहिती होत होती; हिंदुस्थान हे आसेतुहिमाचल एकराष्ट्र आहे, ही कल्पना धीरेधीरे रुजत होती; आणि स्वदेश, स्वभाषा, स्वबांधव, स्वजनहित अशा व्यापक ध्येयांकडे दृष्टी वळून येथील जनतेची जुनीपुराणी निवृत्तिपर वृत्ती दिवसानुदिवस प्रवृत्तिपर बनत होती. तेव्हा तेच परिवर्तन तिच्या वाङ्मयविषयक दृष्टिकोणात झाले असल्यास नवल नाही. अशा रीतीने वाङ्मयविषयक नवदृष्टी प्राप्त झालेल्या नवशिक्षितांनी आपल्या उद्यमशील कर्तृत्वाने मराठी कवितेचा यापुढचा ओघ नव्या व निराळ्या दिशेस लाविला.

### कवितेचे इंग्रजी वळण

इंग्रजी धर्तीवरच्या नवीन मराठी कवितेस स्थिर होण्यास काही काळ जावा लागला. याचे कारण असे की, मराठी कवितेला प्राचीन परंपरा होती; तिला विसदृश

अशी नवीन कविता वाचकांच्या ठराविक अभिरुचीस एकदम मानवणे शक्य नव्हते. शिवाय, पंडितकवींनी पूर्ववयात संस्कृताचा व उत्तरवयात इंग्रजीचा अभ्यास केल्यामुळे त्यांना संस्कृतापुढे इंग्रजी कवितेची किंमत विशेष वाटत नव्हती; आणि दुसरे म्हणजे त्यांना शिक्षणखात्याच्या वाढत्या गरजेकरिता मराठी गद्याची नव्याने पुनर्घटना करावयाची होती. त्यामुळे त्यांनी इंग्रजी गद्याच्या अनुकरणावर जसा भर दिला, तसा तो इंग्रजी पद्यावर दिला नाही. कारण मराठीत प्राचीन पद्य होते. तेव्हा इंग्रजी राज्याची स्थापना होऊन जवळजवळ अर्धशतक लोटल्यावर इंग्रजी तऱ्हेच्या मराठी कवितेचा यथाक्रम विकास होऊ लागला.

मराठी कवितेला इंग्रजी वळण लावण्याचे नवशिक्षित कवींनी आरंभिलेले कार्य सरळ व सुकर नव्हते. संस्कृत आणि मराठी या भाषांचा जवळचा संबंध आहे आणि संस्कृत भाषा ही मराठी भाषेला पूरक आहे. त्यामुळे संस्कृत ग्रंथांचे मराठी भाषांतर हे सहज व सुलभ आहे. मराठीला संस्कृतातील छंदांचा व संधिसमासांचा लाभ साहजिकच मिळतो. जी थोडीफार अडचण पडते, ती फक्त विभक्तीने प्रत्यय आणि क्रियापदांची रूपे यांची. परंतु मराठीला इंग्रजी पेहेराव चढविण्याचे कार्य मात्र कठीण आणि जोखमीचे होते. इंग्रजी भाषा, तिच्यातील कवितांचे विषय आणि तिची पद्यरचना या साऱ्याच गोष्टी विदेशी होत्या. संस्कृत आणि मराठी छंदांत मधुर नादाचे व रसाळ शब्दांचे महत्त्व आहे. उलट, इंग्रजी पद्याचे मराठीकरण अधिक त्रासाचे व जिकिरीचे होते. कारण गद्यापेक्षा पद्यात त्या-त्या भाषेचे आत्मीय गुण अधिक असतात. ते रूपांतरात उतरविताना त्यांच्यातील अर्ध्याहून अधिक सौंदर्य लोप पावते.

**नवे काव्यप्रकार**

नवशिक्षितांना इंग्रजी काव्यवाङ्मयातील केवळ नवेपणा किंवा निराळेपणाच तेवढा हवा होता, असे नाही. इंग्रजी काव्यातील Epic, Narrative Poem, Satire, Lyric, Elegy इत्यादी भिन्नभिन्न कविताप्रकार मराठीत बद्धमूल करण्याचा त्यांचा प्रयत्न सतत चालू होता. इंग्रजी कवितेचे निरलंकारित्व, अर्थसरलता, भावाभिव्यक्तीस आवश्यक तेवढा अवसर देण्याचे धोरण, शब्दांतील स्वरांचे साघात उच्चारण व परिगणन आणि भिन्नभिन्न यमकबंध इत्यादी प्रकार मराठी कवितेत रूढ करण्याचा त्यांचा उद्योग सुरू होता.

नवशिक्षितांनी Words from Poets, A Thousand and One Gems of Poetry, Golden Treasury इत्यादी इंग्रजी कवितासंग्रहांतील निवडक कवितांना मराठी साज चढविण्याचे कार्य चालविले. त्यामुळे यापुढे त्या नमुन्यावर फुटकळ विषयावर मराठीत लहानलहान चुटके निर्माण होऊ लागले. त्यापूर्वी अशी स्फुट स्वरूपाची कविता मराठी साहित्यात नव्हती.

**नवे विषय**

पूर्वी अध्यात्म, वेदान्त, पुराणकथा, संसारत्याग हेच काव्याने मर्यादि..

काव्यविषय होते. परंतु आता सृष्टी, राष्ट्र, समाज आणि दैनंदिन जीवन यांच्याकडे पाहण्याची दृष्टी प्रवृत्तिपर झाली. त्यामुळे कवितेचे लहानमोठे विषय अगणित झाले. इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्कामुळे आमच्याकडे प्रत्यक्ष ज्ञानाची सृष्टिवर्णने उत्पन्न होऊ लागली. नवीन कवितेची भाषाही बदलली. ती गद्याच्या बरीच जवळ आली.

नवशिक्षितांचे युग हे प्राचीन संस्कृती आणि विद्या व कला यांच्या पुनरुत्थानाचे आणि नवीन आचारविचार व ज्ञान यांच्या उदयाचे होते. ज्ञानप्रसारिणी सभा, प्रभाकर, ज्ञानप्रसारक, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, विविधज्ञानविस्तार, ज्ञानसंग्रह, दंभहारक इत्यादी नियतकालिकांच्याद्वारे समाजात ज्ञानदानाचे कार्य चालले होते आणि स्त्रीशिक्षण, स्त्रीपुरुषसमता, विधवाविवाह, प्रौढविवाह, जातिभेदांचे उच्चाटन, भ्रूण-हत्यानिवारण, परदेशगमन इत्यादी सामाजिक चळवळींच्या रूपाने जनतेत नवचैतन्य जागृत होत होते. त्यामुळे नवशिक्षित कवींनी राष्ट्रभाषा, सम्राज्ञीहीरकजयंती, दिल्ली-दरबार इत्यादी त्या काळच्या प्रासंगिक राजकीय घटनांवर आणि मद्यपाननिषेध, वैधव्यविमोचन, लोकाग्रणीनिधन इत्यादी तत्कालीन सामाजिक घडामोडींवर पुष्कळच पद्यवजा कविता लिहिली आहे. ती इतिहासदृष्ट्या उपयुक्त आहे.

ग्रॅण्ट डफचा ‘ मराठ्यांचा इतिहास ’, टॉडचा ‘ ॲनल्ज् ऑफ राज्यस्थान ’ हे ग्रंथ आणि सर वॉल्टर स्कॉट याची ‘ लेडी ऑफ द लेक ’, ‘ द ले ऑफ द लास्ट मिन्स्ट्रेल ’ व ‘ मार्मियन ’ ही काव्ये या कवींच्या वाचनात व अभ्यासक्रमात होती. त्यामुळे या नवशिक्षित कवींनी ऐतिहासिक कथाकाव्यांवर विशेष भर दिला आहे. याला महाराष्ट्रातील इतिहाससंशोधनाची चळवळही कारणीभूत आहे.

या कवींच्या वेळी बहुतेक मिल्टन, स्पेन्सर, ड्रायडन, पोप, गोल्ड्स्मिथ, ग्रे, कूपर इत्यादी मध्ययुगीन इंग्रजी कवींच्या कविता पाठ्यपुस्तकात संग्रहीत केलेल्या असत. त्यामुळे या नवशिक्षित कवींनी त्या इंग्रज कवींच्या काव्यमय विचारांचा, प्रकाराचा व आकारांचा आदर्श समोर ठेवून त्या मासल्याची उपदेशपर व बोधपर कविता रचिली आहे. आपण नीतिपर विचारांचे प्रचारक व समाजाचे शिक्षक आहोत, अशी त्या कवींची धारणा होती. त्या कवींच्या कवितेत भावनेच्या उद्रेकापेक्षा रचनेच्या शैलीस अधिक महत्त्व आहे. तेच वळण नवशिक्षित कवींनी गिरविले आहे. या कारणामुळे नवशिक्षित कवींच्या कवितेत रचनेची ऐट असली, तरी काव्यात्मता मात्र कमी आहे.

## इंग्रजी कवितेचे मराठी अग्रदूत

### हरि केशवजी

नवशिक्षित कवींच्या पिढीचा उगम झाला, त्या सुमारास इंग्रजी कारकीर्दीची सुरुवात होऊन पाचपन्नास वर्षे लोटली होती. इ. स. १८६७-मध्ये बजाबा रामचंद्र प्रधान यांनी सर वॉल्टर स्कॉटच्या ‘ द लेडी ऑफ द लेक ’च्या आधारे ‘ दैवसेनी ’ हे इंग्रजी तऱ्हेचे पहिले मराठी खंडकाव्य रचून प्रसिद्ध केले. परंतु त्यापूर्वी इ. स. १८३३-मध्ये मुंबई येथे हरि केशवजी पाठारे यांनी Conversations

on Natural Philosophy या विज्ञानविषयक ग्रंथाचे 'सिद्धपदार्थविज्ञानशास्त्र-विषयक संवाद' हे मराठी भाषांतर प्रसिद्ध केले होते. हा ग्रंथ विज्ञानविषयक असला, तरी त्यात हरि केशवजी यांनी 'ग्रहविवेचन' या भागात मिल्टनच्या 'पॅरेडाइज लॉस्ट'मधील एका काव्यमय उताऱ्याचे मुळातील कल्पनासौंदर्याला ढळ लागणार नाही, अशा खुबीने पद्यबद्ध भाषांतर केले आहे. ते मुळाबरहुकूम बेमालूम असून अत्यंत रम्य आहे. अस्तमानकाळी सूर्यबिंब क्षितिजाच्या रेषेपाशी स्पष्ट दिसते; त्याचे पुढील वर्णन पहावे —

सूर्यास्तीं कपिशांगी संध्यारमणी करावया केली
नीलांधकारवसना नेसुनि आकाशमंदिरीं ठेली.
तोंणे त्या निजवस्त्रें आच्छादुनि टाकितां दिशावदने
पशुपक्ष्यांनीं जाणों आश्रयिलीं तद्भये निजें सदने.
मौने संगति धरिली संध्येची, मग तृणाचिया दशनीं
पशु, कोठ्यांत पतत्री रमती, निद्रा तशीच तन्नयनीं.
ऐशांत बापुडी ते कोकवधू स्पष्ट एकटी पडली,
गातां पतिते तिजवरि मौनाची सुप्रसन्नता घडली.
मग शुक्रवीर तारासेना घेऊनि जाहला प्रकट,
त्याणें निजतेजाने बहुधा तम नाशिले भयासकट.
यापरि तिमिरमलाते क्षाळुनि तेजोजलें नभीं टिकला,
भासे दिगंगनांनीं नाहुनि तो भालि लाविला टिकला
विजयश्रीने वरिला सेनानी शुक्र त्याशि देखाया
येऊनि चंद्रराजा आपण विश्रांति त्याशि दे खाया.
तेजःपुंज कलानिधि जाणों त्याला सुरौप्य कवचाला
अखिल तमोरिकुलाते नासुनियां विजय पावता झाला.

( तुलनेकरिता मूळ तळटीपेत दिले आहे. )

Evening in Paradise.

Now come still Evening on, and Twilight gray
Had in her sober livery all things clad;
Silence accompanied; for beast and bird,
They to their grassy couch , there to their nests.
Were slunk, all but the wakeful nightingale;
She all night long her amorous descant sung;
Silence was pleased, now glow'd the firmament
With living sapphires, Hesperus, that led
The starry host, rode brightest, till the moon,
Rising in clouded majesty, at length
Apparent queen, unveiled her peerless light,
And o'er the dark her silver mantle threw.

इ. स. १८४१-मध्ये हरि केशवजी यांनी जेम्स फेरिश यांच्या सूचनेवरून स्कॉटिश मिशन सोसायटीसाठी Bunyan's Pilgrim's Progress या सुप्रसिद्ध इंग्रजी ग्रंथाचे ' यात्रिक-क्रमण म्हणजे इहलोकापासून परलोकास जाणें. ' हे मराठी भाषांतर केले. यात त्यांनी मधूनमधून काही प्रार्थनापर भाग पद्यबद्ध केले आहेत. ते भावदृष्ट्या उदात्त व काव्यदृष्ट्या सरस आहेत. हरि केशवजी यांनी आपल्या इतर ग्रंथांतही मधूनमधून पद्यरचना घातली आहे. किंबहुना, गद्यरचनेपेक्षा त्यांची पद्य-रचनाच अधिक सरस व सुंदर आहे. यासंबंधी विनायक कोंडदेव ओक म्हणतात, "हरि केशवजीच्या गद्यापेक्षां पद्यांचा आम्हांस फार चमत्कार वाटतो. त्यांच्या लहानपणांत छापखाने फारसे नव्हते, आणि मराठी कवितांचा प्रसार तर अगदीं थोडा होता. असे असतां, त्यांनीं ' यात्रिक-क्रमणा'च्या भाषांतरांत इंग्रजी पद्यांचें मराठी भाषांतर केले आहे, ते वामनपंडितांच्या श्लोकांच्या बरोबरीचे दिसते. हे जरी हिंदु होते, तरी ह्यांच्या शब्दांत जें येशू ख्रिस्ताचे स्तुतिस्तोत्र आलें आहे, ते पुष्कळ प्रेमळ आहे." इ. स. १८३८-मध्ये रेव्हरंड सी. पी. फेरार यांनी Psalms of David याची आर्या, श्लोक, अभंग, गीते इत्यादी छंदांत भाषांतरे केली होती. ती हरि केशवजींच्या ' यात्रिकक्रमणा'तील स्तोत्रांशी ताडून व तोलून पाहण्यासारखी आहेत.

## महादेव गोविंद कोल्हटकर

यानंतर महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर[1] यांनी इ. स. १८६०-मध्ये इंग्रजी क्रमिक पहिल्या कवितेच्या पुस्तकातील कवितांचे भाषांतर केले; आणि ते ' प्राकृत कवितेचें पहिले पुस्तक ' या नावाने प्रसिद्ध केले. नंतर त्यांनी इ. स. १८६१-मध्ये शाळाखात्याच्या तिसऱ्या इंग्रजी पुस्तकाच्या दुसऱ्या भागातील कवितांचे पद्यबद्ध भाषांतर केले; आणि ते ' मराठी कवितेचे दुसरे पुस्तक ' या नावाने प्रसिद्ध केले. कोल्हटकरांची ही भाषांतरे ' मेहेरबान दायरेक्तर ऑफ पब्लिक इंस्त्रक्शन् ' यांच्या आदेशाने निर्माण झाली होती. तेव्हा साहजिक त्यांत स्वयंस्फूर्तीचा अभाव आहे. महाराष्ट्रात सर्वश्रुत असलेल्या ' मुंगीवरील आर्या ' आणि ' कज्जेकफावतीवरील अभंग ' याच पुस्तकात आहेत. या कवितांतील क्षुद्र विषय, त्यांतील बालिश उपदेश, त्यांची बालबोध भाषा आणि गद्यसदृश रचना ध्यानात घेऊन ' दंभहारक ' म्हणते : ' नवीन शिक्षणाचा क्रम सुरू झाल्यावर काही दिवसांनी कोल्हटकरांचें '

---

१. महादेव गोविंद कोल्हटकर ( १८२२ ), वाई, पुणे.

ज्योतिष, व्याकरण, इंग्रजी वाङ्मय इत्यादींचे अध्ययन यांनी केले होते. ' पुणे कॉलेजा'त मराठीचे प्रोफेसर व विद्याखात्यात डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर म्हणून यांनी काम केले. हे ' ज्ञानप्रसारक सभे'चे पदाधिकारी ( चिटणीस, उपाध्यक्ष ) होते. लेखन — प्राकृत कवितेचें पहिलें पुस्तक ( १८६० ), प्राकृत कवितेचें दुसरे पुस्तक ( १८६१ ), ऑथेल्लो ( भाषांतर ), (१८६७), कोलंबसाचा वृत्तान्त (१८४९), पदार्थविज्ञानशास्त्र ( १८६१ ).

'प्राकृत कवितांचे पहिलें पुस्तक' प्रसिद्ध झालें. त्याची त्या वेळेस बरीच चेष्टा झाली.[1] ज्ञानदेव, तुकाराम आणि वामन, मोरोपंत या कविपरंपरेत कोल्हटकरांची ही विलायती कविता सर्वथैव विसदृश दिसावी, यात काही आश्चर्य नाही. परंतु पाचसहा वर्षांनंतर नवीन मराठी कवितेकडे पाहण्याचा हा जुनापुराणा दृष्टिकोण बदलला; आणि इंग्रजीतून उतरलेल्या मराठी कवितेलाही मानसन्मान मिळू लागला.

कोल्हटकरांच्या पुस्तकात The Burial of Sir John Moore ( Wolfe ), The Child's First Grief ( Mrs. Hemans ), We are Seven ( Wordsworth ), The Love of Country ( Scott ), A Psalm of Life ( Longfellow ) इत्यादी सर्वमान्य कवितांची भाषांतरे आहेत आणि त्यांपकी पुष्कळ भाषांतरे मुळातील भावाला धरून मराठीत उतरली आहेत. नमुना म्हणून My Mother या इंग्रजी कवितेचे 'आई' हे भावमधुर भाषांतर लक्षणीय आहे —

स्तनपानाते करवुनि कोणी गे ! पोशिले मला आई ?
अंतीं झोपीं जाया थोपटिलें कोणि म्हणुनि अंगाई ?
माझ्या गालावरती वरचेवर तोंड ठेवुनी आई !
चुंबियले प्रेमाने मज कोणी म्हणुनि 'तान्हुल्ये बाई'
डोळ्यांवरील माझ्या झांपड पाहूनि कोण तळमळलें ?
मन्मरणभीति पोटीं आई ! आणून कोण गे रडले ?[2]

महादेवशास्त्री कोल्हटकरांच्या उपदेशपर कवितांतही मधूनमधून भावमधुर स्थळे आहेत —

सत्कृत्यांचीं पुष्पें तोडीतचि जावे
सुवासा सोडावें चोहीकडे
आपण केलेल्या परोपकारांची
कृत्ये महत्त्वाचीं दयायुक्त
हृदयस्थ भानू मावळल्यावरी
आठवोनी सारीं मोठ्या प्रेमे
आपुले बा ! नाम लोकांनी स्मरावें
ऐसेंच वांचावें जगामाजीं.

---

१. दंभहारक, वर्ष ५, पृ. ७४.
२. मूळ कविता :
Who fed me from her gentle breast
And hushed me in her arms to rest,
And on my cheek sweet kisses prest ?
My Mother.
When pain and sickness made me cry
Who gazed upon my heavy eye
And wept for fear that I should die ?

महादेवशास्त्र्यांच्या भाषांतरित कवितांत कुटुंबप्रेम, स्वातंत्र्याची लालसा, अन्यायाचा प्रतिकार, विश्वबंधुत्व, मानवी समता, निसर्गाची आवड इत्यादी नवीन विषयांचा समावेश झाला आहे. कदाचित पुढील पिढीतील कवींनी शाळेत असताना लहानपणी ही भाषांतरे पाठ केली असावी आणि त्यांपासून काव्यलेखनाची स्फूर्ती घेतली असावी.

हरि केशवजी आणि महादेवशास्त्री यांना इंग्रजी कवितेचे मराठी अग्रदूत म्हणून मान्यता देण्यास खरोखर काही प्रत्यवाय नाही. कोल्हटकरांनी मराठी रंगभूमीच्या क्षेत्रातही एका नव्या मनोज्ञ मन्वंतराचा प्रारंभ केला. त्यांनी शेक्स्पिअरच्या 'ऑथेल्लो' या हृत्क्षोभकारक नाटकास मराठी वेष दिला. त्यांच्या पश्चात नातू, प्रधान, जठार, कीर्तने, महाजनि, शंकर मोरो रानडे, वासुदेव बाळकृष्ण केळकर, गोपाळ गणेश आगरकर, बर्वे इत्यादिकांनी शेक्स्पिअरच्या निरनिराळ्या नाटकांना मराठी साज घातला. अशा रीतीने संस्कृत नाटकांची मराठी रूपांतरे करणाऱ्या पंडितकवींप्रमाणेच शेक्स्पिअरच्या इंग्रजी नाटकांना मराठी रूप देणाऱ्या नवशिक्षितांची एक अखंड परंपरा सुरू झाली.

## गिल्पिन-चरित्र

यानंतर इ. स. १८६७-मध्ये बजाबा बाळाजी नेने यांनी Cowper-च्या 'डाय्व्हर्टिंग हिस्टरी ऑफ जॉन गिल्पिन' या विनोदपूर्ण इंग्रजी कवितेचे 'गिल्पिनचरित्रे' हे आर्याछंदातील भाषांतर केले. प्रस्तुत भाषांतरात मूळ इंग्रजी कविता आणि तिचा गोषवाराही दिला आहे. या भाषांतराविषयी निबंधमालाकार म्हणतात, " हे भाषांतर निव्वळ फसले असेल, असे आम्ही खात्रीने म्हणतो. कारण त्यात जो नाजूक तऱ्हेचा विनोद आहे, तो केवळ इंग्रजी पद्धतीचाच आहे. तो मराठीत उतरणे केवळ अशक्य होय."

## इंग्रजी शैलीचे पहिले मराठी खंडकाव्य : 'दैवसेनी'

इ स. १८६७ साली बजाबा रामचंद्र प्रधान[1] यांनी सर वॉल्टर स्कॉटच्या 'लेडी ऑफ दि लेक'च्या पहिल्या व अखेरच्या सर्गांच्या आधारे 'दैवसेनी' हे २३५ श्लोकांचे खंडकाव्य रचिले. त्याचे स्वरूप भाषांतराचे नाही. ते थोडे अनुकरणात्मक आहे. त्यामुळे ते आधारित असावे, असा भासही होत नाही.

'दैवसेनी'चे कथानक जयपूरच्या कविकल्पनानिर्मित इतिहासातील आहे. सवाई जयसेनाचा सरदार ठाकूर देवसेन हा राजाची गैरमर्जी झाल्यामुळे आपली तरुण कन्या दैवसेनी हिला घेऊन मारवाडात मेर लोकांच्या आश्रयास जातो. त्याचा

१. बजाबा रामचंद्र प्रधान— ( १८३८–१८८६ ) दापोली, मुंबई.
शिक्षणखात्यात एज्युकेशनल इन्स्पेक्टर म्हणून नोकरी; 'ज्ञानसंग्रह' मासिकात लेखन दैवसेनी ( १८६७ ), 'भ्रांतिकृत चमत्कार' ( भाषांतर – द कॉमेडी ऑफ एरर्स—शेक्स्पिअर ), 'सद्गुणी स्त्री', 'दोन गोष्टी', 'फारा दिवसांची गोष्ट', 'झालें तें ठीकच झालें' इत्यादी गोष्टी.

शोध घेत-घेत मृगयेच्या निमित्ताने. राजा तेथे येतो. दैवसेनी त्याच्या नजरेला पडते त्या दोघांचा प्रेमविवाह होतो, आणि मग राजाची सरदारावरील गैरमर्जी नाहीशी होते.

या कथेत मनोवेधक प्रसंग नाहीत, किंवा उठावदार व्यक्तिरेखा नाहीत. परंतु याची उणीव स्वभावानुरूप सुस्पष्ट मनोलेखने आणि सृष्टिसौंदर्याची प्रफुल्लित वर्णने यांनी भरून काढिली आहे. या काव्यातील दिंडी, साकी, आर्या, श्लोक इत्यादी भिन्न-भिन्न वृत्तांतील पद्यरचना मनोहर आहे. प्रस्तुत कथेत शृंगार आणि वीर हे रस अंगभूत असून करुण रसाचे प्राबल्य आहे. कवितेची भाषा भावानुगामी व रसार्द्र आहे. उदाहरण म्हणून हे मनोलेखन पहा —

काय उद्भवली देवता जलाची ! स्वप्न आहे कीं मोहिनी पिशाची !
नव्हे मानुष, गंधर्वकन्यका हे, वदन उत्सुक सप्रेम शोभताहे.
बाल्य वदनींचे जाय त्या प्रसंगीं, स्त्रीत्व संकोचित कठिण येत अंगीं.
गोड कौतुक त्या मुग्ध अवस्थेचे, बाल्य जेव्हां स्त्रीत्वांत विरे साचें.

आणि हे चित्रमय सृष्टिवर्णन पहा —

कुठे पाझरते उदक पर्वतांगीं, ओघ कोठें होतात एक संगीं.
कड्यावरुनी हे शुभ्र लोटताती निजानंदीं रंगोनि नाचताती.

या काव्यातील काही श्लोकांवरून रघुनाथ-पंडिताचे दमयंतीस्वयंवर प्रधानांना आदर्शवत असावे, असे वाटते. हे खंडकाव्य मालाकारांच्या पसंतीस उतरले होते. यावरून त्याचे उत्कृष्टत्व मान्य करावयास हरकत नाही.

**इंग्रजी पद्धतीची वीररसपूर्ण कविता : ‘ राजा शिवाजी ’**

प्रधानांनी ‘ दैवसेनी’च्याद्वारे इंग्रजी वाङ्मयातील कथाकाव्य किंवा खंडकाव्य मराठीत आणिले, तर त्यांच्यानंतर दोन वर्षांनी, म्हणजे इ. स. १८६९-मध्ये महादेव मोरेश्वर कुंटे[1] यांनी ‘ राजा शिवाजी’च्या रूपाने इंग्रजी साहित्यातील Heroic Epic म्हणजे वीरसप्रधान काव्य मराठीत नव्याने निर्माण केले. हे काव्य कुंटे बारा भागांत पूर्ण करणार होते, परंतु इ. स. १८६९-मध्ये पहिले तीन भाग आणि इ. स. १८७२-मध्ये पुढले तीन भाग असे या काव्याचे एकूण सहाच भाग बाहेर पडले. या काव्याला कुंट्यांनी अठ्ठावीस पृष्ठांची इंग्रजी प्रस्तावना जोडली आहे. तीत त्यांची काव्यविषयक

१. महादेव मोरेश्वर कुंटे ( १८३५–१८८८ ) : माहुली, कोल्हापूर, पुणे, मुंबई; यांनी काही दिवस कोल्हापूर व पुणे येथे अध्यापक म्हणून व काही दिवस मुंबई येथे एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये संस्कृताचे प्राध्यापक म्हणून काम केले. औद्योगिक व्यवसायही त्यांनी करून पाहिला. अनेक क्षेत्रांत संचार हे त्यांचे खास वैशिष्ट्य; ते पदवीधर होते. त्यांनी अनेक विषयाचा ( भाषा व शास्त्रे ) खोल अभ्यास केला होता. लेखन — राजा शिवाजी ( १८६९ ), मन ( १८७२ ), राजाराममहाराज. आर्यसंस्कृतीचीं स्थित्यंतरें (इंग्रजी) — इटलीच्या विद्वत्परिषदेकडून पारितोषिक. बालविवाहनिषेधक वाद ( १८७६ ), षड्दर्शनाचिंतनिका मासिकाचे संचालन.

जी मते व्यक्त झाली आहेत, ती आजदेखील विचारार्ह आहेत.

आपल्या आकलनशक्तीस त्रास न होता ज्यामुळे आपले मन आनंदमय होते ते काव्य, अशी कुंट्यांनी काव्याची व्याख्या केली आहे. काव्यवाङ्मय हे लोकसमुदायाच्या उत्कर्षासाठी आहे. तेव्हा ते ज्ञान्यापासून अडाण्यापर्यंत सर्वांस ग्रहण करिता येईल, असे स्वाभाविक व सोपे हवे. यासाठी त्यांनी आपल्या काव्यात शक्य-तो थेट मराठी शब्दांचा उपयोग केला आहे. संस्कृत शब्दांचा अर्थ अशिक्षितांना ठाऊक नसतो. अतएव त्याचा व्यर्थ वापर करणाऱ्या कवींवर कुंट्यांचा कटाक्ष होता. परंतु फारसी, हिंदी किंवा भ्रष्ट इंग्रजी शब्दांवर त्यांचा राग नव्हता. राष्ट्रात एकोप्याच्या दृष्टीने सुशिक्षित आणि अशिक्षित असे दोन गट व तट नको असतील, तर कवितेची भाषा सर्वांना सहज समजेल अशी हवी, असा त्यांचा आग्रह होता. काव्याची यशस्विता ही वाचकाच्या अभिरुचीवर अवलंबून आहे. ती जशी विशुद्ध व स्वाभाविक, तशीच दांभिक व मलिनही असते. ती सर्वांचीच एकसारखी सुसंस्कृत बनावी, म्हणून त्यांनी काव्यलेखनाचा हा उपक्रम केला होता.

जुने संस्कृत पंडित मराठी कविता लिहीत. तीत संस्कृत शब्दांचे प्राचुर्य असे आणि त्यांचा अर्थ तळटीपांत देण्यात येत असे. त्याचप्रमाणे इंग्रजी पदवीवर नवशिक्षित कवी इंग्रजीचा पुरस्कार आणि मराठीचा तिरस्कार करीत. कुंट्यांना हे दोन्ही प्रकार नापसंत होते. हे दोन्ही वर्ग तिसऱ्या अशिक्षित वर्गाची उपेक्षा करीत आहेत, असा त्या वर्गावर कुंट्यांचा आरोप होता. या दोन्ही वर्गांतील कवी पद्यलेखन करिताना मात्र वामन आणि मोरोपंत यांचे अनुसरण करतात, हेही कुंट्यांना आक्षेपार्ह वाटे. वामन आणि मोरोपंत यांना त्यांनी Degenerate Sanskrit-Marathi Poets म्हणजे ' अधःपतित संस्कृतमिश्र मराठी कवी ' असे म्हटले आहे. पदांमध्ये किंवा ओव्यांमध्ये आढळणारी रोजच्या बोलण्या-चालण्यातली मराठी भाषा श्लोक आणि आर्या या संस्कृत छंदांत का नसावी, असा प्रश्न कुंट्यांपुढे होता. वीररसप्रधान काव्या-करिता श्लोकाचे अवलंबन त्यांना मान्य होते; परंतु जेथे विशुद्ध मराठी शब्द योजणे शक्य आहे, तेथेही श्लोकांत संस्कृत शब्दांची निरर्थक गर्दी त्यांना अमान्य होती. या आपल्या सिद्धान्तानुसार त्यांनी निर्भेळ मराठी शब्द योजिल्यामुळे त्यांचे काव्य वीरदर्पपूर्ण आणि मोठे दणकट व राकट उतरले आहे. निव्वळ मराठी शब्द शृंगार व वात्सल्य यांनाही पोषक असतात, हे त्यांनी नूरजानीचे यौवन आणि संभाजीचे बालपण या दोन प्रसंगांच्या वर्णनांनी सिद्ध केले आहे.

थेट मराठी शब्दांत नाद व रस यांचा अभाव असल्यामुळे मराठी कवितेतली माधुरी उणी होते हा अपसमज आहे, हे कुंट्यांनी मराठी उच्चारण व मराठी लेखन यांच्यामध्ये असंगती असल्याचे सांगून स्पष्ट केले आहे. मराठी लेखन उच्चारानुसारी नाही; त्यामुळे त्याचे पद्यमापन बरोबर होत नाही, यासंबंधी ते म्हणतात —

It is not pure Marathi words that are at fault, but the system of quantification now in force is irregular and unnatural. Marathı words are not written as they are pronounced. For instance, nobody pronounces उच्लून as consising of four full syllables, but च is only a consonant and is amalgamated with उ which, therefore, becomes long by position. So long as this difference between Marathi written and Marathi spoken is not removed, or at least recognized, so long as some innovation founded on the knowledge of the difference is not introduced, the cause of metrical Marathi composition should suffer. Aware of this, I fearlessly adopted the method of writing words as they are spoken, in my poems. So the reader will find खाल्च्या instead of खालच्या which is really unmusical.

याशिवाय कुंट्यांनी मिल्टन व पोप यांच्या ग्रीक काव्यलेखनशैलीचे अनुकरण करून मराठी पद्यात पहिल्यानेच वक्तृत्वाचा प्रचंड प्रवाह वाहविला आहे. मात्र या प्रवाहातील मंगलाचरण, नमस्कृती, आशी इत्यादी प्रथा आपल्याकडील आहेत. कवितेचा अनिरुद्ध ओघ चालू असतानाच त्यात अस्तिपक्षी किंवा नास्तिपक्षी प्रश्नालंकार साधावयाचे, हा इंग्रजी प्रकार मराठीत रूढ करण्याचा प्रयत्न प्रथम कुंट्यांनीच केला.

मनोरंजने शारदे ! देवि पावे, दयाळे ! कृपाळे ! मला धैर्य द्यावे
चढाया पहातो, जिथें वाट नाहीं; जिथें शक्ति माझी न चालेचि काहीं ? [१]

आता इकडील पद्धतीप्रमाणे मंगलाचरण, नमस्कृती, विषयोपन्यास इत्यादी भाग पहा —

जसा थोर वाल्मीकि साधी रसातें। तसें काव्य यावे रचायास मातें
तुवां दाविला मार्ग त्याला भला गे। महाकाव्य त्याचें जनां गोड लागे.
निघे जेंवि योद्धा मराठा लढाया। रणीं तीक्ष्ण तर्वार बांधून जाया
जिताया, मराया मनीं शौर्य वागे,। पुढें वीर चाले; हटेनाचि मागें
मला तेवि हें काव्य यावे रचाया। अगे शारदे — ! [१]

संस्कृत पद्यात किंवा जुन्या मराठी पद्यात एक चरण संपला म्हणजे तितक्यापुरता अर्थही संपतो. परंतु कुंट्यांनी इंग्रजीचे अनुकरण करून एका चरणातील शेवटच्या शब्दाचा अन्वय दुसऱ्या चरणातील आरंभीच्या शब्दाशी जोडला आहे. या बाबतीत

१. "Sing, Heavenly Muse, that on the secret top
. . ... ... ...
Invoke thy aid to my adventerous song,
That which no middle flight intends to soar
Above the Aonian mount, while it pursues
Things unattempted yet in prose or rhyme.

त्यांना इंग्रजीमधून मराठीत नव्यानेच आलेल्या विरामचिन्हांचे साहाय्य झाले आहे. अशा रीतीने अन्वयासाठी विरामचिन्हे उपयोगी पडल्यामुळे पद्यातील स्वाभाविक व ठराविक अवसानस्थाने निरुपयोगी झाली आहेत. मराठीत इंग्रजीप्रमाणे Blank Verse म्हणजे प्रासहीन कविता आणण्याचा कुंट्यांचा हा प्रयत्न असावा. मिल्टन आपल्या पद्यात पल्लेदार वाक्यरचना करितो, आणि तीत एखाद्या घटनेची, दृश्याची अथवा प्रसंगाची विस्तृत वर्णनाच्याद्वारे उपमा साधतो. कुंट्यांनी 'राजा शिवाजी'त तशा तऱ्हेच्या सविस्तर उपमा ( Miltonic similes ) साधल्या आहेत. पुढील पद्यात शिवाजीच्या आईस रानपक्षिणीची उपमा दिली आहे —

गमे त्या सुमातेस संतोष मोठा । जशी रानपक्षीण बांधी घरोटा
बहू उंच जागीं, जिथें डोंगराचा । कडा भेगळे, जोर त्या पारध्याचा—
खुटे, तेथ पिल्लें तिचीं वाढतात । उडों लागतीं. तों झुले ती मनांत
तिच्या भोंवतीं तीं उड्या मारतात । पुढे सर्व चूं चूं असें बोलतात,
अशी शोभली तो सुमाताहि भारी । पुढे बाळ नाचे मिठी तीस मारी ।
पळे, खेळ मांडी, दडे, गोड चाळे । करी; तों सखी ती सुखीं फार लोळे.

प्रस्तुत काव्याच्या इंग्रजी प्रस्तावनेत कुंटयांनी epic, drama, lyric, descriptive rambling poem, pastoral, satire आदी भिन्नभिन्न काव्य-प्रकारांची स्वरूपे संक्षिप्तरीत्या विशद केली आहेत आणि 'राजा शिवाजी' हे आपले काव्य 'that which has a biginning, a middle, and an end' या अरिस्टॉटलच्या Epic-च्या व्याख्येस जुळते-मिळते आहे, हे दाखविले आहे. पुढे त्यांनी स्वतःची लेखनपद्धती स्वाभाविक ( natural ) आहे, म्हणून तिला romantic style म्हणजे स्वच्छंदशैली म्हटले आहे. शिवाजीच्या काळी मराठ्यांच्या राष्ट्राचे उत्थान कसे झाले, पुढे ते कसे भरभराटले आणि शेवटी त्याचे अधःपतन कसे झाले, हे या काव्यात स्पष्ट करण्याचा त्यांचा मनोदय होता. शिवाजीचा इतिहास हा एल्फिन्स्टन आणि मरे यांच्या ग्रंथावरून उलगडणार नाही; तो नीट कळावा याकरिता तुकाराम व रामदास यांची संतवाणी, जुनेपुराणे पोवाडे, ऐतिहासिक आख्यायिका आणि गडकऱ्यांच्या तोंडच्या परंपरागत दंतकथा यांची माहिती हवी, असे त्यांचे म्हणणे आहे. प्रस्तावनेच्या शेवटी स्वतःपाशी एक पुरातन संस्कृत हस्तलिखित असल्याचा उल्लेख कुंटयांनी केला आहे. ते 'पर्णालपर्वतग्रहणाख्याना'चे हस्तलिखित तर नसेल ना? कारण प्रस्तुत काव्याच्या चौथ्या भागाचा आरंभ पन्हाळ-गडच्या वर्णनाने झाला आहे. न्यायामूर्ती रानडे व कुंटे हे सहाध्यायी व स्नेही होते. रानड्यांनी शिवाजीचा काळ व कर्तृत्व यांवर The Rise of the Maratha Power ( मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ) हा ग्रंथ लिहिला आहे, तर 'राजा शिवाजी' हे बारा सर्गांचे काव्य रचण्याचा कुंटयांचा संकल्प होता. या दोघांचे स्फूर्तिस्थान एकच तर नसेल ना?

'राजा शिवाजी'च्या पहिल्या तीन भागांत सुसंगती आहे. महाराष्ट्रदेश, मराठ्यांचा स्वभाव, शिवाजीचा संसार, त्याचे राजकारण आणि पन्हाळ्याच्या पायथ्याशी विजापूरकर मुसलमानांवर मराठी लोकांनी चढविलेला हल्ला ही प्रकरणे त्यांत आली आहेत. दुसऱ्या तीन भागांत बरीच विसंगती व पाल्हाळ आहे. बहिर्जी नाईक, पिलाजी, नूरजानी, शिवाजीचा सोयराबाईसमवेत रांगण्यास प्रवास, मुधोळकराचा वध, वाडीकराचा पराभव आणि शहाजीशी भेट ही प्रकरणे या भागांत आली आहेत. पण पहिल्या तीन भागांतला कुंट्यांचा जोम व हुरूप पुढच्या तीन भागांत राहिला नाही, असे वाटते.

प्रथमदर्शनी प्रस्तुत काव्यासंबंधी मनात आदर उत्पन्न होत नाही. या काव्यात कोमलता व मधुरता यांचे दर्शन क्वचितच घडते. मात्र 'उठे घोर हर्हर्, उठे घोर दिन् दिन्, उडे रक्त मध्यें, रणीं सर्व किन् किन्' असा धांगडधिंगा सर्वत्र धुमाकूळ घालताना दिसतो. पद्यात यमके जुळविली आहेत. ती 'कट्टा–रट्टा' अशी कर्णकटू आहेत. व्याकरणदृष्ट्या अशुद्ध रूपे योजिली आहेत. आणि 'कंपू' व 'फैर' यांसारखे भ्रष्ट इंग्रजी शब्द प्रयुक्त केले आहेत. त्यांपेक्षा संस्कृत शब्द काय वाईट आहेत? उलट ते योजिल्याने काव्यात रटाळपणा जाणवला नसता आणि शब्दसंग्रह वाढून त्याच-त्या शब्दांच्या पुनरावृत्तीला आळा बसला असता. वृक्षांची नामावली आणि योद्धयांची वीरकृत्ये यांच्यामुळे हे काव्य उगाच लांबले असून कंटाळवाणे झाले आहे. प्रस्तुत काव्य जोरकस व्हावे, म्हणून कुंट्यांनी पराकाष्ठा केली आहे. संस्कृतातील 'भुजंगप्रयात' वृत्ताप्रमाणे फारसीत 'करीमा' वृत्त आहे. फकिरांचे खडे सवाल त्यात असतात. तेव्हा आपल्या या खड्या काव्यासाठी कुंट्यांनी प्रामुख्याने भुजंगप्रयाताचा अवलंब केला आहे. समर्थांच्या 'मनाच्या श्लोकां'मुळे गेली तीन शतके महाराष्ट्रास हे वृत्त जसे वैराग्यपर, तसेच वीरवृत्तिपर वाटत आले आहे, हे त्याच्या 'समर्थांचिया सेवका वक्र पाहे असा सर्व भूमंडळीं कोण आहे?' या त्यांच्या वीरदर्पपूर्ण वाणीवरून सहज लक्षात येईल. याशिवाय या काव्यात दूरान्वय, अर्थसंदेह, अर्थविपर्यास इत्यादी दोष आहेत. अनेक ठिकाणी अघळपघळ तीच-तीच वर्णने आहेत, आणि क्वचित बाजीप्रभू पन्हाळ्यावर होता, असे अनैतिहासिक उल्लेख आहेत. चिपळूणकरांनी आपल्या 'निबंधमाले'त या काव्याचा जागोजागी उपहास केला आहे; आणि याच्या कर्त्यास 'महाराष्ट्रकवींचे शिरोरत्न', 'अर्वाचीन कविवर', 'वामनास वामनत्व देणारा आणि मयूराचा पिच्छभार उतरणारा एक महाकवी' या उपरोधपूर्ण उपाधी अर्पण केल्या आहेत. परंतु त्यामुळे हे काव्य मागे पडले, असा जो ग्रह आहे, तो मात्र बरोबर नाही. इ. स. १८७२-मध्ये कुंट्यांनी 'मन' हे तात्त्विक काव्य औपरोधिक शैलीने लिहिले. त्यावर चिपळूणरांनी १ ऑगस्ट १८७२-च्या 'ज्ञानप्रकाशा'त व नंतरच्या तीन अंकांत 'Poet turned a philosopher' म्हणजे 'हे कविब्रुव आता तत्त्वज्ञ बनले!' अशी प्रखर टीका केली आहे. त्यापूर्वीही ज्ञानप्रकाशात 'विलायती कवी' म्हणून कोणी तरी कुंट्यांची थट्टा केली

होती.[1] परंतु कुंटे आपल्या टीकांना भीक घालणारे नव्हते. त्यांनी आपल्या टीकाकारांना सडेतोड उत्तर दिले आहे. "An author does not seek to please you only. He seeks to paint an ideal, true, beautiful and just at all times and in all places."

कुंट्यांचे 'राजा शिवाजी' काव्य मागे पडले, याला कारण ते मुळातच अनाकर्षक आहे. शिवाय, कुंट्यांचा विक्षिप्त स्वभाव, निरंकुश वर्तन आणि वृत्तीची आत्यंतिकता याही गोष्टी त्याच्या प्रसाराच्या वाटेत आड आल्या असाव्या. शिवाय, त्या काळचा समाज जुनाट असल्यामुळे त्याला नवीन वाङ्मयाची आवश्यकता नव्हती. त्या काळच्या मानाने कुंटे हे पुढारलेले होते आणि त्या काळाचे मराठी वाचक हे मागासलेले होते. कुंट्यांनी 'राजा शिवाजी' याशिवाय 'मन' हे तात्त्विक काव्य आणि 'राजाराममहाराज' हे 'स्वदेशसुधारणाविषयक' काव्य रचिले आहे. 'ऋषी' व 'फॅमिश्ड व्हिलेज' ही त्यांची इंग्रजी काव्ये आहेत.

कुंट्यांच्या 'राजा शिवाजी' या वीररसप्रधान काव्याविषयी मोती बुलासा म्हणतात[2]: "कुंट्यांच्या प्रयत्नास कदाचित जसे यश यावे तसे आले नसेल. पण म्हणून 'राजा शिवाजी' हे काव्य अगदीच टाकाऊ झाले आहे, असे आम्हांस वाटत नाही. त्याच्या कित्येक भागांत काव्यरस फार चांगला उतरला आहे असे आम्ही स्वानुभवावरून सांगू शकतों." मोती बुलासा यांचा हा अभिप्राय अगदी यथार्थ आहे. कुंट्यांच्या काव्यात इतस्ततः सुंदर व सरस स्थळे आहेत; परंतु ती मुद्दाम धुंडावी लागतात. 'राजा शिवाजी'तील हा शृंगार पाहा. प्रवासात चालूनचालून दमलेल्या सोयराबाईची ही मूर्ती आहे —

दिसे गोड राणी; जरा लाल डोळे । मुखीं घाम आला; किती बिंदु ढाळे!
कपाळीं झळाळा सुशोभा विराजे । शिरा दोन मध्ये उभ्या, मूर्ति साजे.
तो स्नेह डोळ्यांत, मनीं खुशाले । ती कांति भारी भुवयांत डोले;
ते नाक, शेंडा हलतो जरासा । तो रंग त्याचा सुकुमार खासा.
ताजी सकाळीं सुटली हवा कीं । गालीं उठे ती सुरखी लखाखी.
चोळी खुले; सुंदर झोक आतां । तो घाम, तो भांग, सुरेख कांता.

आणि त्या काळाचा हा विनोद पहा. कदाचित तो आज अनुचित ठरेल. बजवय्ये नसल्यामुळे नूरजानी बैठकीस तयार नसते —

'वीणा नसे कीं, तबला नसे कीं । गाऊ कसी आज अरण्यलोकीं'
कोणी उठे उत्तर तीस द्याया । हे तोंड गे सिद्ध मृदंग व्हाया
मी आज एथें धरणार ताल । राजापुढें तूं मग गा खुशाल.

आणि पाश्चात्त्य वाङ्मयाच्या अभ्यासाने सृष्टिसौंदर्यविलोकन व त्याद्वारे मनोविकसन

१. निबंधमाला, पृ. ३४२, ८०५, ९१५.

२. सुविचारसमागम, मे १८९८ व जानेवारी १८९९.



कृष्णशास्त्री राजवाडे

१८२० – १९०१

व मनोरंजन साधण्याची जी नवीन रीती आली, तिचा हा नमुना पहा –

ते गुंफले वृक्ष भयाण मोठे । ती रानझाडी चिकटून खेटे;
फांद्यांत फांद्या अडकून जाती । पाषाण मोठे पडले सभोंतीं.
शंखासुराच्या पिवळ्या फुलांनी । शोभा चढे सुंदर फार रानीं;
तो उग्रसा पिपळ डोंगरांत । घाली मुळ्या खोल, उदास शांत.

आता, 'मन' या काव्यातील विरहिणीच्या मनोव्यथेचे हे शब्दचित्र पहा –

मनांत झुरते किती मज सख्या ! कसा सोडशी ?
उगीच करिशी अहा ! कपट काय आतां मशीं ?
दिलें सकळ मी तुला मन, करूं नको राग हा !
प्रसन्न तुज कीं करूं, 'मनन' हेंच चित्तीं पहा.
सख्या ! मन तुझे खरे, पण नको बसूं या मनीं,
स्वरूप नयनां रुचे निरवितां तुला कामिनी.
मनांत वसशी जसा, कढत लोहसा भासशी.
निवे नयन, शीत तूं, घडण ही तुझी रे ! कशी ?

कुंट्यांची काव्ये रसाळ नसली, आणि त्यात न्यूने असली, तरी त्यांनी आधुनिक मराठी कवितेच्या प्रांतात क्रांतिकार्य केले, हे अमान्य करिता येत नाही. कुंट्यांच्या प्रयत्नांनी पुरातन संस्कृत काव्यविषयक दृष्टी बदलली. आता नवकवी आपले काव्य दैनंदिन भाषेत लिहू लागले आणि तसले निरलंकृत काव्य वाचण्याची वाचकांना आवड उत्पन्न झाली. यापुढे खऱ्या रसिकांना कृत्रिम काव्यबंधापेक्षा स्वाभाविक कवितेचा प्रवाह विशेष प्रिय झाला.

'राजा शिवाजी'च्या अनुकरणाने यापुढे ऐतिहासिक काव्ये रचण्याची एक परंपरा सुरू झाली. या परंपरेपुढे सर वॉल्टर स्कॉटची कथाचातुरी आणि कुंटयांची धावती रचना यांचा आदर्श होता, असे न्यायमूर्ती रानडे यांनी गोविंद वासुदेव कानिटकर यांच्या 'नारायणराव पेशवे – वध' या काव्यावर जो अभिप्राय दिला आहे, त्यावरून वाटते.

This poem is chiefly written after the model which has become popular, since the author of SHIVAJI wrote his work. The metre is simple. There are no ornaments of style and the course of the poem sounds roughly like a mountain-stream. The English model of such pieces is that of the 'Last Minstrel' and 'Marmion' of Sir Walter Scott. His 'Lady of the Lake' is a higher attempt. It is essential for the success of a work written on this model that the descriptions and the incidents related and the characters described should have a great strength of passion and virtue.

कानिटकर, वामन दाजी ओक, खरे यांनी कुंट्यांचेच अनुकरण केले आहे.

पण त्यांपैकी कोणातही प्रसंग, पात्रे व वर्णने यांत भाव आणि काव्यगुण यांचे सामर्थ्य आणण्याची स्कॉटची कला नाही.

**इंग्रजी वळणाची सृष्टिवर्णनात्मक कविता : 'गंगावर्णना'**

गंगावर्णना हे काव्य पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेठकर या अनेकभाषाविशारद अल्पायुषी कवींनी रचिले आहे. 'राजा शिवाजी'प्रमाणे हेही काव्य इंग्रजी वळण समोर ठेवून लिहिले आहे आणि त्याप्रमाणे प्रस्तुत काव्यातदेखील कवित्वापेक्षा रचनेला अधिक महत्त्व दिले आहे. 'राजा शिवाजी' आणि 'गंगावर्णना' हे दोन्ही विषय'दक्षिणा प्रैज कमिटीने जाहीर केले होते. हे या दोघा कवींचे स्वयंस्फूर्त विषय नव्हते.

'राजा शिवाजी'च्या कर्त्यांनी कवितेचे ध्येय राष्ट्रीय पाहिजे आणि ती (कविता) आबालवृद्धांस समजली पाहिजे, हे दोन आदर्श समोर मांडिले आहेत, तर 'गंगावर्णने'च्या कवींनी आपल्या काव्यात सृष्टिवर्णनपर दृष्टीचे महत्त्व वर्णन केले आहे. दोन्ही विषय इंग्रजीतून मराठीत आले आहेत. मात्र 'गंगावर्णने'त 'राजा शिवाजी'तील आग्रहीपणा नसल्यामुळे ती विशेष मनोहर उतरली आहे.

'गंगावर्णने'त गंगेच्या उगमाचे, तिच्या परिसरातील पवित्र तीर्थांचे, जुन्या समृद्ध व संपन्न नगरांचे आणि तिच्या काठी जी सृष्टिशोभा दृष्टीस पडते, तिचे मनोरम वर्णन आहे. कवींनी या काव्यात गंगेपासून होणाऱ्या पारलौकिक सुखाचा विचार केवळ नाममात्र केला असून तिच्यापासून मिळणाऱ्या ऐहिक सुखांचा विचार विस्ताराने केला आहे. या काव्याची रचना करिताना चिंतामणिपेठकरांनी काही नियमांचा बुद्धिपुरस्सर अवलंब केला आहे. त्यातले काही नियम त्यांनी इंग्रजी ग्रंथांतून घेतले आहेत. एका श्लोकात एक विचार मांडताना कित्येकदा पद्यात निरर्थक पादपूरक भर घालावी लागते, तर कित्येकदा आवश्यक भाग निरुपायाने गाळावा लागतो. चिंतामणिपेठकरांनी प्रत्येक विचारास जेवढा अवसर आवश्यक असेल, तेवढा दिला आहे. काव्यात अगदी ठळकठळक अलंकार गोविले आहेत. त्यात उगाच सटरफटर अलंकारांची खोगीरभरती केली नाही. या काव्यात अतिशयित व अस्खलित वक्तृत्व आहे. त्यास पोषक म्हणून या काव्यात जागजागी प्रश्न, चेतनारोप, विरुद्ध-गुणन्यास इत्यादी अलंकार गुंफण्यात आले आहेत. कवींना वृत्त व यमकबंध नापसंत होते. परंतु आपण प्रथमच लेखन करीत आहो, अशा भावनेने त्यांनी यमकांचा स्वीकार केला आहे. एवढ्या मोठ्या काव्यात एकच-एक वृत्त कंटाळवाणे होईल, म्हणून चिंतामणिपेठकरांनी वृत्तवैचित्र्याचा अवलंब केला आहे. कठीण आणि अपरिचित शब्दांचे अर्थ व पौराणिक आणि ऐतिहासिक दंतकथा यांचे संदर्भ रसास्वादात अडचण निर्माण करितात, म्हणून शक्य-तो ते आणिले नाहीत.

उपर्युक्त धोरणे सांभाळल्यामुळे 'गंगावर्णना' पुष्कळ प्रमाणात इंग्रजी कवितेच्या वळणावर गेली आहे. शार्दूलविक्रीडितासारख्या धीरगंभीर व पल्लेदार अक्षरगण-वृत्ताचा बहुतेक आश्रय केल्यामुळे गंगेच्या भव्य व वेगवान ओघाप्रमाणेच

'गंगावर्णने'तील कविवाणी उदात्त व ओजस्वी झाली आहे. 'गंगावर्णने'त जागजागी सृष्टिशोभेची आल्हादक चित्रे रेखाटण्यात आली आहेत. चिंतामणिपेठकरांची प्रतिभा उज्ज्वल, विचार प्रगल्भ आणि भाषा ओजोगुणयुक्त असून सुसंस्कृत व परिष्कृत आहे. प्रस्तुत काव्यात क्वचित प्रदीर्घ समास आहेत आणि क्वचित अतिरिक्त राजनिष्ठा आहे. परंतु हे दोष उपेक्षणीय आहेत. 'गंगावर्णना' हे काव्य आहे, तेव्हा त्यात इतिहासाच्या सत्यासत्याचा बिनचूक पडताळा नको, असा यासंबंधी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा अभिप्राय आहे.[1] या काव्यात एकूण ३३२ श्लोक असून ते सर्व प्रसादपूर्ण आहेत. शिवाय श्लेषाकडे दुर्लक्ष केले असून सारा भर वर्णनांवर दिला आहे. मात्र हुगळी नदीत कमळे फुलत असल्याचा उल्लेख हास्यास्पद आहे. तथापि त्या ठिकाणची कल्पना रमणीय आहे —

भगवति, उतरूनी त्वज्जलौघीं स्त्रियांनीं –
मणिमय वलयांनी भूषिलेल्या करांनीं,
पुढतिं पद रिघाया सारितां बाजुला, जीं –
बुडति विकचपत्रे वारिजें वारिमाजी,
बघुनि मज गमे, ती तन्मुखश्री बघून
विहतमद रहाती मान खालीं करून.

इ. स. १८५७-मध्ये कानपुरात बंडाचा डोंब उसळला. त्यात सुक्याबरोबर ओलेही जळाले, हे पुढे सांगितले आहे —

बा रे कानपुरा ! जनप्रमुख जे त्या निंद्य कर्मांतले,
सारेही निज दुष्कृतोचित अशा शिक्षा जरी पावले,
तत्रापी किति लोक उत्तम कुळा, निर्दोषबुद्धी, भले,
सर्वस्वीं निजवित्तजीवितधना न्यायाविना नाडले.
  राज्यप्राप्तिमदांध होउनि महादुर्बुद्धिने ज्या कृती
  केल्या, निष्ठुर त्या कलंक सगळ्या देशासही लाविती.
  शस्त्राने निज शत्रुच्याही अबलाबालादिकां मारणें
  राहे फारचि दूषणास्पद महाशूरां जनांकारणें.

चिंतामणिपेठकरांच्या या रचनेवरून, भाषेवर प्रभुत्व असेल, तर अक्षरगण-वृत्तातसुद्धा पाहिजे तेवढा सविस्तर विचार मांडता येतो, हे सिद्ध होते.

### कीर्तिकरांची 'इंदिरा'

प्रधानांप्रमाणे कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनी दुसऱ्या एका खंडकाव्याला मराठी रूप दिले आहे. परंतु प्रधानांचे काव्य ऐतिहासिक असून ते स्कॉटसारख्या पूर्वयुगीन लेखकाचे आहे, तर कीर्तिकरांचे काव्य सामाजिक असून ते लॉर्ड

१. निबंधमाला, पृ. ६३८.

टेनिसनसारख्या समकालीन कवीचे आहे. कीर्तिकरांचे 'इंदिरा' हे काव्य टेनिसनच्या 'प्रिन्सेस'ची अनुकृती आहे. त्यात व्हिक्टोरिया राणीच्या युगातल्या स्त्रीपुरुष-समताविषयक सामाजिक चळवळींचे पडसाद उमटले आहेत. या काव्याची नायिका इंदिरा 'सफ्रेजिट' आहे. स्त्रियांना अधिकार हवेत, पुरुष त्यांचे प्रतिस्पर्धी आहेत, असे तिला वाटते. ती एक राजकन्या आहे; राजाने योजिलेल्या वराशी ती विवाह करीत नाही. उलट, राजापासून एक नगर घेऊन तेथे ती स्त्रीराज्य स्थापन करिते. पुढे तिचा नियोजित वर आपल्या दोघा मित्रांसह स्त्रीवेष घेऊन तेथे प्रवेश करितो. कारण तेथे पुरुषांना मज्जाव असतो. तो एका प्रसंगी तिचे प्राण वाचवितो. दुसऱ्या प्रसंगी तिच्यासाठी द्वंद्वयुद्ध करितो. तेव्हा ती मोहित होऊन त्याच्याशी विवाहबद्ध होते आणि मग तिचा पुरुषविद्वेष नष्ट होतो. या कथेतील वेषान्तराचा चमत्कारिक भाग वगळल्यास बाकीची कथा वास्तव आहे.

मूळ प्रकीर्णकात (Medley) एकूण सात भाग आहेत, आणि त्यांना 'संकेत', 'संलग्न' इत्यादी नावे दिली आहेत. त्याच प्रकाराचा स्वीकार कीर्तिकरांनी केला आहे. मूळ काव्यात पार्श्वभूमी जुन्या पुराणकथेची आहे; परंतु विषय मात्र प्रचलित युगातला रंगविला आहे. तीच तऱ्हा मराठीत आहे. मुळात प्रत्येक भागाच्या आरंभी एक गीत आहे. 'As through the land at eve we went', 'Sweet and low; sweet and low, wind of western sea', 'Tears, idle tears, I know not what they mean', 'Home they brought her warrior dead' इत्यादी टेनिसनची सुरेल शब्दसंगीतके इंग्रजी साहित्यात सर्वश्रुत आहेत. कीर्तिकरांनी केवळ 'O Swallow, Swallow, flying flying south' याच गीताचे 'दक्षिणेशिं उडुनि जाइं झडकरि गे कोकिले' हे भाषांतर केले आहे. इकडील लोकाचारास सन्मार्गाचे वळण लागावे, या हेतूने कीर्तिकारांनी हे काव्य लिहिले आहे. ते लिहिताना त्यांनी भारतीय आचारविचार, रीतीभाती आणि व्यवहारसंप्रदाय लक्षात घेऊन मूळ प्रकीर्णकात योग्य ते फेरबदल केले आहेत आणि मग स्वतंत्र रीतीने लेखन केले आहे.

मूळ कथा टेनिसनने १८०६ ते १८३६ या कालावधीत रचिली आहे, असे 'सती' व 'कृष्णाकुमारी' यांच्या नावांच्या अंतःप्रमाणावरून म्हणता येते. कीर्तिकरांनी तिच्या मराठी अनुकृतीत अव्वल इंग्रजीतील सामाजिक सुधारणेची चळवळ लक्षात घेऊन स्त्रियांचे सहगमन, वैधव्य, केशवपन, पुरुषांचे अनेकपत्नीत्व, वेश्यागमन, उपस्त्रिया, स्त्रियांचे पुरुषदास्य इत्यादी स्त्रीवरील अन्यायांचा आपल्या काव्यात निर्देश केला आहे —

कशा बाला, प्रौढा विगतधव होतांच युवती
अम्हां हिंदू लोकीं अखिल अपुलें आयु मुकती !
सती बोलोनी स्त्रीदहन करिती, निष्ठुर किती !

स्त्रिया सोसूनी ही भयकर दशा ‘ हाय ’ वदती.
शरीरा, सौंदर्या वपनविधि विच्छिन्न करतो
पती जातां पत्नी-भवसुख सदा सर्व हरितो;
भ्रताराचा केशाप्रति कवण संबंध न कळे !
किती क्रूरा दृष्टी ! पुरुषमन तें ना हळहळे !

त्याचप्रमाणे आदर्श स्त्रिया म्हणून रुक्मिणी, द्रौपदी, पार्वती, मुक्ताबाई, जनाबाई, मीरा इत्यादींचा आदरपूर्ण उल्लेख केला आहे.

इंदिरेची कथा सांगताना कीर्तिकरांनी मुळातले काही विचार जसेच्या-तसेच ठेविले आहेत; आणि काही विचार स्वतःच्या पदरचे घातले आहेत. असे करिताना त्यांनी आपल्याकडील सामाजिक परिस्थिती लक्षात घेतली आहे. उदाहरणार्थ, मूळ इंग्रजीत मातेचा मुलाविषयीचा जिव्हाळा पुढील शब्दांत सांगितला आहे —

O children – there is nothing upon earth
More miserable than she that has a son
And sees him err.

त्याचे मराठी भाषांतर असे आहे —

किती बालकें होतिं हीं दुःखकारी । दुराचार त्या लागतां दुर्विकारी
कसा आइचा होइ तै आसभंग । कसे विंधते तै तिचे अंतरंग.

उलट, मुळात नसलेला वधूसंशोधनासंबंधीचा हा स्वतंत्र विचार पहा —

जया जैशी व्हावी, मनमिळतशी शोधुनि तयें
वरावी हो भार्या, तरिच जुगतीं दोन हृदये.

स्त्री आणि पुरुष ही दोघेही परस्परावलंबी आहेत; त्या दोघांस समसमानत्व आले म्हणजे संसारसुख प्राप्त होईल, असे या काव्याचे सार राजकवी टेनिसनने सांगितले आहे.[1] त्याचा मराठी अनुवाद कीर्तिकरांनी पुढीलप्रमाणे केला आहे—

सम-विषम गृहीं ते पाहिजे हो कशाला ?
सम-सम नरनारी कां न तीं आपणांला –
समजुनि मनिं देती साह्य ते एकमेकां

---

1. The woman's cause is man's; They rise or sink
Together, dwarf'd or godlike, bond or free;
If she be small, slight-natured, miserable,
How shall men grow? but work no more alone!
..............Let her make herself her own
To give or keep, to live and learn and be
All that not harms distinctive womanhood.
For woman is not undevelopt man,
But diverse: could we make her as the man,
Sweet Love were slain: his dearest bond is this,
Not like to like, but like in difference.

कधिं मग गृहिं तेणें नाहिं येणार धोका.
नरांच्या गे ! नारी जगतिं असती मैत्रिण सती;
नरांनारीलागीं अखिल भुवनीं एकचि गती.
बसावें सांगातें दिनरजनि त्यांहीं समसमां,
अगे ! या देहाचा मज दिसतसे हाच महिमा.
परस्पर जयीं द्वये निज समागमे स्त्रीनर
बघोनि गुणदोष तीं करतिल स्वरूपान्तर
स्त्रिया प्रबल अंशतः, नर मनीं तसे कोमल,
तसेंच समयीं जगीं सफल आयु ते होइल !
विद्या संपादावी, परि गृहकृत्यांप्रती न त्यागावें;
संसारीं निज भर्त्या सुख संतत होइ तेवि वागावें.

कीर्तिकरांच्या निवेदनात टेनिसनच्या निवेदनातले कलासौंदर्य किंवा आकर्षण नाही. त्यांच्या अनुकरणात मुळातले वागर्थविलसन नष्ट झाले आहे. कथेत कित्येकदा विसंगती, संदर्भविच्छेद, पुनरुक्ती आणि क्लिष्ट शब्दयोजना यांचाही संचार झाला आहे. उच्चारानुसारी लेखन करण्यात आणि गावठी शब्दप्रयोग करण्यात कीर्तिकरांनी कुत्स्यांच्या दोषांचे अनुकरण केले आहे. वामन दाजी ओक यांनी मुंबईत राहिल्याने कीर्तिकरांची भाषा शुद्ध नाही, असे म्हटले आहे. कीर्तिकरांनाही या दोषाची जाणीव होती. कारण त्यांनी एका ठिकाणी " It is the Marathi of patane prabhu " ( पाताणे प्रभु ) असे विनम्र उद्गार काढिले आहेत.[1]

कीर्तिकरांना संगीताची आवड होती. त्यांनी आपल्या गीतांना चाली योजिल्या आहेत. प्रार्थनासमाजासाठी त्यांनी 'भक्तिसुधा' रचिली आहे. तिच्यातली प्रार्थनागीतेही चालीवर आहेत. 'इंदिरे'त त्यांनी कळत-नकळत 'स, य, स, य.' हे गण असलेले बारा अक्षरांचे एक नवेच अक्षरगणवृत्त 'इंदिरा' हे नामकरण करून घातले आहे. 'मणिबंध' वृत्ताला त्यांनी असेच अजाणतेपणाने 'जाती'चे रूप दिले आहे.

कीर्तिकरांचा वाङ्मयव्यासंग दांडगा होता. दोनदा विलायतचा प्रवास घडल्यामुळे सामाजिक सुधारणेसंबंधीची त्यांची मते उदार बनली होती आणि दृष्टी व्यापक झाली होती. अनुकृतीकरिता त्या काळी विद्यमान असणाऱ्या टेनिसनच्या प्रचलित विषयावरील प्रिन्सेस या काव्याची निवड करण्यात त्यांचे औचित्य व पुरोगामित्व प्रकट होते. स्वतःचे भाव वाचकांच्या अंतःकरणापर्यंत पोहोचविण्यास त्यांची वाणी समर्थ होती.

**'विलापलहरी'**

कीर्तिकरांनी आपल्या दिवंगत पत्नी सोनाबाई-यांच्या निधनावर 'विलापलहरी' ही दीडशे श्लोकांची व बावीस पद्यांची विलापिका रचली आहे. कीर्तिकरांच्या

१. विविधज्ञानविस्तार, डिसेंबर, १९१७.

आयुष्याची चौदा वर्षे या प्रेमळ पत्नीच्या सहवासात व्यतीत झाली होती. तिचा अकाली वियोग घडल्यामुळे त्यांच्या व्यथित अंतःकरणात ज्या विलापलहरी उठल्या, त्या त्यांनी या काव्यात गोविल्या आहेत. मात्र कविता रचताना छंदःशास्त्र व शब्दघटनानियम यांच्याकडे क्वचित दुर्लक्ष केले आहे. या विलापलहरीत कोठे पत्नीच्या रूपाचे, कोठे तिच्या गुणांचे, कोठे तिच्या वर्तनाचे व कोठे तिच्या शालीन स्वभावाचे स्मरण आहे:

नाहीं गे ! दिधली तुला निजकरे सप्रेम तीलांजली;
रात्रंदीन रडें, परी न सरली ही वृष्टि नेत्रांतली.
नाहीं ओदन, पिष्ट, पिंड दिधले, केलें न वा तर्पण
सारा देह तुलाच पिंड म्हणुनी केला न का अर्पण

या स्मृतितरंगात कीर्तिकरांतला कवी आहे, तर पुढील स्मृतितरंगात त्यांच्यातल्या तत्त्वज्ञ दृष्टीस पडतो —

कोणेही परि हो बरी, जशि तशी इच्छीत होते मन
हातीं संजिवनीं जरी असति या, देतों तुला जीवन;
आहों मानव दीन दुर्बळ परी, जातां न लागे क्षण !
शिंपोनी स्वदयामृता प्रभुवरे केलें न कां रक्षण ?

परंतु 'भक्तिसुधा' व 'विलापलहरी' यांपेक्षा कीर्तिकरांची कीर्ती 'इंदिरे'वर अवलंबून आहे.

**'कुसुमांजलि'**

प्रधान आणि कीर्तिकर यांनी रूपांतराकरिता इंग्रजी खंडकाव्याची निवड केली, तर विष्णू मोरेश्वर महाजनि[1] यांनी त्याकरिता इंग्रजी वाङ्मयातील स्फुट स्वरूपाच्या

[1] विष्णू मोरेश्वर महाजनि (१८५१–१९२३) पुणे येथे जन्म. १८७३ साली एम्. ए; शिक्षणखात्यात नोकरी. डायरेक्टर ऑफ एज्युकेशनच्या जागेपर्यंत बढती; १९०१ साली निवृत्त. १९०७ साली पुणे येथे भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष. कवी, ग्रंथसमीक्षक, भाषांतरकार, निबंधलेखक. वाङ्मय— (१) मोहविलासित, नाटक, (शेक्सपिअरकृत 'विंटर्स टेल'च्या आधारे) १८८१, (२) वल्लभानुनय, नाटक, (शेक्सपिअरकृत 'ऑल् इज् वेल् दॅट् एण्ड्ज् वेल'च्या आधारे.) १८८७, (३) तारा नाटक (शेक्सपिअरच्या 'सिंबेलाइन्'च्या आधारे) १८८८, (४) कुसुमांजलि, काव्य (इंग्रजी काव्याच्या आधारे), १८८५, (५) स्वतःचा प्रयत्न, प्रकार १. (स्माइल्सकृत 'सेल्फ हेल्प'च्या पहिल्या भागाच्या आधारे.) आ. ३,—१८८५, (६) बंगाल्यांतील जमीनदारी वहिवाट. (हिंदुस्थानातील जमिनीच्या वहितीचे व सारा वसूल करण्याचे प्रकार, पु० १ लें) १८९६, (७) रामायणकालीन लोकस्थिति, १९००, (८) ग्रंथसंग्रहालयें (मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, वार्षिक समारंभाच्या वेळचे व्याख्यान.) १९०७; लेखनाशिवाय स्वतंत्रपणे व श्री. भि. जठार यांच्या सहकार्याने अनुक्रमे, 'वऱ्हाड शाळापत्रक' व 'ज्ञानसंग्रह' या मासिकांचे संपादन.

भावगीतांची (Lyrics) निवड केली. त्यांच्या अगोदर महादेवशास्त्री कोल्हटकरांनी काही इंग्रजी स्फुट कवितांची भाषांतरे केली होती. परंतु ती स्वयंस्फूर्त नव्हती; ती शिक्षणखात्याच्या आदेशाने तयार करण्यात आली होती. महाजनींच्या रूपांतरांची गोष्ट वेगळी होती. ती इंग्रजी आणि मराठी भाषांवरील प्रेमातून उत्पन्न झाली होती. त्यांच्या निर्मितीमागे महाजनींची अंतःप्रेरणा होती. दिवसानुदिवस काळ बदलत आहे, मराठीत नाटक-कथा-कादंबऱ्या फोफावत आहेत, गद्याची चलती आहे, हे महाजनींनी ओळखले असावे; म्हणूनच त्यांनी ब्लेक, स्कॉट, बर्न्स, वर्ड्स्वर्थ, कोलरिज्, बायरन, शेली आणि कीट्स या स्वच्छंदवादी (Romantic) कवींच्या आणि टेनिसन, ब्राउनिंग आणि लॉंगफेलो या व्हिक्टोरियाच्या युगातल्या कवींच्या वेचक कवितांना मराठी रूप देण्याचा सफल प्रयत्न केला. यांपैकी लॉंगफेलो हा कवी अमेरिकन होता. महाजनि आणि त्यांचे समसामयिक कविमित्र यांच्या प्रयत्नांत थोडासा फरक आहे. तो असा की, त्यांच्या समसामयिकांनी मराठी कवितेला केवळ इंग्रजी वळण लावण्याचा प्रयत्न केला; परंतु महाजनींनी त्याबरोबरच तिला इंग्रजी धर्तीवर नेण्याची पराकाष्ठा केली. महाजनींनी रूपांतरांकरिता जे वेचे निवडिले, त्यांची मांडणी, रचना, त्यांचे विषय, त्यांच्यातले विचार हे अगदीच वेगळे आहेत. त्यांच्या पश्चात ज्या कवींची पिढी उदयास आली, तिने तो आदर्श पुढे ठेवून कविता-लेखन केले आहे. त्यामुळे त्यापुढे मराठी कवितेचे स्वरूप पूर्णतया पालटलेले दिसते.

महाजनींनी जवळजवळ एकेचाळीस इंग्रजी स्फुट कवितांची रूपांतरे केली असून ती १८८३-च्या सुरुवातीपासून १८८५-च्या अखेरपर्यंत विविधज्ञानविस्तारात आली आहेत. नंतर ती ' कुसुमांजलि ' या नावाने प्रसिद्ध झाली आहेत.

' कुसुमांजली'त इंग्रजी सारस्वतातील बहुतेक सुप्रसिद्ध कवितांचा समावेश झाला आहे. त्या कवितांचे वेचे वेचण्यात महाजनींची रसज्ञता आणि रूपांतरे करण्यात त्यांची मर्मज्ञता प्रत्ययास येते. महाजनींचे रूपांतर करण्याचे कौशल्य अद्वितीय होते. त्यांची सारीच रचना प्रगल्भ व हृदयंगम आहे. कुसुमांजलीच्या प्रास्ताविकात ते म्हणतात, ' हीं कुसुमे आपल्याकडच्या कुसुमांहून भिन्न आहेत. त्यांचे रूप निराळें, रंग निराळा, सौगन्ध्यही निराळे. तेव्हां तीं आपल्या मधुकरांस प्रिय होतील कीं नाहीं, याचा संशय आहे. " पुढे ते विनयाने म्हणतात, " तरूवर असतांना जे सौंदर्य व सौगन्ध्य कुसुमांत होतें, ते तीं तोडल्यावर प्रतिकृतींत राहणार आहे हे थोडेंच ? त्यांत मधुबिंदु नच मिळाल्यास अनाघ्रात पुष्पें हुंगावयास सांपडलीं, एवढ्यावरच त्यांनीं समाधान मानून घेतलें पाहिजे. " परंतु महाजनींच्या प्रतिकृतीत मूळ इंग्रजी कवितांतील भावार्थास जरादेखील धक्का लागलेला नाही, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

महाजनींनी आपल्या रूपांतरित कवितांवर त्या कवितांच्या भूमिका विशद केल्या आहेत. त्यांत त्यांचे कलाप्रेम व कलाचातुर्य व्यक्त झाले आहे. त्यांनी टॉमस मूरच्या The Last Rose of Summer-चे ' माधवीचें पुष्प ' असें रूपांतर केले

आहे. ते रूपांतर वाटत नाही, तर मौलिक काव्यच वाटते —

So soon may I follow when friendships decay,
And from Love's shining circle the Gems drop away.
When true hearts lie wither'd, And fond ones are flown,
Oh ! Who would inhabit this bleak world alone ?

याचे मराठी रूपांतर असे आहे —

असा होवो मद्विलय, जधीं होते । क्षीण मित्रत्व, प्रेम लया जाते,
शिथिल होतीं जै प्रणयबंधनें तीं । सकल मित्रां यमदूत जयीं नेती,
खऱ्या प्रेमाचें स्थान सखे जातां । पिता, भ्राता, सुत, दार तशी माता
रहायाला इच्छील कोण मागें । शून्य ऐशा या जगीं मला सांगे !

महाजनींनी या रूपांतरात आपल्याकडील परिस्थितीस शोभतील, असे चतुर फेरबदल केले आहेत.

## महाजनींची काव्यात्मता

महाजनींची काव्यात्मता आणि सूक्ष्म सौदर्यदृष्टी, त्यांनी कवितांना ज्या टीपा दिल्या आहेत, त्यांवरून दिसून येते. आधुनिक कवितेतील इंग्रजी पद्धतीच्या प्रणयाचे प्रवर्तन त्यांनीच केले, याची साक्ष द्यावयास The Solitary Reaper म्हणजे ‘ भिल्लकन्या ’, To a Lady म्हणजे ‘ सुंदरी ’ आणि Ye Banks and Braes O' bonnie Doon म्हणजे ‘ युवतीचा पश्चात्ताप ’ या तीन कविता पुरे होतील. ‘ सुंदरी ’ या कवितेची भूमिका ते पुढील शब्दांत विशद करतात — “ एक तरुण पुरुष आपल्या प्रियेबरोबर समुद्रतीरीं मध्यरात्रीं विहार करीत असतां त्याचें हे तिला उद्देशून भाषण आहे. आमच्या हौशी वाचकास ‘ ब्याक-बे’( Back-Bay )-वरचा असा एखादा प्रसंग आठवत असेलच. ” ‘ युवतीचा पश्चात्ताप ’ या बर्न्सच्या कवितेवर ते अशी टीप देतात— “ हा लहानसा चुटका स्कॉट्लंड देशाच्या कवीचा आहे. या कवीची व्यंजना फार बहारीची असते. तिचा हा एक मासला आहे. कोणी एक सात्त्विकवृत्ति अबला पुरुषाच्या वचनास भुलून फसली असता प्रियाबरोबर पूर्वी केलेले विहार स्मरून त्यांतील एका गोष्टीचा येथे उल्लेख ती करते. तिने एके दिवशी केशपाशांत घालण्याकरितां गुलाबाचे पुष्प तोडले, तों ते तिच्या प्रियानें हिसकून नेले आणि तिच्या हातांत कांटा मात्र राहिला ! भावी प्रणयलोप आणि पश्चात्ताप या गोष्टीने सुचविला आहे ”—

स्मरते दिन धन्य ते अतां प्रिय खोटा कळला न जोंवरी
फसले प्रियभाषणीं रता ! वनिता सात्त्विक वृत्ति हो खरी.
विहगा ! न सखी समेत रे ! विटपारूढ विहार तू करीं,
बघुनी विहृती तुझी स्मरे निज केली सखयाबरोबरी.
मग मीं खुडिले गुलाबफूल कबरीपाश सलील भूषवाया,
हिसके प्रिय तों करे दुकूल, सुमनें; कंटक मात्र ये करीं या !

महाजनींचे हे रूपांतर बेमालूम आहे. टीपेत ते म्हणतात — ' हीं अर्धसमवृत्तें होत. यांचे प्रास एकांतर साधले आहेत.' तेव्हा या पद्धतीचा पायंडा महाजनींनी पाडला, हे उघड आहे. जिला आता ' बालानंद ' जाती म्हणतात, तीदेखील प्रथम महाजनींनी योजिली आहे. त्यांच्या ' मृगया ' या कवितेतील ' मृगया करूं या चला चला ! आला रवि हा उदयाला ' या ओळी त्याच जातीत आहेत.

### इतर कवी

महाजनींनी वीणाकाव्यलेखनाचा श्रीगणेशा केल्यावर पद्मनाभ, भांडारे, समर्थ, दंडी, कृ. ल. पा., मोडक, टुल्लु, गोळवेलकर, देवधर, भवाळकर, मल्हार खंडेराव चिटणीस इत्यादिकांनी तोच मार्ग चोखाळला. या सुमारास ' वन थाऊजंड अँड वन जेम्स ऑफ पोएट्री ', ' गोल्डन ट्रेझरी ', ' चॉइस वर्क्स ऑफ पोएट्स ' इत्यादी कवितासंग्रह नवशिक्षितांत प्रसार पावले होते. तेव्हा त्यांच्यातील वेच्यांची रूपांतरे क्रमप्राप्त होती. हरि माधव पंडित हे निबंधकार व सणसणीत समीक्षक म्हणून प्रसिद्ध आहेत, त्यांनीदेखील या लाटेत I see thee, dearest, in my dream या गीताचा अनुवाद केला आहे.

...गेलिस दूर जरी, सखये । अससि सदोदित दृष्टिसमोरी
स्वप्नामाजी रात्रीं दिसशी । दिनभरिं चित्तीं घोळत असशी,
सखि तव मूर्ती सुंदर ऐशी । कोंदे अभ्यंतरीं ...इत्यादी.

### इंग्रजी धर्तीवरची पहिली भावगीते : ' गोविंदगीत '

महाजनींनी इंग्रजीतील वीणाकाव्ये ( Lyrics ) मराठीत आणिली असली, तरी ती बहुतेक वृत्तबद्ध आहेत. त्यांच्याप्रमाणे गोविंद वासुदेव कानिटकर [1] यांनी मूर, हेमन्स, शेली, तोरू दत्त इत्यादिकांची गीते भाषांतरित केली आहेत; त्यांना त्या काळी प्रचलित असलेल्या नाटकांच्या पदांच्या चाली दिल्या आहेत. त्यामुळे ती गेय झाली आहेत. कानिटकरांचे शब्द आहेत आणि चालींचे सूर आहेत. मात्र ही भावगीते स्वतःसंबंधी व स्वयंस्फूर्त नसल्यामुळे त्यांच्यात उत्कटता नाही. मासला म्हणून The Young May Moon is Beaming Love या टॉमस मूरच्या

१. गोविंद वासुदेव कानिटकर ( १८५४–१९१८ ); पुणे, मुंबई. कायद्याचे अभ्यासी. तत्त्वज्ञान ( वेदान्त ), वाङ्मय, कला ( चित्र, गान ) यांचेही ज्ञान; प्रथम यांनी वकिली केली; पुढे मुन्सफ झाले. यांचे बहुतेक लेखन काव्यस्वरूपाचे आहे. अजविलाप ( ना. बा. कानिटकर यांस साहाय्य, १८७२ ), सुशिक्षित स्त्रीचरित्र ( १८७२ ), देवास अर्जी ( 'संमोहलहरी'चे मूळ १८७२ ), हिमालयवर्णन (१८७५), श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध ( १८७८ ), अकबर बादशाहा ( १८७९ ), संमोहलहरी ( १९०० ), गीतांजलीचे गद्यात्मक रूपांतर ( १९१७ ). याशिवाय, ' वीरसेन ' ( हॅम्लेट ), स्त्रियांची परवशता ( Subjection of Women, मिल, १९०२ ) ही भाषांतरे. ' कविकूजन ' ( स्फुट कविता, १९३३ ).

कवितेचे ' वासन्तिक बालचंद्र ' हे पद्यात्मक रूपांतर लक्षणीय आहे. या रूपांतराला त्यांनी ' वैशाखमासिं वासंतिक समय ' ही ' सौभद्रा'तील चाल योजिली आहे —

हा बालचंद्र शीतांशुक उदय पावला,
निद्रावश जनसमूह सकल जाहला
मम नेत्रतारकाचि तूं न उठशि गे ! जरी
समजेल तोही शुक्र तुजसि आपुली तरी
वनराजिमार्जि करुं विहार वाटते मला. "

**' संमोहलहरी '**

कानिटकरांनी विद्यार्थिदशेत वयाच्या एकोणिसाव्या वर्षी केकावलीच्या धर्तीवर पृथ्वीवृत्तात १२१ श्लोकांचे एक काव्य ' देवास अर्जी ' या नावाने ' विविधज्ञान-विस्तारा'त क्रमशः प्रसिद्ध केले होते. पुढे त्यांनी ' संमोहलहरी ' या नावाने त्याची दुसरी आवृत्ती काढली. परंतु या दोहोंत इतका फरक पडला आहे की, मुळाची ओळख पटत नाही. हा फरक पडण्याचे कारण कानिटकरांचे वाढते वय, विचारपद्धती, विद्याव्यासंग व विस्तृत वाचन होय. ' संमोहलहरी ' हे पाश्चात्त्य पद्धतीने लिहिलेले मराठीतले पहिले चिंतनपर काव्य होय. या काव्यावर Tennyson, J. S. Mill, Herbert Spencer, Edwin Arnold इत्यादिकांच्या चिंतनाची छाया पडली आहे. कानिटकर स्वतः या काव्यासंबंधी सांगतात की, त्यांना हे काव्य रचण्याची स्फूर्ति ' केकावली ' वाचून झाली. मूळ ' देवास अर्जी ' या काव्यातले दोष लक्षात आल्यावर त्यांनी त्यात फेरफार केले, परंतु मूळ पाया कायम ठेविला आहे. ते म्हणतात, " हे काव्य म्हणजे सृष्टि, ईश्वर, धर्म, परलोक, नीति, कर्तव्य इत्यादि विषयांच्या संबंधाने माझ्या मनांत नेहमीं घोळत राहणारे जे विचार व ज्या कल्पना त्यांचा आदर्श होय. माझ्या संमोहाच्या लहरी, गोंधळलेल्या मनांतील संशय, कल्पनाजाल व विचारतरंग निर्भयपणे, परंतु साध्या, विनयप्रचुर प्रतिष्ठित शब्दांनीं मीं ह्यांत मांडिले आहेत. " A murmer of gnats in the gloom या टेनिसनच्या उक्तीचा अनुवाद करून कानिटकरांनी आपल्या चिंतनास ' अंधारांत घुटमळणाऱ्या मच्छराची पिरपीर ' असे म्हटले आहे. कानिटकरांचे हे चिंतन-काव्य, त्यातील नवीन व उदात्त विचारसरणी, प्रौढ भाषा आणि प्रगल्भ रचना या दृष्टींनी अपूर्व आहे —

कळो भुवन गूढ हें म्हणुनि पाहिलीं दर्शनें,
तशीं विविध पुस्तके बहुत वाचिलीं भक्तिनें,
परंतु हृदयास या लव न शांतता लाभली–
पदीं रुदन मी करीं तव रचून पद्यावली !
रची ' लहरि ' मूढ मी बुडुनि संशयाच्या तमीं
हताश करुणस्वरे रडतसे अरण्यांत मी

### कानिटकरांची कथाकाव्ये

'संमोहलहरी'नंतर 'राजा शिवाजी'च्या धाटणीवर कानिटकरांनी 'नारायणरावाचा वध', 'अकबर' व 'कृष्णाकुमारी' ही तीन ऐतिहासिक खंडकाव्ये रचिली, त्यांत त्यांनी

मला शारदे ! सांग तो कोण होता
मुसल्मान राजा जनां सौख्यदाता
जयाची असे कीर्ति या देशिं फार
जया मान देती तसा लोक थोर.

अशा प्रकारे 'राजा शिवाजी'चे अनुकरण केले असले, तरी त्यातील दोषांना टाळा दिला आहे. ही तिन्ही ऐतिहासिक काव्ये स्कॉटच्या काव्याच्या नमुन्यावर असून त्यांतील स्थलवर्णने हुबेहूब व जिवंत आहेत. मात्र पात्रांच्या अंतरंगाचे चित्र कानिटकरांना तितकेसे साधत नाही. 'अकबर' काव्यात या जगन्नाथपंडिताला 'लवंगी' दिसते, त्या वेळचे हे शब्दचित्र व भावचित्र पहा :

असेल वनदेवता उपवनास राखावया !
कदाचित सुरांगना भुवन येइ देखावया !
उगीच अथवा मला मनिंच भास हा होतसे ?
न कांहिं अनुमान ते समयि या मला होतसे.
दिसे वयहि कोवळें अजुनि लग्न झालें नसे
हिच्या वसन नेसण्यावरुनि वाटते हे असे;
असंशय हिला करी मदनबाण फार व्यथा,
मनोहर तरी कसे वदन खिन्न जें सर्वथा !

कानिटकर हे जसे साहित्याचे, तसेच संगीताचे व चित्राचे उपासक होते. ते आघाडीवरचे सुधारक होते. 'द सब्जेक्शन ऑफ वुइमेन' या मिल्च्या ग्रंथाच्या आधारे त्यांनी 'स्त्रियांची परवशता' हा ग्रंथ रचिला आहे. आयुष्याच्या अखेरीस त्यांनी रवींद्रांच्या 'गीतांजली'चे गद्य भाषांतर केले आणि तिच्यातील गीतांच्या धर्तीवर काही गूढगीतें रचिली. पण ती सरस अथवा सुंदर नाहीत.

### ऐतिहासिक कथाकाव्ये

कुंट्यांचे 'राजा शिवाजी' हे काव्य बाहेर पडल्यापासून ऐतिहासिक काव्ये रचण्याची एक मोठी लाट उसळली होती. ग्रँट डफकृत 'मराठ्यांचा इतिहास' आणि टॉडकृत 'ॲनल्ज ऑफ राजस्थान' या ग्रंथांच्या आधारे अनेक कवी आपली काव्ये सजवीत होते. परंतु ठराविक साचा, कायम ठसा आणि तोच-तो रटाळपणा यांमुळे ती मागे पडली. डोंगरे यांची 'सिंहगडची मोहीम', कुलकर्णी यांचे पानपतावरील 'दैवदुर्विलास' हे काव्य, स. मो. भिड्यांचा 'पहिला बाजीराव', गद्रे यांचा 'राणा प्रतापसिंह', इनामदार गोसावी यांची 'अहिल्या', 'मल्हारराव' आणि 'परशुराम

पटवर्धन ' यांच्यावरील काव्ये आणि रामभाऊ वैद्य ऊर्फ कवी वनवासी यांची 'हमीर' व 'पानिपत' ही सर्व काव्ये एकाच रूपाची आहेत. त्यांच्यात वेगळीक अशी नाहीच. अध्ययनाच्या दृष्टीने विद्वानांना आणि मनोरंजनाच्या दृष्टीने इतर जनांना या काव्यांचा उपयोग नव्हता. या काव्यांचे कर्तेही प्रतिभावंत नव्हते. तेव्हा साहजिकच काळाच्या ओघात या काव्यांचा मागमूस राहिला नाही. ती आता क्वचित जुन्यापुराण्या मासिकांच्या बांधीव पुस्तकांत मात्र दृष्टीस पडतात.

### नवशिक्षित कवींचे कार्य

यापूर्वीच्या पंडितकवींनी संस्कृतातील अभिजात काव्यांची व नाटकांची भाषांतरे करून आधुनिक मराठी कवितेत सुरसत्व, प्रौढत्व व गांभीर्य निर्माण केले; तर त्यांच्या नंतरच्या या नवशिक्षित कवींनी इंग्रजी कवितांची सरसहा भाषांतरे किंवा अनुकरणे करून तिच्या एकेरीपणात नावीन्य, वैचित्र्य आणि वैविध्य उत्पन्न केले. पंडितकवींनी संस्कृत काव्यांतील कल्पनाशक्तीच्या बळावर मराठी कवितेला चमत्कृतिजनक शब्दालंकारांनी आणि अर्थालंकारांनी रमणीयता आणिली, तर नवशिक्षित कवींनी तिच्यात मानवी हृदयातील भिन्नभिन्न भावनांच्या तरल सूक्ष्म छटा प्रतिबिंबित करण्याचा प्रयत्न केला. पंडितकवींची काव्यदृष्टी वस्तुनिष्ठ असून कवितेच्या विषयांचे क्षेत्र वर्णनात्मक विषयांपुरते सीमित होते; नवशिक्षितांची काव्यदृष्टी व्यक्तिनिष्ठ होण्याच्या मार्गावर होती आणि काव्यविषयांचे तिचे क्षेत्र विशेष विस्तृत होते. पंडितकवींच्या रचनेत आणि नवशिक्षित कवींच्या रचनेत असे अंतर असण्याचे कारण हे की, पंडितकवींनी संस्कृत कवींचा कित्ता समोर ठेविला होता, तर नवशिक्षित कवींची अभिरुची इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्काने बदलल्यामुळे त्यांनी इंग्रजी कवींचे वळण गिरविले होते. या नवशिक्षित कवींनी विषयभिन्नतेबाबत आंग्ल कवींचा आधार व कित्ता घेतला होता. परंतु एक कुंट्यांचा अपवाद वगळला, तर इतर कवींची रचना जुनीच आहे; तीत आधुनिकत्व नाही. याचे कारण असे की, नवीन विचार, नवीन कल्पना, नवीन संवेदना हे मानसिक खाद्य एकदम पचत नाही. त्यावर पुष्ट होण्यास काही काळ जावा लागणे अपरिहार्य आहे. तसा तो गेल्यावर टिळक व केशवसुत यांच्या वेळी कविता आधुनिक बनली.

### या कवींचे आदर्श

नवशिक्षित कवींसमोर मिल्टन, स्पेन्सर, ड्रायडन, पोप, ग्रे, गोल्डस्मिथ इत्यादी इंग्रजी साहित्यातील कवींची कविता होती. या कवींची कविता पुष्कळ प्रमाणात अनात्मपर असून काही प्रमाणात आत्मपर आहे. तिचे स्वरूप बव्हंशी वर्णनात्मक आहे. त्यामुळे ती प्रदीर्घ आहे. नवशिक्षित कवी व स्वतंत्र कवी यांच्या कविताही याच प्रकारच्या आहेत. पंडितकवींच्या मराठी कवितेला संस्कृत भाषा घरचीच होती. परंतु नवशिक्षित कवींच्या मराठी कवितेला इंग्रजी समाज, त्याची संस्कृती, त्याचे विचार, उच्चार व आचार, त्याचे वाङ्मयीन संकेत, त्यांची भाषा व तिचे वाक्प्रचार आणि

संप्रदाय या साऱ्याच गोष्टी अपूर्व होत्या. महाराष्ट्राला त्या एकदम आवडणे, पटणे व रूढ होणे शक्य नव्हते. तशा परिस्थितीतही देश, काल व दशा यांचा विचार करून नवशिक्षित कवींनी दूर अंतरावरील एक बाहेरचा पाट मराठी कवितेत आणण्याचे सफल धाडस केले, हे त्यांचे कार्य चिरस्मरणीय आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या मध्ययुगीन इंग्रज कवींना उपहासोक्ती, विलापिका आणि चिंतनिका हे काव्यप्रकार अत्यंत प्रिय होते. या नवशिक्षित कवींच्या उद्यमशीलतेने हे परके काव्यप्रकार मराठीत आले. कीर्तिकर, लेभे, मोगरे, भांडारे व आगाशे यांनी विलापिका रचिल्या आहेत. परंतु उपहासोक्तिपर काव्ये केवळ मोगऱ्यांनीच लिहिली आहेत. 'संमोहलहरी'च्या रूपाने मराठीत चिंतनपर कविता लिहिण्याचा उपक्रम कानिटकरांनी केला.

कानिटकर आणि महाजनि यांनी वर्ड्स्वर्थ, शेली, मूर, टेनिसन इत्यादी कवींच्या कवितांच्या रूपांतराच्या रूपाने स्फुट भावकविता मराठीत रुजविण्याचा उद्योग केला, आणि तो कल्पनातीत सफलही झाला. महाजनींची बहुतेक भावकविता वृत्तबद्ध आहे. क्वचित त्यांनी 'पाहुं चला हरि कोणिकडे' यासारख्या मात्रिक छंदात काही गीते गाइली आहेत. परंतु कानिटकरांनी मात्र अनेक भावकवितांना 'वैशाखमासिं वासंतिक' किंवा 'चालुं नका रे ! विषयाटविंची वाट कठिण मोठी' अशा त्या काळी प्रचारात असलेल्या नाटकीय पदांची किंवा लोकपदांची चाल योजिली असून भावकविता ही वास्तविक गेयच हवी, हे सिद्ध करण्याचा यत्न केला आहे. मात्र त्यांची कविता चटकदार नाही.

## भावगीताचे अंकुर

महाजनि व कानिटकर यांनी भावकवितेचे उद्भावन केल्यावर मग टिळक-केशवसुतांच्या पुढील पिढीत तिचे बीज रुजले, अंकुरले, पालवले आणि फोफावले. भावकविता ही मुळात भावगीताच्या ( Lyric ) स्वरूपाची असते. उत्तम व उत्कृष्ट गणिल्या गेलेल्या भावगीतात एका प्रधान मनोवृत्तीची उठावणी असते; त्यात वृत्तींचा संकर नसतो. तो झाला असता गीत दूषित होते. तसेच, शब्दरूप चित्रात विशिष्ट कालापलीकडे जाता येत नाही. मनोभावना उचंबळून उत्कट झाली, म्हणजे त्या लहरीत गुणगुणताना कविता निर्माण होते, हा एक सर्वसामान्य अनुभव आहे. अर्थात भावगीत हे नेहमीच उत्कट स्वरूपाचे व लघू आकाराचे असते.

महाजनि व कानिटकर यानी इंग्रजी भावकवितेच्या अनुकरणाने मराठीत जे भावगीत आणिले, त्यात मूळ इंग्रजीप्रमाणे प्रणयाला प्राधान्य आहे. इंग्रजी समाज हा स्त्रीपुरुषांचा संमिश्र असल्यामुळे त्यात स्वच्छंद व यथेच्छ प्रणयाला भरपूर वाव व अवकाश आहे. त्यामुळे इंग्रजीत अनेक उत्तमोत्तम उत्कट प्रणयगीते आहेत. महाजनि व कानिटकर यांच्या काळी आणि पुढे टिळकांच्या व केशवसुतांच्या पिढीतही महाराष्ट्रात स्त्री व पुरुष समाजात एकत्रित येण्याची प्रथा नव्हती. इतकेच नव्हे, तर

कौटुंबिक जीवनातही इतरांच्या समोर पत्नीशीही प्रेमाचे मोकळेपणाचे वर्तन अशक्य असे. त्यामुळे या काळात प्रेमगीतांची निपज झाली खरी, पण ती आपल्या समाजात ज्या प्रमाणात पंख पसरिता येतील, त्याच प्रमाणात झाली. त्या भावगीतांत प्रेम असले, तरी संकोच आणि भीती आहे. मात्र यापुढे मराठी कवितेत अधिकाधिक स्त्रीदाक्षिण्य आढळू लागले.

महाजनि व कानिटकर यांनी इंग्रजी कवितांची रूपांतरे केल्यामुळे आणखी एक नवीन प्रवृत्ती मराठी कवितेत डोकावू लागली. ती प्रवृत्ती म्हणजे सृष्टिविषयक कवितांच्या लेखनाची होय. प्राचीन कवितेत हा विषय गौण असे. परंतु नवशिक्षित कवींनी आपल्या रूपांतरांच्याद्वारे महाराष्ट्राला सृष्टीचे उदात्त व मनोरम रूप दाखविले; आणि सृष्टीच्या अंतरात्म्याशी मानवजातीची तादात्म्यवृत्ती कशी होते, हे शिकविले.

### खंडकाव्ये

याच पिढीतील कवींनी कथाकाव्यांचा, त्यातल्या त्यात ऐतिहासिक खंडकाव्यांचा प्रकार फार मोठ्या प्रमाणात मराठीत आणण्याचा प्रयत्न केला या प्रयत्नाचा उगम प्रधान यांच्या 'दैवसेनी'त व कुंटे यांच्या 'राजा शिवाजी'त आहे. या प्रकाराला प्रोत्साहन मिळण्यास त्या वेळी या देशात नव्यानेच प्रादुर्भूत होणारी राष्ट्राभिमानाची कल्पना कारण झाली असावी. याशिवाय तो बळावण्यास सर वॉल्टर स्कॉट याच्या कथाकाव्यांचा अभ्यास, डफ व टॉड यांचे मराठे व रजपूत यांचे इतिहास आणि मावळलेल्या मराठेशाहीचा अभिमान याही गोष्टी कारणीभूत असाव्यात. परंतु कानिटकर व खरे यांचे स्पृहणीय अपवाद सोडले, तर अन्य कवींचे प्रयत्न निष्फळ ठरले, असेच आज म्हणावे लागते. याच सुमारास 'मोचनगड' आणि पुढे 'उषःकाल' या कादंबऱ्यांचा उदय झाल्यावर ऐतिहासिक पद्यांच्या पैदाशीस आपोआपच पायबंद बसला.

### यमकविषयक दृष्टी

इंग्रजी पद्यरचनेच्या अनुषंगाने मराठी पद्यरचनेत थोडेफार सोयिस्कर फेरफार करण्याचा उपक्रम या नवशिक्षित व स्वतंत्र कवीनी केला. यांपैकी उच्चारानुसारी लेखनाचा कुंटे व कीर्तिकर यांचा प्रयोग पूर्णतया फसला. गद्याचे वाचन व पद्याचे वाचन भिन्नभिन्न प्रकारे करण्याची वहिवाट आज अनेक शतके रूढ असल्यामुळे हा प्रयोग व्यर्थ होता. मात्र प्रासांचे पाश तोडण्याचा आणि यमकांचे बंध झुगारून देण्याचा प्रयत्न काही प्रमाणाने सफल झाला. हा प्रयत्न सफल होण्यास श्राव्य काव्य व दृश्य काव्य यांच्या नवीन कल्पना कारणीभूत झाल्या. इंग्रजी लेखनपद्धतीच्या संपर्कामुळे मराठी लेखनात विरामचिन्हांचा प्रवेश झाला. त्यामुळे विरामचिन्हांनुसार काव्य वाचता येऊ लागले. पूर्वी काव्याला फक्त श्रोताच असे. आता वाचकही

लाभला. हा प्रकार कमीअधिक मान्यता पावण्याचे आणखी एक कारण असे की, जर संस्कृतात बहुधा व इंग्रजीत काही वेळा यमके नाहीत, तर मग ती मराठीत तरी कशाला हवी, हा नियमकवाद्यांचा युक्तिवाद होय. त्यांचे म्हणणे असे की, यमके कानांना गोड लागतात याचे कारण श्रोत्याची सवय आहे; आणि दुसरे असे की, जर नावीन्य, सोय व स्वातंत्र्य हवे असेल, तर एकच मार्ग, एकच तऱ्हा, एकच शिस्त केव्हाही हितावह नाही. परंतु टिळक व केशवसुत यांच्यापुढील पिढीमध्ये कवितेचे क्षेत्र भावाभिव्यक्तीपुरते सीमित झाले आणि भावगीतास यमक हा शब्दालंकार तालाच्या दृष्टीने आणि श्रुतिसुभग म्हणून त्याचे पूर्णपणे उच्चाटन झाले नाही. महाजनि व नंतर खरे यांनी अवलंबिलेल्या एकान्तर यमकांचे पुढे केशवसुतांनी अनुकरण केले आहे. परंतु त्यात यमकांचा त्याग नाही, हे लक्षणीय आहे. प्रत्येक विचारास आवश्यक तेवढा अवकाश व अवसर देण्याचा तिसरा प्रयोग विरामचिन्हांच्या योजनेने अत्यंत मान्यता पावला.

### काव्यविषयक टीकेचा उदय

पंडितकवींच्या काव्यावर फारशा टीका झाल्या नाहीत. कारण त्यांची काव्ये संस्कृतावरून भाषांतरिलेली होती; शिवाय 'दक्षिणा प्रैज कमेटी'ने जाहीर केलेल्या विषयांवर ती निर्माण झाली होती. त्या काव्यांवर त्या-त्या वेळेचे 'कमेटी'चे 'सेक्रेतार' कृष्णशास्त्री चिपळूणकर, शंकर पाडुरंग पंडित, रावजीशास्त्री गोडबोले आणि मराठी वाङ्मयाचा आढावा घेणारे न्यायमूर्ती रानडे यांचे अभिप्राय लहान असले, तरी मार्मिक आहेत. नवशिक्षितांनी इंग्रजी कविता रूपांतरिली होती, ती परकी असल्यामुळे तिची रूपांतरे कमीअधिक प्रमाणात विचित्र होतीं. तेव्हा आरंभी-आरंभी तिच्यावर टीका होऊन वाचकवर्गात थोडीफार खळबळ झाली. परंतु ती आधुनिक कवितेच्या प्रगतीच्या दृष्टीने उपयुक्त व उपकारकच ठरली. कारण या रीतीने काव्यविषयक टीकेचा उदय झाला. वामन दाजी ओक यांनी या समकालीन कवींच्या काव्यांवर टीकात्मक लेख लिहिले आणि नवीन कवितेचा नमुना म्हणून नवीन कवींच्या कवितांतील वेच्यांचा 'काव्यमाधुर्य' हा संग्रह संपादित केला. परंतु त्या वेळी या नवीन कवितेला मोठा असा रसिकवर्ग लाभला नाही.

या कवींचे काव्यलेखन चालू असतानाच निरनिराळ्या सामाजिक आणि राजकीय चळवळींना आरंभ झाला होता. महाराष्ट्रात पाश्चात्त्य विद्येचा प्रसार होऊन ती प्राप्त करून घेणाऱ्या मंडळींस आपल्या देशाची खरी स्थिती अधिकाधिक कळू लागली होती. आमचे राष्ट्र इतर राष्ट्रांपेक्षा कोणत्या विषयांत मागे पडले आहे आणि ते का पडले आहे, हे समजू लागले होते. आणि ते मागे पडावयास करणे काय झाली आहेत, हेही हळूहळू लक्षात येऊ लागले होते. या जाणिवेचे दर्शन कीर्तिकर, कानिटकर आणि नंतरचे आठल्ये व आगाशे यांच्या काव्यांत घडते. या कवींच्या काव्यात स्त्रियांच्या उद्धाराचे उद्गार आहेत. खरे, मोगरे आणि भांडारे याच्या काव्यात राजकीय

स्वातंत्र्याचे विचार आहेत. या कवींच्या काव्यांत जुन्या इतिहासाच्या प्रखर अभिमानाची आणि नव्या एकराष्ट्रीयतेच्या उज्ज्वल देशभावनेची प्रतीती पटते.

**या काव्याची भाषा**

याच सुमारास सामाजिक राजकीय चळवळींच्या प्रसारासाठी वर्तमानपत्रे उदयास येत होती आणि सार्वजनिक ठिकाणी भाषणे होत होती. या लेखनाचा आणि भाषणांचा परिणाम स्वतंत्र कवींच्या कवितांवर झाला आहे. या लेखनात आणि भाषणांत मराठी गद्याला मोठे व्यवस्थित, ओजस्वी व स्पृहणीय स्वरूप प्राप्त होत होते. या गद्याचा परिणाम पद्यावर झाल्याशिवाय राहिला नाही. पद्यातून आता एं, ते हीं, ईं, आं इत्यादी जुनाट विभक्तिप्रत्यय, दीजे, कीजे इत्यादी जुने आज्ञार्थी किंवा विध्यर्थी प्रयोग, आणि माझिया, तुझिया इत्यादी असंयुक्त वर्ण यांची गर्दी नाहीशी होऊ लागली होती. इ. स. १८८५-पूर्वी चार-पाच वर्षे 'दक्षिणा प्रैज कमेटी'ने काव्यासाठी विषय-देणे बंद केले होते आणि पुढे 'प्रैज' देणेही बंद केले. त्यामुळे या स्वतंत्र कवींच्या कवितेत स्वयंप्रेरणेचा अभाव दिसत नाही. मनुष्यात स्वाभिमानाची ज्योत प्रज्वलित झाली म्हणजे त्याच्या लेखनात व भाषणात सद्विचार, स्वकर्तव्य व निःस्पृहत्व यांचे विशदत्व वाढू लागते. तोच प्रकार या स्वतंत्र कवींच्या काव्याबाबत दिसतो. भाषेला चांगले स्वरूप आले, की भाषाशुद्धी, शब्दसौष्ठव, रचनासारल्य यांकडे लक्ष वेधते व मग तिच्या माध्यमाने उदार विचार, गूढ भावना व मनोहर वर्णने प्रकट करिता येतात. मोगरे, खरे, आठल्ये इत्यादी पुढील कवींनी शुद्ध, सरळ व सुगम भाषा लिहून आणि रेखीव रचना करून मराठी पद्य डौलदार केले. त्यांच्याइतकी परिष्कृत भाषा अन्य कवींनी लिहिलेली नाही. मात्र ही भाषा गद्याला जवळची असल्यामुळे कोमल भाव प्रकट करण्यास ती अनुरूप ठरली नाही. ती केवळ उज्ज्वल विचार व जाज्वल्य भावना प्रकट करण्यासच समर्थ ठरली.

यापुढे गद्य भरास आले आणि पद्याची पिछेहाट होऊन ते भावगीतापुरते सीमित झाले. आता नित्य नवी नियतकालिके उदयास येऊ लागली. त्यामुळे कथा, कादंबरी, नाटक व निबंध हे गद्यवाङ्मयप्रकार तरारले. पंडितकवी आणि नवशिक्षित व स्वतंत्र कवी यांची बहुतेक कविता प्रतिकृतिनिदर्शनपर आहे, तिच्यात व्यंजनपरता नाही, तिचे स्वरूप प्रामुख्याने पुस्तकी आहे. पंडितकवी शाळाखात्याच्या आज्ञेने व 'दक्षिणा प्रैज कमिटी'च्या बक्षिसाच्या लालसेने लेखन करणारे होते, तर कीर्तिकर, कानिटकर, महाजनि, आगाशे इत्यादी नवशिक्षित कवि सरकारदरबारी व सुशिक्षितांच्या मेळाव्यात मान्यता पावलेले कवी होते. काव्यलेखन हे त्यांचे 'जीवन' झाले नव्हते. काव्याच्या रंगात रात्रंदिवस रंगलेले आणि त्याच्या नादात स्वतःचे देहभान विसरलेले कवी यानंतरच्या पिढीत जन्मास आले. ते जन्मजात कवी होते. आपल्या प्रतिभेच्या प्रभेने त्यांनी महाराष्ट्रशारदेचे मुखमंडळ उजळ केले आणि आपल्या अविस्मरणीय कवितांनी मराठी रसिकांना प्रसन्न केले. पंडितकवींनी आधुनिक

कवितेच्या मंदिराची पायाभरणी केली, नवशिक्षित व स्वतंत्र कवींनी त्या मंदिराच्या भिंती उभारल्या, आणि त्यानंतर उदयास आलेल्या स्वतंत्र कवींनी त्या मंदिरावर कळस चढविला.

## चार

## लोककविपरंपरा

इंग्रजी राजवटीच्या प्रारंभी मराठी कवितेत तीन प्रमुख प्रवाह होते. संस्कृत संप्रदायातील शास्त्रीपंडितांच्या कवितेचा एक प्रवाह होता. दुसरा प्रवाह इंग्रजी संप्रदायातील नवशिक्षित कवींचा होता. यांपैकी पहिल्या प्रवाहाला संस्कृत साहित्यातील अभिजात काव्यांच्या व नाटकांच्या भाषांतरामुळे पूर आला होता; व दुसऱ्या प्रवाहाचे पाणी इंग्रजी वाङ्मयातील काव्यांच्या व नाटकांच्या रूपांतरांमुळे ओसंडून वाहत होते. तिसरा प्रवाह स्वतंत्र लेखन करणाऱ्या कवींचा होता. मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकास हे तिन्ही प्रवाह ज्ञात आहेत. या तीन परंपरांप्रमाणेच तत्कालीन जनतेच्या जीवनाशी समरस होणाऱ्या लोककवींची चौथी परंपरा होती. लोककवींची परंपरा सर्व काळी सर्व देशांत अखंडित असते. मात्र तिच्या कवितेचे स्वरूप प्रासंगिक, नैमित्तिक, तात्कालिक किंवा प्रचारकी असते. त्यामुळे तो प्रसंग संपला, ते निमित्त नाहीसे झाले, तो काळ उरला नाही, किंवा त्या प्रचाराची आवश्यकता राहिली नाही, म्हणजे त्या कवितेचे स्वरूप केवळ इतिहास म्हणून टिकते. त्यामुळे साहजिकच ती कविता पुढील पिढीच्या श्रुतीतून व स्मृतीतून नष्ट होते, आणि म्हणूनच तिचे संशोधन करावे लागते व सामाजिक महत्त्व पटवावे लागते.

अव्वल इंग्रजीत अशा लोककवींची एक परंपरा उदयास येऊन गेली. या लोककवींपैकी बहुतेकजणांची भूमिका समाजसेवकाची होती. ते अगोदर समाजसेवक होते व नंतर कवी होते. या समाजसेवक कवींनी आपल्या देशबांधवांच्या उद्धारासाठी आमरण स्वतःची वाणी शिणविली व लेखणी झिजविली. यांपैकी अनेक कवी हे स्वतः कर्ते सुधारक होते. केवळ भाषणात व लेखनात त्यांनी आपल्या जीवनाची इतिकर्तव्यता मानिली नाही. समाजाची सर्वांगीण सुधारणा हे त्यांचे ध्येय होते; आणि ती सुधारणा त्यांनी आपल्या आचरणात आणिली. समाजसुधारणेचे ध्येय साधता-साधताच त्यांची कविता संपुष्टात आली. पण म्हणून वाङ्मयाच्या इतिहासात तिला स्थान मिळू शकत नाही, असे नाही. उलट, समाजाच्या प्रगतीचा आढावा घ्यावयाचा असल्यास ती कविता प्रमाण म्हणून अतिशय उपयुक्त व उपकारक आहे.

### काव्य की पद्य

साहित्यशास्त्रातील काव्याच्या व्याख्येच्या कसोटीवर घासून-पुसून पाहिल्यास या लोककवींची कविता कदाचित 'काव्य' या पदवीस पात्र ठरणार नाही. काही तथाकथित रसिक केवळ 'पद्य' म्हणून तिची संभावना करितील. परंतु त्यामुळे तिच्या

महतीला ढळ लागण्याचे अथवा तिच्या मौलिकतेला कमीपणा येण्याचे काही कारण नाही. त्या कवितेच्या आविष्कृतीची मीमांसा करिताना ती निर्माण करणारे लोककवी स्वतः राबले नाहीत, उलट त्यांनीच तिला समाजसुधारणेच्या कार्यात हवे तसे राबविले हे सत्य लक्षात घेणे आवश्यक आहे. समाजसुधारणा हे त्यांचे साध्य होते. त्यासाठी त्यांनी कवितेचा साधन म्हणून उपयोग केला.

गद्यात विचार यथास्थित व व्यवस्थित मांडिता येतात; परंतु त्यांचा प्रसार व्हावा अशी इच्छा असेल, तर प्रचारासाठी 'पद्य' हे प्रभावी आहे, याची लोककवींना चांगलीच जाणीव होती. कारण पद्य हे सयमक असल्यामुळे श्रुतिसुभग व स्मरणसुकर असते. ते ओठांत खेळते व कानांत घोळते. ते अंतःकरणाची पकड अनायास घेते. तेव्हा लोककवींनी गद्यलेखनाबरोबर पद्यलेखनाचाही अवलंब केला, यात नवल नाही. अर्थात पद्यलेखन करण्यात कलाविलास हा त्यांचा हेतू मुळातच नसल्यामुळे त्याला 'काव्या'ची कसोटी लावण्याचे कारण नाही. त्या पद्यांचे महत्त्वमापन हे त्यांच्यातला सामाजिक आशय व त्याचा समाजावर घडलेला परिणाम या दृष्टींनी झाले पाहिजे.

वाटल्यास या लोककवींना 'पद्यकार' ही पदवी द्यावी व त्यांच्या कवितेच्या परंपरेस 'काव्यपरंपरा' असे म्हणण्याऐवजी 'पद्यपरंपरा' असे म्हणावे. परंतु त्यामुळे त्यांच्या विचारवादी व व्यवहारवादी पद्यलेखनाची महती कमी होती, असे मात्र मुळीच नाही. केवळ लोकहितासाठी पद्याची कास धरणाऱ्या या लोककवींच्या लेखनात अन्य परंपरेतील कवींच्या कवितेत असलेले वरवरचे रंग नाहीत, अथवा कल्पनांचे पोकळ तरंग नाहीत. त्यांची वाणी वरिष्ठ अधिकाऱ्याने प्रसन्न रहावे, याकरिता उगाच गोड-गोड बोलली नाही, किंवा त्यांची लेखणी पारितोषिक म्हणून प्राप्त होणाऱ्या नाण्यांच्या नादावर उगाच थयथय नाचली नाही. असंख्य देशबांधवांचे दुःख, दैन्य, दास्य व दारिद्र्य पाहून त्यांचे अंतः करण कळवळत होते. त्यांची पद्यरचना ही त्या कळवळ्याचा शाब्दिक आविष्कार आहे. त्यांचे वाङ्मय हे खरेखरे लोकाभिमुख वाङ्मय आहे.

### धर्मसुधारणेची प्रेरणा

इ. स. १८१८-मध्ये पेशव्यांचे ब्राह्मणी राज्य जाऊन त्या जागी इंग्रजांचे 'बाटगे' राज्य येताच येथे सुरुवातीस जी प्रतिक्रिया झाली, ती धार्मिक चळवळीच्या स्वरूपाची होती. जुन्या राज्यात खोट्यानाट्या धार्मिक आचारांचे बरेच अवडंबर होते. त्यात सहगमन, केशवपन, सक्तीचे वैधव्य, बालविवाह, जरठविवाह, भ्रूणहत्या, जाति-बहिष्कार इत्यादी अनेक रूढींचा, नाना प्रकारच्या वेडगळ समजुतींचा, मूर्खपणाच्या चालीरीतींचा व अनावश्यक विधींचा संचार झाला होता. हिंदुसमाजातील या उणिवांचा गैरवाजवी फायदा गोऱ्या सरकारचा प्रत्यक्ष आश्रय असलेल्या व अप्रत्यक्ष प्रोत्साहन मिळणाऱ्या 'खिस्ती मिशनऱ्यां'च्या पथ्यावर पडत होता. त्यामुळे येथल्या सुशिक्षितांचे लक्ष प्रथमतः धर्मसुधारणेकडे वळले. पुण्यास धर्मसुधारणा करण्याचा

प्रयत्न कृष्ण शास्त्री चिपळूणकर यांचे गुरू मोरशास्त्री साठे यांनी 'कल्याणोन्नायक मंडळ' स्थापन करून केला आणि मुंबईत तसा प्रयत्न सुप्रसिद्ध व्याकरणकार दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनी 'परमहंस-सभा' स्थापन करून केला. या परमहंससभेची माहिती 'अरुणोदया'त रेव्हरंड बाबा पदमनजी यांनी दिली आहे.

"हिच्या सभा गुप्त रीतीने भरत. मंडळींत प्रवेश करणारास एक दुधाचा प्याला आणून प्रथम अध्यक्षानें व दुसऱ्या कित्येकांनी तोंडास लावल्यावर त्यास प्यायास देत आणि रोटीचा (पावाचा) तुकडा खावयास देत. सभेच्या आरंभीं व शेवटीं मराठी प्रार्थना वाचीत, त्या रावबहादूर दादोबा पाडुरंग यांनीं रचलेल्या होत्या. रा. ब. दादोबा पांडुरंग व रा. रा. भाऊ महाजन हे जरी मंडळाच्या मताचे व मंडळीचे पुरस्कर्ते होते तरी ते सभेस कधीं येत नसत. आलेच तर दुसऱ्या खोलींत बसत. दादोबांचे बंधू रा. रा. दाक्तर आत्माराम पांडुरंग हे ह्या मंडळींचे सभासद होते. पण ह्यांची वर्तणूक अशा प्रकारची नव्हती." दादोबांनी रचिलेल्या ज्या 'मराठी प्रार्थनां'चा यात उल्लेख आहे, त्याचा नमुना असा—

ऐका सांगतों मी । विशां अभगांत । सर्वशास्त्रमत । ब्राह्मधर्म,
विश्वकुटुंबी जो । सर्वादिकारण । बाप, त्या शरण । जावें तुम्ही;
बंधूच्या नात्यानें । वागा मानवाशीं । उदार मनाशीं । ठेवुनिया,
जातिभेद सर्व । सोडा अभिमान । द्यावें आलिंगन । एकमेकां.
असो कृष्णगीता । किंवा खिस्तगीता । महम्मदाची वार्ता । असेना कां,
तत्त्वज्ञान त्यांचे । असे एक जरी । न कां तें पदरीं । घ्यावें आम्हीं ?
येईना का आला । थोडा तो विरोध । दाऊं तो न क्रोध । तेणें आम्ही.

या नमुन्यावरून दादोबांना बंगालमध्ये नव्याने अस्तित्वात आलेला 'ब्रह्म-धर्म' अभिप्रेत असावा, असे वाटते. परंतु दादोबांचे बोलणे व चालणे यांत विसंगती होती. म्हणूनच बहुधा त्या काळच्या एका 'टवाळा'ने परमहंससभेची टवाळी केली असावी —

प्रभुराज्यधारकांनीं आणविली ह्या पुरांत सोसाटी
भिशनारीही तद्वत झटती अत्यंत भ्रष्टतेसाठीं.

ही टवाळी 'परमहंसमतप्रशंसा' या लहान चोपड्यात आहे व त्यावर प्रभाकरकर्ते भाऊ महाजन यांनी टीका केली आहे. या परमहंसमतप्रशंसेकडे आता त्या काळच्या उपहासपर काव्याचा एक मासला म्हणून पाहणे आवश्यक आहे. परमहंस-सभेच्या सभासदांच्या भाषणात व आचरणात एकवाक्यता नव्हती. तेव्हा त्यांना तो उपहास मुकाट्याने सहन करावा लागला. या उपहासपर पद्यांना सध्या गणेशोत्सवात मेळ्यां-मध्ये गाइल्या जाणाऱ्या कवनांइतपतही महत्त्व नाही, हे खरे आहे. परंतु त्यांच्यात महाराष्ट्रातील धार्मिक व सामाजिक चळवळींचा इतिहास दडला आहे, या सत्याकडे डोळेझाक करिता येत नाही. धर्मसुधारणा आणि समाजनीतिनिदर्शन हे परमहंस-सभेचे

दोन मुख्य उद्देश होते. ‘मुक्तामाला’ या मराठी साहित्यातील पहिल्या कादंबरीचे कर्ते लक्ष्मणशास्त्री हळबे हे परमहंस-सभेचे सदस्य होते. ‘मुक्तामाले’च्या प्रत्येक ‘भागा’च्या ( प्रकरणाच्या ) प्रारंभी त्यांनी एक स्वकृत नीतिबोधक श्लोक घातला आहे. त्यात परमेश्वराचे मानसपूजन व सदाचरण यांवर भर आहे —

दुःखें जिवावरिल सोशित नित्य जाती
जे सत्य, नीति, सुगुणां अविलंबिताती
ठेवून भार परमेश्वरिं वागतांती,
ते संकटांतहि पहा सुख पावताती

या परमहंस-सभेतूनच पुढे दिनांक ३०–१२–१८६६ रोजी प्रार्थनासमाज उदयाला आला. राजा राममोहन राय यांचा बंगालमधील ब्रह्मसमाज आणि स्वामी दयानंद सरस्वती यांचा पंजाबाकडील आर्यसमाज यांच्या उद्देशांत व प्रार्थना-समाजाच्या उद्देशांत फारच थोडा फरक होता. धर्मसुधारणा हेच या तिन्ही समाजांचे मुख्य उद्दिष्ट होते. ब्रह्मसमाजाचे केशवचंद्र सेन मुंबईला आणि आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंद हे मुंबईला व पुण्याला व्याख्याने देऊन गेले होते. प्रार्थना-समाजातील उपासनांत म्हणण्यासाठीच भास्कर दामोदर पाळंदे यांची ‘रत्नमाला’ अवतरली होती; आणि कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांची ‘भक्तिसुधा’ पाझरली होती. या काव्यांच्या जोडीला नंतर ‘प्रार्थनासंगीत’ आले.

प्रार्थनासंगीतांतील प्रार्थनांचे कर्तृत्व कोणा एकाच कवीकडे नाही —

पाहिन जगिं जगदीश कधीं मी । आस मना ही लागली.

किंवा

विनम्रभावें ज्ञान मिळवुनी स्वार्थत्यागी म्यां व्हावें
बुद्धीचें सामर्थ्य लाभुनी सत्यमार्गी वर्तावें.

इत्यादी त्यांतील गीते जशी उद्बोधक तशीच प्रेरक आहेत, यात शंका नाही.

हरि केशवजी पाठारे यांच्या ‘यात्रिक-क्रमणा’त आणि ‘ज्ञानोदय’ या खिस्ती मतपत्रात काही धर्मपर मराठी कविता आहे. तीदेखील आदरणीय आहे. मात्र खिस्ती मिशनऱ्यांनी येथील अजाण व दरिद्री समाजाला भुलथापा देऊन धर्मांतराचे कार्य आरंभिले होते, ते येथील विवेकी व सुबुद्ध विचारकांना आवडले नाही. खिस्ती मिशनऱ्यांच्या या धर्मप्रसाराला पायबंद घालण्याचे कार्य विष्णु भिकाजी गोखले यांनी केले. हे धर्मसुधारक विष्णुबुवा ब्रह्मचारी या नावाने प्रसिद्ध आहेत. बाबांनी ‘भावार्थसिंधु’ हा ओवीबद्ध ग्रंथ रचिला आहे. त्यात यच्चयावत मनुष्यांना उपदेश घेण्याचा अधिकार आहे, असे ते सांगतात —

पृथ्वीवरील मनुष्यमात्र । म्लेंछादिक सकल जात ।
उपदेशास अधिकारी निश्चित । हीच माझी आशा असे.
मनुष्यजाती असे एक । हेच ज्ञान सम्यक ।

> ऐसा जाणोनी विवेक । मुक्तें उपदेश करावा.
> सकल द्वीपें, सकल खंडें । मुक्ते फिरावीं उदंडें
> मोडूनि मतवादांचीं बंडें । उपदेश ज्ञानाचा करावा.

बाबांच्या या पवित्र ज्ञानमार्गाविषयी कोणाला आदर वाटणार नाही ? ‘ वेदोक्तधर्मप्रकाश ’ या आपल्या ग्रंथाच्या शेवटी बाबांनी आपले मत हे व्यक्तीच्या चित्तशुद्धीसाठी व समाजाच्या उन्नतीसाठी आहे, असा निर्वाळा दिला आहे –

> यांत नाहीं मताभिमान । नसे संशयाचे ज्ञान ।
> जे ईश्वरे उपदेशिले मजलागुन । तेच लिहिलें असे मी.

येथे बाबा आपल्या ‘ आतल्या आवाजा’लाच ईश्वर म्हणत आहेत. या उताऱ्यांनी बाबांच्या स्वतंत्र धर्मपर मतांची कल्पना येते. कालानुसार धर्मात परिवर्तन अपरिहार्य आहे, हे त्यांना पटले होते.

**समाजसुधारणेचा हेतू**

धर्म समाजासाठी असतो तेव्हा धार्मिक सुधारणांबरोबर सामाजिक सुधारणांचीही आवश्यकता असते. खिस्ती धर्मानुयायांनी समाजाच्या सेवेसाठी ज्ञानदान म्हणून शाळा घातल्या आहेत, शुश्रूषेसाठी औषधालये उघडिली आहेत, पतित स्त्रियांना आसरा म्हणून अनाथाश्रम चालविले आहेत, इत्यादी सुधारणा इकडील विचारवंतांच्या लक्षात येताच त्यांनी त्या दिशेने येथील समाजात सुधारणा घडवून आणण्यासाठी पाऊल उचलिले. या विचारवंतांत विष्णु परशुरामशास्त्री पंडित आणि महात्मा जोतिबा गोविंदराव फुले हे प्रमुख होते. या दोघांना, ते समाजसुधारक होते म्हणून, धार्मिक, शैक्षणिक, राजकीय, औद्योगिक इत्यादी इतर अंगांच्या सुधारणेविषयी तळमळ नव्हती, असे नाही. विष्णुशास्त्री पंडित हे महाराष्ट्रातील स्त्रियांच्या सुधारणेच्या संबंधात विशेष प्रसिद्ध आहेत. इ. स. १८५६-मध्ये बंगालमध्ये ईश्वरचंद्र विद्यासागर यांनी विधवा-विवाहाच्या सशास्त्रतेवर एक ग्रंथ लिहिला होता. पंडितांनी त्या ग्रंथापासून स्फूर्ती घेतली व इ. स १८६५-मध्ये ‘ विधवाविवाह ’ हा आपला ग्रंथ प्रसिद्ध केला. पंडित हे क्रियावान सुधारक होते. त्यांनी स्वतः प्रयत्न करून दोन विधवाविवाह घडवून आणले होते व त्यासाठी ‘ पुनर्विवाहोत्तेजक मंडळा’ची संस्थापनाही केली होती. इ. स. १८६९ साली पुण्यास पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेविषयी शंकराचार्यांच्या उपस्थितीत वाद झाला. त्यात पंडितांनी मोठ्या हिरिरीने विधवाविवाहाच्या पक्षाचे समर्थन केले आणि स्वतः विधुरावस्था प्राप्त झाली असताना इ. स. १८७४-मध्ये विधवाविवाह केला. पंडितांचे ‘ पद्यमाला ’ या नावाचे एक लहानसे पद्यात्मक पुस्तक आहे. ते त्यांनी ‘ भरतवर्षस्थ स्वदेशहितेच्छु देशबांधवांस परमप्रीतीने नजर केले आहे.’ या ‘ माले’च्या अखेरीस त्यांचे मित्र विनायक यशवंत बेरडे यांच्याही चार कविता जोडण्यात आल्या आहेत. सोलापुरास स्वदेशहितेच्छू वकील गणेश बाबाजी माटे व त्यांचे मित्र यांनी कीर्तनांच्या द्वारे सुधारणांचा प्रसार करण्याचा प्रघात पाडला. तो

पाहून पंडितांनाही त्या प्रघाताचा अवलंब करण्याची स्फूर्ती झाली. ते ' पद्यमाले'च्या प्रस्तावनेत म्हणतात — " स्वदेशसुधारणेकरितां अनेक उपयुक्त विषयांवर व्याख्यानें देण्याचा प्रकार जसा चालू आहे, तसाच त्या विषयांवर कीर्तन करण्याचा प्रकार चालू केल्यास तो श्रोतृजनांस फार प्रिय होईल. कीर्तनास कवनाची आवश्यकता. तो प्रयत्न तर नवीन. त्यास प्रतिभादि गुण सहज पाहिजेत. परंतु प्रोत्साहन दिल्यावरून कांहीं निरनिराळ्या वृत्तांचीं पद्यें सरासरी बांधलीं. या ग्रंथास ' पुष्पमाला ' याच्याबद्दल ' पलाशपुष्पमाला ' हे नांव विशेष शोभेल. स्वदेशबांधवांविषयी या माळयास प्रेमातिशय आहे. त्यामुळेच श्रीकृष्णास सुदाम्याच्या पोह्यांप्रमाणे अथवा इंदूस गरिबाच्या सुताप्रमाणे ही त्यांस आर्पिली आहे. "

आपल्या समाजासाठी कायावाचामनसा आमरण झिजणाऱ्या या महान सुधारकाचा कोण हा नम्रपणा व प्रेमळपणा! काव्याला अगोदर सहृदयता हवी. ती या ' माले'त पुरेपूर आहे. पंडितांनी ज्ञानाचे श्रेष्ठत्व, जातिभेदाचे निर्मूलन, उद्योगधंद्याचे महत्त्व, मद्यपान व द्यूत या व्यसनांचे दुष्परिणाम या लोकहितकारक विषयांवर ' मित्र ' या काव्यनामाने कवने रचिली आहेत. काव्याच्या बहिरंगापेक्षा त्याच्या अंतरंगातील आशयाला महत्त्व आहे, हे तत्त्व पंडितांच्या वाणीत अशा रीतीने व्यक्त झाले आहे—

नाही कंठामाजी गोडी । नाहीं वक्तृत्वाची प्रौढी,
नाहीं ताल, स्वरज्ञान । नाहीं गायनसाधन,
नाहीं कवनामाजी छंद । नाहीं प्रतिभेचा गंध,
नाहीं काव्याचा अभ्यास । तरी न व्हावे उदास,
येथें उद्देश प्रधान । त्याशीं द्यावा सकळीं मान.

देशांतले दारिद्र्य व दौर्बल्य पाहून पंडितांमधला कवी कळवळतो व उद्गारतो —

आर्यावर्ती स्वामि असुनि अम्हि आलो आजि थरा या
वसनान्नाविण लोटिति जन दिन, कांहि धरा मनि माया.

परदेशी वस्तूंच्या भरमसाट आयातीमुळे स्वदेशी वस्तूंची व त्या निर्माण करणाऱ्या शिल्पिजनांची दशा कशी दयनीय होत आहे, आणि इंग्रज व्यापारी या देशातील उद्योगधंद्यांना बुडवून स्वतः गब्बर होत आहेत, व एतद्देशीयांस रंक करीत आहेत, हे दुःख पंडितांनी पुढील शब्दांत प्रकट केले आहे —

देशी वस्तूंची पायमल्ली । इंग्रजी वस्तूंनीं अतिशय केली
कारागिरांचीं दारे झाकलीं । उपास लोके काढूं लागलीं
शीग्राम, ब्रोहम, फेटन गाड्या । मुशी आणि शेकाच्या शेगड्या
मापें, वजन, कांटे, दांड्या । या मालांच्या येउनी छकड्या
देशी वस्तूंच्या झाल्या चिंधड्या । . . .

पंडितांचे कविमित्र बेरडे यांनी या देशातील कापसाच्या निर्यातीकडे जनतेचे लक्ष वेधले असून येथल्या कच्च्या मालावर विलायतेतील भांडवलवाले कसा अवास्तव

मुनाफा मिळवीत आहेत, हे तिच्या निदर्शनास आणिले आहे. यंत्रयुगाच्या प्रारंभापासूनच भारताला भणंग बनविणाऱ्या 'औद्योगिक क्रांती'कडे या पूर्ववर्ती विचारवंतांचे किती बारीक लक्ष होते, ते यावरून स्पष्ट होईल —

पिकविति आर्यावर्ती कष्ट करुनि बहुत लोक कापूसा
मांचेस्टरिं कां नेतां ? प्रश्न करा हा, भिऊं नका पूसा.
आर्यावर्त पित्याला सुख व्हाया त्वरित लंडनीं जाल
आणाल युक्ति तेथिल तरि सुत हो भरतखंडिं गाजाल.

बेरड्यांनी 'युक्ति' हा शब्द तांत्रिक शिक्षणासाठी योजिला आहे. त्यांचे हे म्हणणे व्यर्थ होते, असे आज कोण म्हणेल? यावरून स्वदेशप्रेम, स्वदेशीचा पुरस्कार, विधवा-विवाह इत्यादी सुधारणा व चळवळी 'निबंधमाले'पूर्वीच्या काळात नव्हत्या, ही समजूत किती चुकीची आहे, हे सहज लक्षात येईल. जातिभेद हा एकतेच्या आड येऊ नये, म्हणून पंडित प्रेमाने उद्गारतात —

ज्ञातिकर्माचा भेद असो कांहीं । देशकार्यामधिं तया स्थान नाहीं,
अता तरि याशीं देउं या निरोप । लावु ऐक्याचे सर्व मिळुनि रोप.
सर्व भेदांचें विसरुं अतां मूळ । माजले हें जेथून सर्व खूळ,
एकमेकांते भेटुं कडकडून । प्रेमसागरभरिं जाउं या बुडून.

स्त्रीविषयक समाजसुधारणेसंबंधी पंडितांची एकही कविता नाही. परंतु त्यांनी महाराष्ट्रातील महिलांच्या सेवेचे जे निरस्मरणीय कार्य केले, त्याचा गौरव वामन दाजी ओक यांनी 'पंडितांवरील विलापा'त केले आहे:—

परिणये पतिसौख्य मिळावया । अशरणा विधवा; श्रम तूं सया
बहुत घेवुनिया, सुखिं घातल्या । तव कृती स्तुतिपात्र खऱ्या भल्या
जुन्या पंडितांनीं तुला फार भ्यावे । तुझे नांव घेतां थरारे उठावे
तुझे ऐकुनी वाद सारे जनांचे । लया जाति किंतू बहूतां दिसांचे.

पंडित व त्यांचे मित्र बेरडे यांनी आपल्या कवितांत ज्या 'स्वदेशी'चा पुरस्कार केला आहे, त्याचा सूत्रपात महाराष्ट्रात गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका यांनी इ. स. १८७३-पासूनच केला होता.

## जोतिबा फुले

विष्णु परशुरामशास्त्री पंडितांप्रमाणेच जोतिबा गोविंद फुले हेही प्रत्यक्ष कामगिरी करून दाखविणारे एक खंदे खंबीर पुढारी होते. जोतिबांच्या गद्यलेखनापेक्षा त्यांचे पद्यलेखन अधिक प्रभावी आहे. त्यांच्या मतावर खिस्ती मताचा पगडा होता, तरी त्यांनी स्वतः धर्मांतर केले नाही किंवा त्या मतांचा प्रचार केला नाही, हे लक्षात घेण्याजोगे आहे. उलट, खिस्ती प्रचारकांच्या अनुकरणाने त्यांनी मुलींचा शाळा व अनाथाश्रम या लोकोपयुक्त व लोकोपकारक संस्था काढून समाजाला एक नवीन मार्ग दाखविला, याबद्दल तो त्यांचा चिरकाल ऋणी राहील. जोतिबांचा प्रतिगामी

भटांभिक्षुकांवर फार मोठा राग होता, तो त्या काळातील प्रतिक्रियेच्या स्वरूपाचा होता. रावबहादुर गोपाळ हरि देशमुखांसारख्या लोकहितवादी ब्राह्मण पुढाऱ्यानेही जेथे आपल्या 'शतपत्रां'त जीर्णमतवादी भटांभिक्षुकांवर कोरडे ओढले आहेत, तेथे जोतिबा हे अब्राह्मण होते म्हणून त्यांनी भटांभिक्षुकांवर टीकास्त्र उपसले आहे, असा अपसमज करून घेण्यात काय अर्थ आहे? जोतिबांवरील मृत्युलेखात बाल-बोधकार विनायक कोंडदेव ओक सांगतात की, 'हे ब्राह्मणेतरांचे मोठे कैवारी होते. हे वाईट ब्राह्मणांस शिव्या देत.'[१] 'निबंधमाले'त विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी 'सत्यशोधक समाजा'च्या वार्षिक अहवालावर अभिप्राय देताना जोतिबांवर विरुद्ध टीका केली आहे. त्याचप्रमाणे फेब्रुवारी १८६८-च्या व जून १८७३-च्या 'विविध-ज्ञानविस्तारा'त जोतिबांवर प्रतिकूल टीका आहे. परंतु त्या टीकांचा रोख जोतिबांच्या कामगिरीवर नसून त्यांनी प्राचीन इतिहास, धर्मविचार, नीतिशास्त्र इत्यादिकांसंबंधी जे वेगळे विचार प्रकट केले आहेत, त्या विचारांवर आहे. अर्थात जोतिबांच्या लेखनाचा विचार करिताना त्यांचा काळ व त्यांची सामाजिक परिस्थिती लक्षात घेणे आवश्यक आहे. पेशवाईत भटांभिक्षुकांचे नुसते स्तोम होते. ती लुप्त होताच ते मावळले. परंतु ही वस्तुस्थिती भटांभिक्षुकांच्या लक्षात यावयास काही काळ जावा लागला. या संक्रमणकाळात जोतिबांनी आपला राग त्या वर्गावर काढावा, हे साहजिक होते. मात्र तो राग क्वचित अनावर होत असे. 'ब्राह्मणधर्माच्या आडपडद्यात गुलामगिरी' या पुस्तकावर Supplement to the Government Gazette of 25th December 1873 याच्या अंकात पृष्ठ ८८३-वर अभिप्राय आहे— It is a most virulent production, mostly consisting of the most wild and ludicrous fancies. In a few places it is even indecent. 'ब्राह्मणाचे कसब', 'शिवाजीचा पवाडा' हे जोतिबांचे ग्रंथ पद्यात्मक आहेत. जोतिबांची भाषा अव्यवस्थित, अशुद्ध व प्रसंगविशेषी अभद्रही आहे. परंतु तिच्यात त्यांचा उदार, त्यागी व परोपकारी आत्मा तळमळत असल्यामुळे एक प्रकारचा आवेश व त्वेष उतरला आहे. 'शिवाजीचा पवाडा' रचिताना त्यांना बाबा पदमनजी, गंगाधरशास्त्री फडके व विनायक बापूजी भांडारकर यांचे साहाय्य झाले होते. 'सत्यशोधक'[२] या नावाने त्यांनी 'मराठी भाषेवर एक पोवाडा' लिहिला आहे. त्यावरून त्यांचे मातृभाषेवरील व पर्यायाने बहुजनसमाजावरील प्रेम व्यक्त होते.[३]

मराठी भाषा थोर आमुची जोरदार खाशी। भले हो। जोमदार
हुरूप देउनि आम्हां, मिळविले वैरी तिणें धुळीशीं ॥ ध्रु. ॥

---

१. बालबोध, जानेवारी, १८९१.

२. हे उदाहरण 'सत्यशोधक'कृत असले, तरी फुले यांचे नसावे. पहा—साहित्यसहकार, नोव्हेंबर, १९६९.

३. मराठी शालापत्रक, अं. १, पृ. ४,

पूर्णत्वाला संस्कृत भाषा गेली तींतून
उच्चाराच्या सुलभपणास्तव प्राकृत जन्मुन
तीहुन सोप्या उच्चाराची, परि आवेशाची
निघे मराठी प्रशस्त भाषा महारठ्यांची ॥

'शिवाजीच्या पवाड्या'त जोतिबांनी महाराजांच्या वीरवृत्तीचा व मुत्सद्देगिरीचा गौरव केला आहे. तेव्हा निबंधमालेपूर्वीच्या काळात महाराष्ट्राला महाराजांची भूमिका कळली नव्हती, हा समज किती गैर आहे, हे उघड होईल –

मावळी गडी सोबतीला । शिपाई केले उघड्याला,
लढवी अचाट बुद्धीला । आचंबा भूमीवर केला,
वाटणी देइ शिपायाला । लोभ द्रव्याचा नाहिं केला,
राजा क्षेत्रांमध्ये पहिला । नाहीं दुसरा उपमेला,
युद्धीं नाहीं विसरला । लावी जीव रयतेला,
टळेना रयत सुखाला । बनवी नव्या कायद्याला,
दाद घेई लहानासानाची । हयगय नव्हती कोणाची.

भोळ्या-भाबड्या शेतकऱ्यांची करुण कहाणी सांगताना त्यांना नाडणाऱ्या मारवाडी सावकारावरील व ब्राह्मण कारकुनांवरील त्यांचा संताप प्रकट झाला आहे –

सरकारी पट्टी नेट । पडे तीन शेंड्या गांठ
कर्जरोखीं लिहिणें आट । निर्दय मारवाडी काट.
अज्ञान्याला समजत नाहीं । कुलकर्ण्यांनें लिहिलें कांहीं
वकिलाची महागाई । न्यायाधिशा दया नाहीं.

सरकारचा सारा, वकिलाची दामदुपटीची फी व न्यायाधीशाचे सहानुभूतिशून्य हृदय यांचीही जोतिबांनी हजेरी घेतली आहे. शेतकऱ्यांचे केविलवाणे असहाय जीवन रंगविताना ते म्हणतात —

कमरेपुरती लंगोटी । फिरती नांगराचे पाटीं,
ढोरामागें सर्वकाळ । पोरे फिरती रानोमाळ,
ताककण्या पोट भरी । धन्य म्हणे संसारी,
असे वस्त्राची कमती । एकमेकां चिकटती. [१]

जोतिबांच्या 'गुलामगिरी' या लहानशा संवादात्मक गद्यपुस्तकात त्यांनी समाजातील वरिष्ठ वर्गाकडून गोसारिबांवर होणाऱ्या अत्याचारांचे व अन्यायांचे तपशीलवार वर्णन केले आहे. त्यात त्यांनी कारकुनांना 'कलमकसाई' म्हटले आहे. त्यावरून त्यांना देशात साक्षरतेच्या प्रसाराची केवढी आवश्यकता होती, हे लक्षात येईल.

१. कृष्णराव पांडुरंग भालेकर, संपादक 'दीनबंधू', यांचे 'शेतकऱ्यांचे मधुर गायन' व 'सुबोध पवाडे' ही काव्ये याच धर्तीवर आहेत.

राजा शिवाजी या सुप्रसिद्ध क्रांतिकारक काव्याचे कर्ते महादेव मोरेश्वर कुंटे यांनी कोल्हापूरच्या राजाराममहाराजांच्या मृत्यूवर एक विलापिका रचिली आहे. तिच्यात नव्याजुन्या सामाजिक मतांचा संघर्ष, विधवाविवाह, परदेशपर्यटन इत्यादी तत्कालीन सुधारणांचा निर्देश आहे. जोतिबांप्रमाणे कुंट्यांनीही समाजास गांजणाऱ्या 'भटाई'वर बोट ठेविले आहे.

ते म्हणतात — अरे दोन वैरी जना गांजती कीं
लढाई, भटाई पिके हिंदुलोकीं.

पंडित, फुले व कुंटे यांच्याप्रमाणेच 'ज्ञानोदय' या ख्रिस्ती पत्रात हिंदूंचे वेडगळ आचारविचार, मूर्खपणाचे रीतीरिवाज व सणासुदीतील बीभत्स प्रकार यांच्या निषेधपर आणि सद्वर्तन व सद्विचार यांच्या प्रशंसेवर काही उपदेशपर व नीतिपर कविता प्रसिद्ध झाली आहे. तीही उपादेय व संग्राह्य आहे —

कशासाठीं केली । होळीची धुमाळी । कां रे! तुम्ही धूळी । उधळील्या?
कशासाठीं रस्तोरस्तींच्या ह्या दऱ्या । उपसल्या मोऱ्या । हवसेनें?
कशासाठीं पीठ । घेवोनी तांबडें । झालांत माकडे । मनुष्य हो?
कशासाठीं मुलां- । लेकरांदेखत । अभद्र बोलत । होतां तुम्ही?
काय तुम्हां लाज । जाळाया सगळी । सांगितली होळी । शास्त्रामध्ये?
सेवा एक देव । गुणाचा सागर । बारा बहात्तर । सोडोनी ह्या ॥ [1]

प्रस्तुत अभंगात होळीतील बीभत्स कृत्यांचा निषेध केला आहे. लोकहितवादी यांच्या शतपत्रांतही एक पत्र होळीतील दुराचारांविरुद्ध आहे.' सुधारलेला मेंढका ' (धनगर) या पुढील कवितेत व्यवसाय, बुद्धिमत्ता, लोकमान्यता व श्रीमंती या सर्वांपेक्षा नीतिमत्ता ही श्रेष्ठ आहे, हा विचार मांडिला आहे. धनगराकरिता योजिलेला 'मेंढका' हा शब्दही लक्षणीय आहे —

असो जाती धनगरु । रानीं मेंढे चारीत फिरूं
तरी आम्हां प्रियकरू । नीतिमंत.
वेडाविद्रा पिसा दिसो । लोकांमाजी मान्य नसो
तरी आम्हां मित्र असो । नीतिमंत.
न जाणो का छकेपंजे । उमजो न लोकगुजें
तरी आमुचे तो खाजे । नीतिमंत.
नसो अंगीं सोनें नाणें । नेसो कसे जुनेंपानें
तरी आम्हां तोचि माने । नीतिमंत.

समाजाला शिक्षण देण्यात आणि त्याला सुधारण्यात ज्यांनी आपले सर्व आयुष्य

१. ज्ञानोदय, १-३-१८५३.

वेचले व महाराष्ट्राला प्रौढ व प्रगत विचार शिकविले आणि प्रगल्भ व भारदस्त भाषा दिली, त्या गोपाळ गणेश आगरकरांनी 'शनिदेव ऊर्फ साडेसातीचा देव' या खोट्या समजुतीविरुद्ध लिहिलेल्या लेखात प्रसंगोपात्त केवळ विनोद म्हणून शनिदेवाची आरती रचिली आहे. तिच्यात शनीसंबंधी समाजात ज्या खुळ्या समजुती आहेत, त्यांचा हास्यकारक उपयोग करून 'सुधारक'पत्राच्या वाचकांना थकलेली वर्गणी पाठविण्याची सूचना केली आहे –

जय देव, जय देव, जय शनीराया
आज मज झाली बुद्धि तुजला वर्णाया । जय०
जे न 'सुधारका' पढतील त्यांसी
त्याची वा किंमत न देती त्यांसी
राशीसी येऊनी छळावें गा देवा !
वद नाहीं नामी हे पत्र का राया ? । जय०
वाचुनि याते जोडी जो तत्त्वज्ञानाला
संतती, संपती, उद्गति दे त्याला,
तैसेच, यांतील विचार ज्या मान्य
त्या महाराष्ट्रीयां दे सुखदान । जय०

या लोककवींचे काव्य ज्या काळी उत्पन्न झाले, तो काळ संक्रमणाचा होता. जुने जात होते व त्याच्या जागी नवे येत होते. या जा-येमध्ये मधूनमधून संघर्ष होत होते. पेशवाईची अखेर झाली असून इंग्रजांची दिवसानुदिवस सरशी होत होती. या संक्रमणकाळातील लोकांच्या मनःस्थितीविषयी विनायक कोंडदेव ओक म्हणतात – "इंग्रजांनीं आपणांस जिंकिले आहे, त्यापक्षीं त्यांचें सगळेच आपल्यापेक्षां चांगलें आहे, असें सर्व लोकांस वाटत होते. त्यांनी आमच्या लोकांची नसती निंदा केली, तीहि खरी वाटत असे. पुण्यासारख्या ब्राह्मण राजधानीस ब्राह्मण प्रभू नकोसा होऊन इंग्रज प्रभू आवडावा, एवढीच गोष्ट जरी पाहिली तरी, अव्वल इंग्रजींतल्या आमच्यांतल्या विद्वानांच्या मनाचा ओघ तसा वहावा, ह्यांचे कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. साखर दृष्टीस पडल्यावर गूळ कमी वाटावा, गुळाच्या ऐवजीं मध खायास मिळाल्यावर मध अधिक आवडावा, ह्यांत कांहीं विशेष नाहीं." [१] ओक म्हणतात, तशी वस्तुस्थिती होती. म्हणूनच परक्या राज्यकर्त्यांच्या कलाने कवितालेखन करणारे परशुरामपंततात्या गोडबोल्यांसारखे कवी

क्षमातळीं इंग्लिशांसारखा प्रभु नाहीं दुसरा,
घ्या सुख आतां, दुःखे पहिलीं सर्व तुम्ही विसरा. [२]

१. महाराष्ट्रवाङ्मय, पृ. ८९.
२. इतिहासावरील सोप्या कविता, इ. स. १८६४.

असे उद्गार काढीत होते, आणि महादेवशास्त्री कोल्हटकर व्हिक्टोरियास्तोत्र गात होते—

> व्हिक्टोरिया महाराणी । माझ्या आनंदाची खाणी
> तिजवर गावीं सुंदर गाणीं । ऐसे मज वाटे
> बहुत कायदे नवीन केले । नरनारींना सुखकर झाले
> लेखनवाचन गुण शिकवीले । शाळा काढोनी.

आणि कृष्णाजी परशुराम गाडगीळ यांचे 'देवी श्रीव्हिक्टुरिया सार्वभौमिनी' हे पद राष्ट्रगीताच्या पदवीचे होऊन शाळाशाळांतून गाण्यात येत होते. अतिरिक्त राजनिष्ठा हा या युगाचा एक भ्रामक गुण होता. पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेठकरांसारखे इतिहासाचे व्यासंगी नवशिक्षित कवीसुद्धा अठराशे-सत्तावनच्या उठावास बंड म्हणून नावे ठेवीत होते आणि नानासाहेब पेशव्यांसारख्या पुढाऱ्यास शलभ, वायस, गोमायू इत्यादी शेलक्या शिव्यांची बिशेषणे देत होते. वस्तुस्थितीचा विचार केला, तर असे दिसते की, राजसत्ता परक्यांच्या हाती गेल्यामुळे प्रजाजनांना परक्या राज्यकर्त्यांच्या स्तुतीशिवाय दुसरा विषयच नव्हता; आणि यदाकदाचित एखाद्या कवीने एखादा राजकीय विषय घेतला असता, तर तो राजद्रोही ठरून त्याचे लेखन जप्त झाले असते.

या देशात इंग्रजांचे राज्य येताच मुद्रण, तारायंत्र, अग्निरथ इत्यादी ज्या भौतिक सुधारणा आल्या, त्या पाहून येथील लोकांचे डोळे अगदी दिपून गेले होते. इंग्रज मनुष्य हा चमत्कार करणारा कोणी तरी 'सिद्ध' आहे, असे त्यांना वाटत होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर म्हणतात, "आमच्या पाश्चात्त्य बंधूंच्या अश्रुतपूर्व कलाकौशल्याच्या व विद्येच्या प्रभावाने आम्हांस चकित करून सोडले होते. 'इंग्रजाने कुडीत जीव घालावयाचा मात्र ठेवला आहे, बाकी सर्व काही केले आहे,' असे आमची भांबावलेली मंडळी म्हणू लागली होती कुणब्यामाळ्याच्या व बायकापोरांच्या तोंडीसुद्धा 'टोपीवाल्यानं केला कावा । आगिनगाडी घेते धावा' अशी आश्चर्यप्रेरित गीते गोवून बसली होती. तेव्हा आजपर्यंत इंग्रज लोकांविषयी व त्यांच्या सुधारणेविषयी आमच्या मनात एकेक विलक्षण कल्पना उद्भवून, हे कोणी अमानुष स्थितीतले प्राणी आहेत व त्यांच्यापुढे आम्ही कोण 'कोटस्थ कीटायते' असे क्षुद्र प्राणी आहो, अशा समजुती दृढ होऊन बसल्या होत्या."[1] चिपळूणकर सांगतात, त्याप्रमाणे अशा कल्पना केवळ अशिक्षितांच्याच नव्हे, तर खुद्द चिपळूणकरांचे विद्वान वडील कृष्णशास्त्री यांच्याही होत्या. कारण व्यापार, उद्योग, राजकारण इत्यादी क्षेत्रांत नव्या राजवटीमुळे काय-काय अनर्थ ओढवले आहेत, याचा विचार न करताच त्यांनी 'त्यांची वस्त्रे विणिती, रथ ओढिति, लोटतीहि नौकांते' अशी इंग्रजी कलांची व सुधारणांची तारीफ व तरफदारी आपल्या 'विद्येप्रशंसे'त केली आहे. गणपतराव हरिहर ऊर्फ बापूसाहेब पटवर्धन या कुरुंदवाडकर राजकवींच्या 'गंगावर्णना'तहि या विलायती यांत्रिक शोधांचे

१. केसरी, २८-२-१८८२.

कौतुक आहे. मात्र इंग्रजांनी आणिलेला हा निर्जीव 'चाक्या म्हसोबा' भारतातील व्यापारधंदे व कलाकौशल्ये यांच्या मुळावर आला असून तो हळूहळू परदेशी मालाला बाजारपेठा मिळवून देत आहे आणि या मायदेशातील कारागिरांना बेकार व भिकार करीत आहे, हे करुण सत्य अनेक लोककवींच्या लक्षात आले होते. १ फेब्रुवारी १८६९-च्या 'ज्ञानप्रकाशा'त या विषयावर 'अग्निरथाचा कहर' या मथळ्याचा संपादकीय लेख आहे. न्यायमूर्ती रानडे यांच्याही ध्यानात ही गोष्ट आली होती, हे त्यांनी इ. स. १८८९-मध्ये औद्योगिक परिषदेची स्थापना केली, त्यावरून दिसून येते. मात्र त्यांनी 'स्वदेशी'च्या निर्माणाचे, खपाचे व लाभाचे उपाय अन्य दृष्टींनी सुचविले आहेत.[1] आगगाडीने देशी उद्योगधंद्यांची पायमल्ली कशी केली आहे, याचे शंकाकुल चित्र गोविंद नारायण माडगांवकर यांच्या 'लोखंडी सडकांचा चमत्कार' या कटावात उमटले आहे. यात 'रेल्वे'ला 'लोखंडी सडक' हा प्रतिशब्द योजिला असून 'आगगाडी'ला 'धाडी' म्हणजे 'सत्यानाश करणारी' म्हटले आहे —

हिंदुस्थानीं अगीची गाडी । तिला बांधला मार्ग लोखंडी,
मनाचा ही वेग मोडी । मग कैचीं हत्तीघोडीं ?
अधीं निघाली युरोपखंडीं । प्रसार मोटा तिचा इंग्लंडीं.
तेथून आली भरतखंडीं । ऐशी तिची ही कथा उदंडी.
अजून पसरेल पिंडींब्रह्मांडीं । वृद्ध तथापि म्हणति 'धाडी',
गरिबांचा व्यापार मोडी । हिंदुस्थाना दरिद्र जोडी.

माडगांवकरांच्या या कटावापेक्षा शिवराम रामकृष्ण नित्सुरे यांची 'इंग्रजी कौशल्यें' ही लावणी जितकी मार्मिक, तितकीच मर्मभेदक आहे. तिच्यात 'शिळा छापखाना', 'आगगाडी' व 'तारायंत्र' यांची वर्णने व त्यांवर टीका आली आहे[2]

कैसीं इंग्लिशराज्यकौतुकें दावि पहा नयनीं
वाटे नवलचि बघतां अद्‌भुत देवाचि करणी.
एक गारुडी निखडा धोंडा मांडुनिया जवळीं
म्हणे, "लावितों पत्र लिहाया ह्यासचि ह्यावेळीं"
सर्वांगांते सारिलि त्याच्या मग शाई काळी
टाकुनि कागद वरी त्वरेनें झाकणही घाली
फुक मारुनि वरि काढुनि कागद दावि तया काळीं
दिसति वरी अक्षरें जशा काय मोत्यांच्या ओळी
नानाविध पत्रें तो यापरि दावितसे लिहुनी.

याचप्रमाणे आगगाडी आणि तारायंत्र यांचे वर्णन करून पुढे कवी म्हणतो —

१. न्या. रानडे यांचे चरित्र, पृ.४५९.
२. विविधज्ञानविस्तार, ऑगस्ट, १८७६.

काढुनि नाना युक्ति गारुडी भरती ते पोटें
बा, काय तुम्ही टकमक बघतां धरुनि मुखीं बोटें ?
साधायातें कसब तयांचें काय कठिण मोठें ?
जाणा अवघें तंत्र, गारुडीमंत्र नसें कोठें !
ना तरि जर बुडवाल सांगतों सत्य नव्हे खोटें
ठकास या भुलुं नका जपुन संभाळा पागोटें
म्हणे शिवाजी, 'देश आमुचा नेति पहा लुटुनी.'

या लावणीच्या शेवटीं कवींनी जो इशारा दिला होता, तो बरोबर नव्हता, असे आता कोण म्हणेल ? दीडशे वर्षांच्या राजवटीत इंग्रजांनी हिंदुस्थान धुऊन नेला, हे कठोर ऐतिहासिक सत्य आहे.

धार्मिक, सामाजिक व औद्योगिक कवितांप्रमाणे अव्वल इंग्रजीत काही राजकीय कविताही लिहिल्या गेल्या. परंतु त्यात फारसा असंतोष नाही. रावबहादुर पु. बा. जोशी यांचे 'भारतवर्षिणी' हे काव्य देशस्थितीवर आहे. त्यात तत्कालीन नवशिक्षितांच्या मनःस्थितीचे प्रतिबिंब पडले आहे. या काव्यात हिंदमाता आपल्या पुत्रांना 'देशाभिमानी व्हा,' असा उपदेश करीत आहे—

समुचित उपाय योजा प्राप्त कराया स्वराज्य निज देशीं
दे मातृभूमिसेवा पुण्य तसे दे न पंढरी, काशी;
उत्तम उपाय म्हणजे दहन करावे अनिष्ट भेदांचे
राष्ट्रैक्यास विघातक भेदच रिपु भारतीं स्वराज्याचे.
भेदा स्थान न द्यावें, सामाजिक हक्क सारखे द्यावे,
ब्राह्मणअब्राह्मण हे भेद कशाला निरर्थ मानावे ?
द्विजकुलसुशिक्षितांनीं ऐक्याचे कार्य आपुल्या हातीं
घ्यावें, तेणे होइल राष्ट्रीं सर्वत्र शांतता-प्रगती.

जातीयतावाद हा राष्ट्रीयतेच्या आड येतो, म्हणून त्याचा नायनाट करा, हा उपदेश करिताना रावबहादुर म्हणतात—

स्वजातिहितभावना जर दुणावली सज्जनीं
स्वदेशहितकल्पना मग न वाढ घे तन्मनीं
स्वजातिभजकां सुधी म्हणति कूपमंडक ते
रमेश न रमे तिथें, नच सुपात्र ते मुक्तिते
जळो ! वाणी वर्णी जननमहिते जी न वदनीं !
जळो ! तद्सद्विद्या प्रियतम न ज्याते स्वजननी
जळो ! ज्ञातिप्रीती विसरति जिथें जन्मविषयां
जळो ख्याती, ध्याती बुधजन जिथें ग्राम्य विषयां !

प्रत्येक राष्ट्रात लोककवींचे लेखन सदैव चालू असते. लोककवींची जीवनाशी एकरूपता असल्यामुळे त्यांच्या लेखनात त्यांच्या काळच्या धार्मिक, सामाजिक, औद्योगिक राजकीय इत्यादी क्षेत्रांतील चळवळींचे प्रतिबिंब पडलेले असते. परंतु हे लेखन जपून ठेवण्याची प्रवृत्ती नसल्यामुळे पुढे राष्ट्राचा किंवा समाजाचा इतिहास लिहिताना त्या काळाची माहिती मिळविणे कठीण जाते. तेव्हा त्या लेखनाचे लोक-जीवनातील स्थान ओळखून आणि त्याचे ऐतिहासिक महत्त्व लक्षात घेऊन त्याचा सांभाळ होणे आवश्यक आहे. आजपर्यंत त्याकडे दुर्लक्ष झाले व त्याची उपेक्षा झाली त्यामुळे आपणास सुसंगत इतिहासास मुकावे लागले आहे.



विष्णु मोरेश्वर महाजनी

१८५१ – १९२३



गोविंद वासुदेव कानिटकर

१८५४ – १९१८



जोतीराव गोविंदराव फुले

१८२७ – १८९०

## प्रकरण नववे

# नाट्यवाङ्मय

### एक

### रंगभूमीचा उदय

" महाराष्ट्र भाषेतील नाटककारांत अग्रस्थानी बसण्याचा मान ज्यांना **विष्णुदास** म्हणत असत, त्यांचा आहे. त्यांच्यामागून जे कोणी नाटककार - मग ते भाषांतरकार असोत किंवा स्वतंत्र कल्पनेचे असोत – झाले आहेत, त्या सर्वांना नाटक लिहिण्याची स्फूर्ती येण्याला कारण विष्णुदासांची नाटके आहेत. सारांश, महाराष्ट्र-नाटयकलेचे विष्णुदास हे भरतमुनि आहेत म्हटले तरी चालेल. "[१]

विष्णुदास भावे यांच्यासंबंधी शंकरराव मुजुमदारांनी काढिलेल्या वरील उद्गारांत यत्किंचितही अतिशयोक्ती नाही हे थोडा ऐतिहासिक विचार करिता सहज लक्षात येण्यासारखे आहे. विष्णुदास भावे यांनी आपले नाटयप्रयोग महाराष्ट्रात चालू केले, त्यापूर्वी निव्वळ मनोरंजनाच्या स्वरूपाचा कोणताही शिष्टसंमत प्रकार येथे रूढ नव्हता. बरीचशी करमणूक धार्मिक स्वरूपाचीच होती. यात्रा, सण, उत्सव या प्रसंगी जे विविध प्रकारचे खेळ वा सोंगे करमणूक म्हणून लोकांपुढे सादर करण्यात येत असत, त्यांचे विषयही देवादिकांचे आणि सांस्कृतिक परंपरेचे असत. गोंधळ, बहुरूप्याची सोंगे, गोविंदा, दशावतारी सोंगे, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ, भारुडे, ललिते इत्यादी लोकरंजनाच्या प्रकारात गणिल्या जाणाऱ्या विपुल कवित्वानेही ही गोष्ट लक्षात

१. महाराष्ट्रीय नाटककार यांची चरित्रे, विष्णुदास, शं. बा. मुजुमदार, पृ. ५–६.

येईल. कथा व पुराणे यांना मनोरंजनाच्या दृष्टीने मोठे महत्त्व असले, तरी धार्मिक पद्धतीचे लोकशिक्षणच या व्यासनारदांच्या वाक्पीठांच्याद्वारे समाजास प्राप्त होई. तमाशा आणि त्यात म्हटली जाणारी लावणी, यांमध्ये मात्र निव्वळ लौकिक स्वरूपाच्या मनोरंजनाचा भाग होता, हे मान्य करावे लागेल. परंतु ती करमणूक तितकीशी सुरुचिपूर्ण नव्हतीच व सर्वांना एकाच वेळी आस्वाद घेता येईल, अशी शिष्टमान्यही नव्हती. विष्णुदासांच्या सांगलीकर-मंडळीने महाराष्ट्रातील प्रमुख शहरांत जी पौराणिक नाटके केली, त्यांवर 'ज्ञानप्रकाश' या पत्राने दिलेले मत या दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहे. ज्ञानप्रकाशकार लिहितात, "या (सांगलीकर) मंडळीस शोकरस व वीररस उत्तम साधला आहे. भाषाहि शुद्ध, प्रौढ, मारु आणि यथातथ्य आहे. तात्पर्य हेच सांगणे कीं, या नाटकवाल्यानीं हलकटपणा ज्यांत बहुत होतो असे जे तमाशे, ललिते, यावरची रुचि बहुतेक उडविली व त्यांचे तमाशेहि कमी करून टाकले."[1]

'मराठी रंगभूमीचे जनक' ही पदवी ज्या विष्णुदासांना आता एकमुखाने देण्यात येत आहे, त्या विष्णुदासांपूर्वी मराठीच्या प्रदेशात स्वतंत्र अशी रंगभूमीही नव्हती, आणि रंगभूमीच नसल्यामुळे तीवर सादर करता येण्यासारखी नाटकेच लिहिली गेली नव्हती, असे अनुमान सरळच निघते. अर्थात राजवाड्यांसारख्या इतिहाससंशोधकांस हे मत मान्य नाही. तंजावरास नव्याने उपलब्ध झालेल्या 'लक्ष्मी-नारायण-कल्याण' या नाटकास (लेखनकाल सुमारे इ. स. १६९०) लिहिलेल्या प्रस्तावनेत ते लिहितात, "सांगलीतील विष्णुदास भाव्यांच्या पूर्वी मराठीत नाटककार **ज्ञानदेवां**पासून विष्णुदास भाव्यांपर्यंत अनेक झाले आहेत. तुकारामाने स्त्रीचे सोंग घेणाऱ्या नटाचे तोंड पाहू नये, म्हणून उद्गार आपल्या अभंगात काढले आहेत. ज्ञानेश्वराने काव्यनाटकांचा मोठ्या आदराने उल्लेख केला आहे. कर्नाटकाची व्युत्पत्ति करताना रामदासाने नाटकाचा उल्लेख केला आहे. ह्यावरून महाराष्ट्रात नाटके आज सहाशे वर्षे होत आली आहेत, असे दिसते.[2]

राजवाड्यांच्या या व्यापक स्वरूपाच्या विधानाचा विचारपूर्वकच स्वीकार करावा लागेल. कारण तुकारामाने उल्लेखिलेला नट हा केवळ स्वतःच सोंग घेऊन पोट भरणाऱ्या बहुरूप्यासारख्या व्यावसायिक जातीतला होता की, रंगभूमीवर संपूर्ण नाटक प्रयोगरूपाने सादर करणाऱ्या संघटित नटवर्गातील कोणी होता, हे सांगणे कठीण आहे. बहुधा तो पहिल्या वर्गात मोडणारा बहुरूपी नट असण्याचीच शक्यता अधिक आहे. कारण संघटित नटवर्गाने सादर केलेल्या संपूर्ण नाटकाचा लिखित वाङ्मयीन

१. ज्ञानप्रकाश, १८५६; शं. बा. मुजुमदार यांच्या 'अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे चरित्र' या पुस्तकावरून, पृ. २३.

२ संकीर्ण लेखसंग्रह, वि. का. राजवाडे.

पुरावा अद्यापि तरी उपलब्ध झालेला नाही. ज्ञानदेवांनी केलेला काव्यनाटकांचा उल्लेख हाही संस्कृतातील काव्यनाटकांसंबंधी असणेच अधिक शक्य आहे. त्याचप्रमाणे 'नाटक' शब्द वापरताना रामदासांच्या डोळ्यांपुढे बहुधा संस्कृत नाटकेच असावीत, किंवा अधिकाधिक म्हणजे कर्नाटकातील नाटके असावीत. कर्नाटकात, म्हणजे मराठीतर प्रदेशात जी नाटके अलीकडच्या संशोधनाने उपलब्ध झाली आहेत, तीही सतराव्या शतकापासून पुढच्या कालात लिहिलेली अशीच मिळतात. सारांश, केवळ नट आणि 'नाटक' या शब्दांच्या उल्लेखांवरून मराठीत फार प्राचीन काळापासून नाटके होत होती, असे मानणे पुराव्याच्या अभावी एकूण अशक्यच दिसते. कारण निव्वळ **मराठी प्रदेशात** मराठीच्या प्रारंभीच्या कालापासून अगदी अलीकडे म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत, म्हणजे विष्णुदासांपर्यंत, प्रयोगासाठी लिहिलेले एकही लिखित नाटक अद्यापि तरी उपलब्ध नाही. आता कर्नाटकात तंजावर येथे उपलब्ध झालेल्या नाटकांचा मात्र स्वतंत्र विचार करावा लागेल.

तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथालयात संगृहीत असलेल्या नाटकांची संख्या सुमारे ३५ असून त्यांतील पुष्कळशी नाटके भोसलेवंशीय राजपुरुषांनीच लिहिली आहेत. तंजावरच्या मठातील मेरुस्वामी या रामदासी संप्रदायातील लेखकाच्या हातचेही एक नाटक यांत आहे. व्यंकोजीचा मुलगा शहाजी याजपासून दुसऱ्या सरफोजीपर्यंत गादीवर आलेल्या भोसले-राजांनी ही नाटके लिहिली. म्हणजे सामान्यपणे इ. स. १६८२ ते इ. स. १८३३-पर्यंतच्या अदमासे १५० वर्षांच्या कालावधीत ही नाटके निर्माण झाली, असे दिसते. तंजावरच्या राजांनी स्वतः मराठीत नाटके लिहून मराठी नाट्यवाङ्मयाची मोठीच सेवा केली यात संशय नाही. त्यांच्या कृतींविषयी प्रा. बनहट्टी लिहितात : " भोसले-राजांना प्रेरणा दाक्षिणात्य 'यक्षगान' किंवा 'भागवत-मेल' नाटकाची खरी, पण त्यांनी त्या प्रकारातील नृत्यप्रधानता कमी करून वाङ्मयात्मकता वाढविली; आणि एकंदरीने नाट्यरचना अधिक प्रमाणात संस्कृताच्या धर्तीवर नेली. त्यांच्या नाटकांची कथानके इतकी कल्पनारम्य आहेत, भाषा इतकी भारदस्त व सुश्लिष्ट आहे, पदे इतकी काव्यपूर्ण आहेत, संवाद इतके वेधक व चटकदार आहेत की या नाटकांची माहिती जर सांगलीकर चिंतामणराव अप्पासाहेबांस असती तर महाराष्ट्र-रंगभूमीचे भाग्य केवढे तरी उजळले असते, असे वाटू लागते. विष्णुदास भाव्यांना मग नवीन कविता रचण्याचे कारण पडले नसते. भोसले-राजांची रचना ( तिचे उपलब्ध नमुने ) क्वचित प्रसंगी उत्तान व ग्राम्य आहे; पण वाङ्मयसौन्दर्याच्या दृष्टीने ती भाव्यांच्या कृतींपेक्षा निःसंशय उच्च दर्जाची आहे." [1] परंतु असे असूनही भोसले-राजांची नाटके हा मराठी रंगभूमीचा प्रारंभ का मानता येत नाही, यासंबंधी प्रा. बनहट्टी पुढे लिहितात, "भोसले-राजांचे प्रयत्न टिकले नाहीत. त्यांचा संबंध

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, श्री ना. बनहट्टी, भाग १, पृ. ४४.

महाराष्ट्राशी, मराठी मुलखाशी कधी जुळला नाही. भोसले-राजांची नाटके व त्यांचे प्रयोग केवळ दरबारी होते. तंजावरच्याच का होईना, पण मराठी जनतेने हे नाट्यप्रयोग आपलेसे करून त्यांच्या आधारावर आपली रंगभूमी चालू केली होती, असे म्हणण्यास आधार नाही. काचेच्या घरात लावलेल्या व सुकून गेलेल्या रोपट्याप्रमाणे त्यांची स्थिती झाली. म्हणूनच भोसले-राजांची नाटके हा मराठी रंगभूमीचा प्रारंभ हे म्हणणे मान्य करिता येत नाही. जिचे विवरण झाले पाहिजे, अशी मराठी नाट्याच्या इतिहासातील ती एक महत्त्वाची गोष्ट आहे हे निर्विवाद, पण ती महाराष्ट्राच्या रंगभूमीची सुरुवात नव्हे. तो मान आज तरी विष्णुदास भाव्यांच्या 'सीतास्वयंवर' या प्रयोगालाच दिला पाहिजे." [१]

मराठी रंगभूमी किती प्राचीन आहे, हे सांगण्याचा उपक्रम मराठी नाट्यकलेचा, म्हणजेच मराठी नाट्यवाङ्मयाचा इतिहास लिहिणाऱ्या बहुतेक लेखकांकडून करण्यात येत असतो. मराठी रंगभूमीच्या पायासंबंधी चर्चा करिताना ज्ञानकोशकारांनीही "ललितवाले तमासगीर याच्याप्रमाणे बहुरूपी यांनीही नाटकाचा पाया रचण्यास मदत केली आहे," असे विधान केले आहे.[२] ललित आणि तमाशे यांना तर ते नाट्यप्रकारच म्हणतात. ज्ञानकोशकारांना वाट पुसत श्री दंडवते यांनीही "बहुरूपे, गोंधळ, ललिते इत्यादी प्रकार हेच महाराष्ट्र-नाट्यकलेच्या इतिहासातले महत्त्वाचे टप्पे होत," असे मत दिले आहे.[3] प्रा. दांडेकरही लोकरंजनाच्या या जानपद प्रकारांना 'नाट्यप्रकार' मानतात. ज्ञानदेवांच्या काळापासून मराठी रंगभूमीचा, आणि मुख्यतः पौराणिक नाटकांचा पाया घालण्याचे काम या करमणूक-प्रकारांनी केले, असे सांगून ते लिहितात,: "कळसूत्री बाहुल्या, ललिते आणि तमाशा ह्या नाट्यप्रकारांनी मराठी रंगभूमीची बहुमोल सेवा केली आहे." [४]

ललित, भारूड, तमाशे, इत्यादी लोकरंजनाच्या प्रकारांना नाट्यप्रकार समजून चालणे किंवा त्यांनाच रंगभूमीचा पाया मानून त्यांना नाट्यकलेच्या इतिहासातील महत्त्वाचे टप्पे मानणे हे बरेचसे अशास्त्रीय आणि अनैतिहासिक स्वरूपाचे होय. दशावतारी सोंगे, भारुडे, ललिते, गौळण, गोंधळ इत्यादी लौकिक आणि पारमार्थिक स्वरूपाच्या खेळांत नाट्य किंवा काही नाटकीय गुण आहेत खरे; परंतु काटेकोर अर्थाने या खेळांना नाट्यप्रकार कदापि म्हणता येणार नाही. मात्र रंगभूमीने लोक-रंजनाच्या या प्रकारांतून विविध स्वरूपाची उचल करून, आपले कलेचे अंग पुष्ट केले आहे, हे नाकबूल करिता येत नाही. प्रारंभीच्या पौराणिक नाटकांतील सूत्रधाराचा

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, पृ. ४५.
२. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, भाग १६, नाट्यशास्त्र, पृ. १५२.
३. महाराष्ट्रीय नाट्यकला व नाट्यवाङ्मय, ग. रं. दंडवते, पृ. १२.
४. मराठी नाट्यसृष्टी, खंड १, पौराणिक नाटके, वि. पां. दांडेकर, पृ. २८.

पूर्वज कळसूत्री बाहुल्यांच्या खेळातील सूत्रचालकात हमखास सापडेल. आध्यात्मिक रूपके गाऊन खेळल्या जाणाऱ्या भारुडांच्या खेळात अन्योक्तिरूप अशा तत्त्वज्ञानात्मक ( Moralities ) नाटकाची मुळे स्पष्टपणे जाणवतील. एके काळी पौराणिक नाटकांत धुमाकूळ घालणाऱ्या विदूषकाचे अग्रज, तमाशामध्ये सोंगाड्याच्या, गोंधळात दिवटेभाउजीच्या आणि गणगौळणीत पेंद्याच्या ऊर्फ फाकडेभाउजीच्या रूपात वावरताना दिसतील. पौराणिक नाटकांतील गणपति-सरस्वतींच्या आगमनाचा प्रास्ताविक भाग हा मूळचा ललितदशावतारादी धार्मिक करमणुकीच्या खेळांमधून घेतलेला आहे, हे सांगावयास नकोच.

परंतु या सर्व चर्चेत मराठी रंगभूमीचा उदय वा प्रारंभ नेमका कशातून आणि केव्हा झाला, याचे निश्चित उत्तर हाती लागत नाही. मराठी रंगभूमीचे मूळ किंवा पाया यांचा शोध लावताना प्रथम 'रंगभूमी' हा शब्द सर्वार्थाने आणि निश्चितार्थाने समजून घेतला पाहिजे. कारण ' रंगभूमी ' म्हणजे काय, याची स्वच्छ व स्पष्ट कल्पना नसेल, तर कोणताच शास्त्रीय वा ऐतिहासिक विचार करणे शक्य होणार नाही. या बाबतीत प्रा. बनहट्टी यांचे विचार ग्राह्य ठरण्यासारखे आहेत. ते लिहितात, " निव्वळ तमाशात पुष्कळ नाट्य असते, तसेच ते साध्या हरिकीर्तनातही असते. मग देवताच्या उत्सवप्रसंगी जी ललिते अथवा खेळ करण्यात येतात, त्यांत नाट्यकला बऱ्याच परिपुष्ट स्वरूपात आविर्भूत झालेली दिसल्यास त्यात काय नवल ? परंतु हे नाट्यकलेचे आविर्भाव म्हणजे रंगभूमी नव्हे. नाट्यकलेचे प्रदर्शन करण्याच्या उद्देशाने सर्व साधनसंसार एकत्रित करून निर्मिलेली व कलादृष्ट्या स्वयंपूर्ण अशा नाट्यप्रयोगाच्या रूपाने समाजाच्या प्रत्ययास येणारी संघटना म्हणजे रंगभूमी होय. रंगभूमी ही नाट्यास प्राधान्य देऊन अस्तित्वात आलेली सामाजिक संस्था होय...विष्णुदासांना ( आपण ) रंगभूमीचे जनक म्हणतो, ते याच अर्थाने. त्यांनी नाट्यकलेसाठी जरूर त्या साधनासंभारासह स्वतंत्र असे अधिष्ठान निर्माण केले. नाट्यप्रयोग हेच जिचे उद्दिष्ट अशी संघटना निर्माण केली. तेव्हा ते मराठी रंगभूमीचे निर्माते होत, ही गोष्ट निर्विवाद आहे. "[१]

## विष्णुदासांची पौराणिक स्वरूपाची नाटकाख्याने

खरे म्हणजे भिन्न रुचींच्या व भिन्न वर्गांच्या जनांचे एकाच वेळी समाराधन करील, असा लोकरंजनाचा स्वतंत्र संघटित प्रकार वा संस्था महाराष्ट्रात आतापावेतो अस्तित्वात नव्हती. स्वतः विष्णुदास यासंबंधी लिहितात, " कर्नाटकांतहि कांही नाटकें करीत, परंतु त्यांत मनोरंजन कांहींच नसे. सोंगाचे वेष तर फारच खराब असत. सर्व पात्रांनी गाऊन नाचावयाचे, मग त्यास गाणे येवो अगर न येवो. हे खेळ पाहून गांवढळ लोकांचे मन रिझे; परंतु विद्वानांस त्यापासून आनंद न होतां उलटा त्रास

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, श्री. ना. बनहट्टी, खंड १, पृ. ६३.

मात्र होई. महाराष्ट्र देशांत उत्साहांत ललितप्रसंगी व तमाशांत मात्र सोंगें घेऊन कांहीं हास्यकारक बीभत्स प्रहसनें होत. परंतु ही नाट्यकला त्यांस माहीत नव्हती." [1] सांगलीचे श्रीमंत चिंतामणराव अप्पासाहेब हे गुणग्राही व रसिक असे संस्थानाधिपती होते. सांगलीस आलेल्या कर्नाटकातील 'भागवत' मंडळीची त्यांच्या दृष्टीने कलाहीन व धांगडधिंग्याच्या स्वरूपाची नाटके पाहून "असले कलाहीन प्रकार पाहण्यापेक्षां यांत चांगली सुधारणा केली तर हा विषय उत्तम जनमनरंजनाचे साधन होईल व त्यांत पौराणिक कथाभागांचीं नाटके होऊं लागल्यास गोंधळ, ललित, रास, भागवत, आटा व बीभत्स तमाशे यांपेक्षा लहानथोर स्त्री व पुरुष इत्यादिकांना पाहण्यायोग्य असे सद्धर्मप्रवर्तक एक करमणुकीचे नवीन साधन निर्माण होईल."[2] या हेतूने त्यांनी आपल्या पदरचे कल्पक, हरहुन्नरी तरुण विष्णुपंत यांना तशी नाटके करण्यास आज्ञापिले.

विष्णुदासांचा नाट्यव्यवसाय ही खरोखर त्या काळी महाराष्ट्रातच नव्हे, तर समग्र भारतात एक अपूर्व अशी सामाजिक आणि सांस्कृतिक घटना ठरली. इंग्रजी राज्याच्या पूर्वीच्या काळात भारतात नाट्यव्यवसाय – जर तो असलाच तर – जातिकुलविशिष्ट असावा. विष्णुपंत भावे यांनी मात्र तो आपला जातिकुलधर्म नसताही नाटकाचा पेशा पतकरून एक नवे मन्वंतर चालू केले. विष्णुदास हे असामान्य प्रतिभेचे उद्योगी व कल्पक कलाकार होते, हे खरेच. परंतु दुसरीही एक गोष्ट अशी की, कलेचा विकास वा संपूर्ण कायाकल्प घडवून आणण्यास पिढीजाद व्यावसायिक जातीव्यतिरिक्त जे कोणी नवे लोक त्या कलेत नव्याने पदार्पण करितात, तेच काहीतरी एकदम नवे असे कलेला प्राप्त करून देतात व तिच्या विकासास प्रामुख्याने कारणीभूत होतात. [3] भाव्यांच्या बाबतीत हेच घडले. भावे हे स्वतः हरिदास, कीर्तनकार, गोंधळी, डवरी वा तमाशेवाले यांपैकी कोणत्याच जातीय व्यवसायाचे वा परंपरेचे नसल्यामुळे नवा हेतू व नवे साध्य कल्पून एकदम नवीन अशा प्रतिभेने त्यांनी हा संपूर्ण नवाच असा व्यवसाय जन्मास घातला. नित्य बदलणारे युग व त्याची बदलती गरज आणि अभिरुची, जुनेच टिकवून धरणाऱ्या पारंपरिकांच्या ध्यानीही येत नाही. त्या दृष्टीने नवीन माणूस हा नव्या युगात जगत असल्यामुळे आणि नव्या युगाच्या जाणिवेत तो वाढत असल्यामुळे निराळे, स्वतंत्र असे काही करण्याची प्रेरणा त्याला याच नव्याने प्राप्त झालेल्या जाणिवेतून मिळत असते.

इ. स. १८४३-मध्ये सांगलीस आपल्या आश्रयदात्यांसमोर 'सीतास्वयंवर'

१. नाट्यकवितासंग्रह, विष्णु अमृत भावे, प्रस्तावना, पृ. ५.

२. आद्य महाराष्ट्र नाटककार विष्णुदास, वा. ग. भावे, पृ ५०.

3. Each change of lierary convention would be caused by the rise of a new class or at least a group of people who creat their own art. — Theory of Literature, Wellek and Warren, p. 279.

या स्वरचित, अभिनव नाटकाचा प्रयोग करून विष्णुदासांनी एका नवीनच युगाला जन्म दिला. पुढे आश्रयदात्यांच्या मृत्यूनंतर अगतिक होऊन या नव्या उद्योगात झालेले कर्जवाम फेडण्यासाठी विष्णुदासांना संस्थान सोडून बाहेर स्वारीस निघावे लागले; पण यामुळेच त्यांच्या कर्तृत्वाचा अधिक बोलबाला झाला. त्यांच्या पुण्या-मुंबईच्या दौऱ्यांमुळे महाराष्ट्रात करमणुकीचे एक नवे क्षेत्र निर्माण झाले. विष्णु-दासांपासून स्फूर्ती घेऊन अनेक नाटकमंडळ्या निघाल्या. नाट्यलेखक निर्माण झाले, आणि 'जिकडे तिकडे नाटकेच होऊन गेली.' ही अपूर्व क्रांती होती. कै. कृ. आ. गुरुजी यालाच 'पहिले स्थित्यंतर' म्हणतात. कळसूत्री बाहुल्या, कर्नाटकी खेळे, रामलीला या प्रकारांचे रूपांतर करून हे पहिले स्थित्यंतर विष्णुदासानी केल्याचे सांगून ते पुढे लिहितात, "कै. विष्णुदास कवींनी आपल्या कृतीने जे स्थित्यंतर केले, त्यातील पहिले स्थित्यंतर नामकरणाचे होय. नाटक हा शब्दच त्या वेळी संस्कृतज्ञ अथवा मॅक्लॉकसाहेबाचे सेरीजातील विद्वान अथवा कै. माधवशास्त्री कोल्हटकरासारखा फर्डा लेखक व रंगेल वक्ता यांच्यासारख्या थोड्यांस काय माहिती असेल तेवढेच. बाकीच्यांस हा शब्द माहीत नव्हता. तो त्यांनी प्रचारात आणला."[१]

विष्णुदासांच्या युगप्रवर्तक कार्याविषयी प्रा. बनहट्टी लिहितात, "कवितारचना म्हणजे विष्णुदासांच्या कृतीचा सारभूत अंश नव्हेच मुळी. नाट्यप्रयोगाची एक विशिष्ट पद्धत निर्माण करून त्या पद्धतीनुसार नाटक करून दाखविणारी एक स्वतंत्र, संपूर्ण चैतन्यमयी संघटना त्यानी निर्माण केली आणि अशा रीतीने महाराष्ट्राला, किंबहुना सर्व भारत देशाला, रंगभूमी त्यांनी उपलब्ध करून दिली, हे त्यांच्या कामगिरीचे सार-सर्वस्व." प्रा. बनहट्टी पुढे लिहितात, हे "निरनिराळे प्रवेश अथवा कचेऱ्या निश्चित करणे, पात्रांचे आगमनिर्गम ठरविणे, पात्रांची भाषणे स्थूल मानाने मनामध्ये योजून ती त्या-त्या पात्रांना शिकविणे, नंतर त्यांना अभिनयाचे धडे देऊन त्यांच्या तालमी घेणे, पात्रांचे पोषाख, किरीटकुंडले, भुजा-अलंकार इत्यादी तयार करणे, सूत्रधाराला गाणे व त्याच्या साथीदारांना साथीचे काम शिकवणे, हे सर्व विष्णुदासांनाच करावे लागे; म्हणजे नाटककार, पत्रकार, दिग्दर्शक, तालीममास्तर, कपडेवाला, रंगवाला, सर्व कांही तेच होते. या सर्व तपशिलाबाबत पूर्वीची रूढी, परंपरागत नमुना त्याच्या-पुढे काही नव्हता. कानडी नाटकाचा कित्ता त्यांच्यापुढे होता; पण तो तात्पुरता व अपुरा होता; त्यासच ओबडधोबड वाटत होता आणि महाराष्ट्राच्या जीवनास व अभि-रुचीस अनुसरून नव्हता. त्यात भाषेचे अंग अगदी तोकडे होते. तेव्हा वर उल्लेखिलेल्या सर्व गोष्टी निर्माण करून रंगभूमीचा जो एक साचा त्यांनी निर्माण केला, तो पौराणिक नाटक या नावाने पुढे पन्नास-साठ वर्षे तर चालू राहिलाच; पण संगीत-नाटक,

१. नाटकाची स्थित्यंतरे, कृ. आ. गुरुजी, रंगभूमी, वर्ष ४, अं. ११–१२, पृ. ४ आणि वर्ष ५, अं. १.

गद्य-नाटक इत्यादी नाट्यप्रकारांनादेखील तो मूळ पाया म्हणून उपयोगी पडला, सर्व गोष्टी मुळापासून निर्माण करण्याचे काम त्यांच्यानंतर मराठी रंगभूमीवर कोणासच करावे लागले नाही. हे सर्व लक्षांत घेतले म्हणजे विष्णुदासांच्या उन्मेष-शालिनी प्रतिभेची कल्पना येते आणि महाराष्ट्राचा भरतमुनी किंवा रंगभूमीचा विश्वकर्मा या पदव्या ज्या त्यांस देण्यांत येतात, त्या यथार्थ असल्याची खूण पडते." [१]

भाव्यांच्या नाट्यप्रयोगांचा जमाना आता व्यक्तीपुरताही नव्हे, तर इतिहासा-पुरताच स्मृतिशेष होऊन राहिला आहे. भाव्यांच्या मागे उरला आहे, तो आपल्या नाट्यनिवृत्तीनंतर त्यांनी छापिलेला 'नाट्यकवितासंग्रह', त्यांच्या कृतिप्रधान नाटकांचा क्षीण व केवळ तांत्रिक शब्दात्मक आधार. या कवितेसंबंधी स्वतः विष्णुदासच लिहितात, "ही कविता केवळ नाटकांतील पात्रांत बोलण्याच्या सूचनेकरिता केली आहे; याकरितां विशेष पाल्हाळ न करितां कवितेत तांत्रिक मजकूर मात्र घेतला आहे. येणे-करून प्रांप्टर(सूचका)चे काम होऊन मध्यें नाटकांत जो खंड पडतो तो या कवितेनें भरून दिसतो" [२] असे जरी असले, तरी वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने या कवितेचे महत्त्व विशेष आहे, असे दिसून येईल. नाट्यकला व वाङ्मय यांचा अन्योन्य व अनन्य असा संबंध असल्याची जाणीव भावे यांना होती, असे दिसते. ते लिहितात, "पुढे या कृत्यास लागण्याच्या पूर्वी बरेच महाराष्ट्र ग्रंथ मीं वाचले व पौराणिक इतिहास समजून घेतला. रामायणापैकीं प्रथम सीतास्वयंवराख्यान तयार करावे असे मनांत आणिलें. त्यास कांहीं संगीत पाहिजे. त्याकरितां पुष्कळ हरिदास वगैरे लोकांकडून कविता मिळविण्याच्या उद्योगास लागलो. प्रथम ती कविता मिळविण्यास मला फार खटपट पडली व पहातों तो ती आर्याश्लोकबद्धच फार. संगीतास उपयोगी पडणारी व शृंगार, वीर, करुण इत्यादि त्या त्या रसाला अनुकूल रागांत कविता बिलकूल नाहीं. मग स्वतः ते आख्यान रसाला अनुकूल असे रागांत तयार केलें." [३] आजच्या वाङ्मयविमर्शकांना भाव्यांची नाट्यकविता वैदग्ध्याच्या दृष्टीने जरी फारच साधी व सामान्य वाटली, तरी तीमध्ये नाट्यानुकूल रसच नव्हता, असे मात्र म्हणता येणार नाही. मुजुमदार लिहितात, 'रामायण, महाभारत व भागवत यांतील उत्तम प्रसंगांवरचे प्रयोग त्या वेळी लोकांना तल्लीन करून सोडीत असत. हरिश्चंद्र-आख्यान, भरतभेट यांसारखी शोकरसपूर्ण नाटके असली की, लहानमोठे प्रेक्षक रडले नाहीत असे कधी होत नसे." [४] अर्थात या सर्व सफल दृश्य प्रयोगांचा रसात्मक आधार म्हणजे सूत्रधाराची रंगभूमीला व्यापून राहिलेली नाट्यकविता हाच होता, हे विसरून चालणार नाही.

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, श्री. ना. बनहट्टी, खंड १, पृ. ११८–१२१.
२. नाट्यकवितासंग्रह, वि. अ. भावे, प्रस्तावना, पृ. ९.
३. नाट्यकवितासंग्रह, पृ. ६.
४. महाराष्ट्रीय नाटककार, विष्णुदास, शं. बा. मुजुमदार, पृ. ८.

रसानुकूल रागरागिण्यांमध्ये पद्यरचना करून, ती भावपोषक अशा विविध ताललयीत गुंफून विष्णुदास कवींनी आपला वाग्गेयकाराच्या ( the poet and composer ) पदावरचाही अधिकार सिद्ध केला आहे. रसानुकूलता व गोडी उत्पन्न करण्यासाठी रागमिश्रणाचे प्रयोग करून प्रसंगी चारचार, पाचपाच रागही एकाच पदात त्यासाठी योजिले आहेत कर्नाटकी चाली आणि राग नाट्यसंगीतासाठी वापरण्याचा प्रथम पायंडा त्यांनी पाडला. भाव्यांनी योजिलेल्या रागरागिणींकडे पाहिले, म्हणजे आजही अवघड व नवीन वाटतील असे कितीतरी राग व रागमिश्रणे त्यांनी त्या वेळी रंगभूमीवर प्रचारात आणिल्याचे दिसेल. कवित्वरचनेसाठी त्यांनी संस्कृतातील धीरगंभीर अशा प्रदीर्घ अक्षरगणवृत्तांचा उपयोग केलेला दिसतो. पण त्याचबरोबर ते खास मराठी छंदांनाही विसरले नाहीत. ओवी, घनाक्षरी, कटाव, पाळणे, अभंग, दिंड्या, साक्या, अजनीगीत, लोकप्रिय स्त्रीगीतांच्या चाली इत्यादी सर्व काही त्यांनी आपल्या नाट्यकवितेसाठी योजिले, आणि त्यामुळेच परशुरामपंत-तात्यांच्या व इतरांच्या संस्कृत नाटकांच्या मराठी भाषान्तरात संस्कृत श्लोकांचे भाषान्तर मराठी छंदांत करण्यास भाव्यांनी निर्माण केलेली परंपरा उपयोगी पडली. भाव्यांच्या आख्यानांची यादी पाहिली, तर पुढच्या झाडून सर्व पौराणिक नाटककारांना नवी आख्याने शोधण्याचे कष्ट बहुधा घ्यावे लागले नसावेत, असेच वाटते. भाव्यांचीच आख्याने त्याना पुरली. फक्त कवितेच्या ठिकाणी त्यांनी गद्यसंवाद रचिले. भाव्यांचे कवित्व अतिसामान्य, असे जरी आजच्यांना कितीही वाटत असले, तरी भाव्यांची नाट्यकविता त्यांच्या व्यवसायाच्या भरभराटीत व व्यावसायनिवृत्तीनंतरच्या काळात पुढे कितीतरी वर्षे लोकप्रिय होती. जुन्या विषयावर नव्याने नाटक लिहिणारा नाटककार खुशाल भाव्यांची कविता ( अर्थात मोकळेपणाने ऋण मान्य करून ) आपल्या नाटकात वापरी. १८७४ साली ' रासक्रीडा ' नाटक रचणारे लेखक डेव्हिड हाइम हे आपल्या नाटकासाठी स्वतःचीच पदे घालणार होते. परंतु " नाटकशाळेत काम करून दाखविणाऱ्या उमेदवारांच्या प्रचारांत " असलेली भाव्याचीच पदे त्यांना गोड वाटून तीच कायम केल्याचे त्यांनी प्रस्तावनेत सांगितले आहे. या कवितेच्या लोकप्रियतेमुळेच भाव्यांनी व्यवसायनिवृत्तीनंतर तेवीस वर्षांनी म्हणजे १८८५ साली आपला 'नाट्यकवितासंग्रह' पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला. भाव्यांच्या रचनेची कल्पना ' वालीवध व हनुमंताचे किर्किंदीं आगमन ' या आख्यानातील पुढील पदांवरून येण्यासारखी आहे.

**राग झिंजोटी, ताल त्रिवट**

मम रूपापरि रूप प्रियेचें अंगा सुवास असे अंजनीसूता
सीताशुद्धीस जायी त्वरे हनुमंता येऊन कळवी मज असे कोठे कांता.
तिजसंनिध पाषाण वृक्ष ते असती नाम मम स्मरीत सूता
मुद्रा खूण ही प्रिये दाविता समजेल मम सेवक तुज सीता.

शिरीं हस्त ठेऊन कपीच्या राम म्हणे जाईं त्वरे आतां
विष्णुदास म्हणे वानरगणसह निघे शोधाया जनकदुहिता.[1]

## मराठी पौराणिक नाटकाचें मूळ

भावे यांच्या 'तागडथोम' नाटकांच्या प्रायोगिक अंगाचे मूळ कर्नाटकी भागवतमंडळीच्या खेळात की इकडच्या ललित, दशावतारी नाटकांत, यासंबंधी काही वाद असला, तरी भावे यांच्या नाटकांच्या वाङ्मयीन अगाची मूळ परंपरा ही खास जुन्या कवींच्या पौराणिक आख्यानक कवितेत असल्याचे स्पष्ट दिसेल. भाव्यांना प्रयोगसिद्धीसाठी आठवली, तो ही जुन्या कवींची आख्यानकरचना. भाव्यांच्या पूर्वी मराठीत नाटके लिहिली गेली नव्हती, हे जरी खरे असले, तरी जुन्या मराठी कवितेचा अभ्यास करिता असे दिसते की, प्रत्यक्ष नाट्य जरी नाही, तरी 'नाटकरीती'ची रचना करण्याच्या उद्योगास मराठी कवी लागले होते. सर्व काही नवीन करीत असताना भाव्यांना या 'जुन्या ठेवण्या'चा अप्रत्यक्षपणे परंतु निश्चित उपयोग झाला असावा, असे वाटते. महाराष्ट्रात पूर्वी नाटके नव्हती, परंतु रसांचा रंग जमविणारे कीर्तनकार, पुराणिक होते. रसाळ आख्याने रचून ते आपले एकपात्री नाटक रंगवून रंगभूमीची उणीव काही अंशाने भरून काढीत असावेत, असे वाटते. मध्यंतरी शिवकालात वामन, नागेश, विट्ठल इत्यादी काही मराठी कवींनी अनेकवृत्तात्मक अशी स्फुट स्वरूपाची आख्याने रचण्याचा पायंडा पाडून नाट्याच्या विकासास नकळत हातभार लावण्याचे थोडेफार काम केले आहे. आख्याने, उपाख्याने यांचा प्रदीर्घ पुराणांतून आणि महाकाव्यांतून, ज्यात मानवी म्हणजेच लौकिक रस अधिक आहे असे एखादे आख्यान निवडून त्यावर स्वतंत्र रचना सादर करण्यात या कवींनी केवळ कथाकथनापेक्षा नाट्योपयोगी असे संविधानरचनेच्या दिशेने वाङ्मयीन विकासाचे पुढचे पाऊल टाकिलेले दिसून येते. आटोपशीर कथाभाग निवडिल्यामुळे पात्रांचे स्वभावही यथायोग्य रीतीने रेखाटून त्यांच्या भावनांचे प्रकटीकरण करण्यासही येथे अवसर सापडला. आपल्या आख्यानांची अनेकवृत्तात्मक रचना करून आणखी एक गोष्ट या कवींनी साधली. कथनाच्या प्रवाहाला योग्य असे एकच-एक असे प्रवाही वृत्त न वापरता त्यांनी संस्कृतातील विविध अक्षरगणवृत्ते व मराठी प्राकृतातील अनेक गेय छंद यांचा उपयोग केला. आता त्यांच्या रचनांत प्रत्येक वेळी भावभेदाप्रमाणे वृत्तभेद आला आहे, असे जरी काटेकोरपणाने दाखविता आले नाही, तरी या शैलीत तीमुळेच कथाकथनावरचा भार कमी करून वृत्तवैचित्र्याने भावाविष्कारावर अधिक भार आणण्याचा प्रयत्न साधण्यात आलेला आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे. बीडकर विट्ठलाने 'सीतास्वयंवर' हे आख्यान-काव्य सप्तसर्गात्मक आणि अनेकवृत्तात्मक असे

१. नाट्यकवितासंग्रह, पृ. ६७.

लिहिले आहे; आणि विशेष असे की, हे काव्य आपण ‘नाटकरीती’ने रचीत आहो, असे त्याने प्रारंभीच स्पष्ट केले आहे. [1]

मराष्ट्रे होत्साते चतुर जनिं हें मान्य करिती,
मनाच्या उल्हासे रचिन तरि मी **नाटकरिती.**

मराठी रंगभूमीचे जनक कै. विष्णुदास भावे यांनी केलेल्या पहिल्या नाटकाचे नाव ‘सीतास्वयंवर’च होते, हे सहज स्मरणात येण्यासारखे आहे. अर्थात विट्ठलाला केवळ संवादांपलीकडे व सांकेतिक रसवर्णनापलीकडे ‘नाटकरीति’ अशी फारशी माहीत नसावीसे वाटते. स्वतंत्र व्यक्तिदर्शन किंवा व्यक्तीच्या विविध विचारभावनांचे तिच्याच मुखाने प्रथमपुरुषी प्रकाशन हा जो खऱ्या नाटकाचा प्राण, त्याची विशेष कल्पना विट्ठलास नव्हती. अर्थात एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास प्रथमच नाटकाख्याने लिहिणाऱ्या भाव्यांच्या बाबतीतही तेच होते. दोघांनीही कविताच लिहिली. भेद एवढाच की, विट्ठलाने अनेकवृत्तात्मक श्लोकबद्ध कविता लिहिली, तर भाव्यांनी वृत्तात्मक रचनेच्या जोडीला विविध ‘रागियती’तील पदरचना केली. खऱ्या नाट्यात कथन जे अप्रत्यक्ष आणि पात्रांच्या कृतीतून व उक्तींतून होत असते, ते येथे फारच अल्प प्रमाणात सापडते. कवितेमध्ये विट्ठल हा कवी म्हणून कथन करितो, तर नाटकात भावे स्वतः सूत्रधार बनून कथन करितात.

कीर्तनाख्यानांना उपयुक्त अशा रचना करणाऱ्या आनंदतनय आणि रघुनाथपंडित या कवींनी नाट्याच्या दृष्टीने उपकारक अशी आणखी काही प्रगती केली. या कवींच्याच अनेकवृत्तात्मक व अनेकछंदात्मक आख्यानांमध्ये पात्रांना स्वतंत्र व्यक्तित्व मुखांतून व स्वीय भावना पदांतून म्हणजेच ‘लिरिकल’ अशा ‘गीत’शैलीतून व्यक्त करून दाखविण्याचा कौतुकास्पद प्रयत्न करण्यात आलेला आहे. “कोण तूझ्या मनासि येतो, सांग हो सीते ” [2] हे आनंदतनयाचे सीतास्वयंवराख्यानातील पद अलीकडील एखाद्या पौराणिक नाटकातलेच असल्यासारखे वाटेल. “सांग सीते यांतिल नृपवर कोण आवडे तुजसीं। सुकुमार लाडके बाळे सांग त्वरे ते मजसीं ” या विष्णुदासांच्या सीतास्वयंवरातील पदात आनंदतनयाच्या पदाची छाया स्पष्टच दिसते. आनंदतनयाच्या ‘सुदामचरिता’तील “ऐशी देखिली द्वारका दीनोद्धारका। विविध उपवनें, मलयजपवने डोलति फळदळकुसुमभरे।...आनंदतनय म्हणे प्रतिमंदिरिं नवनिधि नांदति बहुत बऱ्या ”[3] ह्या पदाने तर एकोणिसाव्या शतकातील नाटककारांसाठी नगरवर्णन, वनवर्णन, भवनवर्णन यासाठी पद, कटाव इत्यादी योजण्याचा एक संकेतच रूढ करून दिला. आनंदतनयाप्रमाणेच भाव्यांनी ‘विष्णुदास म्हणे’ अशी, इतकेच

१. विट्ठलकृत सीतास्वयंवर, सर्ग १, श्लोक १०.
२. महाराष्ट्रकवी आनंदतनयकृत कवितासंग्रह, पृ. १५.
३. तत्रैव, पृ. ५१.

काय, पण भाषांतरकर्त्या परशुरामपंततात्यांनीही 'नारायणसुत म्हणे' अशी स्वनाम-मुद्रा पदांत ठेवून दिली आहे. कटाव तर आनंदतनय अमृतराय इत्यादी कवींनी कीर्तनाख्यानांत आधीच लोकप्रिय केला होता. रघुनाथपंडितांच्या दमयंती-स्वयंवराख्यानातही उत्कृष्ट पदे आली आहेत. 'हर हर सांपडलों, सापडलो। कैसा फांशीं पडलो' या हंसाच्या तोंडी घातलेल्या पदात हंसाच्या आत्मपर भावनांचे किती उत्कट आणि नाट्यपूर्ण प्रकाशन झाले आहे, हे सांगण्याची आवश्यकता नाही.

सारांश, भावे यांच्या पौराणिक नाट्याख्यानांचा वाङ्मयीन उगम हा जुन्या मराठी आख्यानक कवितेत असल्याचे स्पष्ट दिसून येते. किंबहुना, मराठीतील सर्व जुन्या-नव्या पौराणिक नाटकांच्या कर्त्यांना मुक्तेश्वर-श्रीधर-आनंदतनयादी रससिद्ध कवींच्या स्फुट वा प्रदीर्घ आख्यानक रचना स्फूर्ती देणाऱ्या ठरल्या आहेत. मराठीच्या या प्राचीन कवींनी ही रसप्रचुर पुराणे व आख्याने लिहिल्यामुळेच मराठीत पौराणिक नाट्य निर्माण झाले. विष्णुदासांनी ही सर्व जुनी आख्यानपर मराठी कविता पाहिली होती. मराठी रंगभूमी ही जी पहिल्यापासून देशी वाणाची ठरली, त्याचे मुख्य कारण हेच आहे. विष्णुदासांपासून खाडिलकरांपर्यंतच्या पौराणिक नाटके लिहिणाऱ्या सर्वांना मराठीतील जुनी कीर्तनोपयोगी आख्याने आणि पुराणाख्याने रसासाठी, विषयासाठी आणि विशिष्टहेतुसिद्धीसाठी उपयुक्त आणि मार्गदर्शक ठरली आहेत.

### कृतिप्रधानतेवर भर

नाट्यचर्चेच्या दृष्टीने विचार करावयाचा झाला, तर विष्णुदासांच्या नाटकांत वाङ्मय या अर्थाने नाट्यप्रबंधापेक्षा नृत्य, गायन, अभिनय वगैरे कृतिप्रधान अशा गोष्टींवरच अधिक भर होता. देव, गंधर्व, अप्सरा, ऋषी, मुनी, राक्षस इत्यादींची अभिनव सोंगे, तलवारीचे हात, विदूषकाच्या डोंबारी उड्या, रासक्रीडेतील गोफटिपऱ्या, या प्रकारची दृश्य करमणूकच त्यांत अधिक होती. तरी या सर्व प्रयोगात्मक दृश्यरूप व कृतिपर मनोरंजन-प्रकाराला एक भव्य अर्थ देण्यात आला होता. विष्णुदासांच्या खेळांना पौराणिक व धार्मिक स्वरूपाचा एक अनुबंध होता. सत्त्व-तमरजाच्या त्रैगुण्योद्भव अशा मानवी झगड्याचे त्यात निरूपण नव्हते. त्यात सत्त्व आणि तम एवढेच द्वंद्व कल्पून दैवी आणि आसुरी प्रकृतीच्या भव्य, उदात्त आणि अतिमानवी संघर्षाचे चित्रण होते. कथापुराणांचे आकर्षण असणाऱ्या व एकंदर धार्मिकतेकडे कल असणाऱ्या लोकांना त्या वेळी ही एक नवी करमणूक म्हणून अत्यंत प्रभावी वाटली. नाटकांकरिता स्फुट आख्याने निवडण्यामध्ये आटोपशीर संविधानकाची कल्पना अस्तित्वात आली. संघर्षात्मक नाट्याची प्राणभूत कल्पना पाश्चात्त्य. इकडील नाटकांचा आत्मा रस. विष्णुदासांनी याच रसतत्त्वाशी निष्ठावंत राहून आपल्या नाटकांत अतिमानवी देवदेवतांच्या लीलाख्यानांतून रस वाहविला आणि एक नवा रंग जनसामान्यामाठी निर्माण केला.

**नाट्याख्यानाचा नमुना**

विष्णुदासांच्या नाट्याख्यानरूप कवितेचा प्रत्यक्ष परिचय करून देण्यासाठी ' स्वर्गलोकीं अर्जुनाचे गमन आणि उर्वशीशाप ' हे पौराणिक नाट्याख्यान येथे देण्यात येत आहे. त्यावरून सूत्रधाराचे वस्तुनिष्ठ पद्धतीचे कथन, पात्रांची कवितेत गुंफिलेली भाषणे, क्वचित आत्मनिष्ठ भावनेचा प्रथमपुरुषी उद्गार इत्यादी ध्यानी येतील. शिवाय सदभिरुचीतून निर्माण होणारा संयम हाही विष्णुदासांच्या ठिकाणी किती होता, हे पुढील आख्यानावरून लक्षात येईल. पूर्वीच्या कवींनी आणि पुढच्या काही पौराणिक नाटककारांनी जे अचरटपणाचे आणि बीभत्स ग्राम्यतेचे प्रदर्शन आपल्या काव्यनाटकांत केले, त्याचा संपूर्ण अभाव विष्णुदासांच्या कवितेत वैशिष्ट्याने दिसून येईल.

### स्वर्गलोकीं अर्जुनाचें गमन आणि उर्वशीशाप

**पद : राग भूप, ताल त्रिताल**

आला रथासह मातली ॥ विजया न्याया अमरपुरीसी ॥ ध्रु. ॥ इंद्रकीलनगीं रथ येतां बैसुन विजय त्यांत । वंदूनीया नगनाथा निघे सूरपुरिसी ॥ १ ॥ भेटत पंथी सूर्यचंद्रा पुण्यशील जन जे पात्रा ॥ मानातें पदीं नक्षत्रा पाहुनि वंदी तयांसी ॥ २ ॥ ऐरावत द्वारी झुले, इंद्रप्रासादा पाहिलें । मन बहू तोषित झाले कळलें हे इंद्रासी ॥ ३ ॥ बहुमानें आणि सभेसी प्रेमे अंकीं बसवी त्यासी । अवघ्राणी मस्तकासी पार नसे मोदासी ॥ ४ ॥

**पद : राग काफी, ताल त्रिवट**

अर्जुन इंद्रसभे आला ॥ ध्रु. ॥ पाहुनि देव त्याला म्हणती शोभला सुत इंद्राला ॥ करित आनंदाला ॥ १ ॥

**पद : राग बिहाग, ताल दीपंचदी**

आनंदे अप्सरा नाचताती ॥ सभेमाजी गाती स्तुती करीती ॥ वीणा टाळ मृदंग वाजविती ॥ सप्तस्वर गंधर्व आलापिती ॥ २ ॥

**ख्याल : राग यमन, ध्रुवपदाचा ताल त्रिवट व कडवीं एक्का**

देवादिदेव शचीरमण काय वर्णू शोभा अहा ! ती ॥ ध्रु. ॥ उर्वशीरंभादि मेनिका नृत्य गाउनि स्तुति करिताती ॥ १ ॥ भेटला आजी तुम्हासि तुमचा सुत आनंद न माये चित्तीं ॥ २ ॥

**पद : राग सूधकल्याण, ताल त्रिवट**

इंद्र किरीटीप्रति काय बोलला हो ॥ प्रेमपाझर अंतःकरणीं येऊनीया हो ॥ ध्रु. ॥ मुख कुर्वाळूनी बोले पुत्रा बा रे श्रमलासी ॥ घेई प्रसन्न होऊनी देतों समंत्र अस्त्रांसी ॥ मंत्र विधीयुक्त सांगुनि सिद्ध करुनी दे तयासी ॥ चाल ॥ अप्सरा गीतनृत्यें तोषला हो ॥ १ ॥

## मा. प. ( मागील पदाप्रमाणें ) अर्जुन इंद्रसभें

उर्वशीगायनें तल्लीन ॥ अर्जुनमन इंद्रें जाणुन ॥ चित्रसेना कथी सभें आणुन ॥ २॥ गान नृत्य शिकवि जिष्णूसी ॥ ऐकुनि आज्ञेसी शिकवी तयासी ॥ लज्जित अप्सरा जें ऐकुन मानसीं ॥ ३ ॥

## ॥ ओवी ॥

एके दिनी अप्सरानृत्य ॥ अर्जुनें पाहुनी सभेंत ॥ झाला वाटूनि कामें व्याप्त ॥ मघवा सांगे चित्रसेना ॥ १ ॥

## मा. प. अर्जुन इंद्रसभें

जाउनी उर्वशीस ॥ आज रात्रीस जिष्णुशय्येस ॥ जाय तीयेस सांग आज्ञेला ॥ ४॥ येऊनीया चित्रसेन तिजला ॥ इंद्रआज्ञेला सांगता जाहला ॥ आनंद अप्सरेला होऊनी सिद्ध झाली ॥ ५ ॥

## पद्य : अलैयाबिलावल, ध्रुवपदाचा ताल एक्का

मानूनीया इंद्र आज्ञे आनंदीत मने नटली ॥ त्वरे रूपवती अती उर्वशी निशीं निघाली ॥ ध्रु. ॥ आकृति अति रमणीय गौरवर्ण गजशुंडावत् गोडस हस्त रक्त पाद नासिका उच्च सरल भ्रुकुटि धनुवत् आकर्णनेत्र कज्जलयुक्त बिंबओष्ठ दंतप्रभा हिऱ्यावत् कुरल केश उच्च उरस्थल सिंहकटी गजगती चालली ॥ १ ॥ कर्णी नासिकीं रत्नजडित मौक्तिकभूषणें केशपाशीं पुष्पे मूद राखडि चंद्रकोर जडित भालीं कुंकुम-तिलक नवरत्नहार कंठीं कटिं मेखला अगणित हस्तपादभूषणें रुळत पायीं पैजण रत्नमुद्रिका अंगुलीं कंचुकी चिर ल्याली ॥ २ ॥ स्थीर रथीर चमकत हंसगति चंचल कामयुक्त दृष्टि अल्पहास्य अलक उरस्थितचिर सावरीत मदने व्याप्त संगमोत्सुक रतिसदृश मूर्तिमनोहर अभिसारिका तरुणी अर्जुन स्थित अंतरंगीं ठुमकत त्वरे पातली ॥ ३ ॥

## पद : राग काफी जिल्हा, ताल त्रिवट

एकाएकी अपरात्रीं आगमन उर्वशीचे पाहुनीया चक्कीत मन अर्जुनाचे झालें ॥ ध्रु. ॥ आसन देऊनी पुसत माये आजी कां हो येणे केलें काय संकट सांगा तुम्हा कोणीं पीडीयलें ॥ पुरविन इच्छित सांगा मज काय मनामाजी आहे अपरात्रीं कोमल अंगी श्रम तुम्हा झाले ॥ धन्य भाग्य माये माझे पुत्रा दर्शन दीलें वंदूनीया चरण तीज उपचार दिले ॥ चाल ॥ वारंवार माय शब्द ऐकून कीरीटीचे हिरमुष्टीत तेव्हा झाले मन उर्वशीचे ॥ १ ॥

## पद : राग सिंध काफी, ताल एक्का

वदे खिन्न मनें उर्वशी अर्जुनासी ॥ ध्रु. ॥ त्रिभुवनिं अभागी न दुजा तुजसम बा रूपखाणी ॥ लावण्य मी कामें व्याप्त न कळे हे तुजसी ॥ १ ॥ लुब्ध तुम्हावरि होऊन धरुनि रती इच्छेसी ॥ आलें असतां काय माय शब्दें मज बहासी ॥ २ ॥

## पद : राग कल्याण, ताल एका

वीरा अर्जुना ओळख मी उर्वशी न वद माया मसी ॥ इंद्र आज्ञें चित्रसेनें धाडिलें या स्थळासी ॥ ध्रु. ॥ आणिक लुब्ध मी तूझ्या स्वरुपासी ॥ पाहुनी तेजोराशी ॥ प्रिया होउनी संग इच्छा मजसी ॥ आलें या ठायासी ॥ नको अव्हेरूं निष्ठुर मानसीं ॥ पदीं लीन दासी ॥ चाल ॥ स्त्रीइच्छाभंगपाप लागेल हे तुजसी ॥ १ ॥

## मा. प. एकाएकी अप :—

कुंती माद्री सती परीस तूं माये पूज्य मसीं ॥ तात इंद्र याची प्रिय अंगसंग दासी ॥ सोडी दुष्ट इच्छा अनूचित योग्य न हे तुजसी ॥ कुलवती माझी तूं काय कामें मोहीलीसी ॥ पूर्वज माझे जे स्वर्गामाजीं चिरवास करिती ॥ संग त्यांशीं तुझा तूं म्हणुनी मातेपरी सती ॥ चाल ॥ ऐसें ऐकुनि निष्ठुर वचन मन कोपें उर्वशीचें ॥ २ ॥

## मा. प. वीरा अर्जुना

स्वर्गीं श्रेष्ठ जे तपे पुरूवंशीं ॥ रमविती आम्हासि ॥ नाहीं दोष वा यांत लेश त्यांसि ॥ संग करी मजशिं ॥ इंद्रआज्ञेनें आले या स्थळासि ॥ म्हणे शापिते तूसी ॥ ॥ चाल ॥ एक वर्ष नट आणि षंढ जगी होसी ॥ २ ॥

## मा. प. वदे खिन्न :—

शाप देउनी उर्वशी गेलि स्वस्थानासी ॥ विष्णुदास म्हणे चिंता लागे अर्जुनासी ॥ ३ ॥

## ॥ ओव्या ॥

दुःखें शाप उर्वशी देत ॥ अर्जुन इंद्रालागीं कथित ॥ इंद्र त्याते शांतवीत ॥ पुढील वृत्त सांगूनी ॥ १ ॥ एक वर्ष अज्ञातवासीं ॥ क्रमणे असे हो तुम्हांसी ॥ धरून रहा षंढरूपासी ॥ गुप्त जगीं अर्जुना ॥ २ ॥ सकल अस्त्रे संपादून ॥ राहे पंच वर्षें अर्जुन ॥ स्वर्गीं, धृतराष्ट्रा हे कळुन ॥ दुःख होत अपार ॥ ३ ॥ एके दिनीं लोमेश मुनी ॥ फिरत ये इंद्रसभे लागुनी ॥ शक्रा आशिर्वाद देऊनी ॥ मनीं होत चकित ॥ ४ ॥

## पद : राग कालंगडा, ताल दीपचंदी

इंद्रा बोलले काय लोमेश ऋषी ते पुण्यशील तपोनीधी तेजोराशी ॥ ध्रु. ॥ पूजादीक करुनि इंद्रें ऋषीलागि स्तविलें ॥ विजया इंद्रासनिं बघुनि ऋषी चकित जाहले ॥ काय हेतुने म्हणे यासि अर्धासन दीधलें ॥ चाल ॥ ऐकून ऋषी प्रश्न सांगे मघवा काय त्यासी ॥ १ ॥

## मा. प. अर्जुन इंद्रसभें :—

मानुं नये ऋषी मानव याते ॥ नरनारायण हे कृष्णार्जुन ॥ ज्यानीं तपाचरण केलें बद्रिकीं ते ॥ ६ ॥ मम पुत्र हा हो तपें श्रेष्ठ ॥ योद्धा सूभट रणिं न दावि पाठ ॥ भोगिले येणें वनीं बहुतचि कष्ट ॥ ७ ॥ जाऊनीया सांगा धर्मरायासी अर्जुन मजपाशीं

कुशल स्वर्गासी ॥ आहे, अस्त्रें दिलीं मीं अनंत त्यासी ॥ ८ ॥ अल्पकाळें येईल भेटीलागुन ॥ आपण जाऊन धर्मोहातून ॥ विजयाप्राप्त्यर्थ करवा तिर्थाटन ॥ ९ ॥[1]

विष्णुदासांच्या नाट्यकवितासंग्रहात एकंदर ५१ आख्यानांचा समावेश झाला आहे.[2] प्रारंभी काही प्रासंगिक व फुटकळ कविता असून आख्यानांमध्ये रामायणातील एकंदर २२ आख्याने आहेत. १३ आख्याने भारताच्या विविध पर्वांतील असून दशावतारांतील काही अवतारांवर स्वतंत्र आख्याने आहेत. कृष्णाच्या बालक्रीडांवर व रासक्रीडेवरही आख्याने आहेत.

## दातार यांची नाट्यकविता

पौराणिक नाटके १८४३-पासून १८९५–९६-पर्यंत प्रचलित होती. परंतु त्यांची विशेष भरभराट १८६०-पासून सुमारे १८८०–८१-पर्यंत होती. एवढ्यात

१. नाटयकवितासंग्रह, पृ. २२३ — २५०.

२. भावे यांची नाट्याख्याने

( १ ) मंगलाचरण, ( २ ) नाटकारंभीं म्हणावयाचे अभंग, ( ३ ) शंकर-गणपति आगमनांची पदें, ( ४ ) सरस्वत्याऽवाहन, ( ५ ) बालगोपाल गंधर्वांचें गायन, ( ६ ) गणपतिजन्माख्यान, ( ७ ) मत्स्यावतार, (८) मत्स्यावतार कथानक दुसरें, ( ९ ) कूर्मावतार, ( १० ) वराहावतार, ( ११ ) नरहरीं-अवतार, ( १२ ) दशरथविवाह, श्रावणवध आणि रामजन्माख्यान, (१३) गाधिजमखरक्षण आणि ताटकावधाख्यान, ( १४ ) अहिल्योद्धार आणि सीतास्वयंवराख्यान, ( १५ ) भार्गवगर्वमोचनाख्यान, ( १६ ) राघववनप्रवेश, ( १७ ) भरतभाव, ( १८ ) शूर्पणखाविटंबना आणि खरदूषणवधाख्यान, ( १९ ) वालीवध व हनुमंताचें किस्किंदीं आगमन, ( २० ) सीताशुद्धि, लंकादहन आणि रामाचा सुवेळेंत प्रवेश, ( २१ ) पांडवांचा वनवास, ( २२ ) किरातार्जुनयुद्ध आणि पाशुपतास्त्रप्राप्ति, (२३ ) स्वर्गलोकीं अर्जुनाचें गमन आणि उर्वशीशाप, ( २४ ) पांडवांची तीर्थयात्रा आणि भीमगर्वपरिहार, ( २५ ) दुर्वासभोजन, ( २६ ) वत्सलाहरण आणि परिणय, ( २७ ) विराटपर्वांतील कीचकवध, ( २८ ) दक्षिणोत्तर-गोग्रहण, ( २९ ) चक्रव्यूहाख्यान ( ३० ) रावण-विटंबना आणि अंगदशिष्टाई, ( ३१ ) धूम्राक्ष, वज्रदंष्ट्र, आणि प्रहस्तवध, ( ३२ ) कुंभकर्ण, पराषद, अतिकाय, श्रोणिताक्षादि असुरवध ( ३३ ) इंद्रजितवध आणि सुलोचनासहगमन, ( ३४ ) अहिमहिवध, ( ३५ ) शक्तिहतलक्ष्मणाख्यान, ( ३६ ) रावणनिधन, बिभीषणाचें लंकेत आगमन व राज्यीं स्थापना, ( ३७ ) सुरबंदमोचन, भरतभेट आणि रामास राज्याभिषेक, ( ३८ ) अश्वमेधयज्ञ, आणि लवकुशाख्यान, ( ३९ ) कृष्णजन्म आणि कालिया-शकटासुरादिहनन, ( ४० ) रासक्रीडा, ( ४१ ) कात्यायनीव्रतासह रासक्रीडा, ( ४२ ) गोफटिपऱ्यांचा खेळ, ( ४३ ) कंसवध, ( ४४ ) पारिजातकाख्यान, ( ४५ ) कचदेवयानीआख्यान, ( ४६ ) ययाती-आख्यान, ( ४७ ) हिडिंबवध, ( ४८ ) बकासुरवध, ( ४९ ) द्रौपदीस्वयंवर, ( ५० ) द्रौपदी-वस्त्रहरण, ( ५१ ) अश्वमेधांतील सुधन्वाख्यान, ( ५२ ) चंद्रहास्याख्यान, ( ५३ ) हरिश्चंद्रसत्त्वदर्शनाख्यान, ( ५४ ) वीरभद्राख्यान, ( ५५ ) गोपीचंदाख्यान ( हिंदुस्थानी ), ( ५६ ) आरत्या स्तुति वगैरे.

सुमारे पंचवीस-तीस नाटकमंडळ्या झाल्या असतील. परंतु बहुतेक भावे यांच्याच कविता उपयोगात आणीत असत. एक इचलकरंजीकर नाटक-मंडळी इचलकरंजीचेच कोणी बाबाजी दातार यांच्या कविता म्हणत असे. या कविता चांगल्या असत.[1] याच वेळी पुण्यास नाना सोनी नावाचे गृहस्थ कविता करीत. अण्णा इनामदार, नानाबुवा बुधकर, रावजी शहरकर, रावजी बर्वे, कोल्हापूरचे कवी गोविंददास ही मंडळीही नाट्यकविता रचीत. परंतु या सर्वांत चांगली रचना बाबाजीशास्त्री दातारांचीच समजली जाते. इचलकरंजीकर नाटकमंडळीस स्वतंत्र कविता रचून देणारे हेच ते व्युत्पन्न, रसिक पंडित बाबाजीशास्त्री दातार. हे गृहस्थ इचलकरंजीकर नाटकमंडळीसाठी नाट्यरूप आख्याने लिहून देत असत. विष्णुदासांच्या नाटयकविता-संग्रहाप्रमाणे यांची कविता अद्याप संग्रहरूपाने प्रसिद्ध झालेली नाही. त्यांच्या कवितेचे बाड महाराष्ट्र-रंगभूमी-शतसांवत्सरिक-उत्सवमंडळाच्या वतीने प्रसिद्ध झालेल्या ' मराठी रंगभूमी'च्या अधिकृत इतिहासग्रंथाचे लेखक प्रा. श्री ना. बनहट्टी यांना इचलकरंजीचे अधिपती नारायणराव बाबासाहेब घोरपडे याच्या कृपेने प्रथमच प्राप्त झाले. प्रा. बनहट्टींनी दातारशास्त्री यांच्या नाटयकवितेसंबधी वर्णनात्मक आणि विवेचनात्मक माहिती आपल्या ग्रंथात मराठी वाचकांपुढे प्रथमच ठेविली.

दातारशास्त्र्यांच्या रचनांचा ज्ञात रचनाकाल सामान्यपणे १८६० ते १८७४ हाच आहे. शास्त्रीबुवा हे पढिक शास्त्री असल्यामुळे भाव्यांपेक्षा त्यांनी खूपच अधिक पुराणान्चा म्हणजे भागवत, वायुपुराण, स्कंदपुराण, लिंगपुराण, शंकरविजय इत्यादी ग्रंथांचा सुलभतेने उपयोग केला असल्याचे दिसते विष्णुदासांच्या नाटयकवितेच्या तुलनेने प्रा. बनहट्टींना पांडुरंगसूरींची रचना ' लालित्य, पांडित्य, वैविध्य ' इ. गुणांच्या योगाने अधिक दर्ज्याची वाटते. ते लिहितात, " दातारांची भाषाशैली सुश्लिष्ट व सफाईदार आहे; रचनाकौशल्य वरच्या दर्ज्याचे आहे. त्यांनी आपली आख्याने मुळास अनुसरून सरळ रीतीने रचिली आहेत. तथापि त्याची पद्धत अशी आहे की, तीवरून नाटयप्रवेशांची सरणी अप्रत्यक्षरीत्या सूचित व्हावी. पुष्कळ ठिकाणीं पात्रांमधील संवाद पदांमध्ये ग्रथित केलेले आढळतात. अशा रीतीने की, ते जवळजवळ तसेच पात्रांच्या तोंडीं घालून नाटकाचे प्रवेश उभारता यावेत. मूळ कथानकात शास्त्रीबोवांनी स्वतःचा जो मालमसाला घातला आहे, तो त्यांच्या चातुर्याचा निदर्शक आहे. हा मालमसाला बहुधा सर्वत्र विनोदाकरिता घातला असला, तरी त्यात त्या काळच्या, म्हणजे आजपासून शंभर वर्षे मागच्या समाजाच्या स्थितीची काही अंगे प्रतिबिंबरूपाने गोचर होतात. त्या वेळच्या पाठशाळांमधले गुरुजी अणि त्यांचे चेले, त्या वेळचे अचरट अंदाधुंद राजे आणि त्यांचे रांगडे हेगाडे नोकर, लघळ लुबरे उपाध्येबुवा आणि धर्मभोळ्या यजमानीणबाई अशा अनेक मासलेवाईक व्यक्तिचित्रांचीं प्रतिबिंबे

१. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे चरित्र, शं. बा. मुजुमदार, पृ. १७.

त्यांनी आपल्या आख्यानांत प्रसंगोपात्त वठविलीं आहेत."[1]

शास्त्रीबुवांच्या रचनेतील भाषावैचित्र्य खरोखरच पाहण्यासारखे आहे. शास्त्री असल्यामुळे संस्कृतात लिहिणे हा तर त्यांच्या हातचा मळ होता. रांगडे हिंदुस्तानी व हेगाडी कन्नड प्रसंगानुसार योजून आपल्या नाटकांत त्यांनी चटकदार वास्तवता आणण्याचा सफल प्रयत्न केला आहे. भाव्यांच्या गोपीचंदाख्यानाप्रमाणे मत्स्येन्द्राख्यान त्यांनी सर्वच्या-सर्व हिंदुस्थानीत लिहिले आहे.

शास्त्रीबुवांच्या नाट्याख्यानांतील विनोद मात्र 'उथळ, अचरट व ग्राम्य' असल्याचे प्रा. बनहट्टी सांगतात. या संदर्भात विष्णुदासांच्या सर्व रचना तुलनेने अधिक सोज्ज्वल, सदभिरुचिपूर्ण आणि उदात्त वाटतात. अर्थात दातारशास्त्र्यांच्या रचनांचा कालही १८६०-च्या पुढचाच असल्याने बदलती अभिरुची व बदलता काळ याचा प्रभाव त्यांच्या रचनात दिसून आल्यास नवल नाही. प्रा. बनहट्टी याविषयी लिहितात, "त्या वेळच्या एकंदर प्रेक्षक-समाजाच्या अभिरुचीला हें अनुसरूनच होतें, असे म्हटल्यास चालेल. तमाशांतल्या ग्राम्यपणाने, अचकटविचकटपणाने पौराणिक नाटकांवर आक्रमण करण्यास सुरुवात केली होती, याचे हें निदर्शक होय."[2] परंतु फार्स-प्रहसनांचाही त्या काळी बराच सुळसुळाट चालू झालेला होता, ही गोष्ट लक्षात घेतली, म्हणजे अभिरुची उथळ व थिल्लर बनविण्याला तमाशांपेक्षा त्या काळचे फार्सच अधिक कारणीभूत झाले असावेत, असे म्हटल्यावाचून मात्र राहवत नाही.

त्या वेळच्या एकंदर पौराणिक नाटकांप्रमाणेच शास्त्रीबुवांच्या रचना असल्याचे सांगून प्रा. बनहट्टी लिहितात, "भव्य उदात्त ध्येयात्मक अशी सृष्टि निर्माण करण्याचे शास्त्रीबोवांच्या स्वप्नीही आल्याचे दिसत नाही. त्यांच्या रचनेत फारकरून भावनांचा विकास नाही, व्यक्तित्वाचा उठाव नाही, उन्नत विचारांची दरवळ नाही. दातार-शास्त्रीबोवांची दृष्टी तर निव्वळ व्यावहारिक आहे. स्वर्गस्थ देवांनादेखील सामान्य मानवांप्रमाणे लेखून त्यांची ग्राम्य थट्टा त्यांनी केली. त्यांनी निर्मिलेल्या कोणत्याही भूमिकेमध्ये उदात्ततेची छटा त्यांना निर्माण करता आलेली नाही." मात्र कथानकांतील संघर्षाची तार शेवटपर्यंत चढवीत नेणे हा जो नाट्याचा मुख्य गाभा तो शास्त्रीबोवांच्या रचनेत उतरलेला दिसतो,[3] असेही त्यांनी स्पष्टपणे नमूद केले आहे. दातारशास्त्र्यांच्या नाट्यकवितेची कल्पना त्यांच्या 'भरत' नाटकातील एका पदाच्या उदाहरणावरून येण्यासारखी आहे —

**भूप त्रिवट अष्टाविंशी**

दैत्यहृता त्या अमुच्या भार्या अम्हास आणुन द्याव्या। कृपा करुन तुम्ही

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, खंड १, श्री. ना. बनहट्टी, प्रकरण ७, पृ. १५२.

२. तत्रैव, पृ. १६८.

३. मराठी रंगभूमीचा इतिहास, पृ. १६८.

अमच्या विरहव्यथा त्वरित दवडाव्या १. हरिरूचे त्वं विष्णोरंशः स्यात् एतन्नः कार्यम् । नास्ति दुर्घटं निष्प्रतिमं ते नृपते शौर्यौदार्ये २. इत्यादिक तद्भाषण ऐकुन जलदस्वन नृप बोले । स्वस्थ असा तुम्हि त्या दुष्टांना मी मारिन टोले ३. तद्‌हृत युष्मद्योषा आणुन देइन सत्य तुम्हांला । सुरविप्राचे पीडावारण योग्यच होय अम्हाला ४. स्वस्थानाप्रत चला अम्हीही संपृतन निघतों आता । हरि बोले हे अम्हीहि येतो घेउन सुरसंघाता ५. रणांत तुमची सहायता करुं होइल जर भवदाज्ञा । त्रिभुवनि तुमची ख्याता होइल सत्तापद्धत्समाज्ञा ६. भरत म्हणे बर उत्तम आहे अम्हांबरोबर यावें । भवदिच्छा जर आहे तर अस्मत्साहाय्य करावें ७. मग मंत्रिस नृप म्हणे जल्दिसे चत्रंग दल्‌कि तयारी । कर्नो दे तेजन्‌के पर अब चल्‌नेकी असवारी.[1]

## दोन

## संस्कृत नाटकांची भाषांतरे

नाट्यवाङ्मय किंवा नाटकग्रंथ म्हणून ज्यास यथार्थपणे म्हणता येईल, असे या कालात उपलब्ध होणारे सर्वांत जुने आणि छापलेले असे पहिले पुस्तक म्हणजे 'प्रबोधचंद्रोदय' हे नाटक होय. हे स्वतंत्र नाटक नसून मूळ संस्कृतातील नाटकाचे ते मराठी भाषांतर आहे. हे भाषातर १८५१ साली प्रसिद्ध झाले. विष्णुदासांनी मराठी रंगभूमीवर केल्या जाणाऱ्या प्रयोगांसाठी उपयुक्त अशी आख्यानस्वरूपाची नाट्यकविताही पुष्कळ लिहिली. परंतु या आख्यानात्मक कवितेला किंवा नाट्याख्यानांना 'नाटक' असे यथार्थपणे म्हणता येत नाही. 'नाटक' या स्वतंत्र वाङ्मयप्रकाराची ओळख या दृष्टीने मराठीला प्रथम संस्कृतावरून केलेल्या नाटकाच्या मराठी भाषांतरामुळेच झाली. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाला प्रारंभ होईपर्यंत संस्कृतातील संपन्न नाट्यवाङ्मयाकडे मराठीचे पूर्वी कधी लक्ष गेलेले दिसत नाही. संस्कृतातील धार्मिक, ऐतिहासिक व पौराणिक ग्रंथांचे अनुवाद किंवा रूपांतरे मराठी कवींनी व लेखकांनी पुष्कळच केली; परंतु संस्कृतातील नाटके मराठीत आणण्याचा उपक्रम मात्र मराठी वाङ्मयाच्या पूर्वीच्या युगात कोणीही केल्याचे

१. दातारशास्त्र्यांच्या बाडातील आख्यानांची नावे —

सतीचरित्र, सिद्धिविनायकचरित्र, गौरीविवाह, स्कंदनाटक, रत्नावल्याख्यान, हरिजन्मकथा, गुरुममतासंयोगाख्यान, दधीचि-नाटक, गोपीचंदाख्यान, हनुमज्जन्माख्यान, कचाख्यान, राधाकृष्णविरहाख्यान, कंसवधाख्यान, शकुंतलोपाख्यान, वामनचरित, कालियदमनाख्यान, ध्रुवाख्यान, पांडवहयमेधारंभाख्यान, मत्स्येन्द्रकथा, ऐलाख्यान, भरत-नाटक, मदन-नाटक, काली-नाटक, नृहरि-नाटक, सुभद्राहरणाख्यान, श्रियाळचरित्र, वत्सलाहरणाख्यान, प्रमिलाख्यान, क्षीरोदधिमथनाख्यान, भार्गवरामाख्यान, बभ्रुवाहनाख्यान, औषधि-नाटक, शंकरयतिवर्याख्यान, भगवद्दौत्याख्यान, ( कृष्णदौत्याख्यान ).

अद्यापि तरी उजेडात आलेले नाही. त्यामुळे नाटक या स्वतंत्र वाङ्मयप्रकाराची कल्पनाच मराठीत या वेळपर्यंत अस्तित्वात येऊ शकली नाही.

### भाषांतरकारांचे कार्य

भाषांतरयुग म्हणून थोडासा अवहेलनापूर्वक उल्लेख वाङ्मयाच्या या अर्वाचीन कालखंडासंबंधी अनेकदा करण्यात येत असतो. मराठीतील नाट्यवाङ्मयाचा धावता आढावा घेताना ज्ञानकोशकारांनीही संस्कृतावरून वा इंग्रजीवरून केलेल्या मराठी भाषांतरात्मक नाटकांचा नुसता उल्लेखही कोठे केला नाही. भाषांतरात्मक नाटकांना स्वतंत्र असे अस्तित्व किंवा वाङ्मयीन महत्त्व देण्यास ते फारसे तयार नसल्याचेच दिसते. परंतु भाषांतरात्मक ग्रंथ ही एक त्या भाषेपुरती प्रत्यक्ष अशी वाङ्मयीन घटना असते. तिचे अस्तित्व नाकारून चालत नाही. तिचा उल्लेख तर करावयास हवाच, परंतु तीमुळे त्या भाषेच्या वाङ्मयीन विकासाच्या संदर्भात कोणते बरेवाईट परिणाम दिसून आले, याचीही चर्चा होणे अवश्य आहे. तसे पाहता भाषांतर ही वाङ्मयाच्या विकासातील एक अपरिहार्य अवस्था आहे. भाषांतराच्या पांगुळगाड्याला धरून वाङ्मयकला ही अनेक वेळा नव्या दालनात विश्वासाने पाय टाकीत चालण्यास शिकते.

### त्यांची प्रेरणा

संस्कृतातील किंवा इंग्रजीतील ग्रंथांची भाषांतरे मराठी भाषेत करण्याची इच्छा त्या वेळच्या लेखकांना झाली, याचे मोठे कारण म्हणजे या काळात झालेले विद्येचे पुनरुज्जीवन. विद्याप्रेमी इंग्रजांच्या प्रोत्साहनाने व पुरस्कारामुळे एक नवे प्रबोधन या वेळी महाराष्ट्रात घडून आले. अगदी नवीन अशा काळाचा तो उदय होता. लोक-जागृती व ज्ञानप्रसार या दृष्टींनी नव्या-नव्या शैक्षणिक व सामाजिक कार्यांना जोराने चालना मिळाली. संस्कृत विद्येचा व वाङ्मयाचा जुनाच ठेवा, पुनः नव्या दृष्टिकोणाने व नव्या उत्साहाने अभ्यासावा, असे नव्या शिक्षिताना वाटू लागले. परकीय अशा इंग्रजी भाषेतील वाङ्मयाशीही क्रमाक्रमाने परिचय वाढत जाऊन त्याच्याही अभ्यासाची आवड लोकांत निर्माण झाली. या सर्वांचा परिणाम समाजाच्या कलाविषयक अभिरुचीवर कळत-न-कळत, परंतु अपरिहार्यपणे झाला. मराठीमध्ये आतापर्यंत भक्तीसारख्या एकाच विषयाला धरून, एका ठराविक प्रकाराचेच वाङ्मय, ठराविक छंदाच्या माध्यमातून निर्माण झाले असल्याची जाणीव नव्यांना झाली. मराठीचा, मातृभाषेचा वाङ्मयीन विकास साधावयाचा असेल, तर नवनवीन वाङ्मयप्रकार यापुढे मराठीत निर्माण होणे अवश्य होते. परंतु कथा, नाटक, चरित्र, इतिहास इत्यादी लौकिक वाङ्मयप्रकारांना साजेल अशी, पेलेल अशी स्वतंत्र गद्य मराठी शैलीच अद्यापि अस्तित्वात नव्हती. अशा वेळी स्वतंत्र रूपाने लिहिण्यापेक्षा भाषांतराचाच अवलंब प्रामुख्याने करून मराठीने आपल्या गद्यशैलीचा विकास घडवून आणण्यास प्रारंभ केला. ही गद्यशैली दोन अंगांनी विकसित होत होती. व्यवहारोपयोगी मराठी

गद्यशैली वर्तमानपत्रे, मासिके, शैक्षणिक पुस्तके यांच्या लेखनात विकसित झाली. परंतु वाङ्मयीन दृष्टीने अधिक महत्त्वाची अशी जी मराठी गद्याची ललितशैली, तिचा विकास मात्र प्रारंभीच्या काळात संस्कृतातील वा इंग्रजीतील कथांच्या व नाटकांच्या मराठीत करण्यात आलेल्या भाषांतरांमुळेच घडून आला. नाटकांच्या मराठीत झालेल्या भाषांतरांमुळेच दुसरा जो मोठा लाभ झाला, तो नाट्यकलेच्या विकासाच्या दृष्टीने. नाटकरचनेचीच एक नवी दृष्टी मराठी नाटककारांस या भाषांतरात्मक नाटकांमुळे प्राप्त झाली. नाटकाची अंकप्रवेशयुक्त विभागणी, गद्यपद्ययुक्त संभाषणे, स्वगते, पात्रांचे आगमनिर्गम, संविधानकचातुर्य, स्वभावपरिपोष, जीवनविषयक सत्याचा उदात्त आविष्कार, इत्यादी कितीतरी गोष्टी भाषांतरात्मक अशा संस्कृत व इंग्रजी नाटकांमुळेच मराठी नाट्यसृष्टीस प्रथमच ज्ञात झाल्या. जानपद स्वरूपाच्या धार्मिक, लोकरंजनाच्या ललितादी नाटकखेळांत वा विष्णुदासी पद्धतीच्या ' तागडथोम ' नाट्याख्यानांत वरील नाट्यविषयक अंगाचा मागमूसही नव्हता. मात्र सुशिक्षितांना अन्य भाषातील नाटकग्रंथांची भाषांतरे करण्याच्या कार्याकडे वळविण्यास विष्णुदासांनी नव्याने लोकप्रिय केलेली, व जिच्या वृद्धीमुळे महाराष्ट्रभर व महाराष्ट्राबाहेरही एकच धामधूम उडून गेली, ती नाटकाची नवी करमणूक किंवा नवीन नाट्यकलाव्यवसायही कांही अंशाने कारणीभूत झाला असला पाहिजे, हे उघड आहे. [1]

**त्यांपासून अर्थप्राप्ती**

संस्कृतावरून मराठीत भाषांतर केलेले पहिले नाटक ' प्रबोधचंद्रोदय ' हे १८५१-मधले. त्या मानाने इंग्रजी नाटकांच्या भाषांतराला मराठीत फार उशिरा म्हणजे नंतर पंधरासोळा वर्षांनी सुरुवात झाली. शेक्सपिअरच्या इंग्रजीतील ' ऑथेल्लो ' नाटकाचा महादेवशास्त्री कोल्हटकरांचा अनुवाद इ. स. १८६७-मध्ये प्रथम प्रसिद्ध झाला. इतर भाषांतील ग्रंथाचे अनुवाद मग मराठीत या कालात झालेच नाहीत. इ. स. १८७२-मध्ये मो. वि. वाळवेकर यांनी ' नीलदर्पण ' या बंगाली नाटकाचा अनुवाद केला; परंतु तो अनुवाद मूळ बंगाली नाटक पुढे ठेवून न करिता त्याच्या झालेल्या इंग्रजी भाषांतरावरूनच तो त्यानी केला. शिक्षित मंडळींपैकी बरेचसे लेखक संस्कृत नाटकांच्या भाषांतराकडे प्रथम वळले, याचे कारण स्पष्ट होते. ऐतिहासिक, सांस्कृतिक, धार्मिक व भाषिक अर्थांनीही संस्कृताचा मराठीशी साक्षात संबंध असल्यामुळे

1. The promoter of the Sangli Company was one Mr. Vishnupant Bhave, and his success has induced many others to follow his example among whom we may mention Messrs Kirloskar, Dongre, Patankar, Sathe and others. Naturally this new-born taste encouraged the growth of dramatic literature.

Miscellaneous Writings, Justice M. G. Ranade, Page 40.

घरच्याच भांडाराकडे दृष्टी प्रथम जाणे उचित होते. शिवाय, तत्सम शब्दांचा बराचसा प्रचार मराठीत पूर्वीच्या वाङ्मयातूनही आढळत असल्यामुळे भाषांतराच्या किंवा अर्थबोधाच्या दृष्टीनेही फारशी अडचण भासण्यासारखी नव्हती. परंतु या वेळी जे खरे संप्रेरक व तात्कालिक कारण या बाबतीत घडले, ते म्हणजे 'दक्षिणा प्रैज कमिटी'ची स्थापना हेच होय. पेशवाईत श्रावण-महिन्यात विद्वान ब्राह्मणांस प्रतिवर्षी वाटले जाणारे दक्षिणाधन आता या कमिटीच्या हाती नवीन कार्यास खर्च करण्यासाठी सोपविण्यात आले होते. या द्रव्याचा विनियोग मराठीत नवे-नवे ग्रंथ करणाऱ्या होतकरू लेखकांस पुरस्कारपारितोषिके देण्याच्या रूपाने प्रामुख्याने करण्यात आला, आणि त्यामुळे कितीतरी चांगल्या-चांगल्या अभिजात संस्कृत नाटकांची मराठी भाषांतरे याच 'दक्षिणा प्रैज कमिटी'च्या वतीने, तिच्या चिटणिसांकडून वा 'रिव्हैझरां'कडून शुद्ध करून घेऊन छापण्यात आली. दक्षिणादानामुळे नवीन ग्रंथनिर्मितीला कशी प्रेरणा प्राप्त झाली, यासंबंधी कै. कृष्णशास्त्री राजवाड्यांनी लिहिले आहे. "आलीकडे उदार सरकारनें नवीन ग्रंथ करणारांस यथायोग्य बक्षिस देण्याचे ठरविल्यापासून बहुतेक नवीन ग्रंथ होऊं लागले. त्यांतीलच हा एक माझा उद्योग आहे," [1]

**अन्य कारणे**

केवळ अर्थप्रेरणेपेक्षा अन्य अशीही बरीच कारणे या संस्कृत पुस्तकांच्या मराठी भाषांतराबाबत होती. संस्कृतावरून मराठीत केलेल्या पहिल्याच नाटकाचे भाषांतरकार अमरापूरकर (व बापट) हे संस्कृताभिमानी शास्त्रिमहोदय लिहितात, "अलीकडे संस्कृत विद्येविषयीं सरकारास व इतर लोकांसहि फार अनास्था उत्पन्न झाल्यावरून या विद्येचा उत्तरोत्तर ऱ्हास होत चाललेला आहे, यामुळे अशा अप्रतिम ग्रंथाचा लोप होणार असें समजून मी रावजीशास्त्री बापट यांच्या मदतीने त्याचे मराठींत भाषांतर करण्यास प्रवृत्त झालों."[2] कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे विचारही यांपेक्षा फारसे भिन्न असे नव्हते. परशुरामपंततात्यांच्या मूळ संस्कृतासह छापिलेल्या 'नागानंदा'च्या प्रस्तावनेत ते लिहितात, "संस्कृत भाषा जाणणाऱ्या व्युत्पन्न वाचणारांस मूळ संस्कृत ग्रंथ व मराठी भाषांतर हीं सहज ताडतां यावी व पहिल्यांतील रस दुसऱ्यांत किती आला आहे हे समजावें व संस्कृत भाषेची ज्यांस प्रीति असेल, त्यांस ती शिकण्यास कांहीं अंशीं सहाय्य व्हावें; तसेच जुने संस्कृत ग्रंथ राहावे व लोकांत विशेष प्रसृत व्हावे, असे अनेक उद्देश मनांत आणून एका पृष्ठावर संस्कृत मूळ व एका पृष्ठावर मराठी भाषांतर अशा रीतीने हा ग्रंथ छापला आहे."[3] मराठी

१. विक्रमोर्वशी (१८७४), प्रस्तावना, कृष्णशास्त्री राजवाडे.

२. प्रबोधचंद्रोदय नाटक, स. ब. अमरापूरकर व रावजी बापूजीशास्त्री बापट, प्रस्तावना, पृ. २.

३. नागानंद, प्रस्तावना, पृ. १.

भाषेच्या दृष्टीने अगदी वेगळाच, परंतु उपयुक्त असा एक भाषाविषयक विचार कृष्णशास्त्र्यांनी याच प्रस्तावनेत मांडला आहे. ते लिहितात, "संस्कृत नाटकें छापण्यापासून आणखी एक असा उपयोग आहे, कीं त्यांत बालभाषा असते तिचा अभ्यास लक्ष देऊन केला असतां हल्लींच्या चालू प्राकृत भाषा शिकणारांस फार उपयोग आहे. बालभाषेंत महाराष्ट्री, मागधी, पैशाची अशा कांहीं शाखा आहेत व त्या सर्व संस्कृत भाषेचा अपभ्रंश होऊन उत्तरोत्तर झाल्या आहेत. तेव्हां ज्ञानेश्वरीसारखे जुने ग्रंथ व जुने लेख समजावयास व हल्लींच्या मराठी, गुजराथी वगैरे भाषा संस्कृतांतून कशा उत्पन्न झाल्या हे समजण्यास बालभाषेचे ज्ञान फार उपयुक्त आहे." मात्र कृष्णशास्त्री राजवाड्यांनी केलेल्या शाकुंतलाच्या मराठी भाषांतरामुळे केवळ युनिव्हर्सिटीच्या परीक्षांना बसणाऱ्या मराठी जाणणाऱ्या विद्यार्थ्यांची व एकंदर मराठी वाचकांचीच सोय व्हावी; एवढेच नव्हे, तर संस्कृत भाषेत ऑनर्स घेऊन परीक्षेस बसणाऱ्या इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या लोकांनाही ते उपयुक्त ठरावे, अशी आशा प्रकाशकांनी प्रस्तावनेत व्यक्तविली आहे.[1]

## मराठीची पडकी बाजू

प्राकृताभिमानी असून संस्कृताबद्दल नम्र भाव प्रकट करणाऱ्या ज्ञानदेव-एकनाथादींच्या प्रथेला अनुसरून या कालातील भाषांतरकारांनीही अनेक ठिकाणी मराठीची पडकी बाजू, तिचे शब्ददारिद्र्य इत्यादींचा उल्लेख करून संस्कृतातील रस थोडक्यात आटोपशीरपणे आपणांला भाषांतरात आणिता आला नाही, याविषयी खंत प्रकट केली आहे. संस्कृताच्या सुवर्णाच्या पात्राचा आणि मराठीच्या पानांच्या टाचलेल्या द्रोणाचा दाखला त्या वेळी अगदी सांकेतिक होऊन बसला होता. 'सौवर्णपात्रीं सुरसासि गोडी जी तीहुनि पर्णपुटीं न थोडी। परंतु ते दुर्लभ पात्र ज्याला, ती यांत सारीच मिळेल त्याला,' असे परशुरामपंततात्यांनी जरी प्रत्येक नाटकाच्या शेवटी भाषांतराचा गौरव सांगताना लिहिले, तरी सुवर्णपात्र आणि पर्णपुट हा भेद त्या काळी मनात पक्का होताच. भाषांतरकारांनाही त्या वेळी फारसे महत्त्व होते, असे दिसत नाही. दक्षिणा प्रैज कमिटीच्या कृष्णशास्त्री चिपळूणकर किंवा शं. पां. पंडित यांसारख्या जबाबदार पदाधिकाऱ्यांनीही नाटकांच्या भाषांतरांना लिहिलेल्या प्रस्तावनांत भाषांतरांसंबंधी किंवा भाषांतरकारांसंबंधी फारसे गौरवाचे कुठे काही लिहिल्याचे आढळतच नाही. ही मंडळी 'रिव्हैजर' ( Reviser ) किंवा तपासणारी असल्यामुळे कदाचित त्यांनी भाषांतर मुळाला धरून निर्दोष झाले आहे किंवा नाही, एवढेच पाहिले असावे. गौरवापेक्षा 'न्यूनतां'चा निर्देश मात्र सर्वत्र केलेला आहे. रत्नावलीच्या

1. It is hoped that it will be acceptable not only to University students acquainted with the Marathi language and to the Natives of the Maharashtra in general, but also to those Members of the Indian Civil Service who may wish to submit for the 'Honours' Examination in the Sanskrit Language. Shakuntal, Preface, P. 4.

प्रस्तावनेत कृष्णशास्त्री चिपळूणकर लिहितात, " ह्या नाटकाचे संस्कृत मुळावरून भाषांतरकार शिवरामशास्त्री खरे ह्यांनीं करून तें दक्षिणा प्रैज कमितीस नजर केलें; परंतु ह्या भाषांतरांत कितीएक ठिकाणीं न्यूनता होत्या, त्या हा ग्रंथ छापण्याकरतां तयार करतांना दूर कराव्या लागल्या. "[1] भाषांतरकाराच्या गुणांचा परिचय तर दूरच, परंतु काही ठिकाणी भाषांतरकाराच्या नावाचाही उल्लेख ग्रंथात केलेला नाही. परशुरामपंततात्यांच्या 'नागानंद' नाटकाच्या भाषांतरात ( १८६५ ) मुखपृष्ठावर वा अन्यत्र त्यांच्या नावाचा कोठेही उल्लेख नाही. " सौवर्णपात्रीं सुरसासि गोडी " या ग्रंथान्तीच्या श्लोकावरूनच फक्त ते त्यांचेच असल्याचे लोकांना कळते. परंतु मुखपृष्ठावर 'चिपळूणकरोपनाम्ना कृष्णशास्त्रिणा संशोधितः' हे मात्र जाड ठशात अवश्य आले आहे. तीच गोष्ट कृष्णशास्त्री राजवाड्यांच्या शाकुंतलाच्या ( १८६९ ) भाषांतराबाबत झाली. मुखपृष्ठावर भाषांतरकाराचे नाव नाही. 'विनायकराव गोपाळराव घोसाळकर' ह्यांनी छापवून प्रसिद्ध केला, असा घसघशीत जाड ठसा मात्र मुखपृष्ठावर आल्याने व प्रस्तावनाही त्यांच्याच सहीने प्रसिद्ध झाल्याने, त्याच्या कर्तृत्वाविषयी गैरसमजूत होणे साहजिक होते.

### भाषांतरदृष्टीने विचार

मराठीत भाषांतरित झालेल्या मूळ भाषेतील नाटकांसंबंधाने म्हणजे त्याच्या वाङ्मयीन विशेषांसंबंधाने स्वतंत्र असे सांगण्याची फारशी आवश्यकता मुळातच नाही. नाटकाचे गुणदोष किंवा ग्रंथकाराची योग्यता याविषयीचा विचार मूळच्या त्या नाटकाच्या भाषेच्या वाङ्मयसमीक्षेतच यथायोग्यपणे येऊ शकतो. भाषांतरात्मक कृतीला भाषांतरित झालेल्या भाषेत एक 'भाषांतर' यापलीकडे स्वतंत्र असे वाङ्मयीन स्थान नसते. भाषांतरकाराला फारसे श्रेय जे मिळत नाही, त्याचे खरे कारण हे आहे. सारीच्या सारी भाषांतरात्मक नाटके रंगभूमीवर आली, आणि त्यांचे तत्काळ प्रयोग झाले, असेही दिसत नाही. परशुरामपंततात्यांच्या वेणीसंहार, मृच्छकटिक, ( क्वचित नागानंद ) या मोजक्याच नाटकांचे प्रयोग रंगभूमीवर सादर करण्यात आले; पण तेही फार उशिरा. तो मान त्या नाटकांस १८७९-च्या आसपास मिळाला. इंग्रजी नाटकांच्या भाषांतरांबद्दलही हेच दिसते. 'भ्रांतिकृत चमत्कार' ( The Comedy of Errors ) यासारख्या हास्यरसात्मक, प्रहसनवजा एखाद दुसऱ्या नाटकाचे प्रयोग कमीअधिक प्रमाणात पुढे काही नाटकमंडळ्या करीत. अशा वेळी नाट्यकला किंवा नाट्यवाङ्मय या दृष्टींनी भाषांतरात्मक नाटकांचे नेमके एतिहासिक महत्त्व किंवा कार्य कशात दिसून येते, याचा विचार होणे अवश्य आहे.

### भाषाविकास व शैली या दृष्टीने उपयुक्तता

भाषांतरित नाटके पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्यामुळे मराठीतील पुढच्या

१. रत्नावली, प्रस्तावना, पृ. ३.

नव्या नाट्यलेखकांना — मग ते पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक वा कल्पनारम्य अशा कोणत्याही प्रकारची नाटके लिहिणारे असोत, — नाट्यरचनेच्या दृष्टीने पुष्कळच मार्गदर्शन झाले असल्याचे त्यांच्या रचनांवरून दिसते. या नव्या रचनातंत्राच्या परिचयामुळे रंगभूमीचाही काही अंशाने कायापालट झाला. भाषाविकास किंवा नवीन अशी मराठी ललितगद्यशैली निर्माण करण्याच्या दृष्टीनेच खरोखर या भाषांतरात्मक नाटकांचे विशेष महत्त्व आहे. संस्कृत वा इंग्रजी नाटकांची भाषांतरे करणाऱ्या शास्त्रीपंडितांनी किंवा पदवीधर लेखकांनी खरोखर आपली मराठी दृष्टी आणि मराठी शैली वापरूनच ही सर्व भाषांतरे केली व तीतूनच एक नवी गद्य आणि त्याचबरोबर पद्य अशी ललितशैली मराठीला नव्याने प्राप्त झाली. स्वतंत्र लेखन करणाऱ्या पुढच्या लेखकांना ही नव्याने घडविलेली शैली अनायासे मिळाली.

**‘ प्रबोधचंद्रोदय ’**

संस्कृतातून मराठीत आणिलेले पहिले नाटक म्हणून ‘ प्रबोधचंद्रोदय या ’[१] नाटकास फार महत्त्व प्राप्त झाले आहे. या नाटकाचा मूळ कर्ता श्रीकृष्णमिश्र पंडित. हा अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला, असा तर्क आहे. हे नाटक षडंकी आहे. यात अद्वैतसिद्धान्ताच्या तत्त्वाचे मंडन केले आहे. यापुढे झालेल्या सर्व अन्योक्तिरूप नाटकांचा पाया या नाटकाने घातला. त्याप्रमाणे पुढे झालेल्या राम व कृष्ण यांच्या पराक्रमवर्णनविषयक नाटकांप्रमाणे या नाटकाचा व यापुढे झालेल्या हिंदुधर्मविकासाचा अत्यंत निकटचा संबंध आहे.[२] या नाटकाचा विषय तत्त्वज्ञानाचा आहे. काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार, दंभ इत्यादिकांच्या अधीन होऊन विषयलंपट झालेल्या लोकांना ‘ ईश्वराचे वास्तविक ज्ञान करवून त्यांना दुर्लंघ्य अशा भवसागरांतून तारून नेण्यासाठी परमदयालु श्रीकृष्णमित्र पंडित यांनीं ’ हा ग्रंथ रचिला. असा हा विषय नाटकाच्याद्वारे सांगण्याचे कारण असे की, “ ( कृष्णमिश्रांनी ) आपल्या विद्यार्थ्यांना वेदांतशास्त्राचे सिद्धान्त पढविण्यास आरंभ केला, परंतु त्या सर्वांचीं चित्तें पूर्वोक्त लौकिक व्यापारामध्येच निमग्न असल्यामुळे तो उपदेश त्यांच्या हृदयात ठसेना; तेव्हा त्यांनीं अज्ञानी लोकांची ज्यांवर विशेष प्रीति अशा शृंगारादिक अनेक रसांनीं मिश्रित व अतिशय दुर्बोध जो वेदांतविषय तोहि सुलभ रीतीने कळावा अशा नाटकाच्या पद्धतीने एक नवीन ग्रंथ संस्कृत भाषेंत रचून त्याचे नांव प्रबोधचंद्रोदय ( म्ह. ज्याच्या योगाने प्रबोधरूप चंद्राचा उदय होतो ) असे ठेविलें. ”[३]

---

१. भाषांतरकार : सदाशिव बजाबाशास्त्री अमरापूरकर व रावजी बापूजीशास्त्री बापट.

२. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग १६ न ( १२६ ).

३. प्रबोधचंद्रोदय, प्रस्तावना, पृ. २–३.

वेदान्तविषय नाटकरीतीने सांगण्यासाठी येथे सर्व मानवी भावभावनांना व चित्तवृत्तींना मानुषरूप देऊन स्वतंत्र व्यक्तित्वधारी अशा पात्रांच्या स्वरूपात त्यांना उभे केले आहे. अंतःकरणातील सात्त्विक आणि तामस वृत्तींचा झगडा येथे राजा विवेक आणि त्याचा भाऊ महामोह यांच्या कलहाच्याद्वारे वर्णिला आहे. महामोह आपले वैरी धर्म, शान्ती इत्यादींना बंदीत टाकितो. पुढे बाजू उलटून विवेकाचा विजय होऊन त्याची पत्नी उपनिषद् हिच्याशी त्यांचा संगम होतो व पुढे त्यांच्यापासून प्रबोधचंद्राचा जन्म होतो. या नाटकातील आणखी एक महत्त्वाचा भाग असा की, श्रद्धेचा तपास करण्यासाठी स्वतः शान्ती जैन, बौद्ध, शैव व संन्यासी इत्यादी पंथांत जाते. परंतु ते सर्व पंथ इच्छापूर्ती व भोगवृद्धी याचेच उपासक असल्याचे तिला आढळते. विष्णुभक्तीत मात्र शेवटी तिला श्रद्धा भेटते.

प्रबोधचंद्रोदयाचे नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीने एक वेगळेच महत्त्व आहे. गहन, रूक्ष अशा तत्त्वज्ञानासारखा विषयही लोकांच्या गळी उतरविण्यासाठी स्वभावतः ‘ नाटकादिरसिक ’ असलेल्या त्यांना ‘ नाटकव्याजेन ’ सांगण्याचा प्रयत्न कृष्णमिश्राने केला. अमूर्त, अनंग अशा भावनांना व वृत्तींना मानवरूपात चालत्या-बोलत्या करणाऱ्या या पद्धतीमुळे मोठा फायदा असा झाला की, रंगभूमीवरील अतिमानवी देवदेवता, यक्षराक्षस, त्रिकालदर्शी ऋषिमुनी या पात्रांचे महत्त्व थोडे कमी होऊन मानवदेहधारी व्यक्तींचा रंगभूमीवर प्रवेश प्रथमच या अन्योक्तिरूप नाटकांच्या द्वारे झाला. बऱ्यावाईट मानवी गुणांनी युक्त असलेली प्रातिनिधिक माणसे रंगभूमीवर आली. पौराणिक आणि सामाजिक नाटकांमधील मधला दुवा म्हणून या अन्योक्तिरूप नाटकाचे वरील महत्त्व लक्षात घेण्यासारखे आहे. मराठी नाट्यवाङ्मयात याच कालात काही अन्योक्तिरूप नाटके लिहिलेली आढळतात. ‘ विचारसार ’ ( १८५४ ) (चंद्रिका, पु. १, अ. २ ), ‘ सायुज्यसदन ’ ( १८६८ ), ‘ संसार–अंतःपूरपर्यटन–रूपक ’, १८७१ ( दंभहारक, पु. १, अं. १ ) इत्यादी नाटकांच्या लेखकांवर मूळ व भाषांतर-रूप प्रबोधचंद्रोदय नाटकाचा परिणाम झाला असला पाहिजे, हे उघड आहे. इंग्लड-मध्येही सोळाव्या शतकाच्या अखेरीस धार्मिक उपदेशासाठी, प्रचारासाठी केल्या जाणाऱ्या Moralities-चे स्वरूपही असेच अन्योक्तिरूप किंवा रूपकात्मक होते. त्यांमध्येही ( Sin ), प्रभुप्रसाद ( Grace ), पश्चात्ताप ( Repentance ) इत्यादींना मानवी रूपांत रंगभूमीवर चितारण्यात येत असे. अन्योक्तिरूप नाटकांत मानवाचा प्रवेश झाल्यामुळे स्वतंत्र असे कथानक त्याकरिता निर्माण करण्यास लेखकाला अवसर मिळाला. पौराणिक कथानके आधीच तयार असल्यामुळे पूर्वी तसा वाव नव्हता. कथानकरचना व व्यक्तिचित्रण या गोष्टींना अन्योक्तिरूप नाटकांमुळे नव्याने वाव मिळाला, हे स्पष्टच आहे.

प्रबोधचंद्रोदयाचे मुळात एकूण सहा अंक आहेत. परंतु अमरापूरकर-बापट या शास्त्रिद्वयाने तीनच अंकांचा अनुवाद केला आहे. मूळ नाटक अंकयुक्त व अंकही

सप्रवेश असून ते गद्यपद्ययुक्त आहेत. भाषांतरकर्त्यांनी इतर व्यवस्था जरी तीच राखली असली, तरी पद्याचे भाषांतर समश्लोक मराठीत न करिता सरळ गद्य अनुवादच केला आहे. मराठीत भाषांतरित झालेल्या या पहिल्याच नाटकाच्या भाषेची कल्पना येण्यासाठी पुढे एक उतारा दिला आहे.

**सूत्रधार** :– ( नटीस उद्देशून ) अगे, ब्रह्मतेज स्वभावतःच सौम्य असते; व ते जरी कांहीं कारणानें विकार पावले तरी पुनः आपल्या मूळस्थितीवरच येते... व असेच अवतारी पुरुष असतात ते परोपकाराकरितां आपल्या सामर्थ्याने मोठमोठालीं अलौकिक कृत्यें करून पुनः शांतीच पावतात....अथवा जसे पूर्वी **महामोहा**चें प्राबल्य झाले असतां **विवेका**ने त्याचा समूळ नाश करून **प्रबोधा**चा उदय केला, तसाच यानेंहि उन्मत्त झाला जो **कर्ण** त्याला जिंकून आपला परममित्र कीर्तिवर्म राजा याचा उदय केला; आणि सांप्रत तो शांति पावून ब्रह्मानंदरसाचा अनुभव घेण्यास उत्सुक झाला आहे. ( इतक्यांत पडद्याचे आंत कोणी मोठ्यानें ओरडून बोलतो – )

अरे दुष्टा नराधमा, आम्ही जिवंत असतां आमचा स्वामी जो **महामोह** याचा **विवेका**ने पराजय केला असे म्हणतोस !

**सूत्रधार**:– ( घाबरा होऊन पाहातो आणि **नटी**स ) अगे, **रती**ने आपल्या रोमाच-युक्त भुजांनीं जास्त दृढ आलिंगन केलें आहे व ज्याचे डोळे मदानें धुंद झाले आहेत असा हा **काम** आपल्या सौंदर्यानें जगास मोह करीत करीत इकडेच येतो आहे; आणि आपले बोलणे ऐकून त्याला मोठा राग आला आहे असे दिसते, तर आतां आपण येथून लवकर निघून जावे हे बरे ( असे म्हणून तीं उभयतां सभेंतून निघून गेलीं. )

## प्रवेश १

पूर्वी सांगितल्याप्रमाणे **रती**सहवर्तमान **काम** सभेत प्रवेश करतो.

**काम** :– ( क्रोधयुक्त होऊन पुनः पहिल्याप्रमाणे ) मूर्खा नराधमा, आम्ही जिवंत असतां त्या क्षुल्लक **विवेका**पासून आमच्या स्वामीचा पराजय वर्णितोस काय ? अरे मोठमोठ्या पंडितांनाहि शास्त्रीय विवेक जोंपर्यंत कमलनेत्रा स्त्रियांचे नेत्रकटाक्ष त्यांजवर पडले नाहीत तोंपर्यंतच स्फुरण पावतो. एकदा यांची नजरानजर झाली असतां ते आपलीं सर्व शास्त्रें एकीकडे ठेवून माझ्याच स्वाधीन होतात. पाहा ! बागेंतील रमणीय मंदिर, प्रफुल्ल झालेले मालत्यादिक पुष्पांचे वेल, कर्णास मधुर असा गुंजारव करणारे भ्रमर, पुष्पावरील सुगंध घेऊन मंद आणि शीतल वाहणारा वायु, व चांदण्या रात्री आणि सुंदर तरुणी स्त्रिया; हीं इतकीं माझीं अमोघ शस्त्रें तयार असल्यास त्या **विवेका**चें सामर्थ्य मजपुढें काय चालणार आहे ? आणि मग त्या **प्रबोधा**चाहि उदय कोठून होणार ?

**रतिः** – स्वामी, राजाधिराज **महामोहाचा** प्रतिपक्षी **विवेक** मोठा बलाढ्य आहे असें वाटतें.

**कामः** – प्रिये, तुला साधारण स्त्रियांप्रमाणें हें विवेकापासून भय कोठून उत्पन्न झालें ? अगे, माझे धनुष्यबाण पुष्पमय आहेत व सुकुमारहि दिसतात खरे; परंतु ते इतके तीव्र आहेत कीं, त्यांच्या योगानें देवांमध्यें किंवा दैत्यांमध्ये अथवा या सर्व त्रिभुवनांतहि माझी आज्ञा उल्लंघन करण्याविषयीं कोणीच समर्थ नाहीं. पाहा ! माझ्या बाणांच्या सामर्थ्यानें सर्व देवांचा अधिपति जो इंद्र तो अहल्येसीं रत झाला व सर्व सृष्टीचा निर्माणकर्ता ब्रह्मदेवहि आपल्या कन्येसीं लुब्ध झाला आणि चंद्रानें तर आपल्या गुरुपत्नीसींच गमन केलें; याप्रमाणें दुष्कर्मास प्रवृत्त करण्याविषयीं माझ्या बाणांस किंचित् श्रम आहेत काय ?[1]

'रम्यं हर्म्यतलं नवाः सुनयना गुञ्जद्द्विरेफा लताः' किंवा 'अहल्यायां जारः सुरपतिरभूदात्मतनयां' या मूळ श्लोकांतील दर्प, प्रौढी गद्य भाषांतरामध्ये अर्थातच तितकी अनुभवास येत नाहीत. त्या काळच्या छापण्याच्या शिळा-पद्धतीला धरून प्रत्येक प्रवेशाच्या प्रारंभी काम, रति, विभ्रमावती, मिथ्यादृष्टी इत्यादींची पोथ्यांतल्या-प्रमाणे रेषाचित्रे दिलेली आहेत.

## पाळंदे यांचे 'विक्रमोर्वशी'

या वेळी नाटके, कादंबऱ्या जशा स्वतंत्र ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत असत, तशाच त्या नियतकालिकांमधूनही क्रमशः किंवा हप्त्याहप्त्याने येत असत. काहींची ग्रंथरूप स्वतंत्र संस्करणे पुढे निघत, तर काहींना ग्रंथरूपता प्राप्त न झाल्याने त्यांची स्वतंत्र नोंदही फारशी कुठे झालेली नाही. भास्कर दामोदर पाळंदे[2] यांनी कालिदासाच्या विक्रमोर्वशी नाटकाचा केलेला अनुवाद असाच 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकाच्या चौथ्या व पाचव्या पुस्तकांमध्ये क्रमशः प्रसिद्ध झाला. संस्कृत भाषेतील प्रख्यात नाटककाराच्या कलाकृतीचे मराठीत भाषांतर करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय, असे मात्र या भाषांतरास म्हणता येणार नाही. कारण उपलब्ध झालेल्या 'चंद्रिका' मासिकाच्या १८५४-च्या ऑगस्ट, सप्टेंबर व डिसेंबर या अंकांत कालिदासाच्या

१. 'चंद्रिका' मासिकाच्या ( पुस्तक ३, अं. १० ) ऑक्टोबर १८५६-च्या अंकांत प्रबोधचंद्रोदयाचे भाषांतर आलेले आहे. या अंकात कामरतिसंवादच छापलेला आहे. तो ताडून पाहता अमरापूरकराच्या भाषांतराचेच ते पुनर्मुद्रण दिसते.

२. भास्कर दामोदर पाळंदे, १८३२-१८७४ : पदवीधर ( १८५० ) शिक्षकः रेव्हेन्यू खात्यात, तेथून स्मॉल कॉज जज्जाच्या जागेवर काव्यरचना — रत्नमाला ( १८६७ ), गीतासुधा ( १८७३ ), मराठी पद्यरचना व मुख्य मराठी कवींचे वर्णन, विक्रमोर्वशी ( भाषांतर ), लहान मुलांकरितां पहिलें पुस्तक, भा. १ ( १८६७।६–आ. ) इ. अन्य पुस्तके. काही निबंध ( ज्ञानप्रसारक सभा व Students' Scientific & Literary Association यांच्यासमोर वाचलेले ).

'शाकुंतला' नाटकाचे भाषांतर क्रमशः आलेले आहे.[1] हे भाषांतर संपूर्ण मिळाले नसल्यामुळे ते कोणी केले आहे, हे निश्चित सांगता येत नाही. तसे पाहता त्या वेळच्या इतरही अनेक मासिकांत आणखीही काही भाषांतरात्मक किंवा स्वतंत्र नाटके क्रमशः आलेली असण्याची शक्यता आहे. अर्थात त्या काळच्या मासिकांचे सर्व अंक क्रमाने उपलब्ध झाले, तरच त्यासंबंधी काही निश्चित लिहिता येईल. ही नाटके प्रत्येक अंकात सलग येत, असेही नाही. मध्ये चार-चार, सहा-सहा महिन्यांचाही खंड असे. अशा वेळी वाचकही त्यांचा सलग रसास्वाद कसा घेत असतील, हेही एक कोडेच आहे. परंतु त्या वेळी मासिकाचे लालित्यांग किंवा साहित्यांग हेही भरदार असल्याचे दाखविण्यासाठी अशा तऱ्हेच्या ललितकृती भाषांतरित वा स्वतंत्र रूपात मधूनमधून का होईना, पण मासिकांचे अंक भूषवीत असत, असे दिसते.

पाळंदे यांचा अनुवाद मात्र सलगपणे १८५४ साली म्हणजे एकाच वर्षात प्रसिद्ध झालेल्या आठ अंकांमध्ये पूर्ण झालेला असून शेवटी भाषांतरकर्त्याने आपले निवेदनही जोडले आहे. परशुरामपंततात्यांच्या नाटकांच्या भाषांतराच्याही आधीचे हे कालिदासीय नाटकाचे भाषांतर असल्यामुळे याला एक विशेष महत्त्व आहे. भाषांतराच्या पद्धतीविषयी पाळंदे लिहितात, "कालिदास याची सर्व कविता सुगम व सरस आहे हे विद्वज्जनांस माहीतच आहे. परंतु कविता संस्कृत असल्यामुळें सर्व लोकांस तिजमधील रसाची प्राप्ति होत नाहीं, याजकरितां भाषांतर केलें आहे. मूळाची पद्धति हुबेहूब ध्यानात यावी म्हणून संस्कृत श्लोक ज्या चालीचे आहेत त्याच चालीचे प्राकृत करून घातले आहेत."[2] कालिदासाचे हेच नाटक विशेषेकरून निवडण्याचे कारण ते असे देतात, "कालिदास याचीं दोन नाटके प्रसिद्ध आहेत, एक शकुंतला व दुसरे विक्रमोर्वशी; हीं दोन्हीं उत्तम आहेत. परंतु विक्रमोर्वशी यात खरे नाटकचातुर्य विशेष आहे असे वाटते."[3] भाषांतराच्या निमित्ताने संस्कृताच्याच धर्तीवर भाषांतरकर्त्याने मराठी पद्येही तशीच निर्यमक रचिली आहेत. त्याविषयी पाळंदे सांगतात, "पद्यांत कोठें कोठें अप्रसिद्ध म्हणजे ज्यांचा प्राकृत भाषेंत फारसा उपयोग करीत नाहींत अशा संस्कृत शब्दांची योजना करणेंहि अवश्य पडले; परंतु अशा ठिकाणीं टीपा घालून पर्याय शब्द घातले आहेत व इतर रचना, अशिक्षित पुरुषांसहि अर्थाचा स्पष्ट बोध व्हावा, अशी करण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळे श्लेष, प्रास, यमक इत्यादि अलंकार साधतां आले नाहींत व जाणीं मोरोपंत आदिकरून प्राकृत कवींची कविता वाचली आहे त्यांस ही कविता आवडली नसेल. असे

१. पुस्तक ४, अं. १२, मार्च १९५४ प्रारंभ; पुस्तक ५, अं. ७, ऑक्टोबर १९५४ पूर्ण

२. ज्ञानप्रसारक, पु. ४, अं. १२, पृ.३६२.

३. तत्रैव.

झालें असल्यास त्यांची क्षमा मागितली पाहिजे. परंतु ही कविता मुख्यत्वेंकरून जांकरितां केली त्यांस समजून जर त्यांच्या चित्तांत आनंद झाला तर कर्त्याचा उद्देश सिद्धीस गेला."[१]

पुढील उताऱ्यावरून पाळंदे यांच्या भाषांतरशैलीची काही कल्पना येईल —

**मेनका** ( थांबून ) — सखींनो भिऊं नका. तो पहा राजाचा सोमदत्त रथ दिसतो आहे. मला तर वाटतें कीं राजा कार्य केल्याशिवाय परत येणार नाहीं. ( चांगला शकून झाल्यासारखें करून त्या पाहतात. ) ( पुढे, राजा, सारथी व चित्रलेखेनें उजव्या हातांत धरिलेली आणि भीतीने जिचे डोळे मिटले आहेत, अशी उर्वशी हीं येतात. )

**चित्रलेखा** — सखी, सावध हो, सावध हो.

**राजा** — अगे सुंदरी, सावध हो, सावध हो.
महेंद्र याचा महिमा महान् सखी,
न दैत्यभीती अगदींहि राहिली,
प्रशस्त डोळे विकसोत सुंदरी,
प्रभात होतां नलिनी फुले जशी.

**चित्र०** — काय आश्चर्य हे ! ही अजून सावध होत नाहीं. हिच्या श्वासोच्छ्वासावरून मात्र ही जिवंत आहे असे समजावयाचें.

**राजा** — तुझी सखी फारच भ्याली आहे.
पुष्ट कुचांच्या मध्ये हृदयाचा कंप फार दिसतो हा.
होत्ये खालीं वरतीं माळ किती त्यामुळेच पहा !

**चित्र०** — ( करुणायुक्त ) अये उर्वशी, आपली भीति सोडून दे. तूं अप्सरा असून असे घाबरणे तुला अगदीं अयोग्य.

**राजा** — भय कंप न सोडी या अतिकोमल पुष्पतुल्य हृदयाला,
पदर हिचा उडतो गे सहनश्रम दाखवायाला.
( उर्वशी सावध होत्ये. )

**राजा** — स्वस्थ ऐस. तुझी सखी सावध झाली. अगे,
इंदू येतां वरवर जशी रात्र काळोखहीन,
ज्वाला रात्रीं हळुहळु जशी धूर जाऊन शुद्ध,
पर्जन्यानें गढुळहि जशी स्वच्छ गंगा पुढें ती,
येतां येतां प्रियसखि तशी नीट शुद्धींत आली.

**उर्वशी** — ( डोळे उघडून ) माझें रक्षण महेंद्राच्या प्रतापानें झालें ना ?

**चित्र०** — महेंद्राच्या नव्हे, महेंद्रसदृश जो पुरूरवा राजा त्याच्या पराक्रमाने.

१. ज्ञानप्रसारक, पु. ५, अं. ७, पृ २२४.

**उर्वशी** — ( राजाकडे पाहून ) दानवाने हा माझ्यावर उपकारच केला.

( येथे 'म्हणजे राजाचे लावण्यरूप दृष्टीस पाडले' अशी तळटीप दिली आहे. )

**परशुराम बल्लाळ गोडबोले**

संस्कृत नाटकांच्या भाषांतरांना जरी १८५१-पासून प्रारंभ झालेला दिसला किंवा मासिक पुस्तकांतूनही जरी काही अनुवाद प्रसिद्ध झाले, तरी या सर्वांत आपल्या भाषांतरात्मक नाटकांनी मराठी नाट्यवाङ्मयाचे नवीन युग सुरू करणाऱ्या परशुरामपंततात्यांच्या[1] १८५७-मध्ये अनुवादिलेल्या 'वेणीसंहार' या नाटकाचे महत्त्व फार आहे. परशुरामपंततात्यांनी एकट्याने संस्कृतातील प्रमुख-प्रमुख नाटककारांचे, एक-एक याप्रमाणे इतर कोणाहीपेक्षा अधिक असे एकूण सहा नाटकांचे मराठी अनुवाद १८५७ ते ७२ या पंधरा वर्षांत केले. शं. बा. मुजुमदार लिहितात, "तात्यांनीं मराठी भाषेची मोठी लज्जा राखली आहे. कारण आमच्या प्राचीन नाटककारांच्या बहुतेक नाटकांचीं भाषांतरे अगोदरच परभाषेंत होऊन गेलीं होतीं आणि मराठी भाषेंत एकहि नाटक नव्हते. हा कमीपणा तात्यांनीं भरून काढला."[2]

तात्यांच्या भाषांतरविषयक दृष्टीचा विचार करिता तात्यांच्या डोळ्यांपुढे मराठी भाषा आणि मराठी वाचकच विशेषेकरून असल्याचे दिसते. भाषांतराने संस्कृता-भ्यासकाची सोय व्हावी ही त्यांची दृष्टी नव्हती, आणि म्हणूनच भाषांतर करिताना त्यांनी संस्कृतावर जोर न देता तो मराठीवर दिल्याचे दिसून येते. भाषांतरविषयक आपली भूमिका स्पष्ट करिताना ते लिहितात, "आतां भाषांतर म्हटले म्हणजे शब्दास शब्द बरोबर असावें; परंतु तसे केवळ येथे नाहीं. प्रायः बरोबरी आहे, पण क्वचित् स्थळीं फेरफार केला आहे. कारण कीं, संस्कृत भाषेची रीति निराळी आणि महाराष्ट्र भाषेची रीति निराळी पडते. आणि संस्कृताप्रमाणे शब्दास शब्द लावून भाषांतर केले असतां ते महाराष्ट्र भाषेच्या रीतीनें सर्वांशीं चांगले दिसत नाहीं. कोठे रसभंग होतो. म्हणून क्वचित्

१. परशुराम बल्लाळ गोडबोले, ( १७९९–१८७४ ) : मराठी संस्कृताचे अध्ययन, वाई पुणे. 'कोश'शास्त्री, ( सरकारी नोकर ) १८५५-च्या सुमारास ग्रंथनिर्मितीस प्रारंभ. संस्कृत नाटकांची भाषांतरे – वेणीसंहार ( १८५७ ), उत्तररामचरित ( १८५९ ), शाकुंतल ( १८६१ ), मृच्छकटिक ( १८६२ ), नागानंद ( १८६५ ), पार्वती-परिणय ( १८७२ ). संपादित : नवनीत ( १८५४ ), केकादर्श ( १८६७ ), सर्वसंग्रह-मुक्तेश्वर-सभापर्व ( १८६३ ), आदिपर्व ( १८६५ ), मोरोपंत–गदापर्व ( १८६३ ), शल्यपर्व ( १८६३ ), द्रोणपर्व ( १८५५ ), ( शुद्धप्रत ) हरिश्चंद्रोपाख्यान ( १८५९ ) स्वतंत्र : मराठ्यांच्या इतिहासावर सोपी कविता ( १८६४ ), नामार्थदीपिका ( १८६६ ).

२. महाराष्ट्रीय नाटककार – परशुरामपंततात्या, पृ. २५.

स्थळीं संस्कृतांतील अर्थ घेऊन महाराष्ट्र भाषेच्या रीतीनें लिहावें लागते."[1] मराठीला शोभतील असे फेरफार तात्यांनी केले, म्हणून तर त्यांचीं भाषांतरे रसाळ व मराठीच्या प्रकृतीला धरून उतरली व पुढे त्यांचे रंगभूमीवर प्रत्यक्ष प्रयोगही झाले. परतु प्रयोग झाले, तरी ते अठरावीस वर्षानंतर. पण त्याच्याही आधी पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेल्या तात्यांच्या या मराठी नाटकांनी मराठी भाषेला एक वेगळेच वळण व डौल प्राप्त करून देण्याचे मोठेच कार्य केले. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात मराठीला एक नवा आकार, एक नवेच रंगरूप येऊ लागले होते. तिच्या लावण्याचा पहिला बहर धाकट्या चिपळूणकरांच्या निबंधमालेत प्रथम दिसून आला. परंतु तिच्या लावण्याचा पुढे जो विलास दिसून आला, त्याच्या आधी तिच्या कलांचा क्रमाक्रमाने विकास करण्यात ज्या दोन रसिक पंडितप्रवरांनी प्रामुख्याने श्रम घेतले, ते म्हणजे शालापत्रककर्ते व शिक्षणाधिकारी कृष्णशास्त्री चिपळूणकर व परशुराम-पंततात्या गोडबोले हे होत. लालित्य, सौंदर्य, आविष्कारक्षमता इत्यादी मराठी भाषेचे जे गुण पुढे निबंधमालेत विशेष रीतीने प्रकटले व वाढीस लागले, त्याला कारण या दोन विद्वानानी केलेली मराठीची सेवा हीच पुष्कळ अंशी असल्याचे दिसून येईल. या माणसांचे कार्य जर या सुमारास न घडते, तर निबंधमालेतील मराठीचा लावण्यविलास पहावयास मिळण्यास आणखीही काळ लोटावा लागला असता.

तात्याचे मोठेपण आणखी अनेक बाबतींत आहे. भाषांतरकार असूनही तात्यांनी नाट्यकलेच्या व नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीने काही नव्या प्रथा सुरू केल्या; मात्र त्या मराठी प्रकृती व परंपरा यांना धरूनच होत्या. या प्रथांचे अनुकरण पुढल्या नाट्य-लेखकांनी व भाषांतरकर्त्यांनी न चुकता केलेले दिसून येते. भाषांतर करिताना त्यांनी "प्रायः गद्याच्या ठिकाणीं गद्य व पद्याच्या ठिकाणीं पद्यें केलीं आहेत."[2] सर्व ग्रंथाचे केवळ गद्यामध्ये भाषांतर करणारा फक्त अर्थावर दृष्टी ठेवणारा असतो. उभय भाषांचे कामचलाऊ, व्यवहारापुरते ज्ञान असले, म्हणजे त्याचे भागते. परंतु पद्याचा अनुवाद पद्यामध्ये करण्याचे आव्हान स्वीकारणाऱ्याजवळ मात्र कवित्व, रसिकता आणि भाषाभिज्ञता या गोष्टी चांगल्या प्रमाणात असाव्या लागतात तात्यांच्या ठिकाणी या तिन्ही शक्ती उपस्थित होत्या, म्हणून तर ते अनुवादालाही मूळ ग्रंथाइतकीच स्वतंत्र आढ्यता प्राप्त करून देऊ शकले.

नाटकांतील पद्यभागांचे मराठीत भाषांतर करिताना तात्यांनी आणखी एक कलात्मक दृष्टी वापरून मराठीचा मूळचा जो पिंड त्याचे रक्षण करून तो वाढविण्याचे पुण्य संपादिले. जुन्या मराठी कवींच्या काव्याचा जीवनभर व्यासंग असल्यामुळे तात्यांना गद्याइतकेच पद्य लिहिणेही साधून गेले होते. जुन्या वाङ्मयाच्या अभ्यासाने

१. वेणीसंहार, आ. २, १८६१, उपोद्घात, कलम २.

२. उत्तररामचरित, प्रस्तावना, पृ. ४.

मराठी कवितेचे खरे आवडते असे छंद कोणते, याची तात्यांना बरोबर कल्पना होती. संस्कृतातील अक्षरगणवृत्तात्मक रचनेचा साचाच आपल्या पद्य भाषांतरास जसाच्या-तसा न घेता त्यांनी मराठी प्रकृतीला धरून ओवी, अभंग, घनाक्षरी, साक्या, दिंड्या, लावणी, कटाव, सवाया अशा कितीतरी लोकसुलभ मराठी छंदांचा व गेय पदांचा अंगीकार केला. याविषयी आपली भूमिका सांगताना ते लिहितात, "पद्यांत बहुत श्लोक आहेत. क्वचित आर्या, ओव्या, अभंग, साक्या दिंड्या आणि थोडीं पदें तालासुरावर म्हणण्याजोगी केली आहेत."[1] तात्यांची भाषांतरे केवळ वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना मूळ संस्कृत ग्रंथ समजण्यास सुलभ व्हावे, एवढी संकुचित शालेय दृष्टी ठेवून केलेली दिसत नाहीत. भाषांतरांना त्यांनी मराठी वाङ्मयात स्वतंत्र स्थान प्राप्त करून दिले. तालासुरावर गाण्यासाठी पदे रचून ही पुस्तके आपण लोकरंजनार्थ रचीत आहो, याची त्यांना कल्पना असावी. तात्यांच्या पदांच्या चाली जुने मराठी कवी शिवरामस्वामी, केशवस्वामी, शिवदिन केसरी, मध्वमुनीश्वर इत्यादिकांची पदे, प्रचारात असलेली स्त्रीगीते किंवा कटिबंध, लावणी यांसारख्या लोकच्छंदाप्रमाणे असत. त्रिलोकेकर-किर्लोस्करांच्याही आधी भाषांतरात्मक नाटकांत का होईना, परंतु पात्रांना स्वतंत्र अशी गेय पदं घालण्याची प्रथा तात्यांपासूनच सुरू झाली होती. वेणीसंहार नाटकाच्या शेवटी "सर्व अंकांतील एकंदर पद्यें" असे एक कोष्ठक देण्यात आलेले आहे. त्यावरून संस्कृत-प्राकृत छंदांत रचना करण्याचे त्यांनी स्वीकारिलेले प्रमाण लक्षात घेऊन तात्यांच्या स्वतंत्र मराठी दृष्टीची कल्पना येईल. सहा अंकांत मिळून श्लोक १२४, आर्या ५९, ओव्या ४८, दिंड्या १२, साक्या ३०, पदे १२, अभंग ८ व कटाव १ असा हा एकूण ३०४ पद्यांचा तपशील आहे.

तात्यांच्या भाषांतरांचा पाक इतका सरस, गोड आणि नेटका उतरला आहे की, तो प्रत्यक्ष अनुभविण्यासाठी काही उदाहरणेच पहावी लागतील. नागानंद नाटकातील 'मधुरमिव वदन्ति स्वागतं भृङ्गनादैः' या श्लोकाचे भाषांतर असे —

मधुर मधुर शब्दें बोलती स्वागताते,
करिति फळनतांहीं मस्तकांहीं नतीते,
करुनि कुसुमवृष्टी अर्ध्य हे काय देती,
तरु अतिथिपुजेची शीकले येथ रीती.[2]

यातील रीती मुळातल्याप्रमाणेच सुकुमार आहे. शिवाय, सर्व अर्थ पुन्हा जसाच्या तसा उठवून दिला आहे.

जी ही गदा मम करांत सदैव नाचे,
घाते इच्या चुरिन ऊरु सुयोधनाचे;

१. वेणीसंहार, आ. २, उपोद्घात, कलम ३.
२. नागानंद, अं. १, पृ. १७.

रक्तें तयांतिल विलेपिन मी स्वपाणी
त्यांहींच बांधिन सुखें तव मुक्त वेणी.[1]

वेणीसंहारातील "चञ्चद्भुजभ्रमितचण्डगदाभिघातः" या श्लोकाचा सर्व आशय आणि रस यथोचित शब्दांत वरील भाषांतरात तात्यांनी उतरविलेला दिसेल. मराठीची नस तात्यांनी बरोबर ओळखली होती. जुन्या रसाळ कवितेतही ते चांगलेच मुरलेले असल्यामुळे मूळ संस्कृतातील सुदीर्घ अशा शार्दूलविक्रीडित, मंदाक्रांता इत्यादी वृत्तांचाही अनुवाद ओवी-अभंग-आदी प्राकृत छंदांत ते मोकळेपणाने आणि सहज करीत.

अबीर बुका उधळिती, तेणे पिवळे रंग दिसती,
सुवर्णपर्वताची शोभा धरिती, मलय पर्वतीं.
मुठी भरभरोनि सिंदूरधूळी, फेकूनि देती अंतराळीं,
तेणे संध्याराग दिग्मंडळीं, सुरंजित दिसतसे.[2]

ही रचना मुक्तेश्वरासारख्या एखाद्या प्राचीन मराठी कवीची वाटावी; इतकी प्रसादपूर्ण उतरली आहे. 'निष्यन्दश्चन्दनानां शिशिरयति लतामण्डपे कुट्टिमान्तान्' याचे ते 'लतांच्या मडपीं चंदनाचे सडे, थंड चोहींकडे भूमी झाल्या'[3] असे अभंगात लीलेने रूपांतर करितात, आणि त्यामुळे संस्कृतातील अक्षरगणवृत्तात कठीण वाटणारी भाषा व आशय त्यांच्या मराठी छंदाच्या वापरामुळे सुगम व सोपी होऊन जातात. भाषांतरासाठी संस्कृतातील समवृत्त पतकरिल्यास मराठी रचना अनिच्छया का होईना, पण क्लिष्ट बनल्याचे दिसते. राजवाडे, लेले इत्यादींच्या मराठी भाषांतरात श्लोकांतील संस्कृत सामासिक शब्दांचे अर्थ स्पष्ट करण्यासाठी विस्तृत पदटीपा दिलेल्या आढळतील. परंतु मराठी छंदातल्या स्वातंत्र्यामुळे किंवा त्यांतील मोकळेपणामुळे भाषांतरात आपोआपच क्लिष्टतेपासून बचाव होऊन भाषांतर बऱ्याच सहज रूपात अवतरल्याचे दिसते. ओव्या, दिंड्या, साक्या, अभंग, पदे यांच्या रचनेत संस्कृत शब्दांचे प्रमाण आपोआपच कमी होऊन पदटीपा द्याव्या लागलेल्या नाहीत; 'दृष्टा दृष्टिमधो दधाति कुरुते नालापमाभाषिता" याचे तात्यांनी साकीत केलेले रूपांतर मराठी भाषिकाला अत्यंत सरळ असा रसास्वाद घडविते !

होतां दृष्टादृष्ट अधोमुख होउनि खाली बघते;
कांहिं निमित्तें बोलविली तरि मौन धरोनी बसते,[4]

१. वेणीसंहार, श्लोक २६, अं. १.

२. 'चूर्णैः पिष्टीतकस्य द्युतमिह मलये मेरुतुल्यां दधानः' या तेराव्या श्लोकाचे भाषांतर, नागानद, अं. २, पृ. ६९.

३. तत्रैव, अं. ३, श्लो. ७, पृ. ८७.

४. नागानंद, अं. ३, श्लो. ४, पृ. ८५.

या साकीचा उठावच मुळी संगीतमय वाटतो. मराठी छंदांतील गेयतेचा फायदाही तात्यांनी मोठ्या योजकतेने घेतला. तालसुरावर आपली कविता म्हटली जावी, अशी त्यांची दृष्टी असल्याचेही यावरून दिसून येईल.

संस्कृत नाटकांतील सर्व प्रकारचे जाड्य, दुर्गमता व पांडित्य काढून टाकून तात्यांनी त्या नाटकांना असा मराठी पेहराव दिला, की तो अंगावर बेतल्याप्रमाणे बरोबर बसला; इतकेच नव्हे, तर उलट खुलून दिसला. संस्कृतातली ही नाटके तात्यांनी मराठी नाटके बनवून टाकिली. संस्कृत नाटककारांनी मंगलाचरणात गणेशस्तुती क्वचितच केलेली असेल. परंतु तात्यानी विष्णुदासी पौराणिक नाटकांच्या मराठी परंपरेला वंद्य मानून संस्कृत नाटकांच्या भाषांतरांतही गणपतीच्या स्तुतीची पदे प्रारंभी घातली. 'विघ्नहरा मम विघ्न हराया लवकर येई गजवदना' (वेणीसंहार) किंवा 'तो गणराज गजानन मंगल देवो सकल जनां' (मृच्छकटिक) ही त्यांची पदे पहावी. कृष्णशास्त्री राजवाड्यांसारख्या तात्यांच्या पठडीतील भाषांतरकारांनी या प्रथेचे परिपालन केले. तात्यानी जी पदे रचिली, त्यांत काही ठिकाणी विष्णुदास-कवींप्रमाणे आपल्या नावाची मुद्राही त्यांनी ठेवून दिली. उदा. 'नारायणसुत विनवितसे, कीं येउनि पद दावावे ॥ गणराया लौकर यावें.[1] 'प्रकीर्णः पुष्पाणां हरिचरणयोरञ्जलिरयम्' या वेणीसंहारातील नांदीश्लोकाचे त्यांनी 'पुष्पांजलि हा हरिच्या चरणां । वाहिन भावें करुनि स्मरणा' असे सुंदर पद बनविले. उत्तररामचरिताच्या भाषांतरात पात्रांच्या तोंडी तात्यांनी घातलेली पदे मराठी नाटकांत पदरचनेचे नवे युग निर्माण करणारीच ठरली असावी. 'सोड सोड सोड अतां जानकी मला' (अं. १, पद ६९, पृ. २९), 'जन्मुनि रविवंशीं ऐसा ॥ झालों निर्दय मी' (अं. १, पद ३५, पृ. ७१), किति असशी तूं निष्ठुर रामा ॥ नवमेघश्यामा' (अ. ३, पद ३५, पृ. ७१) किंवा 'गे सखि लोभ तुझा हा लटिका ॥ ध्रु. ॥ स्पर्श करुनि मज गेलिस कोठे लावुनि हृदया चटका?' (अं. ३, पद ५७, पृ. ८२) यांसारखी कितीतरी सुंदर पदे तात्यांच्या या आणि अन्य भाषांतरात्मक नाटकांत आली आहेत.

आर्या-दिंड्यांची तर तात्यानी आपल्या सहा नाटकांत रेलचेल उडवून दिली आहे. प्रा. गो. वि. तुळपुळे लिहितात, "तात्यांच्या ओव्या, दिंड्या, साक्या, पदें, घनाक्षऱ्या निःसंशय शुद्ध मराठी रसाळ कवितेचे उत्कृष्ट नमुने होत. तात्यांची दिंडी तर अप्रतिम. तिच्यात मोठी कविकल्पनेची भरारी सापडेल असे नाही, पण स्वभावोक्ति-अलंकाराने वर्ण्य विषयाचे सरस शब्दचित्र काढण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. वामनाचा श्लोक, तुकयाची अभंगवाणी, ज्ञानेशाची ओवी, मयूरपंताची आर्या, अमृतरायाचा कटाव, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची साकी, तशीच परशुरामपंत

१. उत्तररामचरित, अं. १, पृ. २.

तात्यांची दिंडी असें म्हणणे वावगें होणार नाही."[1] 'आई माझे लाडके सितावाई। बाळपणचे कौतूक सांगुं काई!?'[2] यासारख्या सरस दिंड्या जुन्या लोकांना आजही गळ्यावर म्हणण्याचा मोह होतो.

भाषांतरात वर्णनाचे प्रसंग ओळखून तात्यांनी स्वयंस्फूर्तीने जे कटाव रचिले, त्यांमुळे उद्यानवर्णन, राजप्रासादवर्णन इत्यादिकांसाठी कटाव रचण्याचा एक संकेतच पुढील नाटकांमध्ये रूढ होऊन गेला.. 'प्रभातकालरमणीयमग्रतश्चैव बालोद्यानम्। तदलोकयतु देवः?' एवढ्या आधारावर वेणीसंहारात तात्यांनी 'राजेंद्रा, उद्यानाची अद्भुत हे शोभा दिसती.'[3] असे ध्रुवपद ठेवून काव्यातील वर्णनसंकेतांनुसार लता, वृक्ष, पशू, पक्षी इत्यादिकांचे वर्णन करणारा चार कडव्यांचा लांबलचक कटाव रचिला. मृच्छकटिकातही वसंतसेनेची दासी मैत्रेयाला सर्व वाडा दाखविते, त्या प्रसंगी वसंतसेनेच्या महालाच्या एकेका चौकाचे बहारदार वर्णन तात्यांनी कटावाच्या पाच प्रदीर्घ परिच्छेदांत ऐसपैस केले आहे.

— "दासी बोले भटजीबावा, याचा पहिला चौक पहावा, आपण आंत प्रवेश करावा", पाहुन भटजी म्हणे वहावा, चंद्रशंखसम उज्ज्वल कांती, सगिन जोतीं उंच भिंती, जयास दिधली नवी सफेती, वेलबुटी वर फार शोभती, रत्नशिळांचे जिने लवाला."[4]

वेणीसंहारातील दुर्योधनाच्या तोंडच्या 'प्रेमाबद्धास्तामतनयना पोयतमञ्जशोभा' (अं. २, श्लो. १८) या मंदाक्रांता वृत्तातील श्लोकाचे भाषांतर प्राचीन मराठी आख्यानकवींनी योजिलेल्या मदिरावृत्तात तात्यांनी अतिसुंदर रीतीने केलेले दिसेल.

प्रेमदशेत निमीलित लोचन तेज हरी फुलत्या कमळाचे,<br>
लाज बहूतचि यास्तव भाषण अस्फुट हास्यहि मंद जयाचे;<br>
देउनि चुंबन शांत करीं मम यासमयीं तुझिया वदनाचे,<br>
तं करिं पूर्ण मनोरथ सुंदरि इच्छित हेचि मदीय मनाचे.

तात्यांच्या पदांदिंड्यांची एके काळी स्तुती करणारे प्रा. तुळपुळे पुढे आठ वर्षांनी लिहितात," कै. परशुरामपंततात्यांची भाषा आता पुष्कळ जुनी झाली आहे...जुन्या नाटकांत येणारी दिंड्या, श्लोक, आर्या, ओव्या, घनाक्षरी वगैरे गणवृत्ते व मात्र वृत्ते मनोहर वाटत नाहीत. जुन्या पदांच्या हरिदासी चालीही आता आवडणार नाहीत."[6]

१. उत्तररामचरित, उपोद्घात, पृ. १७–१८.
२. उत्तररामचरित, अं. ४, पृ. ९३.
३ वेणीसंहार, अं. २, पृ. २५.
४. मृच्छकटिक, अं ४, पृ. ९७.
५. वेणीसंहार, अं. २, श्लो. २०, पृ. ३५.
६. मृच्छकटिक, आ. ३, उपोद्घात, पृ. ८.

खरोखरच आक्षेपकांच्या म्हणण्याप्रमाणे, प्रौढ, अभिजात संस्कृत नाटकांची सीं त्यांनी कीर्तिमारक्यांने बनविली काय? मराठी किर्लोस्करांच्या सौभद्राबद्दल हा आक्षेप घेता येईल. खरे म्हणजे आजच्या दृष्टीने या जुन्या काळात निर्माण झालेल्या वाङ्मयावर टीका करणे कितपत उचित होईल, याविषयी शंका आहे. त्या काळात तात्यांच्या नाटकांच्या दोनदोन आवृत्त्या निघाल्या. त्यांच्या नाटकांचे प्रयोग झाले. क्रमिक पुस्तकांतही त्यांची नाटकातील कविता आली. ही त्या वेळची त्यांच्या नाटकांची लोकप्रियता विसरता येत नाही. तात्यांचे वैशिष्ट्य हे की, मराठीची जुनी परंपरा व प्रकृती लक्षात घेऊन ही सारी भाषांतरे त्यांनी केली व त्यामुळेच ती केवळ भाषांतरे न ठरता त्या स्वतंत्र कृती ठरल्या; स्वतंत्र सर्जन ठरले. तात्यांनी ही सांधेजोड जुन्याशीं केली, त्यामुळे जुन्याचेही रक्षण झाले व नव्याला नवजीवन मिळाले. संस्कृत भाषेची प्रौढी, [illegible] सौंदर्य, आणि अर्थगौरव हे सर्व काही त्यांनी मराठीत आणून ओतले. त्यामुळे मराठीची शक्ती आणि सौष्ठव निश्चितच वाढले. तात्यांनी पुढच्यांसाठी समृद्ध वाङ्मयीन भाषा याच भाषांतरांतून निर्माण करून दिली; आणि या उपक्रमातून अभिरुचीलाही एक उच्च वळण प्राप्त करून दिले. लेखकांनी ऋणी रहावे, अशा तऱ्हेची ही तात्यांची वाङ्मयीन कामगिरी आहे.

**कृष्णशास्त्री राजवाडे :**

कृष्ण शास्त्री राजवाडे यांची भाषांतरित नाटके परशुरामपंततात्यांच्या पठडीचीच म्हणावी लागतील. भाषांतर झाले, तरी तो स्वतंत्र मराठी ग्रंथ म्हणूनही सरस ठरावा, हा यांचा दृष्टिकोण होता. श्लोकाला श्लोक, पदाला पद असे मराठीत भाषांतर करून दाखविण्याचा त्यांचा आग्रह नव्हता व तसे करण्यात फारसे स्वारस्य नाही, असेच त्यांचे मत असावे. यासंबंधी लिहिताना कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी मराठी भाषांतरांच्या या पद्धतीतील एका गुणाधिक्यावर प्रकाश टाकिला आहे. राजवाड्यांच्या मालतीमाधवाच्या प्रस्तावनेत ते लिहितात, " प्रकृत भाषांतरांत मूळ ग्रंथाचा शब्दशः तरजुमा केला आहे असे नाहीं. तथापि मराठी भाषेची रीत राखून व पद्यरचनेचे नियम न सुटतां, जितका मूळाचा अर्थ आला, तितका आणला आहे व मुळांतला मार्मिक व मुख्य अर्थ प्रायः सोडला नाहीं. संस्कृत भाषेतली बोलण्याची रीत ठरलेली असल्यामुळे त्या भाषेत थोड्या शब्दांनी जो अर्थ दाखवितां येतो, तोच अर्थ मराठींत सुबोध करण्यास अधिक शब्द योजावे लागतात. अशा कारणानें कितीएक ठिकाणीं प्राकृत भाषांतरांत मुळांतल्यापेक्षां विशेष अर्थ आलासा भासेल."[1]

नाटकात पद्यें असल्यास त्यांचे भाषांतर गद्यात न करता पद्यातच होणे इष्ट, असे राजवाड्यांचे मत होतें. ' विक्रमोर्वशी ' नाटकाच्या प्रस्तावनेत ते लिहितात, " ही (गीर्वाण) भाषा गद्यपद्यात्मक कवितारूपाने रसिकांस परमाल्हाद देते, कारण मोकळ्या

१. मालतीमाधव, प्रस्तावना, पृ. ५-६.

वाक्यापेक्षा कवितेपासून आल्हाद फार होत असतो....कवितारूपानें भाषेचा परिणाम झाला असतां तिला गोडी फार येते."[1] भाषांतराविषयी ते म्हणतात, "भाषांतर म्हटलें म्हणजे मूळ ग्रंथाहून भाषांतरांत न्यूनाधिक होऊं नये, पण संस्कृतांत थोड्या शब्दांनीं बहुतार्थांचा संग्रह करितां येतो तसा भाषांतरांत संग्रह करिता येत नाही. तथापि मूळाचा अर्थ न सुटतां अधिकार्थांचा संग्रह कोठें कोठें केला आहे."[2] मालतीमाधव नाटकात मंगलाचरण म्हणून 'गजवदनाची हे क्रीडा, नाशो विघ्नाची पीडा' असे गणेशस्तुतीचे पद राजवाड्यांनी तात्यांनी पाडलेल्या प्रथेला धरून रचिले आहे. आर्या, साक्या, दिंड्या, ओव्या, अभंग, पदे इ. मराठी परंपरेचे छंद त्यांनी भरपूर प्रमाणात आपल्या भाषांतररूप ग्रंथांत वापरले. तथापि राजवाड्यांना साकी विशेष प्रिय असावी असे दिसते, आणि त्यांच्या साक्याही सरळ, सुंदर व सोप्या अशाच उतरल्या आहेत. 'अत्रान्तरे किमपि वाग्विभवातिवृत्तम्' या मालतीमाधवातील (अं. १, श्लो २६) श्लोकाचे त्यांनी साकीत केलेले भाषांतर पहावे—

अशी सख्यांचीं विनोदवचने परिसुनि राजस बाळा
स्मरे शिकविण्या कला अपूर्वा प्रकट करी वेल्हाळा
लज्जा हास्य कटाक्षादिक तैं बहुविध शृंगाराचे,
जया वर्णितां शब्द न पुरती, विलास उमटति साचे.
त्यांतें बघतां विसरुनि गेलों देहभान मी सारें;
वृत्ती झाली तन्मय; अंगीं भरलें मन्मथवारें ![3]

विक्रमोर्वशीतील पुढील साक्याही अशाच सुंदर झाल्या आहेत—

मंजुललपिते, कोकिलमहिले तुजला बोलति कामीं
रतिपतिदूती निपुण असशि तूं मानवतीच्या सामीं,
मानविनाशक अमोघ अस्त्रचि तूं मत्समीप तिजला.
आणी अथवा कांता जेथें तेथें नेई मजला.

कृष्णशास्त्री राजवाड्यांनी तात्यांच्या पद्धतीप्रमाणे आश्रमवर्णनासाठी कटिबंधरचनाही केली. 'नीवाराः शुकगर्भकोटरमुखभ्रष्टास्तरूणामधः' व 'कुल्याम्भोभिः पवनचपलैः शाखिनो धौतमूलाः' या शाकुंतलातील दोन श्लोकांचे भाषांतर त्यांनी एका लांबलचक कटावात केले आहे—

इकडे सारे तमाल दिसती, रसालतरु हे इकडे असती, कुंदवृंद
बहु चंदनपंक्ती, ह्या अंगाला चंपक असती, नारिकेलतरु गगनीं गेले,
पूगद्रुम फलभारें लवले, ह्या बाजूला सारे बकले, अमित जांब
हे पक्व जाहले, इकडे झाडें रामफळीचीं, शिताफळींचीं गर्द जाहली

१. विक्रमोर्वशी, प्रस्तावना, पृ. १.
२. विक्रमोर्वशी, प्रस्तावना, पृ. २.
३. मालतीमाधव, पृ १५.

छाया यांची, रम्य स्थळ हे पाहुनि माझ्या हर्ष बहूतचि झाला चित्ता,
मुनिचा हा आश्रम पाहतां श्रम हरले माझे सूता [1]

तात्यांच्या पुढे पाऊल टाकून राजवाड्यांनी मुद्राराक्षसामध्ये "अहो शरत्समय-संभृतशोभानां दिशामतिरमणीयता" ( अं. ३ ) या वाक्यापुढे आलेल्या श्लोकाचे भाषांतर रामजोशाच्या थाटावर लावणीछंदात केले आहे.[2] मालतीमाधवातील ( अं. ५, श्लो. २३ ) "प्रचलितकरिकृत्तिपर्यन्त –" या एका चरणात ५४ अक्षरे असणाऱ्या दण्डकवृत्तात लिहिलेल्या श्लोकाचे भाषांतर राजवाड्यांनी अतिशय कौशल्याने केले आहे. हे पद त्यांच्या कवित्वशक्तीचीही प्रतीती प्रभावीपणे आणून देण्याइतके सरस उतरले आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

देवी चामुंडे चामुंडे, असुरवधोद्यतदंडे, ( ध्रुवपद )
प्रचंड तांडव ब्रह्मांडाच्या मंडपि करिशी देवी;
इंद्र, वरुण, यम, कुबेर, दिक्पतिपंक्ती तुजला सेवी.
शिरि ढळल्या करिचर्मांते सांवरितां, नखघाते
चंद्रबिंब हे विभिन्न होऊनि तत्क्षणिं अमृत स्रवते.
त्याच्या स्पर्शें नृमुंडमाला सजीव होउनि सारी
मुखें भयंकर पसरुनि करिते अट्टहास जी भारी
पिशाचगण ते भीत होउनी स्तविती तुजला फार;
संकटसमयीं सर्व जगाची असशी तूं आधार
ग्रंथि देउनी भुजगांची त्वां बाहुभूषणे केलीं;
श्वासोच्छ्वासे प्रसृत तयांचीं फणामंडले झालीं
फणांपासुनी विषानलाचे ज्योती उठतां कालीं;
भुजदंडाते हलविशि तेणें पर्वत दडती खाली इ.[3]

"मूर्खा विस्मृति तुज कैशी ? राज्यमदें भुललासी" अशा प्रकारची पदे चाणक्याच्या तोंडी घालून राजवाड्यांनी काहीसा विनोदच केल्यासारखा वाटतो.[4] वेणीसंहारात भीमाच्या मुखी पद घालण्याचा अतिप्रसंग परशुरामपंततात्यांनीही केलेला नाही. मालतीमाधव या नाटकाचा अनुवाद राजवाड्यांच्या सर्व ग्रंथांत पहिल्या श्रेणीचा उतरला आहे. त्याच्या खालोखाल मुद्राराक्षसाचा क्रमांक लागेल. कालिदासाच्या शाकुन्तल व विक्रमोर्वशी या नाटकांचे अनुवाद मात्र तितकेसे प्रसन्न व सहज वाटत नाहीत. कालिदास ही खरोखरच भाषांतरकाराची कसोटी होऊन बसली आहे.

१. शाकुंतल, अ. १, पृ. १४.
२. मुद्राराक्षस, अं. ३, पृ. ५५.
३. मालतीमाधव, अं. ५, पृ. ६४.
४. मुद्राराक्षस, अं. ३, पृ. ७२.

रमणीय वस्तु पाहोनी, आणि मधुर ध्वनी ऐकोनी,
प्राणी सुखांतही असोनी, होत असती उदास.
जन्मांतरींची जी मैत्री, चित्तीं ठसोनि गेली असती
तिची होवोनि कांहीं स्मृति, अत्यंत होती उदास.

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्' या शाकुंतलातील सुप्रसिद्ध श्लोकाचा हा अनुवाद, ओवीछंदात केल्यामुळे पडल्यासारखा वाटतो. ओवीतील गद्यप्राय शैथिल्याने या सुंदर श्लोकाचा मूळचा सुडौल घाट, त्याची एकपिंडता पार निघून गेली आहे. मराठी छंद वापरणे ठीक; परंतु ओवी आणि अभंग या छंदांच्या विशिष्ट साहचर्यामुळे जुनी, वेडीवाकुडी व अनेक प्रसंगी शिथिल अशी गद्यप्राय रचनाच डोळ्यांपुढे येऊ लागते. म्हणून आपण केवळ आर्या, दिंड्या, साक्या हेच छंद वापरले असल्याचे सांगून "अभंग, ओवी, अनुष्टुभ् हे छंद अगदीं योजिले नाहीत," असे गणेशशास्त्री लेल्यांनी कर्पूरमंजरीच्या प्रस्तावनेत (पृ. ३) स्पष्टपणे लिहून ठेविले. कारण लेलेशास्त्र्यांनाही जानकीपरिणयातील "पक्वानि प्रच्यवन्ते क्रमुकविटपिनामुच्छ्रितानां फलानि" या श्लोकाचे स्वतःच केलेले "उंच उंच येथे सुपारीचीं झाडे ! त्यांच्या खालीं सडे फळांचे पै."[2] हे अभंगछंदात केलेले भाषांतर पुढे फार बेडौल आणि पोरकट वाटले असावे.

## गणेशशास्त्री (गणेश सदाशिव) लेले, त्र्यंबककर

गणेशशास्त्री लेले[3] यांनी एकंदर चार नाटकांची भाषांतरे केलेली आहेत; पण मराठीच्या दृष्टीने त्यांच्या भाषांतराचा पाक तितकासा प्रसादपूर्ण उतरलेला नाही. त्यांच्या "मराठी भाषांतरांत मोठीशी चूक प्रायः कोठें आढळली नसल्याची" कबुली 'द. प्रै. कमिटीचे सेक्रेटरी' कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी जरी दिली असली,[4] तरी स्वतंत्र मराठी ग्रंथ या दृष्टीने ही भाषांतरे बरीचशी ओजड वाटतात. कर्त्यास कवित्वशक्ति

१. शाकुंतल अ. ५, पृ. ९४३.
२. जानकीपरिणय, अं. २, पृ. ३०.
३. गणेशशास्त्री सदाशिव लेले (१८२५-१८९८) मुंबई. सुमारे १८५३-पासून लेखनास प्रारंभ. पुस्तके – चरित्रे: (१) कप्तान कुकचा वृत्तान्त (१८५३); (२) लोलेमेकसचा वृत्तान्त, (३) यशवंतरावमहाराजचरित्र (१८८८). संस्कृत नाटकांची भाषांतरे – (१) जानकीपरिणय (१८६५), (२) मालविकाग्निमित्र (१८६७), (३) विद्धशालभंजिका (१८६९), (४) कर्पूरमंजरी (१८७७); काव्य: (१) शिवाजीचरित्र (१८७३), (२) कृष्णाकुमारी (१८७४), (३) अमरुशतक (१८८१), (४) रघुवंश भाषांतर (१८८३), (५) दशरथकथा, (६) सीमंतिनीचे आख्यान, (७) गंगाधरचरित्र, (८) शिवस्तुति, तीर्थयात्रा-प्रबंध (१८८५), साहित्यशास्त्र (१८७०.)
४. जानकीपरिणय, आ. २, 'सूचने'तील विचार.

असावी तशी नसल्यामें, मूळ ग्रंथाप्रमाणे भाषांतरांत गोडी यावयाची नाहीं ही गोष्ट उघडच आहे," असे त्यांनी स्वतःच सांगितले आहे.[1] बोजडपणाबद्दलही ते लिहितात, " पाहिजेत तसे योग्य शब्द न सुचल्यामुळें पुढल्या भाषातरांत जे कठीण व अप्रसिद्ध शब्द घालावे लागले त्यांचा अर्थ त्या त्या पृष्ठांच्या खाली टीपेंत लिहिला आहे."[2] "भाषांतरांत गद्यास गद्य व पद्यास पद्य असे केले आहे. पद्यांत मुख्यत्वें-करून श्लोक, आर्या व क्वचित् साक्या, अभंग वगैरे कविता केली आहे."[3] त्यामुळे त्यांनी वापरून रूढ केलेल्या बहुरंगी मराठी प्राकृत छंदांचा व पदांचा येथे अभाव दिसेल: साक्या-अभंगादी क्वचितच रसाळ उतरलेले दिसतील. साकीसारख्या सुलभ मराठी छंदातीलही त्यांची रचना क्लिष्ट उतरली आहे.

पुराणमुक्तामें नक्षत्रे द्विनिचि सर्वा व्योमीं
ज्योत्स्नापाने मत्त चकोरी असति विहायसगामी..
( विद्धशालभंजिका, अ. १, पृ. ७)
वक्त्रश्रीजित जर्जर इंदुसमाना चेंडुस हातीं
घेउनि, सुतनू क्रीडाकौतुक ताडितरम्यमुखकान्ती
(पूर्वोक्त, अं. २. पृ. ४२ ).

लेलेशास्त्री यांनी जानकी-परिणयाचा जो अनुवाद केला, तो त्याच्या अद्भुत सविधानकरचनेवर लुब्ध होऊन. ' जे कां नाटक जानकीपरिणय प्रख्यात लोकीं असे। त्याची अद्भुत संविधानरचना नाट्यांतरीं ती नसे ।। ' असे ग्रंथान्ती एका स्वतःच्या श्लोकात ते सांगतात. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनाही ही गोष्ट मान्य होती. याविषयी लिहिताना पुढे ते मार्मिकपणे सांगतात, " या नाटकांत संविधानकाचा चमत्कार विशेष आहे असे जे भाषांतरकर्त्यांनीं लिहिलें आहे ते खरे आहे. चमत्कारिक रीतीने पात्रांची घटना करून त्यांस नानाविध रसानुगुणस्थितीत आणण्याची कल्पना या ग्रंथकारांत अपूर्व खरी, तथापि पुढें त्या पात्रांच्या भाषणादिकांवरून रसांचे पुष्टि-करण करण्याचे सामर्थ्य तादृश त्याच्या अंगीं नाहीं. ते जर असते तर हें नाटक फारच उत्कृष्ट झाले असते यांत संदेह नाहीं."[4] नाटकातील रस, संविधानक, संवाद इत्यादी विषयांचा समालोचनात्मक विचार चोखंदळपणे करण्याची योग्यता त्या काळी शिक्षित मंडळींत कशी येत चालली होती, हे वरील गोष्टीवरून ध्यानी येईल.

' जानकी-परिणय ' वगळता भाषांतरासाठी ज्या अन्य तीन नाटकांची निवड शास्त्रीबुवांनी केली, ती सारी शृंगाररसात्मक अशीच आहेत. परंतु या नाटकांना

१. तत्रैव, प्रस्तावना.
२. कर्पूरमंजरी, प्रस्तावना, पृ ४.
३. जानकीपरिणय, प्रस्तावना
४ जानकीपरिणय, ' सूचना '

आवश्यक असणारी खुमासदार मराठी शैली शास्त्रीबुवांच्या ठिकाणी अभावानेच असल्याने त्यांत फारशी रोचकता आलीच नाही. मालविकाग्निमित्राचे भाषांतर फारच सामान्य वाटते. त्यांच्या पद्याचा पुढील उतारा पहावा —

**राजा** – खरेंच मित्रा,

मुळचे स्वरूप सुंदर, त्यावरि गुण, त्यावरी दिला नखरा,
विधिनें केला यास्तव हा नव विषलिप्त कामबाण खरा.
फार काय सांगूं? आतां तुला माझी चिंता असूं दे, म्हणजे झालें.

**विदू०**– तुलाही माझी चिंता असूं दे. हे पहा, माझें उदर भुजाऱ्याच्या कढईप्रमाणे कसे धगधगीत झालें आहे ते!

**राजा** – अरे, खरेच! पण तुला मित्राचे काम करण्याविषयीं त्वरा असावी बरें.

**विदू०**– त्याविषयीं मी तर विडा उचलिला आहे; परंतु काय करावें? मेघाच्या योगाने जसी चंद्रिका आच्छादित होऊन दुर्लभ होते, तसी मालविका ही पराधीन असल्यामुळे तिचे दर्शन दुर्लभ झालें आहे आणि जसा कोणी एकादा गृध्र पक्षी कुत्र्याजवळील मांस मिळविण्याविषयी लोलुप होऊन, त्यावर घिरट्या घालतो, भयाने हात लावण्यास धजत नाहीं, तसा तूं गरजेस येऊन मित्राहि आहेस, आणखी अत्यंत आतुर होऊन, आपले हे तिच्या भेटीचे काम कसे सिद्धीस जाईल अशी काळजी करतोस. हे तुझें करणे बाबा मला आवडत नाही.

**राजा** – गड्या मी कसा आतुर होणार नाहीं बरें? कारण कीं

चित्त उडाले माझें मत्संपूर्णस्त्रियांवरुनि, पाहे
मद्हृदयसर्वभावा एकचि ती पात्र जाहली आहे.[1]

मात्र मालविकेचे वर्णन करताना तात्यांच्या पुढे एक पायरी जाऊन शास्त्रीबुवांनी कटाव नव्हे, तर फक्कड लावणीच राजाच्या तोंडी टाकिली.

**राजा** – ( मनांत ) अहो काय सांगावे! कोणत्याहि स्थितीत पाहिले तरी हिचे रूप सुंदरच दिसते.

पातळ पुतळी चमकत नाचे, अतिचपला नभिं वीज जसी।
नर्तन गुरुला शिकवायाला, योग्य असे ही हवी तसी ॥ ध्रु. ॥
शिरीं कुरळ केशांचा बुचडा खूप कसुनि बांधला असे;
वेणि नव्हे, हा भुजंग दुसरा, ऐसे नयनां भासतसे;
विशाळ भाळावरती केशरचिरी मनोहर शोभतसे;
जसा शरत्काळींचा चंद्रम पूर्णवदन भासते तसे;
विशाळ डोळे, ऐसी शोभा विमला कमलांचीहि नसे;

---

१. मालविकाग्निमित्र, अं. २, पृ. ३९–४०.

नाक कळी चांप्याची केवळ, गाल गुलाबी फूल जसे;
आरक्ताधर पोंवळिं लालहि न शोभती यांपुढें तसीं;
पातळ पुतळी......

विद्धशालभंजिका आणि कर्पूरमंजरी या राजशेखराच्या ज्या दोन नाटकांची भाषांतरे शास्त्रीबुवांनी केली, ती जरी रहस्यात्मक नाटके असली, तरी प्रामुख्याने ती रमणीच्या रम्यावयवाचे वर्णन वेगवेगळ्या प्रसंगांच्या आश्रयाने करण्यासाठीच लिहिलेली असावी, असे वाटते. या नाटकांत वामनयना-सुनेत्री स्त्रियांच्या रम्यावयवांचे वर्णन करणे एवढेच राजशेखराचे ध्येय असावे की काय, असे वाटते. कर्पूरमंजरीमध्ये भैरवानंद आपल्या मंत्रविद्येने कुंतलदेशातील एक परमसुंदर कन्या स्वतःच्या घरी न्हाण्यास बसली असता तशीच राजापुढे दरबारात आणून उभी करितो. त्या वेळी साहजिकच कवीच्या वर्णनास 'बहर' येतो.

राजशेखराच्या दोन्ही नाटकांची भाषांतरे निःसंकोचपणे करून लेलेशास्त्र्यांनी मराठी वाचकांना संस्कृतातील प्रौढशब्दावगुंठित, परंतु खऱ्या अर्थाने अगदी मोकळ्या शृंगाराचा परिचय करून देण्याचे श्रेय एका परीने मिळविले. मात्र हे सर्व मराठीत लिहिण्यास शास्त्रीबुवा धजले कसे, हाही विचार येथे मनात येतो. हे सर्व मूळ संस्कृतातील असून, भाषांतरवजा म्हणून चालले असावे. परतु खरे म्हणजे याच कालात पुण्यामध्येच विलासी शौकीनांचा असा एक मोठा सुप्रतिष्ठित व सुखी असा मध्यमवर्ग होता – यालाच विष्णुशास्त्र्यांनी 'वामकुक्षीवाले' असे अभिधान दिले आहे – की, त्याच्या मनोविनोदनाला अशाच तऱ्हेच्या वाङ्मयाची विशेष गरज होती.

**शिवरामशास्त्री पाळंदे : जयदेवकृत 'प्रसन्नराघव'** ( १८५९ )

अगदी प्रारंभीच्या कालात झालेल्या भाषांतरात्मक नाटकांतील हे नाटक आहे. शिवरामशास्त्री यांनी हे एवढे एकच नाटक अनुवादिले. भाषांतरासंबंधी ते सागतात, "भाषातर केवळ मूळाप्रमाणेच आहे असे नाहीं. कोठे मूळचे गाळले आहे, कोठे फिरवून लिहिलें आहे आणि कोठे नवेच करून घातलें आहे."[१] भाषांतरात पद्यासाठी श्लोक व आर्या यांचा वापर त्यांनी केला. तात्यांप्रमाणे खास मराठी छंद त्यांनी वापरले नाहीत. पाळंदे यांचे हे भाषांतर अत्यंत नेटके आणि सुरस झाले आहे. त्याची भाषा ही तशीच सहज व प्रसंगानुरूप आहे ताटकावधानंतर मिथिलेच्या उद्यानात राम आणि सीता यांना परस्परांचे दर्शन घडते, त्या वेळचा प्रसग पुढे दिला आहे.

**सखी** – राजकन्ये, तुझें चित्त कोणीकडे बरें होतें ?

**सीता** – ह्या आरामाकडे.

**सखी** – ( हंसून म्हणते. ) वा ! काय तुझे चातुर्य आहे. आराम सांगून राम झांकलास.

१. प्रसन्नराघव, प्रस्तावना, पृ. १

**सीता** – ( लज्जायुक्त होऊन अधोमुख उभी राहते. )

**राम** –

वर कर कुरंगनयने नयन तुझे हरिणगर्व हरणारे
होवो मम यमुनेच्या कल्लोळांनींच आज भरणारें.

**सखी** – ( हंसून प्रेमानें म्हणते. ) राजकन्ये, सखीजनाशीं देखील मन चोरतेस, कीं कीं खचीत मला समजलें. ऐक

जों काकपक्षधर पद्मविशालनेत्र
नीलांबुजापरि जसा सुकुमारगात्र,
त्या रामनामक मनोभव दिव्यदेहीं
अत्यंत लंपट तुझें मन काय नाहीं ?

**सीता** – सखे पाहा पाहा.

रतिचरणनूपुरांच्या शब्दापरि मंजुल स्वरें गातो,
अंब्याच्या मुकुलरसें मधुरमुखभ्रमर मत्तसा फिरतो.
(मनांत म्हणते) प्रियमुख कमलरसातें प्या आतां नयनहो तुम्ही फार
चपळपणा सोडा हा गेला प्रिय मग पुन्हां न दिसणार.
( असे म्हणून रामाकडे कटाक्षानें आनंदयुक्त पाहते. )

**राम** – ( न्याहाळून पाहून म्हणतो )

सर्वस्व यौवनाचे, भोगाचे भवन, भाग्य नयनाचे
सौभाग्य विलासाचे, सार जगाचेच, सुफल जननाचे.

**सीता** – ( मनांत पुनः तीच आर्या म्हणते. )

**राम** – सखे राजकुमारी, पहा पहा

विकसित निर्मल कोमल कमलदलाच्याच संशयें फसतो,
डोळ्यांच्या भोंतालीं भ्रमराचा कुमर हा तुझ्या फिरतो.

**सीता** – ( आनंदानें मनांत म्हणते. ) अरे नेत्रांनो बांधल्यासारखे ह्या ठिकाणीं सुखरूप राहा. ( असे म्हणून रामाकडे पाहते. )

पोळंदे यांनी आपले भाषांतर रसिकमान्य व्हावे, म्हणून खूप कष्ट घेतल्याचे ते सांगतात.

शोधून दोन वेळा अशुद्ध काढून टाकलें सकळ,
कठिण स्थळे फिरविलीं कीं व्हावा सर्व यत्न हा सुफळ.

**शिवरामशास्त्री खरे : श्रीहर्षकृत 'रत्नावली'**

परशुरामपंततात्यांच्या संप्रदायात बसेल, अशा स्वरूपाचे हे भाषांतर आहे. आर्या, साक्या, दिंड्या व पदे यांची नाटकात रेलचेल आहे. तात्यांच्याच थाटावर खरेशास्त्र्यांनी 'राजेन्द्रा, अवलोकावी, शोभा या महोत्सवाची' ( अंक १ ) हा कटाव

व 'मिश्रा, हे विचित्र शोभा, ह्या मकरंदोद्यानाची' (अंक १) हे उद्यानवर्णनाचे पदही रचिली आहेत. या नाटकात रचण्यात आलेली काही पदे खरोखर लक्षणीय आहेत. सागरिकेच्या तोंडचे 'रे वेड्या हृदया माझ्या, बा, तुजला काय म्हणावें' (अंक २), राजाचे 'सुमुखी पुनरपि पाहिन काय ? असेल कोणिकडे' (अंक ३) इत्यादी पदे सुंदर उतरली आहेत. १८८० नंतरची संगीत-नाटकें किर्लोस्करयुगात ज्या पदांमुळें गाजली; त्यांतील बऱ्याचशा पदांची बीजे या जुन्या भाषांतरित नाटकांत पहावयास सापडतात. साध्या-साध्या शब्दांत मनातील भाव स्पष्ट करणारी पदे जी, पुढच्या किर्लोस्कर, देवल इत्यादींच्या नाटकांत दिसली, त्यांच्या लेखनाला या भाषांतरकारांनीच खरा प्रारंभ केलेला होता, असे दिसून येईल. भाषांतरित नाटकांना मराठी नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीने काही अर्थच नाही, असे मानून त्यांचा निर्देशही टाळणाऱ्यांनी या नाटकांचे आधुनिक नाट्यवाङ्मयाच्या विकासातील ऐतिहासिक महत्त्व विसरून चालणार नाही.

**रा. भि. गुंजीकर : कालिदासकृत 'अभिज्ञानशाकुंतल' (१८७०)**

प्रबोधचंद्रोदयानंतर कालिदासाच्या सर्वश्रेष्ठ नाटकाचा पहिला अनुवाद 'चंद्रिका' या मासिक पुस्तिकेत (१८५४, पु. १, अं. ६, ७, १०) दोन अंकांपुरता आल्याचे पूर्वी पाहिलेच आहे. गुंजीकरांच्या भाषांतरापर्यंत (त्यांचे भाषांतर धरून) शाकुंतलाची एकंदर चार भाषांतरे झाली. 'चंद्रिके'तील भाषांतर, परशुरामपंततात्यांचे भाषांतर व कृष्णशास्त्री राजवाडे यांचे भाषांतर, या तिहींत कालिदासाच्या या नाटकाचा गद्यपद्यात्मक अनुवाद देण्याचा यत्न करण्यात आलेला आहे. गुंजीकरांनी प्रस्तुत भाषांतराच्या रूपाने प्रबोधचंद्रोदयाच्या भाषांतरकारांप्रमाणे पद्यांचेही भाषांतर गद्यात देण्याचा प्रयत्न केला आहे. नवीन रीती या दृष्टीने हे ठीकच होते, परंतु तसे पाहता कालिदासाची शक्ती विशेषपणे श्लोकांमध्ये, म्हणजेच पद्यांमध्ये प्रतीत होते. अर्थात भावक्षेपणास सहायक असलेले हे श्लोक जर सपाट गद्यात भाषांतरिले, तर मुळातील भाषेचे, विचाराचे, भावनेचे, म्हणजे एकूण त्यांचे सारे रससौंदर्यच हरवले की काय, असे वाटू लागते. 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्' (अ. ५) या शाकुंतलातील प्रख्यात श्लोकाचे गुंजीकरांनी गद्यात केलेले भाषांतर पहावें. "प्राणी आनंदामध्ये सुखोपभोग करीत असतांहि, एकादे वेळीं जर कांही मनोहर वस्तु दृष्टीस पडली, किंवा मधुर सुस्वर असा नाजूक शब्द कानीं पडला, तर त्याचे मन उदास होऊन त्याला विलक्षण प्रकारची अस्वस्थता उत्पन्न होते, याचे कारण खचितच असें असेल कीं, पूर्वी कांहीं घडलेली गोष्ट विसरून गेलेली असून, किंचित् तरंग यावेळीं मनावर उठतो, किंवा अन्य जन्माच्या ठायीं जे कांहीं स्नेह जडलेले असतील, ते स्वाभाविक रीतीने स्थिर जाहलेले असतांही, अशाच कांहीं कारणांमीं मनामध्ये त्यांचे किंचित् स्मरण उत्पन्न होते."[6] भाषांतर म्हणून चांगले असूनही या गद्यानुवादामुळे मूळ श्लोकाचा, त्याच्या इंग्रजीत केलेल्या भाषांतराप्रमाणें नीट अर्थही मनात उतरत

कठीण जाते, आणि तो कष्टाने कळलाच, तरी तो पद्यमय, अल्पाक्षर व नादमधुर नसल्यामुळे एक कायमची ठेव म्हणूनही स्मृतिकोशात प्रतिपाळिता येत नाही.

**कालिदासकृत ' विक्रमोर्वशी '**

शाकुंतलाप्रमाणेच विक्रमोर्वशीयाचेही चार अनुवाद या अनुवादासकट झालेले दिसतात. १८५५-मधील भा. दा. पाळंदे यांचा मराठी ' ज्ञानप्रसारका'त क्रमशः आलेला अनुवाद हा पहिला. परंतु १८७२-मध्ये कृष्णशास्त्री राजवाडे यांचा व ताम्हनकर-अभ्यंकर यांचा असे दोन अनुवाद एकाच वेळी बाहेर पडले व याच वेळी ज्ञानसंग्रह मासिकात पहिल्या पुस्तकात ( १८७२, पु. १, अं. ३ ) विक्रमोर्वशीचे दोन अंक अनुवादित स्वरूपात आले. हा अनुवाद पुढे १८७४-मध्ये ( पु. ३, अं. २ ) संपूर्ण झाला. हे तिन्ही अनुवाद गद्यपद्यात्मकच आहेत. ताम्हनकर-अभ्यंकर शास्त्र्यांचे भाषांतर नेटके, मुळाला धरून व मूळचे सौंदर्य व अर्थ व्यक्तःकरणारे झाले आहे.

या भाषांतरात एक मौजेची नवी प्रथा शास्त्रिद्वयाने प्रचारिली आहे. संस्कृत नाटकात प्रौढ पात्रे संस्कृतात व स्त्रिया व इतर हलकी पात्रे प्राकृतात म्हणजेच बाल-भाषेत बोलतात. मराठीमध्येही हा भेद दाखविण्यासाठी " राज्ञी ऊर्वशी, चित्रलेखा व सहजन्या इत्यादी पात्रांचीं भाषणे आहेत; त्यांत जेथें जेथें सानुस्वार मात्रा आली आहे त्या त्या स्थानीं ँ असे चिन्ह ठेवून त्यांच्या भाषणांत भेद ठेवला आहे. " ( प्रस्तावना, पृ. ७ ). उदाहरणार्थ —

**उर्वशी** – ( एकीकडे ) सख्ये चित्रलेखे, आमच्यावर उपकार करणाऱ्या राजर्षीला माझ्यानँ विचारवत नाहीं; तर तूंच माझैं मुख हो.

( अंक १, पृ. ११ )

## तीन

## इंग्रजी नाटकांची भाषांतरे

येथवर प्रस्तुत कालखंडातील संस्कृतावरून भाषांतरित केलेल्या मराठी नाटकांचा विचार झाला. या काळात बहुतेक सर्व प्रसिद्ध संस्कृत नाटकांची भाषांतरे जुन्या शास्त्रीपंडितांनी केली. त्याचा मराठी नाट्यवाङ्मयाच्या व नाट्यकलेच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने इष्ट असाच परिणाम झाला. संस्कृतावरून झालेल्या नाटकाच्या मराठी भाषांतरांच्या मानाने इंग्रजीवरून झालेल्या नाटकपुस्तकांची संख्या फारच थोडी आहे. १८७९ साली शंकर मोरो रानडे यांचे ' नाट्यकथार्णव ' मासिक निघेपर्यंत अवघी सात भाषांतरित नाटके इंग्रजीवरून ग्रंथरूपात अवतरली. शिवाय, ही सारी नाटकेही एकाच नाटककाराची, म्हणजे केवळ शेक्सपिअरचीच. महादेव-शास्त्री कोल्हटकरांनी ऑथेल्लोचे भाषांतर १८६७ साली केले. इंग्रजी नाटकाचे झालेले हेच पहिले भाषांतर, असे समजण्यात येते; परंतु ' ज्ञानप्रसारक ' मासिकाच्या

नवव्या (१८५८ जुलै, अं. ४) व दहाव्या ( १८५९ जुलै, अं.४) पुस्तकात 'रात्रिभ्रम' या नावाने काही भाग प्रसिद्ध झाला होता. हे नाटक भाषांतरात्मक किंवा निदान रूपांतरात्मक तरी असावे. कारण संपादकांनी एके ठिकाणी पुढील-प्रमाणे टीप दिली आहे--

'हें नाटक हिंदूंच्या रीतिभाति व गृहस्थिति दाखविण्याकरितां लिहिलें आहे असें समजूं नये. यांत पात्रांचीं व दुसरीं हिदू नांवें घातलीं आहेत तीं एवढ्याचसाठीं कीं परभाषेंतलीं नांवें असलीं तर ती उच्चारणे आणि ध्यानांत धरणे लोकांस फार कठीण पडतें ते पडूं नये. यांत वर्णिलेल्या रीतिभाति व गृहस्थिति ह्या इंग्रजी लोकांच्या आहेत.'[1]

त्यानंतर चार वर्षांनी म्हणजे १८७१-मध्ये 'स्त्री-न्याय-चातुर्य' हे 'द मर्चेंट ऑफ व्हेनिस'चे भाषांतर आ. वि. पाटकर यांनी केले. नातूंनी केलेले 'ज्यूलियस सीझर'चे 'विजयाशिंग' हे भाषांतर १८७२-मधले. 'टेंपेस्ट'चे भाषांतर कीर्तन्यांनी १८७५-मध्ये केले. शेक्सपिअरच्या 'द कॉमेडी ऑफ एरर्स' या नाटकाची 'भुरळ' आणि 'भ्रांतिकृत चमत्कार' अशी दोन भाषांतरे अनुक्रमे १८७६-मध्ये आणि १८७८-मध्ये झाली. १८७९-मध्ये वि. मो महाजनींनी 'सिंबेलाइन'चे 'तारा' हे भाषांतर प्रसिद्ध केले. महाजनि व नाट्यकथार्णवाचे संपादक शं. मो. रानडे यांनी पुढे कितीएक नव्या-नव्या इंग्रजी नाटकांची भाषांतरे प्रसिद्ध करून भाषांतरात्मक नाटकांचा एक नवा जमाना सुरू केला. परंतु हे सर्व वाङ्मय १८७९-च्या पुढचे असल्यामुळे त्याचा परामर्श अर्थातच येथे घेतलेला नाही.

संस्कृत नाटकांच्या भाषांतरास 'दक्षिणा प्रैज कमिटी'कडून उत्तेजनार्थ पुरस्कार-पारितोषिकांची प्राप्ती होई. इंग्रजी नाटकांच्या भाषांतरास तसे प्रोत्साहन मूलतः नसल्यामुळे सुशिक्षित लोक या उद्योगाकडे फारसे आकृष्ट झाले नव्हते की काय, की त्यास अन्य काही कारणे होती, याचा विचार होणे अवश्य आहे.

एखाद्या ग्रंथाचे भाषांतर करणे हा एक प्रेम करण्यासारखाच प्रकार आहे. अतिप्रेमामुळेच भाषांतरकार त्या ग्रंथास स्वभाषेत आणण्याच्या उद्योगास लागतो. अर्थात समान गुण, समान संस्कृती दिसेल तेथे सहजच मन प्रथम आकृष्ट होते. संस्कृत ग्रंथांकडे भाषांतरकारांचे विशेष लक्ष जाण्याचे कारण म्हणजे संस्कृत व मराठी यांचे सहज नाते, समान संस्कृती व समान निष्ठा. त्यामुळे संस्कृत ग्रंथांचे अनुवादही मराठीत सहजपणे होऊ शकले व ते लोकांना आवडलेही. परतु इंग्रजी ग्रंथांबाबत ही परिस्थिती नव्हती. एखादा इंग्रजी ग्रंथ मनापासून आवडला, तरी त्याचे भाषांतर मराठीमध्ये कितपत शोभून दिसेल, ते लोकांना कितपत रुचेल, त्यांचे त्यामुळे कितपत मनोरंजन होईल, इत्यादी कितीतरी शंका प्रथमच भाषांतरकाराच्या मनात येणे

१. ज्ञानप्रसारक, १८२९ जुलै, पु. १०, अं. ४, पृ. १०६.

साहजिक होते. कारण चालीरीती, संस्कृती, सामाजिक व धार्मिक कल्पना, आचार इत्यादी सर्वच बाबतींत इंग्रजी-मराठीचे भिन्नत्व असल्यामुळे हा संबंध स्वजनांना फारसा रुचणार नाही, या कल्पनेने इंग्रजी ग्रंथांच्या अनुवादांकडे फारसे कोणी लोक प्रथम वळले नसावेत. "युरोपातील रीतभात, भाषा, मनोव्यापार ही येथल्यापेक्षा फारच निराळी पडली; तेव्हा तिकडील काव्यनाटकादिकांचे यथास्थित रूपांतर इकडच्या भाषांतून होणे वस्तुगत्याच अशक्य होय; ते पुरतेपणी तर साधायचेच नाही."[1] असा चिपळूणकरांचा स्पष्ट अभिप्राय होता.

आणि शेरीडन यांनी प्राच्यांनी इंग्रजीतील ग्रंथांवरचे आपले प्रेम त्यांचा अनुवाद करून सिद्ध केले, [illegible] फारशी चहा झाली नसल्याचे प्रसिद्धच आहे. 'ऑथेल्लो' नाटकाच्या भाषांतराबद्दल विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा एकंदर 'उत्कृष्ट' असाच अभिप्राय होता. या नाटकातील चार-दोन उत्कृष्ट स्थळांचा परिचयही त्यांनी मालेच्या एका अंकात करून दिला.[2] परंतु त्याविषयी ते स्वतः लगेच लिहितात, "वरील स्थळे म्हटली म्हणजे प्रस्तुत नाटकातील अत्युत्कृष्टांपैकी होत. पण ही वाचून ज्यांस आनंद होईल असे मराठी वाचक किती सापडतील! हे नाटक असे जर रंगभूमीवर करून दाखविले तर लोकांना दोन अंकांपर्यंत तरी दम निघेल की नाही कोण जाणे! उघडच आहे. अगोदर ही तऱ्हाच मुळी निराळी; विचार निराळे, कल्पना निराळ्या, वाक्यरचना निराळी; सगळेच अपरिचित! 'ओलेंपस' म्हणजे काय, 'हिरव्या डोळ्यांची राक्षसीण' काय, आणि 'कृष्णवर्ण वैराग्य' तरी काय? मूळ ग्रंथात या शब्दांचा अर्थ जसा तेव्हाच समजला जातो व गोड दिसतो, तसे, मराठीत काय होणार? अशा ठिकाणी भाषांतरकर्त्यास निरुपायास्तव हात टेकणे येते." याविषयी पुढे ते आणखी लिहितात, "मिल्टन, शेक्सपियर, स्कॉट यांचे ग्रंथ इंग्रजीत फार रमणीय आहेत म्हणून मराठीत ते तसे होणार नाहीत. उलटे कंटाळवाणे होऊन हास्यास्पद मात्र होतील."[3] इंग्रजी व मराठी या भाषा परस्परांहून रचनेच्या दृष्टीने अगदी भिन्न असल्यामुळे व पाश्चात्त्य कवींच्या कल्पना व विचार भिन्न असल्यामुळे भाषांतर साहजिकच दुर्बोध व नीरस होण्याचीही भीती अधिक होती. वि. मो. महाजनींनी याविषयी लिहिले आहे, "प्रसिद्ध इंग्लिश कवि शेक्सपियरकृत नाटकांच्या आधारे आजपर्यंत पांचसहा नाटकें मराठींत झालीं आहेत. त्यांतील बहुतेक भाषांतरें असल्यामुळे केवळ विद्यार्थिजनांच्या उपयोगीं पडणारीं आहेत. तीं शुद्ध महाराष्ट्रभाषाभिज्ञ जनांस परदेशीय आचारविचारांच्या योगानें दुर्बोध झालीं आहेत; म्हणून नाटकाचा मुख्य हेतु जो मनोरंजन तो फारसा साध्य झाला नाहीं. त्यामुळें हीं नाटकें वाचणारे गृहस्थ फार थोडे सांपडतात. ज्यांस इंग्लिश भाषा

१. निबंधमाला, आ. ३, द टेंपेस्ट, पृ. ३७४.
२. निबंधमाला, आ. ३, भाषांतर, पृ. १७५–७६.
३. तत्रैव, पृ १७७.

चांगली अवगत आहे ते मूळ वाचतात, भाषांतर वाचीत नाहींत. "[1]

मात्र नाट्यकलेच्या प्रगतीच्या दृष्टीने भाषांतरित इंग्रजी नाटकांचा उपयोग होण्यासारखा असल्याचे चिपळूणकरांनी निश्चित ओळखले होते. ते लिहितात, "प्रस्तुत ( तारा ) नाटकाचा तिसरा उपयोग नाटककार-मंडळीस. यांची सुधारणा करण्याकडे आपल्या नवीन मंडळीने अद्याप म्हणण्यासारखे काहीच लक्ष पुरवले नसल्यामुळे त्यांच्याच अकलेने जेथपर्यंत मजल पोचवेल तेथपर्यंत त्यांनी पोचवली आहे. या मंडळ्यांस मुख्य उणीव म्हटली म्हणजे नाटकांचीच होय. आजपर्यंत एकंदर लोकांचे सज्ञानदशेत विशेष पुढे पाऊल नसल्यामुळे, व इंग्रजी सुधारणुकेची जी नाट्यप्रभृती अंगे, त्यांशी परिचयही चांगलासा झाला नसल्यामुळे "रावणराज्य महाराज", "अलल-ल" वगैरे प्रकार शोभून गेले. पण यापुढे वरील धांगडधिंगा खपला जाणार नाही. अलीकडील अभिरुचीस वरच्यापेक्षा काही खुबीचा प्रकार पाहिजे. तेव्हा अशा संधीस प्रस्तुतसारखी परभाषेतील नाटके किंवा देशभाषेतच नाटके झाली असता फार उपयोग होणार आहे. जुन्या संस्कृत नाटकांची भाषांतरे ही या कामी चांगली पडणार आहेत. "[2]

**महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर : शेक्स्पिअरकृत 'ऑथेल्लो' (१८६७)**

"शेक्स्पिअरकृत या अत्यंत प्रसिद्ध नाटकाचे भाषांतर कैलासवासी महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी सुमारे दहाबारा वर्षांपूर्वी केले ते एकंदरीत फार उत्कृष्ट साधले आहे व ते इतके मराठीत उतरेलसे आम्हांस वाटलेही नव्हते ! – पण याचे कारण अर्थातच भाषांतरकर्त्यांचा रंगेल स्वभाव हे एक आणि दुसरे त्या नाटकाची निवड "[3] अशी चिपळूणकरांनी ज्याची स्तुती केली ते हे ग्रंथरूपाने प्रसिद्ध झालेले इंग्रजी नाटकाचे पहिले संपूर्ण मराठी भाषांतर. भाषांतरकर्त्याच्या मृत्यूनंतर हे प्रसिद्ध झाले. "अथेल्लोचे भाषांतर इतके सुबक आणि मोहक उतरले आहे की, आमच्या मते यासारखी भाषांतरे होणे कठीण. त्या भाषांतरात बहुधा मुळची खुबी कोठे जाऊ दिल्याचे आम्हांला स्मरत नाही. खुबीदार भाषांतर करण्याचे ज्यांस शिकणे असेल त्यांनी शास्त्रीबुवांचा कित्ता गिरवावा. "[4] इतक्या सर्वांमुखी प्रशंसिलेल्या नाटकातील एखादा उतारा पाहणे अगत्याचेच ठरेल. याच नाटकाचे पुढे आर्योद्धारक मंडळीने रंगभूमीवर प्रयोगही केले. रस, भाषा इत्यादी दृष्टींनी पुढील उतारा देण्यात येत आहे.

**प्रवेश २ रा : निजण्याची खोली**

'देस्दिमोना' बिछान्यावर झोपीं गेली आहे. बाजूस दिवा जळतो आहे; अशा

१. तारा नाटक, आ. ३, प्रस्तावना, पृ. १.
२. निबंधमाला, तारा नाटक, पृ. ५५०–५१.
३. निबंधमाला, भाषांतर, पृ. १६७.
४. वि.ज्ञा.विस्तार, पु. ८, अं. ५. ( १८७६ मे ), पुस्तकपरीक्षा, द टेंपेस्ट, पृ. ८३.

समयीं अथेल्लो तिचा प्राण घ्यावा या हेतूने आंत शिरतो आणि आपल्याशींच म्हणतो :

हे मना, या अघोर कृत्याचें तेच बीज बरे, तेच बीज. अहो पवित्र तारांगणांनों, ते मी आपणाजवळ या तोंडाने वदूं नये; पण बीज तेच. तरी या सुंदरीचा रक्तस्राव करणे आपल्या हातून घडणे नाहीं. हिची काया तर पहा कशी बर्फासारखी शुभ्र आहे ती, आणि अंगावर तेज पहा कसे लखलखते आहे ते! जशी काय घोटीव संगमरवरी पुतळीच. अशा तुळतुळीत आणि तेजस्वी शरिरावर घाव करण्यास आपला कांहीं हात वहायाचा नाहीं. (असे म्हणून तरवार आपटतो.) पण हिला जिवंत ठेवण्याची सोय नाहीं, कारण तसे केल्यास ही विश्वासाने पुष्कळांचे असे गळे कापील, याकरितां मारली ही पाहिजेच; पण अगोदर दिवा मालवावा आणि मग – हे प्रकाशदायका दीपा, जरी मी तुला मालविलें तरी मला:जर वाटेल तर पुनः तुला पूर्वीप्रमाणे प्रकाशित करतां येईल. (स्त्रीकडे दृष्टि जाऊन) अहाहा! आपलें सर्व कौशल्य व अक्कल खर्चून परमेश्वरानें तुझी काय ही अप्रतिम सौंदर्याची मूर्ति निर्माण केली आहे! त्या तुझ्या मूर्तींतील अंतर्दीप जर मी समूळ मालविला तर त्यास पुनः प्रदीप्त करावयास संजीवनी विद्या मजपाशीं कोठें आहे? हे गुलाबाचे फूल जर मीं तोडलें तर याला पुनः जीव आणावयाची शक्ति माझ्या अंगांत नाहीं; तेव्हां अर्थातच यास कोमेजून गेले पाहिजे. असो. झाडावर आहे तोंपर्यंत याचा उपभोग तरी घेऊं या. (असे म्हणून तिचे मोठ्या प्रेमाने चुंबन करितो.) अहाहा! काय मधुर चुंबन हे. या माधुर्याच्या योगाने प्रत्यक्ष न्यायदेवतेला देखील आपला खड्ग मोडून टाकण्याची बुद्धि निपजूं लागत्ये. (चुंबनाची तृप्ति न होऊन) आणखी एकदां, आणखी एकदां, प्रिये, तूं मरून अशीच राहा, म्हणजे मी तुजवर अत्यंत प्रीति करीन. पुनः आणखी एकदां आणि आतां हे शेवटचे. इतके गोड असे प्राण घेणे कधीं नव्हते. रडें तर कांहीं आपल्याला आवरत नाहीं. पण हे अश्रु महा दुष्ट आहेत. हे दुःख मोठें अलौकिकच आहे! अहो ज्या ठिकाणीं प्रीति करावयाची त्याच ठिकाणीं घाव घालावयाचा! ॲ! ही जागी झाली.

**देस्दिमोना** — कोण आहे ते? अथेल्लो?

**अथेल्लो** — होय मीच देस्दिमोने.

**देस्दिमोना** — प्राणनाथ, बिछान्यावर यावयाचे ना?

**अथेल्लो** — देस्दिमोने, आज तूं प्रार्थना करून निजली आहेस का?

**देस्दिमोना** — होय, प्राणनाथ.

**अथेल्लो** — अगे दयेचा केवळ सागर अशा परमात्म्यापाशीं कबूल करून क्षमा मागितलेली नाहीं असें एकादें पातक जर तुला आढळत असलें, तर ताबडतोब त्याची क्षमा माग.

**देस्दिमोना** — हाय हाय, प्राणनाथ आपण म्हणतां याचा भाव तरी काय हो?

**अथेल्लो** — आटोप, आटोप लवकर! बोलूं नको. मी अंबळ एथें फिरतों.

तुझी तयारी झाल्याशिवाय कांहीं मी तुझा वध करणार नाहीं. ईश्वर माझ्या हातून असें न करवो आणि तुझ्या आत्म्याचा घात माझ्या हातून न होवो.

**देस्दिमोना** — आपण माझ्या वधाची गोष्ट बोलतां ना ?

**अथेल्लो** — हो, वधाचीच बोलतों.

**देस्दिमोना** — तर मग आतां अगदींश्वराला माझी करुणा आली पाहिजे.

**अथेल्लो** — मी अगदीं मनःपूर्वक सागतो कीं, तसेंच होवो.

**देस्दिमोना** — जर आपण असें म्हणतां तर मला वाटते कीं, आपण कांहीं माझा वध करणार नाहीं.

**अथेल्लो** — हे ( श्रमी होऊन मोठा सुस्कारा टाकतो. ).

**देस्दिमोना** — तरी आपलें मला भय वाटते. कारण आपले डोळे वटारूं लागले म्हणजे आपल्या हातून कांहीं अनार्थोपात व्हावयाचा आहे असें आपण भयंकर दिसतां. ज्यापक्षीं मजकडे दोष नाहीं, त्यापक्षीं मीं भ्यावें कां हे मला समजत नाहीं; पण मी आपली भित्री आहे असें मला वाटते.

**अथेल्लो** — तूं आपल्या पातकाचा विचार कर.

**देस्दिमोना** — पातक जर विचाराल तर आपल्यावर जी मी प्रीति करित्ये तेच असेल तर कोण जाणे.

**अथेल्लो** — होय, आणि त्याचकरिता तूं मरत्ये आहेस.

**देस्दिमोना** — प्रीति करित्यें म्हणून का मरण ! तर हे मोठे लोकोत्तर आहे. – हर हर ! काय अनर्थ हा ! असे दांतओठ कां चावतां आहां ! आपणांस कांहीं विलक्षण संताप येऊन इंगळासारखे लाल झालां आहा आणि सर्व शरीर थरथर कांपते आहे, हीं दुश्चिन्हेंच होताहेत; पण अजुन मला असा भरंवसा आहे कीं, या दुश्चिन्हांचा कटाक्ष कांहीं मजवर नाहीं.[1]

**काशिनाथ गोविंद नातू : ... शेक्स्पिअरकृत ‘ विजयसिंग ’ ( १८७२ )**

शेक्स्पिअरच्या ‘ जूलियस सीझर ’ या नाटकाचा हा अनुवाद होय. कल्पित कादंबऱ्यांपेक्षा भाषांतरकर्त्यास नाटकाचे महत्त्व विशेष वाटत होते. तो लिहितो, “ आपल्या भाषेंत नाटकांचीं पुस्तके असणे हे अवश्य आहे, तेणेकरून भाषा सुधारते, लहानाशीं कोणत्या रीतीनें वागावयाचे, सभ्य गृहस्थाची अशी अदबी ठेवायची, आपल्या बरोबरीच्याशीं कोणत्या रीतीनें वागावें, हलकटपणा कोणता, सभ्यपणा कोणता, इत्यादी अनेक फायदे नाटकापासून आहेत, पण ते अद्याप इकडे जीं नाटकांचीं पुस्तके आलीं

१. ऑथेल्लो, अं. ५, प्र. २, पृ. १९०—१९४.

आहेत, त्यांत पूर्ण जितके दिसून यावे तितके येत नाहींत"[1] "नाटकाची भाषा कशी असावी व नाटके कशीं असतात ह्यांचा मासला ह्या ग्रंथांत दृष्टीस पडावा" म्हणून "बराच यत्न" केल्याचे सांगताना थोड्या फार दर्पोक्तीने भाषांतरकर्ता लिहितो, "महाराष्ट्र व संस्कृत भाषेचे जे मर्मज्ञ आहेत आणि ज्यांनी असल्या प्रकारचीं इंग्रजी पुस्तकें वाचलीं आहेत ते तर ही गोष्ट निःसंशय कबूल करतील अशी आमची खात्री आहे, पण म्हपापाटलासारख्यांला हे आवडणार नाहीं; कारण त्यांच्या कानाला 'प्राणपती वंदन करते', 'तूं किमर्थ येथे आलास', 'माझ्या आगमनाची इच्छा केली तदर्थ आले', 'वत्सा, सांगते श्रवण कर,' असल्या प्रकरची घेडगुजरी आणि उद्धट भाषा गोड लागून गेली आहे."[2] बराच यत्न करूनही प्रस्तुत भाषांतरकर्त्यांची भाषा फारशी सुरस व वैशिष्ट्यपूर्ण उतरली आहे, असे मात्र दिसत नाही. शिवाय, ज्यूलियस सीझर, मार्कस ॲण्टोनियस, कॅल्फूर्निया, पोर्शिया इत्यादी नावांऐवजी विजयसिंग, प्रतापसिंग, पद्मिनी अशा प्रकारची नावे बदलून नातू यांनी या पुस्तकाला जो देशी वेष दिला आहे, तो मात्र रसहानिकारक झाला आहे. ज्यूलियस सीझर, मार्कस ॲण्टोनियस, कॅशियस इ. सर्व ऐतिहासिक व्यक्ती होत्या. या व्यक्तींना रोमच्या इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे. त्यांच्या भव्योदात्त जीवनावर शेक्स्पिअरने रचिलेले हे नाटक; परंतु नातूंनी विजयसिंग, प्रतापसिंग, संग्रामसिंग इत्यादी सारी शिंग-मंडळी आणून मूळच्या धीरगंभीर व भव्य कृतीला राजपुतान्यातील एका छोट्या जहागिरीत घडलेल्या कल्पित कारस्थानाचे संकुचित स्वरूप आणून दिले आहे. त्यामुळे अशा प्रभावी स्त्रीपुरुष-व्यक्तींच्या मागे जे ऐतिहासिकतेचे तेजोवलय असते, तेच मुळी या कृतीने नाहीसे करून टाकिले आहे. त्यामुळे नाटक योग्य त्या परिणामाला मुकले आहे. काल्पनिक किंवा कल्पनारम्य नाटकांतील पात्रांची नावे भाषांतरात वा रूपांतरात बदलण्यापासून हानी नसते. परंतु ऐतिहासिक नाटकात तसे काही करणे म्हणजे नाटकातील विषय आपण होऊन फिका करण्यासारखे होय.

**नीलकंठ जनार्दन कीर्तने : शेक्स्पिअरकृत 'द टेंपेस्ट' (१८७५)**

कीर्तन्यांनी श्रीमंत तुकोजीराव होळकरांच्या "इंग्रजी मदरशांत मुख्य गुरूचें काम करीत असतां, परीक्षेस जाणाऱ्या पहिले वर्गास हें नाटक शिकवीत असतां" 'द टेम्पेस्ट' म्हणजे' 'वादळ'नामक नाटकाचे भाषांतर केले. पुढे ते प्रामुख्याने विद्यार्थ्यांसाठी व त्याचबरोबर इतर "लोकांसहि मनोरंजनार्थ वाचण्यास उपयोगी पडेल," म्हणून छापण्यात आले. भाषांतरासंबंधी कीर्तने यांचे मत असे की, "मुळांतील शब्द व मर्म न सुटतां कोणत्याहि भाषेंतील काव्यनाटकादि ग्रंथांचें भाषांतर कोणत्याहि अन्य प्रौढ भाषेंत चांगलें होऊ शकते. ग्रंथकाराजवळ शब्दांचा व वाक्यरचनांचा भरणा

१. विजयशिंग, प्रस्तावना, पृ. १.
२. तत्रैव, पृ. २.

मात्र पाहिजे."[1] विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी या पुस्तकावर अभिप्राय देताना कीर्तन्यांच्या भाषेविषयी लिहिले आहे, "आमच्या मराठीत भाषेच्या सरणीस अगदी यथास्थित उतरलेली भाषांतरे अगोदर थोडी; त्यातून कॉलेजचे वारे लागून गर्वाने ताठलेल्या व इंग्रजीचा तोरा मिरवणाऱ्या आमच्या नव्या मंडळीत तर वरील उदाहरण शपथेस सापडायचे नाही.... पण लिहिण्यास आनंद वाटतो की आमचे मित्र प्रस्तुत भाषांतरकर्ते हे इंग्रजीत पुरे वाकबगार असता यांच्या लेखात वरील लज्जास्पद दूषणाचा प्रकार आढळलाच तर फार क्वचित आढळेल. यांची लिहिण्याची एकंदर पद्धती अत्यंत शुद्ध व मराठी चालीची असून शिवाय मार्मिक व चित्तवेधक आहे."[2] विविधज्ञान-विस्तारातील या नाटकावर आलेल्या अभिप्रायात प्रामुख्याने ग्रंथकर्त्यांच्या मराठी भाषेवरच टीका करण्यात आली असून चिपळूणकरांची स्तुती केवळ अर्थवादात्मक असल्याचे सांगितले आहे.[3] "आमचे जवळ भुतांस आकळणारा लांब चमचा थोडाच आहे. (पृ. ५९)" "मला वाटते आमचे गाणे ते निनामी वायुरूपी गृहस्थ, त्यांनीं हे वाजविले (पृ. ७७)" "आता ह्या वाक्यांत तद्देशीय काही गोष्टींचा उल्लेख आहे, त्यामुळे काही अर्थ समजल्यास मनास व्हावा तसा संतोष होत नाही. टीपा असल्या म्हणजे सर्व सुरळीत असते."[4] याच अभिप्रायात 'महासाधन इत्यारे', 'तमोमयी घाण', 'शृंगाररहित माती' इत्यादी प्रयोगांत विशेष्यांपेक्षा विशेषणेच जबरदस्त म्हणजे नाकापेक्षा मोती जड याप्रमाणे झाले असल्याचीही तक्रार केली आहे.

पण कीर्तन्यांना या सर्व गोष्टींची जाणीव होती. भाषांतराच्या आवश्यकतेविषयी ते लिहितात, "याचे (शेक्स्पिअर साहेबाचे) सर्व ग्रंथ पद्यात्मक आहेत. त्यांचीं भाषांतरें पृथ्वीतील बहुतेक प्रौढ दशेस आलेल्या चालू भाषांमध्ये झालेलीं आहेत. तशीं भाषांतरे एकदमहि होणे कठिण. मध्यंतरीं अल्पस्वल्प आमच्यासारखे प्रयत्न झालेच पाहिजेत."[5] शेवटीं "परकीय लोकांच्या संबंधाचें हे नाटक आहे, म्हणून रसमाधुर्याची प्रचीति उत्पन्न होणे हेहि हरएकाचे ठायीं संभवत नाहीं, हेहि सांगणे रास्त आहे," असे त्यांनी स्पष्टच लिहिले आहे.[6]

कीर्तन्यानी प्रस्तुत भाषांतरात एरियल व प्रॉस्पेरो यांच्या तोंडी दिंड्या, साक्या, अभंग, आर्या घातल्या आहेत. त्यांतील कवित्व फारच सामान्य आहे.

**'रोमकेतुविजया' : विविधज्ञानविस्तार (पु. ३ ते ५ यांत पूर्ण) १८७० ते १८७२**

शेक्स्पिअरच्या Romeo and Juliet या नाटकाचे भाषांतर वि.ज्ञा.वि.मध्ये

१. द टेंपेस्ट, प्रस्तावना, पृ. ८.
२. निबंधमाला, पृ. ३७५.
३. वि.ज्ञा.विस्तार, पु. ८, अं. ५, १८७६ मे, पृ. ८३–९०.
४. तत्रैव, पृ. ९०.
५. द टेंपेस्ट, प्रस्तावना, पृ. १०.
६. तत्रैव, पृ. ११.

क्रमशः प्रसिद्ध झाले. त्यातील भाषेचा नमुना पुढे दिलेल्या विजयेच्या विषप्राशनापूर्वी केलेल्या स्वगत भाषणात पहावयास मिळेल.

**आई** — बरें तुझें कल्याण असो. जा नीज आतां, जरा जीव शांत होऊं दे. तुला त्रास फार झाला आहे. ( आई व दासी जातात. )

**विजया** — बरे, दंडवत ! – देवा आतां तुला ठाऊक, पुनः आम्ही केव्हां भेटू ते. मला तर कडकडून भय वाटते. अंगावर कांटा उभा राहतो आणि सर्वांगांतून भयाची शिसारी उठते. जिवाचा उबारा मंद पडून सर्वांग थंड पडत चाललें. मी त्यांना हाक मारते आणि माझें समाधान करायला सांगते.– दाई ! पण काय करणार ती येथें येऊन ? माझ्या या सोंगाची बतावणी म्यां एकटीनेच केली पाहिजे.– तेव्हां कुपे अशी पुढे ये – बरें, पण हे औषध मुळींच जर लागू न झाले, तर पुढे कसे ? जबरदस्तीने हे त्या सरदाराशीं माझें लग्न लागणार एकूण ? नाहीं, तसे नाहीं व्हायाचे. ते चुकवायाला हे आहे – तूं इथें ऐस ( एक कट्यार खाली ठेवते. ) बरें ते असो, पण हे जर खरोखरीच विष असले आणि मला मारून टाकण्याकरितांच, लबाडीने हें त्या उपाध्यायाने दिले असेल, तर कसे ? होय. रोमकेतूबरोबर माझें त्यानें एकदां लग्न लावलें आणि पुनः पारिशाबरोबर दुसरें लावले, तर आपली अप्रतिष्ठा होईल ही त्याला भीति आहेच. तेव्हां मला वाटते हे विषच असेल; पण पुनः वाटते, कीं तसे होणार नाहीं. कारण तो मोठा धर्मनिष्ठ मनुष्य आहे. तेव्हां असे खोटे विचार मनांत आणणे नीट नाहीं. पण असें समजा, कीं यांणी मला नेऊन थडग्यांत ठेवले आणि रोमकेतू येऊन तेथून मला सोडवून नेणार, त्याच्यापूर्वी मी पुष्कळ वेळ जिवंत होऊन बसले तर कसें होईल ? ती तर मोठी भयंकर वेळ ! त्या घाणक्या थडग्यामध्ये जिवाला सुख देणारी हवा सुद्धां नसेल. तेथे माझा रोमकेतु यायच्यापूर्वीच मी गुदमरून तडफडून मरून जाणार नाहीं ना ?

**‘ भ्रांतिकृत चमत्कार ’** : The Comedy of Errors

भाषांतररूप नाटक असूनही प्रयोगाच्या दृष्टीने बरेच गाजलेले व लोकप्रिय झालेले नाटक म्हणून ‘ भ्रांतिकृत चमत्कार ’ ह्या विनोदी, हास्यरसप्रधान प्रहसनाचा उल्लेख करिता येईल. दोन बंधू दिसावयास अगदी एकसारखे होते. हा तो की तो तो, या भ्रांतीने एक दिवस जी काही मौज उडाली, ती या नाटकात वर्णिली आहे. स्थलांची नावे कोकणपट्टीतील समुद्रकाठच्या प्राचीन शहरांची घेतली आहेत. भाषांतर देशरिवाजास अनुसरून आणण्याकरिता भाषणे मूळच्याहून काही निराळ्या तऱ्हेची लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळेच भाषांतराचा भाषांतरपणा नाहीसा होऊन

मूळ विनोदी कथा मनोरंजक वाटली असल्यास नवल नाही. पुढे दिलेल्या उताऱ्यावरून भाषांतराची कल्पना येईल.[1]

**हेमकांत शृंगारपूरकर** — काय झालें रे धर्म्या ! धांवत धांवत कोठें चाललास ?

**धर्म्या शृंगारपूरकर** — महाराज, तुम्ही मला खरेच ओळखलें का ? मी धर्म्या खराच का ? तुमचा चाकरच का ? हाच का मी ? ओळखलात का पक्का ?

**हेम.** — तूंच धर्म्या, आणि तूंच चाकर. पण तूं हा भांग प्याल्यासारखें काय करतोस ? – हा मी का तो मी ?

**धर्म्या** — मी गाढव आहे. मी एका रांडेचा चाकर आहे. हा मी नव्हे हो नव्हे. मला खरीच भ्रांति पडली आहे मी भ्रमिष्ट झालो आहे. मी भांग न पितां भ्रमिष्ट झालो आहे.

**हेम** — कोणते रांडरूं तुला चाकर म्हणते ? आणि भ्रमिष्ट कसा झालास ?

**धर्म्या** — महाराज काय सांगूं, खरोखरीच कोळशांतले माणिक हो. ती मला आपला गुलाम म्हणते. ती म्हणते – तूंच माझा नवरा – माझ्यावर मालकी चालविते आणि मला सोडीत नाहीं हो ! मला लपवा तरी कोठें ?

**हेम.** — ती कशी तुझ्यावर मालकी चालविते ?

**धर्म्या** — जशी तुम्ही आपल्या घरच्या घोड्यावर चालवितां कीं नाहीं, त्याप्रमाणे. खरेच ती मला जनावराप्रमाणे वागविते. म्हणजे मला जनावर समजून तसे वागविते असे नाहीं, तर घाणेरड्या जनावरासारखी असून माझ्यावर आपला हक्क चालविते.

**हेम.** — ती आहे तरी कोण ?

**धर्म्या** — कोण म्हणून काय सांगूं ? मोठी पोक्त म्हणजे अगदीच थेरडी हो ! आणि इतकी स्वच्छ ! नांव घेतलें कीं सचैल स्नान करावें. हे लग्न झालें तर माझें नशीब मोठे राठ समजा. पण महाराज, लग्न चबचबीत होईल.

**हेम.** — लग्न चबचबीत रे कसे ?

विविधज्ञानविस्तारात या नाटकाच्या भाषेसंबंधी पुढील मत व्यक्त करण्यात आले आहे. "या ग्रंथातील पात्रांची भाषा फार पोक्त, रसाळ आणि शुद्ध आहे. त्यात विशेषतः बायकांची तर फारच चटकदार आहे....चटकदार प्रियंवदा आणि पोक्त अनसूया या दोघ्या सख्यांनी शकुंतला जशी विलोभनीया झाली, तद्वत ही

१. बजाबा रामचंद्र प्रधान व श्रीराम भिकाजी जठार, वि.ज्ञा विस्तार, पु. ४, अं. ८ (नाटक अं. ३, स्थळ ३).

भ्रांतिकृत चमत्कृती या उभयतांच्या रसिक व उदात्त भाषणांनी जनचित्ताल्हादिनी झाली आहे.[1]

## ' नीलदर्पण ' ( १८७२ )

मूळ बंगाली लेखक दीनबंधू मित्र यांनी लिहिलेल्या नाटकाच्या मधुसूदन दत्त यांनी केलेल्या इंग्रजी अनुवादाचा हा मराठी अनुवाद आहे. हे नाटक मूळ बंगाली-मध्ये फारच खळबळ माजविणारे ठरले. बंगाली शेतकऱ्यांचे शोषण युरोपियन कारखानदारांनी कसे चालविलें होते, तेथील शेतकऱ्यांस विसार रक्कम आधी देऊन त्यांच्यावर करार पुरा करण्यासाठी ते मारहाण, जुलूम-जबरदस्ती कशी करीत असत, याचे मोठे विदारक चित्र या नाटकात एका वाताहत झालेल्या शेतकरी कुटुंबाच्या कथेच्याद्वारे दाखविले आहे. मूळ ग्रंथकर्त्याच्या प्रस्तावनेत प्रारंभीच म्हटले आहे, " मी नीलदर्पण नांवाचा आरसा नीळ पिकविणाऱ्या साहेबलोकांस देतों. यांत प्रत्येकानें आपले तोंड पाहून आपल्या कपाळीं जो आपलपोटेपणाचा डाग आहे तो पुसून काढून त्याच्या ठिकाणीं चंदनाच्या गंधासारखा परोपकाराचा टिळा लावावा, म्हणजे माझ्या श्रमाचें सार्थक झालें, गरीब निराश्रित रयतेचें नशीब उघडलें, आणि इंग्लंड देशाची अब्रू राहिली असे मी समजेन. "[2]

हे नाटक त्या वेळच्या सरकारला फारच झोंबले. इंग्रजी अनुवादकर्ते मधुसूदन दत्त यांची नोकरी याचमुळे गेली. रेव्हरंड जेम्स लाँग यांस या नाटकाचे प्रकाशन केल्यामुळे कारावास भोगावा लागला. परंतु या सर्व आंदोलनाचा परिणाम नीळ पिकविणाऱ्या युरोपियन कारखानदारांचा जुलूम नाहीसा करण्यात झाला. वाळवेकर लिहितात, " हा ग्रंथाचा उद्योग गरीब शेतकरी लोकांवर युरोपियन नीळ पिकविणारे कारखानदार लोक जुलूम करीत असत त्यांजपासून मुक्त करण्याकरितां होता. तो सफल होण्यास पुष्कळ अंशीं हें नाटक कारणीभूत झाले; तेव्हां अशा योग्य नाटकाचें भाषांतर आपल्या मराठी भाषेंत असणे अवश्य आहे असे वाटल्यावरून हे आतां लोकांपुढें सादर केलें आहे. याखेरीज आपले बंगालकर बांधव कोणत्या प्रकारचे उपयुक्त, लोकहितार्थ व सांप्रतच्या कालास अनुसरून आणि गरीब लोकांस दुःख-विमुक्त करण्यासाठीं ग्रंथ करतात याचा मासला आमच्या इकडील विद्वज्जन व ग्रंथ करूं इच्छिणारे लोक यांजपुढें मांडण्याचा या भाषांतराचा,हेतु आहे. " हाच मुद्दा स्पष्ट करण्यासाठी पुढे ते म्हणतात, " या ग्रंथाचें भाषांतर सादर करण्यांत माझा मुख्य उद्देश लोकांमध्ये हल्लीं जीं नाटकें, कादंबऱ्या वगैरे ग्रंथ करण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे तिचा कल उपयुक्त व आपल्या लोकांस दुःखमुक्त करण्याकडे वळावा आणि हल्लीं जीं अनेक प्रकारचीं दुःखें, लोकाचार, व्यापार व राज्यरीति

१. वि.ज्ञा.वि. वर्ष १६, अं. ५, ६, ७, पृ. १३७–१३८.
२. नीलदर्पण ( १८७२ ), ग्रंथकर्त्याची प्रस्तावना, पृ. ५.

यांसंबंधानें होतात तीं निवारण करण्यास साह्यभूत होतील अशा प्रकारचे नाटक वगैरे ग्रंथ आपल्या महाराष्ट्र-भाषेंत व्हावे असा आहे. शेतकऱ्यांचा जो मोठा समुदाय, त्यांची स्थिति, त्यांस मारवाडी वगैरे सावकार अनेक प्रकारांनीं नाडतात ते प्रकार, सरकारच्या दिवाणी न्याय करण्याच्या रीतीने लोक भिक्षेस कसे लागतात त्याचा मासला, पोलिसाचा जुलूम, मुलकी वगैरे कामदारांच्या स्वाऱ्यांमुळे गरीब रयतेस पीडा, पब्लिक वर्क्स् खात्याकडील अतोनात पैशाची उधळपट्टी इत्यादि कितीएक विषयांवर नाटकें वगैरे ग्रंथ होण्याकडे ग्रंथ करूं इच्छिणाऱ्यांचें मन हे नाटक पाहून वळावे अशी माझी इच्छा आहे." [1]

'ज्ञानसंग्रह'कारांनी मात्र या नाटकावर प्रतिकूल टीकेची बरीच झोड उठविली. त्यांच्या अभिप्रायात एकंदर सरकारधार्जिणेपणाच अधिक दिसून येतो. त्यांचे काही मुद्दे तर अगदीच चमत्कारिक आणि न पटणारे आहेत. "बारा वर्षांपूर्वीच्या जीर्ण निर्जीव वादाचे लोकास स्मरण करून देण्यांत कांहीं अर्थ नाहीं" व "कांहीं साहेब लोक बंगाल्यांतील रयतेवर जुलूम करितात ही गोष्ट ६०० कोस दूरच्या लोकांनीं नाटकद्वारां प्रसिद्ध केली ती मराठी वाचणाऱ्यांचे पुढे आणण्यापासून यत्किंचित्‌ही फायदा नसून उलटे नुकसान आहे" असे त्याचे मत होते.[2] इंग्रज लोक खरोखर येथे आपले कल्याण करण्यासाठी राज्य करीत असताना, येथल्या लोकांना त्यांचा सद्धेतू तर लक्षात येत नाहीच, परंतु अडाणीपणाने राज्यकर्त्यांसंबंधी काही गैरसमज ते करून घेऊन बसतात. अशा वेळी असली नाटके राज्यकर्त्यांच्या व आपल्या सख्यात बिघाड निर्माण करतील, अशी भीती व्यक्त करून ते लिहितात, "नवीन शिकलेले नेटिव लोकांचे हे कर्तव्य आहे कीं, राज्यकर्त्यांचे खरे उद्देश त्यानी आपल्या अशिक्षित देशबांधवांस समजून द्यावे आणि इंग्रज लोकांच्याविषयीं त्यांच्या मनांत पूज्य बुद्धि व सख्य उत्पन्न करण्याचा यत्न करावा....असमंजस लोकांच्या मनांत एकदां वाईट आले कीं, ते नाहींसे होण्याचें फार कठिण आहे आणि 'टोपीवाले तिथून सारखेच' असा विचार हा ग्रंथ वाचल्यानंतर तशा लोकांच्या मनांत येणे हें स्वाभाविक आहे."[3] शेवटी वाळवेकरांनाच त्यांनी त्यांचाच उपदेश आचरण्यासाठीच सांगितले आहे. ते लिहितात, "नीळ पिकविणाऱ्या साहेबांच्या जुलमावरच्या ग्रंथाचें निरर्थक व अपकारक भाषांतर केले त्याबद्दल मारवाड्याच्या जुलमावर किंवा त्यांनी प्रस्तावनेत लिहिलेल्या महाराष्ट्र-भाषा बोलणाऱ्या लोकांच्या प्रांतांत लागू अशा विषयावर नाटक रचलें असते तर फार चागले झाले असतें." [4]

---

१. नीलदर्पण, मराठी भाषांतर करणाऱ्याची प्रस्तावना, पृ. २–३.

२. ज्ञानसंग्रह, पु. १, अं. ८, अगस्त १८७२, नीलदर्पण नाटकाचे मराठी भाषांतर, पृ. १४७.

३. तत्रैव, पृ. १४८.

४. नीलदर्पण, प्रस्तावना, पृ. १४९.

या शोकान्त नाटकातील भाषेचा नमुना पुढे देण्यात येत आहे —

**बिंदुमाधव** — सर्पांच्यासारख्या गरळांनीं तोंड भरलेले असे हे नीळ पिकविणारे साहेब लोक त्यांनीं अग्नीच्या ज्वाळेंत सर्व सुख ढकलून दिलें. अन्यायाच्या योगाने बाप तुरुंगांत मेला, थोरला भाऊ निळीच्या शेतांत मेला आणि आई आपल्या नवऱ्याच्या व मुलाच्या दुःखामुळे भ्रमिष्ट होऊन आपल्या हातानें उत्तम प्रकारची चांगली बायको मारून शुद्धीवर आल्यावर माझें दुःख पाहून पुनः तिच्या शोकाच्या सागरास भरती आली आणि या दुःखाच्या गंगाबरोबर संकटाचें विष आलें तेव्हां शांतवनाकडे लक्ष न देतां हें जग सोडून चालती झाली बाबा कोठे आहेत, बाबा कोठे आहेत, म्हणून मी वारंवार हाका मारतों. हास्यमुखानें मला एकदां आलिंगन द्या. आई आई म्हणून मी चोहींकडे हाका मारीत पाहतों; परंतु ते आनंदाचें तोंड कोठें माझ्या दृष्टीस पडत नाहीं.[1]

## चार

## पौराणिक विषयांवरील नाटके

विष्णुदास भाव्यांनी रंगभूमीसाठी जी नाट्याख्याने रचिली, त्यांचे विषय एकूण-एक पौराणिकच होते. बाबाजीशास्त्री दातार, नाना सोनी, नानाबुवा बुधकर इत्यादींनीही विष्णुदासांच्या पद्धतीने अशाच पौराणिक विषयांवर स्वतंत्र कविता वेगवेगळ्या नाटक-मंडळ्यांसाठी लिहिली. अशा प्रकारच्या नाट्यकवितेच्या आधाराने केलेल्या नाट्यप्रयोगांचा काळ १८४३ पासून १८६०–६२-पर्यंत टिकला. ही नाट्यकविता पुस्तकरूपाने प्रसिद्धही होत नसे व पात्राचे संवादही साक्षेपाने लिहिलेले नसत. परंतु संस्कृत नाटकांची एकाहून एक सुरस अशी भाषांतरे जेव्हा पुस्तकरूपाने बाहेर पडू लागली, तेव्हा 'नाटक' ही काही स्वतंत्र रचना आहे याची, अल्पशी का होईना, येथील लोकांना कल्पना आली व तशा प्रकारची गद्यपद्यात्मक अशी स्वतंत्र नाट्य-रचना ( नाट्यकविता नव्हे, ) पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याकडे काही लेखक वळले.

अर्थात नाट्यकवितेबरोबर गद्य भाषणे येऊन ती पुस्तकरूपाने सलग प्रसिद्ध झाली, तरी ती 'नाटके' बनली, असे मात्र नाही. बऱ्याच अंशी ती गद्यपद्यात्मक नाट्याख्यानेच राहिली. कारण नाटक या वाङ्मयप्रकारातील संविधानकाचा आटोपशीरपणा, पात्रांचे स्वभावपरिपोष, संवादांतील खटकेबाजपणा, रसपरिपोष इत्यादी गोष्टींची कल्पनाच या पौराणिक विषयांवरील नाटके लिहिणाऱ्या लेखकांना व ती पाहणाऱ्या प्रेक्षकांना फारशी नव्हती. पूर्वीच्या कवींनी ( प्राधान्याने मराठी कवींनी ) निरूपिलेले पुराणांतील एखादे आख्यान घ्यावयाचे व ते नाटक-रीतीने म्हणजे

१. नीलदर्पण, अं. ५, प्र. ४, पृ. १७७.

नाटकपात्रांकरवी रंगभूमीवर संवादात्मक रीतीने वठवून दाखवावयाचे, एवढीच त्या वेळची दृष्टी असावी. विष्णुदासी पद्धतीच्या कवितेत कथानिरूपण हे सबंध नाटकभर सूत्रधारच आपल्या मुखाने हरिदासाप्रमाणे बाजूला उभे राहून करीत राही. तो काळ मागे पडून आता पात्रेच स्वतः बोलू लागून कथाभागास गती देऊ लागली. मात्र याही नाटकांतून सूत्रधाराला संपूर्ण रजा मिळाली, असे समजणे चूक होईल. सूत्रधार-विदूषकांची जोडी या नाटकांत शेवटपर्यंत राहिलीच; इतकेच काय, पण या वेळच्या सामाजिक, कल्पनारम्य व ऐतिहासिक नाटकांतसुद्धा ही दुक्कल पुढे दीर्घकालपर्यंत वावरत होती. नाटक-कलेचा खरा उत्कर्ष, नाटकीय पात्रांनी स्वभावांचा स्वमुखाने केलेला जो आविष्कार, त्यात पहावयास मिळतो. नाटककार आपल्या कृतीतून संपूर्णपणे निवृत्त झाल्यावाचून खरे नाटक लिहिले जात नाही. प्रारंभीच्या काळात पात्रांना संपूर्ण स्वातंत्र्य देण्यास नाटककार राजी नव्हता. पात्रांच्या स्थितिगतींचे, उक्तिकृतींचे सर्व सूत्र आपल्य हातात रोखून धरून तो सूत्रधाराच्या रूपाने रंगभूमीवरच, विष्णुदासांच्या वेळी, पहिल्या काळात आसन धरून बसला. त्यामुळे या काळातील रंगभूमीवरील जिवंत दिसणारी पात्रे कळसूत्री बाहुल्यांपेक्षा फारशी भिन्न नव्हती. विष्णुदासांच्या नाट्याख्यानांत ग्रंथकार हा खरा सूत्रधारच ( Ring-master ) होता. परंतु पुढच्या पौराणिक नाटकांत त्याने आपली सत्ता बरीच कमी करून घेतली, व पात्रांना पुष्कळसे उक्तिस्वातंत्र्य व कृतिस्वातंत्र्य लाभले. अर्थात साक्षी म्हणून सूत्रधार-विदूषक ही दुक्कल प्रत्येक वेळी उपस्थित राहून घडत असलेल्या प्रसंगावर काही भाष्य करीत शेवटपर्यंत राहिल्यामुळे पात्रे अजून स्वतंत्र झाली नव्हती. कारण नाटककार अद्यापि रंगभूमीवरून संपूर्णपणे निवृत्त झालेला नव्हता.

परंतु संस्कृत नाटकांच्या भाषांतरांमुळे या पौराणिक विषयांवरील नाटकांच्या रचनेत बरीच सुधारणा घडून आली. प्रथमतः पद्य, जे तृतीयपुरुषी होते, ते प्रथम-पुरुषी झाले. कचेऱ्यांची कल्पना मागे पडून अंकांची व प्रवेशांची कल्पना, स्थूल स्वरूपात का होईना, प्रचारात येऊ लागली. स्थूल स्वरूपात म्हणण्याचे कारण असे की, बरीचशी नाटके नुसती प्रवेशात्मकच आहेत. सबंध नाटकाचा एकच अंक, व त्यात वीस-बावीसपर्यंतसुद्धा प्रवेश प्रसंगी गोवलेले सापडतात. कोठेकोठे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे; म्हणजे दोनच अंक करून व पुन्हा त्याचे काही तुकडे पाडून प्रवेश बनविले आहेत. अर्थात पौराणिक नाटकांच्या रूपाने अथपासून इतिपर्यंत सर्व पौराणिक आख्यान सांगावयाचे, म्हणजे वरील प्रकार होणे अपरिहार्यच होते. कारण आटोपशीर संविधानकाची – म्हणजेच कथानकांतर्गत नाट्यपूर्ण रसमय प्रसंगांचीच – लेखकांना सामग्र्याने अद्यापि जाणीव आलेली नव्हती. केवळ कथाकथनावर भर होता. त्यामुळे पात्रांचा खऱ्या अर्थाने स्वभावाविष्कार झाला नाही व त्यामुळे योग्य त्या नाट्यांतर्गत रसाचीही पुष्टी कोठे होऊ शकली नाही. पौराणिक ग्रंथ नित्य वाचनात होतेच. कथाकीर्तनांतही उत्तररंगात पौराणिक आख्याने नित्य लोकांच्या कानांवर पडत.

त्यामुळे पौराणिक नाटकांच्या कथा लोकांना आधीच माहीत असत. फक्त त्या कथा जिवंत देहधारी व्यक्तींच्याकरवी पोशाख, वातावरण इत्यादींच्या साहाय्याने प्रत्यक्ष रूपात पाहणे हाच बराचसा कौतुकाचा भाग प्रेक्षकांच्या मनात त्या वेळी असे. या पौराणिक नाटकांचे दुसरे आकर्षण म्हणजे सूत्रधार-विदूषकांचा विनोदी ' वाग्जल्प ' आणि प्रारंभी येणारी देवदेवताची सोंगे हेच होते.

पौराणिक विषयांवरील नाटकांमध्ये पुन्हा दोन प्रकार स्पष्टपणे दिसून येतात. पहिल्या प्रकारात विष्णुदासी पद्धतीने लिहिलेल्या गद्यपद्यात्मक नाट्याख्यानांचा समावेश होतो. यांमध्ये नाटकलेखकांनी स्वतंत्र आख्याने शोधून काढण्याचीही तसदी न घेता विष्णुदासांचीच आख्याने उचलून त्यांवरच आपली नाटके तयार केली पद्यासाठी संस्कृत वृत्तांच्या फारसे वाटेस न जाता ओव्या, दिंड्या, साक्या किंवा जुनी पदे, गीते यांतच विशेषेकरून रचना करून त्यानी आपली नाटके सजविली. काहींनी तर विष्णुदासांची पदेच जशीच्या-तशी घेतली. मात्र दुसऱ्या प्रकारची जी काही पौराणिक नाटके या काळात विशेष लक्ष वेधून घेणारी ठरली, ती संस्कृत नाटकांच्या पद्धतीने बऱ्याच अंशी लिहिली गेली. संस्कृत नाटकांच्या मराठी भाषांतरांमुळे संस्कृत नाटकांचा साचा आता लोकांच्या परिचयाचा झाला होता. विशेष प्रौढ, रसिक व विदग्ध असे जे लेखक होते, त्यांनी पौराणिक नाटके लिहिताना याच संस्कृत नाटकशैलीचा स्वीकार केला. भाव्यांच्या सूत्रधारी पद्धतीच्या कथनशैलीपेक्षा ही शैली अर्थातच अधिक विकसित व निःसंशय कलात्मक होती. यात पद्ये संस्कृत वृत्तांतच अधिकांश लिहिलेली दिसतील. अर्थात लोकच्छंद यांना वर्ज्य होते, असे नाही. परंतु शिळाछापी किंवा सूत्रधारी नाटकांपेक्षा या ग्रांथिक शैलीच्या नाटकांतला निराळेपणा तेव्हाच लक्षात आल्यावाचून राहत नाही. आटोपशीर कथानक, मोजक्या परंतु स्वतंत्र व्यक्तित्व असलेल्या व्यक्तिरेखा, रसयुक्त प्रसंगांची योजनापूर्वक मांडणी व विदग्ध पद्यरचना आणि या सर्वांच्या भरीस नागर शैलीतील संवाद यांमुळे यांतील काही नाटके निश्चित लक्ष वेधणारी उतरलेली दिसतील.

शिळाछापी पद्धतीची नाटके पुढे १८९०–९५-पर्यंतही लिहिली जात होती. द. वा. जोगळेकर, स. बा. सरनाईक वगैरे मंडळी किर्लोस्कर-त्रिलोकेकरांची संगीत-पद्धतीची पौराणिक नाटके प्रचारात आल्यानंतरही जुन्याच पद्धतीची सूत्रधारी नाटके लिहीत होती. ईश्वरचरित्राचा काही भाग ' सवेष करून दाखविणें ' एवढेच या नाटकांचे ध्येय होते. विष्णुदासी तागडथोम नाटकांतील हरदासी काव्य व रटाळपणा काढून टाकून संवादात्मक पुराणाख्याने या नाटकांच्याद्वारे लोकांपुढे मांडिली जात. शिळाछापी म्हणजे सूत्रधारी पद्धतीच्या या पौराणिक नाटकांत सूत्रधार-विदूषक-संवादास फारच महत्त्व दिले गेल्याचे दिसून येईल. संस्कृत-पद्धतीच्या नाटकांत प्रारंभी सूत्रधार व नटी

यांचा संवाद असतो. परंतु या जुन्या खास मराठी पौराणिक नाटकांत सूत्रधार व विदूषक हीच दुक्कल भेटते, हे लक्षात घेण्यासारखे आहे. विदूषक हा अनेक भाषा बोलणारा, गमतीबाज, गडबड्या गडी किंवा चैनी राम म्हणून चित्रिलेला दिसेल. मात्र अण्णासाहेब किर्लोस्करांपासून जी नाटकांची नवी पौराणिक संगीत पद्धती सुरू झाली, तिचा उगम हा या शिळाछापी पद्धतीच्या नाटकांत नसून दुसऱ्या प्रकारच्या संस्कृत पद्धतीने लिहिलेल्या, गद्यपद्ययुक्त ग्रांथिक पौराणिक नाटकांतच होता, हे विसरून चालणार नाही.

**दामोदरकवी**

पुस्तकरूपाने पहिल्यानेच प्रसिद्ध झालेली या काळातील पौराणिक नाटके म्हणून दामोदरकवीच्या कृतींचा उल्लेख करिता येतो. यापूर्वी पौराणिक नाटके, खण्डशः का होईना, पण मासिकांत प्रसिद्ध होत होती. चंद्रिका मासिकाच्या तिसऱ्या पुस्तकात ( १८५६ ) ' अभिमन्यु-विवाह ' नावाचे संपूर्ण तीन अंकी पौराणिक नाटक ऑगस्टपर्यंतच्या अंकांत क्रमाने छापून प्रसिद्ध केलेले पहावयास सापडते. या नाटकाची पद्धती सूत्रधारी असून रचना अगदीच सामान्य आहे. कवित्वही बेताचेच आहे. जांघील व घटोत्कच यांतील हा संवाद पहावा —

**घटो०** — मामा, आपण द्वारकेत तर येऊन पोहोचलो, परंतु आपणांस सांगतो ती मसलत लवकर योजनेंत यावी.

**जांघी०** — महाराज, लवकर सांगावी. मी सिद्ध आहे.

**घटो०** — श्रवण कर ,

बंडोत्पन्न कराया ग्रहण करावे बहूत वेश अतां
जेणेकरूनि कृष्णा कळुनी येइल, पडेल त्या चिंता.
चिंता कांहीं न करीं कृष्णाची, त्यासि जिंकुं आपण कीं
बलरामासीं लढुनी ख्याति करूं स्विय बरीच त्रय लोकीं.[1]

दामोदरकवीचे ' हरिश्चंद्राख्यान ' नाटक पौराणिक नाटकांच्या क्रमविकासाच्या दृष्टींने पाहण्यासारखे आहे. या नाटकाचे कवीने पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग केलेले असून पहिल्यात संपूर्ण नाट्यकविता केवळ कथासंदर्भासह छापिली आहे व उत्तरार्धात पूर्वीच्या कवितांचा संदर्भ देऊन त्यांवर बोलणाऱ्या पात्रांची भाषणेच नुसती आली आहेत. उदा. पहिल्या भागात तारामतीचे पुढील पद आलेले आहे —

( वक्रतुंड गण० )

नृपदारा वदे मुनिवरा धर्म प्रियकरा, करुनिया त्वरा
मला न विकावें, देऊनि विप्राघरीं धन ते घ्यावे, मी

---

१. चंद्रिका : पु. ३, अं. ५ ( १८५६ ), पृ. १४०.

दीन चरणिं तव लीन जळाविण, होतो त्या शीण
तशी गत जाली. धर्म प्रियकरा दया करा या वेळीं.
कुंटिणी महापापिणी जारकर्मिणी तयां लागुनी न
द्यावे मजला, माझि प्रार्थना ऐके मुनि दयाळा !

'नृपदारा वदे' याने सुरुवात होणारे पद सूत्रधारच गात असावा, असे दिसते. मात्र दुसऱ्या भागात या पदावरचे भाषण आले आहे, ते असे —

"नृपदारा हे म्हटल्यावर तारामती :

अहो मुनिवर्या या कुंटिनी माहाचांडाळणी यांस जर आपण मला विकली तर बरें माझी शोभा काय राहील; व नहाक सूर्यवंशास डाग लागेल."

'कृष्णलीला' नाटकात मात्र संभाषणे व कविता वेगवेगळी न छापिता एकत्रच छापिली आहेत. वामनी प्रकरणाच्या आधारावरच कवीने हे कृष्णलीला नाटक बहुतांशी रचिल्याचे दिसते.

महाबल भट्टत्रिटंबन ।। दुजा पूतनाप्राणशोषण ।। तिसरा भाग
नौकाक्रीडण ।। चौथा राधा विलास तो ।। १ ।। उत्तम कविताप्रकारें
निरूपण ।। नाटकरीत्या आतां करीन ।। करितां जाचे नित्य पठण ।
पातके सर्व हीं दग्ध होतीं.[1]

'कृष्णलीले'त चार भाग स्वतंत्र अंकवजा असून प्रत्येक विभागात वेगवेगळ्या प्रवेशांची योजना केलेली आहे. रागदारीतील पदे, होऱ्या, ठुंबऱ्या, स्त्रीगीते इत्यादींच्या चालीवर ही कविता करण्यात आली आहे.

### नातू यांचे 'नल'-नाटक

महाराष्ट्र-जन-प्रबोध कविता-मंडळीने हे नाटक प्रसिद्ध केले. पौराणिक विषयावरील नाटक ही काही केवळ धार्मिक स्वरूपाची करमणूक नसून त्याच्यातून कालोचित शिकवण अवश्य दिलेली असते, ही दृष्टी परशुरामपंततात्यांनी वेणीसंहार नाटकाला लिहिलेल्या उपोद्घाताने वाचकांना प्रथमच आणून दिली होती. त्यांनी लिहिले आहे, "हा ग्रंथ करण्याचे कवीला मुख्य प्रयोजन हेच कीं, न्यायाने वर्तल्याचे काय फळ, अन्यायाने वर्तल्याचे काय फळ, साधूवर ईश्वराची कृपा कशी असती, दुष्टांवर ईश्वराचा कोप कसा होतो, शांति, दया, क्षमा यांचा परिणाम किती दुःखकारक होतो, साधुसमागमाचे काय फळ, दुष्टसमागमाचे काय फळ, नीतीपासून किती सुख, आणि अनीतीपासून किती दुःख इत्यादि सदसत् गोष्टी लोकांस कळाव्या."[2] हाच बोधवादी दृष्टिकोण ठेवून विनायकशास्त्र्यांनी हे नल-नाटक लिहिले. ते लिहितात, "प्रथमतः नलदमयंतीचे आख्यान घेण्याचे कारण हे कीं त्यापासून वाचणारांस अनेक

१. श्रीकृष्ण-लीला-आख्यान ( १८६० ), पृ. १८.
२. वेणीसंहार, आ. २, ( १८६१ ), उपोद्घात, कलम ८.

प्रकारचा उपदेश व्हावा. ह्या आख्यानावरून त्यांस पहिल्याने तर असें समजेल कीं हल्लीं लहानपणींच मुलांचीं लग्नें करून त्यांचा कांहीं अंशीं आईबाप नाश करितात, त्याप्रमाणे पूर्वी लहानपणीं लग्न करण्याची रूढि नसून, तरुण वयांत स्त्री-पुरुषांचे परस्पर-मतानें व प्रीतीने लग्न होत असे. तेणेकरून किती सुखी होते बरे ?"[1] "विपत्तींत जी पत्नी पतीस सोडीत नाहीं तीच एक साध्वी होय," हा उपदेशही या ग्रंथाच्या-द्वारा वाचकांच्या मनावर ठसविण्याचा ग्रंथकाराचा उद्देश दिसतो.

प्रस्तुत नाटकाचे पाच अंक असून त्यांत सर्व नलचरित्र आले आहे. पहिल्या दोन अंकांत दमयंतीस्वयंवरापर्यंतचा भाग असून पुढील तीन अकांत कलिप्रवेश, दमयंतीत्याग, पुनः स्वयंवराचा बेत व शेवटी दमयंतीविरहसमाप्ती इतका प्रदीर्घ कथाभाग आहे. संविधानक आटोपशीर नसल्यामुळे पहिल्या अंकाचे ५ प्रवेश, दुसऱ्याचे १६, तिसऱ्याचे ११, चौथ्याचे ६ व फिरून पाचव्याचे १६ अशी ५४ प्रवेशांत ही कथावस्तू वर्णिली आहे. पदे, साक्या, दिंड्या, होऱ्या, कटाव, गझल सर्वांची गर्दी यात सापडेल. सर्व पदे प्रसादपूर्ण उतरलेली नाहीत. "यामिनींत कामिनी कशी त्यजून जाशि रे."[2] यासारखे एखादे पद बरे आहे. परंतु "ऋतु हा वसंत करि गरमी ॥ उपवनीं क्रीडा करुं स्वामी"[3] यासारखीच पदे फार. खास संस्कृत थाटाची श्लोकरचनाही भरपूर आहे. उदा. —

**नलराजा** — हे सुंदरी कोकिलरवे ! गुणवती, मनोवृत्तानुसारिणी, लावण्य स्त्री मिळाली असतां त्याचा संसार सार होतो.

शृंगारशास्त्ररसिका शशगावनेत्रा
लीलास्वतापहरिणी परिरम्यगात्रा
नाथव्रता प्रियतमा ललना जयाते
त्याचा द्वितीय वर आश्रम हो जयाते.[4]

प्रस्तुत नाटकाच्या रचनेचा सर्व थाट तात्यांच्या भाषांतररूप संस्कृत नाटकांचाच आहे. सूत्रधार-नट ही जोडी येथे आहे. परंतु नटाचे म्हणजे विदूषकाचे अचरट चाळे व हास्यरसोत्पादक वाक्प्रलाप येथे मुळीच नाहीत. पौराणिक विषयावरील स्वतंत्र रचना म्हणून या नाटकाचे महत्त्व अर्थात आहेच.

### 'श्रीभिल्लिणी' नाटक

नल नाटकाप्रमाणेच विनायकशास्त्री नातूंचे हेही नाटक बोधप्रधान आहे. "ह्या ग्रंथांत पातिव्रत्याचा बोध फार केला आहे," असा उल्लेख प्रस्तावनेत स्पष्टच

१. नल-नाटक (१८६२), प्रस्तावना, पृ. ९.
२. नल-नाटक, अ. ४, प्र. ३, पृ. ७७.
३. तत्रैव, अं. ३, प्र. २, पृ. ४९.
४. तत्रैव, अं. ३, प्र. २, पृ. ४७–८.

आहे. शिवलीलामृताच्या चौदाव्या अध्यायात आलेल्या शिवपार्वतीच्या कथेवर या नाटकाची रचना केली आहे. प्रस्तुत नाटक जरी विशिष्ट हेतूसाठी लेखकाने लिहिले असले, तरी या काळातील नाटकांत आटोपशीर व बांधेसूद संविधानकाच्या व पात्ररचनेच्या दृष्टीने हे नाटक विशेष लक्ष वेधणारे आहे. द्यूतात हरून व पार्वतीवर रागावून शंकर तपोवनात जातो, तो शिवतपोवनप्रवेशाचा पहिला अंक, दुसरा शिवतपोवनत्यागाचा, व तिसरा शिवगृहप्रवेशाचा. यात मुख्य पात्रे दोनच : शिव व पार्वती. शिवपार्वती हे जरी ' जगतः पितरौ ' असले, तरी येथे त्यांचे चित्रण काम, मत्सर, प्रीती इत्यादींनी युक्त असलेल्या सामान्य माणसाचे प्रतिनिधित्व करणारे, असेच करण्यात आले आहे. त्यामुळे प्रेमाच्या व कलहाच्या, खट्ट्यामिठ्या कौटुंबिक रसात रस घेणाऱ्या सर्वांना ही मानवी वाटणारी कथा आवडावी, अशीच आहे.

त्या वेळच्या नाटकांत रंगभूमीच्या इतर सजावटीपेक्षा भूतप्रेतयक्षसुरासुरादी योनींतील सोंगांची सजावट करून त्यांच्या आगमनिर्गमांचे प्रभावी प्रसंग रंगभूमीवर सादर करण्यावर एकंदर अधिक भर असावा असे दिसते. " वाद्यघोषांनी युक्त भूतगणांचा कोलाहल विक्राळ शब्दाने दशदिशा तुमुल करीत श्रीगिरिजाशंकराची स्वारी सभास्थानीं " येण्याचा देखावा हे या नाटकाचे एक आकर्षण असावे. या संदर्भात नट सूचना करतो —

**नट** – हे सभासद हो, सावधान, सावधान. श्रीभिल्लिणी-नाटक-रंगमंडपीं परमेश्वराची स्वारी येत आहे; पण सांवरून बसा. अबलांहो, आपलीं वत्से पोटाशीं कवळून धरा. ईश्वराची स्वारी कडकडीत येत आहे. यास्तव बालके कदाचित भीति पावतील, म्हणून सूचना करतों बरे, ऐकिले काय ! [१]

पहिल्या अंकातील सहाव्या प्रवेशात पार्वतीचे चित्र म्हणजे केवळ प्रेमासाठी दारिद्र्य पतकरून पतीबरोबर राहणाऱ्या खऱ्या मानवी प्रेमिकेचेच चित्र आहे. " लेणे लुगडें दैवाधीन आहे, परंतु स्वामीची मात्र प्रीति असावी, म्हणजे स्त्रियांच्या जातीला सर्व सौख्य. " असे सखीने म्हणताच पार्वती लगेच म्हणते, " बाई ते मात्र सुख खरें...त्या प्रीतीमुळे संसारांत दंग आहे. " परंतु सारीपटाच्या खेळात पार्वतीने जेव्हा नंदी, चंद्र इत्यादी सर्व काही हरून घेतले, तेव्हा ही पुरुषाची अमर्यादा समजून शंकर डोक्यात राख घालून तपोवनाचा मार्ग धरितो. परंतु खरी प्रियतमा पार्वती " शिवावीण सर्व शीण सदा वाहुं किती गे " [२] असे म्हणून शिवशोधाला जाते. नाटककाराने सूत्रधारी पद्धतीला धरून नाटकाचा बराचसा भाग कवितारूपाने निवेदिला आहे. भिल्लिणीचे म्हणजेच वंचकरूपधरा पार्वतीचे अभंगात केलेले वर्णन पुढीलप्रमाणे —

१. श्रीभिल्लिणी, अं. १, प्र. ३, पृ. १०.
२. तत्रैव, अं. २, प्र. २, पृ. ३२.

शंभुशोधासाठि रूपांतर करी. भिल्लिणि ती गौरी झाली तेव्हां.
केश उफराटे फिरवोनी बांधी, वनपुष्प साधी शोभा बरी.
कुंकवाचा भाळीं भरि मळवट, काजळ ते दाट नेत्री शोभे
करिं कंकणाचि दाटी खळखळे, चरणांत वाळे वाजताती.
निऱ्या फिरवोनी, कच्छ घालीतसे, कंचुकीचें तसे बिर्डें मागें.
वनपुष्पपल्लवांचे अलंकार, घाली अंगावर भिल्लिणी ती.[१]

अशी ती पार्वती जोगी राग आळवीत शिवाच्या शोधास जाते.

**गिरिजा** (वंचकरूपधरा)— आतां येथेंच मी गायन करित्यें, म्हणजे त्याचा सुस्वर श्रवण करून, तो गायनप्रिय आहे यामुळे वेध पावून खचितच येईल.

**सखी** — त्यास वेध करणारा, असा कोणता राग गाशील बरे ?

**गिरिजा** (वंचकरूपधरा) — जोगी रागिणीचे गायन करित्ये.

**सखी** — जोगी रागिणी गाण्याचा हेतू कोणता ?

**गिरिजा** (वंचकरूपधरा)— हे सखे ज्याच्यापाशीं दूतत्व करण्यास कोणाला पाठवणे असेल त्याच्या सम-जातीचा दूत अथवा दूती असावी; म्हणजे तो असेल तेथें त्याचा प्रवेश होतो. शंकर क्रोधोपाधीनें जोगी झाला आहे; मीहि त्याच्या विरहाने जोगी आहे. त्याजकरितां जोगी रागिणी हिची योजना केली. ती तज्जातीय आहे, म्हणून तो जोगी शंकर जेथें असेल त्या स्थानीं ती प्रवेश करून त्यास मोहित करील. मग ती त्यास येथें आणील.[२]

आणि मग

सवे सर्सावोनी पदर, नदरही वक्र लावी सुवक्त्रा,
वदे मंजू वाणी मदन भर नता; दाउनी स्पष्ट गात्रा,
फिरे विद्युज्जेवी, छुपक छुपक ती वाजवी पैजणांते,
सलज्जा भिल्लिणी तरल करि मनी मोहुनी शंकराते,[३]

साहजिक शिव या रूपाला भाळला. या प्रसंगी पार्वतीने पतिव्रता धर्माचा श्रेष्ठ महिमा गाऊन शिवाच्या मागणीला झिडकारिले आहे. 'गिरिजा शिरजोरपणाने वागत्ये म्हणून तिचा त्याग' करण्याचे कारण सांगणाऱ्या शिवालाही ती चांगलीच फटकारते. परंतु शेवटी शिव चांगलाच वठणीला आलेला पाहून भिल्लिणी म्हणजे पार्वती आपले सत्य रूप प्रकट करते व शेवटी शिवपार्वतींचे मीलन होते.

हा कथाभाग जरी पौराणिक असला, तरी त्याचें चित्रण सर्व मानवीच झाले

१. श्रीभिल्लिणी, अं. २, प्र. ५, पृ. ३८.
२. तत्रैव, अं. २, प्र. ५, पृ. ४०.
३. तत्रैव, अं. ३, प्र. २, पृ. ५१.

आहे व म्हणून एकंदर नाटक हृद्य झाले आहे. नृत्य, संगीत, देखावे इत्यादींमुळेही हे नाटक आकर्षक बनले आहे. निवेदनपद्धती मात्र जुनी असून भाषा थोडी संस्कृतप्रचुर झाली आहे.

**'मेधावती-परिणय'** (१८६३)

प्रस्तुत नाटकाचे कथानक जैमिनी-अश्वमेधातील आहे. 'सोमवंशी उत्कंठित राजाच्या मेधावतीनामक कन्येनें स्वेच्छेनें ब्राह्मणाशीं विवाह केला आणि तिला अकालीं भोगेच्छा होऊन ऋषीवर बलात्कार करून तिणे संभोग केला; तेव्हां ऋषीनें तीस शाप दिला त्यायोगें राक्षस पुत्र झाले अशी कथा' असल्याचे लेखक[1] प्रस्तावनेत सांगतो. या नाटकात संवाद नाहीत. सारे निवेदन लेखकानेच (हरिदासाप्रमाणे) गद्यपद्यात केले आहे. उदा.

मेधावतीस कामाची पीडा प्रबळ झाली होती आणि ऋषी तर काही बोलत नाहीत, खुणेने नाही म्हणतात, म्हणून ती मोठ्या उत्कठेने त्यांच्या जवळ जाऊन आणखी बोलते —

पुनश्च बोले मेधावती पति गति माझि न पाहातां
खुणा करुनियां नाहीं म्हणता पुरे कर्म हे आतां
बोलुनि ऐसे सन्निध जाउनि गळा घालुनी हात
लोळविला बहु सुमित्र ऋषि तो निजतृप्त्यमृतरसांत
होता संगम गर्भ राहिला वाढे मासोमास
दशम पावतां प्रसूत होउनी पावे तीन सुतांस

त्या अमोघवीर्य ऋषीवर अकाळी आणि त्याची इच्छा नसताना मेधावतीने त्यावर बलात्कार केला म्हणून त्याने शाप दिला की, तुला राक्षस पुत्र होतील.[2]

सूत्रधारी किंवा कीर्तनपद्धतीच्या निवेदनशैलीच्या नाटकाचा नमुना म्हणून हे नाटक लक्षणीय आहे. शेवटी मेधावतीपासून निर्माण झालेल्या सर्वांत बलिष्ठ पुत्राचा म्हणजे सिंहकेतूचा नुकत्याच जन्मलेल्या पाळण्यातील पोराने कसा वध केला, इत्यादी कथाभाग आला आहे. शेवटी 'आरती' होऊन कीर्तनाप्रमाणेच हे नाटक समाप्त होते. पौराणिक नाटकाचे खरे मूळ हे हरिकथेतच असल्याचा पुरावा अशा नाटकांतून सहज जमविता येण्यासारखा आहे. आणखी एक ऐतिहासिक महत्त्वाची गोष्ट या नाटकात आलेली आहे, ती अशी —

**सूत्रधार** — अहो सभ्य हो, पूर्वकालीं कालिदास, भवभूति, नारायणभट्ट, श्रीहर्ष, कंसविध्वंस नाटककर्ता अनर्घ्यराघवकर्ता इत्यादी महापंडितांनी मधुररसपूर्ण अशी अनेक नाटके केलीं — आणि

१. लक्ष्मण गोपाळ दीक्षित.
२. मेधावती-परिणय, पृ. १०.

अलीकडे श्रीमंत आप्पासाहेब सांगलीकर यांस या कामाची इच्छा होऊन त्यांणीं अलीकडे हे कृत्य उत्पन्न केलें, तेव्हांपासून नाटक हा शब्द आबालवृद्धांच्या समजुतींत आला.[१]

"कै. विष्णुदास कवींनी आपल्या कृतीनें जें स्थित्यंतर केलें त्यांतील पहिलें स्थित्यंतर नामकरणाचे होय." हे आ. गुरुजी यांचे वाक्य या संदर्भात स्मरणात येईल.[२]

हरिदासाप्रमाणे मागेपुढे फेऱ्या मारणाऱ्या सूत्रधाराचा व विदूषकाचा संवादही तत्कालीन विनोदाची कल्पना देणारा आहे.

**विदूषक** — नाटक करितां काय ? बरें आहे, पण नाटक करणार ते मागें-पुढें गेलें आलें म्हणजे होते, किंवा ते याहून कांहीं निराळें आहे ?

**सूत्रधार** — तुला ठाऊक नाहीं काय ? तर मग इकडे ये, तुला सांगतों... मेधावती-परिणय नाटक करितो, समजलास काय ?

**विदूषक** — ( हाँ हाँ समजलो ) परिणय करण्याकरिता मे धांवती म्हणतोस तर मग तुझेंच धावल्यावर माझें कां धाऊं नये बरे ?

**'रुक्मिणी-हरण'** १८६५

दीक्षितशास्त्री सातारकरांचे हे दुसरे नाटक आकाराने खूपच मोठे, तीन-अंकी तेवीस प्रवेशांचे व शिळेच्या १४० पृष्ठांचे आहे. यामध्ये सूत्रधारी निवेदनाची शैली टाकून देऊन त्यांनी नाटक-रीती म्हणजे संवाद-पद्धती स्वीकारिली आहे. मात्र हे सर्व नाटक म्हणजे एकनाथांनी लिहिलेल्या 'रुक्मिणी-स्वयंवर' या ओवीबद्ध ग्रंथाचे 'नाटकरीत्या कथानक-कथन' असल्याचे लेखकाने प्रारंभीच सांगितले आहे. त्यामुळे मधून-मधून एकनाथांच्या ओव्याही त्याने उद्धृत केल्या आहेत. स्वयंवर, विवाह इत्यादी विषय आधी लौकिक व विशेषतः लोकाना प्रिय. त्यात पुन्हा याविषयास एकनाथांनी आध्यात्मिकतेची अभिनव डूब दिलेली. विवाहमंगलाचे सर्व लौकिक सुखसोहळे प्रत्यक्ष या नाटकात आलेले आहेत. विविध रागरागिण्यांत ग्रंथकर्त्याने पदेही करून घातली आहेत. बलरामाच्या तोंडी घातलेले पुढील पद राग-तालांच्याही दृष्टीने यथोचित असल्यामुळे सहजच वीररसाचा उत्कर्ष करणारे उतरले आहे —

सर्व वीरासवें रेवतीरमण तो
भावि क्रोधाग्निला करितसे धमन तो
ग्रामिं आला करीं धरुनि नांगर हला
फार प्यारी जगीं एक जाली हला
ऐकुनी चित्र वादित्रकोलाहला

---

१. तत्रैव, पृ. २.
२. नाटकाचीं स्थित्यंतरे, रंगभूमि, वर्ष ४, अं. १३, पृ. ५.

अंबिकालयिं अला शूर गाढा भला.[1]

शेवटी कीर्तन-पद्धतीप्रमाणे सूत्रधाराने उपदेश केला आहे --

तराया नरा धर हरा चित्तदेशीं

जरा स्वस्थ हो तूं खरासारिखा कां पावशी देशदेशी !

सातारकर असूनही वरील उपदेशाप्रमाणे ग्रंथकारही 'दीक्षोतोपाह्व गोपालभू लक्ष्मणहि भजनयोगें गणीं पुणें हीच काशी' असे सांगून पुणेकर बनला आहे. शेवटी आरती म्हणून सर्व जातात. संविधानकरचना, संवाद, विविध रसोत्कर्ष या दृष्टींनी प्रस्तुत नाटक फारसे महत्त्वाचे नाही. कारण जुन्या मराठी कवितेतील भक्तिरस फक्त येथे नाटकरीतीने वठविलेला आहे, एवढेच.

**अभ्यंकरकृत 'हरिश्चंद्र-सत्त्वदर्शन' (१८६५)**

हे सूत्रधारी पद्धतीचे म्हणजेच कीर्तनाख्यानवजा नाटक. पुण्यश्लोक राजा हरिश्चंद्र याचा 'सत्त्वदर्शनरूप लीलानुकार' या नाटकात आहे. त्याचे सर्व चरित्रच येथे आलेले आहे. त्यामुळे ही एक कथा झालेली आहे. ग्रंथकर्त्याने रसांची योजना केली असली, तरी ते नाटक होऊ शकले नाही. पौराणिक व्यक्तींची थोरवी, त्यांनी सर्वस्व पणाला लावून टिकविलेले आपले सत्त्व यांबद्दल धार्मिक वृत्तीच्या वाचकाच्या मनात आधीच आदर व भक्तिभाव वसत असल्यामुळे नाटककाराला नुसते कथारूप व थोडेफार गद्यपद्ययुक्त निवेदन करून हुकमी रस साधता येणे सहज शक्य असे. 'सत्त्वदर्शन' नाटकाचा एक वेगळाच गट कल्पिला, तर त्यात याच कालखंडात लिहिलेल्या रा. बा. लेलेकृत 'श्रियाळचांगुणा-सत्त्व-दर्शन' (१८६९), वा. वि. बापटकृत 'भद्रायु-सत्त्वदर्शन' (१८७७) या नाटकांचा समावेश हरिश्चंद्र-सत्त्वदर्शन या नाटकाबरोबर करावा लागेल. वास्तविक मुक्तेश्वर, श्रीधर इत्यादी रसाळ पुराणाख्यान-कवींनी ही आख्याने आधीच लोकप्रिय करून ठेविली होती. त्या लोकप्रियतेचा फायदा घेऊन नाटककारांनी त्यांची नाटके बनविली.

अशा नाटकांमधून एकच रस इतका वाढवीत-वाढवीत नेलेला असतो की, पुढे त्याचा अतिरेक होऊन प्रसंगी शिसारी वाटू लागते. चिलयाचे आख्यान म्हणजे बीभत्स दृश्यांची चढती मालिकाच. भद्रायु-सत्त्वदर्शनात तेच आणि हरिश्चंद्राच्या चरित्रातही तेच. परंतु भाविकतेचा, श्रद्धेचा, परमेश्वरनिष्ठेचा पक्का बांध प्रेक्षकांच्या बुद्धीला नित्याचाच घातलेला असल्यामुळे हे अतिरेकी रसही त्यांच्या दृष्टीने कधी वाहवले नाहीतच. आजचा वाचक-प्रेक्षक निराळा झाला आहे. तात्यासाहेब केळकरांसारखा साहित्यकार या कथांच्या प्रवाहाला थोडी कलाटणी देऊन त्यांचे सुंदर विनोदपर्यवसायी नाटक बनविण्याची इच्छा करितो.[2] शिवाय, असल्या अतिकरुण

---

१. रुक्मिणीहरण, अ. २, प्र. १, पृ. ५३.

२. काव्यदृष्टी, पृ. २०९, समग्र केळकरवाङ्मय, साहित्य-खंड.

नाटकात प्रतिवेळी विदूषक व सूत्रधार या दुकलीची हास्यकारक ( हास्यास्पद ?) बडबड चाललेलीच, हा रसरंग की रसाच्या अजीर्णापासून बचाव, की दोन्ही ?

या जुन्या नाटकात काही मौजेचे संकेतही पहावयास मिळतात. तारामतीच्या तोंडी नाटककाराने एक हिंदुस्थानी साकी घातली आहे. रोहिदासाचे रक्षण करण्यासाठी ती सर्वांना विनविते —

सब जीवनकु बिनोती सुनिये धरतरि मैया
ओ मेरा नहि पूतु तुम्हारा सब मिल रछें कन्हैया.
ओ ब्रिच्छनजी, ओ सरिताजी, सब मिल मेरा पुत
रछन करीये अपने पावपर डाग है अवधूत ![1]

पुढील संवादात नाटककाराने 'पंचभाषाविलास' कसा साधला आहे, तो पहावा. मुलाचे प्रेत घेऊन बसलेल्या तारामतीस मुले खाणारी लाव ठरवून नगरातील स्त्रिया तिची हेटाळणी करीत असतात, त्या वेळचे हे दृश्य आहे.

**मरा. ना. ( मराठी नारी )** — होय हीच. मी पक्की ओळखली. परवा त्या सावकाराचें मूल इणेच मारलें असावें.

**शूद्र ना.** — छये छये छये ! !! काय त्वोंड, काय हात, आन काय ड्वोळं दिसत्येती ! आपली त बगन्यास सत्तीच व्हायली नाही.

**ब्रिज ना.**— ओ हो ! क्यो सैतान है. गावमे जिते लरके मृत हुए वे सब इन्ने भी खाए क्या ? अब मेरे दिल मे तो ऐसाभि आता है की सब लरकेका काल सो यही सैतान है.

**संस्कृ. ना.** — दृष्टा दृष्टा. कीदृक् स्वरूपमिदं, ययापि निखिलनागरबालानि भक्षितानि, नहि यायापि खलु.

**का. ना.** इको नोड द्या ! मंनि न दिवसा इन्निनें बंदु सावकार दडुग्रु तिदिदाळु हंग तोरतदे. नोडो, इकिबाई. वळे केट्ट इधाळे.[2]

अभ्यंकरशास्त्र्यांच्या विराटपर्वात कीचकवधाचा कथाभाग आलेला असून त्याची 'नाटकरीति' त्यांच्या वरील पौराणिक नाटकाप्रमाणेच आहे

**अनंत दीक्षित-जोशी चिपळोणकरकृत 'गौरीहर विनोद' ( १८७१ )**

श्रीभिल्लिणीप्रमाणेच विदग्धशैलीत लिहिलेले असे हे स्वतंत्र पौराणिक नाटक आहे. हे नाटक अनेक दृष्टींनी लक्षणीय ठरले आहे. येथील कथानक जरी पौराणिक असले, तरी लेखकाने शिव, पार्वती, गंगा यांच्या व्यक्तिरेखा शंभर टक्के मानवी रंगविल्या आहेत. शिवाचा लहरी नादिष्टपणा अशाच एका प्रसंगी सहन न होऊन पार्वती त्यास चिडून क्रोधाविष्ट होऊन बोलते. अर्थात शंकर वैतागाने बाहेर पडतो. या

१. हरिश्चंद्रसत्त्वदर्शन, अं. ३, प्र. १, पृ. ६१.
२. हरिश्चंद्रसत्त्वदर्शन, अं ३, प्र. ६, पृ. ९६.

संधीचा फायदा घेऊन नारदाने भोळ्या शंकराला पार्वतीविरुद्ध भरवून देऊन तो त्याचा गंगेशी विवाह लावूनही मोकळा होतो. पुढे पार्वतीवरचे शंकाराचे प्रेम लक्षात येऊन गंगेलाही मनस्ताप होतो. इकडे शंकरालाही पार्वतीच्या भेटीची तळमळ लागते. शेवटी गंगेची समजूत घालून तिला डोक्यावर धारण करून शंकराची स्वारी पार्वतीकडे येते व तेथेही पुढे संघर्ष फारसा कडेलोटाला न पोहोचविता "मला गंगाही सारखीच, तूंही सारखीच. माझ्या येथे भेदभाव नाही," इत्यादी सांगून शंकर पार्वतीची समजूत पाडतो व दोन्ही स्त्रियांसह सुखाने राहू लागतो.

हे कथानक दिसावयास साधे असले, तरी नाटककाराने विदूषक आणि नारद या दोन पात्रांच्या साहाय्याने सबंध नाटकभर एक मोठे विनोदी, खेळकर वातावरण निर्माण करण्यात यश मिळविले आहे. विनोद निर्माण करणाऱ्या विदूषकाचा मूळ पूर्वज नारद असावा, हे या आख्यानावरून चागलेच पटू लागते. येथे विदूषकही नारदाबरोबर सबंध नाटकात एक पात्र म्हणून वावरतो. शंकराशी, गंगेशी, पार्वतीशी, सर्वांशी बोलतो. या नाटकाचे अंक जरी आठ असले, तरी अंकांत प्रवेश असे नसल्याने नाटक तसे आटोपशीर व सुटसुटीत आहे. अर्थात याहीपेक्षा रेखीवपणा अंकांच्या रचनेच्या संदर्भात लेखकाला आणिता आला असता. लेखकाने नाटकात आपली विदग्ध वृत्ती जागोजाग दाखविल्यामुळे अनेक ठिकाणी काव्य आणि नाटक यांचा संकर झालेला दिसतो. परंतु लेखकाचे हे वैदग्ध्य रंजनकारक असल्यामुळे तोही या नमुनेदार नाटकाचा एक अविभाज्य अंशच बनून राहिला आहे. विदूषक आणि सूत्रधार यांच्यातील प्रारंभीचाच संवाद पहावा. कीर्तनकाराच्या पूर्वरंगातील वृथा पांडित्यपूर्ण भाषेप्रमाणे ती जरी काहींना वाटली, तरी त्या काळातील सभ्यांना ती खास आवडणारीच होती. मनुष्यमात्राने आत्मकल्याण कसे साधावे, याविषयी विदूषक आपले मत सांगतो —

**विदू०**—( बहुतवेळां मान डोलावून ) 'वाहवा ! भले महाराज सूत्रधार ! आतां माझे विचार ऐका. मनुष्याने एक **निमेष**मात्र **वृषा**वांचून वागूं नये. आतां जे कोणी **मिथुन**-भावानेच तुष्ट होत्साते वागतात, त्यांणीं हे आत्मघाताचें कारण **कर्क**शत्व सोडावें आणि **सिंहाहू**नहि अति उग्र जो मृत्यु तो कधीं तरी आपणांवर झडप घालणार, असा विचार करावा. तसेच **कन्या**-दान, **तुला**-दान इत्यादि कर्म सर्वथा संसार -**वृश्चिक**-व्यथा दूर करणारे नव्हे असे समजून परमेश्वराचे नाम हेच **धनुष्य** घहून आणि त्याचे ध्यान हाच तीक्ष्ण शर त्या धनुष्याला लावून, आपण शाश्वत सुखाचा समुद्र असतां त्यांत घुसलेला जो अज्ञान-**मकर** याचा नाश करावा आणि असे मनांत आणावे की, ज्यांचे अंतःकरण या विचाराकडे पाठ करून दुष्ट विषयाला कवटाळण्याकरितां धावेल तो मनुष्य कोरड्या **कुभांत** कोंडलेल्या

**मीना**प्रमाणें निरंतर तरफडणार नाहीं काय ?[1]

नाना तऱ्हेचे कृत्रिम खटाटोप करून आपल्या भाषणात राशिनामे गुंफण्याचा हा उपक्रम नमुना म्हणून लक्षात ठेवण्यासारखा आहे. याचबरोबर त्या काळच्या प्रासबद्ध कृत्रिम गद्यशैलीची उदाहरणेही यात भरपूर आहेत. विदूषकाच्या विनोदी भाषणांना ही शैली अर्थातच पोषक ठरली आहे. विदूषक शंकरास म्हणतो :

**विदू०** — अहो महाराज, आपणांस महाकुलीन राजाची कन्या हे कुटुंब मिळाले आहे आणि आपले राहणेही अगदी एकीकडेस या पर्वताच्या शिखरावर; यामुळे आपणांस बायकांचे चरित्र पुरतेंसे माहीत नाहीं असे वाटते. अहो, डोईतील फुलांस हिऱ्यांच्या पाकळ्या आणि पायांत चांदींच्या साकल्या, बसायास रुप्याचा पाट आणि जेवावयास जडावाचे ताट, खर्चावयास पैक्याची धार आणि गळ्यात नवरत्नांचा हार. जेवणांत मसाल्याच्या वासाचा घप्का आणि नाकांत नथेचा झप्का. असे जर नवरा देईल तर मग त्याणे ऊरात धप्का बसण्याजोगा पाठीवर रप्का मारणे इत्यादि कितीही अप्कार केले तरी त्याजवर त्या टप्का ठेवीत नाहीत आणि ( दोन्ही मनगटांस, गळ्यास, नाकास हात लावून ) हे नसून उगीच यजमान म्हणून जर दप्कावील, तर त्याच्या सर्वांगीं शेणाचा भप्का येण्यासारखा शेणकाल्याचा हप्का बसेल, चप्कर्शी पोतेऱ्याचा लप्का मारण्यास आळस करणार नाहीत, हे पक्के समजावे. असा स्त्रियाच्या प्रभावाचा मासला ज्या पुरुषांच्या मनांत ठसला आणि सर्व जनसमुदाय हासला तरी असल्या बायकोवर विश्वास ठेवून जो बसला, तो वेडा नसला आणि कसाही बुद्धिमान् असला, तथापि फसलाच फसला असे समजावे.[2]

प्रस्तुत नाटकातील विदूषकाने आपल्या कुरूप स्त्रीची केलेली व्याजस्तुती पाहता तो गडकऱ्यांच्या भावबंधनातील इंदुबिंदूंची टवाळी करणाऱ्या कामण्णाचाच पूर्वज वाटतो.

**विदू०** — पहा बरे गौरीबाई, तुमचें तर सारेच अति उत्तम, परंतु मी हा आसला पांढरा परीस कीं नाहीं ? आणि माझी प्रिया तर केवळ कुटकीचा शिळा काढा ! अहो, ती गोरी इतकी आहे कीं तिला काजळाच्या पर्वतावर ठेविले तर त्या पर्वताने आपल्या उजळपणास कोणाची दृष्ट होईल म्हणूनच जणु का कपाळी तीटच लावली आहे अशी दिसेल, आणि तिचे रूप तरी काय वर्णूं ? माकडबोकडांचा खेळ करून दाखविणारे नीळहि बाळगतात. त्यांणीं कदाचित् ती पाहिली तर निःसंशय धरून

१. गौरीहरविनोद, अंक १, पृ १२.
२. तत्रैव, पृ २९–३०.

नेतील या घसघशीनें मी कधीहि तिला घराच्या बाहेर पडूं देत नाहीं."[1]

एकंदर नाटकाचा थाट विनोदी प्रसहनात्मक असल्यामुळे गंगेच्या विवाहाच्या वेळी जमलेल्या भिक्षुकांच्या संवादातही लेखकाने खूप विनोद आणिला आहे. ढकल-कल्याणीभट ढमढेरे पंढरपूरकर आणि अवघडनाथंभट मांडवगणे पांडवगडकर अशी 'किंचित् लंबपुच्छ' नावे असलेल्या भिक्षुकांचा प्रवेश गमतीदार उतरला आहे. या लग्नाच्या निमित्ताने लेखकाने थोडी सामाजिक टीकाही विदूषकाच्या विनोदी भाषणाच्याद्वारे केलेली आहे. गंगेच्या लग्नाच्या निमित्ताने विदूषक नारदाला वराचे म्हणजे शिवाचे वय विचारतो. कारण त्याला विवाह-सामग्रीची यादी करावयाची असते. त्या वेळी

**नारद** – अरे, पण वयाशीं आणि यादीशीं काय संबंध ?

**विदू०** – तरुणापेक्षां वृद्धाचे लग्नाच्या यादीत दोन जिन्नस अधिक लागतात.

**नारद** – ते कोणते रे ?

**विदु०** – अहो नव्या रक्ताची वधू तारुण्याच्या वाढत्या अवस्थेत असायचीच, तेव्हां तिच्या मुठींतून सुपारी ओढून काढण्यास एक सांडस आणि विडया तोडण्यास कोयता.[2]

'पुराणांतील केवळ गोष्ट मात्र घेऊन तिजवर नाटकाचा सारा नवा घाट' रचिल्याचे जे लेखकाने प्रस्तावनेत सांगितले आहे, त्यावरून त्याचा हा नवा घाट खरोखरच चांगला साधला आहे, असेच म्हणावे लागेल. कैलासपर्वताच्या पार्श्वभूमीवर हे सबंध नाटक रंगते. प्रारंभीचा अंक सर्वच दृष्टींनी बहारीचा आहे. अति-मोहक असा विलासवेष धारण करून पार्वती शंकराच्या सान्निध्यात बसली आहे. त्यांचा शृंगार रंगू लागतो न लागतो, तोच 'हरहर' असा नामघोष करीत शिवदर्शनासाठी देवगण येतात. या वेळी विलासवेषयुता पार्वती लाजून आत जाते. परंतु "पार्वती, हे देव आपलीं लेकरें आहेत. यांस लाजण्याचे कारण नाही. तूं तशीच बाहेर येऊन विविध विलासांनी मला संतोषावेस," अशी शंकर आज्ञा फर्मावितात. त्यावर पार्वती असंमती प्रकट करून निघून जाते. झाले ! एवढी गोष्ट त्या क्रोधी शंकराला पुरली. नारदाने व विदूषकाने त्यास आणखी चिडवून गृहत्याग करावयास लाविले

नारदाने शंकराचा विवाह गंगेशी लावून दिला. परंतु पार्वतीच्या प्रेमाने शंकर पुन्हा व्याकुल झाला. गंगा-शिवसंवादात लेखकाने एक छेकापन्हुती घातली आहे. ती रामजोशांच्या छेकापन्हुतीची आठवण करून देणारी आहे.

प्रस्तुत नाटकातील पदे संस्कृतप्रचुर असली, तरी संगीतातून योग्य तो रस पुष्ट करण्यास उपयुक्तच ठरली आहेत. त्या दृष्टीने पुढील पद पहावे —

१. गौरीहरविनोद, अंक ७, पृ. १९३–९४.
२. तत्रैव, अंक ४, पृ. १०२.

(तांडव नृत्याचें पद)

**नार.** – अक्षिहुतस्मर दक्षसवाखिललक्षितपौरुष सांब–शिवा
सांब-सदशिव, सांब-सदाशिव, सांब-सदशिव, सांब-शिवा
भालकलाधर नीलगलाजक-पालललामित सांब-शिवा
शूलधरोरगमालतृणीकृत, काल, परात्पर सांब-शिवा
त्र्यक्ष निजाश्रितपक्षसुरक्षक, यक्षपहितकर सांब-शिवा

'सुकलेल्या हळकुंडाप्रमाणे जिचे हातपाय' कृश झाले आहेत अशा पार्वतीकडे शंकर येतो. तेथील संवाद किंवा छेडछाड संस्कृत विदग्ध शैलीला अनुसरून अगदी सांकेतिक आहे. शरिरावर फडकणाऱ्या संभोगचिन्हांबद्दल पार्वती जेव्हा शंकराची हजेरी घेऊ लागली, तेव्हा शंकरही टराविक पद्धतीची लपवालपवी करतो.

फुंकितां शंख हे चिन्ह ओठीं उठे, मारिले शिगटें कटिस बैलें ॥ अंगिंही
परिमला भक्तसघें दिले, नाचतां व्रण पिशाचानि केले ॥ तुला टाकुनी
म्यां दुजी नाहिं कांता केली तूं मानिशी कां सुखांता? [१]

सारांश, प्रस्तुत नाटकात सर्वच दृष्टींनी काव्यशास्त्रविनोद भरपूर आहे. शंकर, पार्वती, गंगा हे सर्व अगदी मजेदार मानवी नमुने आहेत. सर्वतोगामी विदूषक व नारद ही पात्रे खूप नकला-विनोद करून हसवितात, रमवितात. कथानकात खरा संघर्ष शंकराच्या गंगेशी झालेल्या विवाहाच्या रूपाने उपस्थित होतो. ही सर्व परिस्थिती मात्र त्या भोळ्या, कोपिष्ट व कामारी असूनही कामाच्या आहारी जाणाऱ्या शिवाच्या स्वभावातून सहज निर्माण झालेली दाखविलेली आहे. खरे म्हणजे शिव गंगेसह पार्वतीकडे आल्यावर चकमक झडावयाला पाहिजे होती. परंतु 'गंगा शंकराला प्रिय आहे तर आपणांसही ती प्रिय,' असे समजून पार्वती तडजोड करिते. अर्थात पुराणांतरीच्या कथांमध्ये आणि तेही 'जगतः पितरां'च्या संबंधात आणखी पर्याय तो कसा सुचवावयाचा? शेवट तर आधीच ठरलेला व प्रेक्षकांना माहीत असल्यामुळे लेखकाने नाटक ठराविक पद्धतीने गुंडाळले आहे. परंतु हा असला काही भाग सोडल्यास एक निरामय करमणूक पुरविणारे चांगले नाटक, असेच या नाटकाबद्दल म्हणावे लागेल. आजही याचा प्रयोग झाला, तरी ते जुने असे वाटणार नाही.

**बजाबा बाळाजी नेने : 'सैरंध्री' (१८७५)**

हे द्वादशांकी नाटक 'स्वकपोलकल्पित' असल्याचे लेखक सांगतो. परशुरामपंत-तात्यांनी संस्कृतावरून केलेल्या मराठी भाषांतरात्मक नाटकाचा जो एक साचा बनविला, त्याबरहुकूम पण स्वतंत्रपणे हे नाटक रचिले आहे. मनोरंजनासह बोध व्हावा, ही दृष्टी नाटककर्त्याची असल्यामुळे बारा सारतत्त्वांचे दिग्दर्शन करण्यासाठी त्याने या नाटकात बारा अंकांची योजना केली आहे. 'सर्वगुणसंपन्नता, स्वधर्मरति,

१. गौरीहरविनोद, अंक ८, पृ. २०९.

सज्जन-पालन, खलदलमन, न्यायाचरण, नित्यानित्यवस्तुविचार, अद्भुत कर्म आणि अमानित्व या ज्या सृष्टिवर्तनकौशल्याच्या कला त्यांही युक्त जे भगवद्भक्त तेच परिणामी संपूर्ण सौख्याचे अधिकारी होऊन इहपरत्र धन्य होतात," (प्रस्तावना पृ. ६) हाच ध्वनी नाटकात सर्वत्र आहे.

संस्कृताच्या विदग्ध पद्धतीने या नाटकाची रचना लेखकाने केल्यामुळे यातील कवित्व कित्येक ठिकाणी क्लिष्ट व दुर्बोध वाटते लेखकाने कमलबंध, गोमूत्रिकाबंध, द्व्यर्थक इत्यादी आकृतिबंधही पद्यात आणिले आहेत; 'चित्रकर्म्यांचे कथानक चित्रकाव्यानें वर्णन करण्याचा' हर्षभारव्यादी महाकवींचा परिपाठ लेखकाने आदर्श मानिला आहे. अश्वगती, मणिमध्य, श्येनिका इत्यादि छंदांबरोबर, आर्या, साकी, दिंडी, कटाव, हरिनर्तन, सवाई हेही छंद त्याने योजिले आहेत. संगीतोपयोगी पदे आणि ठुमऱ्या यांचाही उपयोग त्याने केला आहे. संवाद व भाषा यांसंबंधी लेखक लिहितो, "शूद्रादि अज्ञवर्णांच्या स्त्रिया आपल्या भाषणांत म्हणी आणि प्रास यांचा फारच भडिमार करीत असतात; अशा भाषणांच्या अंगीं मनोभाव जागृत करण्याची विलक्षण शक्ति असत्ये, हें दाखविण्याकरितां दुसऱ्या अंकांत पाटविका आणि मालिनी यांच्या भाषणांची तशी रचना केली आहे, यांत सरळ वाक्य चालत असतां नियमित स्थळीं प्रास साधले आहेत." ( प्रस्तावना, पृ. ७ )

विदग्ध शैलीच्या फारच आहारी गेल्यामुळे प्रस्तुत नाटक फारच अवजड नि बोजड झाले आहे. लेखकाचे गुरू परशुरामपंततात्या यांच्या शैलीतला प्रसाद या रचनेत कोठेच नाही. शास्त्र, कला, व्यवहार, धर्म इत्यादी सर्व वस्तूंचा संग्रह आपल्या कृतीत करण्याच्या सर्वसमावेशक बुद्धीमुळे प्रस्तुत कृती नाटक न ठरता, बहुश्रुतता वाढविणारा एक पौराणिक पद्धतीचा ग्रंथ झाला आहे. यास धड काव्यही म्हणता येत नाही व नाटक तर नाहीच नाही. पुढील उदाहरणावरून वरील अभिप्रायाच्या सार्थतेची काही कल्पना येण्यासारखी आहे—

**सैरंध्री** – ( धर्मभीमाकडे तिर्यग्दृष्टि देऊन निषेधपूर्वक ) शिव शिव ! काय अनुचित उत्तर हे. राजा ! हा न्याय इच्छिणारी स्त्री येथें आलीच नसती. पक्षपात-विचार सोड; धर्मविचार कर. अशा अप्रतिष्ठेची क्षति न बाळगणाऱ्या दाशीतली ही दासी नव्हे. हीनकुलवती ( ही नकुलवती ) असून कुलवती स्त्री आहे. ज्ञाता प्रयत्नकृद्भाषणाच्या अर्थात् अंतःप्रवेश करो या इच्छेनें पुनः विनंति करित्यें.

आर्या अर्थचतुष्टयवाची, गोमूत्रिकाबंध

या वामाक्षीविषयीं हे वामाक्षा तवाक्ष वाम न हो ॥
या वामाक्षाविषयीं हे वामाक्षा तवाक्षि वामन हो ॥ १ ॥

टीपेत या श्लोकाचा विराटपर अर्थ, धर्मपर अर्थ, भीमपर अर्थ, शिवपर अर्थ वेगवेगळा संकेतित केला आहे.

हर हर ! मी अंतर्बाह्य शुद्ध असतां —

श्लोक, गत-प्रत्यागत

हाय ! भूवर कां नकरा नया
हा ! नया लिकवालन राजया;
या जरा नलवा कलिया नहा
या नराक न का रव भूय हा !
कालिमा वदनालि कुनाम दे;
काय नाक मुका न हिता वदे;
देवता हि न कामुक नायका
दे मना कुलिना ! दव मालिका !

**विराट** – सैरंध्री ! जो मी केला तो धर्मन्यायच केला.

**सैरंध्री** - (संतापानें) शिव शिव शिव शिव ! राजा धडधडीत अधर्म करून धर्म म्हणतोस ! हाय हाय ! केवढा अन्याय ? कुशलेच्छुजनांहीं सर्वस्व अर्पून रक्षावा तो धर्म तूं आपल्या राज्यांतून नाहींसा केलास, केवढे घातक कर्म हे. पापासारिखा धर्मास दुसरा भयंकर रोग नाहीं. लक्षपूर्वक श्रवण कर—

श्लोक द्व्यर्थक

पापगदें जइं धर्म पडे मरणव्यसनीं
त्यास महागुणकार सुधाहि पडे पचनीं;
होय न जै त्रिदिवेशभिषक्सुकला सुखदा,
श्रीवनितावनि जिष्णु दडे गतधाम तदा.

इंद्राचीसुद्धां ही दशा, तेथें अन्याचा काय पाड ? सारांश, एका धर्मानें विपत्ति वारिली म्हणजे इतर महान् तेजस्वी पुरुषहि दुर्गतीस पात्र होतात.[1]

**नारायण दिनकर गोडबोले : 'गोपीचंद' (१८६८)**

नाथपंथी साधू जालंदरनाथ किंवा बंगालाधिपती राजा गोपीचंद ह्या पौराणिक व्यक्ती नाहीत; त्या ऐतिहासिकच होत. तरी नाथपंथातील सिद्धिचमत्कारांमुळे या व्यक्तींभोवतीही एक तऱ्हेचे पौराणिकतेचे वलय निर्माण होऊन बसले आहे. कारण ह्या ऐतिहासिक नाथसत्पुरुषांचा मूळ गुरू श्रीआदिनाथ म्हणजे स्वतः शंकरच असल्यामुळे शुद्ध ऐतिहासिक विचार येथे करताच येत नाही. शिवाय देवांच्या लीलां-बरोबर संतांच्या लीलांचे वर्णन करणारे भक्तविजय, संतलीलामृत इत्यादी महिपतिबाबा ताहराबादकरांचे जे रसाळ ग्रंथ झाले, त्यांमधून या संतांची चरित्रे दिव्याद्‌भुत अशा प्रसंगांसह वर्णिल्यामुळे या व्यक्ती भाविक-भाबड्यांना ऐतिहासिक वाटण्यापेक्षा पौराणिकच अधिक वाटू लागल्या. पण हे जरी खरे असले, तरी देवासुरांचे शुद्ध पौराणिक विषय बाजूला ठेवून, ऐतिहासिक व्यक्तींच्या जीवनावरील नाटके लिहिण्यात

१. सैरंध्री, अं. ५, पृ. १४०—१४३.

येऊ लागल्यामुळे पौराणिक पद्धतीने का होईना जीवनातील वास्तवता आपोआपच नाटकात रंगविली जाऊ लागली. मानवी स्वभावाचे जिवंत नमुने रंगभूमीवर त्या निमित्ताने दिसू लागले. 'गोपीचंद' नाटक विष्णुदास हिंदीत करीत असत. पौराणिक, पुढे निम-पौराणिक व निम-ऐतिहासिक, त्यापुढे शुद्ध ऐतिहासिक व त्यानंतर काल्पनिक व शुद्ध सामाजिक असा एकंदर नाटकाचा विषयाच्या दृष्टीने विकास कल्पिला, तर संत-जीवनावर मधल्या काळात केव्हा-ना-केव्हा तरी नाटके लिहिली जाणे अवश्य होते. गोपीचंदावरची नाटके, दामाजीवरील नाटके, एकनाथ-तुकाराम या साधूंवरील नाटके किंवा शांकरदिग्जय यासारखे शंकराचार्यांच्या जीवनावरील नाटक ही सारी नाटके ऐतिहासिक दृष्टीने नाटकाच्या विकासातील एक टप्पा आणि प्रवृत्ती दाखवितात, हे लक्षात ठेवले पाहिजे.

गोडबोले यांच्या गोपीचंद नाटकातील सूत्रधाराची उक्ती या दृष्टीने लक्षात ठेवण्यासारखी आहे—

हृदयीं आणुनि हेतू मी हो मानुष-लीला-कथना
विज्ञप्तीही करितां मी कीं जोडुनि हस्त जनां
देवांचा मी आजवरी हो महिमा वर्णन केला
मानव-करणी दाखवितों की वर्णुनि सर्व जनाला !

गोडबोले यांच्या गोपीचंद नाटकाचे अंक दोनच आहेत. परंतु पहिल्या अंकात सात प्रवेश असून दुसऱ्या अंकात बारा आहेत. नाटकाची एकंदर रचना सूत्रधारी पौराणिक नाटकाप्रमाणेच आहे. मराठी छंद, पदे भरपूर आहेत. परंतु गोपीचंद हा बंगालाधिपति आणि जालंदरादी नाथपंथीय साधू उत्तरप्रांतीय अशी कल्पना असल्यामुळे मधूनमधून संवादांत व पद्यांत हिंदुस्थानी भाषेचा संपूर्ण वापर केलेला आहे. विदूषकाच्या तोंडात व इतर पात्राच्या तोंडीही इंग्रजी शब्द सर्रास वापरले आहेत. तर राजाच्या तोंडी "हे सचिवेन्द्र, शृणु एतां वार्तां यो बहिः स्फोटयति, तस्यायुर्गतमिति जानीहि, तस्योत्तमाङ्गस्य च्छेदं करिष्यामि" अशली संस्कृत वाक्येही आली आहेत.[१] "कानिफाशिष्यसहित मैं आऊंगा बर जरूर कुछ दिनमे ॥ फिरता तेरे पुरमे कर शोक लेश मत मनमे"[२] असले हिंदुस्थानी कवित्वही अगदी सामान्य प्रतीचे आहे.

गोडबोले यांच्या नाटकाची प्रस्तावना तत्कालीन विचारसरणीच्या दृष्टीने विशेष महत्त्वाची आहे. १८६८-च्या आसपासच्या मध्यमवर्गीय शिक्षितांना इंग्रजी राज्य हा परमेश्वरी अनुग्रहच जणू वाटत होता. साधूचा एका राजावर झालेला अनुग्रह हा नाटकाचा विषय. त्याचे निमित्त साधून गोडबोले लिहितात, "या हिंदुस्थानांतील लोकांवर परमेश्वरकृपा झाली, आणि हरएकावर जगदीशानुकंपा होण्यास साधूचा

१. गोपीचंद, अं. १, प्र. ५, पृ. ५५.
२. तत्रैव, अं. २, प्र. ११.

अनुग्रहच पाहिजे असें ज्याप्रमाणें सर्व कल्पितात, त्याप्रमाणें ही उर्जित स्थिति थोडक्या काळांत प्राप्त होण्याविषयींचा अनुग्रह इंग्लिश सरकारचाच म्हटला पाहिजे. कारण या देशांत इंग्लिश लोकांचे राज्य फैलावल्यापासून, शहाणपणाच्या, युक्तीच्या, कारागिरीच्या व सर्वोपयोगी अशा गोष्टी ज्या पूर्वी एतद्देशीयांनी स्वप्नांतहि अवलोकन केल्या नव्हत्या, त्या सर्व सांप्रत केवळ निदर्शनासच आल्या आहेत अशी गोष्ट नाहीं, तर त्या वस्तु कोणत्या रीतीनें कशा हिकमतीनें सिद्ध होतात, ते ज्ञानहि बहुतेकांस प्राप्त झालें आहे. आणि उत्तरोत्तर नवीन प्राकृत, संस्कृत (गद्यपद्यात्मक) व भिन्न भिन्न भाषांचे ग्रंथ, आणि कित्येक प्रकारचीं नाटकेंहि उत्कृष्ट नवीन रचलेलीं अशा प्रकारचे ग्रंथावलोकन करण्याची आणि वाचण्याची अभिरुचि सांप्रत लोकांस होऊं लागली आहे. अशा प्रसंगांत आपण जर आपला लाभ न साधला आणि लोकांस प्रिय न झालों तर आपलें कर्तव्य कार्य न केल्याचा दोष आपणास लागेल, हा म्यां हेत्वर्थ मनांत आणून हा ग्रंथ तयार केला आहे." [1]

गोपीचंद याच विषयावर १८६९ सालात रावजी बाबाजी लेले यांनी लिहिलेले नाटक प्रसिद्ध झाले. याचे प्रवेशयुक्त चार अंक असून सर्व रचना पौराणिक पद्धतीची आहे. संस्कृत-मराठी वृत्तांचा वापर केलेला आहे. यापेक्षा या नाटकात लक्षणीय असे काही नाही.

**बलवंत पांडुरंग किर्लोस्कर : शांकरदिग्जय (१८७४)**

आपल्या शाकुंतल, सौभद्र इत्यादी कृतींनी संगीत-नाटकाचे नवे युग १८८०-नंतर महाराष्ट्रात सुरू करणाऱ्या अण्णासाहेबांचे हे पहिले गद्यनाटक अनेक दृष्टींनी संस्मरणीय ठरले आहे. आद्य शंकराचार्यांच्या विभूतिमत्त्वाची आणि त्यांच्या संन्यासमार्गाची एवढी छाप किर्लोस्करांवर जीवनभर होती की, संन्यास घेण्याच्या त्यांच्या अट्टहासामुळे त्यांना अकाली मृत्यू आला की काय, असे राहून-राहून वाटते.[2] जीवनाच्या अल्पावधीत ज्या आद्य शंकराचार्यांनी प्रचंड धर्मकार्य केले, त्याचा जीवनेतिहास व कार्य ही सर्वांना विदित व्हावी, म्हणून किर्लोस्करांनी सदानंद-स्वामींनी रचलेल्या शंकरविजय या संस्कृत ग्रथाचा आधार घेऊन प्रस्तुत नाटक रचिले. हा ग्रंथ नाटकरूपानेच का रचण्यात आला, याचे कारण सांगताना ते लिहितात की, "तशा प्रकारच्या वर्णनात शृंगारादि रस येतात, त्यामुळे अनेक जनांस त्याची गोडी लागून त्यांतील मुख्य जो आचार्यांचा इतिहास तोहि प्रसिद्धीस येईल." [3]

या नाटकाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे त्या काळच्या पौराणिक पद्धतीने लिहिलेले असे जरी हे नाटक असले, तरी या नाटकात पद्ये नाहीत, हे लक्षात ठेवण्यासारखे

१. तत्रैव, प्रस्तावना, पृ. १–२.
२. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे चरित्र, शं. बा. मुजुमदार, पृ. २१३.
३. शांकरदिग्जय, प्रस्तावना, पृ. १.

आहे. ज्या साक्या-दिंड्यांनी आणि पदांनी किर्लोस्करांनी रंगभूमीवर एक नवे युग पुढे १८८०-नंतर सुरू केले, त्यांचे पहिले नाटक संपूर्ण गद्य स्वरूपाचे असावे ही एक अनपेक्षित वाटण्यासारखी घटना आहे. परंतु यासंबंधी अण्णासाहेबांचे विचार सुस्पष्ट आहेत. ते लिहितात, "नाटक हे गद्यपद्यात्मक असणें योग्य आहे, परंतु मी हा ग्रंथ केवळ वाक्यरूपें करण्याचे कारण हेंच कीं, पद्यें हीं कवीच्या वक्रदृष्टीमुळें आणि दूरान्वयामुळें केव्हां केव्हां फार कठीण होतात. याकरितां त्यांतील अर्थ सर्वांस समजणार नाहीं व कथाविच्छेद होईल, व कवितेत वर्णन केलेला अर्थ पुन्हा गद्यांत आणिल्यास ज्यांस ती कविता समजेल त्यांस द्विरुक्ति वाटेल; इत्यादि भीतीमुळें आद्यंतीं दोन श्लोक घालून बाकीचा सर्व ग्रंथ वाक्यरूपानें लिहिला आहे." [१]

प्रस्तुत नाटकातील मुख्य व्यक्ती जरी ऐतिहासिक असली, तरी हे नाटक पौराणिक पद्धतीनेच लिहिण्यात आले आहे. या नाटकाचे एकंदर पाच अंक आहेत. पहिल्या अनुसंधानात्मक अंकात सर्व देव कैलासास शंकराकडे विनंती करण्यास जातात. बौद्ध, कापालिक, दिगंबर इत्यादी नास्तिकमार्ग, वेदमार्गाचे खण्डन करून प्रबल होत असल्यामुळे त्यावर उपाय योजिण्याची आवश्यकता ते सांगतात. शेवटी 'शंकराचार्यनामें उत्पन्न होऊन' संन्यास घेऊन ज्ञानमार्गाची मी स्थापना करीन, असे आश्वासन स्वतः शंकरच देवांना देतात. शंकराचार्यांचा जन्म तिसऱ्या अंकात चौथ्या प्रवेशात दाखविलेला आहे. याच अंकाच्या आठव्या प्रवेशात शंकराचार्य मातेच्या अनुज्ञेने संन्यासही ग्रहण करून मोकळे होतात. कालैक्याच्या दृष्टीने हे सर्वच विपरीत वाटण्याची शक्यता आहे. परंतु लोकोत्तराच्या चरित्रात व पौराणिक पद्धतीने लिहिलेल्या नाटकात त्या काळी हे सर्व क्षम्य म्हणजे 'चालेल' या स्वरूपाचे समजण्यास हरकत नसावी, असे वाटते. चौथा अंक 'मंडनजयपरकायाप्रवेशा'चा. यात तात्त्विक चर्चाच बरीच आहे व शेवटच्या अंकात 'शृंगाराद्यनुभव-दिग्विजय-पुरःसर-निजधामगमना'पर्यंत विषय आला आहे. प्रस्तुत नाटकात शंकराचार्यांचे चरित्र नसून प्रत्यक्ष शंकराचेच अवतारकार्य असल्यामुळे पौराणिक नाटकाची कथापद्धतीमधील अद्‌भुतता इत्यादी गोष्टी यात अपरिहार्यपणे आलेल्या आहेत. [२]

१. तत्रैव, प्रस्तावना, पृ. ३.

२. या नाटकासंबंधी 'मराठी रंगभूमि'कर्ते आ. वि. कुलकर्णी लिहितात, "सत्पुरुषांच्या चरित्रांचे अथपासून इतिपर्यंत वर्णन किंवा त्यांच्या बऱ्याच भागाचे वर्णन नाटकांतून करून त्याची पात्रे वरचेवर रंगभूमीवर आणल्यास त्यांच्यासंबंधीची पूज्यबुद्धी लोकांत जास्त वाढेल असे आमचे मत आहे. शिवाय एकोद्देशत्वादी चांगल्या नाटकाचे जे गुण आहेत ते साधून एका अंकाचा दुसऱ्या अंकाशी चांगला मेळ घालून व एकापेक्षा एक अधिक महत्त्वाचे व पुज्यबुद्धी वाढविणारे प्रसंग घालून नाटककर्त्याने नाटक संपविले पाहिजे." (मराठी रंगभूमी पृ. ६६) पुढे तर त्यांनी 'आचार्यांचा इतिहास हा विषयच शांतरसप्रधान असल्यामुळे तो नाटकास योग्य नाही,' असे मत देऊन टाकिले आहे. (तत्रैव, पृ. ७८.)

परंतु किर्लोस्करांचे हे पहिले नाटक कोल्हापूरकर नाटक-मंडळीने त्या काळी विशेष लोकप्रिय केले होते. या पहिल्या नाटकातही नाटककार या नात्याने अण्णासाहेबांच्या गुणांचा परिचय मिळतो. येथेही खटकेबाज संवाद, सोपी परंतु नागर वळणाची भाषा त्यांनी सफाईने वापरली आहे. शांतरसाच्या पार्श्वभूमीवर शृंगाराचा मधुर शिडकाव अण्णासाहेबांनी मोठ्या बहारीने केला आहे.

प्रस्तुत विवेचनात न उल्लेखिलेली काही पौराणिक नाटके

| | | |
|---|---|---|
| वालिवध | १८६३ | कृ. रा. दांडेकर |
| चंद्रहास्य | १८६३ | रा. धों. बर्वे |
| चित्रसेन गंधर्व | १८६७ | द. वा. जोगळेकर |
| कृष्णचरित्रपूर्णोदयेन्दु | १८६८ | गोवर्धनदास लक्ष्मीदास |
| गोपीचंद राजाचें नाटक | १८६८ | नारायण दिनकर गोडबोले |
| पुनर्दर्शन | १८६९ | रा. का. ओक |
| वत्सलाहरण | १८६९ | दा. ह. चितळे |
| पार्थप्रतिज्ञा | १८७० | वि. ना. ताटके |
| सीतास्वयंवर | १८७० | ल. श. अभ्यंकर |
| सुलोचना | १८७० | रा. बा. लेले |
| रावणवध | १८७१ | रा. बा. लेले |
| मदनप्रताप | १८७४ | रणछोडभाई गुजर |
| रासक्रीडा | १८७४ | डेविड हाइम |
| गोपीविनोद | १८७५ | द. वा. जोगळेकर |
| बाणासुर | १८७५ | बापू कृष्णाजी |
| बकासुरवध | १८७६ | गो. मो वेलणकर |
| नृसिंह-अवतार | १८७६ | द. वा. जोगळेकर |
| बभ्रुवाहपार्थपराजय | १८७६ | श्री. म. शौचे |
| लव्हांकुश | १८७६ | श्री. म. शौचे |
| बाणासुर-आख्यान | १८७६ | पां. भि. फडके |
| सुदर्शन-शशिकला | १८७७ | गो. वि. कानिटकर |
| भामाविलास | १८७७ | द. वा. जोगळेकर |
| कालिदासचातुर्य | १८७७ | वा. गो. केळकर |

## पाच

## रूपकात्मक नाटके

अमूर्त अशा विकारांना व भावभावनांना मूर्त मानवी पात्रे कल्पून, त्यांच्याद्वारे काही-एका कथानकाची योजना करून, त्यातून विशिष्ट बोध वा संदेश लोकांपर्यंत

पोहोचविण्याची पद्धती कृष्णमिश्राच्या 'प्रबोधचंद्रोदया'त अवलंबिलेली पूर्वी आपण पाहिली आहे. शुष्क वेदान्त वा बोध हा सहजग्राह्य होत नाही. उपदेशही कथांतून सूचित केल्यास मनावर अधिक ठसतो. पण त्याहीपेक्षा तो नाटकरीतीने सांगितल्यास अधिक मनोरंजक, प्रत्यक्ष व परिणामकारी सिद्ध होतो. कारण नाटकात शृंगार, वीर इत्यादी आकर्षक रसांची सुलभ योजना करिता येते व त्या ओढीने रसाबरोबर बोधाचाही अनुभव प्रेक्षकांस येतो. मराठीतील जुन्या संतकवींनी जी वेदान्तपर रूपके लिहिली, त्यांत हीच अन्योक्तिपद्धती स्वीकारिली आहे. एकनाथांनी भारुडांत त्या वेळचे सर्व लोकजीवन मोठ्या मनोरंजक रीतीने, परंतु अन्योक्तिपर वर्णिले. त्यामुळे एकाच वेळी करमणूक होऊन अध्यात्माचा बोध पार लहानथोरांपर्यंत सर्वांना होण्याची सोय झाली.

मागे सांगितल्याप्रमाणे रूपकात्मक नाटके हा नाट्याच्या विकासातील महत्त्वाचा टप्पा आहे. पौराणिक विषयांतून पात्रे आणि प्रसंग निवडून त्यांची नाटके करीत बसण्याच्या ठराविक पद्धतीला कंटाळून ही विचारप्रवर्तक, स्वतंत्र नाटकशैली अस्तित्वात आणिली गेली असावी, असे वाटते. या पद्धतीने एक महत्त्वाचा लाभ झाला तो असा की, पौराणिक वा देवासुरवजा पात्रे रंगभूमीवरून प्रथम नाहीतशी होऊन त्या ठिकाणी सजीव, मानवी विकारांनी युक्त अशी मनुष्य-पात्रे रंगभूमीवर आली. सामाजिक नाटकाचा हा एका दृष्टीने विसारच समजला पाहिजे. अशा प्रकारची रूपकात्मक, परंतु विशिष्ट बोध देणारी नाटके रचणे ही नाटककर्त्यांची कसोटी आहे. कारण प्रस्तुत अशा बोधावर भर दिला, तर अप्रस्तुत अशी जी नाटकीय वस्तू ती फिकी पडण्याची भीती असते. अप्रस्तुत अधिक रसपूर्ण झाले, तर इकडे प्रस्तुत बोध दुर्लक्षिला जाण्याचे भय निर्माण होते. अशा नाटकात शेवटपर्यंत बोधाचा पत्ता फारसा लागू न देण्याची दक्षता घ्यावी लागते. मराठीत त्या दृष्टीने या काळात रूपकात्मक नाटके फारशी यशस्वीपणे लिहिली गेली, असे म्हणवत नाही. 'चंद्रिका' मासिकात प्रसिद्ध झालेले 'विचारसार' (१८५४) नाटक अगदीच सामान्य व कल्पित-कथावजा आहे. 'सायुज्यसदना'त (१८६८) संपूर्ण वेदान्त पाण्डित्यपूर्ण रीतीने अर्थात नाटकाच्या माध्यमाने आला आहे. परंतु नाटक या दृष्टीने ती रचना फारच अवजड झाली आहे. 'दंभहारका'तील संसार-'अंतःपूरपर्यटन-रूपक' (१८७१) हेही 'विचारसार' नाटकाप्रमाणे बरेचसे सामान्य आहे.

खरे म्हणजे रूपकाश्रयाने लिहिलेल्या वाङ्मयाला प्रचाराच्या दृष्टीने विशिष्ट काळाची आवश्यकता असते. कोणत्या तरी प्रतिस्पर्धी शक्तीवर जेव्हा आघात करावयाचा असतो, तेव्हा सर्जनशील प्रतिभेचा कलाकार त्या काळातून स्फूर्ती घेऊन अशा विशिष्ट कृती रचण्यात यशस्वी होतो. कृष्णमिश्राच्या नाटकात केवळ प्रबोधाचा चंद्रोदय नाही. त्या ठिकाणी चार्वाक, बौद्ध, कापालिक इत्यादि विरोधी पाखंडी मतांवर वैदिक धर्माचा, श्रद्धेचा विजय विष्णुभक्तीच्याद्वारे त्यास दाखवावयाचा होता. या

काळातील वरील मराठी नाटकांच्या कर्त्यांपुढे तसा काळाचा तीव्र विचार किंवा तदंतर्गत जबरदस्त समस्या दिसत नाही. सामान्यपणे नाटकाच्या पद्धतीतून काही बोध लोकांना करावा, एवढीच दृष्टी दिसते. सायुज्यसदनात तो अगदीच तात्त्विक पद्धतीचा आहे, तर राहिलेल्या दोन रचनांत त्याला काही देशविषयक तत्कालीन अर्थ प्राप्त झाला आहे.

**'विचारसार नाटक' (१८५५)**

देशस्थितीवर रूपकात्मक असे लिहिलेले १८५४-मधील हे पहिले नाटक[1] म्हणून विशेष महत्त्वाचे आहे. प्रथमच सूत्रधार:सभासदांस प्रार्थना करितो ती अशी —

देश-प्राक्-स्थिति पाहुनी निजमनीं होतां मला यातना,
झालो उत्सुक मानसांत बहु मी दावावया सज्जनां;
नामे नाट्य 'विचारसार' करुनी, जोडूनि हस्तांजलि
माते द्या वर आदरून परिसा मद्गीत-वाक्यावलि.

१८५४-मधील या स्वतंत्र नाटकात गणपतिसरस्वती-वंदन, विदूषक-विनोद इत्यादी काहीही नाही, हे वैशिष्ट्य आहे. प्रारंभीच सूत्रधार म्हणतो,

"अहो देशबांधव हो, काय तुम्हीं अगदी गाढ निद्रेत निमग्न होऊन गेला आहां ! तुमचे पूर्वज धर्मराजासारखे सत्यवक्ते, अर्जुनासारखे प्रतापी, विदुरासारखे नीतिमान् इत्यादिकांनी ह्या सृष्टींत आपली कीर्ति अमर (त्व) करून ठेविली आहे. त्यांचेच वंशज तुम्ही नव्हे काय ? ज्या विचाराच्या व सुमतीच्या आश्रयानें, त्यांनीं अनुपम व स्तुत्य असे पराक्रम केले व सर्वत्र शांति पसरविली, त्यांस तुम्ही कारागृहांत घालून ठेवून मोह, विमति इत्यादिकांस प्रीतिपात्र करून ठेविलेत ही गोष्ट तुम्हास लाजिवाणी नाहीं काय ? धिक्कार असो असल्या जिण्याला."[2]

विचार, त्याची स्त्री सुमती, ज्येष्ठ कन्या:शांती व कनिष्ठ: कन्या एकी यांना भरतखंडात कोणी विचारीत नसल्यामुळे ती सारी देशांतरास जातात. प्रथम ती आफ्रिका खंडात जातात, असे पाहून मोहाचा पुत्र 'आळस' त्यांच्या पाठलागास निघतो, तेव्हा ती युरोपखंडात उद्योग नावाच्या मित्राकडे जातात. आफ्रिकेतील मोहाचा मित्र रानटीपणा हा इंग्लंडातील आपला पुत्र मूर्खपणा यास पत्र लिहून विचाराला तेथून हाकलून देण्यास सांगतो. याच पत्री तो आपली कन्या अकाबाई ही आळस यास देण्याचे योजिल्याचे त्यास कळवितो.

वरील कथानकसूत्रावरून या तीन अंकी नाटकाची रचना किती सामान्य असेल, याची कल्पना येईल. साक्या, दिंड्या, आर्या, श्लोक इत्यादी संस्कृत नाटकांच्या पद्धतीनुसार यात आलेली आहेत, पण रचना अगदी सामान्य आहे. करुणरसाची संधी

१. चंद्रिका, पुस्तक १, अंक २ ते ५ आणि ११.
२. चंद्रिका, पु. १, अं. २, पृ. ५८–५९.

साधून तो आळविण्याचा प्रयत्न केला आहे. समुद्र-प्रवासात आपल्या मुलींचे फार हाल होत असलेले पाहून सुमती दुःखाने मुलींना म्हणते —

ऐकुनि तुमच्या दीन भाषणां जीव तुटे तडतडा,
काय करूं मी उपाय नाहीं धीर धरा तुम्हि थोडा [1]

**रामकृष्ण हरि भागवत : ' सायुज्यसदन ' ( १८६७ )**

प्रबोधचंद्रोदयाच्या पद्धतीनुसार लिहिलेले असे हे एक रूपकात्मक नाटक आहे. प्रस्तुत नाटक सप्तांकी असून प्रवेशादींची व्यवस्था यात नाही. तात्यांनी भाषांतरात्मक नाटकासाठी निर्मिलेला गद्यपद्याचा साचाच नाटककाराने आपल्या नाटकासाठी वापरला आहे. श्लोक, आर्या, दिंड्या, साक्या, ओव्या, अभंग व पदे मिळून एकंदर पद्यसंख्या ४६७ भरत असल्याचे ग्रंथकाराने शेवटी दिले आहे. यातील कवित्व विषया-प्रमाणेच क्लिष्ट व संस्कृतजड आहे. ' सायुज्य म्हणजे सहजावस्थैक्य आणि सदन म्हणजे घर; ज्यात जीवेश्वरऐक्य झालें तें सायुज्यसदन ', असे स्पष्टीकरण नाटकाच्या नावासंबंधाने लेखकाने उपोद्घातात केले आहे. " जीव मायावश होऊन कामक्रोधा-दिकांच्या अधीन झाला आणि स्वरूपास विसरला. त्यास दम, शम, बोध इत्यादिकांनी षड्रिपूंचा पराभव करून मायाविमुक्त केलें. नंतर तो कृतापराधाचा पश्चात्ताप करून ईश्वरास शरण जाताच सायुज्यपद म्हणजे सायुज्यमुक्ती पावला,[2] — अशी ही नाटकाची थोडक्यात कल्पना आहे.

खरे म्हणजे हा तत्त्वज्ञानाचा विषय; परंतु तो रोचक व सर्वग्राह्य करण्यासाठी लेखकाने रूपक-पद्धतीने लिहिला. तत्त्वांना व विकारांना मानवी रूप देताना एकनाथांची कौलपत्रातील रूपकपद्धतीच लेखकाने अवलंबिली आहे. शिवाजीराजा म्हणजे ईश्वर, जीवाजीराव = जीव, मायाळू = माया, बोधाजीराव = बोध, दमाजीराव = दम, तुकोजीराव = तर्क, प्रज्ञाऊ = ज्ञान, अशा तऱ्हेची पात्रे कल्पून मराठेशाहीतील वातावरण निर्माण करण्यात आले आहे. भवारण्यातील देहगडावर वरील नाटकातील कथानक घडले आहे. या तत्त्वज्ञानपर नाटकाच्या लेखनाकडे लेखक का वळले, हे त्यांनी प्रस्तावनेत सांगितले आहे. त्या काळी विविध कारणानी लेखन करण्यास लोक कसे प्रवृत्त होत असत ते या प्रस्तावनेवरून सहज कळून येईल. ग्रंथकार लिहितात, " पुष्कळ दिवसांपासून माझ्या मनांत कानाला गोड असून अंतःकरणाला सदसद्बो-धानंदाने पवित्रकारक अशा प्रकारचा लहानसा ग्रंथ रचून देशबांधवांस वाचावयास द्यावयाचा उद्देश होता. परंतु माझा बहुतेक वेळ जो चरितार्थ चालवण्याकरता मी उद्योग करीत असें त्यांत गुंतून गेल्यामुळे त्या सद्धेतूचा अंकुर हृदयभूमीवर न येतां तेथल्या तेथेंच थबकून राहिला. परंतु दैवयोगें करून मोठ्या शारीर आणि मानसिक

१. चंद्रिका, पु. १, अं. ११, पृ. ३२५.
२. सायुज्यसदन, उपोद्घात, पृ. १.

मेहनतीचें जें मी सरकारी काम करीत होतों त्यातून मला मुक्तता मिळून निर्वाहार्थ थोडेंसें पेन्शनहि मिळालें; तेव्हां निर्व्यापाराचे खाजें आणि स्वस्थपणाचें पाणी पाहिजे तसें मिळतांच त्या हृदयभूमींत थबकलेल्या अंकुरांस पालवी फुटून हा त्याचा ग्रंथरूप विस्तार झाला, यास सज्जन विद्वज्जन आपला अवधानाश्रय देऊन न्यून असेल तें पूर्ण करून सर्वव्यापी करतील अशी माझी आशा आहे." [१]

नाटकातील गद्यपद्याचा नमुना पुढील अवतरणावरून ध्यानी येईल —

( इतक्यात पडद्यापलीकडे मोठा क्रोधयुक्त शब्द होतो )

जो रुद्रांबकज, प्रकोपित सदां, दैत्यां सुरां मारवी,
जो दुःसाध्य जितावयास, हटिया ताप्यांसही हारवी,
स्वांता स्वस्थपणा कदापिहि न दे, सौख्यालयां मोडिता,
कंपा दे अवनीतलीं प्रगटुनी शार्दूलविक्रीडिता.
ऐशा या प्रभुने अम्हास दिधलें क्रीडार्थ हे कानन
बंधू आणि स्वसा सहीत विहरे मी एकला आन न;
अस्मच्छासनिं वर्तवीन सकळां, लीला मदीया पहा;
प्राणीमात्र चिरीन बोकड जसे, बा सावचित्तें रहा.

**परि०** — काय हो हा कोण येत आहे? आणि बोलतो हें काय ?

**सूत्र०** — ( मागें पडद्याकडे पाहून ) अहो, हा राघोजी नाईक मांग! स्वराज्यात बंडाळी करूं लागला; तेव्हां शिवाजीराजानें यास नगराबाहेर काढून लावलें, म्हणून हा अत्यंत क्रुद्ध झाला आहे. आणि स्वपरित्राणार्थ या भवारण्याचा आश्रय करून बंधुस्वसासहवर्तमान येथें रहावयास येत आहे. पहा याचे स्वरूप किती भयंकर आहे ते ! शीर जसे काय काजळीच्याच पर्वताचे शिखर आणि त्याजवरील केश कसे वक्रोर्ध्व घोंटीच्या वेलीसारखे ताठर. डोळे तर जसे सर्पांचेच बीळ; आणि पसरट विक्राळ तोंड जणू काय सिंहाचीच गुहा. हा कदाचित् आम्हा सर्वांस मत्कुणासारखें चिरडून टाकील. [२]

### संसार-अंतःपुरपर्यटन-रूपक [३]

हे भारताच्या दुःस्थितीवरचे रूपक आहे. यात भारताच्या या कालातील अवनतीचे काही ठिकाणी प्रत्यक्ष असे वर्णन आलेले आहे. येथे विचार हा भारतवर्षीय ज्ञातीचा पुरुष दाखविलेला असून, दक्षता ही त्याची स्त्री आहे. इतिहास हा वृद्ध सोबती विचाराबरोबर असून चित्ररेखा ( म्हणजे नकाशा ) ही सखी म्हणून दक्षतेबरोबर आहे. मनोयानात बसून ही सर्व माणसे पर्यटनास निघतात. चित्ररेखा ही

१. सायुज्यसदन, प्रस्तावना.
२. तत्रैव, अं. १, पृ. ९.
३. प्रकाशन — दम्भहारक ( १८७१ ), पुस्तक १, अं. २, ६, ८, १०, ११.

विविध द्वीपे दाखविते; तर इतिहास हा त्यांचा वृत्तान्त सांगत चाललेला दिसतो. चित्ररेखेने या मंडळींना प्रथम ब्राह्मणी ( ब्रह्मदेश ), श्यामा ( सुम्ह देश ), मल्लिका ( मलाया ), चिना ( चीन ) व तातार ( तार्तरी ) या ' सौम्य ' ' बायांचे बाडे ' क्रमाने दाखविते. पुढे त्यांना मेग टाकून सुंदर बनलेल्या पाताळातील नागिणीप्रमाणे असलेली नवयौवना, हरिमध्या, बांध्याने उंच, लांबसडक अशी स्त्री भेटली. ही दक्षिणोत्तर पसरलेली लांबलचक, मध्ये पनामाच्या ठिकाणी बारीक असलेली अमेरिकेची नवी वसाहत होती. त्यानंतर त्यांना ' प्रथमा विरूपा परंतु आता युवरूपा ' असलेली युरोपा दिसली. आशिया खंडाचे नाव तर त्याच्या यशावरून पडले असल्याची कल्पना येथे केली आहे —

भारतवर्षिणीचा शोक शेवटी वर्णिला आहे —

बुडत्ये लवकर धाव प्रभु मी बुडत्ये लवकर धाव
अपराधी मी खरी परि तुझें पतितपावन नाम !

असा धावा शेवटी पद्यात केलेला आहे.[1]

**वासुदेव रामचंद्र मोहनी, पैठणकर : वन्हिरथ राजाचें नाटक ( १८६८ )**

त्या काळी अगदी विशेष नवलाच्या वाटणाऱ्या वन्हिरथावरील म्हणजे आगगाडीवर रचलेले हे एक रूपक आहे. " हे लहानसें नाटक रेलवेवर रचिलें आहे. . . . ह्यांत रेलवेसंबंधीं गुणदोष आणवले तितके आणून सुकी नदीवर घडलेल्या अपघाताचेंहि वर्णन केलें आहे, " असे लेखकाने प्रारंभीच प्रस्तावनेत सांगून टाकले आहे. रूपकाचे स्पष्टीकरण व्हावे, म्हणून शेवटी परिशिष्ट जोडले आहे. रेल्वेचे स्वागत त्या काळी कसे झाले, रेल्वेला होणाऱ्या अपघातांमुळे एकंदर लोकांच्या मनात भीती आणि प्रवासासंबंधी नावड कशी होती, इत्यादींचे वर्णन करण्यासाठी लेखकाने काही पात्रे कल्पून हे नाटक रचिले आहे. पात्रांची नावे चमत्कृतिपूर्ण आणि सूचक आहेत. वन्हिरथ राजा म्हणजे एंजिन. त्याचा द्रिवर ( म्हणजे ड्रायव्हर ), हा सदा नशाबाजीने झिंगलेला असल्यामुळे शुष्कावती नदीवर वन्हिरथाला अपघात होतो. त्याचे कित्येक प्रजाजन येथे प्राणांस मुकतात. अपघातस्थळी चाललेल्या शोकाच्या निमित्ताने लेखकाने या ठिकाणी करुणरस साधण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटी या स्थली विदूषक सूत्रधारास म्हणतो —

**वि.** – सूत्रधारा, बापा चल कसा येथून. मला तर रडूं येते. मी म्हणत होतों कीं, ह्या वन्हिरथाच्या नादीं कोणी लागू नका. कारण ह्याला हलक्या लोकांची संगत असल्यामुळें धामाधूमवल्लोका राज्य अशी स्थिति आहे. ह्या लोकांना का दुसरे मार्ग नव्हते काय ? एका सुखाकरिता अनंत संकटें सोसावींत.[2]

---

१. दम्भहारक, पु. १, अं. १०.
२. वन्हिरथ राजाचें नाटक, प्रवेश ५, पृ. २७—२८.

एकंदर सहा प्रवेश असलेल्या या छोटेखानी नाटकात बरेच प्रसंग ओढून-ताणून आणिले आहेत. वन्हिरथाला अपघात होतो, तेव्हा राजमाता कंपनमति ( कंपनी-सरकार ), राजपत्नी सिग्नलिका ( सिग्नल ) चिंताग्रस्त होतात. त्रिपिकसेनास ( ट्रॅफिक डिपार्टमेंटला ) सांगून मातराकडून ( स्टेशन मास्तराकडून ) त्या तारिका-दूतीस ( तार ) पाठवितात. घंटिका, शिट्टीका असलीही पात्रे येथे आहेत. एकंदर नाटक अगदीच सामान्य आहे. कल्पकताही फारशी मौलिक स्वरूपाची नाही. विदूषकाचा विनोदही सदभिरुचीला धरून नाही. शिवाय नवीन काळाकडे वा युगप्रवर्तक शोधाकडे पाहण्याचा दृष्टिकोणही फारसा स्वागतार्ह वाटत नाही. त्यातही जुनाच भित्रेपणा आहे. शेवटचे वन्हिरथ राजाचे भाषण एकंदर रूपकात्मक नाटकाला शोभणारे असे बोधवजाच आहे.

**रा.** – ( मनाशीं ) हलक्या मनाच्या पुरुषांच्या संगाने असे दुःख सोसावे लागते. मातेनें ह्या कामावर सभ्य लोकांची नेमणूक करावयाची होती. कारण राज्यसंबंधीं जोखमीचीं कामें त्यांनीं स्वतः पत्करिलीं आहेत, असे असतां दुःखाशीं झगडण्याची पाळी मजकडेसच येते. अस्तु. ( द्रिवरास ) द्रिवरा, आतां तरी नीट शुद्धि टेव. सर्व अनिष्टास कारण तूंच आहेस.[1]

## सहा

## ऐतिहासिक नाटके

भावे-पद्धतीची पौराणिक नाटके प्रारंभी, ६१–६२-पर्यंतच्या काळात रंगभूमीवर विशेष प्रचारात होती. याच सुमारास १८५० ते ६०-च्या दरम्यान मासिक पुस्तकांत व स्वतंत्र ग्रंथरूपाने संस्कृतामधील नाटकांची मराठी भाषांतरे प्रसिद्ध झाली. भाषांतरात्मक नाटकांमुळे जुन्या पौराणिक पद्धतीच्या नाटकरचनेत व लेखनात क्रांतिकारी फरक घडून आला. नाटकाचे स्वरूप गद्यपद्यात्मक झाल्यामुळे नव्या युगात गद्याला एक स्वतंत्र महत्त्व प्राप्त झाले. आविष्काराचे माध्यम थोडेसे सुटसुटीत, स्वतंत्र व सुलभ असे प्राप्त होताच आपल्या विकासाची नवी वळणे शोधण्याचा प्रयत्न कलेकडून होऊ लागला. प्रस्तुत कालखंड हा पूर्वार्धापुरता तरी पुष्कळसा भाषांतरात्मक निर्मितीमध्येच खर्ची पडलेला दिसला, तरी भाषांतराच्या निमित्ताने का होईना, परंतु विचार करण्यासारखे एकापेक्षा एक महत्त्वाचे विविध विषय त्या काळच्या पिढीसमोर आले. ज्ञानोपासनेच्या युगाला प्रारंभ झाल्यामुळे विचारजागृती आणि स्वत्वजागृती एकाच वेळी उदित होत होती. संस्कृतीचा जुना ठेवा असे जे पौराणिक, धार्मिक स्वरूपाचे वाङ्मय त्याचाही अभ्यास होऊ लागला. परंतु नव्या काळातील नवविचारांना धरून, देवदानवांच्या कल्पित गोष्टींपेक्षा, स्वदेशाचा

१. वन्हिरथ राजाचे नाटक, प्र. ६, पृ. ३५.

व स्वबांधवांचा ज्ञात इतिहास अभ्यासावा, त्याची अधिकाधिक माहिती करून घ्यावी, असाही एक प्रवाह या काळी शिक्षितांच्या मनात सुरू झाला. ग्रॅण्ट डफ, मरे इत्यादींनी लिहिलेल्या 'हिंदुस्तानच्या इतिहासा'ची भाषांतरे साने, ओक वगैरे मंडळींनी या सुमारास केली होती. एका दृष्टीने हे सरकारमान्य इतिहास असले तरी खरा इतिहास याहीपेक्षा निराळा आणि वैभवशाली असला पाहिजे, याची त्या वेळच्या, स्वतंत्र दृष्टीने विचार करणाऱ्या नव्या लोकांना कल्पना येऊ लागली होती.

आणि स्वातंत्र्याचा अस्त होऊन परकीय अमलाखाली वहिवाटत राहणे जेव्हा अटळ होऊन बसते, तेव्हा अर्थातच भूतकाळाकडे दृष्टी जाऊन एक प्रकारची इतिहासरती वाढीस लागते. पूर्वज-भक्ती ही तसे पाहता माणसाच्या रक्तातच असते. महाराष्ट्रात मराठ्यांची स्वतंत्र सत्ता स्थापन करणारे हिंद-सम्राट शिवाजीमहाराज, शिवाजीचेच स्वराज्य व स्वधर्म यांच्या स्थापनेचे कार्य विस्तृत, व्यापक व स्थिर करणारे पेशवे, किंवा इंग्रजी सत्तेला समशेरीने आव्हान देणारी अगदी अलीकडची झांशीची लक्ष्मीबाई या व्यक्तींबद्दल व त्यांच्या पराक्रमाबद्दल जातीय (राष्ट्रीय) आदरभाव प्रत्येकाच्या मनात वसत होता. हा आदरभाव प्रकट करण्याचे पारतंत्र्या-मध्ये एकच-एक साधन कला हे असल्यामुळे नाटकांत या स्वजातिगौरवाला व स्वेतिहासाला वाचा फुटली. पौराणिक विषय हे जरी स्वधर्म, स्वसंस्कृती यांना पोषक होते, तरी ते दूरचे वाटत. शिवाय, त्यांतील कथा काल्पनिक, अत्यद्‌भुत, पात्रेही दिव्य नि अतिमानवी. अशा वेळी वास्तवाकडे सहजच ओढा असलेली कथा ही पौराणिक सृष्टीकडून ऐतिहासिक दृष्टीकडे वळावी, हे अगदी साहजिकच होते.

तरी ऐतिहासिक विषय कलेसाठी घेताना काल्पनिकता सर्वस्वी टाळता येत नाही. पौराणिक काळ तर सुदूरचा आणि अज्ञातच असतो. परंतु इतिहास हाही भूत झालेला असतो, मृत झालेला असतो. कल्पनेची फुंक मारूनच बव्हंशी त्यास जिवंत करावयाचे असते. परंतु अशा रीतीने जिवंत झालेला भूतकाळ वा ऐतिहासिक काळ हा वर्तमाना-इतका वास्तव, खराखुरा व जवळचा वाटू लागतो आणि ऐतिहासिक नाटक हा एकंदर नाटककलेच्या ऐतिहासिक विकासातील महत्त्वाचा टप्पा ठरतो. प्रस्तुत काल-खंडात जी ऐतिहासिक नाटके लिहिली गेली, त्यांचे वरील दृष्टीने महत्त्व आहे. ऐतिहासिक नाटकात सफलतेच्या दृष्टीने इतिहास आणि कला यांचे सामंजस्य राखणे अत्यंत अवश्य असते. मूळ इतिहास हाही काही-एक कल्पनेचा अंश मिळवून नव्याने निर्माण करावा लागतो. नाटकात त्याहीपुढे जाऊन कला या दृष्टीने सर्वच विषयांस व व्यक्तींस आणखी पुन्हा कल्पनेची डूब मिळते. ऐतिहासिक नाटक हा कलाप्रकार वा वाङ्मयप्रकार त्या काळी मराठीत प्रथमच निर्माण होत होता. अशा परिस्थितीत वरील उभय दृष्टींनी पाहता फारशा उच्च कृती त्या वेळी निर्माण झाल्या, असे म्हणता येत नाही. कोठे ऐतिहासिक पात्रे व घटना यांवरच भर दिल्यामुळे कला-पक्ष घसरला आहे, तर कोठे वास्तवता, रसपरिपोष, संवाद इत्यादींवर लक्ष अधिक

दिले गेल्यामुळे ऐतिहासिकता नाममात्र राहिली आहे. परंतु काही झाले, तरी पौराणिक नाटकांचा संकेत मोडून, भूतकालातील का होईना, पण एके काळच्या जिवंत माणसांचा, त्यांच्या भावभावनांचा व त्यांच्या पुढच्या सामुदायिक स्वरूपाच्या प्रश्नांचा कलेच्या माध्यमाने विचार व चित्रण करणाऱ्या या ऐतिहासिक नाटकांचे विशेष महत्त्व या कालखंडात आहे, हे विसरता येत नाही. कारण यातून पुढे वास्तववादी सद्यःकालीन विषयांचा विचार करणाऱ्या सामाजिक नाटकांची वाट कलेला दिसली.

पुस्तकरूपाने प्रकाशित होऊन रंगभूमीवर ज्यांचे प्रयोग होण्यास सुरुवात झाली, अशा नाटकांस 'बुकिश' नाटके अशी एक संज्ञा त्या काळात प्राप्त झाली होती. 'थोरले माधवराव पेशवे' हे मराठी वाङ्मयातील पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले पहिले स्वतंत्र नाटक असल्यामुळे तेच पहिले बुकिश नाटक ठरले. किर्लोस्करांच्या संगीत-नाटकाचे युग अवतरेपर्यंत सुमारे १८--२० वर्षे या बुकिश नाटकांचा बराच बोलबाला मराठी रंगभूमीवर झाला. या बुकिश नाटकांत 'माधवराव' नाटकाबरोबर 'झांशीची राणी', 'नारायणराव पेशवे यांचा मृत्यु' इत्यादी काही ऐतिहासिक नाटकेही होती. जयपाळासारखी काल्पनिक नाटके होती; 'ऑथेल्लो', 'तारा' ( सिंबेलाइन ), 'भ्रांतिकृत चमत्कार' यांच्यासारखी इंग्रजीतून भाषांतरिलेला नाटके होती, आणि वेणीसंहार, शाकुंतल यांसारखी संस्कृतातून मराठीत आणलेली नाटकेही होती. प्रा. बनहट्टी लिहितात, "बदलत्या सामाजिक परिस्थितीच्या प्रेरणेमुळे 'बुकिश' म्हणजे वाङ्मयात्मक नाटक रंगभूमीवर आले. ते रंगभूमीवर आल्यामुळे प्रायोगिक नाट्यकलेत फार मोठे परिवर्तन झाले. नाटक पूर्वी कृतिप्रधान होते, ते आता शब्दप्रधान झाले. अतिमानवतेच्या पातळीवरून नाट्य हे मानवतेच्या पातळीवर आले; जीवनदर्शी भावाविष्कारी अभिनय मराठी रंगभूमीवर प्रादुर्भूत झाला." [1]

### विनायक जनार्दन कीर्तने[2] : थोरले माधवराव पेशवे नाटक ( १८६१ )

मूळ नाटक सुरू होते तेथे या नाटकाचे नाव 'पहिले माधवराव पेशवे' असे (बहुधा ग्रंथकाराने) लिहिलेले आढळते. मागाहून मुखपृष्ठावर मात्र "नाटक, थोरले

१. मराठी नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय, पृ. ७६.

२. विनायक जनार्दन कीर्तने ( १८४०–१८९१ ) — जन्म राजुरी, माध्यमिक शिक्षण कोल्हापूर व मुंबई; न्यायमूर्ती रानड्यांचे सहाध्यायी; १८५९ साली मुंबई विद्यापीठाची मॅट्रिक पहिल्या वर्षी उत्तीर्ण झालेल्या वीस विद्यार्थ्यांपैकी एक; प्रथम शिक्षक, नंतर इंदूर, बडोदे या संस्थानांत न्यायाधीश, नायब दिवाण अशा अधिकारपदांवर काम; लेखनास प्रारंभ १८६०-च्या सुमारास; उत्तरवयात मराठी-वरील भक्ती उडाली होती; वाङ्मय–थोरले माधवराव पेशवे, ऐतिहासिक नाटक, १८६१; जयपाळ, ओल्ड टेस्टामेटमधील जोब (?) याच्या चरित्रावरून लिहिलेले नाटक, १८६५; मध्य हिंदुस्थानचा इतिहास, मालकमकृत Central India-चे भाषांतर; हिंदुस्थानांतील प्राचीन विद्या इत्यादी निबंध.

माधवराव पेशवे यांजवर" असे नाव छापिले आहे. कीर्तन्यांनी हे नाटक कॉलेजमध्ये शिकत असतानाच लिहिले आणि 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे'पुढे ते वाचून दाखवून "रा. डॉक्टर भाऊ दाजी व रावसा. महादेव गोविंद शास्त्री" इत्यादी विद्वान थोर गृहस्थांकडून वाहवा मिळविली. कीर्तने यांचे हे उणेपुरे ६० पानांचे नाटक थोरल्या माधवरावसाहेबांच्या समग्र कारकीर्दीवर आधारलेले आहे; व त्याचमुळे त्यात प्रसंगांची आणि पात्रांचीही बरीच गर्दी झालेली आढळून येईल. माधवराव ही एक अत्यंत कर्तबगार व कर्तव्यदक्ष अशी व्यक्ती पेशवा म्हणून मराठेशाहीला पानिपताच्या पतनानंतर लाभल्यामुळे घरच्या व बाहेरच्या शत्रूंचा बंदोबस्त तातडीने आणि करारीपणाने झाला. शिवाय, कर्तव्यासाठी झुंजत असतानाच राजयक्ष्म्याच्या विकाराने माधवराव अकाली निवर्तले, याविषयीही सदाची हळहळ मराठी मनात त्यांच्याविषयी राहून गेली. वीरपत्नी रमाबाईच्या सती जाण्याने तर 'रमामाधवां'ची स्मृती चिरस्मरणीय होऊन बसली.

कीर्तन्यांनी आपल्या ऐतिहासिक नाटकासाठी वरील कथानक निवडिले यातच त्यांची मार्मिकता दिसून येते. त्या वेळी प्रचलित असलेल्या पौराणिक वा भाषांतरात्मक नाटकाची परिपाठी सोडून इतिहास-विषयावर स्वतंत्र नाटक विद्यार्थिदशेतच लिहावयास घेणे एवढी एक गोष्टही या नाटकाचे स्वतंत्र कौतुक करण्यास पुरेशी आहे. पौराणिक नाटकाच्या अनुषंगाने सूत्रधार-विदूषकांच्या संवादातून ठराविक बाष्कळपणा ऐकण्याची त्या वेळच्या श्रोत्यांना सवय झालेली होती. परंतु कीर्तन्यांनी आपल्या पहिल्याच कृतीत अत्यंत तेजस्वी असा सूत्रधार निर्माण करून एका नव्याच मनूचा रंगभूमीवर प्रारंभ केला. सूत्रधार विदूषकाला व श्रोत्यांना म्हणतो —

**सूत्रधार** – हे श्रोते हो, तुम्हीही ऐका. हे विदूषका, आज मी या लोकांना मराठी दरबारांत नेऊन तेथील हालहवाल दाखविणार. ते कोणते मराठी दरबार जर म्हणशील, तर बाबा, आतांचे नव्हे. ज्या दरबारांत परद्वीपस्थ लोकांच्या आज्ञा चालतात, व राजे केवळ पिंजऱ्यांतील पोपट असून स्वसत्तेच्या छायेस देखील ओळखीत नाहीत, अशा ठिकाणीं मी यांना कशासाठीं नेऊं ? तर थोरले श्रीमंत माधवरावसाहेब पेशवे, कीं ज्यांनीं प्रजेचे पोटच्या पुत्राप्रमाणे प्रतिपालन केलें, ज्यांचे नांव ऐकिलें असतां मुसलमानांनीं थरथरां कांपावें, व ज्यांच्या वियोगेंकरून सर्व महाराष्ट्र देश उदासीन होत्साता निस्तेज पडला त्या सत्पुरुषाच्या दरबारी यांस नेतों; आणि तेथील चमत्कार दाखवितों.[1]

सरकार व संस्थानिक यांच्यावरील ही निर्भय स्पष्टोक्ती १८६१-मध्ये निःसंशय अपूर्वच होती. तरुण दशेत केलेल्या लेखनाचाच हा गुण म्हटला पाहिजे.

कीर्तन्यांच्या या छाटेखानी नाटकाचे चार अंक असून त्यात एकंदर २२

१. थोरले माधवराव पेशवे, अं. १, प्र. १, पृ. २–३.

प्रवेश कल्पिले आहेत. थोरल्या माधवरावांच्या समग्र कारकीर्दीतील बहुतेक सर्व ठळक गोष्टींचा उल्लेख लेखकाने येथे आणिला आहे. त्याचबरोबर रामशास्त्री, सखारामबापू, त्र्यंबकराव मामा, रघुनाथराव दादा, आनंदीबाई, महादाजी, रमा यांसारख्या व्यक्तींच्या स्वभावच्छटा स्पष्ट करण्याचा प्रयत्न लेखकाने पुस्तकभर केला आहे. त्यामुळे प्रसंग आणि पात्रे फार होऊन वेचक रसोत्कट प्रसंग वा प्रभावी प्रमुख पात्रे यांचे चित्रण हव्या तेवढ्या विस्ताराने व कलात्मकतेने होऊ शकले नाही. संविधानकाची योजना प्रथमतःच कौशल्याने करून घ्यावी लागते, ती याचसाठी. परंतु हे सर्व असूनही कीर्तन्यांनी नाटकातील काही प्रवेशांची रचना मोठ्या योजकतेने करून ऐतिहासिक नाटकाचा एक साचा पुढच्यांसाठी बनवून दिला, हे मात्र खरे. सातारच्या छत्रपतींच्या दरबारातील माधवरावाला वस्त्रे देवविण्याचा प्रवेश पात्रांच्या यथोचित भाषेमुळे मोठा मार्मिक वठला आहे.

**रामराजा** – ( माधवरावाकडे बोट दाखवून ) नानासाहेबांचे च्यरंजीव. तोंडात लई सारखे. जनु त्येच. नांव ?

**माधवराव** – सरकार, मला माधव म्हणतात.

**पंत अमात्य** – प्रकृति सौम्य, व माधवरावसाहेबाच्या अंगी लीनता आणि साधेपणा फार.

**रघुनाथ** – हुशारीहि तशीच आहे.

**निंबाळकर** – दादासाब, माशाचं पिल्लु पव्हायला शिकवन नग. सिवाच्या बच्यास्नी हात्ती दावाया न्हाइ लागत.

**रामराजा** – व्हय, अन कां दादा ( रघुनाथरावास ) नानासाब बी लइ चांगला परानी. सावध, शाना, अन राजकारनी. त्येन बगा येका कामाला शंबर युक्ती लडवून पाव्या.

**रघुनाथराव** – जी, सरकारच्या ध्यानांत आले म्हणजे झाले.

**रामराजा** – कां माधवराव, आतां तुम्ही आमचं कारबारी, तुमच्या तिर्थरूपाचं आमास्नी इस्मरन पाडा, मंजी झालं.

**माधवराव** – जी, सरकारपायांची कृपा असली म्हणजे — हो आमचा सेवकधर्म, चाकरी घेणे पायांकडे आहे.[1]

वरील भाषा काही पात्रांच्या संदर्भात अडाणी वाटेल म्हणून प्रस्तावनालेखक बाळाजी बापू साने यांनी आधीच लिहिले, "मराठी दरबारांत शिपायापासून तो सरदारपावेतों सर्व हींच भाषा बोलतात..ग्रंथकर्त्याचा उद्देश मराठी दरबाराचे वास्तविक स्वरूप दाखविण्याचा आहे त्यापेक्षां पात्रानुरूप भाषाहि बदलणें अवश्य पडलें."

प्रस्तुत नाटक ही ग्रंथकाराची पहिलीच कृती असल्यामुळे प्रसंगांची रचना काही ठिकाणी कृत्रिम वाटते. माधवरावाच्या कडकपणाचा, वा त्याच्या दुसऱ्या

१. थोरले माधवराव पेशवे, पृ. ६–७.

एखाद्या सद्‌गुणाचा परिचय करून देण्यासाठी जणू काही प्रसंग ठराविक रीतीने नाटकात आलेले वाटतात. त्यामुळे तेथील इतर पात्रांना फारसे महत्त्व राहत नाही. रामशास्त्री, त्रिंबकमामा इत्यादी पात्रे राहोतच, पण रघुनाथराव व आनंदीबाई याही पात्रांना फारसा वाव मिळालेला नाही. अर्थात याचे एकच कारण म्हणजे माधवरावास कल्पून त्याच्या चरित्रातील मुख्य घटनांची दखल घेणे हाच लेखकाचा हेतू दिसतो. हे नाटक शोकान्त असल्यामुळे त्या संदर्भात नाटकातील विशिष्ट अशा दोन प्रवेशांना तर अपार महत्त्व येऊन बसले. लढाईवर जाण्यापूर्वी माधवराव रमाबाईचा निरोप घेण्यासाठी जातो. त्या वेळचा प्रवेश, त्यातील 'एक साखरेचा' यामुळे शृंगारिक होऊन बसला व पुढच्या बहुतेक सर्व ऐतिहासिक नाटकांत तो सांकेतिक रीतीने यावयाचाच,' हे ठरून गेले. शेवटचा प्रवेश रमाबाईच्या सती जाण्याचा. या प्रवेशाचे इचलकरंजीकर नाटक-मंडळीच्या राघोपंत आपट्यांनी भांडवल करून कंपनीला व नाटकाला अपूर्व यश व अर्थ यांची प्राप्ती करून दिली. या नाटका-विषयी मोठ्या मार्मिकपणाने कृ. आ. गुरुजी यांनी लिहिले आहे. "थोरले माधवराव-साहेब हे स्वराज्यातील स्वदेशी राजाचे व स्वज्ञातीय प्रधान असल्यामुळे व या नाटकाची रचना पौराणिक नाटकापेक्षा निराळी असोन या धर्तीचा हा पहिलाच प्रयोग रंगभूमीवर आल्यामुळे हा पहाण्याकरता लोकांची मुरकुंड वळे. दुसरे, या वेळी अर्वाचीन ज्ञानप्रसार फारसा झाला नव्हता. यात काय आहे, त्यात काय आहे असेच का व्हावे, तसे का नको इत्यादी कल्पनांची समृद्धीही झाली नव्हती. यामुळे भोळेभावाचे प्राबल्य अधिक होते. लोकांच्या या भोळेभावास पोषक असा गुण म्हटला म्हणजे माधवरावाचे अंतसमयीचे भाषण, रमाबाईसाहेबांचा सती जाण्याचा निश्चय, त्यांस आडकाठी करणारे कारभारी मंडळ, नारायणरावाचे अल्पवय इत्यादिकांचा हृदयद्रावक देखावा आणि सतीचा समारंभ हा होय."[१]

'थोरले माधवराव पेशवे,' हे मराठी रंगभूमीवर आलेले पहिले पुस्तकी नाटक. माधवराव नाटक दुःखपर्यवसायी असल्यामुळे थोरल्या चिपळूणकरांनी त्यास Tragedy म्हणून संबोधिले.[२] इकडील वाङ्मयात हा प्रकार किंवा नाटकाचा या प्रकारचा अंत अभिनवच होता. अर्थात Tragedy-च्या कोटेकोर रचनातंत्रात वा मंत्रात या नाटकाची कथावस्तू व पात्रे बसवून दाखविणे कठीण आहे. नाटकात शेवटी मृत्यू आल्यामुळे नाटक दुःखान्त झाले, इतकेच. परंतु हीही गोष्ट कीर्तन्यांच्या पहिल्याच नाटकाला अद्वितीयत्व प्राप्त करून देणारी ठरली. "स्वतंत्र रचना, विषयाची निवड, वेचक प्रसंगांची योजना, पात्रांचा स्वभावपरिपोष, भाषेची प्रसन्नता व दुःख-

१. नाटकाची स्थित्यंतरे, रंगभूमी, वर्ष ४ (अंक ११, १२); वर्ष ५, अंक १, पृ. १९.

२. शालापत्रक, पु. ५, अंक १.

पर्यवसायित्वाची अपूर्वता या गोष्टी आमच्या मतें पुस्तकाचें महत्त्व प्रस्थापित करतात," असे जे लक्ष्मणशास्त्री लेले यांनी म्हटले, त्यात तथ्य असल्याचे मान्यच करावे लागेल.[1]

प्रस्तुत नाटकात हास्य व करुण रस चांगले उतरले असल्याची भलावणीही प्रस्तावनेत बा. बा. साने यांनी केली आहे. 'करुणा-रस' -आहेच परंतु हास्यासंबंधी थोडे पाहिले पाहिजे. कीर्तन्यांचा या नाटकातील विदूषक केवळ टारगट व अचकट-विचकट भाषणे करून हास्यरस निर्माण करणारा दिसत नाही. विदूषकाची येथील योजना काही-एक उपरोध वा व्यंग्य साधण्यासाठीच कीर्तन्यांनी केलेली स्पष्ट दिसते. "आमचा सूत्रधार तुम्हाला मराठी दरबारांत नेऊन लुटणार, या हो या तुमची पागोटीं द्या हो द्या."[2] या विदूषकाच्या उद्गारांत मराठ्यांच्या निंदकांची निंदा लेखकाने उपरोधाने साधली आहे व पुढे माधवरावाच्या मराठी दरबाराचे पावन दर्शन घडविले आहे. बुधवारातील गटारयंत्रापाशी जमलेल्या भिक्षुकांत जाऊनही हा विदूषक आपली अभद्र वाणी उच्चारितो. हैदरअलीवर चालून जाण्याचे ठरल्यावर मठात चर्चा सुरू होते, तेव्हा

**विदूषक** – (मध्येच) तुमचें आतां फार उत्तम झालें. कोणाचे बाप मरतील, कोणाचे लेक मरतील, तितकीं तुमचीं श्राद्धें वाढलीं.

**रामभट** – मूर्ख बेटा, काय बोलतो पाहा.

**विदूषक** – बोलतो बरोबरच. मग काय रामभट लागले सांगायला, करा बापाय तरपंते, मुलाय तरपंते, दक्षणाय टाकते.[3]

यात हास्यही नाही, आणि अभद्रही नाही. कडवट आणि तिखट उपरोध मात्र आहे.

सारांश, कीर्तने यांचे हे पहिलेच अगदी निराळ्या विषयावरचे नाटक, त्याच्या वेगळ्याच शैलीमुळे आणि शिल्पामुळे आजच्या दृष्टीने मुळात पुष्कळसे सामान्य असूनही असामान्य ठरले. मराठी नाटकसृष्टीत त्याने एक नवीन वळण आणून सोडून नाटककलेच्या व वाङ्मयाच्या विकासाच्या दृष्टीनेही पुढच्या टप्पा गाठून दिला. पद्यविहीन किंवा संगीतविहीन अशा स्वतंत्र गद्य नाटकाच्या नव्या युगाची त्यांनी आपल्या यशस्वी कृतीने जणू प्राणप्रतिष्ठाच केली. नवीन व मौलिक कलाकृती कलेला काही एकदम वेगळे व स्वतंत्र असे काही प्राप्त करून देते हे जर खरे असेल, तर कीर्तन्यांच्या या नाटकाने मराठी नाटकवाङ्मयात नवे मन्वंतर निर्माण केले, असेच म्हणावे लागेल.

१. थोरले माधवराव पेशवे व जयपाळ ही नाटके आणि रा. ब. वि. ज. कीर्तने यांचे चरित्र, प्रस्तावना, पृ. १५.

२. अ. १, प्र. १, पृ. ३.

३. अं. ४, प्र. १, पृ. ३६.

**विरेश्वर सदाशिव छत्र्ये : 'नारायणराव पेशवे यांचें नाटक' (१८७०)**

प्रस्तुत नाटकाचा विषय जरी ऐतिहासिक असला, तरी याची रचना शिळाछापी पौराणिक नाटकांप्रमाणे गद्यपद्यात्मक अशी आहे. यात अंक नसून सर्व मिळून तेरा प्रवेशांचे हे एक आख्यानच लेखकाने लिहिले आहे. रंगभूमीवर तर या अपौराणिक व अध्यापाऊण तासात आटोपणाऱ्या छोटेखानी नाटकाचा 'फार्स' म्हणूनच प्रयोग केला जाई. कीर्तन्यांच्या ऐतिहासिक नाटकाशी तुलना करिता अफझलखानाच्या मृत्यूचे नाटक, झांशीच्या राणीचे नाटक किंवा सवाई माधवरावाचे नाटक ही तितकीशी यशस्वी नाटके उतरली नाहीत. एवढे खरे की, ऐतिहासिक विषयांकडे लोकांचे लक्ष जाऊ लागले होते. अर्थात पौराणिक नाटकांचा साचा कायम होता. त्यामुळे ऐतिहासिक नाटकाची प्रगती होऊ शकली नाही. पौराणिक शैलीचा प्रभाव किती जबरदस्त होता, हे सूत्रधाराच्या पुढील भाषणात पहावयास सापडेल.

**सूत्रधार** – महाराज ! सकलजन हो ! आजकालपर्यंत नाना कविश्रेष्ठांनीं देवादिकांच्या कथापुराणांतरीं हरिदास यांणीं कथाभागांतरीं आणि अनेक प्रकारचे नाटकाचार्यांनीं नाटकांतरीं गायन अगर लेखन करून सर्वांचीं मनें त्या अनुसंधानास लुब्ध केलीं; परंतु असा कोणीच निष्पन्न झाला नाहीं, ज्याणें नरलीला नाटकरीतीने हुबेहूब दृष्टिगोचर करून लोकांचीं अंतःकरणे आकर्षण केलीं, त्यासाठीं म्यां तो हेतु मनांत आणून या रंगभूमीवर महाराष्ट्र देशींचे स्वामी कैला० नारायणराव पेशवे यांची लीला नाटकरीतीनें प्रत्यक्ष करून दाखविण्याचा निश्चय केला आहे. [१]

पौराणिक नाटकातील भगवंताच्या लीलांप्रमाणेच नारायणराव पेशव्यांची लीला दाखविणे एवढेच लेखक समजून चाललेला आहे.

प्रस्तुत नाटक हे ऐतिहासिक स्वरूपाचे मूलतः नसून आख्यानस्वरूपाचे असल्यामुळे यात सर्वविनाशाला फक्त एक आनंदीबाई ही कृत्या कारणीभूत झाली आहे, असे दाखविले आहे. राघोबादादांबद्दल लेखकाला अतिशय आदर व अभिमान वाटतो. नारायणरावांचा खुनी सुमेरसिंग हाही येथे एक मोठा साफ दिलपाक मनुष्य चित्रिला आहे. केवळ राजकारस्थानी आनंदीबाईच्या आग्रहास्तव त्याने नारायणरावाचा वध केला, त्यामुळे सबंध नाटकभर एकच पात्र नाचत असते व ते म्हणजे आनंदी. हे नाटक म्हणजे खरी तिची लीला आहे. तिनेच फिरून-फिरून चेतविल्यामुळे सुमेरसिंगाने नारायणाचा वध केला. परंतु त्या वेळी ही मानभावी स्त्री आपल्या दासीस आज्ञा देते, तीवरून तिच्या कारस्थानीपणाची कल्पना येते.

**आनंदी.** – जाकि रांडे गजे, गंगास जाऊन सांग कीं तुजवर मोठा कहर

१. नारायणराव पेशवे यांचें नाटक, प्र. १३, पृ. ९६

कोसळला, इकडून नाना यत्न केले व सासूबाईंनींहि म्हणावें नाना प्रकार केले. परंतु त्यांचा कांहींच इलाज न चालतां गार्द्यांच्या फितुरीनें व या मेल्याच्या हट्टवादाचे बोलण्यावरून बोलणे वाढून नारायणराव मात्र मारला गेला. जा रांडे लवकर जा ! जें नेलें ते आतां तडीपर्यंत सारिखें केलें पाहिजे.'[1]

प्रस्तुत नाटकात ' थोरले माधवराव पेशवे ' नाटकाप्रमाणे राघोबा व आनंदी यांचा शृंगाराचा प्रवेश असून तेथील ' एक साखरे'च्याप्रमाणे येथेही आनंदी ' लाजून राघोबाला .चुंबन देत्ये. '[2] नारायण व गंगाबाई यांच्या प्रवेशात पुन्हा चुंबनविधी आहेच. या ऐतिहासिक नाटकातील आणखी मौज म्हणजे सर्व पात्रांना पदे घातली आहेत. आनंदी, राघोबा, नारायणराव, इतकेच काय पण सुमेरसिंगाला आणि त्याच्या सहकाऱ्यांनाही वैयक्तिक आणि सांघिक गीते आहेत. परेडीच्या ठिकाणी गार्द्यांच्या पलटणीतले लोक, " एक दिलसे बडे बडे टूट जावेंगे वह पाहाड खडे, " हे संघगीत राष्ट्रगीताच्या आवेशात गाताना दिसतात. प्रत्यक्ष खुनाच्या धामधुमीच्या वेळीही संगीत चालूच आहे. सुमेरसिंगच संगीतात नारायणरावाला बजावतो, " लरका बचन तु सुन मेरा, जान अब नहीं बचे तेरा ।। धृ. ।। बचना हो तो अब ही धर दे इसी जगापर पैसा । देऊं दिलाऊं नहीं चलनेका न चले जैसा वैसा ।। " यावर राघोबाही त्यास संगीतात विनंती करितो, " आतां मजवरि करि तुं दया या समयासी ।। धृ. ।। जमादार मी तुमचा दास । पदरीं पडलों न करिं उदास ।। वाचवि बाळाच्या जीवास, एवढी आस पूर्ण करीं ।। "

नाटकाचा शेवट बारभाईंच्या प्रतिज्ञेत झाला आहे. पण या वेळी गंगाबाईला पुत्र वा कन्या काहीच झाले नसताही ' परशुरामभाऊ लष्करानिशीं शहरांत फिरून सवाई माधवराव प्रभू याचा गर्भी राज्याचा डंका प्रसिद्ध करितात व सर्व मुत्सद्दी व प्रजा त्या वचनास मान देऊन मुजरा करितात.[3] यातील ' गर्भी राज्य ' हा शब्दप्रयोग मोठा मार्मिक आहे.

**' झांशीच्या राणीचें नाटक ' ( १८७० )**

प्रस्तुत नाटकाला एक इंग्रजी प्रस्तावना जोडली असून तीत नाटक चेबर्सकृत ' इंडियन रिव्होल्ट्स ' नामे इतिहासाच्या आधारे रचल्याचे लेखकांनी सांगितले आहे. हे नेहमीचे ऐतिहासिक नाटक नसून " नूतनेतिहासांतर्गत मनोल्हादक झाश्याख्य-पुराधीश्वरी लक्ष्मीबाई इचे नाटक " असल्याचे ग्रंथकार[4] सांगतात. परंतु नाटकाचा

१. तत्रैव, प्र. १०, पृ. ८८.
२. तत्रैव, प्र. ३, पृ. २४.
३. तत्रैव, प्र. १३, पृ. ९६.
४. लेखक — विश्वनाथ मोरेश्वर नाशिककर, नारयण गोपाळ दामले, विनायक हरि शिनकर.

विषय जरी नूतनेतिहासातला असला, तरी लेखकांनी ते अगदी जुन्या सूत्रधारी पौराणिक पद्धतीनेच अत्यंत शिथिलपणे लिहिले आहे. त्या काळात १८५७ सालच्या स्वातंत्र्यसमर लढलेल्या बंडातील या क्रांतिसम्राज्ञीचे नाटक लिहिणे म्हणजे अवघडच होते, तारेवरील कसरत होती. म्हणूनही हा कदाचित पौराणिक शैलीचा बुरखा नाटककारांनी घेतला असावा. प्रस्तावनेत सूत्रधार म्हणतो —

इंग्लिश भुवनपति जाहाले । परधर्मांचा द्वेष करूं लागले
न्यायान्यायें संस्थानिक आटिलें । म्हणुनि ईश्वरें समर्ष नेत्र फिरविले

इंग्लिश लोकांनी ती कारणे 'न्याया न्यायानें' या देशात पुष्कळ प्रसूत केली.[1] परंतु वरच्या नियमाप्रमाणेच हा दुसरा नियम आहे की, सर्व लोकांस स्वदेशाचा अभिमान असतो व तो अवश्य असावा. हा नियम संरक्षण करणारे कित्येक लोक शक्त्यनुसार त्या लोकांस आडकाठी करण्यास शके १७७९ साली प्रवृत्त झाले. परंतु अविचारान्ती अपयशही पावले. ती आडकाठी झाल्यामुळे उभयपक्षी दुःखकारक गोष्टी पुष्कळ झाल्या.[2]

प्रस्तुत नाटक पौराणिक पद्धतीनेच लिहिले असून त्यात एकंदर चोवीस प्रवेश आहेत. सूत्रधार व विदूषक ही जोडी शेवटपर्यंत आहे; इतकेच नव्हे, तर नाटकातील प्रसंगांतही त्यांचे अस्तित्व आहे. खरे पाहता या नाटकात प्रत्यक्ष दृश्यावर फारसा भर न देता तो सूत्रधाराच्या निवेदनावरच देण्यात आला आहे. त्यामुळे मधूनमधून दृश्ये व बाकीचे सूत्रधाराचे निवेदन असे स्वरूप या नाटकाला आले आहे. सहाव्या प्रवेशात जोगनबागेत जे हत्याकांड झाले, त्याचे कथन सूत्रधार ७६ आर्यांत कीर्तनकाराच्या थाटावर करितो आणि शेवटी ' विदूषका, याप्रमाणे सर्व हकीगत झाली, ' असा समारोप करतो. सूत्रधाराचे आर्येवर खूपच प्रभुत्व आहे, आणि कथाकथनाला आर्येसारखी दुसरी उपयुक्त जाती कोणती सापडणार? पुढील उदाहरणे पहावी —

बिललब्धीस्तव करितो मान्य जसे मूषकोक्त जिह्मग तो
देउनि विश्वास तया ग्रहण करी शस्त्रराशि जिह्मग तो.

किंवा

बिटवापगापथानें धावति होवोनि चित्तिं अरि भीत
जैसा पतगेन्द्राला पाहुनि भुजगेंद्र जाय अवनींत.

मध्यंतरी झाशीच्या राणीचे कथानक थांबवून सूत्रधाराने गोडसेभटजींच्या प्रवासवृत्तातल्याप्रमाणे ग्वाल्हेरमधल्या नायकिणींचीच प्रकरणे आणिली आहेत. प्रतिष्ठित लोक नायकिणींना लुबाडतात, नायकिणी फौजदारांना कशा लुबाडतात,

१. येथे छापताना 'न्यायान्यायानें' हा शब्द मुद्दामच तोडून छापिला आहे. हेतू हा की, दोन्हीकडे न्यायच वाटावा. संधीमुळे 'अन्याया'चा वास सरकारला न यावा, म्हणून ही कदाचित तरतूद असावी !

२. झांशीच्या राणीचें नाटक, पृ. ९.

इत्यादी सुरसरहस्यकथाभागामुळे मूळ नाटकाचा मात्र रसभंग झाला आहे. मधली २५ पाने ह्याच मामला चालू ठेविला आहे. पुढे नाटक घाईने गुंडाळले आहे. त्यामुळे झाशीच्या लक्ष्मीबाईच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचा ठसा वाचकांच्या मनावर उमटत नाही. पहिल्या काही प्रवेशांत लक्ष्मीबाईला नाटककारांनी रागदारीतील पदेही घातली आहेत. त्यामुळे 'The present work treats of the rebellion of Jhansi in Boondel-Khand brought about by Laxmibai, the Rani of the district, of her brave and praiseworthy deeds and her fate.' हे लेखकाचे प्रस्तावनेतील स्वतःच्या नाटकासंबंधीचे म्हणणे प्रत्यक्ष नाटक वाचल्यानंतर फारसे यथार्थ वाटत नाही.

**व्यंकटेश रंगो कट्टी मुधोळकर : 'सवाई माधवरावाचें नाटक' (१८७१)**

कट्टी हे विद्याखात्यात कन्नड ट्रान्स्लेटर होते. त्यांची जन्मभाषा मराठी नसूनही त्यांनी हे नाटक रचिले, हे विशेष कौतुकास्पद आहे. ऐतिहासिक नाटक या दृष्टीने हे एक बरेच यशस्वी नाटक आहे, असे म्हणावयास मुळीच हरकत नाही. सवाई माधवरावांच्या वेळची पेशवाईची स्थिती सगळीकडून भरभराटीची झाली; पहिल्या प्रतीचे राज्य म्हणून त्याचा बोलबाला झाला. अशा पेशव्यांचा महिमा गाण्यासाठी लेखकाने हे नाटक लिहिल्याचे तो सांगतो. मात्र सवाई माधवरावांच्या बालपणापासून त्यांच्या आत्मघातापर्यंतच्या चरित्रविषयक सर्व घटना नाटकात वर्णिण्याचा आग्रह लेखकाने धरिल्यामुळे पहिले दोन अंक फारसे परिणामकारी होऊ शकले नाहीत. एकंदर नाटक पाच अंकी आणि प्रवेशयुक्त असे आहे. पहिल्या दोन अंकांतून नानांच्याच पराक्रमाचे वर्णन आलेले आहे. राघोबा, इंग्रज, निजामअली इत्यादी शत्रूंवर नानांच्या राजकारणाने मात केली होती. सदाशिवरावभाऊच्या तोतयाचेही त्यानी पारिपत्य केले. टिपूलाही रणात आव्हान दिले. नानांच्या व्यक्तिरेखेला हे सर्व उपकारक ठरणारे असले, तरी हा सर्व ऐतिहासिक कथानकाचाच भाग होऊन बसला आहे.

या नाटकातील खरा संघर्ष तिसऱ्या अंकापासून पहावयास मिळतो. नानांनी राज्य संभाळून आपणांला लहानाचे मोठे केले, याबद्दल सवाई माधवरावास नानांबद्दल मनोगत कृतज्ञता असली, तरी नानांची हुकूमशाही व 'हम करे सो कायदा' या वृत्तीचा त्रास वीट येऊ लागला होता. आपली आई चहाडखोर असून नानांशी तिचे अंतःस्थ सूत आहे, याचाही त्याच्या मनात राग होता. लेखणी धरून मुत्सद्देगिरी करणाऱ्या नानांपेक्षा तरवार धरून दिल्लीपतीला काबूत ठेवून मराठी राज्याची कीर्ती उत्तरेत वाढविणारा सरळ मनाचा मराठी गडी महादजी त्यास अधिक विश्वसनीय व जवळचा वाटे. काही झाले तरी रक्ताचे संबंध असल्यामुळे दुसऱ्या बाजीरावाकडे माधवरावाचे मन ओढ घेई. परंतु त्यांच्यामधील स्नेहसंबंध जमविणारा पत्रव्यवहार नानांनी कब्जात घेतल्यामुळे सवाई माधवरावाचे मन नानाविरुद्ध बंड करून उठले. निजामाविरुद्ध जातीने रणात जावयास निघण्यापूर्वी प्रिय पत्नी यशोदेचीहि तो गाठ

घेतो. ऐतिहासिक नाटकातील एका दृष्टीने सांकेतिक होऊन बसलेला हा प्रसंग लेखकाने मोठा भावपूर्ण रंगविला आहे. रसाच्या दृष्टीने व स्वभावपरिपोषाच्या दृष्टीने या नाटकात अनेक चांगले प्रसंग लेखकाने निर्माण केले आहेत. महादजी शिंद्यांच्या मृत्यूचा प्रसंग हा असाच अत्यंत परिणामकारक उतरला आहे. खरी चकमक शेवटल्या अंकात झडते आणि सवाई माधवरावाचा भीषण अंतही याच अंकात झाला आहे. नाना आणि माधवराव यांची शाब्दिक लढाई चालू असताना 'फार बडबडूं नको थेरड्या, येथेंच तुकडे पाडीन,' असे म्हणण्यापर्यंत माधवरावाच्या नानांबद्दलच्या अनादराची मजल जाते. नानाही 'मी नसतों तर हा माधवराव पेशव्यांच्या गादीचा मालक झाला नसता, कोणीकडे भीक मागत गेला असता कोण जाणे,' असे माधवरावास तिरस्काराने ऐकवितो, येथेच पुढे माधवरावास भ्रम होऊन त्यातच तो कारंज्यावर उडी घेऊन मृत्यू पावतो, असे दाखविले आहे. हा प्रवेश लेखकाने अतिशय चांगला लिहिला आहे. 'हाय रे दुनिया बुडाली, शिरमंत पडले! धनी गेले! जग बुडाले! धावा!" हा बागेत काम करणाऱ्या माळ्यांच्या एकच आक्रोश हृदयात कालवाकालव माजविणारा: असाच आहे.

एकंदर नाटकात संविधानकाचा आटोपशीरपणा साधण्यात लेखक जरी तितकासा यशस्वी झालेला नसला, तरी संघर्षयुक्त नाट्यप्रसंग योजून त्यांच्याद्वारे व्यक्तिरेखांचा ठसा प्रेक्षकांच्या मनावर उमटविण्यात लेखकाने वाखाणण्यासारखे यश मिळविले आहे, असेच म्हणावे लागेल. इतिहासबाह्य अशा कोणत्याच गोष्टी लेखकाने येथे कलात्मक परिणाम साधण्यासाठी आणिल्या नाहीत; अथवा कोणत्या देशी वा विदेशी नाटककाराची उसनवारी करून नायक वा खलनायक यांच्या स्वभावरेषा ओळखू येतील इतक्या सादृश्यांसह त्या रेखाटल्या नाहीत. लेखकाने हे एक शुद्ध असे ऐतिहासिक नाटक लिहिले आहे. यात सूत्रधार-विदूषकांची जोडी व त्यांची रसापकर्षक बडबड नाही. या नाटकात पद्य किंवा पदे कोठेच योजिली नसल्याने ऐतिहासिक नाटकास शोभणारी सलग गद्यशैलीही येथे वैशिष्ट्याने दिसते.

याच सालात म्हणजे १८७१-मध्ये अफझलखानाच्या मृत्यूचे कोंडो सखाराम घाटे यांनी लिहिलेले नाटक ऐतिहासिक नाटक या दृष्टीने अगदी सामान्य आहे. परिपार्श्वकाने म्हटल्याप्रमाणे नाटक "बहुतेक सर्व उर्दू भाषेंत आहे." (पृ. ३) त्यामुळे अर्थबोधात व्यत्यय येऊन रसहानी वाटते. हे नाटक ग्रँट डफच्या इतिहासावर प्रामुख्याने आधारलेले आहे. "पुनरावृत्तीच्या वेळीं संविधानक नीट जुळविण्याकडे आणि ग्रँट डफकृत इतिहासावर सर्वस्वीं अवलंबून न राहतां शिवाजीचें खरें स्वरूप बाहेर आणण्याकडे नीट लक्ष द्यावें अशी आमची सूचना आहे." असा या नाटकावर विविधज्ञानविस्ताराने खोचक अभिप्राय दिला आहे.[१]

१. वि.ज्ञा.वि. पु. ४, अं. ९, फेब्रुवारी १८७२, पृ. १६४.

**नारायण बापूजी कानिटकर : 'श्रीमल्हारराव महाराज नाटक' (१८७५)**

पुढच्या जमान्यात सामाजिक व ऐतिहासिक नाटकांनी ख्यातनाम झालेल्या नारायण बापूजी कानिटकरांचे हे पहिले ऐतिहासिक स्वरूपाचे नाटक. हे खऱ्या अर्थाने ऐतिहासिक नाटक नव्हतेच. त्या वेळी नुकत्या घडलेल्या एका खळबळजनक संस्थानी राजकीय मामल्याविषयीचे हे नाटक आहे. १८७५ एप्रिल २३-ला बडोद्याच्या मल्हारराव महाराजांना सरकाराने पदच्युत केले. याच सालात कानिटकरांनी या विषयावर हे नाटक लिहिले आहे. कल्पित कादंबऱ्या व नाटके अंधानुकरणाने व अंधपरंपरेने लिहिणाऱ्या लेखकांचा सुळसुळाट झाल्यामुळे खरे वाङ्मय निर्माण होत नसल्याची कानिटकरांची तक्रार होती. प्रस्तुत नाटक लिहिण्याचा हेतू स्पष्ट करिताना ते लिहितात, "नाटक हें ह्या जगतींतील घडामोडीचें चित्र आहे. ह्या जगाच्या रहाटीमध्ये प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांदेखत घडणाऱ्या सुखदुःखाच्या गोष्टी नाटकरूपानें लिहून ठेविल्या असतां त्या चिरकाल रहातात व त्या प्रत्येकास आपला वर्तनक्रम सुधारण्यास उपयोगी पडतात. ह्या नाटकावरून देशाचा इतिहास लिहिणारांस मोठें सहाय होते. अमुक वेळेस अमक्या देशाची स्थिति कशी होती, तेथील लोकव्यवहार कसा होता, राजा कसा होता, पदरचे मंत्री कसे होते, हे चांगले किंवा वाईट असल्याने सुखदुःखावह परिणाम काय झाले व ते कोणत्या रीतीनें टाळतां आले असते, वगैरे गोष्टी हव्या त्या वेळी कळण्यास अडचण पडत नाहीं. सदरहू प्रकारचे विचार मनांत येऊन मीं हें नाटक लिहिण्याचा यथामति प्रयत्न केला आहे."[१]

बडोदाधिपती मल्हारराव महाराज हे देशी संस्थानिक होते. बडोद्याच्या इंग्रज रेसिडेंटवर विषप्रयोग केल्याच्या आरोपावरून सरकारने त्यांची कमिशन नेमून चौकशी केली. विषप्रयोगाचा आरोप जरी पुढे त्यांच्यावरून काढून घेण्यात आला, तरी गैरकारभाराबद्दल त्यांना पदच्युत करून त्यांस मद्रासला टेविले. त्या वेळेच्या राजकीय जागृतीला धरून देशातील लोकांची सहानुभूती मल्हारराव महाराजांच्याकडे होती. सार्वजनिक काकांनी त्यांच्या खटल्यासाठी खर्चास १ लाखाचा निधी उभारला होता. त्यामुळे हे सर्व प्रकरण त्या वेळचे लोक मोठ्या कुतूहलाने व सहानुभूतीने दोन वर्षे पाहत होते. कानिटकरांनी हे सताकी नाटक सांगूनसवरून करुणरसप्रधान म्हणून लिहिले आहे आणि शेवटचा प्रजाजनांच्या ताटातुटीचा, निरोपाचा प्रवेश तितकाच करुण उतरला आहे.

मात्र सबंध नाटकात एक तऱ्हेचा बोध लेखकास अभिप्रेत असल्याचे स्पष्ट जाणवते. मुखपृष्ठावरच त्यांनी जो श्लोक छापिला आहे, त्यावरून महाराजांच्या नाशाला त्यांची दुबळी व अस्थिर बुद्धी व त्यांच्या विश्वासात असलेला नीच व स्वार्थी सेवकवर्ग होता, हे स्पष्ट झाल्यामुळे वाचकाच्या सहानुभूतीत एक प्रकारचे व्यवधान

१. मल्हारराव महाराज नाटक, प्रस्तावना, पृ. १-२.

निर्माण होते व झाले ते ठीकच झाले, असे न्यायबुद्धीने वाटू लागून रसामध्ये व्यत्यय येतो. मुखपृष्ठावरचा श्लोक असा :

न तीव्रमति भूप जे, स्थिर न बुद्धि ज्यांची असे,
तयांस अति नीचसा जन सदैव सेवीतसे;
किती फसविती ! किती लुटुनि नेति संपत्ति ती,
अहा भरंवसा अशांवरि किती पहा ठेविती !

सहाव्या अंकात सबंध कमिशनचीच हकीकत आहे. गायकवाडांतर्फे बालंटाईन-साहेबाचे बचावाचे भाषण एकूण १४ पाने आहे. सरकार-दरबारात स्वार्थ साधणाऱ्या वरिष्ठ व कनिष्ठ नोकरवर्गाच्या कारवाया कशा चालतात, हा या सर्व नाटकाचा विषय असल्यामुळे एकंदर नाटकात रहस्यमयता व कारस्थाने खूपच आली आहेत. मल्हारराव हे एकच पात्र या नाटकात महत्त्वाचे आहे. परंतु त्याचा स्वभाव हा लेखकाने आधीच सांगून टाकल्यामुळे, व त्यांच्या स्वभावामुळे त्यांची झालेली फरपट एवढाच नाटकाचा विषय झालेला आहे. त्यामुळे नाटक या दृष्टीने ही विशेष उल्लेखनीय कृती झाली आहे, असे म्हणवत नाही. एक सबंध ऐतिहासिक प्रकरण नाटकरीताने सांगितले आहे, इतकेच. अर्थात कानिटकरांची भाषा, एकंदर संविधानक योग्य त्या क्रमाने मांडण्याची त्यांची हातोटी इत्यादी गोष्टी त्यांच्या या पहिल्या नाटकातही उठावदारपणे स्पष्ट होतात.

## सात

## कल्पनारम्य नाटके

मुक्तामाला, राजा मदन, रत्नप्रभा, सुलोचना, मंजुघोषा, विचित्रपुरी इत्यादी 'नावलां'ची पुस्तके मराठीमध्ये प्रसिद्ध झाल्यामुळे लोकांना कल्पित कथाकादंबऱ्या वाचण्याची गोडी वाटू लागली. वाचकवर्ग मिळतो आहे, असे दिसताच नवे-नवे लेखकही या कल्पित कथांच्या लेखनाच्या व्यवसायात उतरले व त्याचमुळे 'आतांशी नावलांची कीड फार झाली आहे. लहान मुलेंबाळें देखील नावलें लिहून पैसे मिळवूं लागलीं आहेत,' अशी तक्रार का. बा. मराठे यांनी नावल व नाटक याविषयी लिहिताना केली.[1] नावलाचा म्हणजेच कल्पित कादंबऱ्यांचा त्या वेळच्या नाट्यवाङ्मयावरही एक चमत्कारिक परिणाम घडून आला. कल्पिताची अद्भुतरम्यतेची ज्यांना आवड व गोडी होती, अशा लेखकांनी आपल्या लेखनासाठी कादंबरीप्रमाणे नाट्यवाङ्मयाचा प्रकारही घेण्यास प्रारंभ केला. काहींनी त्यावर अतिक्रमणही केले. हे सांगण्याचे कारण असे की, या काळामध्ये लेखकांना काय, किंवा वाचकांना काय, प्रत्येक वाङ्मयप्रकाराचा काही एक विशिष्ट साचा असतो, त्यास काही-एक वेगळा स्वतंत्र बांधा व आकार

१. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, का. बा. मराठे, १८७२, पृ. १८.

असतो, याची फारशी कल्पना नव्हती. या काळात कल्पनारम्य म्हणून जी नाटके लिहिली गेली, त्यांतली बरीचशी नाटके खरोखर नाटके नसून संवादात्मक कादंबऱ्याच आहेत. अर्थात कादंबऱ्या म्हणूनही ती यशस्वी ठरली असती, असेही नाही. मुक्तामाला, मंजुघोषा इत्यादी 'नावलां'वरून स्फूर्ती घेऊन त्याप्रमाणेच आपणही 'कांही चमत्कारिक भाग रचून देशबांधवांचे मनरंजन करावे,' म्हणून 'विलास-तरंगिनी' नाटक लिहिले, असे त्याच्या कर्त्याने सांगितले आहे.[१]

या काळातील कल्पनारम्य नाटकांनी रचनेच्या वा व्यक्तिदर्शनाच्या दृष्टीने काही विशेष प्रगती केली, असे म्हणता येत नाही. पौराणिक नाट्याख्यानांचाच साचा या कल्पित नाटकांसाठी सर्वत्र वापरण्यात आला. सूत्रधार-विदूषक ही जोडी याही कल्पित नाटकांत शेवटपर्यंत राहिली. फक्त पौराणिक देवदेवतांचे विषय जाऊन त्या ठिकाणी संस्थानिक, राजे-राजवाडे, प्रधान-अमात्य इत्यादी सामंतशाही युगातील किंवा मांडलिक-परंपरेतील व्यक्तींभोवती रचिलेली कल्पित आख्याने आली. अर्थात पौराणिक कथानकांतील अद्‌भुतता, अवास्तवता येथेही होती. चंपावती नाटकात राणीच्या असहायतेचा फायदा घेऊन तिजवर बलात्कार करू पाहणाऱ्या राजाचे शरीर चंपावतीच्या पातिव्रत्याच्या तेजाने दग्ध झाल्याचे दाखविले आहे.[२] एवढेच झाले की, अगदीच काल्पनिक वा पौराणिक अशी अतिमानवी पात्रे जाऊन त्या ठिकाणी मानवीच, परंतु उच्च श्रेणीतील आदर्श पात्रे आली. पौराणिक नाटकांतील अद्‌भुततेलाही थोडेफार वास्तवतेचे बंधन पडले, आणि अद्‌भुताला रम्यत्वाची नवी जोड मिळाली; त्यामुळे कल्पित नाटकांस प्रणयप्रधान नाटके असेही म्हणण्यास हरकत नाही. परंतु प्रणयही येथे एका विशिष्ट सांकेतिक पद्धतीने आलेला आहे. पौराणिक नाटकांतील देवासुरांचा लढाच मानवी स्वरूपात व्यक्त करण्याचा प्रयत्न येथे केलेला दिसतो. सत आणि असत अशा दोन स्थिर प्रवृत्ती कल्पून त्यांचा झगडा येथे चित्रि-लेला दिसेल. अर्थात सत पात्रातील सत्त्वगुण हा अंती दुष्ट पात्रांमधील खलतत्त्वावर विजय मिळवितो. परंतु त्याकरिता प्रथम सत्त्वगुणी, सत्प्रवृत्त स्त्रीपुरुषांना संकटांच्या परंपरांना तोंड द्यावे लागते. शेवटी त्यांतून तावूनसुलाखून ही पात्रे बाहेर पडून आपले राज्य वा आपली इच्छिते वा दैवयोगाने दुरावलेली प्रिय माणसे पुनः प्राप्त करून घेतात.

या विशिष्ट सांकेतिकतेमुळे या नाटकांत शृंगार आणि करुण या दोन रसां-वरच विशेष भर देण्यात आलेला दिसतो. नावलांसबंधी लिहिताना का. बा. मराठे यांनी हाच मुद्दा मांडिलेला आहे. ते लिहितात, "अर्वाचीन नावलांमध्ये जागोजाग शृंगार फार, व शोक फार. शृंगाररसाच्या योगानें कांहीं प्रीतीचे बीज पेरले जात

१. विलासतरंगिनी नाटक (१८७१), धों. भि. मराठे, प्रस्तावना, पृ. ३.

२. मनोरंजक चंपावती, ग. वि. कानिटकर (१८७१), अं. २, प्र. १०, पृ. ७१.

असेल खरें; परंतु शोक अतिशय, त्यामुळें जगताविषयीं औदासीन्य फार उत्पन्न होते. प्रत्येक प्रस्तुतचे नावल संकटांचा सागर आहे. एकावर एक संकटें येतात व वाचणारांचें अंतःकरण खिन्न होतें." याचविषयी आणखी पुढे त्यांनी म्हटले आहे, "विद्वानांना तीं विलक्षण संकटें खरीं वाटत नाहींत. असें कोणावर संकटांच्या राशी आणून टाकून वाचणारांस दुःख देणें हें सर्वथैव अश्लाघ्य आहे. अनेक संकटें ऐकवून अंतःकरणें दीन व खिन्न करणें ह्यापेक्षां पुष्कळ उत्साहाच्या, शौर्याच्या, धैर्याच्या, प्रौढीच्या, औदार्याच्या गोष्टी सांगून लोकांस जरा उल्हसित करावे हे बरे." [1]

कादंबरीपद्धतीच्या या कल्पित नाटकांची नावेही 'हंसपालिका', 'विलासतरंगिनी', 'मनोरंजक चंपावती' अशी मंजुघोषा-मुक्तामाला-पद्धतीची स्त्रीवाचकच असल्याचे दिसून येईल. मात्र या काळातील कादंबऱ्यांतल्याप्रमाणे या कल्पित नाटकांत स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, परदेशगमन इत्यादी त्या काळचे सुधारकी विषय फारसे आणिलेले दिसत नाहीत. त्याकरिता मनोरमा, स्वैरसकेशा यांसारख्या शुद्ध सामाजिक नाटकाकडेच वळावे लागेल. कल्पित नाटकांत कथानकातील अद्भुतरम्यतेवरच अधिक भर असल्यामुळे प्रसंग, परंपरा किंवा घटनावर्णन यांनाच अधिक प्राधान्य मिळाले आहे. त्यामुळे या कल्पित नाटकांतील बऱ्याचशा नाटकांत संपूर्ण कथानकही सांगून पुरे झालेले नाही. त्यामुळे या नाटककर्त्यांना शेवटी नाटकाच्या अपूर्णतेबद्दल आपल्या वाचकांना क्षमायाचना करावी लागली आहे. हप्त्याहप्त्यांनी प्रसिद्ध होणाऱ्या कादंबऱ्यांप्रमाणेच या नाटकांचे स्वरूप झाले आहे. 'सूर्यकान्त व नागकन्या' या नाटकाच्या शेवटी सूत्रधार विदूषकास सांगतो, " अरे, नाटक तर अजून आहेच; परंतु आजच्या प्रसंगीं नगर-प्रवेशाचा कथाभाग मात्र संपला. पुढल्या प्रसंगीं वनप्रवेशांतील चमत्कार तुला दाखवीन." शेवटी पुढच्या प्रसंगी असाच आश्रय देण्यास तो प्रेक्षकास विनवितो—

आश्रय देत असावा, नगर-प्रवेशा जसा कृपा करुनी;
वनगृह–प्रवेश यांते, विनवितसे अम्हिहि आस मनिं धरुनी.[2]

### विनायक जनार्दन कीर्तने : जयपाळ (१८६५)

'थोरले माधवराव पेशवे' हे ऐतिहासिक नाटक लिहून स्वतंत्र नाटक लिहिण्याचा पायंडा पाडणाऱ्या रा. ब. कीर्तने यांचे 'जयपाळ' हे नाटक लोकांना त्यांच्या पहिल्या नाटकापेक्षा थोडे डावे वाटले. एक म्हणजे जयपाळ नाटकाची कथावस्तू स्वतंत्र

१. सूर्यकान्त व नागकन्या, ग. पां. कमळाकर व भा. वि. कानिटकर (१८६९), पृ. ६४.

२. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, का. बा मराठे, पृ. ११–१२.

नसून ती बायबलच्या जुन्या करारातील जोबच्या कथानकाची छाया[1] आहे. मात्र गोष्टीचे मूळ परकीय असले, तरी नाटक हे अगदी संपूर्ण देशी, अगदी मराठी उतरले आहे, हे निर्विवाद. कीर्तन्यांनी यहुदी लोकांच्या पुराणातून आपल्या नाटकास[2] विषय शोधला, म्हणून शालापत्रकातल्या जयपाळवरील अभिप्रायात कीर्तन्यांवर जोरदार हल्ला चढविण्यात आला आहे.[3] येथील पौराणिक ग्रंथांतून पात्रे व प्रसंग घेऊन नाटकाची जुळणी झाली असती, तर जनमनाची पकड आपोआपच घेता आली असती, असे अभिप्रायकर्त्यांचे मत पडले आहे. या इंग्रजपूजनाच्या वृत्तीवर टीका करिताना ते लिहितात, " आता कदाचित् आमच्या पुराणांतल्या सारख्याच धर्मभोळ्या, वेड्या समजुतीच्या परंतु आमच्या पुराणांतल्यापेक्षा नीरस व पचपचीत कथा इंग्रज लोकांच्या धर्मपुस्तकांत भरल्या आहेत असे आपल्या हिंदु वाचणारांस दर्शविण्याचा कीर्तने यांचा बैबलांतील गोष्ट घेण्यांत एक उद्देश असला तर कोण जाणे. "[4]

कीर्तन्यांनी येथील पुराणातील विषय घेतला असता, तर अर्थातच ते एक पौराणिक पद्धतीचे नाट्य झाले असते. खिस्ती पुराणाचा आधार घेऊन कीर्तन्यांना आपले नाटक खिस्ती पद्धतीनेही पौराणिक बनवावयाचे नव्हते. या दृष्टीने त्यांची इंग्रजी प्रस्तावना अतिशय महत्त्वाची आहे. ते लिहितात, " माणसाचे बाह्य रंगरूप वर्णन करणे हे नाटककाराचे काम नाहींच...प्रस्तुतसारख्या कृतीत नाटककार मनुष्याच्या भावभावना आणि विकार यावरच सामान्यपणें आपले लक्ष केंद्रित करतो आणि त्याच अर्थाने मीही केवळ भावना आणि विकार यांचाच विचार येथें केला आहे. "[5]

---

१. प्रा. द. वा. पोतदार लिहितात, " जयपाळ नाटकाचे संविधानक Old Testament-मधील Genesis या पर्वातील ४१ ते ४९ या अध्यायातील कथेचे आधाराने आहे, असे उघड दिसते. या कथेत नायक Joseph हा आहे. सात वर्षांचा दुष्काळ, गूढ स्वप्न, आप्तभावाची भेट इत्यादी सर्व Joseph कथेतील प्रकार जयपाळ नाटकात आणिले आहेत. जयपाळ म्हणजे Joseph; Job नव्हे. कदाचित जोसेफचा बाप Jacob व Job याचे नावांचा विस्मरणाने घोटाळा होऊन रा. ब. महाजनि यांनी वरील अभिप्राय दिला असावा. ही चूक माझे मित्र प्रो. रा. प. सबनीस यांनी माझे नजरेस आणली. " ( मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (१९२२), परिशिष्ट : १४–१५)

2. The story has evidently an entirely Hebrew origin; the drama seems to be a thoroughly Maratha production.

Preface, जयपाळ नाटक, पृ. १.

३. शालापत्रक, पु. ४, अं. १२, एप्रिल १८६५, पृ. २६९–२८०.

४. तत्रैव, पृ. २७४.

5. It is not the dramatist's business to draw a picture of the outward man...... It is with the feelings and passions of man alone one can concern himself in a work like this, and it is with the feelings and passions alone, therefore, that I have concerned myself in this work. जयपाळ, प्रस्तावना, पृ. १, २.

शालापत्रककारांनी ' जयपाळ'ची तुलना जुन्या संस्कृत नाटकांशी करून त्यात एखादा रस प्रधान कल्पून तो परिपुष्ट केलेला नाही, किंवा संविधानकही तितकेसे खुबीदार नाही, अशी तक्रार केली आहे. वास्तविक ही सर्व टीका कीर्तन्यांच्या ' जयपाळा'च्या बाबतीत गैरलागू आहे. एका दृष्टीने रसपरिपोषात्मक काव्यात्म नाटक लिहिण्याचा त्यांचा हेतूच नव्हता. त्याना एखादे कल्पित अद्‌भुतरम्य कथानक घेऊन त्यावर नाटक लिहून मनुष्यस्वभावातील प्रेम, वात्सल्य, ईर्ष्या, द्वेष इत्यादी भावनांचे व विकारांचे निरूपण करावयाचे होते. हे करिताना त्यांना कल्पित कथा-श्रयाने येणारे संकेत पाळावे लागले. जयपाळासारख्या सात्त्विक, सद्‌गुणी पुरुषाचे भाग्य, दुष्टांनी कितीही कारवाया केल्या, तरी शेवटी उदयाला येऊन तो भार्या व पुत्र यांच्या सहवासात सुखाने राहू लागतो, व आपल्या अपराधी बांधवांनाही औदार्याने क्षमा करून त्यानाही सुखी करितो, असे येथे दाखविले आहे. ' काममदाने अंध झालेली, पुरुषसंगासाठी वेडावलेली ' कमळजाही पश्चात्तापदग्ध होऊन जयपाळावर केलेल्या खोट्यानाट्या हीन आरोपाबद्दल क्षमा मागून प्राण सोडते. जयपाळाचे लग्न राजकन्येशी होऊन पुढे त्यास पुत्रप्राप्ती होऊन वात्सल्याचाही ती आनंद घेतात.

न्यायमूर्ती रानड्यांसारख्यांनी या कृतीचा गौरव केला आहे. एक म्हणजे जयपाळ हे कल्पित असे प्रामुख्याने कथानकप्रधान नाटक असले, तरी वातावरण-निर्मिती व भाषा या दृष्टींनी ते फार सरस उतरले आहे. कीर्तन्यांनी या बाबतीत आपली श्रेष्ठता ' माधवराव ' नाटकाच्या रूपाने आधीच सिद्ध केली होती. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीही भाषेच्या दृष्टीने ' जयपाळा'चा गौरव केला आहे.[२] पुढेही कल्पित, कादंबरीवजा नाटके लिहिण्यात आली. परंतु त्यांच्या भाषेतील शैथिल्य, अशुद्धता आणि कृत्रिम आलंकारिकता पाहून कोणीही नाकच मुरडतो कीर्तन्यांच्या या नाटकात मूळ कथानक पौराणिक असूनही अद्‌भुताचा आश्रय कोठेच केलेला नाही. उलट, नित्याचेच जीवन तेथे चितारले आहे. मात्र कथानकात राजे, प्रधान, राण्या, राजपुत्र याचेच प्राधान्य आहे. हीही गोष्ट कल्पिताच्या संदर्भात सांकेतिक झालेली होती. प्रणयाचे वर्णनही यात अगदी मित आहे. पुढील कल्पित नाटकांतून प्रणय-वर्णनाचा संकेत बनवून उत्तान कामोद्दीपक वर्णनांची आपली हौस लेखकांनी भागवून घेतलेली दिसते. त्या दृष्टीने कीर्तने यांनी अत्यंत संयमाने ही एक सोज्ज्वळ, सरळ कृती निर्माण करून सहज व सोप्या लेखनाचा एक आदर्शच निर्माण करून ठेविला. जयपाळाचे जीवनचरित्र वर्णन करिताना इतके विविध प्रसंग आणि इतकी विविध पात्रे रंगभूमीवर अत्यंत वास्तववादी पद्धतीने त्यानी आणिली आहेत की, कल्पित नाटक असूनही खऱ्याखुऱ्या जीवनाचे व नित्याच्या व्यवहारात भेटणाऱ्या सुष्टदुष्ट प्रवृत्तींच्या लोकांचेच ते चित्र आहे, असे वाटू लागते. आणि म्हणूनच जयपाळ

२. निबंधमाला ( १९२६ ), भाषापद्धती, पृ. १४३.

नाटकावर मनसोक्त टीका करूनही शेवटी शालापत्रककारांना कीर्तन्यांच्या कृतीतील विवादातीत गुणांची प्रशंसाच करावी लागली. ते लिहितात, "एकंदरींत पाहतां कीर्तने यांची खुबीदार व रसिक भाषा, लिहिण्याची शैली व त्या त्या पात्राच्या भिन्न स्वभावाचें हुबेहूब वर्णन करण्याचे सामर्थ्य व त्या त्या प्रसंगास योग्य मनोविकार दर्शविण्याची खुबी वगैरे नाटककर्त्याच्या अंगीं जे गुण अवश्य असावे लागतात ते कीर्तन्यांच्या अंगीं नांवाजण्यासारखे आहेत असें सर्वांस कबूल केले पाहिजे."[1] कृ. आ. गुरुजींनी मात्र थोड्या खोचकपणे लिहिले, "थोरले माधवरावानंतर थोड्याच दिवसांनी – बहुतकरून १८६४–६५ हेच वर्ष असावे – या वर्षी मशारनिल्हे कीर्तन्यांचेच जयपाळ नाटक रंगभूमीवर आले. परंतु त्यांत 'एक साखरेचा' नाहीं आणि सतीहि पण नाहीं, म्हणून त्याचा बडेजाव व्हावा तितकासा झाला नाहीं."[2]

## धोंडो भिकाजी मराठे : विलासतरंगिनी नाटक (१८७१)

धों. भि. मराठे यांनी आपल्या ग्रंथास 'नाटक' म्हटले आहे, म्हणूनच यास नाटक म्हणावयाचे. या नाटकास संविधानक असे काहीच नाही. अद्‌भुत म्हणजेच कल्पित असा कथाभाग येथे जवळजवळ निवेदनच केला आहे. पात्रे आपली शोभेलाच आहेत. सज्जनांवर संकटे एकामागून एक व एकापेक्षा दुसरे भयंकर, अशी ही यावयाचीच, हा या कल्पित नाटकांतील संकेतच ठरून गेलेला असल्यामुळे चंद्रशेखर राजाविरुद्ध षड्‌यंत्र करून त्याचे दायाद त्यास त्याची राणी विलोचन व पुत्र कमलनाभ यांसह वनवासास पाठवितात. एवढा कथाभाग सांगण्यासाठी पुस्तकातील निम्मी पाने जवळजवळ खर्ची पडली आहेत. वनात आल्यावर 'काय हो या वनाचे वर्णन करावे,' म्हणून वनवर्णनासाठी पुन्हा आणखी काही पाने पाल्हाळिक वर्णनांनी भरून काढिली आहेत. पुढे वनामध्ये आल्यावरही राजाचे दुष्ट दायादपुत्र कमलनाभ हा पाणी पिण्यास एकटा गेला असता त्यास ठार मारण्याचा प्रयत्न करितात. त्यांच्या दृष्टीने जरी तो वार लागून मेला असला, तरी तो मेलेला नसतो. इकडे राजा आणि राणी पुत्रवियोग झाला म्हणून आक्रोश करीत निघून जातात. पुढे कमलनाभ जरा हुषारी वाटू लागल्यावर एकटाच हिंडत राहतो. हिंडता-हिंडता तो जाफरदेशात सुतनंदा अरण्यात येतो. त्या वनात घृतमारीच नावाचा राक्षस राहत असतो. त्याने कुंजदेशातील महमद जानसेन याची कन्या विलासतरंगिनी ही पळवून आणिलेली असते. कमलनाभ आणि विलासतरंगिनी यांची दृष्टादृष्ट होताच त्यांचे एकमेकांवर प्रेम जडते. परंतु एवढ्यामध्ये तो दुष्ट राक्षस तिला घेऊन द्विपदी अरण्यात जातो. कमलनाभही प्रियेच्या शोधार्थ निघतो. वाटेत त्यास दोन फकीर भेटतात व अजिक्य शस्त्र देतात. इकडे जाफरदेशातील एका सावकाराची सून कमलावती ही

१. शालापत्रक, पु. ४, अं. १२, पृ. २७८.
२. नाटकाची स्थित्यंतरे, रंगभूमी, व. ४–५, पृ. २३.

पतीबरोबर शिकारीस गेली असता श्वापदाकडून तिचा पतीच मारला गेल्यामुळे यतीचा वेष धारण करून पुरुषवेषात वनात हिंडत असते. त्यामुळे विलसतरंगिनीस ती कमलनाभाप्रमाणेच भासते. पण पुढे भ्रमनिरास होऊन या दोन्ही स्त्रिया एकत्र राहू लागतात. याच वेळी कमलनाभ येथे येतो. यांच्या भेटीचे आपल्या दृष्टीने मोठे काव्यात्मक वर्णन करण्याचा ग्रंथकाराने प्रयत्न केलेला आहे. पण त्यात काव्य नाही, रस नाही व वैदग्ध्यही नाही. ते वर्णन पुढीलप्रमाणे —

**कमलनाभ**:— "अरे अरे काय शब्द हे ! माझे तर चित्तास असे वाटते की, हे अमृताचे थेंबच गळतात कीं काय? अभ्रांत जसा चंद्रमा आच्छादन होतो तदनुसार या पुष्पवेलींत हा मुखचंद्र आच्छादित होता. तर आज माझे भाग्य म्हणून हा दृष्टीस पडला. पण या चंद्रानें शयन केलें कसे तर या ज्यानु ज्या आहेत या कशा दिसतात, जसे कर्दळीचे स्तंभ आणि त्यापासून सनाल कमल उत्पन्न झालें तेच हें करकमल आणि त्या कमलावर चंद्रानें शयन केले तोच हा मुखचंद्र. पण या चंद्रावर दोन कमले दिसतात काय? अघटित तींहि नेत्रकमलें आणि त्या कमलांतून यमुनस्राव होतो. बरे गंगोदक कां न म्हणावें तर कज्जलयोगें शामवर्ण यमुना असेंच नांव दिलें."[1]

शेवटी लेखकाने नाटक मोठ्या मौजेने गुंडाळले आहे. तो लिहितो, "असें बोलून त्रिवर्ग तिचे स्थलीं विहार करूं लागले. ती पति मृत झाल्यासमर्या गरोदर होती तिचा विस्तार व कमलनाभाच्या आईबापाच्या भेटीविषयीचा आणि राक्षसनिधन सर्व सुखोपाय सानुकूलतेचे लक्षण सुज्ञ वाचक मित्रांनो आश्रय दिल्यास पुढील भाग करण्याची उमेद ठेविली आहे." 'श्री-संगमेश्वर-मारुती-प्रसन्न धोंडो भिकाजी मराठे सांगलीकर नाटकवाले' अशी स्वनाम-निशाणीही लेखकाने शेवटी ठोकली आहे.

शालापत्रकात या नाटकावर कडक टीका लिहिली गेली. "हें नाटक नव्हे हें स्पष्ट दिसते. संविधानकाचा या ग्रंथांत मागमूस देखील नाहीं. फक्त गोंधळी कथे-सारखें चऱ्हाट वळले आहे."[2]

## रावजी मनोहर ताकभाते : 'हंसपालिका' (१८७२)

हंसपालिका हेही नाटक कल्पित असल्यामुळे एकंदर ते कादंबरीच्या थाटावरच गेले आहे. यात समग्र गोष्टीचे लेखकानेच चार भाग कल्पिले आहेत. अंक हा शब्द येथे नाही. मात्र चार भागांत विविध प्रवेशांची रचना केली आहे. 'ग्रंथ-कर्त्याचा उद्देश' म्हणून प्रारंभी केलेल्या निवेदनात काही महत्त्वाच्या गोष्टी लेखकाने सांगितल्या आहेत. प्रस्तुत नाटक असले, तरी 'नुतन उमेदवारांस (स्त्रिया वगैरे)'

१. विलासतरंगिनी, पृ. ८९–९०
२. शालापत्रक, पु. १३, अं. ७, नोव्हेम्बर १८७३, पृ. १४६.

वाचनाची गोडी लागावी म्हणूनच आपण ते लिहिल्याचे तो सांगतो. लेखक लिहितो, ‘स्त्रियांना वाचण्यास तर सोपें असावें आणि मनोरंजन तर उत्तम व्हावें अशीं कल्पित पुस्तकें कादंबऱ्या किंवा नाटकें फारशीं प्रसिद्ध दिसत नाहींत. पुराणांवरून किंवा भाषांतरांवरून गद्य-पद्य अशीं बरींच झालींत. परंतु कल्पित असून वाचण्यास सोपीं व मनोवेधक अशीं फारच कमी असतील. पुस्तकांच्या मधून कविता असल्यानें तीसहित वाचणारे व त्यासरसांच सर्व अर्थ ध्यानात आणणारे असें वाचणार, स्त्रिया वगैरे नुतन उमेदिचे मंडळींत कमीच निघतील आणि त्यामुळें पुस्तकांच्या मधून कविता असल्या म्हणजे त्यांच्या वाचण्यांतील रसाचा विपर्यास होतो, असे पुष्कळ आढळते. नुतन उमेदिचे वाचणारास प्रथम मनरंजन होऊन वाचण्याचा चटका लागला, म्हणजे मग आमच्या देशबांधवांनीं केलेलीं गद्यपद्यात्मक पुस्तके उपयोगीं खरीं ” [१]

शृंगारपूरचा राजा भवनपाल व त्याची राणी यांना चंद्रपुरीच्या चंद्रकांताने त्याच्या राजधानीवर हल्ला केल्यामुळे जीव बचावण्यासाठी वनात जावे सांगते. घनामध्ये त्यांना हंसपक्ष्यांनी वाढविलेले एक कन्यारत्न गवसते. रामोशांच्या वस्तीत राहून ते तिला लहानाची मोठी करितात. ही गोष्ट एका फितूर रामोशाकडून चंद्रकांतास कळते. तेव्हा भुवनपालाला ठार करण्यासाठी तो सिव्हबल सेनापतीस पाठवितो. जंगलातील काळूबाईसमोर राजाराणीचा बळी देऊन हंसपालिका मिळविण्याचा बेत सेनापती आखतो. परंतु याच वेळी शिकारीस आलेला चंद्रकांताचा पुत्र सौंदर्यसागर व हंसपालिका यांची गाठ पडून ती एकमेकांकडे आकृष्ट होतात. सिव्हबलाचे कारस्थान हाणून पाडून तो शेवटी हंसपालिकेशी लग्न करितो. प्रस्तुत नाटक हे रचनेच्या दृष्टीने ‘विलासतरंगिनी’पेक्षा कितीतरी पटीने बरे आहे. यात हंसांनी एखाद्या मुलीचे पालन करणे यापेक्षा अन्य अद्‌भुत असे फारसे नाही. परंतु सज्जनावर दुष्टांनी आणलेली संकटे, त्या संकटांतून पुढे त्यांची झालेली सुटका इत्यादी विषय कल्पितकथेच्या संकेतानुसार अपरिहार्यपणे आलेले आहेत. ही जरी एक कथनपर प्रदीर्घ कथा असली, तरी या कथानकात कृतिप्रधान अशा घटना निर्माण करण्यात लेखकाचे कौशल्य दिसते. केवळ अद्‌भुत अशा गोष्टींच्या पाल्हाळात कृतिप्रधान व कार्यकारणभावयुक्त घटना येतच नाहीत. त्या दृष्टीने या नाटकात लेखकाने काही एक-सूत्र राखले आहे. तथापि केवळ घटनांवर दृष्टी केंद्रित झाली असल्यामुळे आणि सुष्टपणाची आणि दुष्टपणाची विभागणी आधीच पात्रांमध्ये करून टाकिल्यामुळे सामान्यपणे कृतिप्रधान घटनांतही रेखीव व्यक्तिचित्रास जो अवसर प्राप्त होतो, तो अर्थातच येथे नाही. मात्र या कल्पित वाङ्मयामध्ये अद्‌भुतरम्यतेबरोबर सांकेतिक रीतीने जे प्रणयवर्णन येते, त्याच्या संदर्भात या नाटकात काही मौजेचे नाट्यपूर्ण प्रसंग आलेले आहेत, ते पाहण्यासारखे आहेत.

१. हंसपालिका, पृ. ४–५

हंसपालिका आणि सौंदर्यसागर यांची प्रत्यक्ष दृष्टादृष्ट जेथे होते, तेथे लेखकाने कल्पकतेने एका प्रसंगाची योजना केली आहे. सौदर्यसागर आपला शेला बाणाच्या साहाय्याने उडवितो, तो नेमका हंसपालिकेपाशी येऊन पडतो आणि मग शेल्याला निमित्त करून दोघांमध्ये उपालंभपूर्वक जे सवालजवाब होतात, ते थोडेफार कृत्रिम आणि जुन्या विदग्ध शैलीत पडणारे असले, तरी एकंदर मनोरंजक आणि नाट्यपूर्ण झाले आहेत, असेच म्हणावे लागेल. 'अरसिक शेला' पुढे सौभद्रात आलाच आहे. मात्र या संवादात बराचसा भर उत्तान शृंगारावर आहे.

अशा कल्पित कथांत प्रणय जरी अपरिहार्यपणे येत असला, तरी येथे प्रणयापेक्षा कामाचेच वर्णन उद्दीपक रीतीने करण्यावर लेखकाने भर दिला आहे. हंसपालिका आणि सौंदर्यसागर यांच्या पहिल्याच भेटीत त्यांच्या मनात जे विचार आले आहेत, ते पाहिले असता वरील म्हणण्याची प्रतीती येईल. हंसपालिकाही आपली कामभावना निःसंकोच बोलून दाखविताना दिसते.

जनार्दन मोरोबा पाटील यांच्या 'आई नर्मदा अथवा भ्रांतिनिरसिनी'मध्येही नाट्य जवळजवळ नसून कथात्मक पाल्हाळच बराच आहे. हंसपालिकेच्या पद्धतीचे उत्तान कामुक संवादही आहेत. ग. पां. कमळाकर व मा वि. कानिटकर यांचे 'सूर्यकान्त व नागकन्या' किंवा ग. वि. कानिटकर यांचे 'मनोरंजक चंपावती' ही नाटके कल्पित-कथावजाच असून फारच सामान्य आहेत.

**कृष्णाजी परशुराम गाडगीळ : 'फटफजितीचा कळस' (१८७४)**

प्रस्तुत नाटक हे फार्स-स्वरूपाचे विनोदी नाटक नसून एक-अंकी कल्पित नाटक आहे. हे नाटक कल्पित असले, तरी यात अप्रत्यक्षपणे काही सामाजिक चित्रण आल्यामुळे त्यास थोडेफार महत्त्व प्राप्त झाले आहे. शिवाय, कमालीचा दुष्ट पुरुष कसा असतो, हे दाखविण्यासाठी या नाटकातील मुख्य पात्र जो 'दुष्टबुद्धि', याचे व्यक्तिचित्रण जे लेखकाने केले आहे, तेही अतिशयोक्त असले, तरी मानवी स्वभावावर प्रकाश पाडणारे आहे. 'एका अति निर्लज्ज, पापी बदमाषाचे चित्र रेखाटण्याचा मी कित्येक दिवस प्रयत्न करीत' असल्याचे सांगून लेखकाने त्या व्यक्तिचित्रात रंग भरण्यास फ्रेंच राज्यक्रांतीच्या इतिहासातील काही व्यक्तींचा आणि प्रसंगांचा उपयोग कसा झाला, हे आपल्या इंग्रजी प्रस्तावनेत सांगितले आहे.[1] दुष्टबुद्धी हा एक बनेल दुष्टकर्मा असतो. त्याला महाप्रयासाने पकडण्यात आल्यावर न्यायासनासमोर त्याची चौकशी होऊन त्याला फाशी होईल, असाच सर्वांचा व त्याचा तर्क असतो. 'माफी मागून सुटका करून घ्यावी,' अशी विनवणी त्याची एकुलती-एक पोर त्यास करिते. त्या वेळी तो तीस म्हणतो,

1. I have long been picturing to myself a shameless criminal.
फटफजितीचा कळस, प्रस्तावना.

" आम्हांला अक्कल नाहीं; आम्ही बेवकुब, मूर्ख टोणपे; उपड्या वळणाऱ्या पोरांनी देखील आम्हाला शहाणपण शिकवावें असाच विपरीत काळ आला. पोरट्ये, मला कां तूं अक्कल शिकवितेस ? तुझ्या आईनें खरोखर कोणाशीं लपंडाव खेळूंन तुझ्यासारिखें हें बावन कोटी मोलाचे रत्न पैदा केलेन. माझी पोर असतीस तर असली बुद्धि तुला सुचतीना. "[1]

परंतु पुढे न्यायासनासमोर त्याचा धीर खचतो व 'दया करा,' अशी तो शेवटी करुणा भाकतो. पुढे त्यास १४ वर्षांची सजा फर्माविली जाते. परंतु तुरुंगात पुन्हा त्याचा पूर्वस्वभाव जागृत होतो. त्याचे स्वगत पुढीलप्रमाणे —

**दुष्ट** — (उसासा टाकून) काय रे नशिबा, हा कळस केलास ! हे पायात काय ! हे डोक्यावर काय ! काय नशिबा तुझे ताल आहेत ! ( विचार करतो ) रे मना तुला धिःकार असो. पुरुषाचे मन असतां तूं बायकांच्या अदृढ मनासारिखा नशिबास दोष लावीत बसतोस ? नाहीं, नाहीं ! आशेसारिखे अमृतफल कोठे नाहीं. चौदा वर्षे या भेसूर कारागृहांत वास ! अं ! यांत कांहीं नाहीं. हूं हूं म्हणता चौदा वर्षे निघून जातील. आज जाऊन उद्यां येईल. उद्यां जाऊन परवा येईल ! चौदा वर्षे म्हणजे काय पदार्थ ! जनांत म्हणण्याची अशी चाल आहे कीं, एका घटकेत हिकडचे जग तिकडे होते, पण हे म्हणणे जगाच्या व्यापारासारिखें खोटे आहे. पाहा, आज चाळीस वर्षें जगास मी चेपले, तृणवत मानिलें, हजारों त्याच्याशीं शिरजोरीचीं कृत्यें केलीं, परंतु पहिल्यापासून आतांपावेतों जग सारखेच. येवढा वेळपर्यंत त्याच्याने हूं कां कुं सुद्धा करवले नाहीं. आशे ! मला बल दे म्हणजे झाले. पुनः सर्वांचे उरावर बसेन. "[2]

दुष्टबुद्धीचो रखेली सावित्री जिवंतपणीं स्वस्थ बसली, तरी मेल्यावर स्वस्थ बसली नव्हती, हे लेखकाने योजिलेल्या पिशाचांच्या प्रसंगावरून मोठ्या भयानक रीतीने कळून येते. नाटकीय परिणामाच्या दृष्टीने हे प्रसंग योजिण्यात लेखकाची विशेष चातुरी दिसून येते. सावित्रीचे पिशाच दुष्टबुद्धीला तुरुंगात भेटते.

पुढे त्या पिशाचाने झुगारून दिल्यामुळे समोरील भिंतीवर जाऊन आदळून दुष्टबुद्धी मरण पावतो. एकूण व्यक्तिचित्रण, वातावरण, सामाजिक संदर्भ आणि परिणामकारकता या सर्व दृष्टींनी हे छोटेखानी नाटक या काळातले एक लक्षात राहणारे नाटक आहे, असेच म्हणावेसे वाटते.

याच कल्पनारम्य गटात 'कृपनिधि' लेखक वा. मा. केळकर (१८६५) आणि 'छेलबटाऊ आणि मोहनाराणी', लेखक डेविड हाइम (१८७२) याही नाटकांचा समावेश होतो.

---

१. फटफजितीचा कळस, पृ. ३.

२. फटफजितीचा कळस, पृ. २२-२३.

## आठ

# सामाजिक नाटके

या कालखंडात पौराणिक, ऐतिहासिक वा कल्पित स्वरूपाची नाटके ज्या विपुल प्रमाणात लिहिली गेली, त्या प्रमाणात सामाजिक नाटके लिहिली गेलेली दिसत नाहीत. अवघी दोनचार नाटके या तीसपसतीस वर्षांत लिहिली गेली. गोविंद नारायण माडगावकर यांचे 'व्यवहारोपयोगी नाटक' प्रथम ज्ञानप्रसारक मासिकात १८५७-मध्ये प्रसिद्ध झाले. या छोटेखानी नाटकाला नाटक म्हणणेही कठीण आहे. तो एक 'व्यवहारोपयोगी नाटकरूप निबंध' असल्याचेच माडगावकरांनी प्रांजळपणे सांगितले आहे. असेच एक दुसरे छोटेखानी सुबोध नाटक 'मोजनबंधू पानतंबाखू' या नावाचे त्याचे प्रसिद्ध झाले. ज्यांना खऱ्या अर्थाने सामाजिक नाटके म्हणता येतील, अशी दोन नाटके 'मनोरमा' आणि 'प्रबोध-विद्युत् अथवा स्वैरसंकेशा' ही सुमारे ११ वर्षांचा अवधी लोटल्यानंतर १८७१-मध्ये प्रसिद्ध झाली.

### सामाजिक नाटकांचे मूळ – फार्स

सामाजिक नाटकांचे मूळ फार्सात किंवा प्रहसनात असल्याचा जो तर्क अनेकांनी केलेला आहे, तो पुष्कळ अंशी बरोबर आहे. मात्र फार्स किंवा प्रहसन यांचा आज जो केवळ विनोदी स्वरूपाचे नाट्य असा अर्थ आहे, तसा तो या काळात केला जात नव्हता, हे लक्षात ठेविले पाहिजे. काही ऐतिहासिक स्वरूपाच्या गंभीरच नव्हे, तर शोकान्त नाटकांनासुद्धा फार्स म्हणण्याची प्रथा होती, हे 'नारायणराव पेशव्यांच्या वधाचा फार्स', किंवा 'अफझुलखानाच्या मृत्यूचा फार्स' इत्यादी त्या काळच्या खेळांच्या जाहिरातींतील मजकुरावरून लक्षात येईल. विशेष स्वरूपाचेही काही फार्स असत. परंतु फार्स-स्वरूपाच्या अशा या छोटेखानी नाटकांनी मराठी नाट्यसृष्टीत एक नवे युग निर्माण होण्यास जोराची चालना दिली, हे विसरून चालणार नाही. भावे-पद्धतीच्या नाटकांची लोकप्रियता सामान्यपणे १८६५-नंतर क्रमाक्रमाने ओसरू लागली. लोकांना त्या ठराविक पद्धतीच्या व थोड्याफार आर्ष-पौराणिक नाटकांचा वीट येत चालला होता. अद्‌भुत, अतिमानवी व कोलाहलयुक्त अशा तऱ्हेच्या पौराणिक नाटकांनी काही काल लोकांचे रंजन झाले असले, तरी कालांतराने पुढे प्रेक्षकांची अभिरुची अधिक उन्नत आणि चोखंदळ होत गेल्यामुळे पौराणिक नाटके आता त्यांच्या मनाची पकड घेऊ शकत नव्हती. सूत्रधार-विदूषकांचे काही थोडे लौकिक स्वरूपाचे असलेले विनोदी नाट्यही त्यांना आता रंजवू शकत नव्हते. त्यातही फारच ठराविकपणा येऊन बसला होता. शिवाय, विदूषकाचा अचरटपणावर आधारलेला विनोदही प्रेक्षकांना फारच ग्राम्य आणि क्वचित बीभत्स वाटू लागल्यामुळे त्यालाही ते कंटाळले होते.

## फार्सांचे सामाजिक स्वरूप

या वेळी पौराणिक नाटकांपेक्षा अगदी वेगळे परंतु लौकिकातले असे काही या फार्सां नी प्रेक्षकांसाठी रंगभूमीवर निर्माण केले. त्यांत देव नव्हते, दानव नव्हते, विदूषक नव्हता, सूत्रधार नव्हता. टाळ-मृदंग-वीणा यांच्या साथीवर म्हटले जाणारे रटाळ कवित्व नव्हते. रोजच्या लौकिक सृष्टीतील माणसे प्रेक्षकांना येथे प्रथम दिसली. विनोद-निर्मितीसाठी काही सामाजिक विषय घेऊन त्यातील दोषावर लक्ष केंद्रित होईल अशा पद्धतीने त्यांतील प्रसंगयोजना करून हे फार्स केले जात असत. त्यामुळे, म्हणजेच फार्सांच्या अपौराणिकतेमुळे, आपोआपच त्यांमध्ये समाजाचे, त्यातील वेगवेगळ्या थरांतील व्यक्तींचे, व काही सामाजिक प्रश्नाचेही चित्र उमटले. प्रा. बनहट्टीनी या संदर्भात केलेली मीमांसा महत्त्वाची आहे. ते लिहितात, "विष्णुदासप्रणीत पौराणिक नाटकांत संघटित कथानक आणि कलात्मक एकात्मता यांचा बहुतांशी अभावच असे. ओबडधोबड व प्राथमिक स्वरूपात का होईना, पण फार्सांत या गोष्टी होत्या. फार्सांतल्या व्यक्ती व घटना पौराणिकाप्रमाणे दैवी व अद्‌भुत नसून तत्कालीन समाजस्थितीस अथवा इतिहासास अनुसरून कल्पिलेल्या असत. यामुळे पौराणिक नाटकांपेक्षा अगदी निराळी अशी आत्मीयता प्रेक्षकांना त्यांच्याविषयी वाटे. तेव्हा सुसंघटित नाट्यकला आणि सध्याच्या समाजजीवनास अनुसरून असलेले चित्र वठविण्याची प्रवृत्ती या दोन फार महत्त्वाच्या गोष्टी या फार्सांमुळे मराठी रंगभूमीवर रूजू झाल्या, हे लक्षात ठेविले पाहिजे."[१] न्या. रानडे यांनी तर स्पष्टच म्हटले आहे, "ज्याप्रमाणे फार्सांनी जुन्या पौराणिक नाटकाविषयी आवड कमी करून टाकून आपले आसन जमविले, त्याप्रमाणे व यथाक्रम त्यांची ही जागा पुढे राजकीय आणि सामाजिक विषयांची चर्चा करणाऱ्या नाटकांनी घेतली."[२] खास विनोदी व हास्यकारक प्रहसने किंवा फार्स म्हणून ज्यांचा उल्लेख करण्यात येतो असे बरेचसे फार्स पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले या कालखंडात मिळतच नाहीत. फार्साला सुरुवात जरी १८६० साली झाली, तरी 'गुलाबछकडीचा फार्स', 'दामाजीपंताचा फार्स', इ. पुस्तके छापील स्वरूपात १८८०-च्या पुढेच पहावयास मिळतात. तोपर्यंत 'बुकिश' अशा ऐतिहासिक पुस्तकी नाटकांना 'फार्स' हा शब्द लावण्यात येत असावा, असे दिसते.

राजकीय विषयांवर नाटके लिहिली जाण्याचा काल अद्यापि दूर होता. तरी तुरळक का होईना, सामाजिक विषयांवरील नाटके या काळात लिहिली गेली. इंग्रजाचे

१. मराठी रंगभूमीचा इतिहास, खंड १ पृ. १७५.

2. Just as the farces superseded the interest in the Old Puranic Dramas, they have been in turn succeeded by dramas which refer to social and political subjects.

Miscellaneous Writings, P. 41.

राज्य महाराष्ट्रात सुव्यवस्थितपणे चालू झाल्यावर शिक्षणाने आणि नव्यानेच सुरू झालेल्या कायद्याच्या राज्याने लोकांमध्ये एक नवीन वैचारिक जागृती निर्माण झाली. शिक्षणाचा प्रसार झपाट्याने होऊ लागल्यामुळे लोकांच्या डोळ्यांवरची रूढीची झापडे तटातट गळून पडू लागली. स्त्रियांविषयी एक नवीन उदार दृष्टिकोण शिक्षित वर्गात प्रसृत पावला. त्यामुळे त्या काळच्या बऱ्याचशा सुधारणामूलक आंदोलनांत स्त्रियांच्या स्वातंत्र्याचा वा मुक्तीचा प्रश्न प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे निगडित झालेला दिसून येईल. स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, बालाजरठविवाहनिषेध, विधवावपननिषेध, पुनर्विवाह, हुंडाविरोध, कन्याविक्रयनिषेध इत्यादी चळवळींना या काळात बरेच महत्त्व आले. या आंदोलनांचा वाङ्मयाच्या दृष्टीने काय परिणाम झाला, तोही पाहिला पाहिजे. सामाजिक परिस्थिती व वाङ्मय याचा संबंध सापेक्ष आणि क्रियाप्रतिक्रियात्मक स्वरूपाचा असतो. सामाजिक परिस्थिती किंवा युग हे जसे नव्या वाङ्मयाला जन्म देते, त्याचप्रमाणे वाङ्मयही नव्या युगाचे प्रवर्तन करण्यास कारणीभूत होते. वास्तवाचे प्रतिबिंब वाङ्मयात पहावयास मिळते हे वरीलपैकी पहिल्या कारणाने, तर प्रचारासाठी किंवा काही उद्दिष्टासाठी लिहिलेले वाङ्मय हे दुसऱ्या परिस्थितीतून संभवते. तथापि वास्तव चित्रणासाठी असो वा प्रचारासाठी असो, कोणताही विषय कलेच्या माध्यमाने सांगावयाचा असेल, तर तो एका वेगळ्याच रीतीने कलावंताच्या मनात दीर्घकाळ मुरावा लागतो. तसा तो पक्का मुरल्यावरच त्यातून खरी कलाकृती जन्मास येते. परंतु धसमुसळेपणाने, आग्रहाने जर त्यावर कलेचे तंत्र लादण्याचा प्रयत्न केला, तर मात्र अपयश पदरी येते. या काळात लिहिलेल्या सामाजिक नाटकांसंबंधी ऐतिहासिक दृष्टीने चर्चा करिताना हीच गोष्ट प्राधान्याने लक्षात घ्यावी लागेल.

**गोविंद नारायण माडगावकर : ' व्यवहारोपयोगी नाटक '**

बोध ह्या वाङ्मयाच्या आद्य हेतूला धरून माडगावकरांनी हा ' लहानसा व्यवहारउपयोगी नाटकरूप निबंध ' लिहिला आहे. प्रारंभीच ते लिहितात, " यांत ज्या कित्येक गोष्टी लिहिल्या आहेत,: त्या अनुभविक असून वारंवार लोकांच्या आढळण्यांत येतात. मुलांचे लहानपणीं लग्न करण्यांत व लग्नांत बडेजावीने वावगे खर्च करण्यांत आमचे लोक किती उत्सुक असतात आणि ते साधून घेण्यास कसे तापत्रयांत पडतात हे सर्व निरनिराळ्या पात्राच्या द्वारे येथे प्रगट केले आहे. अविचाराने चालले असतां आपली नासाडी होती हे लक्षांत आणून आमच्या लोकांनीं पुढें सावध व्हावे हाच ग्रंथकर्त्याचा मुख्य उद्देश आहे. "[१] या नाटकाचे कथानक अगदी साधे असून त्यात फक्त पाच प्रवेश आहेत. त्रिंबकराव नावाचा एक दरमहा १५ रुपये मिळविणारा सरकारी नोकर बायकोच्या व उपाध्यायाच्या भरीला पडून आपला शाळेत तिसरे बुक शिकणारा मुलगा व त्याच्यापेक्षा धाकटी असलेली मुलगी या दोघांची लग्ने

१. ज्ञानप्रसारक, पु. ८, अं. ६, पृ. १६१.

करण्यास उभा राहतो. लग्न थाटाने उरकण्यासाठी घर गहाण लिहून देऊन मारवाड्याचे कर्ज काढतो. गुजर व्यापाऱ्यांकडून तूप, कापड उधारीवर आणितो. ताशे, इंग्रजी बाजा, नायकिणीचा नाच या आवश्यक (?) गोष्टींतही भरमसाट खर्च होतो. पुढील भाषणावरून याची कल्पना येईल.

**नोकर**— ( बाहेर येऊन त्रिंबकरावास सांगतो ) काका आज तर नायकिणी आणि ब्यांडवाले, एवढे चढले आहेत कीं कांहीं बोलतां नये. मी तर आज पाचसहा रांडांची घरे फिरून फिरून दमलों. कोणी ३० रु. मागते, कोणी ५०. याखालीं बोलतच नाहीं. शेवटीं गुलाबीस मोठ्या शरतीनें ४० रु. ठरवून तिला विडा देऊन आलो.[1]

पुढे लग्नसमारंभ आटोपल्यावर देणेकरी दारी येऊन बसतात. शेवटी त्रिंबकराव नादारीत अर्ज देतो. मारवाडी घराचा कब्जा घेतो. त्रिंबकरावास दुसरीकडे भाड्याच्या घरात जावे लागते. लग्नाच्या कटकटीत फार दिवस गैरहजर राहिला म्हणून चाकरीवरून तो बडतर्फ होतो; लग्न झालेल्या शाळेतील मुलाची फी तुंबल्यामुळे त्यालाही शाळेतून काढले जाते. शेवटी वैतागून त्रिंबकराव म्हणतो, "परमेश्वरा, लोकांची खुशामत करणे नको. मेहेनत करून भाजीभाकर खाऊन राहतात ते आज किती सुखी! अगदीं लहानपणीं मुलांचे लग्न करण्यांत किती त्रास आहे! जे लोक कर्ज काढून बडेजावीने लग्नें करितात त्यांचा धिःक्कार असो."[2] येथे नाटक संपते. वास्तविक नाटक या दृष्टीने याचे फारसे महत्त्व नसले, तरी सामाजिक प्रश्नाला एका विशिष्ट माध्यमाने चालना देण्याचा पहिला प्रयत्न म्हणून या छोट्याशा नाटकाचे वैशिष्ट्य नाकारिता येत नाही.

**महादेव बाळकृष्ण चितळे : 'मनोरमा' (१८७१)**

डेक्कन कॉलेजमध्ये विद्यार्थी असतानाच चितळे यांनी हे नाटक लिहिले. बऱ्याचाईट सर्वच दृष्टींनी हे नाटक त्या काळी चांगलेच गाजले. या नाटकावर मासिक पत्रिकांत व स्वतंत्रपणे टीकाही खूप झाली. कीर्तन्यांचे 'थोरले माधवराव पेशवे' हे १८६१-मध्ये प्रसिद्ध झालेले 'पहिले स्वतंत्र मराठी नाटक' होते हे जरी खरे असले, तरी त्याचा विषय ऐतिहासिकच होता. परंतु 'मनोरमा' हेच खरोखर तसे पाहता पहिले स्वतंत्र मराठी नाटक म्हणावे लागेल. 'मनोरमा' नाटकावर पुष्कळच टीका झाली, परंतु त्या नाटकाचे एकंदर मूल्य ठरवून पाहता त्या काळातील ही निःसंशय वरच्या दर्ज्याची कृती होती, असेच म्हणावे लागेल.

चितळे नव्या रक्ताचे, नव्या पिढीचे आणि नव्या संस्काराचे असल्यामुळे नाटक हा वाङ्मयप्रकार त्यांनी जाणतेपणाने एका विशिष्ट हेतूच्या सिद्धीसाठी वापरला.

---

१. व्यवहारोपयोगी नाटक, पृ. १८४.

२. तत्रैव, पृ. १९५.

नाटकाची शक्ती त्यांनी ओळखली होती. ते लिहितात, " नाटकांत सद्गुणांना आणि दुर्गुणांना योग्य ते प्रतिनिधित्व दिलेलें असते. समाजांत दृढमूल झालेल्या दुष्ट रूढींचे उच्चाटन नाटकच करूं शकते. भावना उन्नत करण्यास आणि भाषेंत व व्यवहारांत सुसंस्कृतता आणण्यास नाटकच मार्गदर्शन करते. आणि काव्यांतून आणि कादंबऱ्यांतून ज्या गोष्टी केवळ वाचकांच्या कल्पनेवरच सोंपवून दिलेल्या असतात, त्या प्रत्यक्ष रूपांत जिवंत करून नाटकांतूनच प्रभावीपणें प्रेक्षकांसमोर मांडल्या जाऊं शकतात. निःपक्षपाती, प्रगत लोकमत बनविण्यासहि यामुळें साहाय्य होते. आणि याचमुळें इतर सर्व साहित्यप्रकारांपेक्षा नाटक हा साहित्यप्रकार श्रेष्ठ समजला पाहिजे." [१]

पौराणिक म्हणजे सूत्रधार--विदूषकपद्धतीच्या नाटकांतून नवे सामाजिक शिक्षण मिळणे शक्य नव्हते. संस्कृतावरून केलेल्या भाषांतरित नाटकांनी मराठी भाषा जरी संपन्न केली, तरी " विचार सुधारण्याचे काम अशा पुस्तकांपासून होत नाही." [२] असे त्यांनी स्पष्टच म्हटले आहे, संस्कृताच्या नाट्यसंकेतांना शोकरसप्रधान नाटक मुळी मंजूर नाही. शिवाय, " ते सामान्य लोकांस फारसे आवडत नाही. तरी त्यापासून उपयोग मोठा आहे." असे ते मानीत असल्यामुळे वस्तुस्थिती रंगविण्यासाठी त्यांनी बव्हंशी शोककारक घटनाच वर्णिल्या आहेत. पात्रांची मनोगते अधिकाधिक स्पष्ट करून सांगण्यासाठी त्यांनी त्या वेळी मराठी नाट्यसृष्टीला नवीन असलेली ' स्वगते ' पात्रांच्या तोंडी घातली आहेत.

मनोरमा नाटकात एकंदर पात्रांची आणि प्रसंगांची खूप गर्दी झालेली दिसून येते. शिवाय, ग्रंथकाराने त्यात मधूनमधून लांबलचक कविता, कादंबरीतील उतारे, वर्तमानपत्रांतील मजकूर, या-ना-त्या निमित्ताने आणून ग्रंथ वाढविला आहे. कविता वगैरे सर्व त्यानेच रचिलेले आहे. नाटकाचे कथानक थोडक्यात असे — कुशी (मनोरमा), ठकू, गंगू व गोदी या चार समवयस्क लहान मुलींचे भवितव्य सामाजिक परिस्थितीमुळे व धार्मिक रूढिबंधनांमुळे कसे भयानक रीतीने ठरविले गेले, याचा वृत्तान्त येथे पहावयास मिळतो. सुखान्त फक्त मनोरमेच्याच बाबतीत घडला आहे. तिच्याही वाट्याला शोक तत्पूर्वी आलाच. कुशी (मनोरमा) ही खेडच्या मामलेदारांची मुलगी. हिचा विवाह पुण्याच्या एका सभ्य गृहस्थाच्या मुलाशी होतो. मामलेदारांचा उपाध्याय रामभट याची सून ठकू ही अगदी लहानपणीच विधवा झालेली मुलगी. मामलेदारांचे कारकून विष्णुपंत यांची मुलगी गंगू हिचा विवाह पुण्याच्या एका

1. It claims a decided superiority over all the rest in representing vice and virtue, in obliterating the fatal customs that frequently take a deep root in society, in improving our sentiments, in refining our language and manners, in placing vividly before the spectator what novels and poetry leave for his imagination to conceive, and in fostering healthy public opinion. Preface.

२. मनोरमा, प्रस्तावना, पृ. २.

पुस्तककीट सुशिक्षिताशी होतो; आणि गोदी ही रामभट उपाध्यायाची मुलगी, तिला एका म्हाताऱ्याच्या गळ्यात बांधण्यात येते.

गोदीचा म्हातारा नवरा त्या उफाड्याच्या मुलीला पसंत नसतो, तर गंगीच्या नवऱ्याला पुस्तकापलीकडे आपल्या बायकोकडे लक्ष द्यावयाला फुरसतच नसते. त्याची प्रकृतीही नेहमीच बिघडलेली असे. त्यामुळे वैवाहिक सुखाला आंचवलेल्या या स्त्रिया शहरातील सरस्वतीबाई नावाच्या एका सभ्य कुंटिणीच्या मदतीने व्यभिचाराला चटावतात. गोदीचा नवरा मरतो. वपनाच्या प्रसंगी नापिताशीच तिचा संग घडून आल्यामुळे तिला गर्भ राहतो. पुढे भ्रूणहत्येच्या आरोपावरून पकडून पोलीस तिला कारागृहाची हवा दाखवितात. गंगू एका सोद्याचा हात धरून कराचीस पळून जाते. तेथे ती राजरोस वेश्याव्यवसाय करिते, परंतु एके दिवशी मवाली लोक येऊन तिचे पैसे लुबाडून तिचा खून करितात. रामभटाची सून ठकू हिचेही पाऊल वाकडे पडते व ती मुलाला घेऊन मुंबईस जाते. तेथे काही दिवस तारुण्य होते, तोपर्यंत भेंडीबाजारात बाजारबसवीचे जीवन घालविते. पुढे गुप्त रोग होऊन दैन्यवाण्या स्थितीत इस्पितळात मरते.

फक्त मनोरमा व्यवस्थित संसारसुख अनुभविते. तिला बिघडविण्याचा सरस्वतीबाई या कुंटिणीचा प्रयत्न व्यर्थ होतो. मनोरमेचा नवरा इंग्लंडला गेला असता खोटी पत्रे पाठवून व आणवून ती उभयतांचा संसार उद्ध्वस्त करू पाहते. परंतु शेवट गोड होतो.

बालाजरठविवाह, अकाली वैधव्य, अननुरूप विवाहसंबंध व विधवांविषयी समाजाची सहानुभूतिशून्य वागणूक यांमुळे समाजात छुप्या वा उघड व्यभिचाराला जो भयंकर ऊत येऊ पाहत होता, त्याला आळा घालण्यासाठी पुनर्विवाहास संमती देणे हा एक उपाय लेखकाने यात सुचविला आहे. मात्र मनोरमेचा पती परदेशी गेला असता तो मृत झाला, असे खोटेच उठले असता सरस्वतीच्या कुटिल कारस्थानाला बळी न पडता मनोरमा व्यभिचारास का प्रवृत्त झाली नाही, तर सुधारकी वळणाची सहानुभूतीने पाहणारी सासू व सासरा यांचे छत्र तिजवर होते म्हणून. हाच संदेश खरोखर लेखकाला या नाटकात ध्वनित करावयाचा आहे. केवळ पुनर्विवाहाच्या प्रचाराचे हे नाटक नाही. मराठे यांचा आक्षेप या नाटकातील पुनर्विवाहाच्या मुद्द्यासंबंधी होता. ते लिहितात, "पुनर्विवाह अवश्य आहे, असें दाखविणें होते तर, मुख्य पात्रावरचा तो प्रसंग चमत्कारिक रीतीनें टाळला आहे! मुख्य पात्रावर तो प्रसंग आणून पुनर्विवाह करविला असता, तर उद्देश विशेष सफल झाला असता. व्यभिचारी स्त्रियांना पुनर्विवाह पाहिजे, असे दाखविण्यांत फारसें पुनर्विवाहशास्त्राचे महत्त्व राहात नाही."[1] व्यभिचारी स्त्रियांना पुनर्विवाह पाहिजे, असे दाखविण्याचा चितळे यांचा हेतू असल्याचे मुळीच दिसत नाही. उलट पुनर्विवाहाचा

१. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, का बा. मराठे, पृ. २३.

मार्ग अशक्य झाल्याने समाजात किळसवाणा व्यभिचार वाढीला लागून कुलस्त्रिया कुमार्गाला कशा लागत आहेत, हीच परिस्थिती त्यांनी विदारक स्वरूपात समाजापुढे ठेविली.

चितळे यांच्या नाटकावर जी ' बीभत्स, अश्लील ' म्हणून टीका झाली, तिचे कारण मराठे यांच्यासारख्यांच्या वरील दृष्टिकोणातच होते. चितळे यानी वर्णन केलेली परिस्थिती कदाचित बीभत्स, क्वचित अतिशयोक्त असू शकेल, परंतु ती सर्वस्वी नाकारता येणारी नव्हती. कारण समाज गुप्तपणे सडत चाललेला आहे, हे सर्वांना दिसत होते. विदारक सत्य समाजापुढे ठेवण्यासाठी स्वगतांत व संवादांत लेखकाने क्वचित जुगुप्सात्मक वर्णन केलेही असेल, परंतु नाटकाचा एकंदर रोख लोकांना अनाचाराकडे प्रवृत्त करावे हा नसून अनाचाराची, सनातनीपणाची, दांभिकपणाची लोकांना चीड येऊन त्यांनी सहानुभूतीने सुधारणेस अनुकूल व्हावे, हाच दिसतो.

आणि लेखकाची हीच दृष्टी असल्यामुळे नाटकातील बहुतेक प्रसंग रसोत्कट असेच उतरले आहेत. कथानकाचा विस्तार व रचना ही जरी एखाद्या कादंबरीला साजेशी असली, तरी कादंबरीपेक्षा यात रसात्मकता अधिक आलेली आहे. संवाद अगदी घरगुती आणि सरळसरळ आहेत. सुशिक्षित व्यक्तीची भाषा प्रौढ आहे. पहिल्या अंकात लग्नसोहळ्याचे पाल्हाळिक, परंतु सामाजिक नीतिरीती दाखविणारे वर्णन आहे; पण ते कंटाळवाणे होत नाही व त्यात मार्मिकताही आहे. लहान मुली-मैत्रिणी झोपाळ्यावर बसून असतात. त्यांत रामभटाची सून ठकू ( तीही लहान मुलगीच, परंतु बालविधवा ) जाऊन खेळू लागते, त्या वेळी ठकूची सासू कडाडते. परंतु मनोरमेची आई राधाबाई तीस म्हणते,

**राधा** — आहे, दोन दिवस पोरस्वभाव आहे तो वाटतं खेळावसं, पुढें एकदा सोवळी झाली म्हणजे तिला तोंड तरी दाखवावसं वाटेल का कुणाला ?

अशा तऱ्हेचे भोठे मार्मिक प्रसंग लेखकाने नाट्यात्मकतेने रंगवून ठिकठिकाणी रसपरिपोष साधून मूळ विषयाविषयी सहानुभूती वाटू लागेल, असाच रचनेचा प्रपंच सर्वत्र केला आहे. गोदीच्या केशवपनाच्या प्रसंगाच्या विष्कंभकात ज्या कविता आल्या आहेत, त्याही अशाच मार्मिक आणि औचित्ययुक्त आहेत. त्यांतील एक कविता पुढीलप्रमाणे —

ज्या केशां हलवावयासहि, असे सौभाग्य जो, वायुला
वाटे भीति, परी न नापित तयां कापावया लाजला !
भासे कीं बहु लोक भीति वचना ज्याच्या, असे जों धनी,
होतां निष्ठुर दैव सेवक तयांही बोलती टाकुनी.

चितळ्यांच्या नाटकावर अश्लीलतेचा शिक्का ज्या संवादांमुळे मारण्यात येतो, त्यांतील काही अंश येथे मुद्दाम उद्धृत करण्यात येत आहे. गोदीला पोलिसांनी पकडल्यावर ' स्वगत ' भाषणात ती सांगते —

**विधवा** :—पुढें खरोखरच पासष्ट वर्षांची मूर्ति मिळाली. अहा ! स्वरूप तरी काय !—चारचौघींत गेलं तर 'आली थेरड्याची तरणीताठी बायको' असं म्हणून घ्यावं ! जिनं तिनं ठोसरे मारावे, "कसं बाई म्हाताऱ्यापाशीं निजवत असेल कोण जाणे ! ' बायकांना भूषण काय ते नवऱ्याचं. ही कुणाची तर 'अमक्याची बायको' असं म्हणतात. पण माझं भूषण केवढं, ज्यांनीं त्यांनीं हंसत असावं ! "पाढऱ्या अंबाडीजवळ काळे केस शोभतात कसे" म्हणून सर्वांनीं चेष्टा करावी. "गुलगुलीत शरीराला म्हातारपणाचीं हाडं खुपत नसतील का !" म्हणून सोरट लोकांनी म्हणावं ! सर्व प्रकारे फजीती ! बरं इतकं सोसूनहि राहात होत्ये. एक स्वरूपाची तरी मौज असे. चारचौघांनी मान डोलविण्यासारखं रूप ! हर ! हर ! पण मेल्यावर ते सुद्धां नाहीं. सर्व छिन्नभिन्न ! ज्यानि त्यानि नाक मुरडावं ! कोणी तोड पाहिलं तरी अपशकून ! कुठें कार्य झालं, कांहीं झालं, तरी तोंड लपवूनच बसावं ! ज्यांनीं नेहमीं चहात असावं त्यांनीं देखील त्रास करावा ! मेलं संन्याशासारखं राहावं पण जीव कुठे राहतो ! लागला चाळा जाईल कसा ! मागला पुढला विचार सुद्धां नाही. कुणी म्हटलं की होच. शेवटीं औषधं घेतां घेता थकल्यें. तरी ह्या कामांत शेवटीं फजीती झालीच ! छपवून तरी कोठपर्यंत ठेवावं ? [१]

या स्वगतात सभ्यतेला नामंजूर असलेल्या गोष्टींचा उच्चार आहे, हे खरे आहे. परंतु पांत्राचे अंतरंग स्पष्ट करण्याचा हा जो उपक्रम चितळे यांनीं नाट्यवाङ्मयाच्या प्रारंभिक अवस्थेत केला, तो धाडसी व अभिनव म्हणून लक्षात ठेवण्यासारखा आहे. वरील प्रकारच्या अशाच अन्य काही स्पष्टोक्त भाषणात त्यांनी त्या वेळच्या स्त्रीपुरुषांचे आणि समाजाचे अंतर्मनच जणू उघडे करून दाखविले आहे. या सर्वांच्या बुडाशी लेखकाची सहानुभूती आणि सुधारणेविषयीची तळमळ असल्यामुळे या भाषेविषयी वा स्वगतांविषयी घृणा वा जुगुप्सा निर्माण न होता, त्या परिस्थितीची व त्या परिस्थितीला कारणीभूत झालेल्या सामाजिक वृत्तीची वाचकाला घृणा वाटू लागते आणि हाच लेखकाचा विजय आहे. का. बा. मराठे यांचा या नाटकाकडे पाहण्याचा दृष्टिकोणच मुळी भिन्न होता. "दुष्ट व हलकट लोकांचा नाटकामध्यें फारसा उल्लेख असूं नये. त्यापासून अज्ञान वाचणाराचे मन बिघडते व अज्ञान वाचणारांस वीट येतो. मनोरमा व स्वैरकेशा ह्या नाटकात हलकटपणाचा व दुष्टवर्तनांचा कडेलोट झाला आहे. नीच, कपटी, व्यभिचारी लोकांची एक मालिकाच लावली आहे... साध्वी स्त्रिया तर असलीं पुस्तके फाडून चुलींत टाकतील." [२] असे ते म्हणतात.

१. मनोरमा, अं. ५, २.
२. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, पृ. ३५.

पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीने मराठ्यांच्या टीकेला परस्पर उत्तर दिलेच. परंतु वास्तववादी सामाजिक नाटक अजून समाजाला तितकेसे मंजूर होत नव्हते, याचाच पुरावा या टीकेत मिळतो. चितळे यांच्या या नाटकात एकंदर सर्वच पात्रे प्रातिनिधिक असल्यामुळे एक तर त्यात पात्रांची गर्दी अधिक झाली व रेखीव असा स्वभावविकास एकाही पात्राचा वैशिष्ट्याने असा त्यांना दाखविता आला नाही. कदाचित ते त्यांचे ध्येयच नसावे. प्रामुख्याने त्यांना एका सबंध समाजाचा अधःपात भडक रंग वापरून चित्रित करावयाचा होता. त्याचमुळे त्यात अतिशयोक्ती आली, कथानकात कृत्रिमता निर्माण झाली. परंतु प्रचार, तळमळ, अभागी स्त्रियांविषयी उत्कट सहानुभूती यांच्या पोटी या गोष्टी येणे अपरिहार्य होते. शिवाय निर्भेळ कलावाद आणि त्यास धरून होणारी निर्मिती या गोष्टी मराठी वाङ्मयाच्या प्रारंभीच्या अवस्थेत अपेक्षिणेही योग्य नाही. सारांश, भाषेचे वावडेपण थोडेसे दृष्टीआड केल्यास चितळे यांच्या नाटकाने समाजात आत्मनिरीक्षणाच्या आवश्यकतेची एक प्रचंड लाट निर्माण करून सामाजिक अंतःकरणात उपकारक असा काही भावनात्मक बदल घडवून आणण्याचे कार्य काही प्रमाणात केले असले पाहिजे, असे म्हणावयास हरकत नाही.

**रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकर : प्रबोधविद्युत अथवा स्वैरसकेशा (१८७१)**

सामाजिक, परंतु अन्य कारणांनी गाजलेले दुसरे नाटक म्हणजे स्वैरसकेशा. मराठे यांनी या नाटकावर केलेली टीका सर्वस्वी योग्यच म्हणावी लागेल. ते लिहितात, " स्वैरसकेशा नाटकांतील कालकशास्त्री काय सद्‌गुणी मनुष्य ! सर्व दुर्गुणांनीं संपन्न ! हवे ते निंद्य व नीच कर्म करितो व त्याला नाटकांतले एक मुख्य पात्र केलें आहे व त्याच मासल्याचीं सर्व पात्रें आणलीं आहेत. तोंडांतून काढूं नयेत असे अवाच्य शब्द या नाटकांत, आणि असल्या नाटकाची दुसरी आवृत्ति लवकरच निघणार आहे असें आम्ही ऐकितों ! ! सुनीतीचा व सद्‌गुणांचा उत्तरोत्तर लोप होत चालला आहे असें एक म्हटलें पाहिजे अथवा तमासगिरांनी या पुस्तकाच्या प्रती घेतल्या आहेत असे म्हटले पाहिजे. "[१]

रघुनाथशास्त्री अभ्यंकरांनी सूत्रधार-पद्धतीची विराटपर्व (१८६७) व हरिश्चंद्र-सत्त्वदर्शन (१८६२) ही दोन पौराणिक नाटके लिहिली होती. ही नाटके अगदीच सामान्य आहेत. पौराणिक पद्धतीची नाटके लिहिणाऱ्या एका शास्त्रीबुवांनी सामाजिक विषयावर लिहिलेले नाटक गुणांच्या आणि विचारांच्या दृष्टीने कोणत्या प्रकारचे असेल हे न सांगताच सामान्यपणे कळण्यासारखे आहे. सुधारकाने विधवांच्या स्थितीत सुधारणा होण्यासाठी नाटके, कादंबऱ्या इ. ललितवाङ्मय लिहिले, तर सनातन्यांनी विधवांची बेअब्रू करून त्यांच्या चारित्र्यावर शिंतोडे उडवून त्यांना

१. तत्रैव, पृ. ३५.

बदनाम करण्यासाठीच लेखणी धरली की काय, असे हे नाटक वाचून वाटते. ' स्वैरसकेशा ' म्हणजे बेताल विधवा. बेताल विधवा सावित्री ही केशवपन न करिता कापालिक या पुरुषाचा हात धरून निघून जाते. पुढे कापालिकाला पश्चात्ताप होतो; कारण पैशामुळे तो घाईला आलेला असतो. स्वतःच्या पत्नीचा संसार आणि ही नव्याने स्वीकारिलेली विधवा यांचा खर्च त्याला झेपत नाही. तो विष खाऊन मरतो व पुढे स्वैरसकेशा सावित्री हीही आत्महत्या करून मरते. या सावित्रीची थोरली बहीणही यमुना अशीच म्हाताऱ्याला दिलेली असते. पुढे तीही विधवा होते; त्या विधवेशी रामभट नावाचा एक भिक्षुक लगट करण्याचा प्रयत्न करितो. त्या झटापटीत यमुना खिडकीतून उडी मारते, पुढे या अपघातामुळे ती मरण पावते. रामभटाला दोन वर्षे सक्तमजुरी होते. कालकशास्त्री म्हणजे सावित्रीचा पहिला नवरा.

एकंदर नाटकात सुसूत्र संविधानकाचा पत्ता लागत नाही. ते प्रयत्नाने समजून, जुळवून घ्यावे लागते. कथानक, स्वभावपरिपोष या गोष्टींकडे काही लक्ष द्यावे लागते, याची लेखकाला कल्पना दिसत नाही. आपल्या दोषाची कबुली देताना तो लिहितो, " कांहीं ठिकाणीं बुद्धिसंकोचामुळे पोटभागांचा उपसंहार मध्येच झाला हे मी मोठ्या दिलगिरीने कबुल करितो. अनेक पात्रांच्या चित्तवृत्तींची तसबीर हुबेहूब प्रमाणानें दाखविण्यास माझी ज्ञानसामग्री ती किती ? तेव्हां अशा दोषांबद्दल विद्वज्जनांपासून निंदेस मी पात्र नाहीं. कित्येक ठिकाणीं स्पष्ट शृंगाराचाही दोष मला पदरीं घेतला पाहिजे. "[१]

" आधी स्त्रियांचे रमणीय वृत्त ।। त्यांतून स्वैरा सकचा तशांत "[१] असे असल्यामुळे शास्त्रीबुवानी स्वैरसकेशेचा वृत्तान्त मोठ्या उत्साहाने वर्णिला आहे. कथानकाची पूर्वसूचना नटी-सूत्रधार-संवादातच मिळते.

**नटी** :— ( तिरस्कारयुक्त ) हो, तुमचे नीट आहे. तुम्हांला नाटकें करायला काय लागते ? माझा जीव मेला झुरणीस लागला आहे. एकुलती एक पोर. नशिबानें तिच्यावर धाड घालून तिचे कुंकू पुसलें, बरे कशी तरी पोटची पोर घरांत होती. पण येथें काय धर्माभिमानाचा जसा ऊतच आला आहे. तिला सोवळी करण्याची तयारी चालविली. चटावलेलें जनावर बांधून कोठे राहते ? तिणे दिवाणींत अर्जी केलीन. मेल्या सासरच्या खाटकांनी जितेपणींच तिचे कर्मांतर करून टाकले. मग ते काय जाणूनबुजून भूत, धरलान एका काळ्या श्रीमंताचा हात आणि गेली आगीनगाडीच्या शेकीन कलासांत बसून.[२]

केस ठेवणाऱ्या विधवांच्या बदनामीची संधी ग्रंथकाराने कोठेच चुकविलेली नाही. कुटाळांच्या तोंडी असलेले पुढील स्वैरसकेशास्तोत्र पहावे—

१. प्रबोधविद्युत्, प्रस्तावना, पृ. १.
२. तत्रैव, पृ. ३.

**पहिला** :– धन्य जगीं या आजि जाहलों, स्वैर-सकेशा-चरिताच्या
वर्णनमात्रें मुक्त जाहलों पाशांतुनि अजि दुरिताच्या.

लोकहो, याला 'स्वैरसकेशास्तोत्र' म्हणतात. याचा ऋषि हा फक्कड, देवता कापालिक, लावणी छंद, व अधोगतिप्राप्ति याचे फळ, समजलां? गातों तर आतां. पण असें नव्हे रे कसे रे बाबांनो, कोणीकडून आदीं वर्णू? कपाळाकडून म्हणाल तर तें कोरें लखलखीत आहे. पायाकडून म्हणाल तर त्यावर केस आहेत... कसे काय तबेतीआई (पोट हलवून) डोक्याकडून म्हणत्येस? बरे तसेंच.[1]

सुधारकांचीही अशीच टवाळी लेखकाने साधून घेतली आहे.

**दुसरा** :– (टवाळ) बाबारे, कापालिकासारखे जे लोक आहेत त्यांच्या हातून कांहीं व्हायचे नाही. बापाचें श्राद्ध करायच्या वेळेस **आय रिफार्मर** आणि पुनर्विवाह लावण्याच्या वेळेस **आय आर्थाडॉक्स**, मिळून धड गाढव ना ब्रह्मचारी असे आहे. अरे पाहा! याच विधवे-बरोबर त्याणे पुनर्विवाह लावला असता, पण ही जन्मभर तरुणच राहत्ये काय? दोन दिवसानीं उतार होणारच, तेव्हां पुढें कोणीतरी नको का आणायला. विधवा तर त्याला अशा देवानेंच आंदण दिल्या आहेत. पुराणिकांना लोक नांवें ठेवतात, पण या राजश्रींपुढे खरोखरच त्यांणीं राजिनामा दिला पाहिजे.

फक्त एके ठिकाणीं कन्याविक्रय करणाऱ्याविषयी ग्रंथकाराने मार्मिक टीकास्त्र चालविले आहे.

**नारा** : अकराशे रुपये घेऊन ३ वर्षांची पोर त्रेपन्न वर्षांच्या थेरड्याला देणारा कोण असेल याचे अनुमान देखील नाहीं तुला? अरे तो बाबदेवभट महाशब्द्या. व्याजाचे ताक खाणारा तो रे! वडील मुलगी अशीच एका म्हाताऱ्याला देऊन रांडकी करून ठेविली आहे.

**राम** : हं हं. आतां ठीक बेत जमला. फुटक्या सहाणेला तुटके खोड! ठीक जोड जमला. त्याणे अधिकसे रुपये मिळाले असते तर एकाद्या इंग्रजाला देखील दिली असती.[2]

जरठ-कुमारी-विवाह, वैधव्य, केशवपन इत्यादी सामाजिक विषय यात आलेले असले, तरी लेखकाला कोणतीच गोष्ट कलात्मक पातळीवरून वर्णिता आलेली नाही. मनोरमा आणि स्वैरसकेशा असा जोड–उल्लेख मराठे यांनी प्रत्येक ठिकाणी केलेला आहे. त्या संबंधाने एवढेच म्हणावेसे वाटते की मनोरमा नाटक हे नाटक असून त्यात रसपरिपोष अनेक स्थळी साधण्यासाठी लेखकाने जी सहानुभूती किंवा जिव्हाळा

१. प्रबोधविद्युत्, अं. ३, पृ. १००–१०१.
२. तत्रैव, अं. १, पृ. ७.

ओतला आहे, त्याचा संपूर्ण अभाव स्वैरसकेशा या नाटकात स्पष्ट जाणवतो. लेखकापुढे आटोपशीर असा वास्तव वा ध्येयवादी कोणताच आराखडा नाही. येथे सामाजिक घाणीचेच हर्षभराने वर्णन केल्यासारखे दिसते. ' शृंगाररसांत मन वेधलें असतां एकाएकीं, परिणामाचा उपदेश होण्याचा मुख्य उद्देश असल्यामुळें ' याचें नाम ' प्रबोधविद्युत् ' ठेविले असल्याचा निर्वाळा लेखकाने प्रस्तावनेत कितीही दिला असला, तरी नाटकाच्या वाचनाने कोणताच उपदेश मनावर ठसत नाही, किंवा काही नवा जीवनानुभव प्राप्त झाल्याचे समाधानही वाटत नाही. खरा उपदेशक वा खरा कलावंत हा हाडाचा सहानुभूतीने असा युक्त असावा लागतो. येथे विधवांविषयी कोठेच सहानुभूती तर नाहीच, पण त्यांच्या बदनामीचा सूरच जास्त आहे, व या विषयाच्या निमित्ताने शृंगाररसाची किंवा व्यभिचाराची (?) चंगळ करावी, एवढाच लेखकाचा येथे उपक्रम दिसतो. ' मनोरमा ' नाटकाच्या भाषेबद्दल कोणास नाक मुरडता येईल, परंतु तेथे वर्णिलेली सामाजिक परिस्थिती हीच विशिष्ट परिणाम करणारी आहे, असेच सहृदय वाचकाला वाटल्यावाचून राहत नाही. या नाटकात मुख्य अभाव जर कोणता असेल, तर तो लेखकाच्या सहृदयतेचाच. शिवाय, नाटकाचा आत्मा कशात असतो, याचीही लेखकास नीटशी कल्पना नाही. त्यामुळे क्रमविरहित असंबद्ध असे प्रसंग तो योजितो व सापडेल तेथे शृंगार व शिवराळपणा यांची खैरात करतो, एवढेच लक्षात येते. या नाटकात चार मृत्यू होऊनसुद्धा एकाही पात्राबद्दल शोक वाटावा, अशी परिस्थिती नाही. कारण लेखकाने कोणत्याच पात्रात आपला जिव्हाळा न ओतता बातमीदाराप्रमाणे घटनांचे जुडगे जुळवून फक्त कथन केले आहे.

## नऊ

## समारोप

मराठी रंगभूमीचा प्रारंभ सांगलीला इ. स. १८४४-मध्ये विष्णुदास भाव्यांच्या ' सीता-स्वयंवर ' या नाट्यप्रयोगाने झाला. परंतु मराठी नाट्यवाङ्मयाचा प्रारंभ मात्र आणखी पुढे दहा-पंधरा वर्षांनी म्हणजे इ. स. १८६०-च्या आसपास झाला. विष्णुदासांच्या किंवा बाबाजीशास्त्री दातार यांच्या पौराणिक नाटकाख्यानांचा आधार म्हणजे त्यांनी रचिलेली नाट्यकविता एवढाच होता. सूत्रधाराकडून म्हटल्या जाणाऱ्या या कवितेच्या किंवा पदांच्या अनुषंगाने नाटकातील पात्रे आपापली भाषणे वठवीत. या भाषणांना अर्थातच नाटकस्वरूपाच्या संवादांचे निश्चित असे रेखीव रूप त्या काळी प्राप्त झाले नसावे व झाले असल्यास तसा पुरावाही फारसा उपलब्ध नाही. रंगभूमीवर त्या जमान्यात वेगवेगळी पात्रे आपापल्यापुरती स्वतंत्र अशी भाषणे करीत. या भाषणांना संवादांचे स्वरूप प्राप्त न झाल्याने सूक्ष्म असा मानसिक संघर्ष या भाषणांतून क्वचितच प्रतीत होई. त्याचप्रमाणे एक व्यापक संघर्ष व स्वतंत्र जीवनविषयक दृष्टिकोण, यांचे जे दर्शन नाटककार या संवादांतून रसात्मक

रीतीने प्रेक्षकांस करवीत असतो, त्याचाही बराचसा अभाव यांमध्ये जाणवल्यावाचून राहत नाही. सामान्यपणे स्थूल संघर्षच त्या काळी रंगभूमीवर कृतिरूपाने दाखविण्यात येई. देवासुरांची ललित-विकट-अद्‌भुत सोंगे, द्वंद्वे, लढाया, रास, नाच इत्यादी आणि सूत्रधाराचे टाळमृदंगांसह होणारे नाटयकवितागायन या दृश्य आणि श्राव्य गोष्टींचे आकर्षणच त्या वेळच्या प्रेक्षकांना अधिक होते.

## नाट्याभिरुचीचा प्रारंभ

परंतु हे अर्थात मान्यच करावे लागेल की, बाल्यावस्थेत असलेल्या या ओबड-धोबड स्वरूपाच्या रंगभूमीमुळेच एक सर्वस्वी नवी नाट्यविषयक अभिरुची येथे जन्मास आली. मौज अशी की, ती क्रमाने वाढीला लागताच पंधरा-सोळा वर्षांच्या काळातच वरील भावेपद्धतीच्या पौराणिक तागडथोम नाटकांचा लोकांना कंटाळा येऊ लागला. कोणत्याही कलेसंबंधी किंवा वाङ्मयासंबंधी प्रथम अभिरुची निर्माण होण्यास व तिचा विकास म्हणजेच तिची वाढती भूक जागृत होण्यास प्राथमिक स्वरूपाचा असा काही काळ जावाच लागतो. मराठी रंगभूमीची ही पहिली काही वर्षे याचसाठी खर्ची पडली. तसे पाहता नाटयवाङ्मयाच्या निर्मितीस व त्याच्या विकासास कारणीभूत होणारी रंगभूमीच येथे महाराष्ट्रात राजाश्रयाच्या अभावी किंवा विशिष्ट धार्मिक व सामाजिक परंपरेमुळे गेली सहाशे वर्षे अस्तित्वात नव्हती. भाव्यांनी ती नव्याने स्थापन केली व एक नवा कलाव्यवसाय महाराष्ट्राला मिळवून दिला. पुढे इ. स. १८६०-च्या आसपास ज्याला खऱ्या अर्थाने नाटयवाङ्मय म्हणता येईल अशा स्वरूपाचे स्वतंत्र वा अनुवादरूप लेखन सुशिक्षित पदवीधरांनी व शास्त्रीमंडळींनी केले. परंतु त्याच्या मुळाशी भाव्यांनी सतरा वर्षांपूर्वी स्थापिलेली हीच ओबडधोबड रंगभूमी आणि त्यांची साधी अनलंकृत परंतु रसात्मक नाट्यकविता होती, हे विसरता येत नाही. नाटकाच्या या नव्या अभिरुचीचे सर्व श्रेय न्या. मू. रानडे यांनी विष्णुदास भाव्यांच्या नाटकव्यवसायाला देऊन त्यामुळेच नाट्यवाङ्मयाच्या वाढीला प्रोत्साहन मिळाले, असे स्पष्ट सांगितले आहे.

## नाटकांचे विविध प्रकार

आणि आश्चर्याची गोष्ट ही की, रंगभूमीच्या संस्थापनेमुळे एक नवी अभिरुची निर्माण होताच तिची वाढती मागणी पुरविण्यासाठी रंगभूमीच्या प्रारंभानंतर अवघ्या पंधरा-वीस वर्षांच्या आतच नाटयवाङ्मयाचे बहुतेक सर्व प्रकार त्या वेळच्या लेखकांनी मोठ्या उत्साहाने योजून आपल्या नवनवीन रचना सादर केल्या. ‘प्रबोध-चंद्रोदया’चा अनुवाद अमरापूरकरशास्त्र्यांनी १८५१-मध्ये केला होता. परंतु संस्कृत नाटकांच्या मराठी अनुवादांची वैशिष्ट्ययुक्त परंपरा निर्माण केली परशुरामपंत-तात्या गोडबोले यांनी. ‘वेणीसंहार’ व ‘उत्तररामचरित’ या दोन संस्कृत नाटकांचे सुगम व सरस अनुवाद त्यांनी १८५९-मध्ये केले. १८६१-मध्ये कीर्तन्यांचे ‘थोरले माधवराव’ हे पहिले स्वतंत्र मराठी ऐतिहासिक नाटक प्रसिद्ध झाले. संस्कृत नाटक-

शैलीवर लिहिलेले पहिले मराठी पौराणिक नाटक 'नल' विनायकशास्त्री नातूंनी १८६२-मध्ये रचिले. निबंधातच सांगण्यासारख्या सामाजिक विषयाला नाटकरूप देऊन माडगावकरांनी आपला 'व्यवहारोपयोगी' नाटकरूप निबंध १८५९-मध्ये लिहिला. यास जरी उच्च दर्ज्याचे सामाजिक नाटक म्हणता येत नसले, तरी सामाजिक विषय नाटकरूपाने सांगण्यास त्यांनी यामुळे प्रारंभ केला, हे विसरता येत नाही. सामाजिक म्हणून विशेष गाजलेले 'मनोरमा' नाटक पुढे १८७१-मध्ये लिहिले गेले. कल्पनारम्य नाटकांचा प्रारंभही कीर्तन्यांच्या 'जयपाळ' या नाटकाने १८६५-मध्ये झाला. इंग्रजी नाटकांच्या अनुवादास कोल्हटकरांच्या ऑथेल्लोने १८६७-मध्ये सुरुवात झाली. 'प्रबोधचंद्रोदया'च्या पद्धतीने 'विचारसार' नावाचे पहिले, छोटे व स्वतंत्र असे रूपकात्मक नाटक १८५४-मध्ये जरी 'चंद्रिका' मासिकात प्रसिद्ध झाले होते, तरी 'सायुज्यसदन' हे याच पद्धतीचे भागवतांचे भारदस्त, रूपकात्मक नाटक १८६७-मध्ये प्रकाशित झाले.

## सामान्य वाङ्मयीन दर्जा

रंगभूमीसाठी नाट्यवाङ्मयाची गरज निर्माण होताच मराठी लेखकांनी पंधरावीस वर्षांच्या आत नाट्यवाङ्मयांतर्गत बहुतेक सर्व जुने प्रकार योजून नवी-नवी नाटके लिहिली, ही गोष्ट निःसंशय कौतुकास्पदच होय. परंतु वाङ्मयाच्या दृष्टीने या नाटकांकडे पाहिल्यास ती फारशी उच्च दर्ज्याची होती, असे मात्र म्हणता येत नाही. इतकेच काय, परंतु पुढेही पंधरा-वीस वर्षे म्हणजे १८८०-मध्ये किर्लोस्कर-युगाला प्रारंभ होईपर्यंत नाटकाच्या या नव्याने सुरू झालेल्या वाङ्मयप्रकारात नाव घेण्याजोगी अशी फार थोडी नाटके, त्यांचे ऐतिहासिक महत्त्व सोडले तर, निर्माण झालेली दिसतात. अर्थात त्यामुळेच सुधारणेच्या या नव्या काळात भाषेची व वाङ्मयाची गौरवशाली पूर्वपरंपरा असलेल्या मराठीमध्ये भाषेच्या व वाङ्मयाच्या दृष्टीने इतक्या साध्या कृती कशा निर्माण झाल्या, याचे आजच्या वाचकांना थोडेसे आश्चर्य वाटते. भास्कर-नरेन्द्रांसारख्या महानुभावांनी व ज्ञानदेव-एकनाथांसारख्या संतसत्पुरुषांनी मराठी-प्राकृताचा अभिमान बाळगून वेदान्त, तत्त्वज्ञान, भक्ती यांसारखे विषय समर्थपणे योजून प्रारंभीच्या काळात मराठीत ग्रंथरचना केली. पुढच्या मराठी कवींनीही इतिहास-पुराणादी ग्रंथ मराठीत रसाळपणे सांगून मराठी सारस्वत संपन्न केले. अनुवाद वा रूपांतर करितानाही आपल्या न्यूनगंडाचे प्रदर्शन त्यांनी फारसे केले नाही. उलट उसनवारीसुद्धा प्राकृतचा दिमाख मिरवीत त्यांनी केलेली दिसते. मात्र येथे एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पाऊणशे वर्षांत मराठीला इतकी हीनकळा का आली, हे लक्षात येत नाही. गद्य लिहिण्याची सवय तिला यापूर्वी कधीच नव्हती का? ऐतिहासिक पत्रे, बखरी इत्यादींत विकसित झालेल्या वैशिष्ट्यपूर्ण गद्यशैलीकडे पाहता तसे म्हणवत नाही. परंतु या कालखंडाकडे पाहिले, तर या काळातील गद्य मात्र भाषेचे अगदी प्राथमिक धडे गिरवीत असल्याचा भास होतो. संस्कृत वा इंग्रजी

ग्रंथांची भाषांतरे करिताना लेखकांच्या ठिकाणी जिगीषुवृत्ती फारशी कोठे दिसत नाही. भाषांतरकार संस्कृतातील वा इंग्रजीतील ग्रंथांच्या प्रभावाने दिपलेला दिसतो. द. प्रा. कमिटीच्या व सरकारी बक्षिसांच्या प्रोत्साहनाने नाटकांचीही भाषांतरे प्रसिद्ध झाली. त्यामुळे सरकारी आश्रयाने वाढलेल्या या कलेत एक प्रकारचा कोतेपणा राहिलाच. राजकीय पारतंत्र्य तर होतेच, परंतु विचार, भाषा, वाङ्मय, ज्ञानविज्ञान इत्यादी दृष्टींनी कितीतरी प्रगत झालेल्या राज्यकर्त्यांकडून मार्गदर्शन आणि प्रोत्साहन मिळूनही नव्या बुजरटपणात व एक प्रकारच्या दडपणात वाङ्मयकलेचा मुक्त विकास घडून आला नाही, एवढे मात्र खरे.

## जुन्या मराठीचे अपुरे सामर्थ्य

परंतु थोड्या बारकाईने आणि सहानुभूतीने विचार केल्यास याची आणखीही काही कारणे स्पष्ट होण्याची शक्यता आहे. एक म्हणजे या काळात सर्व काही एकदम नवीन होते. पूर्वींचेच भक्ति-अध्यात्म-शृंगारादी विषय आता ठराविक छंदांत त्याच ठराविकपणे आळवीत बसण्याचा जमाना संपला होता. एकंदर सारे युगच बदलले होते. नवी ज्ञानविज्ञाने काळाच्या, शिक्षणाच्या व राज्यशासनाच्या गरजेप्रमाणे प्रचारात येत होती. शिक्षणाच्या व साक्षरतेच्या प्रसाराबरोबर अगदी नवीन, परंतु धार्मिकेतर अशा करमणुकीच्या वाङ्मयाची गरज निर्माण झाली होती. या सर्वांसाठी जुनी मराठी पुरी पडली नाही. तिला संस्कृत, प्राकृत, इंग्रजी यांवरून बरेचसे नवे शिकावे लागले, आत्मसात करावे लागले. त्यामुळे या पहिल्या अमदानीत वाङ्मय निर्माण करण्याऐवजी भाषा निर्माण करण्याचे म्हणजेच नवीन विचारांस अनुरूप योग्य गद्यमाध्यम निर्माण करण्याचे काम त्या पिढीला करावे लागले. शास्त्रीमंडळींनी व पदवीधरांनी भाषांतरात्मक व स्वतंत्र असे जे काही वाङ्मय प्रयत्नपूर्वक निर्मिले, त्यातूनच ही गोष्ट साधली गेली.

## नाट्यातील आवश्यक अंगांकडे दुर्लक्ष

बरीचशी शक्ती या भाषेच्या प्रयत्नातच खर्ची पडल्यामुळे आणि नाटकासारख्या वाङ्मयप्रकाराची मराठीत त्यापूर्वी परंपराच नसल्यामुळे, उच्च दर्ज्याची नाटके त्या काळी निर्माण होऊ शकली नाहीत, याबद्दल खरोखर फारसे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. आधी स्वतंत्र अशी नाटके या काळात फारच थोडी लिहिली गेली. त्यातही तंत्रदृष्ट्या निर्दोष व वाङ्मयाच्या दृष्टीनेही वरच्या दर्ज्याची नाटके तर संख्येने फारच थोडी सापडतील. बरीचशी नाटके पौराणिक विषयांना धरूनच आढळतात. त्यांतही नाट्याची कला कमीच. जुनीच आख्याने नाटकरीतीने म्हणजे फक्त संभाषणरूपाने 'लीला'वर्णनाच्या स्वरूपात सादर केलेली दिसतात. बांधेसूद संविधानक, वास्तव व्यक्तिचित्रण, मुख्य संघर्षाला धरून घटनांमध्ये साधलेली विशिष्ट लय वा कलात्मक चढउतार इत्यादी गोष्टींकडे लेखकांचे त्या काळात विशेष लक्ष नव्हतेच. नाट्य ही प्रामुख्याने प्रायोगिक स्वरूपाची दृश्य करमणूक म्हणून मानिल्याने त्याच्या

वाङ्मयीन भागाकडे साहजिक दुर्लक्ष झाले.

या सर्व गोष्टी मराठी नाट्यवाङ्मयाच्या प्राथमिक अवस्थेत अपेक्षिणेही तितकेसे योग्य होणार नाही. खरोखर आजसुद्धा नाटकलेखन ही लेखकाची कसोटी होऊन बसली आहे. प्राचीन काळी मराठीला पद्य लिहिणे जमले. यमकांच्या काठ्या हाती धरून त्यांच्याच साहाय्याने हुकमी चरणविन्यास करीत पद्य लिहिणे अनेकांना बरेचसे सुलभ झाले. पण नव्या जमान्यात आव्हान होते गद्याचे.' गद्यं कवीनां निकषं वदन्ति ' हे मत तर प्राचीनांपासून असल्याचे प्रसिद्धच आहे. त्यात पुन्हा नाटक हे ' काव्येषु रम्यम् ' म्हणजे सर्व वाङ्मयप्रकारांत जसे परमरमणीय, तसे ते लिहिणेही तितकेच अवघड हे नाकारिता येत नाही. आजसुद्धा यशस्वी कादंबरीकार यशस्वी नाटककार झालेले नाहीत. अशा वेळी केवळ आख्यानक स्वरूपाच्या रचनेचीच बरीचशी सवय असलेल्या मराठीला नव्या जमान्यात नाटकरचनेत फारसे यश आले नाही, म्हणून आश्चर्य मानण्याचे कारण नाही. नाटक या वाङ्मयप्रकाराच्या ' मंत्रा'चा तर दूरच, परंतु साध्या प्राथमिक बाह्य ' तंत्रा'चाही परिचय त्या वेळच्या नाट्यलेखनोद्यम करणाऱ्या अनेकांना नव्हता. पौराणिक नाटके लिहिण्यावरच एकंदर लेखकांचा भर होता. सामाजिक व ऐतिहासिक नाटके अगदीच हाताच्या बोटांवर मोजण्याइतकी निर्माण झाली. त्यांतही ' मनोरमा ' व ' थोरले माधवराव ' हीच काही अंशी बरी म्हणून गाजली, व समाजदर्शन असे जे काही थोडे पहावयास मिळते, ते याच नाटकांत. वर्तमानपत्रांच्या व ग्रंथांच्याद्वारे जी काही सामाजिक व राजकीय जागृती त्या काळी समाजात होत होती, तिचे प्रतिबिंब या काळातील ललितवाङ्मयात तसे फारसे पडलेले दिसत नाही. उच्च दर्ज्याची कला या दृष्टीने नाटक हा वाङ्मयप्रकार त्या काळच्या लेखकांत रुळला नव्हता; त्यांना आत्मसात झालेला नव्हता. शिवाय, लोकांमध्येही सामाजिक काय, किंवा राजकीय काय, काही-एक भूमिका इ. स. १८७४-पर्यंत संथपणे तयार होत होती. त्यामुळे वाङ्मयाच्या सर्व प्रकारांतून तिचा कलात्मक आविष्कार होण्याचा काळ अद्यापि आलेला नव्हता, एवढेच या बाबतीत म्हणता येण्यासारखे आहे.

### कौतुकास्पद कामगिरी

परंतु हेही खरे की, पाठीमागे कोणत्याही प्रकाराची परंपरा नसताना या दिशेने जी काही वाङ्मयनिर्मिती झाली, ती एका दृष्टीने कौतुकास्पदच म्हटली पाहिजे. न्यायमूर्ती रानडे यांनीही या काळात निर्माण झालेल्या वाङ्मयाचे मूल्यमापन करिताना थोडाफार हाच उदार दृष्टिकोण स्वीकारिला होता. ते लिहितात, " इंग्रजी वाङ्मयाच्या कसोट्यांवर जर आपल्या या नाटकांचे मूल्यमापन करावयाचे म्हटले, तर यांतील उत्तमोत्तम कृतीही फारच सामान्य दर्ज्याच्या ठरतील, अशी भीति वाटते. परंतु असल्या उच्च निकषांवर या विशिष्ट वाङ्मयीन शाखेच्या विकासाची तपासणी करणेच मुळी योग्य नाही. कारण इंग्लंडसारख्या देशात या वाङ्मयाच्या विकासात जितकी शतके जावी

लागली, तितकी दशकेही येथील वाङ्मयाच्या विकासास तसें पाहता वाटयास आलेलीं नाहीत " [1]

## पौराणिकतेवर भर

तसे पाहता कोणत्याही देशातील कला वा वाङ्मय यांचा विकास हा बाहेरून कितीही वेगवेगळे परिणाम झाले, तरी त्या त्या देशातील मूळ परंपरेला व तेथील जीवनस्थितीला धरूनच होत असतो. इंग्रजांच्या आगमनानंतर सुमारे अर्धशतक लोटून गेल्यानंतर ज्यांना 'नाटक' म्हणून खऱ्या अर्थाने म्हणता येईल, अशी अगदी थोडी म्हणजे पाचदहाच नाटके येथे निर्माण झाली. 'बुकिश' या नावाने ओळखली जाणारी नाटके ती हीच. बाकी एकंदर जमाना पौराणिक नाटकांचाच चालू होता. मध्यंतरी १८६०-नंतर फार्सोचा म्हणजेच लौकिक व विनोदी स्वरूपाच्या प्रहसनांचा बराच बोलबाला झाला, परंतु स्वतंत्र रीतीने छापिलेले फार्स १८८०-पर्यंत फारसे मिळतच नाहीत. फार्स या नावाने छापिलेली पुस्तके १८८०-नंतरच्या काळात उपलब्ध होतात. गंभीर ऐतिहासिक नाटकासही फार्स म्हणण्याची प्रथा १८८०-पूर्वी रूढ होती. सारांश, फार्स किंवा बुकिश स्वरूपाची नाटके त्या मानाने फारच थोडी निर्माण झाली. मुख्य भर पौराणिक नाटकांवरच होता. सर्व पौराणिक नाटकांचे मूळ विष्णुदासांनी प्रथम निर्माण केलेल्या नाटकाख्यानांतच पहावयास सापडते, ही एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. विष्णुदासांची नाट्यपरंपरा मात्र संपूर्णपणे भारतीयच होती. भावाभिनय, संगीत व नृत्य यांवरच भर असलेल्या मूळच्या भारतीय नाट्यपरंपरेत करमणुकीच्या प्रेक्ष्य व श्राव्य या अंगांवरच अधिक भर असे. मूळच्या धार्मिक दशावतारी सोंगांतून किंवा कर्नाटकी 'खेळ्यां'तून स्फूर्ती घेऊन भाव्यांनी जुन्या मराठी पंडितकवींच्या आख्यानकरचनांप्रमाणे आपली गेय व अभिनेय अशी नाटकाख्याने लिहिली, आणि पौराणिक नाटकांच्या विकासाचे पहिले पाऊल टाकिले. पुढे संस्कृतातील उत्तमोत्तम नाटकांचे अनुवाद येथे झाले. परंतु संस्कृत नाटकांच्या मराठी अनुवादकांनी येथे नव्याने वाढीला लागलेली पौराणिक नाटकांची परंपराच अनायासे स्वीकारिली. संस्कृत श्लोकाच्या जागी परशुरामपंततात्यांनी भावे-परंपरेची रागदारीची पदे घातली. संगीताचा परंपरेने चालत आलेला नाटकातील श्राव्य भाग त्यांनी टाळला तर नाहीच, पण उलट वाढवून दिला. त्यामुळे " सस्कृत नाटकांतील मूळचे श्लोक जे काव्यात्म होते ते मराठी नाटकांत गीतात्म झाले."[2] त्यांची पदे झाली. इंग्रजी नाटकांच्या मराठी अनुवादांतही काही लेखकांनी याच पद्धतीने पदे घालून

---

1. Judging by English standards, our best performances must occupy a subordinate place; but it is not fair to judge by this high standard, the development of a branch of literature which has had as many decades to grow here as it has taken centuries to grow in England. Miscellaneous Writings, p. 42.

२. नाट्यविमर्श, के. नारायण काळे, पृ. १४६.

परंपरापालन केले. ऐतिहासिक व सामाजिक अशा अनेक नाटकांत सूत्रधार-विदूषकांची दुक्कल पौराणिक नाटकांतल्याप्रमाणे वावरत राहिली.

### नाटकांचे जनतेकडून स्वागत

या नव्या वाङ्मयाचे स्वागत त्या वेळच्या लोकांनी चांगलेच केले. शिळाछापी पौराणिक नाटके या काळात कितीतरी छापिली गेली. पोथ्यांतल्याप्रमाणे चित्रे घालून ही नाटके छापिली जात. ग्रंथरूपाने प्रकाशित झालेल्या नाटकांत बुकिश म्हणजे इंग्रजीवरून अनुवादिलेली नाटके, संस्कृत नाटकांची भाषांतरे व दुसरीही स्वतंत्र रूपाने लिहिलेली सामाजिक नाटके होती. काही नाटकांच्या त्या काळात एकाहून अधिक आवृत्त्या निघालेल्या दिसून येतात. मुख्य म्हणजे वाचनाची गोडी त्या वेळच्या स्त्रीपुरुषात वाढीला लागल्यामुळे ही (बुकिश) नाटकेही मनोरंजनार्थ वाचली जाऊ लागली होती. नाट्यवाङ्मय स्वतंत्रपणे रूढ होऊ लागल्याचा हा पुरावा होता. वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या या नाटकांवर कृष्णशास्त्री चिपळूणकर-गुंजीकरप्रभृती अधिकारी, रसिक संपादकानी व लेखकांनी शालापत्रक, विविधज्ञानविस्तार, ज्ञानसंग्रह इत्यादी नियतकालीन पत्रिकांतून अभिप्राय देऊन त्यांचा परामर्श घेतला. त्यामुळे वाङ्मयीन टीकेलाही एक प्रकारचा प्रतिष्ठितपणा प्राप्त होऊन वाचकांनाही या काळात योग्य ते मार्गदर्शन मिळू लागले. का. बा. मराठ्यांनी 'नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध' लिहून त्या-त्या वाङ्मयप्रकारांसंबंधी डोळस अभिरुची निर्माण करण्यास बहुमोल साहाय्य केले. कादंबऱ्यांप्रमाणे अनुवादित व स्वतंत्र स्वरूपाची नाटकेही त्या वेळच्या मराठी नियतकालिकांत हप्त्याहप्त्याने छापण्याची प्रथा रूढ झाली होती.

### भाषांतरयुग

वाङ्मयाच्या या कालखंडाला सामान्यपणे भाषांतरयुग म्हणून, त्याची अवहेलना करून, त्यातील कृती अगदी सामान्य ठरवून त्यांना दुर्लक्षिण्याची जी एक वृत्ती दिसून येते, ती मात्र तितकीशी योग्य नाही. कारण सहाशे वर्षांत जे घडले नाही, ते या काळात घडले, हे विसरून चालणार नाही. अर्थात सर्वच काही नव्याने घडत असताना बऱ्याच उणिवा राहणे स्वाभाविक होते. नव्या युगात गद्याचे आव्हान पतकरून मराठीने जशी निबंध, इतिहास शास्त्र, कादंबरी इ. विविध वाङ्मयनिर्मिती केली, त्याप्रमाणे नाट्यवाङ्मयही, त्यातील विविध प्रवृत्तींना व प्रकारांना धरून, निर्माण करून या प्राथमिक अवस्थेतही तिने एका दृष्टीने काळाबरोबर राहण्यात आपला मूळ धर्म व बाणा याही काळात राखला, एवढे तरी निश्चित म्हणता येईल.

सर्वच वाङ्मय काही जुने होत नाही. निदान त्याचे ऐतिहासिक महत्त्व उरतेच उरते. विश्वविद्यालयीन अध्ययनक्रमात तर अशा ग्रंथांचे मोल विशेष असते काही वेळा जुन्याच्या पुनरुज्जीवनाचीही गरज एक चूष म्हणून नव्या काळात भासते. त्या दृष्टीने त्या काळच्या कितीतरी (गाजलेल्या) नाटकांचे पुनर्मुद्रण होणे अवश्य आहेसे

वाटते. जुन्या मराठी पद्याबरोबरच जुन्याच पद्धतींनी लिहिलेली 'उत्तररामचरित', 'शाकुंतल', 'मृच्छकटिक', 'प्रसन्नराघव', 'मुद्राराक्षस', 'सायुज्यसदन', 'सैरंध्री' इ. गद्यपद्यमिश्रित नाटके मराठीच्या अध्ययनातील पदवी-परीक्षेच्या अभ्यासक्रमात ठेवण्याइतकी चांगली उतरली आहेत. त्यांत काही दोष, उणिवा आहेत. परंतु अध्ययन हे गुणदोषांचे झाल्यासच त्यास परिपूर्णता येते. जुन्या मराठी कवींप्रमाणेच या काळातील शास्त्रीपंडितांनी नाटकद्वारा कवित्व केले आहे, त्याचाही अभ्यास होणे अवश्य आहे.

### अभ्यासाची उपयुक्तता

इंग्रजी व संस्कृत यांवरून झालेल्या मराठी भाषांतररूप कृतींचाही अभ्यास पुन्हा भाषिक व वाङ्मयीन दृष्ट्या होणे अवश्य आहे. या बाबतीत मौज अशी की, मूळ कृती कधीच जुनी न होता सदैव रसरशीत व टवटवीत राहते. मात्र तिची त्या त्या युगातील भाषांतरे व रूपांतरे नित्य जुनी होत असताना दिसतात. शेक्स्पिअर वा कालिदास कधीच जुने झालेले नाहीत. मात्र प्रत्येक युगाला त्यांची जुनी भाषांतरे बाजूला ठेवून नव्या काळाच्या जाणिवेने त्यांना समजून घेण्यासाठी नवी भाषांतरे करावीशी वाटतात. महान ग्रंथकार हे या दृष्टीने कालातीत असतात, तर त्यांच्या कृतींची भाषांतरे कालविशिष्ट असतात. कारण विशिष्ट युगातील जाणिवेने त्या महान ग्रंथकारांस समजून घेण्याचा तो त्या काळाचा प्रयत्न असतो. याही दृष्टिकोणाने हल्लीची व पूर्वीची वरील महान ग्रंथकारांच्या ग्रंथाची भाषांतरे अभ्यसिली जाणे अवश्य आहे. त्यावरून कालसापेक्ष जाणिवेचा बोध घेणे सुलभ होईल.

प्रायोगिक रंगभूमीच्या दृष्टीने गौरीहरविनोद, श्रीमिळिणी ही नाटके पुन्हा रंगभूमीवर आणण्याइतकी रंगदार आहेत. आज भारुडे, लोकनाट्य ( तमाशा ) इत्यादी करमणुकीच्या प्रकारांचे पुनरुज्जीवन होत आहे. अशा वेळी पौराणिक नाटकांची मौज, त्यांतील विदूषक-सूत्रधारांचे वाक्चापल्य, कोटीबाजपणा, देवदेवतांची सोंगे व व्यक्तिचित्रे त्यांतील हरिदासी प्रासमय गद्य, शिवाय खास मराठी थाटाची गेय पदे, लावण्या, अभंग या गोष्टी आजच्या रसिक प्रेक्षकांना ऐतिहासिक नमुना म्हणूनच केवळ नव्हे, तर खास मराठी काव्यशास्त्रविनोदाची व नृत्य-गीत-हास्यादींनी बहरलेली एक नवी चूष म्हणून स्वागतार्ह वाटेल. जुनी संस्कृत नाटके जर कळली वा न कळली, तरी रंगभूमीवर आज हौसेने पाहिली जातात, तेथे ही निश्चितपणे कळणारी तर खास निरागस मराठी नाटके पुन्हा लोकप्रिय होण्याची शक्यता आहे. कट्टींचे सवाई माधवराव पेशवे हे नाटक पुन्हा मुद्रित करून अभ्यासिण्यासारखे आहे; त्याचप्रमाणे चितळयांच्या 'मनोरमा' नाटकाचे पुनर्मुद्रण होणे अत्यावश्यक आहे.

### उपयुक्त संदर्भवाङ्मय

( १ ) नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध – का. बा. मराठे १८७२
( २ ) नाट्यकवितासंग्रह – विष्णु अमृत भावे १८८५

( ३ ) मराठी रंगभूमि – आ. वि. कुलकर्णी
( ४ ) नाटकाचीं स्थित्यंतरे – कृ. आ. गुरुजी
( ५ ) मराठी नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय – ग. रं. दंडवते १९३१
( ६ ) मराठी नाट्यसृष्टी – पौराणिक नाटके – वि. पां. दांडेकर १९४१
( ७ ) मराठी नाट्यसृष्टी – सामाजिक नाटके – वि. पां. दांडेकर १९४५
( ८ ) मराठी रंगभूमीचा इतिहास – खंड १ – य. गं. लेले १९४३
( ९ ) आद्य महाराष्ट्र नाटककार विष्णुदास – वा. ग. भावे १९४३
( १० ) मराठी रंगभूमीचा इतिहास – श्री. ना. बनहट्टी १९५७
( ११ ) मराठी नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय – श्री. ना. बनहट्टी १९५९
( १२ ) नाट्यविमर्श – के. नारायण काळे १९६१
( १३ ) मराठीचा नाट्यसंसार – वि. स. खांडेकर १९४५

प्रकरण दहावे

# निबंध-वाङ्मय

## एक

### उद्गम आणि विकास

१८१८ ते १८८५ हा अव्वल इंग्रजीचा काळ धरिला, तरी निबंधाच्या दृष्टीने १८३२ ते १८७४ एवढीच त्याची मर्यादा ठरेल. कारण १८३२-मध्ये 'दर्पण' या पत्रास प्रारंभ झाला, आणि त्यातील संपादकीय स्फुट लेख व वाचकांची पत्रे हीच निबंधाची गंगोत्री होय. तसेच, १८७४ साली विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'निबंधमाला' सुरू केली व निबंधदृष्ट्या तरी 'अव्वल इंग्रजी' हे युग संपुष्टात आले, आणि नवीन युगास प्रारंभ झाला.

### दोन विभाग

अव्वल इंग्रजीतील निबंधाचे कालपरत्वे दोन विभाग पडतात. १८३२ ते १८४९ हा पहिला विभाग व १८५० ते १८७४ हा दुसरा विभाग. पहिल्या विभागात श्रीमती फेरार व लोकहितवादी हे दोन प्रमुख निबंधकार होऊन गेले. निबंध या वाङ्मयप्रकाराची स्पष्ट जाणीव या कालखंडात उदयाला आली नव्हती. सुचेल त्या विषयावर सुचेल त्या शब्दांत गद्य लिहिणे एवढीच या कालातील लेखकांची निबंधासंबंधी कल्पना असावी. या कालात राजकीय विषयावर क्वचितच लेखन झाले; मुख्य भर धार्मिक व सामाजिक विषयांवर दिला गेला. १८४९ साली 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिक सुरू झाले व त्याच्याद्वारे अव्वल इंग्रजीतील निबंधाचा दुसरा कालखंड सुरू झाला. स. म. दीक्षित, गोविंद नारायण माडगांवकर, विश्वनाथ नारायण मंडलिक, बाबा पदमनजी, विष्णुबुवा

ब्रह्मचारी, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर अशा अनेक लहानमोठ्या निबंध-कारांनी या काळात निबंधलेखन केले. पूर्वार्धाच्या तुलनेने उत्तरार्धातील निबंध जवळ-जवळ सर्वच बाजूंनी विकसित झाला. शैली व विवेचनपद्धती यांमध्ये लालित्य व रेखीवपणा हे गुण आले; तसेच, धार्मिक, सामाजिक, कौटुंबिक या विषयाबरोबरच आता वाङ्मय, निसर्ग, कला इत्यादी विषयांकडेही निबंधकार लक्ष पुरवू लागले. राजकीय विषयांवर लेखन करण्याची वृत्ती मात्र वाढली नाही. अव्वल इंग्रजीतील गद्यलेखनाला निबंधाचा निश्चित घाट लाभला, तो या कालखंडातच.

### दोन प्रकार

स्वरूपदृष्ट्याही अव्वल इंग्रजीतील निबंधाचे दोन प्रकार पडतात : नियत-कालिकांत प्रकाशित झालेला स्फुट निबंध व ग्रंथरूपाने प्रकाशित होणारा दीर्घ निबंध. पूर्वार्ध व उत्तरार्ध या दोन्ही कालखंडांत स्फुट व दीर्घ निबंध आढळतो. स्फुट निबंधासाठी लोकहितवादी व दीर्घ निबंधासाठी बाबा पदमनजी विशेष प्रसिद्ध आहेत.

### निबंध-कल्पना

अव्वल इंग्रजीतील निबंधवाङ्मयाची स्थूल रूपरेषा ही अशी आहे. या काळातील निबंधाचा सविस्तर विचार करण्यापूर्वी ' निबंध ' या शब्दाची व इंग्रजी वाङ्मय-प्रकाराची थोडी पूर्वपीठिका पाहणे आवश्यक आहे. ' निबंध ' या संस्कृत शब्दाचा धात्वर्थ ' गोवलेला विषय ' किंवा ' जीत विषय गोवला आहे अशी रचना ' असा आहे. ' शास्त्राधार देणे ' या अर्थाने ' निबंध काढणे ' असा शब्दप्रयोग प्राचीन मराठीत आढळतो. या अर्थाने ' निबंध ' ही संज्ञा जुनी असली, तरी ' निबंध ' हा वाङ्मय-प्रकार मात्र आधुनिक आंग्ल वाङ्मयाच्या अभ्यासाने अव्वल इंग्रजीत हळूहळू विकसित झाला. ' कोणताहि विषय न्याय्य रीतीनें उद्घाटणे आणि त्याची यथाशक्ति जुळणी करून जें वर्णन करणे तो निबंध होय, '[१] अशी अव्वल इंग्रजीच्या काळात निबंधाची व्याख्या करण्यात आली. ' कांहीं एक गोष्टीवर बाधल्याप्रमाणे लिहिलेले जें व्याख्यान तो '[२] असेही निबंध-वाङ्मयप्रकाराचे स्पष्टीकरण दिले गेले.

### इंग्रजी ' एसे '

इंग्लंडमध्ये एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी ' एसे ' हा गद्यवाङ्मयप्रकार वेगाने वाढत होता. त्याच्या अनुकरणाने मराठी निबंधाचा विकास झाला. परंतु इंग्लंड व महाराष्ट्र यांच्या सांस्कृतिक पातळीत इतके अंतर होते की, आंग्ल एसेचे तंतोतंत अनुकरण अव्वल इंग्रजीतील मराठी लेखकाला झेपणे शक्य नव्हते. एकोणिसाव्या शतकात इंग्लंडमध्ये वृत्तपत्रे व विद्यापीठे या साधनांच्या प्रसारामुळे इंग्लिश समाज सुसंस्कृत व सुशिक्षित झाला होता. अशा समाजाची बौद्धिक भूक भागविण्याचे कार्य इंग्लिश एसेला करावयाचे होते. या आपल्या प्रयोजनाला शोभेल, असेच आंग्ल

१. मराठी ज्ञानप्रसारक, १८५०.
२. मराठी भाषेचा नवा कोश, १८७०.

एसेचे रूप तेव्हा होते; प्रौढ, गंभीर व सालंकृत.

### मराठी निबंध

उलट, महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी मुद्रणकलेला व वृत्तसंस्थेला नुकताच प्रारंभ झाला होता. समाजात राजकीय क्रांती घडून आली होती; परंतु विचारवंतांनाही तिचा नीटसा अन्वय लागत नव्हता. जुन्या खाजगी शिक्षणपद्धतीचा कस उत्तर पेशवाईतच नाहीसा झाला होता व नवी शिक्षणप्रणाली पूर्णांशाने अस्तित्वात आली नव्हती. समाज चकित व मूढ झाला होता. प्रत्येक नव्या-जुन्या घटनेची समज अगदी नव्याने देणे भाग होते. अशा समाजासाठी अव्वल इंग्रजीत जे गद्य अवतरले, त्यातून मराठी निबंध उत्क्रांत झाला. स्वसमाजाप्रमाणे 'आपणहि सर्व विद्यार्थीच आहोंत,' अशी हे गद्य निर्माण करणाऱ्यांची भावना होती.[1] म्हणून या गद्याचे स्वरूप माहितीवजा, उपदेशपर व सुबोध आहे.

### बालबोध वळण

अव्वल इंग्रजीतील निबंधसदृश गद्याला असे बालबोध वळण लाभण्याचे आणखी एक कारण मराठी काव्याप्रमाणे मराठी गद्याला उज्ज्वल व अखंड वाङ्मयीन परंपरा नव्हती हे. महानुभावांचे गद्य अव्वल इंग्रजीत उजेडात आले नव्हते, आणि उजेडात आले असते, तरी त्याचे आधुनिक गद्याच्या विकासाला काही साहाय्य झाले असते, असे वाटत नाही. कारण महानुभावी गद्य अनेक शतके महाराष्ट्राच्या सामाजिक व वाङ्मयीन स्थित्यंतरांपासून अलिप्त राहिलेले असे आहे. आधुनिक युगाच्या प्रेरणा व्यक्त करण्यात ते अयशस्वी ठरले असते. ऐतिहासिक बखरी व पत्रे आणि अर्जदस्त, करीणे, कहाण्या इत्यादी इतरही गद्य प्राचीन मराठीत आढळते. पण त्यालाही 'वाङ्मयीन परंपरा' म्हणता येणार नाही. किंबहुना, 'वाङ्मय' म्हणून त्याच्याकडे कोणी पाहिलेच नाही. त्याचे मुख्य कारण वाङ्मयाचे आवाहन सार्वजनिक असावे लागते, तर बखरी, पत्रे करीणे, अर्जदस्त ही खाजगी हेतूने निर्माण झाली. कहाण्या यांचा अपवाद सांगता येईल, पण हा प्रवाह अगदीच संकुचित, अविकसनक्षम होता. कहाण्यांचे क्षेत्र तर केवळ माजघरापुरतेच होते.

यावरून नवीन मराठी गद्याला पूर्वीची सलग परंपरा नव्हती, हे तर दिसतेच. पण अशी एखादी परंपरा असती, तरी आधुनिक युगात तिचा कितपत उपयोग झाला असता, याची शंका आहे. मराठी पद्याला परंपरा होती, पण अर्वाचीन काळी त्याचा जो विकास झाला, तो प्रामुख्याने परंपरानिरपेक्ष; क्वचित परंपरेचा धिक्कार करूनही झाला. म्हणून आधुनिक मराठी गद्याने परंपरेचा आधार घेतला नाही, त्यामुळे ते निस्तेज झाले हे मत जसे गैर आहे, त्याचप्रमाणे मराठी गद्याला तेजस्वी परंपरा लाभली असती, तर अव्वल इंग्रजीत त्याचे विशेष मोहक रूप प्रकटले असते, ही कल्पनाही विवाद्य आहे. खरे म्हटले, तर मराठी गद्याला प्रभावी परंपरा नसल्यामुळे

१. सवयी आणि अभ्यास, वि. ना. मंडलिक.

पद्यापेक्षा गद्याचा विकास सहज व अप्रतिबंध झाला, असे म्हटल्यास ते चूक होईल, असे वाटत नाही. नव्या युगाच्या जाणिवा व्यक्त करण्यासाठी नव्या वळणाच्या गद्याची गरज होती. ती भागविण्यासाठी देशीविदेशी सरकारी अधिकारी, वृत्तपत्रांचे संपादक, नवशिक्षित तरुण लेखकवर्ग, इतकेच नव्हे, तर पत्रलेखकांच्या रूपाने प्रत्यक्ष समाजच पुढे सरसावला. अनुवाद, अनुकरण आणि आत्मप्रत्यय या पायऱ्यांवरून जात अव्वल इंग्रजीतील गद्य व त्या गद्यातून मराठी निबंध आकारास आला. नियतकालिके हे त्याचे मुख्य माध्यम होते.

## नियतकालिके आणि निबंध

१८३२ साली सुरू झालेले 'दर्पण' हे मराठीतील आद्य नियतकालिक. त्यातील आंग्ल विभागाचे लेखन बाळशास्त्री जाभेकर व त्यांच्या लेखनाचा अनुवाद करून मराठी विभागाचे लेखन जनार्दन वासुदेवजी हे करीत असत. 'नियतकालिक लेखांपासून जे स्वार्थ होतात त्यांविषयीं', 'इंग्लंड देशांतील राज्यरीतींत बदल करण्यासंबंधीं यत्न', 'राममोहन राय', 'विद्या हे बळ आहे', 'स्वतंत्र व पक्षपातरहित वर्तमानपत्रापासून होणारीं कार्यें आणि फळे', 'रहदारी जकाती' इत्यादी विविध व महत्त्वपूर्ण विषयांवर दर्पणात गद्य स्फुटे प्रकाशित झाली आहेत. 'दर्पणा'च्या आरंभकाली 'नियतकालिक लेखापासून जे स्वार्थ होतात' याविषयी जे स्फुट आले आहे, ते तर त्या विषयावरील एक छोटासा निबंधच होय.

ते स्वार्थ पुढीलप्रमाणे सांगितले आहेत —

"यद्यपि या लेखांचीं फळे संसारांतील सामान्य व्यवहारांत उपयोगी नव्हत; आणि लाभ नसतांही केवळ सुरूपतेस येण्याचा साधनाचा विचार करणारे जे विद्वान त्यांस मात्र संतोषकारक होत, म्हणोन अशा फळांपासूनच या लेखांचा थोरपणा वर्णावा असे नाहीं, तथापि लोकांस लाभ देणाऱ्या गोष्टीही यापासून घडतात. ते असे. त्यांपासून अतिशय दूरचे देशांतील वर्तमाने कळतात. बुद्धिमानांची बुद्धिमत्ता त्यांचे द्वारे सर्व लोकांत प्रसिद्ध होत्ये; उपयोगी बातमी समजण्यांत येत्ये. आणि श्रमसाध्य विद्यादिकांचे विचारांकडे जे चित्त देत नाहींत, त्यांचे मनोरंजनही होते. अशा लेखांचा प्रचार जा देशांत निर्विघ्नपणे होऊन लोकांचे मनांत त्यांतील गोष्टी ठसतात ते देश धन्य होत."

बाळशास्त्री जांभेकर यांनीच सपादित केलेल्या 'दिग्दर्शन' या मासिकातही 'रसायनशास्त्र', 'सूक्ष्मदर्शक यंत्र', 'कागदाची उत्पत्ति', 'इतिहास', 'चीन देशाचें वर्णन', 'कृतज्ञता' इत्यादी विविध विषयांवर स्फुट लेख आले आहेत. 'दर्पण' व 'दिग्दर्शन' या नियतकालिकांतील लेखांचे मथळे पाहिले म्हणजे त्या लेखांचे विषय निबंधालाच काय, पण ग्रंथलेखनासही अनुरूप ठरतील, असे वाटते; पण प्रत्यक्षात मात्र या लेखांचे स्वरूप मुख्यतः माहितीपर व सूचनावजा आहे. स्वतंत्र चिंतनाचा त्यात जवळजवळ अभावच आहे. ही उणीव प्रभाकर पत्र सुरू करून भाऊ महाजन यांनी भरून काढली. 'प्रभाकरा'त त्यांनी 'ग्रेट ब्रिटन देशाची राजनीति', 'फ्रेंचांचे बंडाचा

वृत्तांत ', ' विधवाविवाह ', ' स्त्रीशिक्षण ', ' ताबुताची चाल ', ' वेठबिगार ', ' युरोपियन अधिकाऱ्यांचा अरेरावीपणा व बेफिकीर वृत्ति ' इत्यादी लेख प्रकाशित केले. भाऊ महाजनांची वृत्ती कशी स्वाभिमानी होती, त्याचे प्रत्यंतर पुढील लेखात येईल —

" सांप्रत मुंबई येथील हिंदु लोक इंग्रजी भाषा आणि विद्या यांपासून संसारांत उपयोग आहे म्हणोन त्या शिकणे हाच मोठा पुरुषार्थ मानून त्यांत सर्व वेळ खर्च करितात आणि देशपरंपरागत जी स्वभाषा किंवा त्या भाषेचें मूळ आणि धर्मशास्त्र-पुराणें यांच्या ज्ञानास साधन अशी जी संस्कृत भाषा तिचा अभ्यास करण्याकडेस कांहींच लक्ष देत नाहींत. यामुळे येथील लोकांची भाषा व स्थितीरीती हीं विलक्षण होत चाललीं आहेत, ती अशी कीं, ते बोलूं लागले असता पंचवीस शब्दांमध्ये वीस शब्द इंग्रजी येवून मध्यें विभक्ति, अव्यये, सर्वनामे आणि प्रसिद्ध क्रियापदें इतकीं मात्र स्वभाषेचीं उपयोगांत आणतात. तसेच नमस्कार करणे अथवा आगतस्वागत विचारणे झाल्यास इंग्रजी शब्दांनीं करितात. कोणी स्नेही आला असतां इंग्रेजाप्रमाणे त्याचा हात धरितात आणि ते देवळांत गेले असतां टोपी काढितात, त्याप्रमाणे आपण पागोटे काढतात. हा एक दृष्टान्त लिहिला, पण याचप्रमाणे आणखी बहुत सांप्रदाय पडत चालले आहेत. त्याहीकरून असें होते कीं, प्रौढ भाषा आणि आमचे शिष्टसंप्रदाय यांचाच ज्यांस जन्मापासून अभ्यास त्यांची व एथील लोकांची गाठ पडली असतां त्यांस हे जसे द्वीपान्तरचे लोक असे भासतात आणि त्यांचे स्वरूप यांस न समजून आपलें हेंगाडे बोलणें त्यांस समजत नाहीं एवढ्यावरच हे त्यास वेडे ठरवून उपहास करितात. " [1]

दर्पणातील लेखापेक्षा यात वैचारिक भरीवपणा व शैलीचा जिवंतपणा अधिक आहे, हे सहज लक्षात येते. ज्ञानोदय ( १८४२ ) व ज्ञानप्रकाश ( १८४९ ) याही नियतकालिकानी मराठी निबंध घडविण्याच्या कार्यात आपला वाटा उचलला. ज्ञानोदयात ' कलकत्ता शहराचे वर्णन ', ' खिस्ती मंडळीची बखर ', ' चीन देशांतील भाषा व पुस्तके ', ' पुनर्विवाह, ' ' ब्राह्मणांची दुर्दशा ', ' लग्नासंबंधी हिंदु लोकांचे मूर्खपण ' इत्यादी लेख आले आहेत. ' ज्ञानप्रकाशा'चे संपादक एका ठिकाणी म्हणतात —

" आलीकडे काहीं गृहस्थांनीं आम्हांस असे सुचविलें कीं, आमचे नांव पत्रात दाखल होऊं नये. असे कितीएक उद्गार आमचे कानीं आले. त्यास महाराज आपण असे समजावे कीं, कमांडर चीफ व गव्हर्नर जनरल यांचे आजचे काळीं नानासाहेब भाऊसाहेबासारखे पराक्रम त्यांचींहि नावे कारणपरत्वे निघतात व त्यांचे वर्तणुकेविषयीं छापणारे यांनी जें संभवेल ते लिहिण्यास अधिकार आहे. कारण कीं जो सरकारचा चाकर तो लोकांचा चाकर आणि छापणारा लोकांचे डोळे आहेत. आणि दुसरे असे आहे कीं बहुधा आधारावाचून आम्हीं लिहीत नाहीं. त्यास आमचे

१. प्रभाकर, ८ मे १८४२.

पत्र वाचणारांपैकी कोणाचे नांव बाहेरचे पत्रांत पाहाण्यांत आलें तें आम्हीं जर तुम्हास न कळवावें तर मग छापावे कशास व तुमची चाकरी कशास करावी ? जे जे कोणी तुम्हास म्हणतील ते आम्ही तुमचे कानावर घालूं. तुमचे उत्तर असेल ते आम्ही छापूं म्हणजे त्याचें निवारण जाहलें. छापखाने सुधारणेचे द्वार आहे. "[1]

दर्पण, दिग्दर्शन, प्रभाकर ज्ञानोदय व ज्ञानप्रकाश ही सर्व १८५०-पूर्वीची नियतकालिके होत दर्पण-दिग्दर्शनांतील माहितीपर गद्यलेखनातून मराठी निबंधाला वाट गवसली. प्रभाकराने या माहितीपर लेखांना स्वतंत्र व निर्भीड विचारांची जोड दिली; दर्पणातील कृत्रिम भाषेला जिवंत केले. परंतु भाषाशुद्धीकडे द्यावे तेवढे लक्ष प्रभाकराने दिले नाही. त्यामुळे कॅंडीसारख्या परभाषकानेही भाऊ महाजनांचा उपहास केला.[2] ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश यांच्याबाबतही असेच घडले.

### पत्रव्यवहार

प्रस्तुत नियतकालिकांत प्रकाशित होणाऱ्या संपादकीय लेखांप्रमाणे त्यांत प्रसिद्ध होणाऱ्या वाचकांच्या पत्रव्यवहारानेही महत्त्वाचे निबंधविषयक कार्य साधले. या पत्रांचा संबंध एका बाजूने ऐतिहासिक काळातील अखबारनविसाच्या वार्तापत्रांशी व दुसऱ्या बाजूने लोकहितवादींच्या शतपत्रांशी आहे अखबारनवीस देशविदेशांतील महत्त्वपूर्ण वार्ता धन्याला कळवीत असत. या पत्रलेखकांनी हे कार्य समाजाच्या संदर्भात केले; एवढेच नव्हे, तर समाजाला प्रसंगी मार्गदर्शनही केले. या हेतूंना सुसंगत रूप देऊन पुढे लोकहितवादीनी आपली शतपत्रे लिहिली. गद्यलेखनात जिव्हाळा, युक्तिवादचातुरी, वक्तृत्व, वास्तवता इत्यादी गुण जे विशेषत्वाने प्रकट झाले, ते प्रथम या पत्रवाङ्मयातच

### दर्पणातील पत्रे

दर्पणातील पत्रव्यवहारात धार्मिक प्रश्नांना अग्रस्थान मिळाले. राज्यकर्ते जरी धर्मव्यवहारापासून अलिप्त होते, तरी मिशनऱ्यांचे पद्धतशीर आक्रमण सुरू झाले होते. सामाजिक सुधारणेलाही प्रारंभ झाला होता; व बहुतेक सामाजिक सुधारणांच्या आड धार्मिक रीतिरिवाज उभे होते. त्यामुळे धर्मविषयक चर्चेला भर आल्यास आश्चर्य नव्हते. ' शास्त्रे व परलोकसिद्धि ', ' हिंदुधर्म आणि सती ', ' ईश्वर आहे याविषयी प्रमाण ' इत्यादी विषयांवर पत्रे आढळतात. ' पुनर्विवाह प्रकरण ', ' मनुष्य जातीचे भेद ', ' स्त्रियांस विद्याभ्यास ', ' मुंज मुलीची कां नाही ? ' अशा सामाजिक विषयांवरही पत्रलेखकांनी चर्चा केली आहे. क्वचित ' सरकारी नोकरींत जातीयता ' व ' महाराष्ट्र भाषेचे व्याकरण ' असे वेगळे विषयही पत्रलेखक घेत. या पत्रलेखकांच्या वादंगाचा कोणाला कंटाळा येत असे, व त्याबाबतही पत्र लिहिले जाई —

१. ज्ञानप्रकाश, १९ मार्च १८४९.
२. ज्ञानोदय, १ फेब्रुवारी १८५१.

" विनंती विशेष. मी तुमचा पत्र वाचणारा ऐसें जें – तुम्ही पत्राचे नांव दर्पण असे ठेविलें आहे; परंतु या तुमच्या पत्राचें नांव रणशिंग असे ठेविलें असतां फार चांगलें शोभेल; कां कीं ते शिंग बाजलें म्हणजे दोन्ही सैन्यांत जसी लढाई होऊं लागत्ये, असे तुमचें पत्र होतांच वाद चालू झाले. असो हि थट्टा. परंतु सांप्रत तुमचे पत्रांत धर्माचे वादांची पराकाष्ठा झाली. ती इतकी किं वाचणारांतून बहुतांचे चित्तांत त्याचा त्रास उत्पन्न झाला असेल असे मला खचित वाटते...माझा अभिप्राय हा किं कांहीं वाद छापावे, परंतु पत्राची पत्रें जीं वादाने भरतां, त्यांत दुसरे उपयोगी व मनोरंजक विषय लिहायास बहुत मिळतील. " [१]

**प्रभाकरातील पत्रे**

'प्रभाकरा'तील पत्रे 'दर्पणा'तील पत्रांपेक्षाही सरस आहेत. इंग्रजी राज्यापासून भारताचे किती नुकसान झाले, याचे निर्भीड विवेचन करणारे 'प्रभाकरा'तील 'एक कोंकणस्था'चे पत्र प्रसिद्धच आहे. त्यात पत्रलेखक म्हणतो —

" विनंती विशेष. इंग्रज लोक यांहीं हिंदुस्थान घेतल्यापासून त्यांचे ग्रंथकार व वर्तमानपत्रवाले त्यांची नेहमी तारीफ करीत असतात किं आपल्याकडे हिदुस्थान आल्यापासून तो देश दिवसंदिवस सुधारत चालला आहे, लोक मोठे सुखी होताहेत आणि त्याचे हातीं हे राज्य दिल्ह्यावरून ईश्वराने हा हिंदु लोकांवर मोठा उपकार केला अशी नाना तऱ्हेची बडबड ते करित असतात. त्यास असी बडबड करण्यास त्यांस काय आधार आहे तो मला समजत नाहीं. परंतु मला एक वाटते की हिंदु लोक अज्ञान आहेत. तेणेकरून त्यांस आपली स्थिती कोणत्या प्रकारची आहे आणि उत्तरोत्तर कसी होत जाईल याविषयी कांहींच समजत नाही व दुसरे त्यांस इंग्रजी भाषेचे ज्ञान नसते, त्यामुळे ते इंग्रेज लोक ग्रंथांतून काय लिहितात हेही समजत नाही असी संधी सापडल्यामुळे ते इंग्रेज युरोपांतील मोठमोठीं राज्ये आहेत त्यांस भुलथापा देण्याकरितां अशा लबाड्या करितात. त्यास त्यांचा अशा लबाड्या चालुं नये आणि या लोकांस इंग्रेज लोकांची दगलबाजी समजावी आणि आपले हिंदु लोकांचे या बाबे डोळे उघडावे अशा हेतुने तुमचासारखे जे विद्वान पुरुष आहेत त्याहीं आपले लेखणीस विसांवा न होतां हमेशा या गोरे लोकांचा काळेपणा यत्किंचित् उघडकीस आणावा असा तुमचा धर्म होय. असे असतां आज चार पांच महिने होत आले तुमचे पत्र चालले आहे, परंतु हा विषय अद्यापि तुम्ही काढला नाहीं. " [२]

प्रस्तुत पत्र चांगले प्रदीर्घ असून पत्रलेखकाने प्रारंभी इंग्रजधार्जिण्या ग्रंथकारांवर व वृत्तपत्रकांवर टीका केली आहे. 'ज्ञानसिंधु' व 'ज्ञानचंद्रोदय' या पत्राचा नावानिशीने धिक्कार करून 'प्रभाकरा'ने जर आपले काम चोख रीतीने बजावले नाही,

१. एक मनुष्य, दर्पण, २९ जून १८३२.
२. एक कोंकणस्थ, प्रभाकर, १३ मार्च १८४२.

तर त्याला आपण ‘ निशाकर ’ म्हणू , अशी धमकीही दिली आहे. राज्यकर्त्यांवर उघड टीका करताना पत्रलेखक म्हणतो —

“ आतां इंग्रेज लोक यांहीं हिंदुस्थानावर काय उपकार केले हे पाहुं गेलों असतां मला एकही आढळत नाहीं. ते आत्मस्वार्थि लोक परमुलखांतून आलेले मुळचे केवळ बुभुक्षित आणि दरिद्रि असे जे लोक, ते हिंदुस्थानांत पहिल्यानें आले तेव्हां तेथील संपदा व वैभव पाहून सहज चकित जाहलेच असतील. तेव्हां प्रथमतः त्यांचे मनांत ती संपदा आपले मुलुकांत न्यावी याशिवाय दुसरी कल्पनाच आलि नसेल, तेव्हां ती कोणत्या प्रकारानें न्यावी याचा विचार करूं लागले असतील. ”

इंग्रजांवर टीका करीत असतांनाही केवळ तेवढ्यावरच पत्रलेखक समाधान मानीत नाही. इंग्रजांच्या वैगुण्याप्रमाणेच त्यांची वैशिष्ट्येही तो स्पष्ट करितो; व स्वसमाजाचे दोषही स्पष्ट शब्दांत नमूद करितो —

“ इंग्रेज लोक जेव्हां पहिल्याने हिंदुस्थानांत आले तेव्हा त्यांचा हेतु फक्त व्यापार करण्याचा होता. तेव्हां त्या वेळे जे राजे या मुलुखात होते त्यांहीं त्यांस फक्त व्यापार करण्याची मात्र मोकळीक द्यावयाची होती. परंतु तसे न करितां त्यांस फौज ठेवण्याची व दारुगोळा व शस्त्रे बाळगण्याची सुट दिल्ही, तेणेकरून ते या लोकाचा सहज पराभव करित. ते युद्धकौशल्यांत मुळचेच फार निपुण होते. बरे पुढे जेव्हां या लोकांहीं पाहिलें कीं इंग्रेज लोक हे आपल्यास अजिक्य आहेत तेव्हां तरी विचार करायाचा होता कीं हे लोक आले कोठून, यांचा मुलुक आहे कोठे, हे आपल्यास कोणत्या बळावर जिंकतात ? परतु हा विचार एकीकडेस करून आपआपल्यांत कलह जाला असतां त्यांची मदत मागीत आणि त्यांस मुलुक देत असे करून करून त्यास प्रबळ केलें आणि आपण हिनबळ जाले. हे सगळे अज्ञानाचे फळ. जर हे त्या वेळेस विचार करते कीं हे लोक २००० कोशावरुन आलेले परदेशी. आपण या मुलुकांत रहाणारे त्यास त्यांचे उगीच अन्नपाणीच बंद केलें असते तर बिचारे आल्या वाटेने परत जाते. याच लोकांची पलटणे तयार करून त्यांहीं यांसी लढावे परंतु हे हिंदु लोक असे गावदी कीं त्यांचे सारखी तोफखाना त्यांचे युद्धकौशल्य हे आपण घ्यावें आणि आपणही त्यांचे सारीखें युद्धनिपुण व्हावे आसे त्यांचे मनांतहि आले नाही. त्यांही युद्धप्रसंग आला म्हणजे वेडेबागडे लोक जमा करावे आणि हरि विठ्ठल म्हणून त्यांचे कवायत शिकलेले लोकांवर हल्ला करावा. अशा त्याहीं आपल्या रानवट चाली आज-दिवसपावेतों सोडल्या नाहींत आणि तेणेकरून शेवटीं या थाऱ्यास आले. ”

## स्वसमाजाचे दोषदर्शन

पेशवे व ब्राह्मण यांच्यावर टीका करिताना पत्रकार लिहितो —

“ पुण्यांत अखेरचा पेशवा बाजीराव हा तर इतका मूर्ख होता कीं याणे आळसी निरोपयोगी आसल्या लक्षावधी ब्राह्मणांस रोज साखरभात आणि बुंदी यांचीं जेवणें द्यावीं आणि फौजेस रुकसत दिल्ही. आतां असल्या मूर्खत्वास काय म्हणावे पहा बरें.

जेव्हां इंग्रेज लोकांहीं पुणें घेतलें तेव्हां ज्या ब्राह्मणांही त्यांचें अन्न खाल्लें ते उपयोगी पडलें किं काय ? तेव्हा पहा बरें जर त्यांचे वाटचें त्या अन्नाचे पैक्याने पलटणी ठेविल्या असत्या तर किति उपयोगी पडल्या असत्या."

अशा रीतीने इंग्रज, इंग्रजधार्जिणे एतद्देशीय विद्वान, शेवटचा बाजीराव, त्याचे ब्राह्मण-मंडळ, स्वकीयांचे अज्ञान अशा अनेक व्यक्तींवर व वृत्तीवर सडेतोड टीका करूनही पत्रलेखकाचे विवेचन एकांगी किंवा पूर्वग्रहदूषित वाटत नाही, हे विशेष. त्याची भाषाही उत्कट भावना व भरीव विचार पेलण्याइतकी कमावलेली आहे; अव्वल इंग्रजीत ही गोष्ट दुर्मिळ होती. 'एक कोकणस्था'च्या पूर्वी भास्कर पांडुरंग तर्खडकर' यांनी 'एक हिंदु' या टोपणनावाने इंग्रजी राजनीतीचे कृष्ण स्वरूप उघड केले होते. पण तर्खडकरांचे लेखन इंग्रजीत असल्यामुळे, विचारदृष्ट्या जरी त्याला महत्त्व असले, तरी मराठी निबंधाच्या दृष्टीने काही महत्त्व आहे असे वाटत नाही. वेचक व प्रांजळ शब्दांत काळ्यांचा गावदीपणा व गोऱ्यांचा काळेपणा त्यांच्या पदरात टाकण्याचे निकडीचे कार्य मराठीत 'एक कोकणस्था'नेच प्रथम केले, असे दिसते.

**सामाजिक सुधारणाविषयक पत्रे**

'एक कोकणस्था'ने सामाजिक सुधारणेच्या क्षेत्राला स्पर्श केलेला नाही, पण त्या विषयावरील पत्रेही प्रभाकरातून प्रसिद्ध होत —

"महाराज आपले मागल्ये पत्रांत बेळगांव मुक्कामीं दोन ब्राह्मणांचे विधवा स्त्रियांचे पुनर्विवाह जाहाले असे आपण लिहिलें. ही गोष्ट ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. कारण हा अधर्माचा पाया मुख्यत्वें ब्राह्मणानींच घातला असे याजवरून सिद्ध होते. धर्मशास्त्रांत असे आहे कीं, ब्राह्मणास एकदा ब्राह्मणानें अथवा दुसरे कोणी दान दिलें तर ते परत घेणे वर्ज्य केलें आहे. बरे जर त्या स्त्रीनें स्वयंवर करावें असे कोणी म्हणेल तर जी विधवा स्त्री स्वयंवर करणार तिचा मेलेल्या भ्रताराचे जे कुलपुरुष असतील ते तिचे सुहृद. सबब त्यांजबरोबर तर पुनर्विवाह होणार नाहीच, परंतु जर तिनें दुसरे कुलांतील पुरुषाबरोबर स्वयंवर केले तर शास्त्रांत असे आहे कीं, जी स्त्री कुलांतून गेली तिचा घटस्फोट त्या कुलपुरुषांस केला पाहिजे. बरे तो घटस्फोट केला म्हणजे ती विधवा स्त्री प्रेतरूप जाहाली आणि तिजबरोबर लग्न करणारा पुरुष किती शास्त्रास अबद्ध चालला असे होईल." [२]

आपल्या पत्राच्या पूर्वार्धात लेखकाने विधवाविवाहाच्या सुधारणेचे खंडन केले. परंतु सर्वच सामाजिक सुधारणांच्या तो विरुद्ध आहे असे नाही. पत्राच्या उत्तरार्धात त्याने बालविवाहाला विरोध दर्शविला आहे —

"अहो महाराज, प्राचीन कालांत असे होते कीं, अल्पवयी मरण हे क्वचित सहस्रांत एखादेंच होत असे. परंतु हाल्लि याचा प्रादुर्भाव विशेषच होत चालला

१. बॉंबे गॅझेट, १० जुलै १८४१ ते २० ऑगट १८४१.
२. धर्माभिमानी, प्रभाकर, ६ फेब्रुवारी १८४२.

याचे मूळ कारण शोधून काढावें ते तर एकीकडेच राहिलें, परंतु ही शास्त्रविरुद्ध मते काढून अधर्मप्रवर्त करावा हे अगदी नीट नाहीं. पुरुषानें सोळा वर्षांपलीकडे लग्न करावें म्हणजे तेणेंकरून स्त्रीस बालवैधव्य प्राप्त होणे क्वचितच घडण्यांत येतील व धर्मसंरक्षण होईल कीं स्त्रीपुरुषांचा संयोग काळीं होऊन त्यापासून जी प्रजा होईल ती शरीरानें सुपिड होऊन अल्पवयी सहसा मरणार नाहीं. अल्पवयी स्त्रीपुरुष मरण पावून हे जे वियोग होतात त्याचे कारण हाल्लि जी अगदि अल्पवयांत लग्नें करतात तींच मुख्यत्वे आहे."

**पत्रांचे इतर विषय**

इंग्रजांची राजनीती व सामाजिक सुधारणा अशा गंभीर विषयांप्रमाणेच अगदी साध्या विषयांवरील रसाळ भाषेतील पत्रेही 'प्रभाकरा'ने प्रसिद्ध केली —

"मी अंमळसा रंगीला गडी आहे. कांहीं जत्रा, उरुस किवा असाच कांहीं जेथे बहुत लोकांचा समाज असतो तेथे मौज पाहावयास गेल्यावाचून नाहीच राहावयाचे अशी माझी हमेशा चाल आहे. त्याप्रमाणे गेले सोमवारी मी पागडी घालून व दुसरा थाटमाट करून कित्येक सोबत्यांबरोबर ताबुतांची मजा पाहावयास बारावर दोन वाजतांचे सुमारे घराहून निघालों, तो मी आरंभीं भेंडीबाजारांत गेलो आणि तेथे मौज पाहात उभा राहिलो. तो चमत्कार काय सांगावा ! माझे मन अगदी तल्लीन जाहले, व एके गोष्टीने मला थोडेसे विरस केले. तितकी जर गोष्ट जाहली नसती तर मग तो किती आनंदाचा दिवस होता ते माझ्याने वर्णनहि करता आले नसते. ती गोष्ट ही की; बैलावर पखाली घालून त्यांतील पाणी ताबुतांपुढे ओतीत. तेणेकरून वर्षाऋतू-प्रमाणे रस्त्यांत चिखलाचा रेदा होऊन त्या गर्दीत चिखलाचे शिटकाव माझे नवे धुपट आगरख्यावर उडून मला केवळ विरूपच करून टाकले "[1]

**कॅण्डीसाहेबाचे पत्र**

प्रभाकरातून भाऊ महाजनानी कॅण्डीच्या मराठी ग्रंथपरीक्षणाच्या अधिकारावर आक्षेप घेतला. त्याला कॅण्डीने दिलेले उत्तर 'ज्ञानोदया'तून प्रसिद्ध झाले आहे —

" एतद्देशीय लोकांनीं केलेलीं मराठी भाषांतरे व त्यांनी स्वतः रचलेले ग्रंथ तपासण्याचे काम मजकडे बहुत वर्षांपासून आहे...... त्या भाषांतरांपैकीं बहुतेक भाषांतरे ज्यांनी केलीं होतीं त्यांस इंग्लिश भाषेचे ज्ञान आहे खरे, परंतु त्यांनीं आपल्या जन्मभाषेचा ( मराठी भाषेचा ) अगदी अभ्यास केला नाहीं, ह्यामुळे परकीय भाषेंतून जें काय ज्ञान त्यांस प्राप्त झाले आहे ते सुंदर रीतीनें ग्रंथ रचून किंबहुना लोकांत लिहिण्याबोलण्याच्या ज्या पद्धती आहेत त्याप्रमाणे तरी ग्रंथ लिहून स्वभाषेंत आणता येत नाही. "[२]

१. प्रभाकर, २८ फेब्रुवारी १८४२.
२. ज्ञानोदय, १ फेब्रुवारी १८५१.

मराठी लेखकांचा दोष योग्य शब्दांत दाखवून कॅण्डी पुढे म्हणतो —

" प्रभाकरकर्ता असें म्हणतो कीं, मेजर क्यांडीसाहेबास मराठी भाषा अगदी समजत नाहीं, व त्यास पंडितांच्या मदतीवाचून दोन ओळींचे देखील भाषांतर व्हावयाचें नाहीं. आतां माझ्या अंगीं मराठी भाषेचें ज्ञान किती आहे हें म्यां स्वतः बोलावें हें मला योग्य वाटत नाहीं; पण असें म्हणण्यास मला चिंता नाहीं कीं, ज्या अर्थी मी आज पंचवीस वर्षें मराठी भाषेचा अभ्यास करीत आहे, त्या अर्थी तिचें कांही ज्ञान मला असावेंच......प्रभाकर पत्रांत मीं जीं वाक्ये पाहिलीं आहेत तशीं दोषयुक्त वाक्ये माझ्या हातून पडतीं, तर मला मोठी लाज वाटती. लांब नको, माझी निंदा करतांना त्यानें ज्या वाक्याने आपल्या मनांतील अर्थाचे उद्घाटन केले आहे ते वाक्यच किती दुष्ट आहे हे पहा. (ऑक्टोबराच्या २७व्या तारिखेच्या प्रभाकरांत ५३व्या पृष्ठांत) 'त्याच्याने दोन ओळी भाषांतर करतां यावयाचे नाहीं.' मराठी भाषा शिकण्यास ज्यानें नुकता प्रारंभ केला आहे त्यास देखील ठाऊक आहे की, त्याच्याने करतां यावयाचें नाहीं, हे वाक्य अगदी अशुद्ध आहे. हे वाक्य शुद्ध रीतीने लिहिण्याचे प्रकार दोन आहेत; " त्याच्याने करवणार नाहीं " किंवा " त्यास करतां यावयाचे नाहीं. " आपल्या हातून अशा चुक्या पडतात, आणि त्या चुक्या परदेशांतून येऊन आपली भाषा शिकणारे लोक काढतात, ह्या गोष्टीची प्रभाकरकर्त्यास लाज वाटावी. "

मेजर कॅण्डीच्या वरील पत्रात विनय व आत्मविश्वास यांचा सुंदर समन्वय साधला आहे.

**वृत्तपत्रांच्या महत्त्वाचे वर्णन**

' एक विद्यावृद्धेच्छु ' याने ' ज्ञानप्रकाशा'त लिहिलेल्या एक पत्रात वृत्तपत्रांचे महत्त्व थोडक्यात प्रतिपादन केले आहे[1]—

" विनंती विशेष. तुम्ही पत्र काढतां परंतु त्याचा उपयोग बहुतांस अजून कळत नाही. जे मोठे मोठे म्हणवितात व आपले ठिकाणीं गर्व करून आहेत त्यांस देखील असे वाटते हा रिकामा उद्योग आहे. परंतु तुमच्यावाटचे मीच बोलतो. बातमीपत्राचे उपयोग फार आहेत. आपले लोकांमध्यें तर कोणास बातमी मुळींच कळत नाहीं. ज्यास आपला आपला विचार दिसतो. ज्याची त्याची नजर आपले घरापुरती असते पुढे काही कळत नाहीं. याजमुळे हे लोक पुढे सरकत नाहींत. मजुरी करणे हें कांही फारसे शहाणपण नाहीं. शहाणपण म्हणजे कोठे काय आहे हे पाहणे, सर्व देशांवर व जगावर नजर ठेवणें, माहितगारी करणें यांचे नांव शहाणपण. याजकरतां आम्ही या लोकांची प्रार्थना करतो कीं तुम्हीं इतके दिवस सुस्तीने राहिलेत त्याचीं फळे ही भोगतां. परंतु अजून तरी तुमची नजर दूरवर जाऊं

१. एक विद्यावृद्धेच्छु, ज्ञानप्रकाश, ५ मार्च १८४९.

द्या. विद्या करा. वर्तमानपत्रादिक वाचीत जा म्हणजे तुम्हास बहुतकरून माहिती होईल, जें न समजेल ते पुसा आणि खातरी करा. वादविवाद करीत जा. म्हणजे तुमची बुद्धी वाढेल. विद्येचें शत्रुत्व कराल व कुबुद्धीचा आश्रय कराल तर फजीत पावाल. जवळ तुमच्या पैसे असले म्हणून सर्व मुलखांत आहेत असें नाहीं. आपले-सारखा दुसऱ्याचा विचार. हे विनंती. ”

**परीक्षणात्मक लेखन**

कित्येक पत्रलेखकांनी आपल्या पत्रांमधून पुस्तकपरीक्षणे. नाट्यपरीक्षणे केली आहेत. स्टीव्हन्सनच्या मराठी व्याकरणाचे संक्षिप्त परीक्षण ‘ एक एतद्देशीय ग्रहस्त ’ याने १६ मे १८३४-च्या ‘ दर्पणा’त केले आहे. ४ एप्रिल १८६६ रोजी ग्रॅण्ट रोड थिएटरमध्ये ‘ सुलोचना-आख्यान ’ नाटकाचा प्रयोग झाला. नाटक पूर्ण न केल्यामुळे वा जाहिरातीत नमूद केल्याप्रमाणे इतर उपकार्यक्रम न जोडल्यामुळे ज्ञानप्रकाशाचा वार्ताहर खवळला व पत्ररूपाने त्याने प्रस्तुत नाट्यकंपनीची हजेरी घेतली —

“ मुळीं जी सोंगें आली त्याजला स्पष्टपणे सुधें भाषण करता येईना. कोंकणी चालीचे अगदी संदिग्ध विवळून बोलणे बोलत. जो ज्या नाटकपात्रांनीं विषय जसा रस तसा करावा व सर्वांस पसंत भाषण बोलावें ते तर त्यास स्वप्नींहि माहीत नाहीं. नाटकपात्रें जे कांही बोलत ते कोणास बरोबर समजले देखील जाईना. मग रंग कोठून जमणार. सर्व मंडळी नाखुष व उद्विग्न होऊन विनाकारण ठकबाजीने जाहिरातीत मजकूर दर्शविला ती तरी सोंगे व फार्स वगैरे करावयाचीं होती. परंतु मधूनमधून ते विषय नाटककारांनी केले नाहीत. शेवटी दुसरे भागाचा निम्मे सुमार खेळ केला आणि सर्वांस निर्लज्यपणाने सांगितले की आता सर्व खेळ रात्र थोडी राहिली म्हणून आमच्याने करवत नाहीं. ”[1]

**शैलीचे नमुने**

केवळ शैलीच्या दृष्टीने विचार केल्यासही काही आकर्षक पत्रे आढळतात —

“ एडिटर तात्या गम्मत हो गम्मत. सांगू का तुम्हाला ? नको पण. तुम्हास असल्या गमतीशीं काय करावयाचे आहे ? तुम्ही आपले आर्टिकले लिहून देश सुधारण्याच्या कामांत अगदी गर्क झालां आहां. तरी ही गम्मत आपल्या पत्राच्या एका कोपऱ्यांत द्या ठांसून म्हणजे मौज तर होईल. थोड्या दिवसांमागे चांदण्या रात्रीं मी व माझे एक दोन मित्र कांही कामाकरिता बुधवारांत कोतवाल चावडीजवळ गेलों तों बुधवार वाड्याकडून उघडी दोन पांढरे घोडे जुंपलेली एक फैटन जी धावत चालली ती एकदम कोतवाल चावडीच्या शेजारी एक नवीन वाडा आहे त्याच्या अलीकडे थोपली. चांदणे फारच शुभ्र पडल्याकारणाने आंतील मनुष्ये स्पष्ट दिसलीं. या गाडींत एक गोरागोरापान फिरंगी पोषाखाचा, लांब दाढीचा एक ऋषी दिसला.

१. ज्ञानप्रकाश, २३ एप्रिल १८६६.

त्याच्या शेजारी एक पऱ्याजी पगडीचा वाळकुंजा मनुष्य होता. त्याची मुद्रा पाहतां ते फार उतावीळ दिसले. गाडी थांबवून चिकाऱ्या पडद्याकडे आपले केसाळ मुख करून त्या ऋषीरूपी मनुष्याने 'ताई, ताई' अशा दोनचार हाका मारिल्या. लागलीच ताई खाली येण्याबरोबर त्या पऱ्याजी पागोट्याच्या बेश्रम मनुष्याने तिला उचलून पटकन गाडींत घेतले. मग जी त्या दाढीच्या बोकडाने गाडी पिटली म्हणतां ती वाटेत माणसें चालत होतीं त्यांस एक बाजूस सरण्यास देखील अवकाश मिळाला नाही. कित्येक वाटेंतील गरीब लोकांस चाबूकरूपी प्रसाद मिळाला. पण करतां काय ! मारणारा पडला श्वेतवर्ण बोकड आणि त्यांत फिरंगी पोषाख. जवळचे पऱ्याजी पागोट्याचे पाजीदेखील ह्या बोकडास उत्तेजन देत होते ! आहे की नाही. नाही तर तुम्ही, दिवसभर काम करावें आणि रात्रीं पडावे घोरत. गोऱ्या वर्णाचा ऋषी आपले उच्छिष्ट देखील खाणाऱ्या चेल्यास बरोबर घेऊन असली बहार करतांना मी प्रथमतःच पाहिला. हा ऋषी कोण, शेजारचा लोणीलाव्या पाजी कोण हे जर कोणी सांगेल तर की नाही, मोठी मेहरबानी होईल. हे पत्र छापून ही गम्मत लोकांस कळवा बरे. नाहीं तर अप्पलपोट्यासारखे तुम्ही आपल्यालाच ही गम्मत ठेवाल. संभाळा." [1]

यावरून पत्रांचे क्षेत्र किती विस्तृत होते याची कल्पना येते. गोल्या घुबड, गाढव, वेताळ, पिशाच, इत्यादी टोपणनावांनी काही विनोदी पत्रेही प्रकाशित झाली आहेत. पुढे निर्माण झालेल्या औपरोधिक निबंधाला यांचा हातभार लागला असणे शक्य आहे. या सर्व पत्रलेखकांचे वैशिष्ट्य हे दिसते की, त्या सर्वांनी टोपणनावे धारण केली आहेत; व ही टोपणनावेही कायम स्वरूपाची नसून पत्रविषयाप्रमाणे बदलणारी असावी, असे वाटते.

### 'मराठी ज्ञानप्रसारका'चे कार्य

वरीलपैकी अधिकांश पत्रे १८३२ ते १८४९ या काळातील आहेत. या काळात प्रकाशित झालेली संपादकीय स्फुटे, लेख व पत्रे या गद्यातून आकारास आलेला निबंध १८५० साली 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकात स्पष्ट रूपात आविष्कृत झाला. 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे'त वाचल्या जाणाऱ्या निबंधांपैकी काही निवडक निबंध 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकात प्रकाशित होत. "धर्मसंबंधी व सांप्रतच्या राज्यप्रकरणसंबंधी सर्वथा निबंध लिहिले जाणार नाहीत व त्या विषयांवर नुसता संवाद देखील होणार नाही," असे बंधन या सभेने स्वतःवर घालून घेतले असले, तरी सेप्टेंबर १८४८ ते एप्रिल १८४९ या कालावधीत प्रस्तुत सभेत वाचल्या गेलेल्या निबंधांवरून तिने व तिच्यातर्फे प्रकाशित होणाऱ्या मासिकाने किती महत्त्वाचे निबंधविषयक कार्य केले, याची कल्पना येते. उदाहरणार्थ — (१) सृष्टिसौंदर्याविषयीं (भास्कर दामोदर पाळंदे), (२) रसायनशास्त्राविषयीं (वासुदेव-

१. एक गम्मत पाहणारा छिचोर, ज्ञानप्रकाश.

बापू ), ( ३ ) मराठ्यांच्या उत्कर्षापकर्षाविषयीं ( लक्ष्मण नृसिंह जोशी ), ( ४ ) हिंदु-लोकांच्या त्रिकालस्थितीविषयीं ( सखाराम मनोहर दीक्षित ), ( ५ ) सृष्टीमध्ये परमेश्वराची शक्ति दृष्टिगोचर होते याविषयीं ( दाजी परशुराम ), ( ६ ) उद्योगाविषयीं ( विष्णु अमृतराव ), ( ७ ) व्यवहारशास्त्राचे उद्देश आणि लाभ ( विश्वनाथ नारायण ), ( ८ ) हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या स्थितीविषयीं ( नारायण विष्णु ), ( ९ ) एकीपासून लाभ ( बाळ भास्कर ), ( १० ) हिंदुस्थानांतील विद्या व कला यांविषयीं ( विनायक हरिश्चंद्र ), ( ११ ) सत्याविषयीं ( भिकाजी भास्कर ), ( १२ ) विद्येविषयीं ( बाबाजी कृष्णनाथ ).

**ल. नृ. जोशी**

यांपैकी ल. नृ. जोशी व स. म. दीक्षित यांचे निबंध विशेष महत्त्वाचे आहेत. ल. नृ. जोशी हे नॉर्मल क्लासमध्ये दादोबा पांडुरंग यांचे सहकारी होते. काही काळ ते सरकारी शाळेत ॲसिस्टंट मास्तर होते. पुढे सिंधप्रांती मुन्सफ होऊन तेथेच स्थायिक झाले. निबंधाच्या प्रारंभी निबंधकाराने इतिहासज्ञानाची आवश्यकता व त्यापासून होणारे लाभ यांचे वर्णन केले आहे. एखाद्या राज्याच्या उत्कर्षापकर्षाची सामान्य कारणे कोणती व तीच मराठी राज्याच्या उत्कर्षात कशी आढळतात, याचे दिग्दर्शन लेखकाने केले आहे. एका ठिकाणी लेखक म्हणतो, " तेव्हा असा समृद्ध देश त्या परदेशीय लोकांच्या हातीं लागल्यावर ते त्या देशापासून स्वदेशाचे कल्याण होईल तितके करतील. मग त्यांत त्या देशाचे कल्याण असो किंवा नसो. "[1]

स. म. दीक्षित यांचा लेख तर आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही दृष्टींनी अप्रतिम आहे. " राज्य गेले; प्रतिष्ठा गेली, व्यापार बुडाला; प्राचीन विद्येचा ऱ्हास झाला; नूतन विद्या शिकण्यास उत्तेजन नाहींसे झाले; अज्ञान वाढत चालले; आकाशांतून पडलो आणि धरणीनें सांवरलें अशी अवस्था झाली. जीं शहरे पूर्वी केवळ इंद्रभुवनासारिखीं शोभायमान व लंकेसारखीं कनकमय होतीं, तीं रसातळास पोंचून तेथें केवळ पिशाचपुरी वसल्याशा दिसूं लागल्या; ज्या शिवारांमध्यें शेतकऱ्यांचे थवेचे थवे मोठ्या उमेदीने खपत असत, तेथें आतां कंबरेइतकें तृण वाढून त्यांत गरीबदुबळे लोक मोठ्या कष्टानें कोरभर भाकरीकरितां मजुरी करितात, तथापि तीहि मिळत नाहीं. जा शहराच्या रस्त्यांमधून अमीरउमराव लोकांच्या स्वाऱ्या हमेशा जात असत त्यांमधून तेलग व इतर भिकाऱ्यांच्या झुंडी तांदळाच्या चार दाण्याकरिता दारोदार फिरताहेत व अंधळेपांगळे हे रस्त्यांत गडबडा लोळून करुणास्वर काढिताहेत; जा लोकांस मद्यपान हे केवळ विषतुल्य व मोठें पातक असे वाटत होते, आतां दारूच्या अमलाने लुंड होऊन रस्त्यांत पडतात यावरून व्यसनी लोकांच्या मनांतून ईश्वराचे भय अगदीं नाहींसे झालें असे दिसून आलें; उदरनिर्वाहार्थ किंवा यथेच्छ

१. ज्ञानप्रसारक, वर्ष पहिलें, अंक ५–८, १८४९.

सुख भोगण्याच्या हेतूनें स्त्रिया स्वतंत्र व निर्भीड होऊन रस्तोरस्तीं व्यभिचार मूर्तिमंत दृष्टीस पडूं लागला, जांमध्ये पूर्वीं मोठमोठे लष्करी कारखाने होते, अशा इमारती अथवा जीं उमराव लोकांचीं विश्रांतिस्थानें; ज्यांचे आतां तुरुंग होऊन ती खुनी व व्यसनी लोकांनीं भरून गेलीं; वीतभर कागदाची किंमत हजारों रुपयेपर्यंत चढली असतां तसल्या कागदांस पैसा भरून आपल्या इष्टमित्रांची घरें बुडविण्याचीं इच्छा वाढत चालली आणि इतके अनर्थ घडघडीत होत असून माझे स्वदेशी लोक अज्ञानरूप गाढ निद्रेंतून जागृत होऊन ज्ञानप्रभेमध्यें अद्यापि येत नाहींत. "[1]

या अतिशयोक्त वर्णनाचा हेतू राज्यकर्त्यांना दोष देण्याचा आहे, असा भास होतो; तो खरा नाही. कारण पुढे लगेच लेखक म्हणतो – "असे नाना प्रकारचे खेदकारक विचार एकामागून एक मनांत आल्यामुळें चित्त व्यग्र होते; परंतु महाप्रतापी विद्वान असे जे लोक पूर्वी कधीं आपल्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांतहि आले नसते, त्यांचा प्रत्यक्ष सहवास घडूं लागला; अद्वितीय राज्यनियमांचीं पुस्तके सिद्ध होऊं लागलीं; न्यायमनसुबीच्या उत्तम रीति, राज्याचे बंदोबस्ताच्या व फौजेचे कवायतीच्या शिस्ती नजरेस पडूं लागल्या; टांकसाळ, गोदी यांतील वाफयंत्रांसारखीं अपूर्व व महदुपयोगी यंत्रे, वाफेच्या गाड्या व जहाजें, घड्याळे व नाना तऱ्हेचीं वस्त्रें इत्यादिक अलौकिक चमत्कार, जे पूर्वी कधीं ऐकलेही नवते, ते आतां नेहमी नजरेखालून जाऊं लागले. मोठे उपयोगी व केवळ दुर्लक्ष अशा ग्रंथांचे संग्रह पाहून त्यांच्या ठायी चित्त रमूं लागलें; छापखान्याच्या योगें बरीच वर्तमानपत्रें ( तीं बहुधा परभाषेतलीं ) वाचावयास मिळूं लागली; प्रजेचीं दुःखें प्रसिद्ध होण्यास तेच यंत्रसाधन झालें आणि त्याच अमूल्य यंत्राच्या योगें सर्वनाशक रूढीचे व स्त्रियांच्या असाह्य दुःखाचे उद्गार निघू लागले. धर्मसंबंधी असत्य विचार प्रगट होऊं लागले. थोड्याबहुत शाळा झाल्या; त्यांच्या योगें देशाची स्थिति व विद्या म्हणून काय या गोष्टी समजूं लागल्या; स्वच्छ व निर्भय रस्ते झाले, मोठमोठ्या प्रचंड तारवांनी समुद्र आच्छादित झाला; इत्यादिक आनंदजनक चमत्कार पाहून मात्र मनास विस्मय होतो."

अव्वल इंग्रजीतील विचारी माणसाची स्थितीही कशी चमत्कारिक झाली होती, याचे ठसठशीत चित्र वरील दोन परिच्छेदांत उमटले आहे. लेखकाच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे "परस्परविरुद्ध विचार अंतःकरणांत येतात त्यामुळे मति कुंठित होऊन भगवंताची करणी अतर्क्य होय हा निश्चय होतो," अशी तत्कालीन लेखकांची स्थिती झाली होती. अर्थात हा प्रगतीचा एक टप्पाच म्हटला पाहिजे; कारण साधारणतः १८५०-पूर्वीच्या नियतकालिकांतील निबंधांत कुठला तरी एक पक्ष दिसतो; थोडे ऐकांतिक प्रतिपादन दिसते. आता निबंधकारांना समाजस्थितीचे साकल्याने ज्ञान झाल्यासारखे वाटते व त्यांच्या लेखनात समतोलपणा आल्यासारखे दिसते.

१. मराठी ज्ञानप्रसारक, पु. १, अंक ४.

उपर्युक्त ज्ञानप्रसारक सभेने राजकीय विचार वर्ज्य मानिले असले, तरी अनेक निबंधकारांनी प्रकट-अप्रकट रीतीने आपल्या राजकीय आकांक्षांना अभिव्यक्ती दिली. ' एकीपासून लाभ ' या निबंधात बाळ भास्कर यांनी " जर हिंदु एकचित्त असते तर अन्य देशींचे लोक एथें येऊन मुलूख कसे काबीज करते ? " असा सूचक प्रश्न विचारिला आहे. वामन आबाजी मोडक यांनी १८५७ साली लिहिलेल्या एका निबंधात स्वदेशाभिमानाची थोरवी वर्णन केली आहे. ' शिवाजी राजांचा वृत्तांत ' या निबंधात पाठक यांनी " जे युरोपियन इतिहासकर्ते वॉलेस, ब्रूस, टेल आदिकरून स्वदेश-उद्धारक युरोपखंडात झाले त्यांचीं नांवे घेतलीं असतां टाळ्या पिटतील, तेच हिंदुस्थानांत स्वदेशउद्धारक जो शिवाजी झाला, त्याचे नांव काढलें असतां चोर, लुटारू असे निर्लज्जपणें बोलतील. "[1] असे उद्गार काढले आहेत.

भारताच्या आर्थिक शोषणाचे सम्यग्ज्ञान अर्थविषयक निबंधांतून दिसत नसले, तरी आर्थिक दुरवस्थेची जाणीव व ती दूर करण्याचे उपाय यांचे दर्शन मराठी ज्ञानप्रसारकांतील निबंधांत घडते. ' हिंदु लोकांची संपत्ति व तिचे सांप्रत उपयोग ' ( नामदेव नारायण ), ' व्यर्थ खर्च करणे ' ( मोरोबा बाळाजी ) हे आर्थिक प्रश्नांवरील निबंध जुजबी होत. स. म. दीक्षित यांनी आपल्या ' हिदु लोकाच्या त्रिकाल-स्थिती· विषयीं ' या निबंधांत आर्थिक भूमिकेने स्वदेशीचा पुरस्कार केला आहे. " विद्या, उद्योग, आणि साहस यांच्या बळाने आमचे लोक अजूनही असा दृढ निश्चय करितील की, आपल्याच देशांत जे ओलें कोरडें मिळेल तेच खाऊं, जाडें भरडें मिळेल तेच लेवूं, ओबडधोबड जिनसा मिळतील त्याच वापरू व परदेशांतील मालाप्रमाणे येथें माल उत्पन्न करून तो त्यापेक्षा स्वस्त विकला जावा याकरितां आपण कलाकौशल्यामध्यें निपुण होऊन समाईक भांडवलाने येथेच यंत्रादि साधनें आणूं तर म्हणजे त्यांचा प्रत्यक्ष कोणी हात धरील इतका केवळ विपरीत काळ आला आहे असा नाहीं. "

लोकहितवादींनीही याच सुमारास शतपत्रांत प्रस्तुत विचार व्यक्त केला. जानेवारी १८६५-च्या अंकात महादेव गोविंद रानडे यांनी ' प्रजावृद्धि व तिजपासून होणारा परिणाम ' या विषयावर निबंध लिहिला. त्यात वाढत्या लोकसंख्येचा आर्थिक व सामाजिक दृष्टिकोणाने विचार केला आहे. आर्थिक स्थैर्य व प्रौढ वय या गोष्टी लाभल्याशिवाय पुरुषाने विवाह करू नयेत, असे प्रस्तुत निबंधात लेखकाने सुचविले आहे. " दुसरे जे उपाय आहेत ते कधी तरी निर्वेदीन " असे निबंधाच्या अखेरीस निबंधकाराने म्हटले आहे. त्यामागे ' कुटुंबनियोजनाचा उपाय ' लेखकाला अभिप्रेत असावा किंवा काय, हे निश्चयाने सांगता येत नाही ! ' तरुण शिकलेल्या लोकांचीं कर्तव्यें ', ' मराठी राजेरजवाडे ', ' मराठी व बंगाली लोकांच्या भावी उत्कर्षाचीं चिन्हे ' इत्यादी निबंध रानडे यांनी सभेत वाचले; पण त्यांना अंकांत

१. मराठी ज्ञानप्रसारक, एप्रिल १८६०.

स्थान मिळाले नाही.

'स्त्रीशिक्षणाविषयीं विचार', 'स्त्रियांस विद्याभ्यासाची आवश्यकता आहे याविषयीं निबंध', 'स्त्रीशिक्षण' असे स्त्रीविषयक अनेक निबंध प्रकाशित झाले. त्या सर्व निबंधांचा रोख साधारण एकच आहे —

"तृण खाऊन जल पिणारा अथवा बांधलेल्या डोळ्याने तेल्याचे घाणीस फिरणारा असा जो पशु त्यासारिखी काबाड करून पोट भरायाकरितां कित्येक कर्तव्यें आहेत तशींच स्त्रीस कर्तव्ये आहेत." [१]

विष्णु घनश्याम, केरो लक्ष्मण छत्रे व विनायक हरिश्चंद्रजी यांनी अनुक्रमे 'नेत्र', 'हवाप्रकरण', 'कागद करण्याची रीत' इत्यादी शास्त्रीय विषयांवर निबंध लिहिले. नारायणभाई यांनी एतद्देशीय लोकांस केवळ स्वभाषेच्याच द्वारे विद्या शिकविली असता लाभ कोणकोणते व तीच जर इंग्लिश व स्वभाषा या दोहोंच्या द्वारे शिकविली, तर कोणकोणते, याविषयीं निबंध लिहिला आहे. या दीर्घ निबंधाला अर्स्किन पेरी पारितोषिक मिळाले होते. प्रस्तुत निबंधात लेखकाने 'स्वभाषा आणि इंग्रजी या दोहोंपासून सारखे लाभ आहेत,' असा निष्कर्ष काढिला आहे. निबंधाच्या उत्तरार्धात लेखकाने जाता-जाता एक विचार मांडिला तो लक्षणीय आहे — "परंतु काय नाहीं तरी इंग्रेज लोकांचा एथें निरंतर अंमल राहील? त्रीवेलॅयन साहेब म्हणतात कीं इंग्लंड व हिंदुस्थान या दोन दूरदूर देशाच्या संबंधाची स्थिति पाहिली असतां दिसून येते कीं कितीही जरी झालें, कसेही कायदे वगैरे केले तरी लोक कधीं तरी स्वतंत्र होतील." [२]

सभेचा मूलभूत नियम मोडूनही सभासदांचे विचार कसे आडमार्गाने व्यक्त होत, त्याचे हे उत्तम उदाहरण आहे!

याशिवाय लोकोत्तेजनार्थ सदुपदेश, मानभावी पंथ, वऱ्हाड प्रांताचे वर्णन इत्यादी विविध विषयांवरील निबंध प्रकाशित झाले. 'आरम्भशूराः खलु दाक्षिणात्याः' या निबंधाचे स्वरूप तर अगदी लघुनिबंधासारखे आहे! मराठी ज्ञानप्रसारकाने निबंधकारांची एक नवीन पिढीच निर्माण केली. अव्वल इंग्रजीतील निबंधवाङ्मयाच्या विकासात मराठी ज्ञानप्रसारकाचा वाटा एवढा मोठा आहे की, मराठी ज्ञानप्रसारकाचे स्वतंत्र 'निबंध-पर्व' कल्पावयास हरकत नाही. 'मोडी लिपीची सुधारणा' अशा विषयापासून 'देशाची सुधारणा' अशा विषयापर्यंत सर्व विषयांवर एका विशिष्ट दर्जाचे निबंध मराठी ज्ञानप्रसारकाने प्रकाशित केले. केरो लक्ष्मण छत्रे व महादेव गोविंद रानडे या पुढे आपापल्या क्षेत्रांत विशेष मान मिळविणाऱ्या व्यक्तींचे निबंध प्रकाशित करण्याचा मान याच मासिकाने मिळविला. गोविंद नारायण माडगांवकर यांच्यासारख्या बहुप्रसू निबंधकाराचे सुरुवातीचे निबंधही याच मासिकात प्रसिद्धीस

१. स्त्रीशिक्षणाविषयी विचार, मराठी ज्ञानप्रसारक, जुलै १८५०.

२. नारायणभाई यांचा 'एतद्देशीय...याविषयीं निबंध', मराठी ज्ञानप्रसारक, १८५२–५३.

आले. स. म. दीक्षित यांच्यासारख्या एखाद्या लेखकाची भाषाशैली चित्तवेधक असली व महादेव गोविंद रानडे यांच्यासारख्या एखाद्या निबंधकाराचे विचार विशेष प्रौढ असले, तरी प्रस्तुत मासिकातील एकूण निबंधाची भाषा साधी, सोपी व विचार मर्यादित आवाक्याचे आहेत. मात्र दर्पण-प्रभाकर-पर्वातील निबंधलेखकांमधील भाबडे सांस्कृतिक अनुकरण वा अधिक्षेप आणि बेंगरूळ भाषा ही वैगुण्ये या लेखकात दिसत नाहीत. भाषा, भावना व विचार यांतील सुबोध समतोलपणा हे प्रस्तुत मासिकातील निबंधांचे एक खास वैशिष्ट्य सांगता येईल.

## चंद्रिकेतील निबंध

'चंद्रिका' (१८५४) या मासिकात 'शिक्षणपद्धतीविषयी विचार', 'राजसत्ताक व लोकमतानुसारी राज्यांतील सौकर्याविषयी विचार', 'निरिच्छतेविषयीं निबंध' इत्यादी निबंध प्रकाशित झाले आहेत. 'नेटिव्ह लोकांस अब्रूच्या व जबाबदारीच्या जागा द्याव्या किंवा नाहीं', 'देशाची उत्तम स्थिति' व 'गोऱ्या लोकांचा काळेपणा' हे निबंध विशेष महत्त्वाचे आहेत. 'गोऱ्या लोकांचा काळेपणा' हा निबंध लिहिणाऱ्या लेखकाची भाषा किती तिखट होती, याची कल्पना खालील उताऱ्यावरून येईल —

"कित्येक साहेब लोक एकदां शपथ घेऊन अधिकारावर आले, म्हणजे तघलख बादशहाप्रमाणे पूर्वी ओतलेल्या पिशव्या कोणत्या रीतीनें लवकर भरतील इकडे आपले सर्व लक्ष लावितात. मग आपणास सरकारने कोणत्या अधिकारावर नेमले व हा अधिकार आपल्या हातून चांगल्या रीतीने कसा चालविला जाईल, या गोष्टीचा विचार बिलकूल विसरतात...साहेब लोकांचा कांहीं वेळ 'टिफीन' घेण्यात जातो, कांहीं वेळ विश्रांति घेण्यांत जातो, बिचाऱ्या नेटिवांनीं मात्र कसेही करून तरफडत दहा वाजतां कचेरींत यावे. परंतु साहेबाचे १० साहेब आल्याखेरीज वाजत नाहींत. कोणत्या रीतीचा न्याय !...दहा हजार माणसांच्या हिताकरितां कोट्यावधी लोकांचा नाश करणे, हें स्वतः सुधारलेले व सर्व पृथ्वीवरील लोकांस शहाणपण शिकविणारे लोक, अयुक्त आहे असे म्हणत नसल्यास न म्हणोत. परंतु राज्यकारभाराविषयी ज्यांस कांहींच माहीत नाहीं अशा एखाद्या धनगरापुढे ही गोष्ट नेली असतां ही अगदी अन्यायाची आहे असे तो तत्काल सांगेल." [१]

'पुणे-पाठशाळा-पत्रक' (१८६१) या मासिकात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी दादोबांच्या व्याकरणग्रंथाचा साधकबाधक विचार करण्याच्या निमित्ताने 'मराठी व्याकरणावर निबंध' या शीर्षकाचे पंचवीस निबंध लिहिले. हा वेळपावेतो मासिकांत स्फुट निबंधच प्रामुख्याने प्रकाशित होत. दीर्घ निबंध मासिकांत खंडशः प्रकाशित करण्याची पद्धत कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी सुरू केली. प्रस्तुत निबंधांत

१. चंद्रिका, मे १८५४.

चिपळूणकरांनी नवी परिभाषा व नव्या व्याख्या यांचा अवलंब केला असून व्याकरण-विषयक काही मौलिक विचार मांडले आहेत. याशिवाय पत्रकात 'इंग्रजांचे सर्वांशीं अनुकरण करणें अयोग्य होय', 'व्यसनाविषयीं', 'वाचनाविषयीं', 'कवितेविषयीं', 'मराठी भाषेविषयी निबंध' प्रसिद्ध झाले आहेत.

## 'विस्तारा'तील निबंधलेखन

१८६७ साली 'विविधज्ञानविस्तार' मासिक जन्माला आले व त्याने मराठी निबंधात विलक्षण परिवर्तन घडवून आणिले. १८६७–६८-मध्ये 'कानडी भाषा', 'इंग्रजी शब्दांचे उच्चार', 'रजस्वलांविषयी विचार' इत्यादी मार्मिक व प्रौढ निबंध आले आहेत यांपैकी शेवटच्या निबंधातील विचार त्या काळाच्या मानाने विशेष पुरोगामी वाटतात. १८७०-च्या जुलै महिन्याच्या अंकांत 'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' या विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या ग्रंथावर संक्षिप्त पण परखड परीक्षण आले आहे. १८७२-मध्ये 'युरोपियन लोकांची एतद्देशीय भाषाज्ञानाविषयी पोकळ घमेंडी' अशा शीर्षकाचा सविस्तर निबंध आला आहे. डिसेंबर १८७३-च्या अंकात 'आपल्या भाषेची स्थिति' या विषयावरील समतोल, सुसंगत व पोक्त निबंध आला आहे. त्यात लेखक म्हणतो, "पहा सांप्रत आपल्या राज्यकर्त्यांची जी इंग्रजी भाषा, तिच्या अभ्यासापासून चार पैसे मिळून सांसारिक कृत्यास मदत होऊं लागल्यामुळे, जो तो स्वभाषेचा अनादर करून इंग्रजी शिकूं लागला; यामुळे सरासरी इंग्रजी जाणणाऱ्यांची संख्या मात्र पुष्कळ झाली, पण त्या विद्येपासून देशाचे वास्तविक काहीच हित न होतां, बहुतेक लोक निरुद्योगी मात्र झाले व धंदा नाहीसा झाला...सध्या बहुधा सर्वत्र अशी स्थिति आहे की, मोठमोठ्या विद्वान म्हणविणाऱ्यानाही पाव घटकाभर शुद्ध मराठी भाषेने अस्खलित किंबहुना तुटक तुटकही संभाषण चालविण्याची मोठीच मारामार ...परके लोक आमच्या भाषेची वृद्धि व सुधारणा इच्छित असतां आमच्या लोकांनाच असे दुराग्रहाने ग्रासावे, ही मोठीच दुःखकारक गोष्ट होय."

याव्यतिरिक्त 'स्मृतिशास्त्र', 'संस्कृत कवि', 'मोरोपंत' इत्यादी विषयांवर विस्ताराने उद्बोधक निबंध प्रसिद्ध केले.

दंभहारक (१८७१) व ज्ञानसंग्रह (१८७२) या मासिकांनीही निबंध-विषयक कार्य, थोड्याफार प्रमाणात केले. दंभहारकात 'घरोघर मातीच्या चुली', 'स्त्रियांचीं स्वाभाविक भूषणे', 'एतद्देशीय भाषांचे इंग्लिश लोकांचें ज्ञान' इत्यादी विषयांवर निबंध लिहिले. त्यांतील विचार सुधारणावादी आहेत. ह. मो. शेवडे, कृ. भ. पैठणकर यांचेही निबंध त्यांत दिसतात.

१८३३ ते १८७२ या काळातील महत्त्वाच्या नियतकालिकांतील निबंध-वाङ्मयाचे अवलोकन केले, म्हणजे या काळाचे दोन ठळक भाग जाणवतात. १८३२ ते १८४९ व १८५० ते १८७४ हे ते दोन भाग होत. पहिल्या कालखंडातील निबंध-विषयक कार्य दर्पण व प्रभाकर या पत्रांनी म्हणजे बाळशास्त्री जांभेकर, जनार्दन वासुदेवजी व भाऊ महाजन यांनी केले. यांना 'एक कोंकणस्थ', 'लोकहितवादी' या

पत्रलेखकांनी फार मोलाचे सहकार्य दिले. हा मराठी निबंधाच्या गर्भावस्थेचा काळ आहे, असे म्हणता येईल. ' निबंध ' हा शब्दही या काळात फारसा प्रचारात आला नव्हता;[1] त्याऐवजी ' लेख ' हा शब्द रूढ होता. आपल्या गद्यलेखनाला एक निश्चित प्रारंभ, विस्तार व अंत असावा, याची जाणीव लेखकांना नव्हती. मग त्याबाबत आकर्षकता जाणून तंत्रकौशल्य प्रकट करणे हे दूरच ! भावनांचा व विचारांचा सहज आविष्कार हे या गद्याचे रूप आहे. त्यामुळे शब्दयोजना व वाक्यरचना यांच्याकडे अक्षम्य दुर्लक्ष झालेले दिसते. शुद्धलेखनाचेही निश्चित नियम आढळत नाहीत. वैचारिक दृष्टीने पाहिल्यास या गद्याचे स्वरूप स्वतंत्र चिंतनाचे नसून माहितीपर व अनुकरणात्मक आहे. लोकहितवादींची ' शतपत्रें ' हा याला मोठा अपवाद असला, तरी त्यांतही वरील विशेष अधूनमधून आढळतातच. भावनेची अभिव्यक्ती कधी फारच भीतभीत, बिचकत, तर कधी उमाळ्याने, अनावर होत असे. प्रभावी पण संयत भावना अपवादानेच दिसावी, याला पूर्वकालीन वाङ्मयीन परिस्थिती व तत्कालीन सामाजिक सांस्कृतिक परिस्थिती बऱ्याच अंशाने कारणीभूत ठरली.

१८५०-पासून नियतकालिकात मराठी निबंध स्वतंत्र रूपाने वावरू लागला. मराठी ज्ञानप्रसारकाचे याबाबतचे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. ' निबंध ' हा शब्द याच मासिकाने रूढ केला. भाषा, भावना व विचार या सर्व दृष्टींनी शुद्ध व सकस मराठी निबंध अवतरले, ते याच मासिकात. ल. नृ. जोशी, स. म. दीक्षित व गो. ना. माडगावकर हे या मासिकाने पुढे आणिलेले तीन ठळक निबंधकार होत. मराठी ज्ञानप्रसारकाने सुरू केलेले कार्य पुणे-पाठशाळा-पत्रक व विविधज्ञानविस्तार या मासिकांनी पूर्ण केले. बेंगरूळ व भांबावलेले गद्य मागे पडून डौलदार व प्रत्ययपूर्ण निबंध आता लिहिले जाऊ लागले. त्याला शुद्धलेखन, व्याकरण, औचित्य व पांडित्य यांची सुखकर बंधने पडली. विषयाचे व विस्ताराचे बंधन गळून पडून त्यात विविधता व विस्तृतता हे गुण आले. तो सैल न होता विस्तारला, व विकारवश न होता भावपूर्ण झाला. आपल्या स्वरूपाची काळजी घेऊन त्याने प्रारंभ-मध्य-अंत इत्यादी आपले अवयव समर्थ व सुंदर केले.

१८७२ सालीच पुणे-पाठशाळा-पत्रकात विष्णुशास्त्री चिपळूणकर यानी काव्यविषयक तीन निबंध लिहून मराठी निबंधांतील भावी परिवर्तनाची अस्फुट सूचना दिली होती. पुढे २५ जानेवारी १८७४ रोजी ' निबंधमाला ' हे मासिक सुरू करून आपली ही सूचना मालाकारांनी अपेक्षेबाहेर सफल केली. दर्पण-प्रभाकरादी वृत्तपत्रांतील औपरोधिक पत्रे, मराठी ज्ञानप्रसारकातील काही स्वदेशप्रीतीचे निबंध व

१. अपवाद : ( १ ) शिल्पविद्या या विषयाचे निबंध ( १८३५ ) विलियम हेन्री बेल, नारायणशास्त्री जोशी. ( २ ) शब्दसिद्धि-निबंध ( १८४३ ) विनायकशास्त्री दिवेकर, गोविंद विठ्ठल महाजन.

विविधज्ञानविस्तारातील अस्मिता आणि पांडित्य हा अव्वल इंग्रजीतील निबंध-वाङ्मयाचा कस पुढील कालखंडातील निबंधाने स्वीकारिल्याचे व वाढविल्याचे स्पष्टपणे दिसून येते.

अव्वल इंग्रजीतील नियतकालिकांनी पुढे आणिलेला सर्वांत मोठा आणि मानाचे स्थान लाभलेला निबंधकार म्हणजे लोकहितवादी. पत्रलेखनासारख्या प्रासंगिक व स्फुट गद्याचा आश्रय घेऊन त्यांनी मराठी निबंधात मोलाची भर घातली. त्यांच्यापूर्वी अनेक लेखकांनी वृत्तपत्रांत पत्रे लिहिली; त्यांतून आकर्षक भाषेत मौलिक विचारही व्यक्त केले. पण सामाजिक, धार्मिक, राजकीय इत्यादी विविध विषयांवर पुरोगामी विचारांची विपुल भावपूर्ण पत्रे लोकहितवादींशिवाय कोणीही लिहिली नाहीत. ही ' शतपत्रे ' इतकी महत्त्वाची आहेत की, त्यांचा स्वतंत्र व सविस्तर परामर्श येथे घेणे आवश्यक ठरते.

## दोन

## लोकहितवादी [१]

बाबा पदमनजी यांचा अपवाद सोडल्यास अव्वल इंग्रजीत लोकहितवादी

---

१. मूळ नाव गोपाळ हरि देशमुख, जन्म १८ फेब्रुवारी १८२३, पुणे येथे; वडील हरिपंत पेशवाईत बापू गोखले यांचे फडणीस; दहा हजार रुपये उत्पन्न असलेली तीन गावांची जहागीर पेशवाई नष्ट झाल्यावर काही काल जप्त; १८२४-मध्ये हरिपंताना त्यांचा सरंजाम परत मिळाला; परंतु १८२६-मध्ये त्यांच्या निधना-नंतर पुनः जप्त झाला. पुढे हरिपंतांच्या पत्नीस सहाशे रुपये व त्यांच्या तीन मुलांस सरकारी नोकरी लागेपर्यंत दोनशे रुपये वर्षासन मिळाले. गोपाळरावांस अक्षर-ओळख आणि प्राथमिक शिक्षण घरीच मिळाले. १८४१-मध्ये पुण्याच्या सरकारी इंग्रजी शाळेत प्रवेश आणि १८४४-मध्ये तेथील अभ्यासक्रम पुरा. १८४४-मध्ये मासिक ७७ रुपये पगारावर नेमणूक; दोन वर्षांनी मुन्सफीची परीक्षा आणि १८५२-मध्ये वाई येथे मुन्सफ म्हणून नेमणूक; १८५५-मध्ये प्रसिद्ध इनाम कमिशनवर ॲसिस्टंट कमिशनर म्हणून नेमणूक; १८६२-मध्ये अहमदाबाद येथे ॲसिस्टंट जज्ज म्हणून नियुक्ती; १८७६-मध्ये सनदी नोकर म्हणून अधिकारप्राप्ती व नाशिक येथे नेमणूक; १८७७ रावबहादूर पदवी; १८७७ जस्टिस ऑफ द पीस; १८७८-मध्ये मुंबई विद्यापीठाचे फेलो व सेवानिवृत्ती. १८८० लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद; १८८४ रतलाम संस्थानची दिवाणगिरी. सेवानिवृत्तीमध्ये सरकारकडून ५००० रुपयांचे वर्षासन, अधिक पूर्वीच्या २०० रु. वर्षासनाची जोड; १८९२ ऑक्टोबरच्या ९ तारखेस निधन.

यांच्याइतके विपुल वैचारिक वाङ्मय अन्य कोणीही लिहिले नाही.[1] त्यांचे सर्व वाङ्मय समाजजीवनविषयक आहे, ललित नाही. त्यात फार विविधता आहे. वाङ्मयप्रकारांच्या दृष्टीने पाहिल्यास निबंध, चरित्रे आणि इतिहास हे प्रमुख प्रकार त्यात आले आहेत. विषयदृष्ट्या वर्गीकरण करावयाचे झाल्यास ऐतिहासिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक, आर्थिक असे त्याचे विभाग पडतात. या वाङ्मयातील बरेच ग्रंथ अनुवादित वा आधारित असले, तरी अशा ग्रंथांना त्यांनी ज्या प्रस्तावना, तळटीपा आणि परिशिष्टे जोडिली आहेत, त्यांत त्यांची विवेचक बुद्धी स्पष्ट झाली आहे. हे सर्व लेखन त्यांनी केवळ लोकहितार्थ केले. आपल्या 'शतपत्रां'च्या अखेरीस ते वाङ्मयनिर्मितीमागील आपली भूमिका पुढील शब्दांनी प्रकट करितात — " लोकहितवादीने कोणाची मजुरी

१. लोकहितवादींचे वाङ्मय — ( १ ) होळीविषयीं उपदेश, १८४७, ( २ ) महाराष्ट्र देशांतील कामगार लोकांशी संभाषण, १८४८, ( ३ ) शतपत्रे १८४८ ते १८५०, ( ४ ) लक्ष्मीज्ञान, १८४९ ( A Treatise on Political Economy या क्लिफ्ट्च्या ग्रंथाचे रूपांतर ), ( ५ ) सरकारचे चाकर व सुखवस्तु हिंदुस्थानांतील साहेब लोकांशीं संभाषण, १८५०, ( ६ ) यंत्रज्ञान, १८५० ( An Introduction to Physical Sciences या ग्रंथाचे भाषांतर, ( ७ ) पंदनामा, १८५० ( फारसी नीतिग्रंथाचे भाषान्तर ), ( ८ ) पुष्पवन, १८५१ ( सादीच्या गुलिस्तांतील आठव्या अध्यायाचे भाषांतर ), ( ९ ) शब्दालंकार १८५१ ( इंग्रजीवरून भाषांतर ), ( १० ) भरतखंड—पर्व, १८५१, ( ११ ) खोटी साक्ष आणि खोटी शपथ यांचा निषेध, १८५१, ( १२ ) निबंधसंग्रह १८६६, ( १३ ) हिंदुस्थानला दरिद्र येण्याचीं कारणे इ. १८७६ ( दादाभाई नौरोजी यांच्या Poverty in India या निबंधाच्या आधारे ), ( १४ ) पानिपतची लढाई, १८७७ ( काशीराजाच्या फारसी ग्रंथाच्या इंग्रजी तर्जुम्याचे मराठी भाषांतर ), ( १५ ) कलियुग, १८७७ ( १६ ) भिक्षुक १८७७, ( १७ ) जातिभेद, १८७७, ( १८ ) ऐतिहासिक गोष्टी आणि उपयुक्त माहिती, भाग १ –१८७७, भाग २–१८८०, भाग ३—१८८०, ( १९ ) प्राचीन आर्यविद्या व रीति, १८७७, ( २० ) गीतातत्त्व, १८७८, ( २१ ) बोधपत्र, १८७८, ( २२ ) हिंदुस्थानचा इतिहास, पूर्वार्ध, १८७८ ( इंग्रजीतून भाषांतर ), ( २३ ) सुभाषिते व सुबोधवचनें, १८७८, ( २४ ) आश्वलायन गृह्यसूत्र, ( १८८० ) ( भाषांतर ), ( २५ ) स्वाध्याय, १८८०, ( २६ ) सुराष्ट्र देशाचा ससाक्ष इतिहास, १८८१ ( गुजरातीवरून मराठीत ), ( २७ ) पृथ्वीराज चव्हाण याचा इतिहास, १८८३ ( चंदावरदायी याच्या – पृथ्वीराज रासोच्या आधारे ), ( २८ ) स्थानिक स्वराज्यसंस्था, १८८३, ( २९ ) ग्रामरचना, १८८३, ( ३० ) स्वामी श्रीमद्दयानंद, १८८३, ( ३१ ) आगमप्रकाश, १८८४, ( ३२ ) गुजरात देशाचा इतिहास, १८८८, ( ३३ ) लंकेचा इतिहास, १८८८, ( ३४ ) उदेपूरचा इतिहास, १८९२, ( ३५ ) राज्यस्थानचा इतिहास, १८९२. यांशिवाय स्वदेशीय राज्ये व संस्थानें, विद्यालहरी, एका दिवसांत लिहिलेलें पुस्तक, हिंदुस्थानांतील बालविवाह, इंग्लिश कारकीर्दीचा इतिहास इत्यादी किरकोळ, अनुवादात्मक अथवा अमुद्रित असे वाङ्मय आहे. क्र. २६, २८, ३० आणि ३३ हे ग्रंथ लोकहितवादी या मासिकात प्रसिद्ध झाले.

पतकरिली नाही, कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा नाही. कोणाचे सांगण्यावरून किंवा शिकविल्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर ठेवून कीर्ति व्हावी या हेतूने लिहिलें नाही. इतके श्रम जे केले, ते लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांणीं सुधारावे, त्यांस इहलोकीं समृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावे व बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत, त्यांपैकी कांहीं अविचारानें व कांहीं मूर्खपणाने जडलेले आहेत, ते कमी व्हावे, किंवा नाहींसे व्हावे, इतक्याच हेतूने मी यथामतीनें व स्वच्छेनें वेतनावाचून हे श्रम केले आहेत. ”

## शतपत्रें

ही पत्रे प्रथम मुंबईच्या ‘ प्रभाकर ’ पत्रात प्रसिद्ध झाली आणि नंतर १८६६-मध्ये ‘ निबंधसंग्रह ’ या पुस्तकात त्यांचा समावेश करून स्वतंत्ररीत्या छापण्यात आली. नाव ‘ शतपत्रें ’ असले, तरी त्यांत एकूण १०८ पत्रे आहेत. निबंधसंग्रहात ती समाविष्ट करून छापिली, याचा अर्थ त्यांचे स्वरूप निबंधाचेच आहे, असे पत्रकर्त्यांस वाटत होते, असाही घेता येईल. विषयदृष्ट्या त्यांचे स्थूल मानाने ( १ ) राजकीय, ( २ ) धार्मिक, ( ३ ) सांस्कृतिक व ( ४ ) सामाजिक असे विभाग होतील. या पत्रलेखनात पूर्वनियोजन नाही; म्हणजे एका विषयावरील पत्रे सलग एकामागोमाग लिहिलेली नाहीत. त्या-त्या वेळी सुचेल तो विषय घेऊन लेखन केले आहे. एकाच विषयावर पुनःपुनः लिहिलेली एकापेक्षा अधिक पत्रे यांत आहेत. प्रत्येक पत्राचा प्रारंभ ‘ विनंती विशेष ’ या शब्दांनी व शेवट ‘ कळावे हे विनंती, आपला लोक-हितवादी ’ अशा शब्दांनी होतो. प्रत्येक पत्र स्वतंत्र आहे.

## राजकीय विषयांवरील पत्रे

शतपत्रांची सुमारे १५ पत्रे राजकीय विषयांवरील आहेत आणि त्यांत एक राजनैतिक विचारसरणी व्यक्त झाली आहे. ती त्यांच्या हिंदुस्थानच्या पराधीनतेची कारणे, इंग्लिश राज्याची आवश्यकता, हिंदुस्थानातील इंग्रजी राज्याचा विचार, इंग्लिश राज्यापासून फळ, इंग्रजी राज्यापासून लाभ, इंग्रज सरकार, राज्यसुधारणा, हिंदू लोकांनी काय करावे, इत्यादी पत्रांमध्ये प्राधान्याने मांडिली गेली आहे. त्यावरून लोकहितवादी यांच्या विचारसरणीचे सार असे निघेल : ( १ ) प्राचीन काळी भारत स्वतंत्र व संपन्न होता, ( २ ) भारताच्या अधोगतीला आठ घटक मुख्यतः कारण झाले : ( अ ) पंडित आणि बहुजनसमाज यांचे भाषाभिन्नत्व, ( आ ) शब्द-प्रामाण्य, ( इ ) जन्माधिष्ठित श्रेष्ठकनिष्ठत्व, ( ई ) नवविचारांचा अभाव, ( उ ) अंधश्रद्धा, ( ऊ ) दैववाद, ( ए ) गतानुगतिकत्व, ( ऐ ) भौतिक जीवन व धर्म यांत केलेली गल्लत, ( ३ ) इंग्रजांनी यथान्याय राज्य घेतले, ( ४ ) इंग्रजी राज्य हा ईश्वरी संकेत आहे, ( ५ ) इंग्रजी राजवटीमुळे घातुक सामाजिक रूढींचा नाश झाला व भौतिक जीवनदृष्टी लाभली, तसेच बेकारी, कनिष्ठ दर्ज्याचा नोकरपेशा व व्यापारात मंदी ही हानीही झाली, ( ६ ) व्यापाराने संपन्नता आणि विद्येने सुसंस्कृतता आली,

म्हणजे त्यांच्या मागोमाग स्वनियंत्रणाचे अधिकार आणि स्वातंत्र्य येईल.

## या विचारसरणीचा परामर्श

आपली ही विचारसरणी लोकहितवादींनी एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धाच्या अखेरीअखेरीस ( १८४८ ते १८५० ) मांडिली. उत्तर-पेशवाईतील अनागोंदी कारभार संपून सुनियंत्रित इंग्रजी राजवटीचा समाज अनुभव घेत होता. त्याला या वेळी स्वराज्याचा महती सांगणे म्हणजे पूर्वीच्या बेछूट राज्यकारभाराचे स्मरण देण्यासारखे होते. स्वराज्याचा आणि स्वातंत्र्याचा खरा अर्थ समजण्याची पात्रता तत्कालीन बहुजन समाजात नव्हती. ती येण्यासाठी त्याला प्रथम सुसंस्कृततेचे धडे देणे आवश्यक होते. राज्य म्हणजे काय, त्याचे प्रकार किती, त्यापासून फायदे-तोटे कोणते, आपण परतंत्र का झालो, व त्यातून मागे न जाता पुढे कसे जाता येईल, हे तत्कालीन समाजास समजणे जरूर होते. या सर्वांचे निव्वळ तात्त्विक नव्हे, तर तपशीलवार विवेचन लोकहितवादींनी आपल्या राजकीय पत्रांत केले. म्हणून ते पारतंत्र्याची कारणमीमांसा करणारे विचारवंत होते, असे म्हणता येईल.

प्राचीन व ऐतिहासिक भारताचे विश्लेषण करिताना लोकहितवादींनी युरोपातील मध्ययुगीन तमोयुगाचे उदाहरण डोळ्यांपुढे ठेविले असावे. युरोपात बेकन, देकार्त व ल्यूथर यांनी आप्तवचन, अंधश्रद्धा आणि दैववाद याना विरोध करून तमोयुगाचा अंत घडवून आणला. लोकहितवादींचे हिंदुनाशाष्टक याच तीन दोषावर आधारलेले दिसेल. युरोपीय कारणमीमांसा भारतीय परिस्थितीला तंतोतंत लागू पडणे शक्य नव्हते. प्राचीन भारताला स्वतंत्र परंपरा आहे व त्या परंपरेच्या संदर्भातच येथील सांस्कृतिक इतिहासाचा अन्वय लावणे योग्य ठरते. भारतीय धर्मश्रद्धा युरोपीय धर्मश्रद्धेपेक्षा वेगळी आहे. तसेच, महाराष्ट्रापुरते बोलावयाचे झाले तर तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत संतांची एक अखंड परंपरा निर्माण झाली होती. या संतानी धर्माच्या माध्यमाने देशाच्या समाजकारणावर कळत-नकळत परिणाम केला होता. या वैशिष्ट्यांची आणि घटनांची जाण लोकहितवादींच्या राजकीय लिखाणात दिसून येत नाही. लोकहितवादी एके ठिकाणी म्हणतात, "ज्या काळीं इंग्रज गडबड करूं लागतील किंवा कांहीं नवीन कानू बसवावयास आग्रह करतील, त्या काळीं अमेरिकेत झाले तसें होऊन हे लोक आपल्यास स्वतंत्र करून घेतील आणि इंग्रजांस सांगतील कीं तुम्ही आपल्या देशीं जावें."[1] पण अमेरिकेत जे घडले, त्यासाठी अमेरिकन विचारवंतांनी आणि बहुजनसमाजाने कोणते मोल दिले, याची आठवण मात्र ते समाजाला देत नाहीत. याचे कारण त्यांची इंग्रजी राज्यामुळे होणाऱ्या परिवर्तनाच्या इष्टतेबद्दलची निष्ठा होय. ही निष्ठा निव्वळ अंधळी होती वा गुलामी वृत्तीतून जन्मली होती, असे नाही. उद्योगप्रधान, भौतिकवादी, लोकशाहीनिष्ठ अशा युरोपीय संस्कृतीवरील डोळस प्रेम, युरोपातील तत्कालीन उदारमतवादी धोरण, अव्वल इंग्रजीतील

१. इंग्लिश राज्यापासून फळ, शतपत्रें ५४.

समंजस इंग्रज अधिकारिवर्ग, भारताच्या प्राचीन व ऐतिहासिक काळाची अपुरी जाणीव यांमुळे दृढ झालेल्या या निष्ठेचा त्यांच्या राजकीय लेखनावरील परिणाम स्पष्ट आहे.

स्वदेशी व असहकार या तत्त्वांचे दर्शन लोकहितवादींच्या लेखनात घडते, पण पुढे या तत्त्वांना जो एक व्यापक राजकीय अर्थ प्राप्त झाला, तो लोकहितवादींना अभिप्रेत असणे, हे तो काळ पाहता असंभवनीय होते. अव्वल इंग्रजीतील ब्राह्मणसमाज भिक्षुकी व कारकुनी या दोन अनुत्पादक व दरिद्री व्यवसायांवरच आपले पोट भरीत होता. त्याला व पर्यायाने सबंध समाजाला आर्थिक समृद्धीची दिशा दाखवावी, या हेतूने लोकहितवादींनी स्वदेशात उद्योग सुरू करा व परदेशी माल वापरू नका, असा उपदेश केला, एवढाच त्याचा अर्थ आहे. त्यांच्या राजकीय विचारप्रणालीत काही अंतर्विरोधही आढळतो. इंग्रजांनी भारतात कायमची वस्ती करावी असे ते सांगतात, पण तसे झाल्यास आपण गुलाम होऊ, अशी भीतीही ते व्यक्त करितात. भारतात संसदीय राज्यपद्धती हवी असा विचार ते मांडितात, पण येथील लोक मूर्ख असल्यामुळे त्यांच्यासाठी राजेशाहीच बरी, असेही ते म्हणतात. परदेशी मालामुळे आपला व्यापार बसला अशी कबुली ते देतात, आणि वर इंग्रजांनी येथे व्यापार केला, तर काय हरकत आहे, असा प्रश्नही करितात.

### लोकहितवादींच्या राजकीय लेखनाचे महत्त्व आणि मर्यादा

असे असूनही लोकहितवादींच्या राजकीय लेखनाचे महत्त्व फार आहे. त्याचे स्वरूप व मर्यादा थोडक्यात अशा — लोकहितवादींनी ( १ ) युरोपीय उदारमतवादी तत्त्वज्ञान त्या काळच्या राजकीय व सामाजिक अवस्थेला लावून दाखविले; ( २ ) जातिनिरपेक्ष आणि वर्गनिरपेक्ष संसदीय लोकशाहीचा पुरस्कार केला; ( ३ ) पारतंत्र्याची ऐतिहासिक दृष्टीने चिकित्सा केली; ( ४ ) राज्याची उत्पत्ती, उद्देश व प्रकार या विषयांवरील नवीन विचार साध्या-सोप्या मराठीत मांडिले; ( ५ ) राजकीय विचारांची सांगड आर्थिक तत्त्वांशी घातली. ( ६ ) पण पारतंत्र्याची चीड व स्वातंत्र्यप्राप्तीसाठी अटळ असलेला संघर्ष यांचे अगत्य लोकहितवादींनी स्पष्ट व्यक्त केले नाही.

### लोकहितवादींची आर्थिक विचारसरणी

लोकहितवादींची आर्थिक विचारसरणी प्राधान्याने त्यांच्या पुढील पत्रांमध्ये प्रकट झाली आहे— ( १ ) हिंदु लोकांनीं उद्योग करण्याची आवश्यकता, पत्र ४४, ( २ ) दया, पत्र ४७, ( ३ ) भिकारी, पत्र ९२, ( ४ ) हिदु लोकांचा व्यापार, पत्र ५७, ( ५ ) हिंदु लोकांची द्रव्योपयोगाविषयी समजूत, पत्र ५१, ( ६ ) उद्योगप्रशंसा, पत्र ६८, ( ७ ) हिंदुस्थानास दरिद्र येण्याचीं कारणें, पत्र २७. या विचारसरणीचा सारांश असा –

मर्यादित लोकसंख्येमुळे प्राचीन काळी भारत देश आर्थिकदृष्ट्या सुखी होता. पुढे लोकसंख्या वाढली. तीत परकीयांच्या आगमनाने भर पडली. उपभोक्ते वाढले, पण त्या प्रमाणात उत्पादनाची साधने वाढली नाहीत. अनुत्पादक घटकांमध्ये

सरंजामदार व त्यांचा खाजगी नोकरवर्ग, इंग्रज अधिकारी व त्यांचा परिवार, भिक्षुक, भिकारी आणि स्त्रिया यांचा समावेश होतो. अज्ञान, आळस आणि इंग्रजांचा व्यापार यांमुळे आपण दिवसानुदिवस दरिद्री होत आहोत, म्हणून इंग्रजी शिक्षणाने प्रथम आपले अज्ञान दूर केले पाहिजे. मूल्यवान वस्तू जवळ बाळगिल्याने भांडवल वाढत नाही, ते व्यापारधंद्यांतच गुंतविले पाहिजे. इंग्रजी मालाशी स्पर्धा करावयाची असल्याने तसा माल तयार करण्याचे कसब हस्तगत केले पाहिजे. परदेशी माल न वापरता स्वदेशी वापरावा, म्हणजे पैसा परदेशात जाणार नाही व स्वदेशी कारागिरांना उत्तेजन मिळेल. या सर्व तत्त्वांचा प्रचार हरिदासपुराणिकांनी करावा. आता आपण सावध झालो नाही, तर आफ्रिका-अमेरिका या खंडांप्रमाणे इंग्रज येथेही आपली कायम वसाहत करितील व भारतीय संस्कृती लुप्त होईल.

### लोकहितवादींच्या आर्थिक विचारांचे महत्त्व

कृषिसंस्कृतीच्या अखेरच्या टप्प्यावर अनेक शतके स्थिर झालेल्या स्वसमाजाला लोकहितवादींनी हा जो उद्योगसंस्कृतीच्या स्वीकाराचा संदेश दिला, तो फार दूरदृष्टीचा व महत्त्वाचा आहे. विशेष हे की, लोकहितवादी या उपदेशानुसार स्वतः नेहमी देशी कापड वापरीत असत. इनामदारवर्ग विलासांत रमलेला, त्याला व्यापारात भांडवल गुंतविण्याची अक्कल नाही, सुशिक्षित समाज कारकुनी करण्यात संतुष्ट होणारा, त्याला वरिष्ठ जागा मिळत नाहीत, शेतकरी कराने आणि कर्जाने वाकलेला, वर्षभर मरेमरेतो मजुरी केली तरी लंगोटी आणि कोंड्याची शिळी भाकर-देखील मिळावयाची भ्रांती, शिपाई व कसबी कारागीर याना बेकारीने ग्रासलेले, स्वतंत्र व्यापारीवर्गाचा अभाव, ही अव्वल इंग्रजीतील महाराष्ट्र-समाजाची सांपत्तिक दुरवस्था लोकहितवादींनी जाणली व त्यावर पत्राद्वारे आणि 'लक्ष्मीज्ञान', 'हिंदुस्थानास दरिद्र येण्याचीं कारणे' इत्यादी ग्रंथांद्वारे शास्त्रशुद्ध व व्यावहारिक उपाय सुचविले. यावरून त्यांच्या लेखनाचे अर्थशास्त्रीय मूल्य स्पष्ट होते. लोकहितवादींनी प्रामुख्याने उत्पादनाच्या तांत्रिक व संस्थात्मक घटकांवर भर दिला असला, तरी उत्पादनाच्या विभागणीकडे त्यांनी अगदीच दुर्लक्ष केले नाही. जगातील घोटाळ्यामुळे उत्पन्न करणारे एकीकडे राहून भलतेच तिचा उपयोग करितात ( निबंधसंग्रह, पृ. ७७० ), असा धनविभागणीविषयीचा सध्याचा मामला ते दाखवून देतात. युरोपीय उद्योग-संस्कृतीपुढे आपली कृषिसंस्कृती हतबल ठरत आहे, हे त्यांना जाणवले होते; पण यापेक्षा लोकसंख्येची वाढ व भिक्षुकवर्गासारखा अनुत्पादक घटक, या त्या मानाने कमी महत्त्वाच्या मुद्द्यांवर त्यांनी मुख्य जोर दिला.

### लोकहितवादींची धार्मिक विचारसरणी

लोकहितवादींची धर्मविषयक मते त्यांच्या पुढे उल्लेखिलेल्या पत्रांमध्ये आली आहेत — ( १ ) विधिनिषेधरूप धर्माचे मूळ, पत्र २८, ( २ ) धर्मसुधारणा, पत्र ६४, ( ३ ) देवपूजा, पत्र ३७ ( ४ ) देवळे व नेमधर्म, पत्र ७४. त्यांतील आशय असा :

मानवाच्या सुखासाठी आणि हितासाठी धर्मशास्त्र आणि नीतिशास्त्र यांचा जन्म झाला. ही शास्त्रे ईश्वरप्रणीत नसून मानवप्रणीत आहेत, त्यांच्यात सुधारणा करण्याचा अधिकार मानवाला आहे. भारतात अनेक पंथ व धर्म आहेत; त्यांपैकी प्रवृत्तिपर कर्मयोग सर्वांत उत्तम होय. ईश्वर अव्यक्त आहे, त्याचे मनन करावे. सगुणोपासनेचा अतिरेक करू नये; त्यामुळे ईश्वराच्या मूळ स्वरूपाचा विसर पडतो. जीवनविषयक औदासीन्य वाढते व नैवेद्यादी उपचारांमध्ये अकारण पैसा खर्च होतो. हा पैसा समाजाचाच असतो. त्याचा अपव्यय न करिता तो समाजहितासाठी खर्च करावा. जपतप हा खरा धर्म नसून दया हा धर्म होय. ही दयाही सत्पात्री असावी. अमुक-एक व्यक्ती विशिष्ट जातीची आहे, म्हणून तिला दान देऊ नये; तिचे चारित्र्य आणि परिस्थिती विचारात घ्यावी. भक्ती आणि वैराग्य यांपेक्षा कर्म चांगले. इहलोकाबद्दल प्रेम बाळगून स्वतःचे, स्वतःच्या कुटुंबाचे व समाजाचे हित साधवे, अशी लोकहितवादी यांची धर्मविषयक शिकवण आहे. ही शिकवण लोकहितवादींनी समकालीन समाजाला उद्देशून दिली होती. या समाजातील बहुसंख्य जनांना धर्मशास्त्र हे ईश्वरी शास्त्र असून त्यात ढवळाढवळ करण्याचा अधिकार आपल्यास नाही, असे वाटत होते. मानवी संसार तिरस्करणीय असून त्याचा मोह न धरिता आपले आयुष्य व धन देवालयातील देवास व पुजाऱ्यास अर्पण करावे, शाक्तपंथासारख्या भोगवादी पंथापासून जैनपंथासारख्या त्यागवादी पंथापर्यंत कोणत्याही पंथनियमांना धरून परलोक-सुखासाठी धडपड करावी व तसे करिताना लौकिक आयुःक्रमाकडे कितीही दुर्लक्ष झाले तरी चालेल, किंबहुना परलोकप्राप्तीच्या निमित्ताने लौकिक कर्तव्ये खुशाल लाथाडावी, अशा वृत्तीचा हा समाज होता. त्यांना उद्देशून दिलेल्या या शिकवणीपाठीमागे धर्मतत्त्वांचे मानवकर्तृकत्व, त्यांची परिवर्तनशीलता, ईश्वराचे निर्गुणत्व, मानवांचे ऐहिक कल्याण व बुद्धिवाद ही मुख्य प्रेरक सूत्रे होती. या सर्वच तत्त्वांचे तर्कशुद्ध व निःसंदिग्ध असे विवेचन लोकहितवादींनी केले, असे नाही. उलट, कित्येकदा मुख्य तत्त्वांना व्याघाती ठरणारे युक्तिवादही त्यांनी स्वीकारिले होते. बुद्धिप्रामाण्याचा स्वीकार केल्यावर शास्त्राधार देणे गैर ठरावे, परंतु आपल्या विवेचनाच्या सिद्धीसाठी व स्वीकार व्हावा म्हणून ते कित्येक प्रसंगी शब्दप्रामाण्याचा आधार घेऊन अमुक-एक गोष्ट शास्त्राला मान्य आहे, हे मी दाखवून देईन, अशीही भाषा वापरतात. या-ना-त्या युक्तिवादाने समाजाने हितकर विचार स्वीकारावा, ही त्यांची दृष्टी असे. लोकहितवादींना मानवी जीवनातील तात्त्विक समस्यांपेक्षा सामाजिक समस्यांचे अगत्य अधिक होते. म्हणून भौतिकवाद व बुद्धिवाद यांचे ओझरते दर्शन त्यांच्या धर्मविषयक लेखनात होत असूनही त्यांचा धर्म प्रामुख्याने मानवतावादी झाला आहे. दया हे त्याचे अधिष्ठान आहे. परंतु या दयावादाला सामाजिक अधिष्ठान होते; तो वैयक्तिक दयावाद नव्हता. आपण सर्व एकाच समाजाचे घटक आहो, म्हणून परस्परांशी सहकार्य करणे हे आपले कर्तव्य आहे, असे त्यांनी सुचविले आहे.

## लोकहितवादींचे सांस्कृतिक विचार

प्राचीन काळी भारतीयांनी चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांची निर्मिती केली, पण कालांतराने ही नवनिर्मितीची आणि नवसंशोधनाची प्रवृत्ती लुप्त झाली. जुन्या ज्ञानाला नवे वळसे देण्यातच सर्व शक्ती खर्ची पडून प्रगती खुंटली. एका विशिष्ट वर्गाच्या हातीच ज्ञानसाधने गेली आणि बहुजनसमाजाचा व ज्ञानाचा संबंध उरला नाही. ज्यांना संस्कृत कळत होते, त्यांनीही अर्थप्रतीतीपेक्षा पाठांतरावरच जोर दिला. मुळातच या विद्यावंताचे क्षेत्र मर्यादित, त्यातही त्यांची गती कुंठित झालेली, यामुळे भारताच्या सांस्कृतिक जीवनाचा झराच आटला. स्वतःचे वर्चस्व टिकविण्याकरिता ब्राह्मणवर्गाने या विद्येचा दुरुपयोग केला. लोकहितवादीच्या कालीही इंग्रजी विद्येला विरोध करणारा वर्ग तोच. त्या विरोधाचे कारण इंग्रजी विद्येच्या प्रसारामुळे या वर्गाचे श्रेष्ठत्व नष्ट होणार हे होते. प्राचीन विद्या एकारलेली व ऐहिक जीवनात प्रत्यक्ष मार्गदर्शन न करणारी, परंपरेवर आधारलेली होती. उलट, अर्वाचीन विद्या विविधागी, लौकिक व्यवहार सुकर करण्यास साहाय्य करणारी आणि अनुभव-प्रयोग यांवर अधिष्ठित. म्हणून समाजाने जुनी निरुपयोगी विद्या व तिचे पाठीराखे यांच्यामागे न लागता नवी उपयुक्त विद्या आणि तिचे पुरस्कर्ते यांना शरण जावे.

युरोपीय तमोयुगातील पोपशाहीप्रमाणे भारतीय संस्कृतीच्या अगतिकपणाला येथील भिक्षुकवर्गच जबाबदार आहे, असे मानून त्या वर्गावर त्यांनी हल्ला चढविला. भारतीय संस्कृतीच्या उत्कर्षाचे आणि अपकर्षाचे श्रेय केवळ ब्राह्मणवर्गाकडे नाही. त्यात क्षत्रिय व वैश्य हेही वर्ग भागीदार आहेत, या गोष्टीकडे त्यांनी दुर्लक्ष केले. क्वचित त्यांनी राजेमहाराजे यांच्यावर टीकास्त्र सोडिले, पण तेही ही मंडळी विलासी, अज्ञ आणि ब्राह्मणधार्जिणी आहेत एवढ्यापुरतेच; व्यापक अर्थाने क्षत्रियर्गाला त्यांनी सांस्कृतिक जीवनात जबाबदार धरलेले नाही. तरीही भारतीय उन्नतीचा आणि अवनतीचा जो आलेख लोकहितवादींनी रेखाटला आहे, तो वस्तुस्थितीला धरून आहे, असेच म्हणावे लागेल. उत्तर-पेशवाई व अव्वल इंग्रजी या कालातील समाजाचे व विशेषतः भटवर्गाचे त्यांनी जे भेदक दर्शन घडविले व त्याचे विश्लेषण केले, तेही यथातथ्य व न्याय्य आहे. त्यांच्या या विवेचनात एक-दोन उणिवा मात्र जाणवतात. एक, भारतीय संस्कृतीची अधोगती थोपवून धरण्याचा संतमहंतांनी ऐतिहासिक काळी जो प्रयत्न केला, त्याकडे दुर्लक्ष व दुसरी सांस्कृतिक अधोगतीची अपूर्ण कारण-मीमांसा. ती पूर्ण व्हावयास हिंदू, मुस्लिम अशा सर्व भारतीयांना लागू पडणारी सर्वंकष असावयास पाहिजे होती. शतपत्रांत आलेल्या या अपूर्णतेची भरपाई त्यांच्या हिंदुस्थानच्या इतिहासाच्या प्रस्तावनेत बरीचशी झाली आहे.

## दोन संस्कृतींमधील अंतर

भारतीय संस्कृती उत्तर-पेशवाईच्या कालात आपल्या ऱ्हासाच्या अखेरच्या अवस्थेत होती. त्या अवस्थेत ती कोणत्याच दृष्टीने समकालीन युरोपीय संस्कृतीपेक्षा

श्रेष्ठ नव्हती. उलट, युरोपीय संस्कृती बरीच प्रगत झाली होती. या दोन संस्कृतींमधील अंतर लोकहितवादींसारख्या डोळस व्यक्तीला तीव्रतेने जाणवले. भारतीय संस्कृतीच्या प्राचीन काळात कार्यकर दिसणारी सर्वसमावेशक वृत्ती अनेक शतकांपासून क्षीण होत-होत ती संस्कृती आता जरठ झाली होती. या प्रगतिपराङ्मुख, आत्मवंचक व स्थितिशील संस्कृतीवर प्रहार करणे हे आपले कर्तव्य आहे, असे लोकहितवादींना वाटले. म्हणूनच या जुनाट संस्कृतीचे संरक्षक जे भटभिक्षुक त्यांच्यावर त्यांनी सतत धार धरिली. ब्राह्मण सुधारले की सर्व सुधारतील, असे ते म्हणत. यात त्यांची दृष्टी केवळ मध्यमवर्गापुरती मर्यादित होती, असे नव्हे. ब्राह्मण हे समाजाचे सांस्कृतिक नेते होते, हे त्याचे कारण होते. लोकहितवादींना युरोपीय संस्कृती श्रेष्ठ वाटली, यामागे अंधानुकरणाची वा राजकीय पराभूततेची भावना निश्चित नव्हती. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ती संस्कृती केवळ आक्रमक नव्हती, तिच्यात एक अंतर्बाह्य सुसंगती होती. लोकशाही, व्यक्तिवाद व बुद्धिवाद या तत्त्वांचा ती हिरिरीने पुरस्कार करीत होती व या तत्त्वांचे पालन करण्याचाही पूर्ण कसोशीने प्रयत्न करीत होती. भारतीय संस्कृतीजवळ ही प्रगतिशील तत्त्वे नव्हती व जी पारलौकिक मूल्ये होती, त्यांचे सुसंगत पालन होत नव्हते. जग माया आहे किंवा ईश्वर निर्गुण निराकार आहे, असे सांगणारे विद्वानही निर्जीव पाषाणांना आणि पोथ्यांना चिकटून बसले होते. एका संस्कृतीमधील सुसंगती आणि दुसरीमधील विसंगती यांच्या दर्शनाने लोकहितवादींना पहिलीविषयी आदर व दुसरीचा उबग वाटू लागला. असे असूनही येथील संस्कृतीच्या जागी आंग्ल संस्कृती नांदावी, असे स्वप्न त्यांनी कधी पाहिले नाही. आपल्या संस्कृतीवरील बांडगुळे व तिच्या जीर्ण शाखा यांची खच्ची करून तिच्यावर नव्या विचारांचे कलम करावे, असेच लोकहितवादींचे मत होते. भारत 'ख्रिस्तीयन' होऊ नये, भारतीय 'गुलाम' होऊ नयेत, तर ते ज्ञानी, सधन व सदाचारी व्हावेत, असे त्यांना उत्कटतेने वाटत होते. या अर्थाने त्यांना भारतीय संस्कृतीविषयी अभिमानच होता, असे म्हणता येईल. पण त्या संस्कृतीचा विकास केव्हाच थांबला आहे, तिला विकृत रूप आले आहे, आंग्ल संस्कृती प्रगत असून तिच्यातील भौतिक सुधारणा आपण स्वीकारिल्या पाहिजेत, या अर्थाने भारतीय आचारविचाराचा त्यागही त्यांना अभिप्रेत होता.

## लोकहितवादींचे सामाजिक विचार

प्राचीन कालापासून भारतात चातुर्वर्ण्य-व्यवस्था प्रचारात आहे. प्रारंभी तिच्या अंगच्या गुणकर्मांना महत्त्व होते, पण नंतर ते लोपले. केवळ जन्मावरून जात ठरविण्याची पद्धत आता रूढ आहे. चार वर्ण आज निव्वळ नावालाच उरले आहेत. ब्राह्मणवर्गाने ज्ञानार्जन व ज्ञानदान ही कर्मे करावयाची; पण आजचा ब्राह्मणसमाज ही विहित कर्मे मुळीच करीत नाही. तो पोटभरू झाला आहे. अर्थरहित पाठांतरामागे लागल्याने जुने ज्ञानही त्याला आकळिता येत नाही. नवीन विज्ञानाशी तर त्याची तोंडओळखही नाही. समाज-संरक्षण हे कार्य क्षत्रियांचे, पण ब्राह्मणवर्गाप्रमाणे क्षत्रियवर्गही

सध्या कर्मच्युत झाला आहे. शौर्य नव्हते म्हणून पारतंत्र्य आले, आणि पारतंत्र्य आले, म्हणून शिपाईगिरीलाही वाव नाही, अशी या वर्गाची स्थिती आहे. ज्यांनी बाहुबलाने संपत्ती संपादन करावी, ते निवृत्तिवेतनाच्या गोष्टी करीत आहेत. सावकार-व्यापारी यांचीही कथा अशीच. इंग्रजी व्यापारापुढे त्यांचा धंदा डबघाईला आला आहे. आज अधिकांश भारतीय समाज सेवाचाकरीच्या मागे आहे. ज्ञान, बल व अर्थ यांच्या संपादनाचे व उत्पादनाचे सामर्थ्य कोणातच उरले नाही. आज आपण सारे शूद्र झालो आहो.

भारतात वावरणारा आणखी एक वर्ग म्हणजे आंग्ल समाज. हा वर्ग विज्ञानाचा प्रसार करीत आहे. राजसत्ता, लष्कर, व्यापार, विद्येची साधने या सर्व गोष्टी आज या समाजाच्या हातात आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांची कामे हाच वर्ग करीत आहे. म्हणजे खऱ्या अर्थाने भारतात दोनच वर्ग उरले : एक जेता आंग्ल वर्ग, दुसरा जित नेटिव वर्ग. येथील ब्राह्मणसमाजाला ही वस्तुस्थिती समजत नाही. अजूनही समाजव्यवस्थेत आपले स्थान सर्वोच्च आहे, असे त्याला वाटत आहे; पण ही त्याची भूल आहे. खरे म्हणजे या भटवर्गाइतका आळशी, अज्ञानी आणि अनुत्पादक घटक आपल्या समाजात दुसरा नाही. हाच घटक समाजाच्या प्रगतीला विरोध करीत आहे, कारण समाजाच्या स्थितिशीलतेत त्याचे हितसंबंध गुंतले आहेत. स्त्रीला शिक्षण मिळू नये, तिचे बालपणीच व प्रसंग पडल्यास वृद्धाशीही लग्न लावावे, दुर्दैवाने ती विधवा झाल्यास पुनर्विवाह करण्याचा अधिकार तिला देऊ नये, घरात सोवळेओवळे आणि घराबाहेर स्पृश्यास्पृश्य हे भेद कटाक्षाने पाळावे, अशी या वर्गाची मते आहेत. आपल्या मतांच्या समर्थनासाठी हा वर्ग शास्त्र व रूढी यांचा आधार घेतो. बहुजनसमाज अज्ञ असल्याने या वर्गाची मते तो मान्य करितो. समाजाने आता या वर्गाचे नेतृत्व झुगारून दिले पाहिजे. ब्राह्मण हे आमचे गुरू नसून इंग्रज हे गुरू आहेत. ते सर्व बाबतींत आमच्याहून वरचढ आहेत. त्यांच्यात शिस्त, चिकाटी, उद्योगप्रियता, शौर्य, देशाभिमान हे गुण आढळतात; उलट आम्ही आळशी, गयाळी, भित्रे आणि स्वार्थी आहोत. सामाजिक दृष्टीने इंग्रज स्त्रीदाक्षिण्यवादी, सामाजिक विषमता न मानणारे व सुसंघटित आहेत, तर आपण स्त्रीसमाजाला पायदळी तुडविणारे, समाजघटकांत उच्चनीचभाव कल्पिणारे आणि आपपरभावाने विघटित झालो आहो. आमच्या समाजात उधळेपणा, कर्जबाजारीपणा, लाचलुचपत, लाचारी व व्यसनासक्ती या दुर्गुणांची बजबजपुरी झाली आहे.

## लोकहितवादी यांनी सुचविलेली उपाययोजना

या एकूण अधःपाताला आमचा ब्राह्मणवर्ग आणि त्याची शास्त्रे याच गोष्टी जबाबदार आहेत. तेव्हा प्रथम ब्राह्मणनिष्ठा व शास्त्रप्रामाण्य यांचा त्याग केला पाहिजे. ब्राह्मणांचे अनुकरण न करिता इंग्रजांचे करावे, व शब्दप्रामाण्य न मानता बुद्धिप्रामाण्य स्वीकारावे. ग्रामण्याचे भय बाळगू नये. नव-विचारकांची स्वतंत्र जात झाली, तरी

हरकत नाही. दुसरे, नवीन सुधारणा समाजात प्रसृत करावी. त्या दृष्टीने कुटुंबसंस्था, लग्नसंस्था आणि जातिसंस्था यांत आपल्याला महत्त्वाचे फरक करावे लागतील. एकत्र कुटुंबात एक कमावतो आणि दहा त्याच्या जिवावर जगतात. म्हणून विभक्त कुटुंब-पद्धती प्रचारात आणावी. लग्नसंस्थेत अवाजवी खर्च आणि वधूवरांच्या मतांची उपेक्षा हे दोन दोष आहेत, ते दूर करावे; म्हणजे झेपेल तेवढाच खर्च करावा व विवाह वधू-वरांच्या संमतीने व्हावा. या दृष्टीने बालविवाह व जरठकुमारीविवाह या चाली घातुक आहेत. पहिल्यात वधूवरांना मतेच नसतात. दुसऱ्यात स्त्रीवर अन्याय होतो. शिक्षण खंडित होणे किंवा मुळीच न लाभणे, शारीरिक दुर्बलता येणे, दुर्बल प्रजा निर्माण होणे व अकाली संसाराची जबाबदारी शिरावर पडणे हे बालविवाहातील दोष आहेत. जरठकुमारीविवाहात स्त्रीला वैधव्य येण्याची अधिक शक्यता असते, तिला वैवाहिक सुख मिळत नाही, व्यभिचार वाढतो; म्हणून विषमविवाह रद्द करून पुनर्विवाह रूढ करावे. जातिसंस्थेत प्रत्येक जात स्वतःला श्रेष्ठ व इतरांना कनिष्ठ मानते व वरिष्ठ जातीचे अनुकरण करू पाहते. उच्चवर्णीय व्यक्ती मुसलमान किंवा इंग्रज यांच्याशी व्यवहार करितात, पण स्वधर्मीय कनिष्ठ व्यक्तीशी करीत नाही. खरोखर परधर्मीयापेक्षा स्वधर्मीय अधिक जवळचे, त्यांच्याशी व्यवहार करावा. या सर्व सुधारणा करण्यास सरकार अनुकूल असले, तरी असे कायदे करण्यास सरकारला उत्तेजन देऊ नये. विशेषतः, विवाहासारख्या कौटुंबिक घटनेत सरकारा कायदे शिरणे इष्ट नव्हे. त्यापेक्षा सुधारणा होण्यास थोडा उशीर लागल्यास चालेल.

**पुनर्विवाह आणि जातिव्यवस्था**

कुटुंबसुधारणेच्या या सर्व बाबींत पुनर्विवाहास लोकहितवादींनी विशेष महत्त्व दिले आहे. या एकाच विषयावर त्यांनी एकूण नऊ पत्रे लिहिली आहेत. पुनर्विवाह हिंदू लोकाच्या सुधारणेचे मूळ आहे व त्यांत निम्मी सुधारणा आहे, असे त्याना वाटत होते. कारण पुनर्विवाहास मान्यता देणे म्हणजे स्त्रीपुरुषसमानता व स्त्रीस्वातंत्र्य या दोन मूलभूत तत्त्वांना मान्यता देणे होय, हे त्यांनी ओळखले होते. या सुधारणेच्या पुरस्कारामागे त्यांची नेहमीची मानवतावादी दृष्टीही होतीच. या दोन्ही कारणानी त्यांच्या पुनर्विवाहविषयक लेखनात स्त्रीविषयक विलक्षण कळवळा आणि ब्राह्मणवर्गा-विषयी विलक्षण कडवटपणा प्रकट झाला आहे. विधवाची दुरवस्था पाहून "आतां पुरे करा. आजपर्यंत विधवा जाळिल्या तितक्या पुरे करा," असा आक्रोश त्यांनी केला, आणि या दुरवस्थेला जबाबदार असलेल्या शास्त्रीवर्गासंबंधी "हे जुने वृद्ध आणि शास्त्री मेले तर बरे", अशी भाषा वापरली आहे. जातिसंस्थाविषयक लोकहितवादींच्या लेखनाविषयी असे म्हणता येईल की, ब्राह्मणांवर त्यांनी कडाडून हल्ला केला असला, तरी त्यांना ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा भेद समूळ नष्ट करावयाचा होता, असे नाही. जुन्या भांडवलावर ब्राह्मण आता टिकाव धरू शकणार नाहीत, त्यांनी नवे विचार आत्मसात केले नाहीत, तर मात्र त्यांचा समूळ नाश होईल, असे

त्याना वाटत होते. कृषिसंस्कृती आणि उद्योगसंस्कृती यांच्या संघर्षाचा व संमिश्रणाचा तो काळ होता. कृषिसंस्कृतीत उपकारक ठरलेली जातिव्यवस्था हट्टाने पाळणे शक्य नसले, तरी उद्योगसंस्कृतीत होणारा तिचा नाश व प्रचारात येणारी नवी अर्थाधिष्ठित वर्गव्यवस्था यांचे सुजाणपणे केलेले प्रतिपादन लोकहितवादींच्या कालात शक्य नव्हते. अशा संक्रमणकालात लोकहितवादींनी ब्राह्मणांवर प्रहार केले, पण जातिव्यवस्थेवर केले नाहीत. इंग्रज व मुसलमान यांच्यापेक्षा महारमांग जवळचे आहेत, असे सांगून जातिभेदांची तीव्रता कमी करावयास सांगितले, परंतु तिचा पूर्ण त्याग सुचविला नाही. व्यक्तिस्वातंत्र्य, समाजघटकांतील समता व परस्पर सहानुभूती या सुधारणावादी मूल्यांवर भर देऊन त्याच्या स्वीकाराने होणारी लाभपरंपरा समाजाला दाखवून द्यावी, यावर त्यांचा भर होता.

## शतपत्रांतील विचारांची पूर्वपीठिका

शतपत्रांचा साकल्याने आणि ऐतिहासिक दृष्टीने विचार केल्यास त्यांतील विचारसरणी अत्यंत महत्त्वाची होती हे तर जाणवतेच, पण तिला एक परंपरा होती, हेही लक्षात येते. भारताचे पारतंत्र्य, त्याचे आर्थिक शोषण व त्यावरील उपाय, नीतिप्रधान धर्माचा पुरस्कार, सामाजिक विषमतेवर आघात, युरोपीय विद्याकलांचे स्वागत ही शतपत्रांची ठळक वैशिष्ट्ये १८३२ ते १८५० या कालातील वृत्तपत्रीय लेखनामध्ये पुनःपुनः आढळतात. समाजाने पार्लमेंटची मागणी करावी, असे लोकहितवादींनी सुचविले; हाच विचार दर्पणाने १८३२-मध्ये आपल्या समाजाला पार्लमेंटची माहिती देताना व्यक्त केला होता.[१] लोकहितवादींनी स्त्रियांबाबत विवाहविषयक सुधारणा सुचविल्या. 'दर्पणा'तच 'माते'ने स्त्रीशिक्षणावर भर देऊन त्यांच्या दयनीय अवस्थेचे वर्णन केले आहे.[२] भिक्षुकी व कारकुनी या दोन व्यवसायांतच समाधान मानणाऱ्या ब्राह्मणवर्गाला व पर्यायाने सर्वच दरिद्री भारतीय समाजाला उद्योगधंदे करण्याची सूचना लोकहितवादींनी केली; तिचे सूतोवाच 'मुंबई-अखबार'कर्त्यांनी १८४०-मध्येच करून ठेविले होते. भारतीय पारतंत्र्याची मीमांसा लोकहितवादींनी केल्याचे आपण पाहिलेच आहे. 'प्रभाकर' पत्रात 'एक कोकणस्थ' या सहीने ही मीमांसा १८४२-मध्येच येऊन गेली होती.[३] या कोकणस्थाने शोधक बुद्धी, एकी आणि कवायती लष्कर याचा अभाव, आणि समाजमनावर ब्राह्मणाचे वर्चस्व ही भारताचे स्वातंत्र्य जाण्याची कारणे म्हणून सांगितली होती. स्वसमाजातील दुर्गुणांमुळे आपल्यास पारतंत्र्य आले, याबाबत हे 'एक कोकणस्थ' आणि लोकहितवादी यांच्यामध्ये एकमत होते. असे असले, तरी म्हणजे शतपत्रांतील विचार आधी

१. दर्पण, ६ जानेवारी १८३२.
२. दर्पण, ८ जून १८३२.
३. प्रभाकर, १३ मार्च १८४२

कोठे-कोठे प्रकट झाले असले, तरी त्यामुळे शतपत्रांचे महत्त्व मुळीच कमी होत नाही. कारण शतपत्रपूर्व विचार मौलिक असले, तरी तुटक, प्रासंगिक व वेगवेगळ्या संदर्भांत वेगवेगळ्या व्यक्तींकडून मांडिले गेले होते. लोकहितवादींनी नजीकच्या पूर्व-कालातील जवळजवळ सर्व विचार पचविले होते. त्या सर्व विचारांना मानवतावादाच्या व बुद्धिवादाच्या सूत्रात गुंफून अत्यंत कळकळीने त्यांचे सतत व चिकाटीने त्यांनी प्रतिपादन केले. त्याकरिता आवश्यक तो युक्तिवाद केला होता. अप्रिय परंतु सत्य बोलत राहण्याचे धैर्य त्यांनी दाखविले आणि सुधारणावादाची पताका फडकावीत ठेविली, हे कार्य सामान्य नव्हते.

लोकहितवादींची कौटुंबिक आणि सामाजिक विचारप्रणाली बहुतांशी निर्दोष व पूर्णांशाने निर्भीड असली, तरी त्यांच्या आर्थिक आणि राजकीय विचारांचा आविष्कार तितका निर्भीड नव्हता, असे दिसते. इंग्रजी राजवटीत भारताचे आर्थिक शोषण होत होते, हे त्यांना कळत होते. निबंधसंग्रह, ग्रामरचना इत्यादी आपल्या लेखनात त्यांनी त्याला वाचाही फोडिली आहे. त्याबाबत राज्यकर्त्यांना जाब विचारण्याऐवजी ते स्वकीयांच्या अंधश्रद्धेवर व आळशी स्वभावावर कोरडे ओढतात. तसे पाहिले, तर इंग्रजांच्या शोषक नीतीवर हल्ला करणे अव्वल इंग्रजीत अशक्य होते, असे नाही. 'प्रभाकर' पत्रात ( २० एप्रिल १८४५ ) पुढीलप्रमाणे आलेली टीका यास साक्ष ठरेल. " हे राज्य जाल्यापासून ते ( लोक ) अन्नवस्त्रासदेखील महाग जाले आहेत. एथलें सर्वच द्रव्य गोरे लोक हजार तऱ्हेनें घेऊन जातात आणि त्या लोकांचे पाद्री आम्हांस सांगतात की तुम्ही लोभ करूं नका. या पृथ्वींतील सुखें क्षणभंगुर आहेत. परंतु अशा गोष्टी त्यांही आपलेच लोकांस सांगाव्या. अम्हांपेक्षा त्यांस या उपदेशाची गरज फार आहे. " इतक्या उघडपणे अव्वल इंग्रजीत राज्यकर्त्यांविषयी लिहिले गेले होते. लोकहितवादी सरकारी नोकर होते व स्वसमाजातील दुर्गुण दाखविण्यावर त्यांचा भर होता. म्हणून त्यांची एतद्विषयक भूमिका परखड झाली नाही. त्यांच्या राजकीय विचारांबाबत तर हे अधिक जाणवते. लोकशाही विचारधारा प्रसृत करण्याचे श्रेय त्यांना देत असतानाच त्यांनी इंग्रजांची भेदनीती अणि स्वातंत्र्याची अपरिहार्यता स्पष्टपणे जाणली नाही, असे म्हणावे लागते. ल. नृ. जोशी, स. म. दीक्षित यांच्या लेखनात ती प्रकट झालेली दिसते. लोकहितवादींच्या उत्तरायुष्यात त्याची काहीशी जाणीव त्यांना झालेली होती. ते एके ठिकाणी म्हणतात — " कोणाच्या धर्मात वगैरे हात घालून बखेडे माजविणे व लोकांस अप्रिय होणे हे त्यांस ( इंग्रजांस ) आवडत नाहीं व त्या संबंधानें त्यांचा बिलकुल बोभाट नाहीं. परंतु देशातील द्रव्यौघ मात्र यांच्यामुळे परदेशांत अप्रतिबंधपणे चालला आहे, अशा कुरकुरी या देशाच्या सर्व भागांतून ऐकूं येतात. तेव्हा कांहींना कांहीं कुरकूर राहावी असा हिंदुस्थान देशांतील लोकांचा दैवयोग आहे असे दिसते. " येथेहि इंग्रजांस स्पष्ट दोष लावण्यापेक्षा दैवयोगाचा ते निर्देश करितात.

## उपेक्षा आणि तिचे स्वरूप

महाराष्ट्राने लोकहितवादींची उपेक्षा केली किंवा नाही, अथवा केली असल्यास का, याचे उत्तर यातूनच मिळण्यासारखे आहे. लोकहितवादींनी स्वसमाजावर कडक टीका केली आणि इंग्रजी राज्याबाबत निःस्पृह टीका केली नाही, हे त्यांच्या उपेक्षेचे कारण म्हणून सांगण्यात येते. हे अंशतः खरे असले, तरी मुख्य कारण वेगळेच असावे. साधारणतः १८३२-पासून महाराष्ट्रात सामाजिक आत्मनिरीक्षणास प्रारंभ झाला. हे करणाऱ्या सुधारणावादी मंडळींनी आपल्या सामाजिक व्यवस्थेतील वैगुण्ये स्पष्ट करीत असतानाच आंग्ल समाजातील चांगल्या गोष्टींचे दिग्दर्शनही करण्यास प्रारंभ केला होता. या कार्यामागे व्यक्तिवाद, बुद्धिवाद, भौतिकतावाद या नवीन मूल्यांच्या जाणिवेपेक्षा स्वसमाजाच्या उन्नतीची व तीकरिता आंग्ल संस्कृतीमधील विशेषांच्या अनुकरणाची भावनाच प्रधान होती. सुधारणेचे हे पहिले पर्व होते. या सामाजिक विचारप्रक्रियेचे टोक गाठण्याचे कार्य लोकहितवादींनी केले. युरोपीय संस्कृतीवरील विश्वास, राज्यकर्त्यांविषयी आदर, स्वसमाजातील उच्चवर्णीयांविषयी चीड व बहुजन-समाज आणि विशेषतः स्त्रीवर्ग यांच्याविषयी कणव, तत्त्वशुद्ध विचारसरणीपेक्षा समाजास पटेल अशा युक्तिवादाचा आश्रय ही या सामाजिक प्रक्रियेची ठळक लक्षणे होत. या साऱ्या विशेषांचे दर्शन शतपत्रांत होते. स्वकालाचे उचित प्रतिनिधित्व व बऱ्याच अंशाने नेतृत्व केल्यामुळे लोकहितवादींची आणि त्यांच्या शतपत्रांची त्यांच्या कालात उपेक्षा होणे शक्यच नव्हते. प्रस्तुत पत्रे प्रकाशित होत असताना यथार्थवादी, कल्याणोन्नायक-मंडळी इत्यादी सनातनी मंडळींनी व ज्ञानोदय, ज्ञानप्रसारक या सुधारणा-नियतकालिकांनी त्यांची यथायोग्य दखल घेतली. आपले मतपरिवर्तन घडवून आणण्याचे कार्य शतपत्रांनी केले, असे बाबा पदमनजींनीही[1] नमूद केले आहे १८१८ ते १८५०-पर्यंतच्या आत्मनिरीक्षणाच्या या कालखंडाचे लोकहितवादी हे नायक होते.

परंतु १८५०-पासून या परिस्थितीत बदल होऊ लागला. अनुभवाने आणि शिक्षणाने इंग्रजी राजवटीमुळे आलेले राजकीय पारतंत्र्य व होणारे आर्थिक शोषण यांची जाणीव सुशिक्षित वर्गाला होऊ लागली होती. १८५२ साली दक्षणी प्रांतस्थ मंडळी ( The Deccan Association ) नावाची पहिली राजकीय संस्था स्थापन झाली. १८५७ साली मुंबई विद्यापीठाची स्थापना व पलटणीतील शिपायांच्या असंतोषाचा तीव्र उद्रेक झाला. इंग्रजी राजवटीच्या हितकारकतेविषयी शंका व राजकीय

---

१. "प्रभाकर पत्र रा. रा. भाऊ महाजन हे काढीत असत...त्यांच्या पत्रांत लोकहितवादी या सहीची दीर्घ निबंधमाला लागली होती, तिजपासून तर मला फार उपयोग झाला. ब्राह्मणांचा धर्म व ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व यांजवरील माझी श्रद्धा व पूज्यबुद्धी ही उत्तरोत्तर नष्ट होण्यास ही पत्रमालिकाच बहुतेक अंशी कारणीभूत झाली." अरुणोदय, पृ. ८८, दु. आ. ( १९५५ )

स्वायत्ततेची जाण ही त्या काळाची प्रेरणा होती. सामाजिक सुधारणांचा उद्घोष करणाऱ्या लोकहितवादींना राजकीय स्वातंत्र्याचे प्रतिपादन कटाक्षाने आणि तीव्रतेने करिता आले नाही, व या दोन गोष्टींच्या विरोधात आपली भूमिका निःसंदिग्धपणे, निश्चितपणे स्पष्ट मांडताही आली नाही. इंग्रजांना विरोध करून देशाच्या स्वातंत्र्याचे अगत्य मानणारे राष्ट्रवादी व या विचारप्रणालीला उघडपणे दुय्यम लेखून सामाजिक सुधारणेचे तर्कनिष्ठ प्रतिपादन करणारे सुधारक या दोन गटांचे नेते १८५०-नंतर समाजजीवनाच्या अग्रभागी येत होते. यांपैकी कोणत्याही एका गटाचा पुरस्कार करणे हे लोकहितवादींना आपल्या उत्तरायुष्यात न साधल्यामुळे ते मागे पडल्यासारखे झाले. मालाकार चिपळूणकरांच्या दीर्घ व तीक्ष्ण टीकेमुळे लोकहितवादींच्या वाट्याला उपेक्षितांचे दुर्भाग्य आले, म्हणणेही तितकेसे बरोबर नाही. मालाकारांच्या टीकेतील अप्रस्तुत आणि प्रासंगिक भाग वगळल्यास लोकहितवादी काळाच्या मागे पडल्याची तक्रारच त्यांना करावयाची होती, हे जाणवते. म्हणजे मालाकारांनी केलेल्या टीकेमुळे लोकहितवादींची उपेक्षा झाली नसून काळाने केलेल्या उपेक्षेवर मालाकारांनी थोड्या भडक शाईत शिक्कामोर्तब केले, इतकेच.

### आचारविचारांतील विसंगती

लोकहितवादींचा काळ महाराष्ट्रातील विचारसंक्रमणाचा काल होता आणि आचारांतही जुन्यानव्याचा संघर्ष चालू झाला होता. अशा काळातील व्यक्तींच्या विचारांत आणि आचारांत कित्येक बाबतींत विसंगती आढळते. तसेच लोकहित-वादींच्या बाबतीत झालेले आढळते. समाजातील जुन्या आचारांवर ते कडक टीका करीत, पण स्वतःच कित्येक जुन्या सवयींना चिकटून राहत. अशा वेळी विरोधकांकडून असा आक्षेप घेतला जाई की, हे नुसते बोलके सुधारक आहेत. हा आक्षेप नंतरच्या काळातील सुधारकांवरही घेतला गेलेला दिसतो. ज्या वेळी सुधारणेची तत्त्वे आवेशाने सांगणे हीच मुख्य गरज असते, त्या वेळी ती सांगणे हाच कर्तेपणा ठरतो व असा कर्तेपणा लोकहितवादींमध्ये होता. परंतु प्रत्यक्ष आचरणात सुधारकी बाणा ठेवून भोवतालच्या समाजापासून, किंबहुना कुटुंबियांपासून अलग होण्याचे धैर्य सुधारकाने दाखवावे, अशी अपेक्षा असते. ही अपेक्षा पुष्कळदा सुधारणाविरोधी लोकांकडून जोराने प्रकट केली जाते. अशा रीतीने वागणाऱ्या सुधारकाला आचाराच्या भ्रष्टतेमुळे समाजापासून अलग करणे, वाळीत टाकणे सोपे जाईल, अशीही या विरोधकांची सुप्त मनीषा असते. लोकविरुद्ध आचरण मुद्दाम होऊन न करणे ही गोष्ट सुधारक केवळ धैर्याच्या अभावाने करितात असे नसून विरोधकांच्या या मनीषेला बळी न पडावे, म्हणूनही करितात. तेव्हा लोकहितवादींच्या हातून केवळ सुधारणेचा प्रचार झाला व आचार मात्र घडला नाही, असा आक्षेप घेताना त्यांचा काळ आणि सांगितलेली परिस्थिती लक्षात घ्यावयास हवी.

## वाङ्मयीन मूल्यांकन

लोकहितवादींची आणि त्यांच्या वाङ्मयाची उपेक्षा कोणी केली असेल, तर ती मराठी वाङ्मयसमीक्षेने त्यांचे व त्यांच्या वाङ्मयाचे शुद्ध वाङ्मयीन मूल्यमापन करण्याचे प्रयत्न अपवादानेच झाले. अव्वल इंग्रजीतील सनातनी आणि सुधारक लोकांनी लोकहितवादींच्या वाङ्मयाविषयीच्या आपापल्या प्रतिक्रिया प्रकट केल्या, पण त्या वाङ्मयीन नाहीत. मालाकारांनी लोकहितवादींच्या वाङ्मयातील काही वैगुण्ये दाखविली आहेत, पण वैचारिक विरोधकाच्या आपल्या मुख्य भूमिकेमुळे त्यांवर विशेष जोर दिला नाही. गांधीवादी आणि समाजवादी युगांच्या प्रारंभी लोकहितवादींच्या वाङ्मयाचे पुनर्वाचन आणि पुनर्मूल्यन झाले; पण या पुनर्मूल्यनात बहुधा वैचारिक इतिहास नमूद करण्याची भूमिका असल्यामुळे या इतिहासकारांकडूनही त्यांच्या साहित्याचे वाङ्मयीन विश्लेषण वा मूल्यमापन नीटसे झाले नाही. लोकहितवादींनी ललितवाङ्मय लिहिले नाही. त्यांच्या साऱ्या वाङ्मयनिर्मितीमागे वाङ्मयीन प्रयोजन वा हेतू नाही. शुद्ध सामाजिक हेतूने त्यांनी लेखन केले. वाङ्मयीन प्रेरणेचा अभाव व वाङ्मयीन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या गुणविशेषांची न्यूनता या कारणांमुळे लोकहितवादींची वाङ्मयीन उपेक्षा झाली असावी. हे खरे असले, तरी त्यांच्या वाङ्मयात काही वाङ्मयीन वैशिष्ट्ये आहेत, आणि त्यांची दखल वाङ्मयसमीक्षकांनी घ्यावयास हवी.

## उत्कट भावना

लोकहितवादींच्या लेखनाचे पहिले ठळक वैशिष्ट्य म्हणजे त्यातील उत्कट भावना. पोशाखीपणासारखा साधा विषय असो, किंवा पुनर्विवाहासारखा गंभीर विषय असो, लोकहितवादी त्याविषयी अत्यंत तळमळीने लिहितात. विधवांविषयी समाजाला जाब विचारताना ते लिहितात, " तुम्ही आजपर्यंत बायकांचे बळी घेतलेत व पुढे घेतां. त्याचे झाडे कोठें द्याल ? अहो, जिचा नवरा मरतो तिचा अधःपात होतो, आणि ती दुःखी होते, आणि तुम्ही तशा अवस्थेत निर्दयपणानें तिचे केश काढितां आणि तिचे अगावरचे दागिने काढून घेतां, हा काय धर्म आहे ? आणि तुम्ही म्हणता दैव वाईट म्हणून तिचा नवरा मेला, परंतु तुम्ही दुष्ट म्हणून तिला दुसरा नवरा करून देत नाही. दुर्दैवी मनुष्याशीं दुष्टपणा करणें हे फार नीचपणाचें काम आहे. "[१] उत्कट भावना आणि उपदेशकाची भूमिका यांमुळे त्याच्या लेखनात एक सूक्ष्म वक्तृत्वगुण आढळतो व काही ठिकाणी तर तो चटकन डोळ्यात भरेल असा दिसतो. उदाहरणार्थ, पुढील उतारा पहावा —

" – अहो, लोकांनो ! तुम्ही आपले कन्यांचे वध करणारे आहांत. साप्रतचे ब्राह्मणांस शिकविणे फार अवघड आहे. चालीविरुद्ध गोष्ट त्यांचे कानी पडली म्हणजे ते नाक मुरडतात आणि म्हणतात, छेः हे काय ? त्यांत काय आहे ? पूर्वापार चालत

१. पुनर्विवाह, पत्र ७०.

आलेली चाल असून तीस विरुद्ध कसें बोलतां ? आमचे वडील तर लक्षावधी रुपये मिळवीत होते. आतां आम्ही हलक्या अवस्थेप्रत पावलों म्हणून अशी बुद्धि झाली. जसा एखादा पहिलवान एक पल्ला ओझे उचलणारा असतो आणि त्यास क्षयरोग झाला म्हणजे तो औषध घेत नाही. तो म्हणतो की, अरे, माझें पल्लाभर उचलायचें बळ होते तेव्हा मीं औषध घेतले नाही. आता मी थकलों. आतां औषध घेऊं काय ? मी कधीं घेणार नाहीं. तसे ब्राह्मण मूर्ख होऊन विचार करितात आणि म्हणतात कीं, अहो, आमचे पूर्वज विश्वामित्र, त्याने नवी सृष्टी केली, अगस्तीनें समुद्र प्राशन केला, दुर्वासाचे शापाने विष्णूने दहा जन्म धारण केले व भृगूनें लक्ष्मीनारायणास लाथ मारली; असे आम्ही देवांचे देव, आणि सर्वांहून वरिष्ठ, आम्हांस शहाणपणा शिकवायास कोणी समर्थ नाहीं." [१]

या एकाच उताऱ्यात संबोधने आणि संभाषणे यांची रेलचेल झाल्याने त्याला उत्कट वक्तृत्वगुण लाभला आहे. वाङ्मयाला शोभा आणण्यासाठी नव्हे, तर आपल्या विरोधकांना आणि अज्ञजनांना पटवून देण्यासाठी ते या गुणाचा उपयोग करितात. अशा प्रसंगी त्यांच्या लेखनातील युक्तिवादचातुरीही लक्षणीय असते. पुढील युक्तिवाद पाहण्यासारखा आहे:-- " परंतु मनु हा जर ईश्वरअंश होता तर त्याने अशीही सत्ता पृथ्वीवर कां प्रकट केली नाही कीं जर आपण असे शास्त्र केलें, तर असेही करूं की कोणे एकहि ब्राह्मणाचे स्त्रीचा नवरा मरणार नाहीं. प्रथम स्त्री मरावी, नंतर नवरा मरावा, असा क्रम जर पृथ्वीवर घातला असता, तर मीं म्हटलें असते की मनु हा ईश्वर होता व ब्राह्मण हे ठीक करितात." [२] तथापि आपले मत सिद्ध करण्यासाठी ते नेहमीच तर्कांचा आश्रय करितील, असे नाही. केव्हा-केव्हा आप्तवचनाचाही उपयोग करितील. ते म्हणतात, "यावरून उघड न्याय होत आहे की जाति व अभिमान मानणारे मूर्ख आहेत. आणि जाति व्यवहारावरून आणि कर्मावरून झाल्या आहेत, यांत संशय नाहीं. याविषयी मनूचे वचन आहे की, ब्राह्मणाचा शूद्र होतो आणि शूद्राचा ब्राह्मण होतो. शूद्रायां ब्राह्मणात् जातः श्रेयसा चेत् प्रजायते." [३]

आपला युक्तिवाद सबळ करण्याकरिता चटकदार व समर्पक चुटके आणि आख्यायिका योजिण्यात त्यांचा हातखंडा असे. या दृष्टीने जावईबोवांची उसनी शिदोरी ( निरुद्योगीपणाच्या चाली, पत्र ४३ ), सरंजामदारांचे हास्यास्पद अज्ञान ( ब्राह्मण-लोकांचा स्वभाव, पत्र ४८ ), जांबुवंत व नारद ( नादविद्या ), धर्मभोळी बाई आणि उंदीर ( लोकांची समजूत व पुराणादिकांचे सौरस्य ) इत्यादी चुटके वाचनीय आहेत. समर्पक अवतरणे उद्धृत करिताना त्यांची बहुश्रुतता व्यक्त होते. गीता आणि

१. पुनर्विवाह, पत्र १०.
२. शतपत्रें, पत्र १५.
३. शतपत्रें, पत्र ३९.

नामदेव-तुकाराम यांचे अभंग त्यांना विशेष प्रिय दिसतात. इंग्रजी अवतरणे ते कधीच देत नाहीत आणि इंग्रजी ग्रंथकारांची नावेही अपवादानेच नमूद करितात.

आपली शैली सजविण्याचा सहेतुक आणि कृत्रिम प्रयत्न लोकहितवादींच्या लेखनात नसला, तरी त्यांची लेखणी सहजपणे सुंदर अर्थालंकार व शब्दालंकार साधून जाते. जुनाट मताच्या वृद्धांशी वाद करण्यात अर्थ नाही, असे सांगताना ते म्हणतात, " असा विचार करणाऱ्या पुरुषांशी वाद करणे आंधळ्यापुढे मशाल धरणे किंवा प्रेताच्या तोंडाशी औषधाची वाटी लावणे याप्रमाणे आहे." (पुनर्विवाह, पत्र १०४.) हिंदू लोकांच्या दुर्बलतेचे वर्णन करिताना ते लिहितात, " जशी पुष्ट बकरी व्याघ्रास सांपडतात तसे हे लोक मुसलमानांस सांपडले " आणखी उदाहरणे अशी — जेव्हा या स्त्रिया विद्वान् होतील, तेव्हा या पंडितांस चरणसंपुष्टांनी पूजा अर्पण करितील. (पुनर्विवाह, पत्र १०५). —जसा कोणी मेला म्हणजे त्याचे नावें वृषोत्सर्ग सोडतात, तशी मराठ्यांची राजधानी गेली, बाजीरावाचे नांवाचे इंग्रजांनी पोळ सोडले. म्हणजे इंग्रजांनी कोणास जहागिरी व कोणास पेन्शने दिली आहेत, ती ते खातात आणि पोळासारखे फिरतात. (स्त्रियांची स्थिति) गंध म्होरकीदार, मुद्रा चक्रीदार व शेंड्या घेरेदार राखाव्या व ढोंग माजवावे, यांत फळ काय होणार? (ब्राह्मणांचे आचार). अर्थात सोपेपणा व साधेपणा हे त्यांच्या शैलीचे खरे वैशिष्ट्य. मनातील विचार-विकार सुचतील त्या शब्दांत व सुचतील त्या क्रमाने शब्द ठेवीत व्यक्त करावे, ही त्यांची पद्धती होती. चोखंदळ शब्दयोजना व डौलदार वाक्यरचना यांचे त्यांना विशेष अगत्य वाटत नसे. भावनेची तीव्रता फार वाढली की लोकहितवादी ग्राम्य शब्दांचा वापर करावयास मागेपुढे पाहत नाहीत. भिक्षुकवर्गास तर त्यानी मूर्ख, टोणपे, बैल, पोळ, गाढव, डुक्कर, व रांडये ही विशेषणे बहाल केली आहेत. मूर्ख शब्द त्यांचा आवडता होता. शतपत्रांत तो शंभराहून अधिक वेळा आला असेल. ज्या उत्कट भावनेने त्यांच्या वाङ्मयात जिव्हाळा आणि उदात्तता हे गुण निर्माण केले, त्याच उत्कट भावनेने त्यांच्या वाङ्मयात शिव्यांचे प्राचुर्य व पुनरुक्ती — विषयांतर हे दोषही उत्पन्न केले. मात्र या अपशब्दाच्या वर्षावामागे वैयक्तिक द्वेषभाव नव्हता. तथापि तेवढ्याने त्यांच्या वाङ्मयातील अभद्र शब्दयोजना समर्थनीय ठरत नाही. भटांची अनिष्ट मिरासदारी व पुनर्विवाहाची इष्टता या दोन विषयांचे त्यांना एवढे अगत्य होते की, कोणत्याही विषयाचे विवेचन करीत असता ते या विषयांकडे सहज वळत. ' डौल व नेटिव राजे ' या विषयाच्या प्रतिपादनात वास्तविक भटवर्गाचा संबंध येण्याचे कारण नव्हते, पण तेथेही लोकहितवादी भिक्षुकवर्गास ओढून परिच्छेदचे परिच्छेद खर्ची घालतात. ' म्हापण्याची कला व म्हातारपणीं लग्न ' यात मुख्य विषयाकडे दुर्लक्ष करून अवांतर गोष्टींकडेच त्यांनी अधिक लक्ष पुरविले आहे. पुनर्विवाह या विषयावर अनेक लेख व त्यांत तेच-ते विचार मांडून त्यांनी पुनरुक्तीचा अतिरेक केला आहे.

शतपत्रांतील विचार कळकळीचे आणि महत्त्वाचे असले, तरी ते मांडण्याची एक सुसंगत पद्धत सर्वत्र दिसत नाही. या पत्रांना प्रारंभ, मध्य व अंत असे अवयव नसतातच. पत्र कोठून तरी सुरू होते, ते कोठेतरी संपते. विषयाच्या महत्त्वानुसार पत्राचा विस्तार कमी-अधिक करावा, असे त्यांस वाटले नाही. ' इंग्रजी राज्यापासून लाभ ' या विषयासाठी दोन पाने व ' वेळेचा व्यर्थ खर्च ' या त्या मानाने सामान्य विषयाकरिताही दोन पाने. विषय आणि लेखांचा विस्तार यांबाबत काही स्थूल संकेतही त्यांनी ठरविले नव्हते. कारण ते लेख नसून पत्रे होती. पत्ररूपाने विषयाचे उत्स्फूर्त विवेचन करण्याची पद्धती त्यांच्या काळी रूढ होती. तीच त्यांनी स्वीकारिली व तिचे दोषही पतकरिले, असे म्हणावे लागते. फुटकळ व प्रासंगिक विवेचन हे विशेषही त्यामुळेच केव्हा-केव्हा त्यांच्या लेखनात आले. विस्कळित मांडणी, शिथिल वाक्य-रचना, विषयांतर, पुनरुक्ती, ग्राम्य शब्दयोजना, तार्किक विसंगती, अनिरंजित भावना इत्यादी दोष त्यांच्या पत्रशैलीत दिसतात हे खरे, परंतु त्याच वेळी विचाराचे सामर्थ्य, विविधता, जिव्हाळा, सडेतोडपणा, ठामपणा, साधेपणा या गुणांनी ते तोलून धरले आहेत, असे म्हणावे लागते. म्हणून वाङ्मयीन भूमिकेवरून पाहिले, तर अव्वल इंग्रजीतील निबंधकार-लेखकांत त्यांचे स्थान मानाचे आहे, यात शंका नाही.

### लोकहितवादींची वाङ्मयीन परंपरा

लोकहितवादींची वाङ्मयीन परंपरा अशी निर्माण झालेली दिसत नाही. तथापि विष्णुबुवा ब्रह्मचारी व जोतिबा फुले यांच्या लेखनात त्यांच्या शैलीचे किंचित दर्शन घडते. विष्णुबुवा हे शतपत्रांच्या प्रसिद्धिकाली ऐन पंचविशीत होते. त्यांच्या नजरेतून हिंदू धर्मावरील लोकहितवादींची झणझणीत टीका सुटली असेल, असे नाही. जातिबांना त्यांच्या कार्यात लोकहितवादींचे सहकार्यच लाभले होते. या दोघांवरही लोकहित-वादींच्या वाङ्मयीन आविष्काराचा काही-ना-काही संस्कार होणे अपरिहार्य होते. ब्राह्मणवर्गाच्या अर्थरहित पाठांतरावर विष्णुबुवांनी केलेली पुढील टीका लोकहित-वादींच्या लेखनापासून वेगळी काढणे कठीण आहे. ते म्हणतात: "जो गीर्वाण भाषा म्हणजे संस्कृत भाषा शिकतो आणि बोलतो, तोच विद्वान अशी हिंदुस्थान देशांतील बहुतेक लोकांची बोलण्याची चाल पडून तशीच समजूत झाली आहे, परंतु ही समजूत अगदीच मूर्खपणाची आहे. का की, ज्या ज्ञानाच्या अनुभवाने वेदशास्त्रादिक ग्रंथ रचले, ते ज्ञान, तो अनुभव नाही आणि नुसते ग्रंथ पाठ केले आणि बोलला त्याला विद्वान म्हणणे हें केवढे मूर्खपण आहे!" विष्णुबुवानी लोकहितवादींची युक्तिवादपद्धती अनुसरिली, तर जोतिबांनी तीमधील वक्तृत्वगुण उचलला, असे दिसते. पुढील लहान उतारा याचे उदाहरण म्हणता येईल —

" अरेरे, या आपल्या सरकारच्या एवढ्या दिगंबर विद्याखात्याच्या गोऱ्या तोंडावर या काळ्या तोंडाच्या भटपंतोजींनी हा केवढा काळोखाचा डाग लाविला. अरे

हीं कडू कारलीं. आमच्या सरकारनें इतकीं तुपांत तळून साखरेंत घोळून मळलीं, तथापि त्यांनीं आपला जातिस्वभाव न सोडतां तीं अखेरीस कडूचीं कडूच राहिलीं."

विष्णुबुवा आणि जोतिबा यांच्यापेक्षाही बाबा पदमनजी याच्या विचारावर लोकहितवादींचा विशेष परिणाम झालेला दिसतो. मात्र दोघांच्या प्रवृत्ती आणि स्वभाव भिन्न होते. लोकहितवादींचा स्वभाव आक्रामक व शैली ओबडधोबड; उलट, बाबांचा स्वभाव हळुवार व त्यांची शैली प्रसन्न. तरीही 'कुटुंबाची सुधारणा' या व बांच्या ग्रंथावर लोकहितवादींची छाप निर्विवाद दिसते.

## तीन

## दीर्घ निबंध

### खिस्ती निबंधकार

अव्वल इंग्रजीतील नियतकालिकांमधून मराठी निबंध विकसित होत होता, त्याच सुमारास अनेक निबंधकार आपले निबंध स्वतंत्रपणे ग्रंथरूपाने प्रकाशित करीत होते. या कार्यात खिस्ती मिशनरी लेखक अग्रेसर होते. रॉबर्ट निज्बिट यांचे 'भगवद्गीतेचें सार' (१८३२) व 'ब्राह्मणांचे महत्त्व' (१८३२) हे ग्रंथ निबंधसदृश आहेत. परंतु ज्या मराठी ग्रंथाला खऱ्या अर्थाने 'दीर्घ निबंध' संबोधिता येईल असा ग्रंथ म्हणजे १८३५ साली प्रकाशित झालेला 'कुटुंबप्रवर्तननीति' हा होय. सदर ग्रंथाच्या लेखिका श्रीमती फेरार असून त्याना शिकला राहत असत. त्यांचे पती रे. सी. पी. फेरार हेही मराठीत लेखन करीत. रे. फेरार याच्या नावावर एक[1] व श्रीमती फेरार यांच्या नावावर सात[2] ग्रंथ आज उपलब्ध आहेत. या सात ग्रंथांपैकी सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ 'कुटुंबप्रवर्तननीति' हाच होय. 'Hints for the Improvement of Early Education and Discipline' या आंग्ल ग्रंथाच्या आधारे फेरारबाईनी आपला ग्रंथ रचिला आहे. ग्रंथात एकूण अकरा पर्वे म्हणजे प्रकरणे आहेत. प्रस्तावनेत लेखिका म्हणते — "संसारात जो आनंद कुटुंबाच्या ऐकमत्यानें उत्पन्न होतो, तो इतर कशानेहि होत नाहीं. ज्या कुटुंबांत भाऊबहिणी एकमेकाचें हित पाहतात, आपल्या मातापितरांचा मान राखितात, तेंच कुटुंब सुखी होय. जरी ते दरिद्रावस्थेंत असलें किंवा हाल काढीत असले तरी परिवाराच्या संतोषामुळे बाहेरच्या कष्टांपासून शांति पावते आणि ज्यामध्यें भाऊबंदांची स्पर्धा व वडिलांचा अनादर, परस्परांत द्वेष, कलह, कुत्सित भाषण इत्यादिक नेहमी चालतात त्या कुटुंबास पुष्कळ लाभ जरी असला तरी ते सुखी असे म्हणावयाचें नाहीं"

१ ईश्वराचें पवित्रत्व (१८३५), रे. सी. पी. फेरार.

२ कुटुंबप्रवर्तननीति (१८३५), हेनरी आणि त्याचा सांभाळणारा गडी संभू यांची गोष्ट (१८३५), चमत्कारिक गोष्टी (१८३५), बाळबोध गोष्टी (१८३८), शास्त्रांतील सुबोध धडे (१८३८), यात्रेकऱ्याचा वृत्तांत (१८३८), वाटसराची गोष्ट.

कौटुंबिक सुखाचे महत्त्व असे अनन्य असल्यामुळे व ते इष्ट मार्गांनी मिळविण्याचे ज्ञान अनेकांना नसल्यामुळे आपण प्रस्तुत ग्रंथ लिहीत आहो, असे सुचवून बाई पुढे म्हणतात —“ असा हा इंग्रजी मूलावरून मराठी भाषेंत ग्रंथ करून सादर केला आहे. ह्यांत प्रौढ भाषणें किंवा रमणीय कथा नाहींत. लोकांच्या नित्याच्या वहिवाटींतल्या साधारण गोष्टी व बालोपचार गोष्टी आहेत. कारण हा ग्रंथ कीर्तीसाठीं किंवा लाभासाठीं केला नाहीं. लेकरांच्या हितासाठीं उत्तम शिक्षामार्ग दाखवायाकरितां केला आहे.” कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीने कसकसे वागावे, याचे सविस्तर विवेचन लेखिकेने प्रकरणशः केले आहे. मुलांना किती व कसे रागवावे. याचे निरूपण करीत असताना लेखिका बजावते —“ रागानें शासन कद्धीं करूं नये. राग खाई आपणास आणि संतोष खाई दुसऱ्यास अशी ह्मण आहे. रागाने जी शिक्षा केली ती सोसणाऱ्यापेक्षां करणाऱ्यास फार दुखविती.”

अव्वल इंग्रजीतील जरठ कुटुंबव्यवस्थेत बालकापेक्षाही स्त्रीवर अधिक अन्याय होत होता. लहानपणापासूनच मुलगा व मुलगी असा भेद केला जाई. मुलीने खावे-हसावे कमी, तिला शिक्षण नाही, स्वातंत्र्य नाही, अशी तत्कालीन मुलींची अवस्था होती. कोवळ्या स्त्रीवर्गाची ही दैना पाहून फेरारबाईंच्या स्त्रीहृदयाला पाझर फुटावा, यात नवल नाही. “ अहो स्वदेशहितकर्ते सुजनहो तुम्ही स्त्रीजातीच्या शिक्षेस अनुकूल होऊन ते काम ह्या देशांत चालवा म्हणजे हा तुमच्या देशावर तुमचा मोठा उपकार होईल. तुम्ही म्हटलें असतां दीर्घ दृष्टीनें लोकांचें हित पाहत असतां आणि तुमच्या प्रत्यक्ष कन्येचें हित तुम्ही पाहत नाहीं हे तुम्हांला शोभेल काय? मुलांवर तर तुमची प्रीति जडलीच आहे परंतु त्यांतून मुलींवर प्रीति करायला थोडीशी तरी उरणार नाहीं किं काय! मुलीहि तुमच्याच पोटच्या आहेत आणि तुम्ही विचार करा कि जसा मुलांचा आत्मा अमर तसा मुलींचाहि अमर आहे. जसें मुलाला आपल्या बऱ्या वाईट आचरणाप्रमाणें इहलोकीं परलोकीं फल मिळते तसें मुलींलाहि मिळते. म्हणून जितकी ज्ञानाची अपेक्षा पुत्राला आहे तितकीच कन्येला आहे.”

अबलेवरील अन्याय पाहून फेरारबाईंचे अंतःकरण तिळतीळ तुटते. पण लोक-हितवादींप्रमाणे त्या सनातनी समाजाला शिव्याशाप देत नाहीत; तर अत्यंत ऋजू शब्दांत आपल्या विरोधकांच्या अंतःकरणातील उदात्त भावनेला आवाहन करितात. या नम्रतेमागे धर्मप्रसाराची भावना आहे हे खरे. पण धर्मप्रसाराचा आपला उद्देश बटबटीत स्वरूपात व्यक्त होणार नाही, ही दक्षता घेण्यास लेखिका चुकत नाही. दुसऱ्या पर्वात पालकांशी हितगूज करिताना फेरारबाई सांगतात, “ तुम्ही देवकृत्याकडे पाहून लेकरांपाशीं असे जर वर्ताल, तर त्यांजपासून तुम्ही प्रीत व संमान पावाल.” आणि पुढे ओघाने यावे तसे लिहून जातात, “ आणि तें तुमचे नियंतृत्व मानूं लागले म्हणजे आकाशांतल्या बापाचेहि नियंतृत्व मानायला त्यांला अधिक सोपें पडेल.” कधी ‘ सत्यनिष्ठ पाद्रीची गोष्ट ’ सांगून, कधी बायबलमधील दृष्टांत योजून बाई आपला

हेतू साधतात. " जे दयाळू ते धन्य; कां किं त्यांजवर दया केली जाईल, मला यज्ञापेक्षां दया फार आवडती, " " ख्रिस्ती लोकांच्या शास्त्रांत एक प्रत्यक्ष घडलेली गोष्ट अशी आहे "," (ख्रिस्ती) शास्त्रांत कांहीं कामुकांच्या कथा किंवा अचाट गोष्टी किंवा अघटित वार्ता ह्या अगदी नाहीत " अशा वाक्यांतून अट्टहास न करता विनासायास प्रचार साधण्याचे बाईंचे कौशल्य प्रकट होते.

संयत भावना व बेमालूम प्रचार या गुणांप्रमाणेच ग्रंथकर्त्रीजवळ कोमल, शुद्ध व लवचिक भाषाशैलीही आहे. " आयुष्यासारखा अमोलिक पदार्थ दुसरा नाहीं. वेळ जो आहे हें मनुष्याचें मुख्य द्रव्य. ह्याची एक एक घटका लाखाची जाती. व्यापारांत जें कांहीं बुडालें ते प्रयत्नानें मिळवितां येईल. पैका गमाविला तो कदाचित् सांपडेल. अब्रूची खराबी झाली तरी युक्तिप्रयुक्तीने सांवरतां येईल, पण जी घटका गुजरली ती कद्धीं परत येणार नाही. आणखी जसे दमडी दमडी खर्चल्यानें लाखों रुपये फुकट बुडतात, तसे पळघटका दवडल्यानें सर्व आयुष्य फुकट बुडते. देवाकडे घटका पळाचा देखील हिशोब द्यावा लागेल म्हणून एक पळहि फुकट घालविण्याविषयीं जपावे. "[१] अव्वल इंग्रजीच्या पूर्वार्धात इतकी शुद्ध, सुबोध व ओघवती शैली ही अपवादात्मक बाब होती. त्यातही एका परभाषी स्त्रीने ती आत्मसात केली आहे, हे पाहिले म्हणजे विशेष कौतुक वाटते. आवेशाने एखादे मत खोडून काढावे, हिरिरीने आपले मत मांडावे, हे बाईंच्या वृत्तीत नाही. वाचकाला युक्तिवादाने दिपविण्यापेक्षा वा जिंकण्यापेक्षा प्रेमाने त्याला आपलेसे करण्याकडे त्याची प्रवृत्ती दिसते. वत्सल मातेने आपल्या लाडक्या पण हट्टी मुलाची परोपरीने समजूत काढावी, त्या धर्तीने त्यानी आपले विवेचन आधारले आहे. त्यामुळे एका निरभिमानी व प्रेमळ मनाच्या सहवासात आपण आहोत, असे हा ग्रंथ वाचीत असता सतत वाटत राहते.

बाईंची शब्दकळा घरगुती आहे. क्वचित 'नियंतृत्व आणि अधिकारिता', 'दीर्घदृष्टि व योग्यव्ययता' अशी बोजड शीर्षके त्या योजितात. एरव्ही, 'उडाऊ', 'पुस्तपना', 'लाजवटपना',' हेदरे' इत्यादी देशी शब्द व 'ओपणे', 'बोधवणे', 'ठेव करणें' इत्यादी जुन्या मराठी पद्यातील वाक्प्रयोग त्यानी कुशलतेने योजिले आहेत.

'राग खाई आपणास आणि संतोष खाई दुसऱ्यास', 'जित्याचा स्वभाव काय मेल्याशिवाय जाणार?' अशा म्हणीही बाईंनी सहजगत्या वापरल्या आहेत. परंपरेपासून घेण्यासारखे जेवढे होते तेवढे सर्व त्यांच्या भाषेने स्वीकारिले आहे. ग्रंथगत विषयाचे सर्वांगीण व मुद्देसूद निरूपण हा प्रस्तुत निबंधाचा आणखी एक विशेष. प्रस्तावनेत ग्रंथाचे प्रयोजन सांगून पुढे 'आईबापांची मालकी', 'नियंतृत्व आणि अधिकारिता', 'दड व देणगी', 'स्वभावप्रकरण', 'सत्यता व प्रामाणिकता',

१. कुटुंबप्रवर्तननीति, पर्व ६ – उद्योगीपणा.

'उद्योगीपणा', 'दीर्घ दृष्टी व योग्यव्ययता', 'नियमशीलता व मनाची स्वच्छता' आणि 'धर्म व धार्मिकपणा' अशा दहा पर्वांत विषयाचे प्रतिपादन केले आहे, आणि शेवटच्या अकराव्या प्रकरणात 'सारांश' कथन करून समारोप केला आहे. वाङ्मयीन व ऐतिहासिक या दोन्ही दृष्टींनी मिसेस फेरार यांच्या 'कुटुंबप्रवर्तननीति' या निबंधाचे स्थान महत्त्वपूर्ण आहे.

**फ्लिन्नचे 'भाषण'**

"भाषण, मुंबई एथील शिक्षामंडळीचे शाळेत तारीख २५ वी माहे आप्रिल सन १८४८ चे दिवसीं वार्षिक परीक्षा झाली; त्यावेळ नामदार सर अर्स्किन पेरी साहेब-बाहादूर शिक्षामंडळीचे मुख्य यांणीं केलें. त्यांचें मराठी भाषांतर जेम्स फ्लिन्न याणें केले," ते ग्रंथरूपाने उपलब्ध आहे. प्रस्तुत भाषण म्हणजे इंग्रजाच्या शिक्षणविषयक धोरणावरील एक निबंधच आहे. जेम्स फ्लिन्न यांनी प्रारंभी एक इंग्रजी-मराठी प्रस्तावना जोडली आहे. त्या प्रस्तावनेत हिंदूंच्या भौतिक सृष्टीविषयीच्या अज्ञानाचे वर्णन आले आहे. आणि 'एतद्देशीयाचे अज्ञान दूर करण्याचा राज्यकर्त्यांचा प्रयत्न आहे,' असे आश्वासन तीत दिले आहे. "लोकांची स्थिती चांगली व्हावी असे इच्छिणारे परोपकारी पुण्यप्राणी युरपखंडी म्हणजे विलायतेंत फार आहेत. आणि विद्येचा प्रचार सर्व ठिकाणी एकसारिखा व्हावयाविषयी अत्यंत काळजी लागली आहे." या भाषणाच्या सुरुवातीला पेरीसाहेबांनी शिक्षामंडळीवर झालेल्या प्रतिकूल टीकेला उत्तर दिले असून प्रशिक्षित शिक्षकाचे महत्त्व विशद करिताना ते म्हणतात, "मराठी, गुजराथी, कानडी या भाषांमध्ये विद्याविषयीची पुस्तके थोडींच आहेत. तर त्या भाषांच्या योगानें एतद्देशीय लोकांची विद्या वाढविण्यास चांगली केलेलीं अशीं जीं शालांचीं पुस्तकें त्यांची भाषांतरें होतील तर फार चांगले, किंबहुना तशीं भाषांतरे आवश्य पाहिजेत, परंतु एतद्देशीय लोकांची विद्या वाढविण्यास वास्तविक रीतीचे मूळ रचनेपैकीं भाषांतर करणे हे एक साधन असे आवश्यक आहे कीं एतद्देशीय भाषा जाणणारे चांगले शिकविलेले अशा प्रतीचे पंतोजी असावे. अशा पंतोजींवाचून काही होणार नाहीं. युरोपियन विद्येच्या पुस्तकांचे एक भाषांतर देखील पाहावयास जवळ नसलें तथापि आर्नल्ड आणि ओबरलिन या दोघानी ज्या रीतींच्या नीति शिकून आणि धैर्य करून जसे आपल्या शिष्यांचे मन वश्य केलें, तशा नीतीचे आणि धैर्याचे आणि गुणें करून युक्त आणि स्वतः नीट रीतीने शिकलेले, असे पंतोजी असल्यास त्यांच्या योगाने फारच सुखकारक परिणाम होण्याची आशा दिसती." या त्रेचाळीस-पानी भाषणात ब्राह्मणाचा गर्व, विद्येचे उद्दिष्ट इत्यादी विषय आले आहेत. निबंध मुद्देसूद असला, तरी भाषांतर अगदीच रटाळ व बेंगरूळ झाले आहे. विशेषतः, मिसेस फेरारचे एक तपापूर्वीचे भाषांतर व प्रस्तुत भाषांतर यांची तुलना केल्यास फ्लिन्नचे भाषादारिद्र्य विशेष जाणवते. 'प्रेय' हा शब्द त्याने पुल्लिंगी वापरला आहे, हे त्याचे एक उदाहरण.

## सिमियन बेंजामिन

'मुलांस वागविण्याची रीति' या नावाचा ४५ पृष्ठांचा हा निबंध सिमियन बेंजामिन यांनी लिहिला आहे. या ग्रंथाची गंमत ही की, एका महाराष्ट्रीय माणसाच्या इंग्रजी ग्रंथावरून अ-मराठी माणसाने मराठीत हा ग्रंथ लिहिला आहे! १८८१ साली प्रकाशित झालेल्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत लेखक म्हणतो, 'मुलांस कसें वागवावें ह्या विषयावर माझे मित्र मिस्टर डी. व्ही. पाणंधोकर यानीं एक लहानसें पुस्तक इंग्रजींत लिहिले आहे... त्या इंग्रजी पुस्तकाचें मराठी भाषेत मीं भाषांतर करून व त्यात कांहींसा स्वतःचा विषय मिळवून त्याची पहिली आवृत्ति इ. स. १८७२त छापून प्रसिद्ध केली होती." संसारज्ञ व संसारागज्ञ या दोन काल्पनिक व्यक्तींच्या संवादांतून लेखकाने विषयाचे निरूपण केले आहे. परंतु त्यामुळे ग्रंथाच्या निबंधरूपाला बाध आलेला नाही. आई-वडिलांनी मुलाशी कसे वागावे, याचे तपशीलवार व मार्मिक विवेचन लेखकाने केले आहे—"मुलगी डोइ विंचरतांना रडली तर असे म्हणता ऐकले आहे कीं, 'नीट विंचरूं दे, नाही तर डोइत उवा होतील व त्या तुला समुद्रांत ओढून नेतील.' असे खोटे कारण कधी सांगू नये...तर तीस मोठ्या ममतेनें सांगितलें पाहिजे की, 'कांहीसे तरी दुखल्याशिवाय कसे होईल. जर तूं विंचरूं न दिलेस तर केसांत उवा होतील, व त्यामुळे डोके फार खाजवेल... उवा फारच झाल्या तर डोके भादरावें लागेल आणि मग तुझ्या सुंदर केसांत फुले भरण्याच्या लाभास, आनंदास व सुखास तुला मुकावें लागेल.' अशा प्रकारे खरीं खरीं कारणें सांगून तिची समजूत करावी." बेंजामिन साहेबाची भाषा मिसेस फेरारबाईच्या भाषेइतकी रसाळ नसली, तरी फिलनसाहेबाच्या भाषेइतकी रटाळही नाही. तिचे वळण शुद्ध व आधुनिक आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या अखेरीस बेंजामिनसाहेबांच्या 'अपशब्दनिषेध' व 'कामदृष्टि किंवा स्त्रियांकडे पापी नजरेने पाहण्याचा नीच प्रकार' या दोन निबंध-पुस्तकाची जाहिरात आढळते.

यांशिवाय जॉन विल्सन, मडम विल्सन, रे. ए. व्हाइट इत्यादी ख्रिस्ती लेखक-लेखिकांनी निबंधसदृश पुस्तके लिहिली आहेत. परंतु केवळ ख्रिस्ती निबंधकारांतच नव्हे, तर एकूण अव्वल इंग्रजीतील निबंधकारांतच ज्याला मानाचे स्थान आहे, असा ख्रिस्ती निबंधकार म्हणजे रे. बाबा पदमनजी.

## बाबा पदमनजी

बाबा पदमनजी याचा जन्म कासार जातीत बेळगाव येथे मे १८३१-मध्ये झाला. 'मुळे' हे त्याचे आडनाव. त्यांचे शिक्षण सरकारी मराठी शाळा (बेळगाव), मिशन स्कूल (बेळगाव) व फ्री चर्च स्कूल (मुंबई) या संस्थांमध्ये झाले. महादेवशास्त्री कोल्हटकर, गोविंद नारायण माडगावकर, दादाभाई नौरोजी अशी गुणी माणसे त्यांना शिक्षक म्हणून लाभली. विद्यार्थी असतानाच डॉक्टर विल्सन, जेम्स, मिचल, रॉबर्ट निस्बिट इत्यादी ख्रिस्ती धर्मप्रसारकांच्या सहवासात ते आले.

प्रभाकरातील ' शतपत्रे ' वाचून ब्राह्मण व वैदिक धर्म यांच्यावरील त्यांचा विश्वास डळमळला होता. खिस्ती धर्मग्रंथांचा अभ्यास व मिशनऱ्यांचा सहवास यांनी उरला-सुरलाही विश्वास नष्ट केला. बाबा काही काळ परमहंसमंडळींच्या सहवासात राहिले व शेवटी १८५४-मध्ये त्यांनी उघडपणे खिस्ती धर्माची दीक्षा घेतली. या धर्मपरि-वर्तनाचे सविस्तर विवेचन त्यांनी ' अरुणोदय ' या आपल्या आत्मचरित्रात केले आहे. बाबांनी मुंबई येथे फ्री-चर्च-मिशन शाळेत शिक्षकाचे व पुण्यास फ्री चर्चमध्ये ' पालका'चे काम केले. हा व्यवसाय सांभाळून ' ऐक्यवर्धक पत्रिका ' व ' सत्य-दीपिका ' ही नियतकालिकेही त्यांनी चालविली. २९ ऑगष्ट १९०६ रोजी त्यांचे देहावसान झाले.

बाबांचा खराखुरा व्यवसाय ग्रंथलेखन हाच होता. आपल्या आयुष्यात त्यांनी सुमारे शंभर लहानमोठी पुस्तके लिहिली, असे म्हणतात. आज त्यांपैकी फक्त ३८ पुस्तकांची नावे ज्ञात असून प्रत्यक्षात फारच थोडी उपलब्ध आहेत.[1]

---

१. बाबा पदमनजी याचे वाङ्मय —

( १ ) स्त्री-विद्याभ्यास ( १८५२ ) ( २ ) हिंदुलोकांच्या सणाविषयी निबंध ( १८५३ ) ( ३ ) व्यभिचारनिषेधक बोध ( १८५४ ) ( ४ ) कुटुंब-सुधारणा ( १८५५ ) ( ५ ) खिस्ती लोकांचे कर्तव्यसार ( १८५६ ) ( ६ ) यमुनापर्यटन ( १८५७ ) ( ७ ) शब्दरत्नावलि ( १८६० ) ( ८ ) निबंधमाला ( १८६० ) ( ९ ) आमचीं भक्तीसंबंधी पापें वाहणारा उपाध्या ( १८६२ ) ( १० ) इंग्रजी-मराठी-कोश ( १८६३ ) ( ११ ) मराठी-इंग्रजी कोश ( १८६३ ) ( १२ ) मुलाकरिता पुस्तक १, २, ३, ४ ( १८६१-६५ ) ( १३ ) महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास ( १८६६ ) ( १४ ) आत्मारामपंत आणि मृत्युशिपाई ( १८६७ ) ( १५ ) स्त्रीकंठभूषण ( १८६८ ) ( १६ ) कृष्ण आणि खिस्त यांची तुलना ( १८७१ ) ( १७ ) सटीक मराठी नवा करार ( १८७४ ) १८ ) साहित्य-शतक ( १८७६ ) ( १९ ) मुक्तिमार्गमीमांसा (१८७८) ( २० ) जगत्शेटाचा पुत्र नरनायक ( १८७९ ) ( २१ ) नूतन जन्म (१८७९) ( २२ ) अरुणोदय (१८७९) ( २३ ) मूर्तिपूजेवरील संवाद (१८८१) (२४) खिस्ती व हिंदु जीवित याची तुलना (१८८१) ( २५ ) हिंदुधर्माचे स्वरूप-भाग १, २ ( १८८३–८४ ) ( २६ ) हिन्दु आणि खिश्चन याच्या धर्म-पुस्तकांत वर्णिलेला स्वर्ग ( १८८४ ) ( २७ ) सहभोजनाचा ( खिस्त्याचा ) सहचर ( १८८९ ) ( २८ ) संस्कृत–मराठी–कोश ( १८९१ ) ( २९ ) वैदिक हिन्दुधर्म ( १८९२ ) ( ३० ) पवित्रशास्त्र विरुद्ध कांहीं ब्राह्मणीय भूगर्भशास्त्रविषयक व देवता-विषयक आक्षेपांचा विचार ( १८९२ ) ( ३१ ) नीसिमा ( १८९३ ) ( ३२ ) लाभालाभ ( १८९५ ) ( ३३ ) अनुभव--संग्रह, भाग १, २ ( १८९५--१९०४ ) ( ३४ ) हिंदुधर्म व खिस्तीधर्म यांची तुलना ( १९०३ ) ( ३५ ) बापाकडे जाणे ( १९०४ ) ( ३६ ) नेपोलियन बोनापार्ट याची शकुनवंती ( ३७ ) जातिभेदविवेचन ( ३८ ) बोधपर निबंध.

क्रमिक-पुस्तकांपासून कोशवाङ्मयापर्यन्त विविध वाङ्मय बाबा पदमनजींनी निर्माण केले. पण या विपुल व विविध वाङ्मयाचे उद्दिष्ट मात्र एकच आहे : खिस्ती धर्माचा प्रचार. त्यांचे निबंधसाहित्य याला अपवाद नाही. स्फुट व दीर्घ असे दोन्ही प्रकारचे निबंध बाबांनी लिहिले. 'निबंधमाला' हा स्फुट निबंधांचा संग्रह आहे. त्यांत 'अर्धी सोडून सगळीला धांवूं नको', 'बौद्ध धर्म', 'कुस्तीशास्त्र', 'खरे सुख', 'मित्रत्व', 'स्वदेश-प्रीति' इत्यादी विषयांवर स्फुट निबध आहेत. 'स्त्रीविद्याभ्यास', 'हिंदु लोकांच्या सणाविषयी निबंध', 'व्यभिचारनिषेधक बोध' हे त्यांचे महत्त्वाचे दीर्घ निबंध आहेत.

'स्त्रीविद्याभ्यास-निबंध' हा ५९ पृष्ठांचा ग्रंथ असून त्याला चार-पानी प्रस्तावना लेखकाने जोडली आहे. प्रस्तावनेत ग्रंथाचे स्वरूप स्पष्ट झाले आहे. लेखक म्हणतो :—

"हा निबंध वाचणाऱ्यास मनोरजक व्हावा व यात जो विषय आहे, त्याजविषयीं हिंदु लोकाचे मत कोणत्या प्रकारचे आहे, ते पुरतेपणी स्पष्ट करून दाखविता यावे, म्हणून येथें काल्पनिक संवादाची योजना केली आहे" ह्या संवादाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागात स्त्रियास विद्या न शिकवावी, म्हणून हिंदुलोक ज्या शंका आणितात, त्यांचे यथामति समाधान केले आहे, आणि दुसऱ्या भागात विद्येपासून स्त्रियांस कोणते लाभ आणि संतोष प्राप्त होतील, ते संक्षेपाने दाखविले आहेत. प्रस्तुत संवादात्मक निबंधात एतद्देशीयांवर शिवराळ टीका व खिस्ती धर्माची अनावर प्रशंसा असा प्रकार नाही. "एखादा टोपकर त्याजवळ आला तर त्याच्या पायासीं कुत्र्याप्रमाणे वळघतील. पण गरीब बिचारे जे त्याचे स्वदेशीय बंधुजन त्यांसीच ते असी वर्तणूक करितात, हे पाहून मला फार दुःख होते" अशी कठोर टीका लेखक क्वचितच करतो. एरव्ही, सर्वत्र स्त्रीचे दुःख व अज्ञान दूर करण्याकरिता त्याचे मन व्याकूळ झाल्यासारखेच दिसते. म्हणून तो म्हणतो – "सांप्रत आपल्या स्त्रियांस जी अज्ञानाची गाढ निद्रा लागली आहे, तींतून जागृत करण्यास विद्यारूप घंटा वाजविली पाहिजे. म्हणजे त्या सावध होतील." हिंदु मातेची व तिच्या पुत्राची अवस्था कशी असते, हे सांगताना बाबा म्हणतात –"आपल्या देशांत ज्येष्ठ पुत्राची आई म्हटली म्हणजे बहुतकरून अठरा किंवा वीस वर्षांच्या वयाची मुलगी असती. तिजजवळ ते मूल जनावरांच्या बचड्याप्रमाणे शरिरानें मात्र वाढते. ते कांहींसे जाणते म्हणजे दोन किंवा अडीच वर्षांचे झालें नाहीं तों त्यास हात उचलावयास, कोणास छिःथु करायास, लात मारायास, ती शिकविती. ही काय त्या लहान बाळकास सुशिक्षा म्हणावी!" स्त्री अज्ञानी आणि मुले असंस्कृत होण्याचे मुख्य कारण पुरुषवर्गाची वृत्ती. "त्यांस वाटते कीं, ईश्वराने स्त्री हे एक आपणास दोन पायांचे व बोलते जनावरच कष्ट मसालत करण्यास दिले आहे." बाबा पदमनजींच्या सदर ग्रंथात भारतीय कुटुंबव्यवस्थेचे सूक्ष्म निरीक्षण दिसून येते. ग्रंथ संवादात्मक व बाबा साध्या-

सोप्या भाषेकरिता विख्यात, असे असले तरी अधूनमधून आलंकारिक पल्लेदार वाक्यरचना दृष्टीस पडते –" शरीररूप पलंगावर आळसाचा बिछाना पसरून बुद्धि उशास घेऊन वर अभिमानाची पासोडी घेतली, आणि त्याजवर अविचाराचे पडदे पाडून आज दोन अडीच हजार वर्षें खुशाल गाढ निद्रेंत घोरत होतेत, तशांत तुमच्या बायकांनीं अज्ञानाचे पंखे घेऊन मूर्ख समजुतींचा तुम्हांवर वारा घातला; तेणेकरून तर अधिकच गाढ झोंप लागली. परंतु आतां ईश्वरकृपेने विद्याभेरीचा नाद तुमच्या कानीं पडून तुम्ही जागे झाले आहां. तर पुनः त्या दुष्ट निद्रेची आवड न धरितां पुर्ते सावध होऊन आपल्या भोवता काय होत आहे व आपण कोणत्या स्थितींत आहों हा विचार करून आपली सुधारणूक करून घ्या."

**'हिंदुलोकांच्या सणाविषयीं निबंध'**

'हिंदुलोकांच्या सणाविषयीं निबंध' हा एक पत्रात्मक निबंध आहे. प्रत्येक प्रकरण हे एक पत्र आहे असे कल्पून लेखकाने वाचकाला उद्देशून दहा पत्रे लिहिली आहेत. अव्वल इंग्रजीतील सामाजिक स्थितीसंबंधी बोलताना लेखक प्रस्तावनेत म्हणतो – " जिकडे तिकडे नासाडी व ओसाडी राज्य करिते." पहिल्या पत्रात इंग्रजी राज्य, भारतीयांची सामाजिक परिस्थिती व भारतीय सण यांविषयी सर्वसाधारण माहिती आहे – " ईश्वरकृपेने इंग्लिश सरकारचें राज्य या मुलखीं झाल्यामुळे जे अनेक लाभ झाले आहेत, त्यांपैकी डाक, तारायंत्र, आगगाडी, आगबोट यांच्या योगें आपणास कोठेही वर्तमान पाठविणे झाले, तरी अल्प काळांत व स्वल्प अर्थात निर्धोक जाऊन पोहचते." पण इंग्रजी राज्यकर्त्यांविषयी आदर असला तरी अंधश्रद्धा नाही. म्हणूनच लेखक म्हणू शकतो – " कोणत्याही देशांतील लोक अद्यापि सुधारणुकेच्या कळसास येऊन पोहचले नाहींत; कोणी कोणी तिच्या मध्यास व कोणी काहींसे वर असे आहेत. परंतु बहुतेक लोक खालच्या पायरीवरच आहेत. आपला देशही अद्याप खालींच आहे. परंतु आपल्या सभोवतालच्या देशापेक्षा म्हणजे इराण, अर्बस्थान, तुर्कस्थान, ब्रह्मदेश इत्यादिकांपेक्षां चांगल्या स्थितींत असून आपणास वर चढविणारे गुरू चांगले मिळाले आहेत." प्रस्तुत विषयावर निबंधनिर्मिती करण्याची आपणास इच्छा का झाली, याचे कारण सांगताना बाबा म्हणतात – " ह्या सणांपासून जे लाभ किंवा हानि होतात याविषयीं आजपर्यंत हिन्दु लोकांमध्ये कोणी शोध केला नाहीं. होळीविषयीं मात्र दोन उत्तम ग्रंथ झाले आहेत." 'चैत्रमास' या दुसऱ्या पत्रात हिंदू समाज किती देवभोळा व दैववादी आहे, याचे वर्णन करून त्यापासून काय नुकसान होते याची मीमांसा केली आहे. या संदर्भात ब्राह्मणवर्गावर टीका केली आहे, पण ती लोकहितवादींच्या टीकेइतकी कठोर नाही. हिंदुलोकांसारख्या देवभोळ्या व अज्ञानी लोकास हे जोशी फसवितात, यांत आश्चर्य नाही. कारण त्यांस मुळीच खगोलविद्येचे ज्ञान नाही. भट जे सांगतील ते त्यांस मान्य; 'भट सांगेल ती अमावस्या' ही म्हण तर सर्वांना ठाऊकच आहे." लोकहितवादींचा कठोरपणा नसला, तरी त्यांची

'विवेकनिष्ठा' मात्र बाबांमध्ये आहे. क्रमांक तीनच्या पत्रात निबंधकार सांगतो — "तर केवळ त्यांजवर (भटांवर) विश्वास ठेवूं नये. ईश्वराने आपणास बुद्धि दिली आहे तिच्या योगाने विचार करावा." परंतु केवळ हिंदुसमाजात विवेक कमी म्हणून "समुद्रानें शांत व्हावे व त्याने व्यापारी लोकांचीं तारवें बुडवूं नये, म्हणून त्यास सर्व हिंदु लोक एक एक नारळ देतात. परंतु समुद्र कां खवळलेला असतो व तो श्रावणी पौर्णिमा झाली म्हणजेच का शांत होऊं लागतो, या गोष्टीचे कारण कोणीं शोधून पाहत नाहीं" (पत्र ५). आठव्या पत्रात लेखकाने होळीतील अनाचारावर विशेष टीका केली आहे. "होळीच्या होळकरांच्या गुणांची तुलना करण्याजोगें नीच असे एकही जनावर ईश्वराने ह्या पृथ्वीवर उत्पन्न केले नसेल. घाणीमध्ये लोळणारीं डुकरे व किडे यांचीं शरीरें मात्र मलीन होतात. परंतु ह्या होळीच्या सणांत जे मिसळतात त्याचीं अंतःकरणेंही अतिशय अमंगळ होऊन जातात." बाबा पदमनजींची भूमिका प्रचारकाची असली, तरी ते सहसा खंडनमंडनाच्या भरीस पडत नाहीत. त्यामुळे येणारी कटुता त्यांना अप्रिय होती, हे त्याचे कारण असावे. परंतु नवव्या पत्रात त्यांनी उघडउघड 'हिंदुधर्मतत्व' या गंगाधरशास्त्री फडके यांच्या ग्रंथातील मतांचे खंडन केले आहे. मात्र वादाची पातळी ढळू दिली नाही. या ग्रंथाच्या शैलीत एक स्वाभाविक ओघ व गोडवा आहे. हिंदुलोक स्वधर्मातील अनेक बरेवाईट सण तर साजरे करतातच, पण तेवढ्याने समाधान न होऊन परधर्मातील सणही उत्साहाने स्वीकारितात या वस्तुस्थितीचे बाबांनी केलेले दिग्दर्शन पाहिले, म्हणजे त्याच्या लेखन-कुशलतेची व प्रचारचातुर्याची कल्पना येते. प्रस्तुत निबंधात अभिनव किंवा मौलिक विचारसरणी नाही; परंतु जे साधेच विचार लेखकाने मांडिले आहेत, त्यांना लेखकाच्या समंजस व विवेकी भूमिकेने वजन प्राप्त झाले आहे. त्याचे एक लहानसे उदाहरण म्हणजे 'राष्ट्रीय सणा'विषयीची लेखकाची सुजाण कल्पना — "या निबंधकर्त्यास असे वाटते कीं, ह्या देशात जेव्हां परोपकाराचीं, दयेचीं, देशकल्याणाचीं, विद्यावृद्धीचीं व सद्धर्मप्रसाराचीं मोठमोठाली कामें होऊं लागतील तेच पुढें सण होऊन बसतील." (पुरवणी) लेखकाची दृष्टी केवळ विघातक नाही, तर विधायकही आहे, हे यावरून दिसून येते.

## 'कुटुंबाची सुधारणा'

'कुटुंबाची सुधारणा' हा बाबा पदमनजी याचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ त्याच्या प्रस्तावनेत लेखक म्हणतो — "जो निबंध लिहावयास मीं हाती घेतला आहे, तो जरी मोठ्या उपयोगाचा आहे, तरी त्याची सर्व सामग्री मजकडून होणे, हे अशक्यच आहे. ह्या कामास पुष्कळ विद्या, विचार, बुद्धि व बहुश्रुतत्व, ह्यांचे प्रयोजन असून रचनाशक्तीची आवश्यकता आहे. ह्यांतून एकही माझ्या अंगीं पूर्ण नाहीं. असे असून हा निबंध लिहिण्यास मीं प्रारंभ केला आहे. तर तो सिद्धीस कसा जाईल असे कोणी विचारील तर त्यास माझें विनययुक्त उत्तर असें आहे कीं, केशराचीं शेतें

लावावयास पुष्कळ भांडवल पाहिजे, पण त्या शेताची जमीन नांगरावयास फारसें भांडवल नको. एक नांगर व बैलाची एक जोडी असली की पुरे, म्हणजे एकादा कुळंबी ती नांगरून तयार करितो. त्याप्रमाणें हा माझा निबंध लिहिण्याचा प्रयत्न आहे."

लेखकाने आपला निबंध पुढील दहा प्रकरणांत विभागला आहे : (१) कुटुंबाविषयीं साधारण विचार (२) हिंदु लोकांच्या स्त्रियांची सांप्रतची स्थिति (३) स्त्रीशिक्षण (४) विधवा स्त्रियांचा पुनर्विवाह न केल्यामुळे जे अनर्थ होतात व केल्यानें जे लाभ होतील, त्यांविषयी विचार (५) मुलांस विद्याभ्यास व सुशिक्षा (६) हिंदु लोकांतील लग्न करण्याच्या चालीविषयीं (लहानपणी मुलांचे लग्न करण्याची चाल) (८) कन्याविक्रयरूप अनर्थ (९) मुलांचे अंगावर दागिने घालण्यापासून अनर्थ (१०) हिंदु लोकांचे सण. या दहा प्रकरणांची रचना अशी आहे की, म्हटल्यास ते दहा स्वतंत्र निबंध आहेत व म्हटल्यास ती एका विषयावरील सलग प्रकरणे आहेत! पहिल्या प्रकरणात 'कुटुंब म्हणजे काय व त्याविषयीं निरनिराळ्या लोकांचीं मतें काय आहेत,' हे थोडक्यात सांगितले आहे. पूर्वीच्या लोकांचे 'संसार असार आहे' हे पारंपरिक मत चुकीचे आहे, असे समजून बाबा ऐहिक जीवनात गोडी घेऊन राहणे हे कसे योग्य आहे ते सांगतात. या इहलोकनिष्ठेमागे ख्रिस्तीधर्माचे तत्त्वज्ञान आहे. पण आपल्या लेखनाला बाबांनी प्रचाराचे हिणकस रूप येऊ दिले नाही. प्रस्तुत निबंध धर्मपरिवर्तनानंतर लिहिलेला आहे, हे लक्षात घेतले, म्हणजे लेखकाच्या संयमाचे कौतुक वाटते. पहिल्या प्रकरणापेक्षा दुसरे प्रकरण विस्तृत व महत्त्वाचे आहे. त्यात मध्यम, कनिष्ठ व उच्च या तिन्ही वर्गांत स्त्रीची अवस्था कशी असते याचे वास्तव वर्णन लेखकाने केले आहे. 'मुलांस विद्याभ्यास व सुशिक्षा' या प्रकरणात मुलांच्या शिक्षणाकडे कसे दुर्लक्ष होत आहे, मुलांनाही शिक्षणाची कशी हौस नाही, घरातही मुलांवर कसे कुसंस्कार होतात, याचे तपशीलवार वर्णन लेखकाने केले आहे. लग्नसमारंभातील बेसुमार खर्च, वाजंत्री, कलावंतिणीचे नृत्य इत्यादी वाईट चाली याचा निषेध 'हिंदू लोकांतील लग्न करण्याच्या चालीविषयीं' या प्रकरणात केला आहे. 'लहानपणीं मुलांचे लग्न करण्याची चाल' या प्रकरणात विद्याभ्यासात अडथळा, शरीरप्रकृतीत बिघाड इत्यादी बालविवाहाचे तोटे सांगितले आहेत. कोणत्याही परिस्थितीत मुलांच्या अंगावर दागिने घालू नये व दिवाळी आणि विशेषतः शिमगा हे हिंदूंचे दोन्ही मुख्य सण त्याज्य आहेत, असे विचार अनुक्रमे 'मुलांचे अंगावर दागिने घालण्यापासून अनर्थ' आणि 'हिंदु लोकांचे सण' या प्रकरणांत मांडिले आहेत. यांपैकी शेवटचा लेख म्हणजे याच विषयांवरील लेखकाच्या पुस्तकातील काही भाग होय! प्रस्तुत ग्रंथातील पुनर्विवाहविषयक प्रकरण विशेष महत्त्वाचे आहे. 'कन्याविक्रयरूप अनर्थ' या प्रकरणात लेखकाने अव्वल इंग्रजीतील एका हीन चालीचे दिग्दर्शन केले आहे. आपला ग्रंथ एकसुरी व कंटाळवाणा होऊ नये, तसेच आपले विचार वाचकाच्या मनावर नीट

ठसावे, या हेतूने लेखकाने काही प्रकरणांत संवादांची योजना केली आहे.

प्रस्तुत ग्रंथाचे नाव ' कुटुंबाची सुधारणा ' असे असले, तरी त्याचे स्वरूप खरोखर ' समाजाची सुधारणा ' या शीर्षकाला शोभेल असे आहे. सदर निबंधावर जागोजाग लोकहितवादींच्या विचारांची व शैलीची छाया पडलेली दिसते. ' शतपत्रां'तील अनेक अवतरणे लेखकाने घेतली आहेत. पुनर्विवाह, संस्कृत विद्या, ब्राह्मण इत्यादी विषयांवरील बाबांचे विचार म्हणजे लोकहितवादींच्या विचारांची प्रतिकृती आहे. संयम व मार्दव या गुणांसाठी बाबांची लेखणी विख्यात आहे. पण या निबंधात, लोकहितवादींच्या अनुकरणाने की काय, लेखकाने ' पाषाणहृदय हिंदु ', ' चांडाल ब्राह्मण ' अशी भाषा अनेक स्थळी वापरली आहे ! बाबा पदमनजी व लोकहितवादी यांच्या लेखनात किती साम्य आहे, हे पाहण्यासाठी ' मुलांस विद्याभ्यास व सुशिक्षा ' हा लेख वाचण्यासारखा आहे.

' व्यभिचारनिषेधक बोध ' या १०५ पृष्ठांच्या ग्रंथात लेखकाने व्यभिचाराचे प्रकार, मुंबईतील त्याची अधिकृत स्थाने, व्यभिचाराची कारणे व त्याचा परिणाम इत्यादी गोष्टींचा विस्ताराने विचार केला आहे. इतर ग्रंथकारांशी स्वतःची तुलना करिताना बाबा पदमनजी प्रस्तावनेत म्हणतात—" त्यांच्या ग्रंथांतील भाषेची प्रौढी, पदरचनेची शैली, अन्वयाची एकता, विचाराचे गांभीर्य व शब्दालंकार यांतून एकहि भूषण यास नाहीं म्हणून याचा अनंगिकार त्यांनीं करूं नये. एका गोष्टीवरून तरी याचें ग्रहण करावें. ती गोष्ट ही कीं जशी त्या ग्रंथकर्त्यांनी लोकांचे कल्याण करण्याची वास्तविक इच्छा धरून श्रम केले, तसेच मी स्वजनहित कल्पून हा प्रयत्न केला आहे. तो सर्व सुज्ञांनीं मान्य करावा."

नेहमीच्या संयत वृत्तीने लेखकाने मुंबईकरावर टीका केली आहे : " शेकडो कळावंतिणी त्याखेरीज कसबिणी गोवें, पुणें, वाडी, बडोदें इत्यादि प्रांतांतून येऊन या मुंबईच्या लोकांचे द्रव्यहरण करितात. अशा या बिचाऱ्या मुंबईकरांस जर एखादे वर्तमानपत्र अथवा पुस्तक घेण्यास सांगितलें, तर त्यांच्या नाकीं नव येतील." प्रस्तुत निबंधात खिस्तीधर्माचा प्रत्यक्ष प्रचार कोठेही नाही.

बाबा पदमनजी यांनी धार्मिक, कौटुंबिक व सामाजिक विषयांवर निबंधलेखन केले. लोकहितवादींप्रमाणे बाबांच्या लेखनातही भावनिक तळमळ व वैचारिक तपशील याचे दर्शन घडते. परंतु बाबांच्या लेखनात लोकहितवादींच्या लेखनातील वैगुण्ये आढळत नाहीत. खरे म्हटले तर त्यांची भूमिका प्रचारकाची. त्यांच्या लेखनात अशी वैगुण्ये आढळली असती तर त्यात आश्चर्य नव्हते. परंतु बाबांचे व्यक्तित्व समतोल असल्याने त्यांच्या लेखनात बुद्धी व भावना यांचा यथोचित मिलाफ आढळतो. लोकहितवादींच्या तुलनेने त्यांची शैलीही आकर्षक आहे. किंबहुना, भाषेची प्रौढी, पदरचनेची शैली, अन्वयाची एकता, विचाराचे गांभीर्य व शब्दालंकार यांची कलात्मक जाणीव बाबांशिवाय अन्य अव्वल इंग्रजीतील निबंधकारांत अपवादानेच

आढळते. मात्र लोकहितवादींची वैचारिक सखोलता बाबांच्या निबंधांत नाही. खिस्तनिष्ठेमुळे भारताचे पारतंत्र्य, आर्थिक शोषण या घटनांचे त्यांना आकलनच झाले नाही. तरीही खिस्ती लेखकांतील व अव्वल इंग्रजीतील एक संयमित विचार-विकारांचे आणि आकर्षक शैलीचे निबंधकार म्हणून त्यांचे स्थान अढळ आहे.

## इंग्रजी वळणाचे निबंधकार

### गोविंद् नारायण माडगावकर ( शेणवी )

शरीरप्रकृती बेताची असूनही माडगावकरांनी[1] भरपूर लेखन केले. 'अचाट खाणें मसणात जाणें', 'अति सर्वत्र वर्जयेत्', 'अन्न', 'कापूस', 'कावळ्यांचा घरटा व मधाचे पोळे', 'द्रव्येण सर्वे वशाः', 'बळी तो कान पिळी', 'भरत-खंडांतील कारागीर', 'रेशमी रुमाल' इत्यादी त्यांचे निबंध ज्ञानप्रसारकात प्रकाशित झाले.

माडगावकरांच्या ग्रंथांपैकी पाचसहा ग्रंथच निबंधाच्या धाटणीचे आहेत. त्यांत 'शुचिर्भूतपणा' हे ४९ पानाचे, परंतु अगदीच लहान आकाराचे चिमुकले पुस्तक आहे. शरीर, मन, घर, वस्त्रे इत्यादी स्वच्छ कशी राखावी, यासंबंधी बाळबोध माहिती या निबंधात आहे. 'ऋणनिषेधक बोध' या ७४-पानी पुस्तकात १० प्रकरणांमध्ये कर्जाचे स्वरूप व परिणाम विशद केले आहेत. 'कर्जा'च्या निमित्ताने लेखकाने आपल्या समाजातील अनेक चालीरीतींतील वैगुण्ये स्पष्ट केली आहेत. 'सार्थक ऋण' व 'निरर्थक ऋण' असे निबंधकाराने कर्जाचे दोन प्रकार केले आहेत. लग्न, आजारपण यांसाठी काढलेले कर्ज ते सार्थक ऋण व केवळ चैनीसाठी, डामडौलासाठी केलेले कर्ज ते निरर्थक ऋण अशी माडगावकराची ऋणविषयक व्याख्या आहे. " जसें

---

१. जन्म गोवे प्रांतात पेरी या गावी १८१५-मध्ये; मराठी व इंग्रजी शिक्षण मुंबई येथे 'फ्री जनरल असेंब्ली' या शाळेत; वडिलांच्या मृत्यूमुळे शिक्षण अर्धवट सोडून त्याच शाळेत शिक्षक; उत्तम शिक्षक म्हणून लौकिक; दादोबा पांडुरंग, डॉ. भाऊ दाजी, वि. ना मंडलीक इ. विद्वान स्वतःला गोविंदजींचे शिष्य म्हणवीत; १५ मार्च १८६५ रोजी देहावसान.

गो ना. माडगावकर यांचे ग्रंथ —

( १ ) शुचर्भूतपणा ( १८४९ ), ( २ ) कुटुंबसुधारणा, ( ३ ) ऋणनिषेधक बोध ( १८५० ), ( ४ ) हिंदु लोकांच्या रीति सुधारण्याविषयीं बोध ( १८५१ ), ( ५ ) सत्यनिरूपण ( १८५२ ), ( ६ ) सृष्टींतील चमत्कार ( १८५३ ), ( ७ ) दारू-पासून अनर्थ ( १८५५ ), ( ८ ) उद्‌भिजन्य पदार्थ ( १८५६ ), ( ९ ) नीतिसंवाद ( १८५७ ), ( १० ) वृक्षवर्णन ( १८५७ ), ( ११ ) लोखंडी सडकांचे चमत्कार ( १८५८ ), ( १२ ) व्यवहारोपयोगी नाटक ( १८५९ ), ( १३ ) सुलेखनविद्या ( १८६० ), ( १४ ) मुंबईचे वर्णन ( १८६३ ), ( १५ ) पत्रावळी व द्रोण, ( १६ ) भोजनबंधु पानतंबाखू, ( १७ ) यत्नेन किं दुर्लभम्.

अन्नाकडून शरीररक्षण होतें, तसेंच उद्योगानें शरीर बळकट राहते, " असा उपदेशही लेखकाने या निबंधात केला आहे. निबंध रंजक व सुबोध करण्याकरिता अधूनमधून डेनहाम्, सोलन, क्लेसिपस इत्यादी व्यक्तींसंबंधीच्या कथाही लेखकाने योजिल्या अहेत.

न्यायप्रकरणात व लोकांच्या कल्याणवृद्धीत सत्यतेचे रक्षण करण्याने किती लाभ होतात, याविषयी 'सत्यनिरूपण' हा निबंध आहे. प्रस्तुत ग्रंथ नऊ प्रकरणांचा व ८९ पृष्ठांचा आहे. प्रस्तावनेत निबंधकाराने इंग्रजी राजवटीचे कौतुक केले आहे. "या भरतखंडाच्या राज्याचा उपभोग मराठे, मुसलमान आदिकरून बहुतेकांनीं घेतला; परंतु कोणत्याच सरकाराने लोकांच्या सुधारणुकीकडे व विद्यावृद्धीकडे व रयतेच्या कल्याणाकढे तादृश लक्ष दिलेच नाहीं आतां ईश्वरकृपेने हे राज्य इंग्रेज सरकारच्या हस्तगत झाल्यापासून सर्वत्र विद्येचा प्रसार होऊन व्यापाराची वृद्धि झाली; आणि लोकांमध्ये स्वतंत्रता व सुखाचीं साधनें वाढून अज्ञानाचाहि लोप होत चालला आहे." विषयाचे मुद्देसूद विवेचन व शुद्ध, सरळ भाषा ही गोविंद नारायण यांच्या निबंधलेखनाची वैशिष्ट्ये होत. मराठी भाषेत लेखन करण्याची स्फूर्ती आपणांस कशी झाली, याचे सविस्तर वर्णन लेखकाने आपल्या 'उद्भिज्जन्य पदार्थ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केले आहे : "इंग्रजी शिकायास लागल्यापासून मला तर महाराष्ट्र भाषेचा तिरस्कार येत असे. अशीच बहुतेक लोकांची स्थिती झाली होती. एकादा प्राकृत ग्रंथ वाचावा किंवा हातांत धरावा म्हटले म्हणजे वाईट वाटे. जेव्हां मी फ्रीचर्च विद्यालयांत गेलो तेव्हां डाक्तर विल्सन व मयत रेवरेड राबर्ट निसबिट यांची मराठी भाषेवर श्रद्धा आणि एतद्देशीय मुलांमध्ये ती भाषा शुद्ध येण्याविषयीची उत्कंठा व श्रम पाहून मला तिचा थोडा अभ्यास करण्याचे आवश्यक पडलें. पुढें सन १८४०-मध्ये दैवयोगानें अशी गोष्ट झाली कीं, डाक्तर लीथ हे कधी कधीं या शाळेंत येत असत. त्याणीं विद्यार्थ्यांस स्वभाषा चांगली आली असतां परभाषा शिकण्यास फार सुलभ पडते, असे मनांत आणून मोठ्या परोपकार बुद्धीने महाराष्ट्र भाषेंत बसल्या बैठकीस कोणाची मदत न घेतां व दुसरे ग्रंथ अवलोकन न करतां, त्याच वेळीं योजलेल्या विषयावर जो निबंध लिहील, त्यास शंभर रुपये इनाम देऊं असें दर्शविलें. ह्या त्यांच्या स्तुत्य कृत्यावरून शाळेंतील बहुतेक शिक्षकाची व मुलांचीं मनें स्वभाषेकडे वळलीं. त्या वेळीं मलाहि त्या गोष्टीचा निदिध्यास लागल्यावरून मींहि तिजवर बरेच परिश्रम केले. तेव्हापासून मराठी भाषेची गोडी लागून, जें कांहीं अल्पस्वल्प सध्यां त्या भाषेचें ज्ञान मला झालें आहे त्याचा मी सदरीं सांगितलेल्या तीनहि गृहस्थांचा ऋणी आहे." [1]

परकीयांकडून स्फूर्ती घेऊनही गोविंद नारायण यांची भाषा भेडगुजरी झाली नाही. उदाहरणार्थ — "अरेरे! ह्याप्रमाणे शपथ वाहून जो मनुष्य लोभांध होऊन

१. उद्भिज्जन्य पदार्थ, प्रस्तावना, पृ. १४–१५.

खोटी साक्ष देतों, त्याच्या मूर्खपणास पार नाहीं, असे समजावें. आपण बोलतों काय आणि करतों काय याचें ज्याला भान नाही, तो मनुष्य केवळ पशु असें समजावें. अरे खोटी साक्ष देणाऱ्या! पाहा तूं किती अनर्थ करतोस तो. जर तुझी साक्ष एकाद्या खुनाच्या मुकदम्यांत असली, खून करणारा तुझा आप्त किंवा तुझी मूठ भरणारा असला, तर तुझ्या साक्षीवरून कदाचित् एखादा गरीब या जगांतून उठला जाईल आणि त्याचीं बायकोमुलें भिकेस लागतील. मग तीं जसजसीं दुःख पावतील तसतसीं तुला तळतळाट देतील."[1] माडगावकरांची भाषा समाधानकारक असली, तरी त्यांच्या निबंधांत उत्कट भावना किंवा मौलिक विचार चुकूनही आढळत नाही. त्यांचे निबंधवाङ्मय खरोखरच 'बालोपयोगी व शालोपयोगी' झाले आहे.

**विश्वनाथ नारायण मंडलीक**

विश्वनाथ नारायण[2] यांचे लेखन प्रामुख्याने भाषांतरवजा, संकलनात्मक व उपदेशपर आहे. " सदोष राज्यपद्धति व अज्ञानादि तम यांतून आमचा उद्धार

१. सत्यनिरूपण, पृ. ६३.

२. विश्वनाथ नारायण मंडलीक यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील मुरूड या गावी ८ मार्च १८३३ रोजी झाला. यांचे मूळ आडनाव परांजपे, विश्वनाथ नारायण यांचे इंग्रजी शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन विद्यालयात झाले मुख्य हिशेबनीस, व्हिजिटर, मुन्सफ इत्यादी सरकारी नोकऱ्यांच्या निमित्ताने त्यांना भूज, कराची या दूरदूरच्या ठिकाणी जावे लागले. १२ वर्षे सरकारी नोकरी केल्यावर त्यांनी वकिलीची परीक्षा दिली व सरकारी नोकरी सोडून वकिली सुरू केली. ९ मे १८८९ रोजी त्यांचे देहावसान झाले. निबंध, इतिहास, व्याकरण इत्यादी विषयांवर त्यांनी लहानमोठी ग्रंथरचना केली आहे. ती अशी —

(१) सवयी व अभ्यास (१८५७), (२) हिंदु लोकांच्या मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार (१८६२), (३) द्यूतवर्जकसंवाद, (४) हिंदुस्थानचा इतिहास भाग ३ (१८६१–६२), (५) यंगकृत बीजगणिताचें सिंधींत भाषांतर, (६) तुकारामाची गाथा, (७) दत्तक विरुद्ध खालसा—लघुग्रंथ (इंग्रजी), (८) कोंकणांतील वतनदार खोतांचा इतिहास, (९) हिंदुधर्मशास्त्र—व्यवहारखंड (१८६७), (१०) व्यवहारमयूख व याज्ञवल्क्य (इंग्रजी), (११) मुंबईच्या जुन्या लिटररी सोसायटीची कामगिरी, भाग ३, (१२) सिंधी भाषेचे लघुव्याकरण, (१३) लक्ष्मीशास्त्र, (१४) दिवाणी कायद्याची चूर्णिका, (१५) मुंबई इलाख्याचा इतिहास व भूगोल, (१६) मराठी कोश, (१७) नाना फडणविसाचें चरित्र.

यांशिवाय मराठी ज्ञानप्रसारक व स्वतः मंडलिकांनी सुरू केलेले नेटिव ओपिनियन या नियतकालिकात त्यांचे काही निबंधही प्रकाशित झाले: (१) व्यवहारशास्त्राचे उद्देश आणि लाभ, (२) जातिभेदावर निबंध, (३) स्त्रीशिक्षण, (४) विधवाविवाह, (५) शिमगा, (६) उम्मरकोट येथील सोद राजे, (७) मुरूडचा इतिहास, (८) पश्चिम हिंदुस्थानांतील नागपूजा, (९) महाबळेश्वर येथील कृष्णानदीचा उगम, (१०) शालिवाहन व त्याची सप्तशती, (११) संगमेश्वर-माहात्म्य, इत्यादी.

करण्यास्तव परमेश्वरानेच इंग्रजी अंमल आमच्यावर चालू केला आहे," अशी त्यांची भावना असल्यामुळे ते स्वाभाविकही होते. ' सवयी आणि अभ्यास ' या ७१ पृष्ठांच्या ग्रंथात सवयीवर एक व अभ्यासावर एक असे दोन निबंध संगृहीत केले आहेत. पहिला निबंध २५ सेप्टेंबर १८५६ रोजी व दुसरा निबंध ९ ऑक्टोबर १८५७ रोजी ज्ञानप्रसारक सभेत वाचण्यात आला होता. हे दोन्ही निबंध जॉन टॉड याच्या ' स्टयूडंट्स गाइड ' या पुस्तकाच्या आधारे लिहिले आहेत.

सवयींचे बंधन फार चिवट असल्याने प्रयत्नाने चांगल्या सवयी अंगी बाणवाव्या, असे निबंधकार म्हणतो. उदाहरणार्थ ( १ ) प्रत्येक दिवशीं काय करायचे त्याचा पूर्वी संकेत ठेवणे ( २ ) सतत श्रम ( ३ ) मनोनिग्रह ( ४ ) कालनियमाची सवय ( ५ ) प्रातःकाळीं लवकर उठणे ( ६ ) जो पुरुष भेटेल त्यापासून कांहीं तरी उपदेश स्वीकारणे ( ७ ) आपल्या वृत्तींविषयीं व कृतींविषयीं दृढ विचार ( ८ ) शरीर व पोषाख साधा, स्वच्छ व नीट ठेवणें ( ९ ) जे काय कराल ते चांगलें करीत जा ( १० ) आपल्या मनोवृत्ती स्वाधीन ठेवण्याविषयीं यत्न ( ११ ) तारतम्य विचारशक्ती दृढ केली पाहिजे ( १२ ) आईबाप-मित्र आणि सोबती यांशीं योग्य रीतीने वागण्याची सवय ठेवा. ही निबधातील उपशीर्षके होत. त्यांवरून निबंधकाराला कोणत्या सवयी अपेक्षित आहेत, याची कल्पना येते. आपले मुद्दे स्पष्ट करण्याकरिता लेखकाने युरोपातील महापुरुषांच्या जीवनातील वेगवेगळ्या आठवणींचा उपयोग केला आहे. निबंधात ' आहारनिद्राभयमैथुनं च... ', ' स्वयमपि लिखितं... ',' संगतिः सङ्गदोषेण... ' इत्यादी संस्कृत अवतरणे आणि ' दिवस गेला रेटारेटी मग दिव्यांत कापूस वाटी ', ' व्याप्तीवाचून प्राप्ती नाही ' इत्यादी म्हणी यांचा यथोचित वापर केला आहे.

'अभ्यासाविषयीं' या दुसऱ्या निबंधात (१) नित्याभ्यासाचे कालमान ( २ ) अभ्यासाचे वेळीं शरीराची व्यवस्था नीट ठेवा ( ३ ) अभ्यास करणे तो पुरा करावा ( ४ ) शुष्क व कठीण अभ्यासाची सवय ठेवा ( ५ ) आपल्यास अभ्यास चांगला होण्यास आणि त्याची उपस्थिती राहण्यास जसा मनोनिग्रह पाहिजे, तसे पुन्हा अवलोकन करण्याची सवय ठेवली पाहिजे – या पाच मुद्द्यांचा विचार केला आहे. पहिल्या निबंधाप्रमाणे येथेही अवतरणांचा वापर लेखकाने केला आहे. समर्पक उपमा वा दृष्टांत योजून आपला विषय स्पष्ट करण्याचे कौशल्य निबंधकारात दिसते : "जसा एकाद्या जाड काचेपासून विस्तव पाडायचा असला, तर त्या काचेवर सूर्याचे किरण पाडून त्या किरणांचे सर्व तेज एका फोकसांत आपण आणितों, तसे आपलें सर्व मन त्या विषयांत गुंतविले पाहिजे."

'हिंदुस्थानचा मध्यंतरीय अवस्थेविषयीं विचार' याही निबंधात निबंधकाराने असाच एक सुंदर दृष्टांत योजिला आहे: "समुद्रास भरती आली, म्हणजे पाणी भरून पुनः ओहोटते; परंतु ते ओहटत जातां जातां त्याची मागे जाण्याची सीमा होऊन पुनः ते वाढू लागते त्याचप्रमाणें कोणत्याहि लोकांचे उत्कर्षापकर्ष होतात असे दिसते.

अलीकडे दोन हजार वर्षेपर्यंत या देशाचा सर्व प्रकारे अपकर्ष होतां होतां पाणी संथ होऊन भरती लागण्याचा समय आला आहे." लेखकाने म्हटल्याप्रमाणे "सिकन्दर बादशाहाचा पूर्वीचे, त्याचा वेळचे आणि विक्रमापर्यंतचे लोक व चाळीसपन्नास वर्षो-अलीकडील लोक यांचा स्थितींतील कांहीं गोष्टींमधील अन्तर दाखविणे, हा या निबंधाचा उद्देश आहे."

गो. ना. माडगावकरांप्रमाणेच वि. ना. मंडलीक याची भूमिका उपदेशकाची आहे. माडगावकरांइतकी नाही, तरी मंडलिक यांची विवेचनपद्धती समाधानकारक आहे. मंडलिकांची भाषा मात्र आकर्षक किंवा फारशी शुद्ध नाही. वक्तशीरपणा, उद्योगप्रियता इत्यादी वैयक्तिक गुणांचा त्यांनी प्रामुख्याने विचार केला आहे. त्यांच्या उपदेशाचे केंद्रही हेच आहे.

## जुन्या वळणाचे निबंधकार

### विष्णुबुवा ब्रह्मचारी

विष्णुबुवा ब्रह्मचारी[1] यांचे मूळ नाव विष्णु भिकाजी गोखले. घरच्या गरिबीमुळे वयाच्या नवव्या वर्षापासूनच त्यांना नोकरी करावी लागली. सुरुवातीला तालुका-कचेरीत, नंतर भुसाऱ्याच्या दुकानात आणि शेवटी कस्टम खात्यात याप्रमाणे चौदा वर्षे कुलाबा, रत्नागिरी आणि ठाणे या जिल्ह्यांत त्यांना हिंडावे लागले. वयाच्या तेविसाव्या वर्षी घरदार सोडून ते आत्मसाक्षात्कारासाठी बाहेर पडले. सप्तशृंगीच्या डोंगरावर त्यांना आत्मज्ञान झाले. 'पाखाडमतांचे खंडन करून तूं वैदिक धर्माची पुन्हा स्थापना कर,' असा ईश्वराचा त्यांना आदेश मिळाला. तदनुसार त्यांनी पंढरपूर येथे आपल्या प्रचारकार्यास प्रारंभ केला. येथेच बावांनी 'भावार्थ-रामायण' या एकनाथांच्या ग्रंथाची पारायणे केली. विवेकसिंधू, ज्ञानदेवी, एकनाथी भागवत, दासबोध इत्यादी ग्रंथांचाही त्यांचा अभ्यास होता. संस्कृत व इंग्रजी या दोन्ही शिष्ट भाषा त्यांना फारशा अवगत नव्हत्या. परंतु त्यामुळे त्यांचे काहीच अडले नाही. अंतःस्फूर्तीच्या बळावर त्यांनी ग्रंथनिर्मिती केली. आपल्या परीने जीवनाचे एक सर्वांगीण आणि अनेक बाबतींत पुरोगामी असे तत्त्वज्ञान त्यांनी आपल्या गद्यपद्य ग्रंथांतून मांडिले. मात्र आपल्या तत्त्वज्ञानाचे मूळ वेदांत आहे, असा त्यांचा आग्रह होता. या वेदोक्त धर्माला विरोध करणारा धर्म म्हणून त्यांनी ख्रिस्तीधर्मप्रसाराला भाषणे व वादविवाद

---

१. जन्म – शिरवली, कुलाबा जिल्हा येथे, १८२५-मध्ये; मृत्यू — १८७१.
ग्रंथ – १. भावार्थसिंधु ( १८५६ ), २. वेदोक्तधर्मप्रकाश ( १८५९ ), ३. सुखदायक राज्यप्रकरणी निबंध ( १८६७ ), ४. चतुःश्लोकी भागवत याचा अर्थ ( १८६७ ), ५. सहजस्थितीचा निबंध ( १८६८ ), ६. वेदोक्त धर्माचा विचार व ख्रिस्ती मतखंडन ( १८७४ ), ७. सेतुबंधनी टीका ( १८९० ). यांशिवाय 'समुद्र-किनारींचा वादविवाद' ( १८७२ ) हा जी. बोईन यांनी संपादित केलेला ग्रंथही बुवांच्या नावावर समाविष्ट करिता येईल.

यांच्या साहाय्याने विरोध केला. सांगली, मिरज, वाई, सातारा, पुणे, नगर इत्यादी गावी त्यांची प्रवचने झाली. मुंबईला तर सर्वधर्मीयांना मुक्तद्वार असलेले वादविवाद त्यांनी घडवून आणिले. हे वादसत्र मुंबईला १८५७-पासून दर गुरुवारी समुद्रकिनारी होत असे. वाद अर्थात खिस्ती मिशनरी विरुद्ध बावा असा असे. बावांच्या या प्रयत्नांमुळे बरीच धार्मिक जागृती घडून आली असावी. मद्रास, कलकत्ता, काशी इत्यादी दूरच्या शहरींही बावा जाऊन आले होते. विष्णुबुवांचे एक वैशिष्ट्य हे की, ते 'बोले तैसा चाले' या कोटीतील पुरुष होते. त्यांच्या आचारविचारांत पूर्ण सुसंगती होती. स्वयंभू प्रज्ञा, तीव्र स्मरणशक्ती, असाधारण वक्तृत्व व वादकौशल्य हे त्यांचे विशेष होत. त्यांच्या अफाट महत्त्वाकांक्षेमुळे लोक त्यांना 'विक्षिप्त' म्हणत.

'वेदोक्तधर्मप्रकाश' हा एक सातशेहून अधिक पृष्ठांचा ग्रंथराज आहे. त्यातील २५ प्रकरणांची नुसती नावे पाहिल्यास ग्रंथगत विषयाचे क्षेत्र किती विस्तृत आहे, याची कल्पना येते: (१) वेदोक्तधर्माचा विचार (२) वेदोक्तधर्माच्या आज्ञा (३) न्याय (४) निराकार देवाविषयी (५) नीतिपर पुराणोक्त गोष्टी (६) वेदातील सृष्टीचे नियम व त्यांची प्रमाणे (७) श्रीकृष्णावताराविषयी कथा (८) वेदोक्तधर्माचा थोरपणा (९) ज्योतिषशास्त्रातील नावे व सिद्धांत (१०) धर्मसंबंधी लोकांच्या प्रश्नांची उत्तरे (११) वेदोक्तधर्माची मार्मिक प्रश्नोत्तरे (१२) आत्मज्ञान होण्याविषयीच्या कहाण्या (१३) हठयोग व राजयोग (१४) अनेक मतांच्या लोकांस सुबोध (१५) राजनीति (१६) बापाचा आणि मुलाचा संवाद (१७) आईचा आणि मुलीचा संवाद (१८) विचारप्रदर्शन (१९) म्लेच्छ मते (२०) मंत्रशास्त्र (२१) सत्याचा वाद (२२) नास्तिकांना जिंकण्याचे वाद (२३) प्रार्थना (२४) सुभाषित (२५) हकीकत. पंधराव्या प्रकरणातील कलमावर 'राजनीती'वरून विष्णुबुवाच्या विचारविश्वाची कल्पना येते ती अशी —

१ राज्यकारभार चालविणारे कामगार वंशपरंपरा नेमू नयेत.

२. राजानें सर्व मनुष्यांस मजूरी व अन्नवस्त्र मिळावे, अशासाठीं देशोदेशीं जगाला सुखोपयोगी असे नवीन नवीन कारखाने काढावे व जुने कारखाने सुधारावे व मंडळ्या नेमून त्या कारखान्यांचा बंदोबस्त राखीत जावा. व हरएक मजूराला किंवा कामगाराला दररोज, किवा दर महिन्याचे महिन्यास ठरलेला मजुरीचा पैका देत जावा.

३. 'वृद्धानें लहान मुलीबरोबर लग्न केले असतां, ती मुलगी परत घेऊन, तिचे लग्न तिच्या वयाच्या व गुणाच्या नियमाने जो तिच्या शरीरधर्माप्रमाणे व चार वर्णाप्रमाणें पुरुष असेल, त्याजबरोबर लावून द्यावे आणि ज्या वृद्धानें असे काम केलें असेल त्याला त्याच्या गुन्ह्याप्रमाणे शासन करावे, व हरएक जमातीचा म्हणजे जातीचा पुरुष आहे, आणि हरएक जातीची विधवा स्त्री त्यांजबरोबर लागू झाली आहे असे आढळलें तर, त्या स्त्रीचा आणि त्या पुरुषाचा विवाह करावा.

४. देवळांत किंवा तीर्थक्षेत्रांत पुजारी किंवा कारभारी इत्यादि वतनदार ठेवूं नये, कारण तसें केल्यांत द्रव्यलोभानें भक्तीचा नाश होतो.

५. श्रीमंत लोकांची, अथवा भिकाऱ्यांचीं इत्यादि पोरे गाईंना किंवा बोकड-शेळ्यांना, किंवा कुत्र्याच्या पिलांना, अथवा हरएक घरच्या अथवा लोकांच्या अथवा बिनवारशी प्राण्यांना त्रास देतात, यास्तव तसल्या कर्मांच्या पोरांना शरीरदंड सरकारांतून करावा. मग तीं पोरे नीच अथवा उंच पदवीच्या मनुष्यांचीं असली तरी चिंता नाहीं, कारण त्यांना शिक्षा असावीच असावी.

६. हरएक तान्हेल्या प्राण्याला पाणी पिण्याविषयीं हरएक ठिकाणी जो कोणी अडथळा करील, त्याला अवश्य शासन करावे.

७. राजानें प्रत्येक मनुष्याचा जन्मदिवस व त्याचे नांव, जन्मल्या ठिकाणाचे नांवें व त्याच्या कुळाचे नांव व जातीचे नांव व त्याचा धंदा व हुद्दा इत्यादिकांचीं नांवे व नांवनिशीवार खाती गावोगांवीं वहीवर घालून ठेवावीं आणि प्रत्येक मनुष्य कोणत्या कारणानें व कोणत्या गांवी व काय हेतूस्तव व कधीं गेला, हा तपशील लिहीत जावा.

८. शेतकीच्या वगैरे जमिनीवर किंवा खुराकी सामानावर किंवा लाकडावर किंवा गवतावर, पानांवर किंवा प्यावयाचे पाण्यावर इत्यादिकांवर राजाचा कर मुळींच नसावा; कारण ते पदार्थ ईश्वरी देणगीचे आहेत. परंतु मनुष्यमात्राचे रक्षणार्थ प्रत्येक मनुष्यापासून दरवर्षास एक रुपाया कर राजानें घ्यावा.

९. हिंदुस्थान देशांतील राजकीय लेखन किंवा व्यावहारिक लेखन, बालबोध जी देवनागरी पूर्ण लिपी तिच्यांत असावे, अथवा...मोडी लिपी तिच्यांत असावें आणि युधिष्ठिर, शालिवाहन विक्रम हे शक व चैत्र, वैशाख इत्यादि महिने...याप्रमाणे पुस्तकांत लावीत जावे.

१०. ज्या काळांत नीतिमान दयाळू व अल्पसंतोषी अशा स्त्रिया असतील त्या काळांत मात्र एक पती मेला असतां दुसरा पती याप्रमाणें सर्व आयुष्याच्या काळांत विवाह करण्याची मोकळीक द्यावी आणि ज्या काळांत एक पती प्रिय नाहीं म्हणून ...दुसरा पती करावा अशी स्त्रियांची चाल दिसेल त्या काळांत विद्ध्योनि झाल्यावर...दुसरा पती करूं नये असा नियम चालवावा आणि तसल्या काळांत स्वयंवरांत स्वपरेच्छेनें पती वरावा असा नियम चालवावा याप्रमाणें विवाहाचे नियम कालपरत्वें चालवावे, की जेणेंकरून मनुष्याचें प्राणरक्षण व्हावे आणि सुखहि बुडूं नये व धर्महि बुडूं नये.

११. न्यायाधिशानें अन्यायी ब्राह्मण आणि अन्यायी महार या दोघांस सारख्या मानानें उभे करून अथवा बसवून न्याय करावा. परंतु महार दरवाज्या-बाहेर आणि ब्राह्मण आंत असा पक्षपात करूं नये.

१२. राजाच्या पोटीं उत्पन्न झाला तोच राजा आहे असे नाहीं, जी लहान

हुद्द्यापासून मोठ्या हुद्द्यापर्यंत कामें करून योग्यतेस चढला तोच राजा असावा, मग तो प्रज्येंतील कोणी का माणूस असेना.

१३. युद्ध करणारी सेना अथवा लेखनकामादिक अनेक कामें करणारी सेना, इत्यादि सैन्य राजानें बाळगावे. त्यांतील मनुष्यें अमुकच वर्णांचीं अथवा अमुकच वर्णांपैकीं अमुकच जमातीचीं म्हणजे जातीचीं असावी असे नाहीं.

१४. राजकीय नियमांतील चाकरमनुष्यें म्हणजे शिपायापासून राजापर्यंत व दासीपासून राणीपर्यंत, वल्ही मारणारांपासून नाव चालविणारापर्यंत व घोडा धुण्याऱ्यापासून कचरा झाडणाऱ्यापर्यंत इत्यादि राजकीय नियमांतील चाकर मनुष्यांतून ह्याला म्हणजे लेखन, वाचन ज्ञान नाही असे तर कोणीच नसावें.

१५. राजा मेला किंवा वृद्ध वगैरे कारणानें ठरावाप्रमाणें वेतन घेऊन बसला, तर त्याच्या हाताखालचे जे मुख्य दहा कामदार त्यांतून एक राजा नेमावा. तो नेमण्याचा अधिकार प्रज्येतील लोकांचा या प्रकारचा असावा. म्हणजे एक जाहिरात छापून राज्यातील सर्व प्रजेस विनंती ल्याहावी कीं...हे राज्याभिषेकास योग्य आहेत. पैकीं अमुक गादीवर बसवावा अशी इच्छा असेल त्यानें त्याचे नांवाखालीं आपली सही करावी.[1]

यांशिवाय अनेक लहानमोठ्या गोष्टीवर विष्णुबुवांनी आपली मते प्रकट केली आहेत. बावांच्या या 'आज्ञापत्रा'त साक्षरताप्रसार, लोकशाही तत्त्वानुसारी मतदान, सामाजिक समता, बालाजरठविवाहाचा निषेध, पुनर्विवाह व स्वयंवर यांचा पुरस्कार, औद्योगिक प्रगतीची आवश्यकता इत्यादी अनेक आधुनिक तत्त्वांच्या बीजाचे दर्शन घडते.

**'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध'**

'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' या ग्रंथाची मध्यवर्ती कल्पना 'सर्व प्रजा एक कुटुंब होय', अशी आहे.

"याप्रमाणे सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन हाच एक बाग व त्यांतून जें जें निघेल ते ते सर्वांचे एक. याप्रमाणें राज्यव्यवस्था असली म्हणजे सर्वांना सर्व उपयोग मिळतात व सर्वांना उत्तम खावयास मिळते. सर्वांना उत्तम विपुल वस्त्रें व अलंकार-भूषणें मिळतात. सर्वांना नाच, तमाशे, बैठकी पहावयास सांपडतात. पालख्या, रथ, घोडे व हत्ती यांजवर सर्वांना बसावयास मिळते. यामुळे कोणाला कांहीं प्राप्त नाहीं असे होतच नाहीं. म्हणून सर्व लोक पूर्णकाम होतात."

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी आपल्या जॉन्सनवरील निबंधात विष्णुबुवांच्या या विचारप्रणालीला 'सार्वस्विक संप्रदाय' म्हणजे 'साम्यवाद' संबोधिले आहे. या 'सार्वस्विक संप्रदाया'चे ब्रह्मचारीबोवांनी मोठे तपशीलवार वर्णन केले आहे :

१. वेदोक्तधर्मप्रकाश, पृ. ४३६–४५०.

" सर्व प्रजेकडून सर्व जमिनीची लागवड करवावी, ती अशी कीं ज्या ठिकाणीं जी वनस्पति चांगली पिकेल त्या ठिकाणीं तिची लागवड करावी...आणि अनेक प्रकरची फळें, कंद, भाज्या, अन्न...उत्पन्न करून गांवोगांव कोठारें भरून ठेवावीं. व त्यांतून सर्व गांवकऱ्यांनीं पोटास लागेल तितके अन्न न्यावें, व जनावरास चारा न्यावा. याप्रमाणे सीतकाळ, उष्णकाळ व पर्जन्यकाळ या बाराहि महिन्यांत एकसारखें सर्व जमिनींतून उत्पन्न करावें आणि ते सर्वांचें उत्पन्न एकच व एकाचेच ताब्यांत राहून त्यांतून खावयास विपुल न्यावें व राजानें लोकरीचे, तागाचे, रेशमाचे व कापसाचे याप्रमाणें अनेक तऱ्हेचे कपडे तयार करावे आणि गांवोगांव खजिन्यांत ठेवावे. त्यांतून ज्याला जो कपडा पाहिजे तो त्यानें न्यावा. व सोन्यारुप्याचे, मोती, हिरे यांनीं जडलेले अलंकार तयार करून गांवोगांव ठेवावे व ते सर्व स्त्रियापुरुषांनीं वापरावे आणि मोडले म्हणजे पुनः राज्याच्या खजिन्यांत ठेवावीं व सर्व प्रकारचे खेळ गांवोगांव ठेवावे. व आगगाड्या व तारायंत्रें गावोगांव असावीं व सर्व प्रकारच्या कारखानदारांनीं व शेतकऱ्यांनीं व राजानें एकसारखें अहिंसक खाणें खावें व ते सर्वांनीं एका कोठारांतून नेऊन खावें व सर्वांचीं लग्नें करण्याच्या खात्याच्या मार्फतीनें राजानें करावीं व आवड नसली तर पुनः ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा म्हणजे स्वयंवर असावें व सर्वांचीं पांच वर्षांचीं पोरें झालीं म्हणजे मुलगे व मुली राजाच्या ताब्यांत द्यावे, नंतर त्याने त्यांना सर्व विद्या शिकवून ज्याला ज्या कामांत जास्ती उद्योग करण्याची संवय असेल त्याला त्या कामाकडे लावून द्यावा व स्त्रियापुरुष वृद्ध झालीं म्हणजे त्यांच्याकडून कामधंदा न करवितां त्यांनीं स्वस्थ बसून खावें व त्या त्या खात्याचे 'पार्लमेंट' सभेचे सभासद असावे आणि जगत् भासणाराचे उपकार आठवीत बसावें."

या सर्व सुधारणा भारतात नव्यानेच कराव्या लागतील, असे नाही. तर प्राचीन काळी त्या भारतात प्रचलित होत्याच; फक्त कालांतराने खंडित झाल्या एवढेच, असाही विचार 'वेदोक्तधर्मप्रकाशा'त बुवा मांडतात — " प्रथम, हिंदुस्थानांत सर्व धंद्यांचीं खातीं होतीं. व प्रत्येक धंद्याच्या खात्यांतील सात-आठ वर्षांच्या वयाच्या मुली व मुलगे राजा घेऊन जाई आणि मुलींना अनेक धंदे शिकविण्याच्या खात्यांत पाठवी, आणि मुलगेही अनेक धंदे शिकविण्याच्या खात्यांत पाठवी; आणि ते मुलगे व त्या मुली वयांत येत तसतसे त्यांस जें जें काम शिकविले असेल त्या त्या कामाला परस्पर मदत होण्यासारख्या बेताने राजा त्यांचीं लग्नें करण्याच्या खात्याकडून लग्नें करवून त्यांना जें काम येते त्या कामाच्या सेक्रेटरीकडे त्यांना पाठवी. नंतर तो सेक्रेटरी त्यांची राहण्याची व्यवस्था करी. असा बहुतकाळ लोटल्यानंतर पुढें राजे दुर्बुद्धि झाले; यामुळे लोक आपलीं मुलें राजाच्या स्वाधीन न करतां आपणास येते तीच विद्या आपल्या मुलांस शिकवूं लागले. पुढे मुलें मोठीं झाल्यावर बापाचाच धंदा करूं लागलीं. याप्रमाणे झाल्यामुळे खातीं होतीं तितक्या जाती झाल्या. पुढे तोच

जात्यभिमान दृढ झाला. आणि पूर्वस्थिती विसरले. नंतर राजे लुटारू होऊन प्रजेस पीडा करू लागले...पुढे प्रजाही लुटारू झाली म्हणून मनु या नांवाचा राजा झाला, त्याने कायदे केले. अशा या बिघडलेल्या नीतींतील ज्या अनेक प्रकारच्या राजनीति त्याच भूगोलावरील अनेक प्रकारच्या राजनीति आहेत."

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या या स्वप्नरंजनावर विविधज्ञानविस्तारात औपरोधिक टीका आली होती. आधुनिक ज्ञानविज्ञानाशी परिचय नसल्यामुळे विष्णुबोवांचे मूलगामी विचार तर्कदुष्ट उतरले. तसेच, आपले विचार कृतीत उतरविण्यासाठी जी संस्थात्मक पद्धतीने कार्य करण्याची आवश्यकता असते, तिची जाणीव त्यांना नसल्याने या वैचारिक विसंगतीला भव्य स्वप्नरंजनाचे रूप आले! केवळ अंतःप्रेरणेने बोवांनी युगाची चाहूल ओळखिली, त्यासाठी ग्रंथनिर्मितीचा व ग्रंथप्रचाराचा अवाढव्य खटाटोप रचिला आणि मोठ्या नेटाने आपल्या तत्त्वज्ञानातील वैयक्तिक आचारसंहिता कसोशीने पालन केली, हे त्यांचे कार्यही असामान्य कोटीतील समजावे लागेल. बोवांची निष्ठा प्राचीन धर्मग्रंथांवर असली, तरी त्यांचे विचार मात्र जुनाट नव्हते. राजेरजवाडे, संस्कृत विद्या, ब्राह्मणवर्ग यांविषयीची त्यांची मते पाहिल्यास ती लोकहितवादींच्या मताइतकीच तिखट आहेत, असे दिसेल. हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांविषयी ते म्हणतात: "स्वहस्तानें काम करण्याची संवय नाहीं. व भूगोलाची माहिती नाही, व जलप्रवास करीत नाहींत. यामुळे त्यांना मरणाची भीती वाटते. वंशपरंपरा चाकर मनुष्ये, यामुळे समयास कोणाचा उपयोग नाहीं, व जात्यभिमानामुळे कोणी कोणास सार्वभौमत्व देण्यास वगैरे मदत नाहीं, व स्वतः लेखनवाचनज्ञानाचा, व कला-कौशल्याचीं कामे करण्याचा मार्ग मुळींच ठाऊक नाहीं, व त्यांतील आनंदरस चाखला नाही, व बापाच्या आज्यानें ज्या पराक्रमाने जो किताब मिळविला, तो किताब भालदारचोपदारांकडून ललकारून, आपण नाटकांतील सोंगाप्रमाणे त्या किताबाचा आनंद भोगतो याची लज्या त्यांना वाटत नाहीं, व अन्य द्वीपांतील राजे, कोणत्या कारणानें व कायद्यानें योग्यतेस चढले तो उद्योग करण्याचे ज्ञान नाहीं, पण शिकवू लागल्यास शिकत नाहींत, इत्यादि प्रकारची हल्लीं जे हिंदुस्थान देशांत लहानमोठे राजेरजवाडे आहेत त्यांची स्थिति आहे."[1] केवळ संस्कृत जाणणाऱ्यांविषयी त्यांचे मत असे – "जो गीर्वाणभाषा म्हणजे संस्कृत भाषा शिकतो आणि बोलतो, तोच विद्वान अशी हिंदुस्थान देशांतील बहुतेक लोकांची बोलण्याची चाल पडून तशीच समजूत दृढ झाली आहे; परंतु ही समजूत अगदींच मूर्खपणाची आहे. का कीं, ज्या ज्ञानाच्या अनुभवानें वेदशास्त्रादिक ग्रंथ रचले, ते ज्ञान व अनुभव नाहीं, आणि नुसते पाठग्रंथ केले आणि बोलला त्याला विद्वान् म्हणणे हें केवढे मूर्खपण आहे!"[2] बावांचे

१. वेदोक्तधर्मप्रकाश, पृ. ४२५–२६.
२. वेदोक्तधर्मप्रकाश, पृ. ४२७.

वाचन प्रामुख्याने प्राचीन मराठी धर्मग्रंथांचे असल्याने त्यांच्या भाषेवर व शैलीवर जुनी छाप उमटली आहे. उदाहरणार्थ, कडसणी, पाणिलगे इ. शब्द वापरणे, विशिष्ट पदाची वा वाक्याची पुनरुक्ती करणे, धर्मग्रंथांतील मताचा सूत्रमय संदर्भ देणे इत्यादी.

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या व्यक्तित्वावर एकनाथांचा परिणाम झाला असावा, असे वाटते. एकनाथी वाङ्मयाचे पारायण, एकनाथी ओवीचा वापर, 'भावार्थसिंधू' हे ग्रंथनाम, 'चतुःश्लोकी भागवत याचा अर्थ' हा ग्रंथ, नव्या-जुन्या विचारांचा समन्वय करण्याची वृत्ती, भूतदयावादी भूमिकेवरून सामाजिक विषमता शिथिल करणे, किरिस्तावाच्या हातचा पाव खाणे व खानू नावाचा मुसलमान खानसामा बाळगणे, संस्कृत भाषेपेक्षा मराठी भाषेचे अगत्य वाटणे इत्यादी विष्णुबुवांच्या अनेक विशेषांमुळे हा समज दृढ होतो. तडफ, वक्तृत्व, युक्तिवादचातुर्य व आग्रहीपणा हे त्यांच्या शैलीतील गुण मात्र लोकहितवादींची आठवण देतात. जुन्या परंपरेतील नवा निबंधकार या शब्दांत विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे वर्णन केल्यास ते चूक ठरणार नाहीं.

### इतर निबंधकार

अव्वल इंग्रजीच्या काळात ज्यांनी विपुल निबंधलेखन केले नाही, ज्यांनी इतर वाङ्मयप्रकारांतच विशेषत्वाने नाव मिळविले, किंवा ज्यांच्या निबंधलेखनात इंग्रजी किंवा जुने असे कुठलेच नेमके वळण दिसत नाही, अशा निबंधकारांचा समावेश प्रस्तुत गटात करिता येईल. दादोबा पांडुरंग, विष्णुशास्त्री पंडित, जोतिबा फुले, काशिनाथ बाळकृष्ण मराठे, रामकृष्ण विश्वनाथ इत्यादी निबंधकार या गटात अंतर्भूत होतात.

### रामकृष्ण विश्वनाथ

अल्प परंतु बहुगुणी निबंधलेखन करणारे निबंधकार म्हणून रामकृष्ण विश्वनाथ यांचा आदराने निर्देश करावाला गेल.' हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिती व पुढें काय त्याचा परिणाम होणार, याविषयीं विचार ' या १८४३ साली प्रकाशित झालेल्या त्यांच्या दीर्घ निबंधात तत्कालीन भारताच्या राजकीय व आर्थिक परिस्थितीची आगळी जाण दिसून येते. इतिहासलेखकाची भूमिका स्पष्ट करिताना ग्रंथाच्या प्रारंभी लेखक म्हणतो, "इतिहास लिहिण्याचा उद्देश जी हकीगत झाली, तिचा खरा वृत्तांत लिहावा, इतकाच नाहीं, परंतु त्या विषयाचा सर्वसाधारणपणे विचार करणे, व त्या वृत्तांतापासून जो निर्णय निष्पन्न होईल, तो इतिहास या हेतूने सर्वांस समजावा, इतकेच नाहीं, परंतु व्यवहारांत त्यापासून सर्वांस उपयोग होई, व सर्वांचें कल्याण होई, अशा प्रकारे त्या निर्णयाचा उपयोग करणे हाच मुख्य उद्देश होय. इतिहास लिहिणाराचे ग्रंथांत एक पक्ष किंवा कांहीं हलके हेतु न धरितां सर्वांच्या कल्याणाचा हेतु जों जों अधिक असतो, तों तों ग्रंथ लिहिण्यास अडचणी गणितश्रेढीनें वाढत जातात व या अडचणींतून पार पडण्याविषयींची सूक्ष्म आशा भूमितिश्रेढीनें अधिकाधिक सूक्ष्म होत जाते." प्राचीन भारतातील हिंदू व मुसलमान राजवटींचा

जितक्या निरपेक्ष व निर्भीड भूमिकेने लेखकाने विचार केला, तितक्याच निरपेक्ष व निर्भीड भूमिकेने इंग्रजांचा भारतात चंचुप्रवेश व येथे त्यांनी प्रस्थापित केलेली अधिसत्ता यांचा त्याने परामर्श घेतला आहे. इंग्रजांच्या कपटनीतीचे वर्णन करिताना लेखक लिहितो – "पुणे व हैद्राबाद सरकार म्हणजे पेशवे आणि निजाम यांस इंग्रेज सरकाराशीं दोस्ती केल्यापासून अंतीं कांहीं फायदा झाला नाहीं. कारण इंग्रेज सरकारानें टिपू सुलतानाचे राज्य मोडल्यावर लागलेंच ते सरकार पेशवे, निजाम या सरकाराशीं कलह उत्पन्न करण्यास कांहीं कारण शोधू लागलें. याचा परिणाम शेवटीं असा जाहला कीं मराठ्यांचें राज्य बुडालें."[१]

एतद्देशीय संस्थाने गिळकृत करण्याकरिता इंग्रज राज्यकर्त्यांनी कोणकोणती कारस्थाने रचिली याचे तपशीलवार व साधार विवेचन लेखकाने केले आहे. निंबोरी संस्थानप्रकरणाचे उदाहरण देऊन लेखक म्हणतो, "कंपनी सरकारने आसपासचे संस्थानांचे दरबारात आपले गुप्तपणानें प्राबल्य चालविलें आहे." (पृ. ७५) गाजलेल्या साताराप्रकरणाबाबत तर "ब्रिटिश एजेंटानें राजास भुलथाप घालून व त्यास कळूं न देतां कोऱ्या कागदावर राजाकडून सह्या घालविल्या, नंतर त्यावर पाहिजे तशी खोटीं कागदपत्रें लिहिलीं." (पृ. ७५). मुसलमानी राजवटींत हिंदुस्थानातील कारागिरीचा विकास झाला व व्यापार वाढून लोकांला चार पैसे अधिक मिळाले. कंपनीसरकारच्या व्यापारी धोरणामुळे मात्र आज देशाची आर्थिक दुरवस्था विकोपाला जात आहे, हे लेखकाने ओळखिले होते —

"मुसलमानांचे राज्यांत हिंदुस्थानांतील उत्पन्न केलेलें सामानही बरेच पूर्णतेस आले होते व त्याचा सर्व लोकांत चाहाही झाला होता, परंतु ब्रिटिशांचा बेत व वर्तणुक अशी आहे कीं हिंदुस्थानाची सामान इत्यादि उत्पन्न करण्याची शक्ति अगदी मोडून टाकावी कीं जेणेंकरून युरोपांतील उत्पन्न केलेले सामानाचा खप व्हावा."[२]

इंग्रजी राजवटीचा साकल्याने विचार करिता लेखकास वाटते —

"कीं जा सर्व लोकांची या विस्तीर्ण देशांत वस्ती आहे, त्यांचें कल्याण होण्यास व ब्रिटिशांचे राज्याची व्यवस्था व स्थिरता असण्यास एक राज्यकारभार करण्याचे स्थितींत मोठा फेरफार झाला पाहिजे, नाहींतर या लोकांच्या उद्योगांत व वर्तणुकेत कांहीं नवीन रचना झाली पाहिजे. इंडियाचे कोणतेही भागांत गेलों असतां सांप्रतचे जमाबंदी, शिबंदी अथवा न्यायखाते यांचा कारभारांत जे लोकांवर मोठमोठे कर, अंदाधुंदी आणि जुलूम आहे याविषयीं आणि हिंदुस्थानांतील उत्पन्न केलेलें सामान यावर अनिवार मोठी जकात बसवलेली आहे, कीं जेणेकरून त्या जिनसांस विलायतचे बाजारांत जाण्यास मार्ग न मिळावा याविषयीं व या काम करणारे लोकांनीं यामुळे आपआपले

१. हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति, पृ. ६३.
२. हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति...पृ. ७८.

धंदे सोडून दिले व भिकेस लागले याविषयीं चहूंकडून लोक गाऱ्हाणीं करितात, असें आपले आढळण्यांत येईल. हीं असलीं गाऱ्हाणीं ऐकून आम्हांस फार दुःख वाटतें." इंग्रजांनी "मिठाचा व अफिणीचा प्रतिबंधकारक व्यापार चालविला आहे, त्यापासून हिंदुस्थानांतले लोकांचा फार नाश झाला." (पृ. ८३) असा स्पष्ट अभिप्राय लेखकाने दिला आहे. न्यायालयीन चौकशी न करिता एका एतद्देशीय लष्करी अधिकाऱ्यास फाशी देण्यात आले. या अन्यायाची दखल घेऊन निबंधकार औपरोधिक शब्दांत म्हणतो – "हें कदाचित् सुधारलेपणाचे उदाहरण असावें. हिंदुस्थानचे लोक आपले शरीरावर किंवा आपले प्रतिष्ठेवर किंवा आपले मालमत्तेवर जुलूम होतो म्हणतात, म्हणून त्यास बंडखोर व रानटी असे म्हणावें कीं काय?" (पृ. ८२)

राज्यकर्त्यांवर टीका करण्यातच लेखकाने आपली बुद्धिमता खर्ची घातली नाही, तर त्याने स्वसमाजातील वैगुण्येही उघड केली आहेत —

"हिंदुस्थानचे लोकांहीं जर त्यांस आपलें कल्याण करायाचे असेल, तर त्यांस आपल्याला स्वतंत्रता मिळवायाची असेल, आणि आपला व्यापार हितावह करून घ्यावयाचा असेल, तर त्यांहीं स्वतांच कमर बांधावी, आणि आपल्या सामर्थ्येंकरून व गुणेंकरून दुसऱ्यांचे साहाय्याची गरज नाहींशी करावी आणि जीं दुःखें त्यांहीं आपल्या आळसामुळें आपणावर ओढून घेतलीं आहेत, तीं दूर करावीं."[1]

'स्वतंत्रता' व 'व्यापार' या दोन गोष्टींवर रामकृष्ण विश्वनाथ याचा विशेष जोर आहे; व त्या बाबतीत भारताची प्रगती होणे कठीण नाही. कारण —"जमाबंदी व राजकीय कारभार चालविण्याचे एतद्देशीय लोकांस फार चांगलें ज्ञान आहे, यांत संशय नाहीं. कारण कीं त्याचे धूर्तपणामुळें व शहाणपणामुळें कित्येक हिंदु राजांनीं आपले राज्य मोठ्या प्रतिष्ठितपणे, व त्यांचे रयतेस सुखकारक होण्याजोगे केले आहे... इतकेच नाहीं, कंपनी सरकारचे राज्यांतही देशप्रकरणीं व जमाबंदी खात्यांतला इंग्लश कलेक्टरचे कचिरीचा कारभार बहुधा एतद्देशीय लोक चालवीत असतात." (पृ. १७)

लेखकाने इंग्रज सरकारवर जशी अंधळेपणाने टीका केली नाही, तशीच स्वकीयाची अंध प्रशंसाही केलेली नाही. हिंदू लोकांच्या सामाजिक रीतिरिवाजांचो व त्यांच्या दैववादाची त्याने कसून परीक्षा केली आहे: "हिदु लोकांमध्ये सण आणि उपवासाचे दिवस बहुत येतात, त्यांत त्यांचा काळ उगीच व्यर्थ जातो, आणि तेणेकरून त्यांचे सुधारण्यास विलंब लागेल. परंतु जसजसी त्यांजमध्ये यंत्राची आणि मजुरीची गरज अधिक होत जाईल, तसतसे सण आणि उपवास कमी होत जातील. सांप्रतचे सणांचें महात्म्य दिवसानुदिवस कमी होत चाललें आहे, त्याचप्रमाणें ब्राह्मणाचाही मान कमी होत चालला आहे, याणेंकरून असे दिसोन येते कीं हा देश

१. हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति...पृ. १३.

कांहीं चांगले दशेस येईल. हिंदु लोकांचा दैवावर आणि ग्रहदशेवर फार भरवसा आहे, तेणेंकरून ते मोठमोठाले कारखाने घालण्यास आणि व्यापार करण्यास नालायक जाहाले आहेत. जर एखादे हिंदूस कांहीं कारण जाहालें, तर ते काम सुरू करण्यास पहिल्यानें त्यांस चांगला दिवस पाहावा लागतो आणि घरांतून बाहेर पडते वेळेस म्हणतो कीं हे माझें काम सिद्धीस जावो. नंतर पायरी खालीं उतरल्यावर मार्गांत पहिल्यानें कोण कोण भेटतात हे मोठे चित्त देऊन त्यास पाहावे लागते. कोणी इतक्यांत जर शिंकला तर शिकल्यापासून काय होईल, याचा शोध करितो; त्याचप्रमाणे कावळा ओरडला असतां, आंधळा मनुष्य, ब्राह्मण किंवा परीट भेटला असतां तो वाईट शकुन असें मानतात."

गिबन, बर्क इत्यादी आंग्ल विद्वानांच्या ग्रंथांशी परिचय असूनही लेखकाला इंग्रजी राजवटीतील पुस्तकी विद्येबद्दल तत्कालीन इतर लेखकांप्रमाणे अंध आदर नाही. "इंग्रजी भाषेचा अभ्यास करण्यास फार आतुर म्हणून जेथेजेथे शाळा घातलेल्या आहेत, तेथेतेथे शाळा मुलेंकरून भरलेल्या असतात, व तेथे ते बराच विद्याभ्यासही करितात, परंतु या अशा लोककल्याणार्थ शाळा घालणारांचे लक्षांत असे कधींच आले नाहीं कीं या मुलांनीं पुढे आपला उदरनिर्वाह कोणत्या प्रकारे चालवावा ? कंपनी सरकार मोठमोठ्या पगाराच्या व विश्वासाच्या जागा नेटिव लोकांस अगदीं देत नाहीं. विद्येकरून त्यांचीं मने मोठीं होतील, व त्यांस सृष्टींत कोणत्या रीतीनें वागावें हे ज्ञान प्राप्त होईल, परंतु या ज्ञानाचा उपयोग करण्यास त्यांस कोणताही मार्ग करून ठेवला नाहीं, अथवा जा प्रकारे त्यांस सध्या विद्याभ्यास शिकवितात, तो प्रकार त्यांस पुढे ज्या धंद्यांत ते पडणार त्यांत वाकब करण्यास उपयोगी आहे काय ?"[१] नव्या इंग्रजी विद्येचे इतके समतोल परीक्षण रामकृष्ण विश्वनाथ यांच्याशिवाय अव्वल इंग्रजीतील दुसऱ्या कोणत्याही मराठी निबंधकाराने केलेले दिसत नाही. लेखकाची बुद्धी पूर्वग्रहदूषित नाही. त्यामुळे तो भारत व इंग्लंड या दोन्ही देशाकडे सारख्याच निर्लेप दृष्टीने पाहू शकतो : "हिंदुस्थानांत कापूस वगैरे जिन्नस जावत्कालपर्यंत पिकत आहे, तावत्कालपर्यंत हा मुलूख कधीही निष्कांचन होणार नाहीं; परंतु तो जिन्नस विलायत चीन आदिकरून परमुलखात पाठवून त्यांचीं वस्त्रें वगैरे जाल्यावरती पुनः या देशांत आणण्यापासून तो अर्थात् नेहमी दरिद्री होत जाईल...इंग्लंड देश दुर्भिक्ष आणि दरिद्री होता. हेच तेथल्या लोकांचे संपत्तीस, सुखास, आणि बळास कारण जाहले आणि हिंदुस्थानात सर्व पदार्थांची समृद्धी होती तेणेंकरूनच हे लोक दरिद्री जाहले." (पृ. ८५-८६)

सांप्रत कारकुनांची संख्या वाढली आहे. कामगार, कारागीर याची मुले इंग्रजी शिक्षण घेतात व मग त्यांना उत्पादक धंद्यांत शिरण्याची लाज वाटू लागते. आपण

१. हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति, पृ. ८७.

जर लवकर 'यंत्रयुक्ति' आत्मसात केली नाही, तर येत्या काही वर्षांत कारकून-मंडळींना पाच रुपयांपेक्षा अधिक मासिक पगार मिळणार नाही, असा गंभीर इशारा देऊन लेखक "आपला कापूस वगैरे जिनसाचीं वस्त्रें वगैरे पदार्थ आपलेच लोकांहीं उत्पन्न करावे हे योग्य आहे" (पृ. १०२) असा 'स्वदेशी'चा संदेश लेखक लोकांना देतो. "हे कृत्य करण्यास इथल्या लोकांहीं प्रथम एक मंडळी करावी, आणि दाहा लक्षांचे भांडवल काढावे, दोन हजार रुपयांचा भाग असे पांचशे भाग करावे," अशी सहकारी संस्था स्थापन करण्याची सूचना देऊन आपले विचार केवळ स्वप्नरंजनात्मक नाहीत, हे निबंधकाराने सिद्ध केले आहे.

निबंधाच्या अखेरीस रामकृष्ण विश्वनाथ यांनी समंजस अशावाद व्यक्त केला आहे — "सारांश, हिंदुस्थान देश मोठा फलयुक्त व उत्पन्नेंकरून परिपूर्ण आहे, व परमेश्वराने मोठें औदार्यें करून या देशावर आपली कृपा पसरली आहे, तेव्हां, या परमेश्वराची कृपा बाहेर आणण्यास जर लोकांहीं उद्योग केला व आपलें सामर्थ्य खर्चले, तर किती चमत्कार होईल बरे! आपली स्थिति चांगली करण्याकरितां युद्ध किंवा राजकीय वाद विवाद व उगीच खंती करणें याचे प्रयोजन नाहीं; कारण यापासून कांहीं फायदा नाहीं. आपले देशाचे काय सामर्थ्य आहे ते आपल्यास बरोबर समजल्यानें त्याचा उपयोग करण्यास ते प्रवृत्त होतील व तेणेकरून सौख्य हा त्याचा आपोआप परिणाम होईल." भारतीय इतिहासाचे तपशीलवार ज्ञान, त्याच्या बळावर भविष्याचा वेध घेण्याचे सामर्थ्य, राजकीय व आर्थिक घटनांचे शास्त्रशुद्ध आकलन, प्रौढ आशावाद ही रामकृष्ण विश्वनाथ यांच्या 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति...' या निबंधाची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत. याशिवाय भारतीयांचा निरुद्योगीपणा व दैववादी स्वभाव, इंग्रजांची भेदनीती व आर्थिक शोषण आणि इंग्रजी विद्येचा पुस्तकीपणा यांचा लेखकाने केलेला शिष्ट शब्दांतील धिक्कार हाही विशेष लक्षात घेण्यासारखा आहे. १८५०-पूर्वीच्या मराठी निबंधात ही वैशिष्ट्ये प्रकट झाली, हे कौतुकास्पद होय.

रामकृष्ण विश्वनाथ यांच्या लेखनात एक मोठे वैगुण्य आढळते व ते म्हणजे त्यांची घोळ घालणारी शैली व बेडौल भाषा. "असा प्रकार आहे, त्यापेक्षां जो कोणी पृथ्वीवर किंवा हरएक मुलुखांत आजपर्यंत जी हकीगत जाहली, तिचा विचार करूं लागतो, त्यास नाना प्रकारचीं विघ्ने प्राप्त होतात यांत कांहीं आश्चर्य नाहीं, व आजपर्यंत ज्या गोष्टी घडून आल्या, त्याविषयीं व सांप्रत जो रंग दिसत आहे, याचा बहुधा परिणाम काय होईल, यांविषयीं फार विस्तारेकरून विचार करण्याचे खटपटींत न पडता या अडचणी दुरभिमान वगैरे समज दूर करण्याचे उद्देशाने नवीन प्रयत्न केले, आणि ते जरी सिद्धीस गेले नाहीत, तथापि त्यांत कांहीं फारसें आश्चर्य आहे, अशी गोष्ट नाहीं, व निराशेपासून जे दुःख प्राप्त होणार, तें फुकट वाढविण्याचे प्रयोजन नाहीं, किंवा कदाचित् दैवयोगें करून असे घडून आले कीं, या अडचणींतून दुसरे जे कोणी पार पडायास इच्छीत असतील, त्यांची इच्छा सफल जाहाली नाहीं, असें

विद्वज्जनसमाजाचे ध्यानीं आलें, तथापि ग्रंथ लिहिणारांस त्या कामापासून पराङ्मुख करणें, किंवा त्यांचे स्वतांचे जे कांहीं विचार असतील, त्यांजवर लक्ष न देणें हें योग्य नाहीं" ...[१]

प्रस्तुत परिच्छेदवजा वाक्यावरून व ग्रंथांच्या शीर्षकावरूनही लेखकाच्या भाषाशैलीची कल्पना येते. अर्थात 'शतपत्र'पूर्वकाळात सुगम व रेखीव भाषाशैली ही गोष्ट अपवादात्मकच होती.

## दादोबा पांडुरंग

"दादोबा हे महाराष्ट्राचे पहिले धर्मसुधारक, वैयाकरण आणि भाष्यकार. किंबहुना, स्वतंत्र प्रज्ञेचे पहिले ग्रंथकार म्हणूनहि त्यांना अग्रमान देणें अयोग्य होणार नाहीं ... दादोबांचें साहित्य हें मौलिक, रसपूर्ण आणि विचारप्रवर्तक असल्याचें अनुभवाला येते. त्यांची शैलीहि रस-प्रसंगानुसार आर्ष आणि आर्जवी, प्रसन्न आणि प्रौढ आहे." निबंधकार म्हणून जरी दादोबांचा सहसा निर्देश केला जात नसला, तरी त्यांच्या व्याकरणविषयक ग्रंथांच्या प्रस्तावना, 'यमुनापर्यटन' या बाबा पदमनजींच्या ग्रंथाला जोडलेला पुनर्विवाहविषयक लेख, 'विद्येच्या लाभाविषयी' हे उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेतील अध्यक्षीय भाषण व 'यशोदापांडुरंगी'च्या प्रारंभी केलेले परीक्षण हे सारे साहित्य निबंधरूपच होय.

दादोबांनी आपल्या 'मराठी भाषेचे व्याकरण' या ग्रंथाची दुसरी आवृत्ती १८५० साली प्रसिद्ध केली. मराठी व्याकरण व भाषाशास्त्र या विषयांवरील एक सुबोध निबंध अशा शब्दांत या प्रस्तावनेचे वर्णन करता येईल.

१ सप्टेंबर १८४८ रोजी उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेची स्थापना झाली. त्या वेळी दादोबांनी 'विद्येच्या लाभाविषयी' या विषयावर सुमारे १० पृष्ठांचे भाषण केले. सदर भाषण मराठी ज्ञानप्रसारक मासिकाच्या पहिल्या वर्षीच्या पहिल्या अंकात प्रकाशित झाले. शास्त्रीय ज्ञानाची आवश्यकता प्रतिपादन करून दादोबा म्हणतात, "ज्ञानशक्तीचा प्रसार आपल्या देशांत प्राचीन काळीं कमी होता असे नाहीं. सर्व इतिहासकर्ते असे मान्य करितात कीं, इतर बहुतेक देश ज्या वेळेस अज्ञान दशेत होते, त्या वेळेस हिंदुस्थान उत्तमावस्थेंत होता व ही गोष्ट प्राचीन ग्रंथांवरून खरी अशीही अनुभवास येते. आपणामध्ये पूर्वी व्यासादि ऋषि व कालिदास, भट्टोजी दीक्षित, भास्कराचार्य, इत्यादि पंडित यांनीं शास्त्रीय व व्यावहारिक विषयांवर जे नाना प्रकारचे ग्रंथ केले आहेत त्यांचे मनन करून पाहिलें असतां त्यांचा उद्योग केवढा व त्यांचे ज्ञान किती याचे सहज अनुमान होते. त्या वेळचे त्यांचे श्रम आणि सांप्रतकालचे आमचे श्रम यांमध्ये तारतम्य पाहिलें असतां किती बरे अंतर! आहो, त्यांच्यासारखे नवे ग्रंथ करणे तर असो, परंतु त्यांनीं केलेले ग्रंथ समजत देखील

१. हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति, पृ. १–२.

नाहींत. आपल्या पूर्वजांनी जो विद्यावृद्धीचा क्रम घालून दिला होता तोच जर आजपर्यंत एकसारखा चालता तर आपल्या देशांत किती बरे ज्ञानाची समृद्धी झाली असती. तर पुनः एकदां आपण सर्व मिळून आपल्या देशाची सुधारणूक करण्यास यत्न करूं आणि आपल्या पूर्वजांचें नांव उदयास आणूं."

'यमुनापर्यटन' या बाबा पदमनजी यांच्या कादंबरीला दादोबा पांडुरंग यांचा पुनर्विवाहविषयक संस्कृत लेख जोडला आहे. शीर्षकपृष्ठावर त्याचे वर्णन "आरंभीं रावबहादुर दादोबा पाडुरंगजी यांनीं विधवांच्या पुनर्विवाहाविषयीं निबंध लिहिला असे" या शब्दांत केले आहे. 'विधवाश्रुमार्जन' या संस्कृत निबंधाचे मराठी भाषांतरही जोडले आहे. मात्र हा मराठी निबंध दादोबांच्या हातचा नाही.[1] या संस्कृत मराठी निबंधाचे स्वतंत्र मुद्रणही झाले. निबंधाच्या अनुवादप्रारंभी हेतु कथन करिताना दादोबा म्हणतात, "विधवा स्त्रियांस आपल्या पतीच्या मरणापासून जीं दुःसह दुःखें प्राप्त होतात, त्यांविषयीं बाबा पदमनजी यांनीं सुसंवादरूपाने प्राकृत भाषेंत हा पुढील ग्रंथ रचिला आहे. परंतु ती भाषा या देशांतील शास्त्रीपंडित इत्यादि विद्वज्जनांस नीरस वाटती यावरून या ग्रंथांतील विषयाची गोडी त्यांस लागणार नाहीं, असें ग्रंथकर्त्यास वाटून त्यानें मला अशी विनंती केली कीं, माझा ग्रंथ विद्वान लोकांस ग्राह्य व्हावा म्हणून आपण संस्कृत भाषेंत या विषयावर कांहीं लिहावें. त्यावरून मीं लहानसा निबंध लिहिला आहे."[2] या १८ पृष्ठांच्या निबंधावरून दादोबांची संस्कृत धर्मग्रंथांत गती किती होती व त्यांचे विचार कसे सुधारणावादी होते, याची कल्पना येते. "विषादप्यमृतं ग्राह्यम्" अशी संस्कृत विद्वानाना विनंती करून लेखक मूळ विषयाकडे वळला आहे : "पूर्वीच्या विधवा स्त्रियांस पुनर्विवाह करण्याची मोकळीक होती किंवा नव्हती, आणि जर नव्हती तर त्या अवस्थेंत त्या कोणत्या आचाराने राहत होत्या व त्यांच्या वर्तनाचे नियम कोणते होते या विषयींचें ज्ञान प्रस्तुतच्या विषयास फार उपयोगीं आहे. म्हणून त्यांचा विशेषेकरून विचार करावा. परंतु हा शोध करण्यापूर्वीच मनांत शोक उत्पन्न होतो. कारण जे कोणी एतद्देशीय लोकांच्या प्राचीन ग्रंथांचे अवलोकन करून त्यांतील मतभेद व परस्पर विरोध पाहतात तेव्हां त्याचे मन व्यग्र होते."[3] पुढे संपूर्ण निबंधात निबधकाराने प्राचीन धर्मग्रंथांतील या विसंगतीचेच सविस्तर, सोदाहरण विवेचन केले आहे. लेखकाने मनु, पराशर, याज्ञवल्क्य इत्यादींच्या ग्रंथांतील उतारे उद्धृत केले आहेत. संस्कृत पंडितांना प्रिय असलेला 'शाब्दिक युक्तिवाद'ही

१. "आज सकाळींच मी मि. दादोबा पांडुरंग यांजकडे गेलों, आणि तेथून यमुनापर्यटन पुस्तकाकरितां संस्कृत निबंध घेऊन घरीं आलों... चार वाजतां संस्कृत निबंधाचें भाषांतर करावयास एका शास्त्र्यापाशीं बसलों."

अनुभवसंग्रह ( बाबा पदमनजी ), भाग १, पृ. ६०.

२. यमुनापर्यटन, संस्कृत निबंधाचे भाषांतर, पृ. १.

३. यमुनापर्यटन, संस्कृत निबंधाचे भाषांतर, पृ. २.

क्वचित लेखकाने केला आहे, " सर्व मुनींचे मत असे आहे कीं, पति मरण पावला असतां विधवेनें परपुरुषाचे नांव देखील घेऊं नये. असे असतां नवरा मरतांच त्या विधवेचे मस्तक नापिताच्या स्वाधीन करितात व तिचा व त्याचा एकांतीं सहवास करवितात असे प्रतिमासीं एक दोन वेळां त्यांस करावेंच लागते, यामुळे ते आपल्याच मताप्रमाणे आपण पापांत पडतात, कारण जें पाप पतिमरणानंतर कालेंकरून परपुरुष-स्पर्शानें होणार ते लागलेच तिजकडून करवितात. दिव्याच्या खालीं मोठा अंधकार तो हाच आहे. " [१]

निबंधाच्या शेवटी दादोबा बजावितात, " अशा वेळीं दयाळू परमेश्वराने त्याच्या दुःखशमनार्थ परधर्मांचे द्विपांतरींचे राजकार्यधुरंधर व्यवस्थापक अशा लोकांच्या बुद्धीस प्रेरणा केली, आणि त्यांनी एतद्देशीय विधवांचा पुनर्विवाह करावा असा नवा कायदा स्थापन करून मोठी कीर्ति मिळविली. तर आता राजाज्ञेंकरून जो पुनर्विवाह स्थापित झाला, त्याच्या निषेधाविषयीं वाक्पांडित्य करून हांसील नाहीं, म्हणून परमेश्वरइच्छेकरून जें प्राप्त झालें त्याला अनुसरावें हेच उत्तम आहे. " पुनर्विवाहविषयक सुधारणेबाबत दादोबा धर्माज्ञा व राजाज्ञा यांचा आश्रय घेतात; पण बाबा पदमनजी व लोकहितवादी यांच्याप्रमाणे सनातनी मंडळींच्या दयाबुद्धीला वा बुद्धिप्रामाण्याला आवाहन करिताना दिसत नाहीत !

दादोबा याचा सर्वोत्कृष्ट निबंध म्हणजे 'यशोदापांडुरंगी'ला जोडलेली टीकात्मक प्रस्तावना. दादोबांनी १८६५-मध्ये मोरोपंतांची 'केकावलि' सटीप प्रकाशित केली. या ग्रंथालाच त्यांनी 'यशोदापांडुरंगी' हे नाव दिले आहे. त्यासंबंधी ते खुलासा करितात, " ज्यांच्या उदरीं त्या जगदीशाने मला जन्म दिला त्या परम वंद्य आणि प्रेमास्पद मातापित्यांचे नामयुग्माने या माझ्या टीकेस अभिधान देऊन यश देणारे मातृनाम यशोदा, आणि त्या यशाची निर्मलता दर्शविणारे पितृनाम पांडुरंग. " या स्पष्टीकरणात दादोबांची कल्पकता व सहृदयता या दोन्ही गोष्टी प्रकट झालेल्या आहेत. " जिच्या अभ्यासाकरितां म्यां प्रथमपासून या पुढील केकावली या नांवाच्या स्तोत्रावर टीका करायास आरंभ केला, परंतु जी त्या ग्रंथाची समाप्ति पाहण्यास जगदीशाच्या इच्छेने राहिली नाहीं, " त्या आपल्या कावेरीबाई या कन्येस त्यानी प्रस्तुत ग्रंथ अर्पण केला आहे. केवळ शीर्षक व अर्पणपत्रिका यांच्याकडे पाहिले तरी दादोबांचे मन कसे काव्यानुकूल होते, याची कल्पना येते दादोबांच्या प्रस्तावनेत सहृदयता, चिकित्सक बुद्धी व बहुश्रुतता यांचे दर्शन घडतेच, पण त्याचबरोबर दादोबांची एरव्ही निव्वळ सुबोध, व्याकरणशुद्ध असलेली शैली येथे कशी काव्यमय झाली आहे, हे पाहून विशेष कौतुक वाटते. या दृष्टीने दादोबांनी केलेले उत्तरपेशवाईतील विलासी जीवनाचे वर्णन वाचण्यासारखे आहे: " त्या काळी रावबाजीच्या उत्तेजनाने पुणें शहरांत व त्या

१. यमुनापर्यटन, संस्कृत निबंधाचे भाषांतर, पृ. १३.

वारा लागून जेथें तेथें शिमग्याचे चांदणें वाढत चाललें होते. दिवसास ब्रह्मभोजनाचा थाट आणि दिव्यांत वात पडली नाही, तों मंदिरांत चवघडे सणया यांचा मंजुळ घोष; श्रीमंतांच्या व सरदारलोकांच्या वाड्यांत सरकारी तायफांचे मुजरे; रात्रीस रस्त्यांत आणि बोळांत फिरणाऱ्या विलासी लोकांचीं मने आपणाकडेस ओढून घेणारे नुकतेच चिमणी, साळू, मैना यांच्या मंजूळ कंठांत होनाजी बाळाने घातलेले खडे सूर, आणि फौजेकडील सिलेदार, बारगीर, शिपाई आणि शहरांतील सुखवस्तु शिंपी, माळी, सराफ, दुकानदार यांस रिजविण्याकरितां बहिरू, मल्हारी, धोंडीबापु, सगनभाऊ आणि रामा गोंधळी, यांनीं सजविलेले डफतुणतुण्याचे तमासे, आणि कलगीतुऱ्याचीं भांडणें; हे सर्व थाट रावबाजीच्या उल्हसित मनोवृत्तीच्या प्रेरणेनें पुणें शहरांत जेथें तेथें गाजून राहिले होते. मग यथा राजा तथा प्रजा या न्यायानें त्या प्रेरणेचा अंमल सर्व पेशवाईत पसरला नसेल असें संभवत नाहीं."[1]

दादोबांनी 'होळी' व 'स्त्रीशिक्षण' या विषयांवर दोन इंग्रजी निबंधही लिहिले आहेत. तथापि सामाजिक निबंधांपेक्षाही व्याकरणविषयक व विशेषतः टीकात्मक निबंधांच्या क्षेत्रांत दादोबांचे नाव लक्षात ठेवावे लागेल. दादोबांनीच "महाराष्ट्र टीकेचा अपूर्व प्रकार प्रथम सुरू केला," असे मालाकार चिपळूणकरांनी म्हटले आहे.[2]

### काशिनाथ बाळकृष्ण मराठे

कविचरित्र देणे, काव्याचे 'परीक्षण' करणे या गोष्टी जरी दादोबांनी आंग्ल टीकेवरून उचलल्या होत्या, तरी मराठी पद्याला संस्कृत, मराठी परंपरा असल्याने व मल्लिनाथी करिताना दादोबांनी संस्कृत पद्धतीचा वापर केल्याने त्यांची 'यशोदा-पांडुरंगी' वाचकांना वेगळी वाटली तरी अपरिचित वाटली नसावी. परंतु काशिनाथ बाळकृष्ण मराठे यांनी १८७२-मध्ये प्रकाशित केलेला 'नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध' मात्र तत्कालीन वाचकांना अगदी अनोखा वाटला असावा. याचे मुख्य कारण ग्रंथाचा अभ्यासविषय नवीन, मराठी परंपरा नसलेला होता. लेखकाची विवेचनपद्धती मात्र इंग्रजी-संस्कृत अशी संमिश्र आहे. प्रस्तुत निबंधलेखकाने १६ फेब्रुवारी १८७२ रोजी ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचला होता. ३८ पृष्ठांच्या निबंधाला निबंधकाराने एक-पानी मराठी व दीड-पानी इंग्रजी प्रस्तावना जोडली आहे. मराठी प्रस्तावनेत आपल्या ग्रंथनिर्मितीचा उद्देश स्पष्ट करिताना लेखक म्हणतो —

"प्रस्तुत नावलें लिहिणारे व नाटकें लिहिणारे फार झाले आहेत, हव्या तशा कल्पना पुस्तकांतून घालतात, व हवा तितका सत्याचा अपलाप करितात. असें होऊं नये म्हणून कोणी तरी चांगल्या विद्वानाने नावल व नाटक ह्यांच्या स्वरूपाविषयीं

१. यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ. १०–११.
२. निबंधमाला, अंक ५२, पृ. ८, तळटीप.

निबंध लिहावा व तो छापून प्रसिद्ध करावा. रा. ब. विष्णुपंतांनी हा अभिप्राय दोन तीन चांगल्या विद्वानांस कळवला परंतु कोणाच्याही हातून ती गोष्ट झाली नाहीं; म्हणून पुढील अल्पविद्वानाचा निबंध छापण्यांत आला. त्यांत न्यूनता पुष्कळ असतील, परंतु कांहीं माहिती इंग्रजी निबंधांतून व संस्कृत ग्रंथांतून घेतली आहे, ती ह्यापुढें नावल करणाऱ्यांस अथवा नाटक लिहिणाऱ्यांस उपयोगी पडेल अशी निबंधकर्त्याची आशा आहे."[1] मराठे यांचा नावलविषयक निबंध नाटकविषयक निबंधापेक्षा सरस उतरला आहे.

मराठे यांच्या शैलीची कल्पना येण्यास पुढील उपसंहाराचा उतारा पुरेसा होईल —

"सर्व प्रकारच्या सुधारणांमध्ये विद्वानांचा पुढे पाय आहे, तर ही नाटककला व नावल लिहिण्याची शैली सुधारण्याकडेही त्यांनीं लक्ष द्यावें, असे आम्हांस वाटतें. कोणी विचारील कीं नावले व नाटकें चांगलीं लिहितां येऊन काय उपयोग आहे? नावलें व नाटकें लिहून मन रिझवणे ह्यापासून देशाची काय सुधारणा होणार आहे? त्या लोकांस आमचा असा प्रतिप्रश्न आहे कीं तुमचीं बायका-मुले, केवळ लिहितां वाचतां येणारे चाकरचुकर, व तुमचे अल्पज्ञानी देशबांधव, ह्यानीं आपला काळ कसा घालवावा? तीं तुमच्या बरोबर नाणीं, ताम्रपट, जुनीं लेणीं, जुन्या चालीरीति, जुनीं माणसे, व जुने लेख ह्यांचा शोध करीत बसतील काय?...असे अनेक प्रकारचे जे गूढ व क्लिष्ट उद्योग तुम्ही करितां, त्यांपासून त्यांना आनंद होणार आहे काय? कधीं नाहीं. त्यांचा काळ जाण्याला चमत्कारिक गोष्टीच पाहिजेत, आणि त्यांपासून त्यांचे हित व मनोरंजन हीं दोन्हीं व्हावीं अशी तुमची इच्छा असली तर स्वतः आपण कांहीं सुबोध गोष्टी व नाटके रचावीं अशी आमची विनंती आहे."[2]

'वेदाविषयीं निबंध' (१८६९) या नावाचा आणखी एक ग्रंथ का. बा. मराठे यांच्या नावावर नमूद आहे.

### कृष्णशास्त्री चिपळूणकर

दादोबा पांडुरंग यांच्याप्रमाणेच कृष्णशास्त्री चिपळूणकर हेही निबंधकार म्हणून विख्यात नाहींत. शास्त्रीबोवांना निबंधकार म्हणून जी काही प्रसिद्धी आहे, ती त्यांच्या 'मराठी व्याकरणावर निबंध' या ग्रंथामुळे. पुणे येथील 'ट्रेनिंग कॉलेज'-मध्ये प्राचार्यांच्या जागेवर काम करीत असता शास्त्रीबोवा विद्यार्थ्यांना दादोबांचे व्याकरण शिकवीत. अध्ययन-अध्यापनकार्यात त्यांना दादोकृत व्याकरणात बऱ्याच त्रुटी आढळल्या. त्यांचे दिग्दर्शन करण्याच्या निमित्ताने त्यांनी १८६५ साली 'पुणे-पाठ-

१. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, प्रस्तावना.

२. नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध, पृ. ३७–३८.

(प्रस्तुत टीकात्मक निबंधाचा अधिक परामर्श पुढे वाङ्मयविचारामध्ये पहावयास मिळेल.)

शाळा-पत्रका'तून २५ निबंध लिहिले. तेच पुढे 'मराठी व्याकरणावर निबंध' या नावाने ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाले. याशिवाय रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान, वनस्पतिशास्त्र इत्यादी शास्त्रांतील महत्त्वाचे सिद्धांत सुबोध मराठीत सांगण्यासाठी कृष्णशास्त्री यांनी अनेक इंग्रजी ग्रंथांच्या आधारे 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' हा ग्रंथ लिहिला. परंतु त्यातील कित्येक शास्त्रीयेतर लेख अव्वल इंग्रजीतील उत्कृष्ट निबंध ठरतील. उदाहरणार्थ, 'विद्यानंदाविषयीं', 'इंग्लंडांतील राज्यसत्तेचा प्रकार', 'विद्येचा व ज्ञानाचा अद्‌भुत प्रभाव', 'छापण्याची कला', 'वाक्यांतले अलंकार', 'हिमालय पर्वत', 'योग्य अभिमान', 'ताजमहाल', 'मेल्यांविषयीं दुःख', 'वाक्‌चातुर्य' इत्यादी.

'विद्यानंदाविषयीं' लेखक म्हणतो, "मनुष्ये अनेक उद्योग करून कालक्षेप करितात, परंतु त्या सर्व उद्योगांमध्यें विद्याभ्यासांत काल घालविण्यासारखा उत्तम उद्योग दुसरा कोणता नाहीं. ह्या व्यवसायांत जें समाधान आहे व जी प्रतिष्ठा आहे, त्यांपेक्षां विशेष समाधान व विशेष प्रतिष्ठा दुसऱ्या कोणत्याही व्यवसायांत नाहीं. ह्याप्रमाणें प्राचीन कालापासून सर्व देशांतील ज्ञाते पुरुष मानीत आले आहेत." (पृ. १) पुढे विद्यानंदाचे स्वरूप, प्रकार व फायदे यांचे मोठे वेधक वर्णन शास्त्रीबोवांनी केले आहे 'छापण्याची कला' व 'विद्येचा व ज्ञानाचा अद्‌भुत प्रभाव' हे निबंध त्या मानाने अगदीच लहान आहेत. 'वाक्यांतले अलंकार' व 'वाक्‌चातुर्य' हे दोन निबंध विशेष दीर्घ आहेत. 'वाक्‌चातुर्य' व योग्य 'अभिमान' या दोन निबंधांत मालाकारांच्या अनुक्रमे 'वक्तृत्व' व 'गर्व' या निबधांचे मूळ सापडते. 'मेल्याविषयीं दुःख' हा तर एक उत्कृष्ट लघुनिबंध होय —

"सर्व दुःखें जाण्याविषयीं आपण इच्छितों; पण मेल्याबद्दलचे जें दुःख होते, तेवढें मात्र जाण्याविषयीं आपण कधीं इच्छित नाहीं. हरएक जखम बुजून बरी होण्याविषयीं आपण झटतों. हरएक हानि विसरण्याविषयीं प्रयत्न करितों, परंतु इष्ट जनाच्या मरणानें अंतःकरणास जी जखम पडते, ती बुजूं न देणें हा आपला धर्म वाटून ती आपण तशीच ठेवितों व ह्या हानीचा विसर पडूं न देतां एकांतीं बसून ती मनांत घोळीत असतों. व ज्या आईचें केळीच्या कोंबासारखें तान्हे बाळ डोळ्यांदेखत गमावलें असतें, त्यांची आठवण झाली असतां तिच्या हृदयास हजारों विंगळ्या झोंबल्यापेक्षां अधिक वेदना होतात; पण त्या वेदना होऊं नयेत, त्या बाळाचा विसर पडावा, असें कोणत्या आईच्या मनांत येणार आहे बरें? तसेंच अत्यंत मायाळू आई मरण पावल्यावर, तिचें स्मरण झालें असतां मन कासावीस होते, तर तिची आठवण बुजून जावो, असें ज्यास वाटतें, असें कोण मूल आहे बरें? परलोकीं गेलेल्या जिवलग स्नेह्याच्या गोष्टी वारंवार मनांत येऊन त्यांच्या योगानें अंतःकरण नेहमी व्याकूळ होतें; ह्यास्तव त्या स्नेह्याची आठवण न होईल तर बरें, असें कोणी इच्छील काय?...... मृत्यु एक प्रकारें किती चमत्कारिक पदार्थ आहे? शरीर चितेत जळालें म्हणजे त्याबरोबर मनुष्याचे सर्व अपराध, सर्व व्यंगें, सर्व द्वेषकारणें जळून नाहींतशीं होऊन शुद्ध धातु

जसा उरावा तसें मेल्या मनुष्याचे गुण मात्र दिसूं लागतात. मोठा शत्रू का असेना! त्याचें प्रेत दृष्टीस पडलें असतां, पश्चात्ताप होऊन मनांत असें खाऊं लागतें, कीं शिव शिव! या असल्या बापुड्या दीन मातीशीं कायरे मीं द्वेष केला! ह्याच कारणानें वाली रक्तानें नाहालेला पाहून सुग्रीवास व रावण समरांगणीं पाहून बिभीषणास शोक झाला, असें जें वाल्मीकीनें रामायणांत वर्णिलें आहे, त्याची उपपत्ति समजावी." या निबंधामधील शेवटचा परिच्छेद सोडल्यास उरलेल्या संपूर्ण लेखात लघुनिबंधाला विसदृश ठरेल, असा एकही शब्द नाही. त्यातील उत्कट भावचिंतन व ललित भाषा यांमुळे त्याला मराठी लघुनिबंधाचा पूर्वावतार म्हणावयास काहीच हरकत नाही.

'पुणे-पाठशाला-पत्रका'तूनही कृष्णशास्त्री यांनी अनेक स्फुट निबंध लिहिले. मराठी निबंधाला एका बाजूने शास्त्रीय व दुसऱ्या बाजूने ललित रूप देण्याचे महत्त्वाचे कार्य कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी केले आहे.

यांशिवाय भवानी विश्वनाथ कानविंदे, कृष्णनाथ रघुनाथजी विष्णु परशुराम पंडित, मोरोबा कान्होबा इत्यादी अनेक लेखकांनी स्फुट व दीर्घ निबंध लिहिले.

## समारोप

### निबंधाचा पहिला प्रकार

अव्वल इंग्रजीतील निबंधवाङ्मयाचा साकल्याने विचार केल्यास त्याचे दोन कालखंड स्पष्ट जाणवतात; पहिला कालखंड १८३२ ते १८४९ हा होय. १८३२-साली 'दर्पण' पत्र सुरू झाले. त्यात संपादकीय स्फुट लेख व वाचकांची पत्रे प्रकाशित होऊ लागली. हीच मराठी निबंधाची गंगोत्री होय. दर्पणापेक्षाही १८४१ साली निघालेल्या 'प्रभाकरा'ने निबंधविषयक महत्त्वाचे कार्य केले. दर्पणातील माहितीपर निबंधाला प्रभाकराने थोडे चिंतनशील बनविले. लोकहितवादींची 'शतपत्रे' प्रभाकरातच प्रकाशित झाली. शतपत्रांमध्ये १८३२ ते १८४८ या काळाचे सर्व विशेष व मर्यादा स्पष्ट होतात. निबंध या वाङ्मयप्रकाराची निश्चित जाणीव अजून उदयाला आली नव्हती. आपले मनोगत यथायोग्यपणे व्यक्त व्हावे, म्हणून तरी शब्दयोजना व वाक्यरचना यांच्याकडे लक्ष द्यावे, एवढेही भान या काळातील निबंधकारांना नव्हते. मग केवळ अभिव्यक्तीची हौस म्हणून शैलीकडे लक्ष देण्याचा प्रश्नच नव्हता. सुचेल तो शब्द लिहून जमेल तशी वाक्यरचना करीत जावी, हा या निबंधकारांचा खाक्या होता. विवेचनपद्धतीतही पूर्वनियोजन दिसत नाही. कुठेतरी विषयाला सुरुवात करावी, मनात येईल तो मुद्दा मांडावा, मुख्य विषयाशी नाममात्र संबंधित असे विचार सुचले, तर त्यांचाच पाल्हाळ लावावा, एखादी बाब फार महत्त्वाची वाटली, तर तिचीच कंटाळवाणी पुनरुक्ती करावी, असे या निबंधवाङ्मयाचे बाह्य रूप आहे. विषयाच्या निवडीतही फारसे सूक्तासूक्त नव्हते. कुठल्याही लहानमोठ्या विषयावर भाषांतरित किंवा प्रासंगिक विचार मांडावयाचे, हे धोरण. स्वतंत्र व सखोल चिंतनाचा अभावच. लोकहितवादींचे लेखन याला अपवाद असले, तरी त्यातही प्रस्तुत दोष जागोजागी

डोकावतात. धार्मिक आणि सामाजिक विषयांचे विशेष अगत्य असले, तरी राजकीय विषय अगदीच वर्ज्य नव्हते. पारतंत्र्याची मीमांसा करिताना आपले अज्ञान आणि आळस यांच्यावरच जास्त जोर दिला गेला; इंग्रजांची उद्यमशीलता व विज्ञाननिष्ठा कशी आत्मसात करिता येईल, याबाबतही उपाय सुचविले गेले.

## निबंधाचा निराळा प्रकार

नियतकालिकांतून प्रकाशित होणाऱ्या निबंधापेक्षा एक वेगळा निबंध याच काळात आकारास येत होता. खिस्ती निबंधकार तो आकारास आणीत होते. श्रीमती फेरार, एस. बेंजामिन यांच्या निबंधलेखनामागची प्रेरणा धर्मप्रसाराची होती; तरी त्यांची दृष्टी कोती किंवा वृत्ती धसमुसळी नव्हती. त्यामागे शुद्ध भूतदयावादी भावनाही असावी. कारण आपल्या निबंधग्रंथांतून खिस्ती धर्माचा सरळसोट प्रचार न करिता त्यांनी नीतिसुधारणा व कुटुंबसुधारणा या विषयांना हात घातला. रामकृष्ण विश्वनाथा-सारखा एखादा लेखक देशाचे भूत-भविष्य-वर्तमान यांविषयी पोटतिडिकीने विचार करीत असला, तरी तो अपवादच समजावयाचा.

नियतकालिकांत प्रसिद्ध होणारा स्फुट निबंध व ग्रंथरूपाने अवतरणारा दीर्घ निबंध असे अव्वल इंग्रजीच्या प्रथमार्धातील निबंधवाङ्मयाचे दोन प्रवाह दिसतात. स्थूल मानाने पाहिल्यास या दोन प्रवाहांमध्ये साम्यापेक्षा भेदच अधिक दिसतात. नियत कालिकांतील निबंध हा आकाराने लहान, तर ग्रंथरूपाने प्रकट होणारा निबंध दीर्घ. पहिला प्रकार मुख्यतः एतद्देशीय लेखकांनी घेतला. आपले विचार गद्यात मांडण्याची त्यांना सवय नव्हती. ' निबंध ' या वाङ्मयप्रकाराची जाणीवही त्यांना नव्हती. त्यामुळे त्यांच्या निबंधाचे स्वरूप सैल आणि बेडौल आहे. उलट खिस्ती निबंधकारांना आंग्ल निबंधाची चांगली जाण होती. इंग्रजी का होईना, परंतु गद्यलेखनाचा त्यांना सराव होता. त्यामुळे व्याकरणदृष्ट्या त्यांची भाषा क्वचित सदोष असली, तरी विचारदृष्ट्या त्यांच्या निबंधाची मांडणी तर्कशुद्ध, मुद्देसूद व रेखीव आहे. रामकृष्ण विश्वनाथ यांचे उदाहरण या दृष्टीने उद्बोधक ठरेल. त्यांनी दीर्घ निबंध लिहिला, पण खिस्ती निबंधकारांच्या लेखनातील बांधेसूदपणा त्यात आला नाही. स्फुट निबंधांत एतद्देशीयांचे भेदरलेले, भांबावलेले आणि कातावलेले मन प्रकट झाले आहे. कधी इंग्रजी शिस्त, उद्योगप्रियता, विद्या व कला यांच्यामुळे ते भयचकित होते; राज्यकर्त्यांची भाटगिरी करण्यात धन्यता मानिते. कधी हे सारे गुण आपल्यात नाहीत, कधीच नव्हते, असे म्हणून स्वकीयांच्या नावाने बोटे मोडते. असे अस्थिर, अगतिक मन दीर्घ निबंधात दिसत नाही. ही एतद्देशीय मेंढरे अगदी अज्ञान आहेत व त्यांना चुचकारून शहाणे करणे हे आपले दैवी कर्तव्य आहे, या भावनेने खिस्ती निबंधकारांनी आपले निबंध लिहिले. त्यामुळे स्फुट निबंधांतील आत्मनिर्भर्त्सना किंवा अंधानुकार यांमुळे येणारी वैचारिक दुर्बलता त्यांत नाही. भारतीयांच्या कुटुंबजीवनातील उणिवा मोजक्या शब्दांत दाखवून त्यांवर ठराविक उपाय सुचविले आहेत. त्यांचे स्वरूप

सौम्य उपदेशपर आहे. त्यात भावनेचा भडकपणा किंवा वैचारिक गोंधळ नाही. या दोन निबंधप्रकारांतील आणखी एक फरक म्हणजे स्फुट निबंध हा प्रासंगिक, पण विविध व स्वतंत्र आहे; तर दीर्घ निबंध अ-प्रासंगिक, ठरीव विषयांवरील व अनुवादात्मक आहे. या दोन प्रवाहांत एकच मोठे साम्य आहे व ते म्हणजे त्यांची शिथिल व्याकरणदुष्ट भाषा. श्रीमती फेरार हाच काय-तो एकमेव अपवाद.

## उत्तरार्धातील निबंध

१ सप्टेंबर १८४८ रोजी 'ज्ञानप्रसारक मंडळी'ची स्थापना झाली व १८४९-पासून या संस्थेचे 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिक निघू लागले; आणि अव्वल इंग्रजीतील निबंधवाङ्मयाचा पूर्वार्ध संपून त्याच्या उत्तरार्धाला सुरुवात झाली. दरम्यानच्या काळात अनेक वृत्तपत्रे, मासिके, ग्रंथप्रकाशनसंस्था, खाजगी व सरकारी शिक्षणसंस्था यांनी समाजजागृतीचे कार्य केले होते. दादोबांच्या व्याकरणाची सुधारलेली आवृत्तीही याच सुमारास (१८५०) बाहेर आली. या साऱ्या घटनांचा स्पष्ट परिणाम १८५० ते १८७४ या उत्तरार्धातील निबंधवाङ्मयावर झालेला दिसतो. 'मराठी ज्ञानप्रसारका'तील ल. नृ. जोशी व स. म. दीक्षित यांचे निबंध वाचले, म्हणजे हे दोन कालखंड भाषा व विचार या दोन्ही दृष्टींनी कसे विभक्त आहेत, याची कल्पना येते. एतद्देशीय लेखकांची संभ्रान्त अवस्था दूर झाली व आपापल्या प्रवृत्ती-प्रमाणे त्यांनी एक-एक विशिष्ट वैचारिक भूमिका स्वीकारिली. इंग्रजांची वैयक्तिक आणि सामाजिक नीतिमत्ता व शिस्त आत्मसात करणे आपल्या समाजाच्या दृष्टीने आवश्यक आहे असे वाटून गोविंद नारायण माडगावकर, विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी खिस्ती निबंधकारांच्या धर्तीवर भाषांतरवजा सौम्य उपदेशपर निबंध लिहिले. बाबा पदमनजी यांचे धर्मपरिवर्तनापूर्वीचे निबंधही याच प्रकारचे आहेत. परंतु त्यांचा एक विशेष हा की, इंग्रजांचे नैतिक गुणच नव्हेत, तर त्यांचा धर्मही आपल्या समाजाने स्वीकारावा, अशी बाबा पदमनजींची प्रारंभापासूनच भूमिका होती. त्यामुळे प्रारंभी आडून व पुढे उघड रीतीने त्यांनी निबंधांद्वारे धर्मप्रसार केला. प्रथमार्धातील खिस्ती निबंधकारांची परंपरा त्यांनी चालविली; ऋजुता व सुबोधता सकस केली. इंग्रजांचे कुठल्याही प्रकारचे ऋण न घेता आपला उद्धार होऊ शकेल, या निष्ठेने विष्णुबुवा यांनी लेखन केले. वैदिक संस्कृतीत सुप्त रूपाने वावरणारी बुद्धिनिष्ठा स्वीकारून त्यांनी स्वसंस्कृतीची कालानुरूप पुनर्घटना करण्याचा प्रयत्न केला. त्या परिस्थितीत निश्चित वैचारिक भूमिका पतकरणे काळाने कसे अपरिहार्य केले होते, याची यावरून कल्पना येते. परिस्थिती किंवा प्रकृती यामुळे अशी निश्चित भूमिका घेणे, ज्यांना जमत नव्हते, अशा लेखकांनी विज्ञान व वाङ्मय हे प्रांत निवडले. दादोबांच्या व्याकरण-विषयक प्रस्तावना, यशोदापांडुरंगी, कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे व्याकरणावरील निबंध व शास्त्रीय विषयांवरील स्फुट लेख आणि का. बा. मराठे यांचा 'नावल व नाटक' या विषयावरील निबंध ही त्याची उदाहरणे होत. हे एक नवे क्षेत्र होते. पण निबंधदृष्ट्या

त्यांचा विशेष विकास झाला नाही. याचे कारण मातबर मंडळी सामाजिक विचार-मंथनात गुंतली होती व आंग्ल वाङ्मयप्रकारांचा दृढ परिचय झाला नव्हता.

पूर्वार्धाच्या तुलनेने उत्तरार्ध बहुनेक सर्वच दृष्टींनी प्रगत दिसतो. पूर्वार्धातील एकमेव शैलीकार म्हणजे श्रीमती फेरार. उलट, उत्तरार्धात स. म. दीक्षित, बाबा पदमनजी, गोविंद नारायण माडगावकर, दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर अशी अनेक नावे आढळतात. या काळात भाषा शुद्ध आणि आकर्षक झाली. निवेदनपद्धतीत सुसूत्रता येऊन पाल्हाळ, पुनरुक्ती आणि संदिग्धता हे दोष खूपच कमी झाले. वैचारिक निष्ठेमुळे निबंधांत विचारांचा भरीवपणा व चिंतनाचे तेज प्रकटले. स्वाभाविकच स्फुट निबंध व दीर्घ निबंध हा भेद केवळ आकारापुरता राहिला; त्यात गुणात्मक अंतर उरले नाही. विषयाचे क्षेत्रही विस्तारले. प्रासंगिक, कौटुंबिक, सामाजिक, धार्मिक या विषयांबरोबरच सृष्टिसौंदर्य, काव्य, नावल, नाटक, ताजमहाल इत्यादी विषयांकडेही निबंधकार लक्ष पुरवू लागले. स्वतंत्र लेखन करणाऱ्यांची संख्या वाढली, तरी भाषांतर करणाऱ्यांची संख्या कमी झाली नाही. राजकीय विषया-वर लेखन करण्याची वृत्ती मात्र मंदावली. पूर्वार्धात स्फुट पत्रांच्या रूपाने का होईना, पण समाजाचा राजकीय असंतोष व्यक्त होत होता. परंतु उत्तरार्धात राज्यकर्त्यांचे दडपशाही धोरण वाढल्याने व इंग्रजी सुधारणांचे तात्कालिक हितकर परिणाम स्पष्टपणे दृग्गोचर झाल्याने राजकीय निबंधलेखनात विचारांचा पल्ला किंवा भावनेचा आवेग वाढला नाही; थोडा कमीच झाला. धार्मिक आक्रमण परतविण्याचे व स्वधर्मसुधारणेचे प्रयत्न मात्र वाढल्याचे निबंधांतून दिसते.

साकल्याने पाहिल्यास पूर्वार्धापेक्षा उत्तरार्धात मराठी निबंधाची प्रगतीच झाली, असे दिसेल. खरे पाहिले, तर उत्तरार्धातच मराठी गद्याला ' निबंधा'चा निश्चित घाट लाभला. त्यावर सुबक नक्षी काढण्याचे व त्यात ज्वलंत रसायन ओतण्याचे कार्य मात्र १८७४-च्या नंतर घडून आले.

श्रीमती फेरार, रामकृष्ण विश्वनाथ, लोकहितवादी, बाबा पदमनजी, विष्णुबुवा ब्रह्मचारी व गो. ना. माडगावकर हे अव्वल इंग्रजीतील प्रमुख निबंधकार. श्रीमती फेरार यांची शैली व निवेदनपद्धती आकर्षक, पण त्यांचा निबंध भाषांतरित. रामकृष्ण विश्वनाथ यांचा निबंध स्वतंत्र व त्यातील विचार मौलिक, पण शैली विस्कळित आणि निवेदनपद्धतीत नेमकेपणाचा अभाव; लोकहितवादींची स्थितीही अशीच. त्यांचे विचार अधिक मौलिक पण त्याचप्रमाणे त्यांची शैली अधिक बेंगरूळ. संयमाची अधिक उणीव, पुनरुक्तीचा व विषयांतराचा अतिरेक. श्रीमती फेरारांच्या परंपरेतील बाबा पदमनजींजवळ मधुर शैली व विचारही स्वतंत्र; परंतु राज्यकर्त्यांचा धर्म स्वीकारिल्यामुळे स्वसमाजाची आर्थिक व राजकीय दुरवस्था त्यांना जाणवली नाही. त्यांच्या पेशामुळे त्यांचे लेखन समतोल असूनही सर्वांगीण नाही. विष्णुबुवांच्या बाबतीतही असेच घडले. स्वतंत्र प्रज्ञा असूनही आंग्ल शिक्षणाच्या अभावी त्यांच्या विचारांना स्वप्नरंजनाचे

रूप आले, त्यांचे लेखन जुन्या वळणाचे झाले; त्याला निबंधाचा रेखीव घाट आला आहे. माडगावकरांनी सुबोध शैली कमावली, पण त्यांच्या निबंधाचा आशय ' शालेय ' अवस्थेच्या पलीकडे जाऊ शकला नाही; आणि मुख्य म्हणजे निबंध हा एक स्वतंत्र वाङ्मयप्रकार आहे व वाङ्मयाकडे निव्वळ वाङ्मय म्हणून पाहण्यास हरकत नाही, याची स्पष्ट जाणीव तर यांपैकी कोणातही नाही. दादोबा, मराठे व कृष्णशास्त्री यांच्यामध्ये ती थोड्या प्रमाणात असावी, पण त्यांनी प्रत्यक्ष निबंधलेखन फारच थोडे केले. यामुळे अशी ' वाङ्मयीन जाण ' अव्वल इंग्रजीत नव्हतीच, असे म्हणावयास हरकत नाही. मात्र अव्वल इंग्रजीतील निबंधकारांनी मौलिक विचार, आक्रामक वृत्ती, सुसूत्र निरूपण, शैलीचे कसब ही सारी वैशिष्ट्ये विभक्त रीतीने आपापल्या निबंधांत आणून नव्या युगाची तयारी केली होती. यांतील अधिकांश वैशिष्ट्ये पचवून व नवी वाङ्मयीन जाण बाळगून निरुपम निबंधलेखन करणारा मालाकार पुढे प्रकटला. स्वकालीन समाजाला उपदेश करण्याचे, त्याला जागरूक करण्याचे कार्य करीत असतानाच या भावी निबंधकाराची पायवाटही अव्वल इंग्रजीतील निबंधकारांनी तयार करून ठेविली.

अव्वल इंग्रजीतील निबंधकारांचे वाङ्मयीन कार्य हे अशा स्वरूपाचे आहे.

प्रकरण अकरावे

# चरित्रे, इतिहास आणि वाङ्मयविचार

अव्वल इंग्रजीमध्ये इंग्रजांच्या किंवा त्यांच्या वाङ्मयाच्या परिचयामुळे ज्या वाङ्मयप्रकारांचा मराठीमध्ये पुनः नव्याने अवतार झाला, त्यांत चरित्रे आणि इतिहास हे दोन प्रकार आहेत. आधुनिक इतिहासपंडितांच्या मताने बखरींचे मूल्य काहीही असले वा नसले, तरी त्यांचा समावेश इतिहास-वाङ्मयातच कोठेतरी करावा लागतो, आणि महिपतीची संत-चरित्रे किंवा भक्तविजय आधुनिक चरित्रदृष्टीने कितीही सदोष असले, तरी त्यांना काव्य म्हणण्यापेक्षा चरित्रे म्हणणेच अधिक योग्य होईल. हे लक्षात घेतले असता इतिहास आणि चरित्रे हे वाङ्मयप्रकार मराठीला नाटक अथवा कादंबरी यांच्याइतकेही नवे अथवा अपरिचित वाटण्याचे कारण नाही. परतु या दोन्ही वाङ्मयप्रकारांकडे पाहण्याची आधुनिक दृष्टी मात्र वेगळी आहे, हे मान्य करावे लागेल. महिपतीच्या चरित्रांमध्ये सत्यापेक्षा भक्तीचे अधिष्ठान आणि आवाहन अधिक होते, तर नवीन चरित्रांमध्ये सत्य आणि यथार्थत्व यांना अधिक महत्त्व देण्यात येऊ लागले. जुन्या चरित्रांत अलौकिक भक्त हा चरित्रनायक असे, तर नवीन चरित्रांत तो लौकिक मानव होऊ लागला. पूर्वीच्या चरित्रांत अद्भुताला महत्त्वाचे स्थान होते, आणि वाचकाकडून डोळस विवेकापेक्षा अंध श्रद्धेची अपेक्षा अधिक असे. बखरी या इति-ह-आस असण्यापेक्षा वीरगाथाच होत्या, असे म्हटले तरी चालण्यासारखे आहे. या दोन्हीबाबत जी काही नवीन दृष्टी इंग्रजीच्या परिचयामुळे आली, तीमुळे मराठी गद्याच्या इंग्रजी अवतारामध्ये या दोन वाङ्मप्रकारांचा अंतर्भाव करावयास हवा, आणि त्यांचा परामर्शही या नवीन दृष्टीने घ्यावयास हवा.

चरित्र आणि इतिहास यांचा साहित्याशी कितीही संबंध असला, तरी त्यांचा अंतर्भाव साहित्यात म्हणजे ललितवाङ्मयात बहुधा करण्यात येत नाही. साहित्याचे प्रयोजन मानव किंवा त्याचे जीवन यांचे दर्शन घडविणे असे मानिले, तर इतिहास आणि चरित्रे ही त्यांतून वेगळी काढणे शक्य होणार नाही. कारण त्यांतही हेच केले जाते आणि जावे, अशीच अपेक्षा असते. चरित्रांना साहित्य म्हणावे की इतिहास म्हणावे, असा संभ्रम निर्माण होण्याचे कारणही हेच आहे. मात्र साहित्यातील मानवदर्शन हे कल्पित सत्यावर आधारलेले असते. त्यालाच संभाव्य सत्य किंवा सत्याभास असे म्हणण्यात येते. चरित्रे आणि इतिहास यांत मात्र सत्याचा आभास नसून सत्यच असते; कल्पिताचा भाग नसून प्रत्यक्ष घटितांचा भाग असतो. साहित्यात कल्पित सत्य असल्याने त्यास निर्मितीचे स्वरूप प्राप्त होते. चरित्रे किंवा इतिहास यांस कल्पनेचे साहाय्य होत असले, तरी त्यांना स्वतंत्र निर्मितीचे स्वरूप येऊ शकत नाही; मग त्यात लालित्याचा किंवा कलात्मकतेचा अंश कितीही असो.

चरित्रे म्हणजे व्यक्तींचा इतिहास आणि इतिहास म्हणजे व्यक्तींची चरित्रे असेही कित्येक वेळा म्हटले जाते. आजच्या प्रगत कल्पनांच्या जमान्यात हे सर्वस्वी बरोबर नसले, तरी शंभर वर्षांपूर्वी हे स्थूल मानाने खरेच होते. राजकीय अथवा ऐतिहासिक व्यक्तींची चरित्रे लिहिली जाण्याचे कारण त्यांचा इतिहासाशी असलेला हा संबंध होय आणि इतिहासात समाजजीवनापेक्षा ऐतिहासिक महत्त्वाच्या व्यक्तींच्या चरित्रास जे प्राधान्य मिळते, त्याचेही तेच कारण आहे. म्हणून या दोन्ही वाङ्मयप्रकारांचा विचार लागोलग करणे सोयीचे होते. अव्वल इंग्रजीमधील या वाङ्मयाचा परामर्श आता येथे घ्यावयाचा आहे.

## एक

## चरित्र-वाङ्मय

### चरित्रलेखनाची प्रेरणा

अव्वल इंग्रजीतील चरित्रलेखनाची प्रेरणा कोणती होती? या कालातील बरेच लेखन आणि वाङ्मयनिर्मिती यांच्या मुळाशी ज्ञानसंपादन आणि संपादिलेल्या ज्ञानाचे इतरांस दान असा हेतू असे, हे आपण यापूर्वी पाहिलेलेच आहे. बरेच निबंधलेखन आणि नियतकालिक वाङ्मय हे याच प्रवृत्तीमधून निर्माण होत होते. पण केवळ निरपेक्ष अशी ज्ञानसंपादनप्रवृत्ती ही कार्यकारी ठरली नसती. तिला काही-एक दिशा आणि निमित्तकारणही लागत असे. पुष्कळशी वाङ्मयनिर्मिती या कालात पाठ्य-पुस्तकांच्या प्रणालीतून झालेली आहे. इंग्रजी अमलातील शैक्षणिक अभ्यासक्रमात इतिहासाला स्थान मिळालेले होते. त्यामुळे इतिहासस्वरूपाचे ग्रंथ लिहिले जाणे, म्हणजे खरोखर अनुवादिले जाणे स्वाभाविक होते. व्यक्तिचरित्रांना अभ्यासक्रमात तादृश महत्त्व नव्हते. याचा परिणाम इतिहासग्रंथांच्या मानाने चरित्रग्रंथ थोडेच निर्माण

होण्यात झाला. जे झाले, तेसुद्धा सरकारी शिक्षणखाते किंवा ग्रंथोत्तजकमंडळी यांच्या सूचनेवरून वा सांगीवरून झाले असावेत असे वाटते; म्हणजे अर्थप्रेरणेमुळे निर्माण झाले. या चरित्रांच्या नायकांची जी निवड झाली, ती पाहिली असता हे अनुमान बरोबर असावे, असे म्हणता येईल. आपल्या समाजाच्या किंवा देशाच्या जीवनाशी निगडित असलेली व्यक्ती त्यांत अपवादभूतच दिसते. इराणचा राजा खुसरू किंवा रशियाची कॅथराइन यांचा भारतीयांच्या जीवनाशी कोणत्याही प्रकारचा संबंध होता, असे म्हणता येणार नाही. तथापि त्यांच्या चरित्रांचे अनुवाद या कालात झाले आहेत. एतद्देशीयांपेक्षा परकीयांची चरित्रे अधिक अनुवादिली गेली आहेत. अनुवाद झाल्यानंतर अर्थात त्याचे समर्थन करण्याचे प्रयत्न व्हावेत, हेही स्वाभाविक होते. हे काम स्वतः लेखकाने अथवा प्रस्तावनाकाराने केलेले आढळून येते. पाश्चात्त्यांच्या चरित्रावरून भारतीयांनी शिकण्यासारखे बरेच कसे आहे, ते या समर्थनात सांगितले जाई. आपल्या सॉक्रेटिसाच्या चरित्रानुवादाच्या प्रास्ताविकात कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात, "आतां ह्या असल्या चरित्रापासून उपयोग म्हटला असतां फारच आहे...चरित्रामध्ये ज्यांचें वर्णन केलेलें असते, ते पुरुष बहुतकरून चौघा लोकांसारखेच असतात. त्यांस संसारांत ज्या अडचणी आल्या आणि जे प्रसंग आले म्हणून त्यांच्या चरित्रात वर्णिलें असते त्या अडचणी व ते प्रसंग बहुतांस यावयाजोगे असतात. ह्याकरितां त्या अडचणी व ते प्रसंग अमुक अमुक थोर मनुष्यांनी अमुक रीतीने टाळले हे समजलें असतां लोकांस फारच उपयोग आहे. हे चरित्र वाचण्याचे सामान्य लाभ झाले."[१] या सामान्य लाभांशिवाय त्या-त्या चरित्राच्या नायकापासून काही विशेष शिकण्यासारखे अर्थात असतेच. त्याच चरित्राच्या मूळ पाश्चात्त्य लेखकाने म्हटल्याप्रमाणे "हा पुरुष पराकाष्ठेचा क्षमाशील, मोठा प्रामाणिक, निःस्पृह व निरभिमानी असा होता. ह्याचे चरित्रांत ज्या उत्तम गुणांचे वर्णन आलें आहे ते वाचून वाचणाऱ्याच्या मनांत त्या गुणांची प्रीति उत्पन्न व्हावी असा आहे."[२] लॉर्ड क्लाइव्ह ह्या मेकॉलेने लिहिलेल्या चरित्रनिबंधाच्या भागवतकृत अनुवादाला विष्णुशास्त्री पंडित यांनी प्रस्तावना लिहिली होती. तिच्यामध्ये राजकीयदृष्ट्या घेता येण्याजोग्या बोधाचा स्पष्ट निर्देश आहे. ते म्हणतात, "या भरतवर्षातील प्रस्तुतच्या सार्वभौम ब्रिटिश सरकारच्या राज्याचा पाया या देशीं कोणत्या ठिकाणीं, कोणत्या वेळीं, कोणत्या पराक्रमी पुरुषाच्या हातून व हा देश कोणत्या स्थितींत असतां, घातला गेला; त्या गोष्टींस एतद्देशीय कोणते लोक साधन झाले, तो पाया घालणारानें साम, दाम, भेद, दंड यांतून कोणकोणत्या उपायांची योजना केली होती इत्यादि गोष्टींचे ज्ञान एतद्देशीय लोकांस अत्यंत आवश्यक आहे...इंग्लंद देशाहून कांहीं...व्यापारी लोकांनी...येऊन सर्व देशच

१. सॉक्रेटीस ह्याचे चरित्र, प्रस्तावना, पृ. २.
२. सॉक्रेटीस ह्याचें चरित्र, मूळ चरित्राच्या इंग्रजी प्रस्तावनेच्या तर्जुम्यावरून.

पादाक्रांत केला या चमत्कारिक स्थितीस पुढील दोन गोष्टींपैकी कोणती तरी एक गोष्ट अवश्य कारण असली पाहिजे. . .या देशचे लोक शारीर अथवा मानसिक सामर्थ्याने, किंवा दोहोंनींहि युरोपांतील लोकांपेक्षां कमी असून त्यांत एकी नसावी. अथवा हे व्यापारार्थ आलेले ब्रिटिश वगैरे युरोपियन लोक तरी शरीरानें अथवा मनाने, अथवा दोहोंनींही विशेष समर्थ असून त्यांत विशेष एकी असावी...तर दोन गोष्टींपैकीं ब्रिटिशांस सार्वभौमपदप्राप्तीविषयीं कोणती गोष्ट साधक झाली, व तीस आणखी अवांतर कोणकोणत्या गोष्टी साक्षात अथवा परंपरया साधक झाल्या, हें सप्रमाण समजण्यास हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्याचा स्थापक जो लॉर्ड क्लैव, त्याच्या वृत्तांताच्या यथार्थ माहितीप्रमाणे दुसरीं थोडींच साधने आढळती."[1] एवढ्या विस्ताराने सांगितलेला हा सार्वजनिक राजकीय विचार अनुवादपूर्व कालातही मांडला गेला होता काय, हे सांगणे कठीण आहे. पंडितानी जॉर्ज वॉशिंग्टनच्या चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेतही यासारखाच हेतू प्रकट केला आहे. ते म्हणतात, " अशा समयास सर्व पृथ्वीवर अत्यंत विख्यात जॉर्ज वाशिंग्टन जो अगदी सामान्य प्रतीच्या कुळांत जन्मून अत्यंत उच्च पदास पावला, आणि ज्याने आपल्या विलक्षण बुद्धिचातुर्याने, परमावधीच्या निःस्पृहतेनें व स्वभावसिद्ध देशाभिमानाने आपला देश परराष्ट्राच्या अमलांतून स्वतंत्र करून आपलें नांव या भूमंडळावर अमर केलें, त्याचें चरित्र लोकांस समजणे किती उपयुक्त आहे हें लिहून कळवितां पुरवत नाहीं. तर स्वदेशहितेच्छु लोकांनीं स्वतः वाचूनच त्याचा अनुभव घेतला पाहिजे." राजकीय अथवा देशहिताची दृष्टी ही प्रत्येक चरित्रामागे होती असे म्हणता येत नाही, आणि बहुधा प्रस्तुत कालखंडाच्या अखेरी-अखेरीस ती आलेली असावी. साधारणपणे थोर व्यक्तीच्या चरित्रापासून काही बोध घेता येतो, ही प्रेरणा आणि स्वतः परिश्रम करावे न लागता अनुवादाने लेखक किंवा ग्रंथकार होण्याची दृष्टी ह्याच गोष्टी या कालातील चरित्रलेखनाच्या मुळाशी होत्या, असे दिसते. अनुवादापासून काही अर्थप्राप्ती होई, हा विचारही प्रेरक झाला असणे शक्य आहे.

## चरित्रनायकांची निवड

अनुवाद करण्यास इंग्रजी ग्रंथ उपलब्ध असणे या घटनेचा परिणाम चरित्रनायकांच्या निवडीवर झाला आहे, हे स्पष्ट दिसते. एतद्देशीयांच्या चरित्रग्रंथांपेक्षा परकीयांची चरित्रे अधिक तयार झाली, त्याचे कारण हेच होते. एतद्देशीयांमधील राजा राममोहन राय यांचे चरित्र मराठीमध्ये लिहिले गेले, याचे कारण ते मुळात इंग्रजीमध्ये उपलब्ध होते, हेच दिसते. अनुवादामध्ये परिश्रम कमी पडत. शिवाय, " स्वतंत्रपणे स्वदेशीय व्यक्तींची चरित्रे लिहिण्यासारखी साधनसामग्री उपलब्ध नव्हती, आणि उपलब्ध असली, तरी ती गोळा करून तिची व्यवस्थित छाननी करून स्वतंत्र चरित्र-

१. लॉर्ड रॉबर्ट क्लैव ह्याचा वृत्तांत, वि. ना. भागवत, प्रस्तावना, पृ. १.

ग्रंथ तयार करण्याची प्रवृत्तीच निर्माण झाली नव्हती, "[१] "मुद्दाम सामग्री जुळवून व संगती लावून एखाद्या समकालीन थोर पुरुषाचे अथवा ऐतिहासिक नरव्याघ्राचे चरित्र लिहिण्याची तसदी 'बृहस्पति'तुल्य थोरल्या शास्त्रीबोवांनीही घेतली नाही, "[२] असे सॉक्रटिसाचे चरित्रकार कृष्णशास्त्री चिपळूणकरांसंबंधी जेथे म्हणता येते, तेथे इतरांविषयी बोलण्याचेच कारण नाही. स्वकीयांपेक्षा परकीयांची निवड होण्याचे कारण हे होते. ही निवड करण्यात विशेष तारतम्य बाळगले गेले नव्हते, हा त्यापुढील खेदजनक भाग होता. अन्यथा रशियाची राणी कॅथराइन हिचे चरित्र मराठीमध्ये या कालात तरी होण्याचे कारण दिसत नाही. सॉक्रेटीस वा वाशिंग्टन यांच्या चरित्रापासून काही शिकण्यासारखे असले, तर कॅथराइन हिच्या चरित्रापासून तेही मिळण्यासारखे नव्हते. इराणचा राजा सायरस अथवा खुसरू या 'शालिवाहन शकाचे पूर्वी ६७७ व्या वर्षी' जन्मलेल्या व्यक्तीची निवडही आपल्या दृष्टीने फारशी बोधप्रद होती, असे नाही. हाही ग्रंथ मूळ फ्रेंच लेखकाच्या (रोलँच्या) ग्रंथाचा इंग्रजी अनुवाद उपलब्ध होता, म्हणून तयार होऊ शकला. लेखकास स्वतंत्र परिश्रम त्याकरिता करावे लागले नाहीत.

### चरित्रग्रंथांचे सर्वसामान्य स्वरूप

या चरित्रांच्या लेखनाचा एक साचा ठरून गेल्यासारखा होता व तो साचाही धोपटमार्गी होता. जितकी म्हणून माहिती गोळा करिता येईल तितकी करून (अनुवादाकरिता अर्थात हेही करण्याचे श्रम करावे लागत नाहीत,) तिच्या सत्यासत्यतेची विशेष छाननी न करिता साधारणपणे कालानुक्रम सांभाळून ती पुस्तकात भरावयाची, एवढे एक चरित्रकाराचे ध्येय असे. या माहितीत काही कमी करण्यात येत असेल तर चरित्रनायकामधील दोषांचे दर्शन घडविणारा भाग हाच असे. चरित्रलेखनाची शैलीही कलात्मक नसे. 'नीरस भाषेत, थंड्या पद्धतीने' चरित्रनायकाच्या जीवनातील प्रसंग एकामागून एक कसेबसे कथन करणे यापलीकडे जाऊन शैलीचे असे काही सौंदर्य असते, या गोष्टीची कल्पनाही या चरित्रलेखकांना नसे. चरित्रनायकाच्या जीवनक्रमामागे त्याचे काही व्यक्तित्व असते आणि त्याचे यथार्थ दर्शन हा चरित्रलेखनाचा मुख्य हेतू असावयास पाहिजे याची कल्पना त्यांना नव्हती, आणि हे सारे कलात्मकतेने, परिणामकारक रीतीने सांगावयास पाहिजे, याची जाणीव नव्हती. त्यात व्यक्तिचित्रणापेक्षा वृत्तान्तकथनालाच प्राधान्य असे. चरित्र चांगले होण्यास चरित्रविषयाशी समरस होण्यास लागणारी उदार सहानुभूती, त्या विषयाशी तादात्म्य होण्याचे सामर्थ्य आणि त्याचे चिरकाल केलेले चिंतन यांची फार आवश्यकता असते. अनुवादरूपाने चरित्रलेखन करणाऱ्याच्या ठिकाणी या गोष्टी असण्याचा संभव फार

१. चरित्र आणि आत्मचरित्र, अ. म. जोशी, पृ. १५४.

२. प्रदक्षिणा, गोपिनाथ तळवलकर, पृ. २५४.

कमी. म्हणून हे ग्रंथ फार नीरस आणि चरित्रदृष्ट्या सामान्य उतरणे अगदी स्वाभाविक होते. ते तसे उतरले आहेत. असे म्हणत असताना एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे, आणि ती ही की, त्यांच्या लेखकांच्या पुढे असलेले आदर्शही बेताबाताचेच होते. चरित्राबद्दलची आजची कल्पना त्या वेळी इंग्रज चरित्रलेखकांमध्येही होती, असे म्हणता येणार नाही. चरित्रनायकाच्या गुणदोषमिश्र आणि म्हणून संपूर्ण आणि यथावत व्यक्तिमत्त्वाचे आणि अंतरंगाचे कलात्मक दर्शन ही चरित्राविषयीची आजची कल्पना पाश्चात्त्यांमध्येही अलीकडेच आलेली आहे. चरित्रलेखनाचा धोपट मार्गच तिकडेही मागच्या शतकात रूढ होता. मात्र स्वतंत्रपणे चरित्रलेखन करण्यास करावे लागणारे परिश्रम आणि व्यासंग ह्यांचा भाग त्यांच्या चरित्रलेखनामध्ये दिसून येई आणि त्याकरिता करावे लागलेले जे चिंतन, त्याचा फायदा अर्थातच त्यांना मिळे. आपल्याकडील चरित्रलेखकात हे येण्याचा संभव नव्हता. कारण मराठीमध्ये अनुवाद करण्यापलीकडे चरित्रलेखनास फारसे काही करावे लागत नव्हते. प्रस्तुत कालखंडातील चरित्रांत धार्मिक क्षेत्रापेक्षा इतर क्षेत्रांतील व्यक्तींची चरित्रे लिहिली जाणे आणि हे करीत असता अद्भुताचा भाग गळणे या दोन बाबतीत वेगळेपणा आला आणि चरित्रलेखनाची प्रथा रूढ झाली, एवढा वाङ्मयदृष्ट्या लाभ झाला, यात शंका नाही.

## स्वकीयांची चरित्रे

अव्वल इंग्रजीत परकीयांच्यापेक्षा स्वकीयांची चरित्रे संख्येने कमी झाली या, घटनेचा उल्लेख मागे आलेला आहेच. परंतु या कालातील पहिले चरित्र ठरण्याचा मान स्वकीय व्यक्तीच्या चरित्रासच मिळतो, हे मात्र लक्षात घेण्यासारखे आहे. हे चरित्र प्रकाशित करण्याचा मान कलकत्ता येथील फोर्ट विल्यम कॉलेजमधील मराठीचे अध्यापक पंडित वैजनाथ शर्मा यांना मिळतो. हे चरित्र म्हणजे 'राजा प्रतापादित्याचे चरित्र' होय. परंतु हे चरित्रही अनुवादाच्या स्वरूपाचेच आहे. त्याचे मूळ पंडित रामराय बसु यांनी मूळ बंगालीमध्ये इ. स. १८०१-मध्ये प्रसिद्ध केलेल्या चरित्रामध्ये सापडते. म्हणजे :प्रारंभ झाला तो इंग्रजीमधून नसला, तरी बंगालीमधून केलेल्या अनुवादानेच झाला. बंगालमध्ये प्रसिद्ध झालेल्या ह्या मराठी चरित्रामुळे इकडील चरित्राची प्रथा सुरू झाली, असे समजणे हे अर्थात चुकीचेच होईल. कारण वैजनाथ शर्मा ह्यांचे पुस्तक इ. स. १८१६-मध्ये प्रसिद्ध झाले असले, तर कालदृष्ट्या दुसरे ठरणारे चरित्र प्रकाशित होण्यास १८४९ साल उजाडावे लागले. ह्या वर्षी महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी केलेला 'कोलंबसाच्या वृत्तांता'चा अनुवाद प्रसिद्ध झाला. हे अर्थात स्वकीयाचे चरित्र नव्हे. असे स्वकीयाचे चरित्र म्हणजे १८५२-मध्ये प्रकाशित झालेली नाना फडणवीस यांची बखर हे. मूळ लेखक मॅक्डोनाल्ड याच्या इंग्रजीमध्ये लिहिलेल्या ग्रंथाचा त्याच्याच नावाने प्रकाशित झालेला हा अनुवाद होय. ही स्वकीय व्यक्ती ऐतिहासिक व्यक्ती असल्याने यात चरित्रापेक्षा इतिहास येणेच स्वाभाविक होते.

इंग्रजी ग्रंथाचे नाव Chronicle of Nana Faranwis हे त्याचेच द्योतक आहे. या ग्रंथावरून १८५९ साली विष्णुशास्त्री पंडित यांनी 'नाना फडणवीस ह्यांची संक्षिप्त बखर' रचिली. बखर ह्या मराठी शब्दाचा उपयोगही त्याचे ऐतिहासिक स्वरूप व्यक्त करितो. ह्याच्या आदल्या वर्षी म्हणजे १८५८ साली राजा राममोहन राय ह्यांचे चरित्र प्रसिद्ध झाले, तोही भास्कर हरि भागवत यांनी केलेल्या 'कलकत्ता रिव्हयू' नावाच्या इंग्रजी त्रैमासिकातील मजकुराचा अनुवादच आहे. १८७०-७१-च्या सुमारास हनुमंतस्वामीकृत रामदासस्वामींच्या चरित्राचे त्याच्या नावामध्ये थोडासा फरक करून, दोघा वेगवेगळ्या प्रकाशकांनी प्रकाशन केले.[१] ही अर्थात प्रस्तुत कालात झालेली चरित्रे असे म्हणता येणार नाही. खिस्ती लोकांना ज्या मराठी संतकवींविषयी विशेष आपुलकी अलीकडेपर्यंत वाटत आली आहे, त्या तुकाराममहाराजांची गोष्ट १८७१-साली चौथ्या वेळी प्रकाशित झाल्याची नोंद आहे. बॉम्बे ट्रॅक्ट अॅण्ड बुक सोसायटीने ही प्रकाशित केली आहे.

**स्वतंत्र चरित्रे**

ज्यांना शुद्ध अनुवादाचे स्वरूप नाही अशा दोन पुस्तकांचा निर्देश येथे करावयास हवा. इ. स. १८६०-मध्ये जनार्दन रामचंद्रजी यांनी 'कविचरित्र' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. हा ग्रंथ अनेक संस्कृत, प्राकृत आणि इंग्रजी पुस्तकांच्या आधारे लिहिला असल्याचे आणि त्यात 'हिंदुस्थानातील प्राचीन व अर्वाचीन कवि आणि ग्रंथकार यांचा इतिहास' असल्याचे सांगण्यात आले आहे. त्यात चरित्रापेक्षा आणि इतिहासापेक्षा दंतकथांचे भारूड असल्याचे दिसून येते. संस्कृत कवींत जयदेव, कालिदास, दंडी, माघ, भर्तृहरि यांचा, प्राकृत कवींत मराठी संत-पंत, हिंदी कवींत सूरदास हे कवी, आणि अर्वाचीन लेखकांत बाळशास्त्री जांभेकर यांचा समावेश झालेला आहे. अनेक ग्रंथांच्या आधारे लिहिलेल्या या सुमारे अडीचशे पृष्ठांच्या ग्रंथास इतर ग्रंथांचा आधार असला, तरी रचनास्वातंत्र्याचे श्रेय लेखकास द्यावे लागेल. दंतकथांवर विश्वास ठेवून लिहिलेल्या या चरित्राचे नाते महिपतीच्या संतचरित्रांशी अधिक जवळचे आहे, असे म्हणावे लागते. यापेक्षा अधिक आधुनिकता श्रीरामचंद्र पांडुरंग आजरेकर यांनी लिहिलेल्या 'श्रीविष्णुबावा ब्रह्मचारी' यांच्या चरित्रात दिसून येते. हे चरित्र वेदोक्तधर्ममंडळीच्या आज्ञेवरून लिहिले आहे व त्यात बावांनी स्वमुखाने सांगितलेल्या व ग्रंथकाराने स्वतः अनुभविलेल्या गोष्टी ग्रथित केल्याची प्रतिज्ञा आहे. इतर साधूंचे साधुत्व स्वतःपुरतेच असते, परंतु 'या बावाजींनी लोकहितार्थ अनेक ग्रंथ करून व बहुत सभा करून वेदोक्तधर्माचा सिद्धान्त, व धर्म म्हणजे काय व त्याचा विचार करण्याची रीत कोणती व तरणोपाय होण्याचा सुलभ

१. श्रीरामदासस्वामींची बखर, प्रकाशक वि. रा. बापट आणि ना. ल. दिघे, १८७० श्रीरामदासस्वामींचे चरित्र, प्रकाशक महादेव विनायक चौबळ, १८७१.

मार्ग कोणता हे सर्व जागोजाग दाखविलें आहे,' असे लेखकाचे म्हणणे आहे. दुसऱ्यांच्या 'आज्ञे'वरून लिहिलेल्या या चरित्रात लेखकाची मूळची अनुकूल वृत्तीही प्रतिबिंबित झालेली दिसते. इतर ग्रंथांच्या आधाराशिवाय लिहिलेले आणि अनुवादाच्या स्वरूपाचे नसलेले चरित्र या दृष्टीने त्याचे असणारे वैशिष्ट्य मान्य करावे लागेल.

**परकीयांची चरित्रे**

स्वकीयांच्या चरित्ररचनेत स्वतंत्र लेखन-रचनेचा काहीतरी संभव होता; तो परकीयांच्या चरित्रामध्ये तेवढाही उरत नाही. नाही म्हणावयास मुळातील काही भाग गाळून किंवा त्यात काटछाट करून ते पुढे मांडण्यात लेखकाने अनुवाद-स्वातंत्र्य घेतलेले दिसते. अनुवादकर्त्यास गुणांचे श्रेय मिळण्याचा संभव एवढाच. बाकी इतरत्र अनुवादामधील गुण हे बहुधा मूळ लेखकाचे आणि दोषही, अनुवादकर्त्याने त्यात काही भर घातलेली नसल्यास, त्याचेच अशी स्थिती असते. परकीयांच्या चरित्रानुवादात दोन वस्तुतः प्रवासवर्णनेच ठरतात. कोलंबस काय, किंवा कप्तान कुक काय, त्यांच्या जलपर्यटनाचे वर्णन ह्याच त्यांच्या चरित्रातील मुख्य भाग होय. आणखी दोन चरित्रे ही धर्मसुधारकांची चरित्रे आहेत. ल्यूथर आणि महंमद हे दोघेही प्रचलित धर्मात सुधारणा करण्याच्या हेतूने प्रेरित झालेले होते. खुसरू, रशियाची कॅथराइन राणी आणि 'पीतर धि ग्रेत' या राजेलोकांमधील व्यक्ती या, रोमच्या बादशहांच्या बरोबर, चरित्रनायक म्हणून आणखी चार चरित्रांत आल्या आहेत. रॉबर्ट क्लैव आणि जॉर्ज वॉशिंग्टन या प्रत्यक्ष राज्यपदी असलेल्या व्यक्ती नसल्या, तरी बऱ्याच प्रमाणात तसा अधिकार गाजविलेल्या व्यक्ती आहेत. सॉक्रेटीस हा ग्रीक तत्त्वज्ञ आणि बेंजामिन फ्रांकलिन हा अमेरिकन शास्त्रज्ञ या दोन व्यक्ती मात्र या इतरांपेक्षा वेगळ्या क्षेत्रांतील व्यक्ती आहेत. ह्या अनुवादांमागे काय प्रेरणा होती, हा विचार येथेही मनात येणे स्वाभाविक आहे. एवढे खरे की, कोणा तरी इतरांच्या 'आज्ञेने' हे करण्यात आले, आणि या आज्ञेबरोबर दक्षिणाही मिळालेली असे. दक्षिणा प्राइझ कमिटीने खुसरू, कॅथराइन, वाशिंग्तन, फ्रांकलिन, क्लैव व कुक यांच्या चरित्रांची निवड केली होती. पीटरचे चरित्र सरकारी विद्याखात्याच्या प्रेरणेने झालेले दिसते. सारांश, स्वयंप्रेरणेने हे चरित्रकथन झाले, असे म्हणता येत नाही, आणि त्यामुळे चरित्रांत चरित्रनायकाविषयी जिव्हाळाही बेताबाताचाच प्रतिबिंबित झाला आहे. हे सारे चरित्रलेखन एकंदरीत 'निकृष्ट' झाले आहे, असा जो सामान्य अभिप्राय पडलेला आहे, त्याचे कारणही हेच.

**कोलंबसाचा वृत्तांत ( इ. स. १८४९ ) आणि रोम बादशहांचा वृत्तांत ( १८५१ )**

यांपैकी कालदृष्ट्या पहिले चरित्र म्हणजे कोलंबसाचा वृत्तांत हे होय. ते अमेरिकन मिशनकरिता महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी रॉबर्टसनकृत History of America या ग्रंथाच्या दुसऱ्या पुस्तकावरून अनुवादिले आहे. साधे सरळ निवेदन

हे त्याचे स्वरूप आहे. 'रोम बादशहांचा वृत्तांत'ही अमेरिकन मिशननेच तयार करवून घेतलेला आहे. त्या मिशनने ल्यूथर आणि महंमद या धर्मसुधारकांची चरित्रे तयार करून घ्यावी, हे स्वाभाविक होते. त्या चरित्रकारांची नावे मात्र त्यांनी प्रकाशित केली नाहीत.

**साक्रेतिसाचा इतिहास (इ. स. १८५२)**

अनुवादित चरित्रांत पहिले महत्त्वाचे चरित्र म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे ग्रीक तत्त्वज्ञ सॉक्रेटीस याचे चरित्र होय. सात अध्यायांमध्ये आलेले हे चरित्र एका संपूर्ण बुद्धिवादी माणसाचे चरित्र असून तत्त्वाकरिता त्याने प्राणांचीही पर्वा कशीकेली नाही, हे त्यावरून वाचकास कळून येते. परंतु त्याचा जो परिणाम होतो, त्याचे श्रेय मूळ चरित्रनायकास आणि मूळ लेखकास द्यावे लागते. सॉक्रेटिसाचे विशिष्ट तत्त्वज्ञान काय होते, त्याची जपणूक त्याने कशी केली, त्यामुळे आलेल्या प्राणसंकटात तो कसा ताठ उभा राहिला, हे त्यावरून कळते; परंतु त्याची सुसंगत, सुसूत्र मांडणी मात्र या चरित्रात दिसत नाही. चरित्रकार हे सारे तटस्थ राहून लिहीत आहे, असेही वाटते. चिपळूणकरांच्या प्रौढललित भाषेचा प्रत्यय मात्र इतर चरित्रकारांच्या तुलनेने याही ग्रंथात येतो.

**खुसरू राजाचा इतिहास (इ. स. १८५२) आणि कॅथरिनचा इतिहास**

ज्या रोलँनसाहेबाच्या मूळ ग्रंथाच्या इंग्रजी अनुवादावरून कृष्णशास्त्री यांनी साक्रेटीस याचे चरित्र अनुवादिले, त्याच्याच Life of Cyrus-च्या आधारे विष्णू मोरेश्वर भिडे यांनी हे चरित्र लिहिले आहे. खुसरू हा इराणचा राजा, इसवीसनपूर्व सातव्या शतकात होऊन गेला, त्याचे हे चरित्र आहे. याचे दहा अध्याय असून पृष्ठसंख्या १८० आहे. केवळ राजा म्हणून त्याचे चरित्र लिहावयाचे असा हेतू नसून त्याच्या अनेक गुणांमुळेच ते लिहावयाचे, अशी मूळ ग्रंथकर्त्याची भूमिका अनुवादामध्येही स्वीकारिली असल्यास तीमध्ये नवल नव्हते. कॅथरीन राणीचे चरित्र मात्र स्त्रीचे चरित्र आणि भाग्य यांत भरलेल्या आश्चर्यजनक घटनांचे आकर्षण प्रभावी वाटले असल्याने झाले असावे. या दोन्ही चरित्रांना इतिहास हे नाव ऐतिहासिक राजपुरुष वा राजस्त्रिया यांच्या चरित्रानेच इतिहास बनतो, या समजुतींमुळे देण्यात आले असावे.

**राबर्त क्लैव याच वृत्तान्त (१८७३)**

ज्या चरित्रनायकाचे केवळ गुणवर्णन करिता येणे शक्य नव्हते असा हा चरित्रविषय होता. हा वृत्तान्त वि. ना. भागवत यांनी मेकॉलेच्या तद्विषयक निबंधाच्या आधारे सांगितला आहे. "भाषांतरकर्त्याने मूळ ग्रंथातला कितीएक ठिकाणचा जो भाग एतद्देशीय लोकांस समजण्यास दुर्बोध व अनुपयुक्त असा होता, तो गाळून टाकला आहे," असा खुलासा त्याविषयी करण्यात आला आहे. बहुधा तो भाग अनुवादासही कठीण असावा. क्लैव याच्या कर्तबगारीच्या विवेचनाबरोबर त्याच्या दुर्गुणांचाही उल्लेख त्यात येतो, परंतु त्यांचे समर्थन करण्याचा प्रयत्नही त्यात

दिसतो. या दोहोंचेही श्रेय वा दोष भाषांतरकर्त्यास देण्यात अर्थ नाही. कारण त्यास मेकॉलेच जबाबदार आहे. त्या चरित्रास चरित्रापेक्षा इतिहासाचे स्वरूप आले आहे, हे स्वाभाविकच होते. कारण क्लैव हा राजकारणी पुरुष होता आणि त्याच्या करणीमुळे भारताचा इतिहास घडला.

**जार्ज वाशिंग्टन याचा इतिहास' ( इ. स. १८७२ )**

चरित्र चांगले उतरण्यास चरित्रनायकाविषयी लेखकास आत्मीयता वाटणे आवश्यक असते. तशी आत्मीयता वॉशिंग्टनचे मराठी चरित्रकार वि. पु. रानडे यांच्या ठिकाणी असल्याचा निर्वाळा या चरित्रास प्रस्तावना लिहिणाऱ्या विष्णुशास्त्री पंडित यांनी दिला आहे. ते म्हणतात, " वि. पु. रानडे यांस देशाभिमानी पुरुषांचीं चरित्रें वाचण्याचा नाद फार होता. त्यांतही त्यांस जार्ज वाशिंग्टनाचे चरित्र हे तर अत्यंत प्रिय होते. पाल्डिंगकृत वाशिंग्टनच्या चरित्राचीं तर त्या पुरुषानें जशीं कांहीं पारायणेच केलीं. " या घटनेचा परिणाम प्रस्तुत चरित्रावर झाला असणे अशक्य नव्हते. परंतु Chamber's Miscellany-च्या आधारे दक्षिणा प्रा० कमिटीच्याकरिता केलेल्या या अनुवादात ते प्रतिबिंबित होणे कठीणच होते. हे चरित्र दोन वर्षांत खपल्यामुळे त्याची दुसरी आवृत्ती काढावी लागली, त्या वेळी प्रस्तावनाकार विष्णुशास्त्री पंडित यांनी या चरित्रनायकाविषयी आपल्या लोकांत आवड उत्पन्न होईल, असा आशावाद साहजिकच प्रकट केला. त्याचा प्रसार ' विशेषतः विद्यार्थ्यांत ' व्हावा, अशीही इच्छा त्यांनी प्रकट केली. मूळ लेखकापेक्षा प्रस्तावनाकारांस वॉशिंग्टन याचे मोटेपण अधिक पटले असावे, असे त्यांनी लिहिलेल्या दोन्ही आवृत्तींच्या विस्तृत प्रस्तावनांवरून वाटू लागते. विष्णुशास्त्री पंडित यांनी करंदीकराच्या फ्रांकलिनच्या चरित्राचेही ' संशोधन ' केले होते. हे चरित्र स्वतः फ्रांकलिनने लिहिलेल्या पुस्तकावरून भाषांतरित केले होते.

**पीतर धी ग्रेत याचे चरित्र**

प्रस्तुत कालखंडाच्या शेवटी पुढे चरित्रकार म्हणून काही वैशिष्ट्य प्राप्त करून घेतलेल्या वि. को. ओक यांनी लिहिलेले पहिले चरित्र प्रसिद्ध झाले. तो शुद्ध अनुवाद नव्हता ; निदान एकाच ग्रंथाचा नव्हता. ' अनेक इंग्लिश ग्रंथांच्या अधारे ' हे तयार केले होते. हे चरित्र म्हणजे इतिहासाचाच भाग आहे, अशी चरित्रकाराची भावना होती.' इतिहासाचा अत्यंत ग्राह्य अश म्हटला म्हणजे थोर पुरुषांचीं चरित्रें होत,' असे लेखक प्रस्तावनेत म्हणतो. आपल्या ह्या पुस्तकाबद्दलच्या काही अपेक्षाही लेखकाने व्यक्त केल्या आहेत. ' स्वदेशहित करणाऱ्या मेहनती पुरुषाचा कित्ता घेऊन केवळ राजांचेच हित होईल असे नव्हे. साधारण संसारी मनुष्यासहि. . .हित साधता येईल,' असे तो सांगतो. आणि शेवटी ' आमच्या देशांतील राजेरजवाड्यांनीं आणि संस्थानिकांनीं हें पुस्तक वाचावें, त्याचे तात्पर्य समजावें, त्याप्रमाणें वागावें, आणि आपले व आपल्या देशाचे हित साधावें,' अशीही अपेक्षा ते व्यक्त करितात. ' पीतरा'च्या कर्तृत्ववर्णनाबरोबर त्याची काममूलक आणि क्रूर कृत्ये यांचेही वर्णन यात

येते. त्यांचा विशेष निषेध केला, असेही अर्थात झालेले नाही. चरित्राची भाषा ओकांच्या साध्या, सुगम पण निरलंकृत शैलीची प्रातिनिधिक आहे.

मराठीमधील परकीयांची चरित्रें ही या काळातील स्वकीयांच्या चरित्रांपेक्षा अधिक विस्तृत, आणि तेवढ्यामुळे अधिक बरी उतरली आहेत, हे मान्य करावे लागेल. त्याचे श्रेय चरित्रकारांपेक्षा मूळ चरित्रांना देणे योग्य होईल. सर्व चरित्रे कालानुक्रमाने जीवनातील घटनांचे सरळ साधे वर्णन करणारे लेखन या स्वरूपाची होती. त्यांत चरित्रनायकाच्या मनाची, व्यक्तित्वाची, त्या व्यक्तित्वाची घडण करणाऱ्या परिस्थितीची चिकित्सा अभावानेच आढळते. चरित्रकल्पनेमध्ये आज येणाऱ्या अर्थाच्या दृष्टीने त्यांना चरित्रे म्हणण्यापेक्षा चरित्रसाधने म्हणणेच योग्य होईल.

यांशिवाय मराठी ज्ञानप्रसारक मासिकामधून शिवाजी महाराज, अहल्याबाई, बुद्ध, महंमद, सर आयझॅक न्यूटन, विलियम जोन्स इत्यादी थोर व्यक्तींची चरित्रे लेखस्वरूपात प्रसिद्ध झाली होती.

### दादोबांचे आत्मचरित्र

चरित्रांबरोबर आत्मचरित्रांचाही परामर्श ओघानेच येतो. पण जेथे चरित्रेच फार थोडी झाली, तेथे आत्मचरित्रे अपवादभूतच असावी, हे स्वाभाविक होते. आत्मचरित्राची प्रथा आपल्याकडे नव्हतीच, असे म्हणावयास हरकत नाही. नाना फडणवीस आणि गंगाधरशास्त्री पटवर्धन हे अपवाद होते. मुळात गद्यग्रंथलेखनाची परंपरा विशेष सबळ नव्हे. त्यातून केवळ स्वतःविषयी विस्ताराने लिहून ठेवणे यात वाटणारा जो संकोच त्यामुळे आत्मचरित्रलेखनास कोणी प्रवृत्त होत नसे. अव्वल इंग्रजीमधील जवळजवळ एकमेव आत्मचरित्र म्हणून दादोबा पांडुरंगांच्या आत्मचरित्राचा उल्लेख येथे करणे आवश्यक आहे. हे चरित्रही पुढे, म्हणजे प्रथम १९२७ साली विविधज्ञानविस्तारात आणि नंतर १९४७-मध्ये स्वतंत्र ग्रंथरूपाने श्री. अ. का. प्रियोळकर यांनी संपादन केलेले असे प्रसिद्ध झाले आहे. त्याचे लेखन १८६८-मध्ये सुरू झाले होते आणि अधूनमधून थोडे-थोडे असे १८८२-पर्यंत चालू होते. पण यापेक्षा यात आलेला चरित्राचा भाग हा १८१४ ते १८४७ या कालखंडातील आहे, म्हणूनच ते अव्वल इंग्रजीतील आत्मचरित्र ठरत आहे. हे आत्मचरित्र अर्धेच आहे, कारण १८४७ ते लेखकाच्या अंतापर्यंत म्हणजे १८८२-पर्यंतचा भाग त्यात नाही. या एवढ्या अर्ध्या भागात कुलवृत्त व जन्म, बाळपणाचे स्मरण, मराठी शिक्षणाचा प्रारंभ, इंग्रेजीचा पहिलाच अभ्यास, सोसायटीची शाळा, अभ्यासक्रम व गुरू, लग्न, हरि केशवजी, सदाशिव काशिनाथ छत्रे, सोनगीरकरबुवा या व्यक्तींचा परिचय, एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूशनमधील नोकरी, जावरा येथील नबाबाकडील नोकरी, परत मुंबई येथे आगमन, एवढा दादोबांच्या जीवनकथेचा भाग यात आला आहे. त्यांच्या जीवनातील महत्त्वाचा उत्तरार्ध त्यात आलेलाच नाही. फक्त व्याकरणरचनेची मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने महत्त्वाची घटना तेवढी या पूर्वार्धामध्ये घडलेली आहे.

हे आत्मचरित्र व्यक्तिचरित्रापेक्षा समकालीन शैक्षणिक, धार्मिक, सामाजिक आणि काही प्रमाणात राजकीय परिस्थिति यांचे वर्णन आहे आणि या दृष्टीने ते अधिक महत्त्वाचे ठरेल. आत्मचरित्र लिहिण्यात केवळ अनुवाद करण्यापेक्षा स्वतंत्र रचनेची आणि परिश्रमांची अधिक आवश्यकता असते. निदान स्मरणशक्तीला तरी ताण द्यावा लागतो. या दृष्टीने त्यात ग्रंथकर्तृत्व अधिक असते. साधे, निरलंकृत, प्राजल आणि अतिरंजनरहित असे हे दादोबांचे आत्मनिवेदन आहे. त्याला चरित्रात तेवढे महत्त्व नसले, तरी आत्मचरित्रात आहे. त्याच्या भाषेचे वर्णन पांगारकरांनी ' घराऊ मराठी ' आणि बा. गं. खेरांनी ' घरेलु ' या शब्दांनी केले आहे. त्याचा अर्थ तीमध्ये प्रौढता किंवा लालित्य या गुणांनी येणारे वजन वा आकर्षकता हे वाङ्मयीन गुण नाहीत, असा आहे. परंतु ती स्वाभाविक, साधी आणि म्हणून आत्मनिवेदनास इष्ट अशी आहे. आजच्या चरित्रांपासून ज्या अपेक्षा आपण करतो, त्या जशा त्या काळच्या चरित्रांपासून करिता येत नाहीत, तशा आत्मचरित्राविषयीच्या आजच्या अपेक्षा दादोबांच्या आत्मचरित्रापासूनही करिता येत नाहीत.

दादोबांना आत्मचरित्र-लेखनाची स्फूर्ती गुर्जरकवी व कोशकार नर्मदाशंकर लालशंकर यांनी १८६६ साली लिहिलेल्या ' मारी हकीकत ' या आत्मचरित्रावरून झाली असावी, आणि स्वतः नर्मदाशंकर यांना ती स्फूर्ती विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी आपल्या वेदोक्तधर्मप्रकाश या ग्रंथाच्या पंचविसाव्या प्रकरणात केलेल्या आत्मनिवेदनाने झाली असावी, असा एक तर्क दादोबांचे चरित्रकार प्रियोळकर हे करितात. विष्णुबुवांचे आत्मनिवेदन हे १८५९-चे असल्याने अव्वल इंग्रजीतील आत्मचरित्र-कथनाचा पहिला मान त्याच्याकडे जाईल. आपल्यास झालेल्या साक्षात्काराची ' हकीकत ' सांगणारा पाचसहा पृष्ठांचा हा मजकूर चरित्र या नावास पात्र ठरत नाही. आणि त्याचा थाटही संतपरंपरेतील चरित्रलेखनाशी जुळता आहे.

# दोन

## इतिहास-वाङ्मय

### इतिहासलेखनाची प्रेरणा

चरित्रविचारानंतर आपण ओघानेच इतिहासपरामर्शाकडे येतो. चरित्रांपैकी काही इतिहासाच्या स्वरूपाची होती, हे आपण पाहिलेच आहे. नाना फडणविसांच्या चरित्राला तर बखर हेच नाव दिलेले होते. खुसरू, क्लाइव्ह, वाशिंग्टन या ऐतिहासिक पुरुषांची चरित्रे म्हणजे त्या-त्या कालातील इतिहासाचे भागच म्हणावयास हरकत नाही. या चरित्रांबरोबर प्रस्तुत कालखंडात इतिहासग्रंथही लिहिले गेले आणि ते संख्येने चरित्रांपेक्षा अधिक, मजकुराच्या दृष्टीने अधिक भरदार, आणि विषयदृष्ट्या अधिक विविध असे लिहिले गेले असे दिसून येते. चरित्रग्रंथलेखनाला नैमित्तिक कारण काहीही असले, तरी अभ्यासक्रमाच्या दृष्टीने उपयुक्तता हे कारण काही सांगता

येण्यासारखे नव्हते. नवीन शिक्षणक्रमाने इतिहाससंबंधी मात्र अशी उपयुक्तता आणि आवश्यकता निर्माण झालेली होती. ( ग्रॅण्ट डफच्या ' बखर मराठ्यांची ' या पुस्तकास ' वाचनबुक ' म्हणून मराठी शाळांतून स्थान मिळाले असल्याचा उल्लेख नी. ज. कीर्तने यांनी केला आहे.) यामुळे लहानमोठी अशी साठपर्यंत इतिहासपुस्तके या कालखंडात छापून प्रसिद्ध झालेली दिसतात. (एकाच ग्रंथाचे अनेक भाग म्हणजे अर्थात एकेकच ग्रंथ गणावा लागेल.) त्यांतील संक्षेप, सारांश, सार, टाचण, प्रश्नोत्तरे या स्वरूपाची पुस्तके बरीच म्हणजे किमान वीस तरी असतील. त्यांच्या शीर्षकांमध्येच ही कबुली दिलेली असे. इतिहासलेखनामध्येही अनुवादांचे प्राबल्य फार आहे, हे वेगळे सांगावयास नको. किंबहुना, नवीन इतिहासलेखनास अनुवादानेच प्रारंभ झाला, हेही मान्य करावे लागेल. या अनुवादांचे मूळ इंग्रज लेखकांच्या ग्रंथांत सापडते. या लेखकांत ग्रॅट डफ, एल्फिन्स्टन, मरे, मॅक्डोनाल्ड, पीनॉक, टॉड इत्यादी साहेब आहेत. या अनुवादांचा मूळ हेतू पुष्कळ अंशी शालेय अभ्यासक्रमाची गरज भागविणे हाच असला, तरी ग्रॅट डफ अथवा एल्‌फिन्टन यांचे मूळ ग्रंथ किंवा त्यांचे अनुवादही मुळात इतर वाचकांकरिता झाले असावेत, असे वाटते. पूर्वीचे शाळेतील विद्यार्थी प्रौढ असत, हे लक्षात घेऊनही या ग्रंथांचे स्वरूप केवळ शालेय वाटत नाही. डफच्या पुस्तकाचे भाषांतरही ' त्यांतील गोष्टी महाराष्ट्र-मुलखी **लोकांस** फार हितावह आहेतशा समजून सरकार कंपनी इंग्रेज बाहादूर यांचे आज्ञेवरून ' करण्यात आले होते. याचा अर्थ इतिहासाविषयी अधिक आवड, जिज्ञासा वा आस्था निर्माण करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न होऊन पुढे तिला फलही आले होते, असा करावा लागतो. या कालखंडाची एकंदर ज्ञानार्जन आणि ज्ञानदान करण्याची प्रवृत्ती काही प्रमाणात तरी या इतिहासलेखनामागे होती. शालेय जगात काही मर्यादित प्रमाणात इतिहासाच्या ज्ञानाची अवश्यकता असली, तरी त्याबाहेरच्या जगतात ती नव्हती. शाळांतून प्रथम मराठ्यांच्या, नंतर हिंदुस्थानाच्या आणि त्यानंतर वा त्याबरोबरच राज्यकर्ते जे इंग्रज लोक, त्यांच्या इतिहासाच्या अध्ययनाची आवश्यकता असणार. परंतु परराष्ट्रांचे इतिहास किंवा जगाचे इतिहास यांच्या अध्ययनाची तादृश गरज नसावी. हे इतिहास सामान्य ज्ञानाभिलाषेमधून किंवा ते ज्ञान देण्याच्या इच्छेमधूनच निर्माण झाले असले पाहिजेत. प्रस्तुत कालखंडातील इतिहासलेखनाची प्रेरणा याप्रमाणे द्विविध होती : (१) शालेय अभ्यासामध्ये उपयुक्तता, आणि (२) सामान्य जिज्ञासा , ज्ञानाभिलाषा. या दोहोंबाबतही अखेरचे श्रेय परकीय इंग्रज राज्यकर्ते यांच्याकडेच जाईल, असे मानण्यास प्रत्यवाय नाही.

### निरनिराळे इतिहास

या इतिहासलेखनास प्रारंभ मराठ्यांच्या इतिहासाने व त्यातही ग्रॅण्ट डफच्या इतिहासाने होतो. त्याचे किंवा त्याच्या ग्रंथाच्या ईजडेलने केलेल्या संक्षिप्त रूपाचे हे अनुवाद होते. मराठ्यांच्या या बखरीबरोबर साताराचे छत्रपती, नागपूरचे भोसले,

ग्वाल्हेरचे शिंदे अलिजाबहाद्दर, पंतप्रतिनिधी इत्यादी ऐतिहासिक घराण्यांचे इतिहास किंवा इतिहासवजा पुस्तके झाली. हिंदुस्थानातील गुजरात, राजस्थान, गोमंतक व मैसूर इत्यादी अन्य प्रांत आणि संस्थाने यांचेही इतिहास होते. हिंदुस्थानातील प्रदेशांप्रमाणे सबंध हिंदुस्थानचा इतिहासही व्यापकपणे लिहिला जावा, हे स्वाभाविक होते. येथेही ग्रँट डफप्रमाणे एल्फिन्स्टन हा परकीय साहेबच प्रेरक ठरला असावा. हे ग्रंथ साहजिकच अनुवाद, सारांश, संक्षेप अशा स्वरूपाचेच होते; स्वतंत्र असे लेखन फारच थोडे होते. हिंदुस्थानाबाहेरील देशांत इंग्लंडचा अंतर्भाव प्राधान्याने व्हावा, हेही स्वाभाविक होते. इतर राष्ट्रांत ग्रीस, रोम, मिसर हे देश आणि असीरियन, बाबिलोनियन हे लोक आहेत. हे अर्थात प्राचीन कालाचे इतिहास होत. अर्लीकडे फ्रेंच आणि जर्मन या लोकांच्या लढायाचा इतिहास हा एकच अर्वाचीन कालाचा इतिहास म्हणता येईल. याहीपेक्षा व्यापक इतिहास म्हणजे सबंध जगाचा इतिहास. याबाबत आपल्या लोकांचा अधिकार किती होता, हे सांगावयास नको. तथापि याही स्वरूपाची ५-६ पुस्तके प्रस्तुत कालखंडात झाली आहेत. शिवाय, इतिहासरचनेस उपयुक्त किंवा अंगभूत अशी शकावल्यांसारखी चारपाच पुस्तकेही तयार झाली होती, हेही येथे नमूद करून ठेवणे आवश्यक आहे.

### ' डफ'चे युग

इतिहासवाङ्मयाच्या या प्रस्तुत कालखंडास ' डफचे युग ' असे नाव द. वा. पोतदार यांनी दिले आहे. ते सार्थ वाटते ते अशासाठी की, १८२–९३०-मध्ये डफच्या इंग्रजी ग्रंथाचा मराठी अनुवाद छापून प्रसिद्ध झाल्यापासून इ. स. १८६८-पर्यंत त्याच्या अकरा आवृत्त्या प्रकाशित झाल्या. मराठ्यांच्या इतिहासाबाबत हेच पुस्तक प्रमाणभूत मानिले गेले होते. डफचा ग्रंथ ' केवळ इंग्रजच नव्हेत, तर हिंदुस्थानातील नेटिव्हसुद्धा प्रमाणभूत मानीत.'[१] १८६७ साली कीर्तने यांनी ' आपणांस पंख फुटतात, न फुटतात तोच ग्रँट डफचा ग्रंथ अपुरा आणि अधुरा आहे असे धीटपणे कॉलेजात प्रतिपादन करीपर्यंत'[२] त्या ग्रंथातील दोषाकडे कोणाचे फारसे लक्ष गेले नव्हते, किंवा विरोधाची वाचा फुटली नव्हती. डफने त्याकरिता फार कष्ट केले होते आणि पदरमोडही बरीच केली होती. आपल्या या ग्रंथाचे History of the Mahrattas हे नाव बदलून दुसरे काही नाव देण्याची प्रकाशकाची सूचना अमान्य करून त्याने हा ग्रंथ प्रकाशित केला होता. त्याचा इतिहास हल्लीच्या मानाला चालण्यासारखा नसला, तरी पहिला प्रयत्न आणि तोही मराठ्यांच्या प्रतिपक्षातील एका लष्करी माणसाने केलेला, म्हणून जर त्याकडे पाहिले, तर ग्रॅण्ट डफचे कोणीही कौतुकच करील,[३] असाही

१. मराठी इतिहास व इतिहास संशोधन, अर्वाचीन मराठी साहित्य, पृ. ३२०.
२. ,, ,, ,, पृ. ३२२.
३. ,, ,, ,, पृ. ३२१.

अभिप्राय पोतदार यांनी देऊन ठेविला आहे. डफ, एल्फिन्स्टन, माल्कम यांनी आपले इतिहासग्रंथ इंग्रजीत लिहिले, परंतु आपल्याकडील विद्वानांनी शाळांसाठी त्यांची नुसती भाषांतरे केली, यापलीकडे त्यांनी फारसे परिश्रम केले नाहीत, असेही आपले स्पष्ट मत त्यांनी प्रकट केले आहे. यावरून त्या कालखंडातील एकंदर इतिहास-लेखनातील कर्तृत्वाच्या श्रेयाची वाटणी कशी झाली आहे, याची कल्पना येण्यासारखी आहे. डफच्या भाषांतरित ग्रंथाचा उपयोग मात्र इतिहासलेखनातील नवीन दृष्टी आणि पद्धती कशी असावयास पाहिजे, याची कल्पना येण्याच्या दृष्टीने झाला, हे मान्य करावयास हवे. अस्सल साधनांचा उपयोग करून, त्यांच्या आधाराने घटनांचा कालानुक्रम ठरवून, त्यास अनुसरून माहितीची मांडणी करणे हे इतिहासलेखनात किती आवश्यक आहे, याचीही कल्पना आपल्यास डफच्या ग्रंथावरूनच प्रथमतः आली. डफवर हल्ला करणाऱ्या कीर्तन्यानीही "वर सांगितल्याप्रमाणे या ग्रंथांतील कांहीं व्यंगें आम्ही दाखविलीं म्हणून त्या ग्रंथाविषयीं पूज्य बुद्धि कोणापेक्षाही आमची कमी आहे असे कोणी काडीमात्रही समजूं नये,' असे उद्गार काढले आहेत. आरंभीचे आपले मराठ्यांच्या इतिहासाविषयीचे ज्ञान डफच्या इतिहासावरच आधारलेले असे.

## मराठे आणि मराठे राजघराणी यांचा इतिहास

मराठीमधील मुद्रित अशा इतिहासवाङ्मयाचा प्रारंभ १८२९—३०-मध्ये प्रकाशित झालेल्या डफच्या पुस्तकाचा 'बखर मराठ्यांची' असा जो अनुवाद प्रसिद्ध झाला, तेव्हापासून झाला, असे समजावयास हरकत नाही. तेव्हापासून पंधरा वर्षेपर्यंत या पुस्तकाचे अधिराज्य चालू होते. यास अपवाद म्हणून काही पुस्तकांचा उल्लेख मात्र करावयास हवा. डफच्या इतिहासाआधी जवळजवळ पंधरा वर्षे म्हणजे १८१६-मध्ये बंगालमधील सेरामपूर येथील छापखान्यात 'रघूजी भोसल्याची वंशावळी' या नावाचे पुस्तक छापले गेले होते. ते शिळाछापावर आणि मोडी लिपीत छापिले गेले आहे. वंशावळ असे नाव असले, तरी ती केवळ वंशावळ नाही; तीत इतिहासही ग्रथित झालेला आहे. एकंदर आवाका सुमारे शंभर लहान पृष्ठे इतका लहानच आहे, आणि बखरीच्या पद्धतीनेच ती लिहिली गेली आहे; तीत आधुनिकता नाही. मुद्रित म्हणून नवीन इतिहासवाङ्मयातील पहिले पुस्तक असे म्हटले, तरी पद्धती जुनी असल्याने बखर-वाङ्मयातच त्याचा समावेश करणे योग्य होईल. १८३० आणि १८४०-च्या दरम्यान इंग्लंड आणि इतर परकीय लोक यांच्या इतिहासाविषयी पाच-सात पुस्तके झाली, परंतु या देशाच्या इतिहासाशी त्यांचा संबंध नसल्याने त्यांचा विचार येथे येत नाही.

## बखर मराठ्यांची – केपिन आणि साने

"बखर मराठ्यांची—क्यापटन ग्रांट डफ याणी—इंग्रजींत केलेली तीचें—भाषांतर — क्यापटन डेविड केपनसाहेब यांणीं महाराष्ट्र भाषेत केले. मुंबई जानेवारी

सन १८३०" असा मजकूर दोन-चार शब्दांच्या ओळी एकीखाली एक अशा देऊन पहिल्या पानावर दिलेला आहे. त्याच्या समोरच्या पानावरील मजकुरात कप्तान केपिन साहेबाबरोबर बाबा साने यांचा उल्लेख सहायक या नात्याने केला आहे, आणि 'सन अठराशे एकुणतिसांत मुंबईमध्ये छापिली' असा छपाईच्या कालाचा उल्लेख केला आहे. बखरीचा आकार फूल्सकॅप असून पृष्ठात बराच मजकूर मावतो आणि अक्षर मोठे नसून सुबक आहे. तीत अशी पृष्ठे सवाचारशेपेक्षा अधिक आहेत, म्हणजे ग्रंथ या दृष्टीने तो भारदस्त झाला आहे, यात शंका नाही. त्या कालातील आणि नंतरच्या ३०–४० वर्षांच्या ग्रंथनिर्मितीच्या तुलनेने पाहता हे एक मोठेच काम झालेले होते, असे म्हणावयास पाहिजे ग्रंथकाराचा लेखनहेतू जो सांगितला आहे, तोही लक्षात घेण्यासारखा आहे. तो असा:–" महाराष्ट्र लोक इतक्या योग्यतेस कसे चढले, ते समजावयास त्या लोकांचे प्राचीन वृत्त ध्यानास आणिले पाहिजे. तेणेकरून विलायतेतील लोकांसही विदित होईल." त्यातील गोष्टी महाराष्ट्रीय लोकांसही 'फार हितावह' असे समजून कंपनी सरकारनेच हे भाषांतर करविल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. स्वतः डफला मात्र मूळ ग्रंथ लिहिण्यास बरेच परिश्रम पडले. नेहमीचे काम करूनच त्याने उरलेल्या वेळात अविश्रांत श्रम केले डोकेदुखीची व्यथा मनावर न घेता, ती वेळ टाळून मॉरिस यास साहाय्यास घेऊन त्याने सामग्री जमा केली व ती संगतवार लाविली. तथापि लेखन येथे न करिता इंग्लंडमध्येच केले. मरे नावाच्या एका प्रकाशकाने मोगलांचा पाडाव किंवा ब्रिटिशांचा हिंदुस्थानातील इतिहास यासारखे नाव दिल्यास आपण प्रकाशित करू, असे सांगितले असताही History of the Mahrattas हेच नाव कायम करून त्याने हे प्रकाशन केले आणि तो या कामात '१७००० रु.पेक्षा जास्त रुपयांस' बुडाला. त्याला साताऱ्चे दप्तर उपलब्ध होते, तथापि पुणे येथे आणि इतरत्र जी माहिती मिळण्याचा संभव होता, तेथून ती मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला. त्या बखरीचा अनुवाद करणाऱ्यांना अर्थात हे कष्ट करावे लागले नाहीत. त्या लेखनाचे श्रेय आणि अर्थात पुढे त्यावर आलेले आक्षेप हे डफच्याच हिशेबी जमा व्हावयाचे. अनुवादासंबंधी एवढेच म्हणता येते की, "त्या वेळच्या इतर ग्रंथांच्या मानाने हे भाषांतर फार चांगले उतरले आहे. यांतील भाषा प्रौढ पण सुबोध आहे." ऐतिहासिक ग्रंथांची परिभाषा मराठेशाहीतच निश्चित झाली असल्याने भाषांतरकर्त्यास तेवढा फायदा मिळाला आहे, असेही याबाबत म्हणता येण्यासारखे आहे.

## डफच्या अनुवादाचे संक्षेप

डफची ही बखर 'वाचनबुक' म्हणून शाळांतून नेमिली गेली असली, तरी तिचा अभ्यास व वाचन शालेय विद्यार्थ्यांस झेपणे कठीणच होते. म्हणून तिचे संक्षेप विद्यार्थ्यांकरिता व्हावेत, हे स्वाभाविक होते. हा संक्षेप प्रथम इंग्रजीतच ईजडेल-साहेबाने प्रश्नोत्तररूपाने केला, आणि त्याचेच मराठी भाषांतर सरकारी इंग्रजी शाळेतील

विद्यार्थी कुशाबा लिमये यांनी करून क्यांडीसाहेबास ते नजर केले. पाउणशे लहान पृष्ठांच्या या पुस्तकाचा हेतू आणि त्याचे रूप ही अगदीच सामान्य उतरावी, यात आश्चर्य नव्हते. विद्यार्थ्यांची गरज पाहून लहान प्रश्नोत्तररूप पुस्तके काढण्याची प्रथा आजची नसून सवाशे वर्षांइतकी जुनी आहे, हा त्याचा अर्थ आहे. १८६६-पर्यंत या पुस्तकाच्या नऊ आवृत्त्या निघाल्या. इ. स. १८४०-मध्ये हे पुस्तक तयार झाले होते आणि त्याचे नाव 'महाराष्ट्र देशाचे वर्णन' असे होते. पुढे १८६१-मध्ये मराठ्यांचा संक्षिप्त इतिहास आणि १८६६-मध्ये 'शाळांकरिता महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास' ही पुस्तके प्रसिद्ध झाली. हे दुसरे पुस्तक बाबा पद्मनजींनी लिहिले आणि ख्रिश्चन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीतर्फे प्रकाशित झाले. लहान आकाराच्या ८६ पृष्ठांच्या या पुस्तकात प्राचीन काळापासून इंग्रजी अंमल येईपर्यंत महाराष्ट्रात कोणकोणत्या राजवटी होत्या, हा संक्षिप्त इतिहास दिला आहे. एवढ्या थोड्या जागेत ही माहिती द्यावयाची म्हणजे ती किती त्रोटक आणि केवळ विधानरूप असेल, याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. शेवटी मुसलमानी धर्म व हिंदुधर्म नष्ट होत असल्यामुळे लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारावा, असा उपदेशही त्यात आला आहे.

### कीर्तने यांची डफवरील टीका

१८६७ साली पूना यंग मेन्स अ‍ॅसोसिएशनपुढे त्या वेळी डेक्कन कॉलेजमध्ये विद्यार्थी असणाऱ्या नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनी वाचलेल्या निबंधाने मराठ्यांच्या इतिहासाविषयीच्या विचाराला फार जोराची कलाटणी मिळाली. त्याच वर्षी तो निबंध इंदुप्रकाशामध्ये प्रकाशित झाला. निबंध वाचला गेला, त्या वेळी अध्यक्षस्थानी कृष्णशास्त्री चिपळूणकर होते आणि उपस्थित मंडळींत शंकर पांडुरंग पंडित होते. अशा लोकांसमोर विद्यार्थिदशेतच मोठ्या प्रौढपणे कीर्तने यानी टीका केली आहे. मराठी कवितेप्रमाणे मराठी इतिहासास सरकारने उत्तेजन दिले नाही असा आक्षेप घेऊनच ते पुढे विवेचनास प्रारंभ करितात. सरकारी अधिकारी हॉवर्ड आणि ग्राण्ट यांना वर उल्लेखिलेल्या लिमये यांच्या 'महाराष्ट्र देशाच्या वर्णना'पेक्षा मोठे पुस्तक विद्यार्थ्यांनी वाचण्याची आवश्यकता वाटत नाही, असे सांगून १८६६-पर्यंत झालेल्या इतर पुस्तकांत 'उत्तम तर नाहीच, परंतु मध्यम असेहि मोठ्या प्रयासाने म्हणावें लागते," अशीच पुस्तके असल्याचा उल्लेख केला आहे आणि नंतर "ग्राण्ट डफ-साहेबाचे इतिहासाविषयीं आपले मत निराळे आहे असे नाही," असेही स्पष्ट म्हटले आहे. डफच्या ग्रंथाविषयीचे हे विधान खरोखरच धक्का देणारे होते. डफसाहेबास उपलब्ध असलेली साधने आणि मिळालेले साहाय्य पाहता "त्यावरहि मोठी सुंदर इमारत उठली आहे असे म्हणवणार नाहीं," असे आपले मत कीर्तने यांनी दिले आहे. जुन्या बखरींमधून "स्वराज्यप्रीति आणि धर्म यांचे अभिमानाने जो एक प्रकारचा रंग उठला आहे, तोहि साहेबांचे ग्रंथांत नाहीं." डफच्या पुस्तकातदेखील "कांहीं मागचे पुढें व पुढचें मागें, कित्येक गोष्टी अगदींच गाळून टाकणें व कित्येक गोष्टींचा विस्तार

करणें इत्यादि गोष्टी केल्यास बरीच सुधारणा होण्यासारिखी आहे." असे पुढे एके ठिकाणी कीर्तने म्हणतात. काय यावयास पाहिजे होते ते सांगताना "शालिवाहनाचे नांव नाहीं, मराठीमधील प्रमुख ग्रंथांची माहिती नाही, प्राचीन इतिहासाची माहिती संगतवार जशी असावी तशी नाहीं, सध्याचीं मराठी कुळे कोठून कोण आलीं यांची माहिती नाहीं," इत्यादी उणिवा त्यांनी दाखविल्या आहेत. त्यामुळे 'हा मराठ्यांचा इतिहास' होण्यापेक्षा 'मराठ्यांच्या मोहिमांचा इतिहास' असेच नाव त्यास योग्य होईल, असे त्यांचे म्हणणे आहे. कोणत्याही राजाच्या कारकीर्दीत जे मोठमोठे पुरुष झाले, त्यांच्या स्वभावांचे आणि वर्तनाचे म्हणण्यासारखे वर्णन नाही, अशीही त्यांची तक्रार आहे.

कीर्तने यांचा यांपेक्षा महत्त्वाचा आक्षेप आहे, तो डफच्या मराठे आणि शिवाजी यांसंबंधीच्या असलेल्या प्रतिकूल वृत्तीवर. डफसाहेबाने "शिवाजीच्या वर्तणुकीवर आपलें जे मत दिले आहे, ते प्रायः मात्र आम्हास मान्य आहे," असे म्हणूनही ते सांगतात की, "डफसाहेबांचे हातून एकच चुकी झाली आहे, ती ही कीं त्यांनीं शिवाजीचे चरित्र लिहितांना मराठ्यांचे लेखांवर भरोसा ठेवणे योग्य आहे तितका ठेविला नाही." शिवाजीची प्रजा गांजलेली असावी, असा जो तर्क डफसाहेबाने केला आहे, तो आपणांस मान्य नाही, असे त्यांनी स्पष्टपणे सांगितले आहे. या अनुमानाने त्याला त्याच्या लोकांनी मनापासून जे साहाय्य केले, त्याची संगती लागणार नाही, असे त्यांचे म्हणणे आहे. अफझलवधाबाबत त्यास जे दोष देतात, त्यांनी मराठी इतिहासकार त्याबाबत काय म्हणतात, त्याचा विचार करावयास पाहिजे. तो डफसाहेबानेही केला नाही, ही मोठीच शोचनीय गोष्ट आहे, असे कीर्तने म्हणतात. "तेव्हाची युद्धाची रीति, शत्रूंशी वागण्याची रीति व राज्यनीति यांचा पूर्ण विचार केल्याशिवाय डफसाहेबाने त्यास उगीच शिव्या दिल्या आहेत," असे सांगून "लोकांच्या विवाहित स्त्रिया हिराऊन घेण्याकरितां मोहिमा करणाऱ्यांच्या इतिहासकारांनी शिवाजीस अनीतिमान, दगलबाज व चोर इत्यादि पाहिजे तसे दोष दिल्यास ते त्यांस शोभणारेच आहेत," असाही शेरा त्यांनी दिला आहे. चिमाजीअप्पांस कवायती पलटणे आपल्याकडे असावीत असे वाटले हे चूक होते, या डफच्या मताशी आपला विरोधही त्यांनी दर्शविला आहे. शेवटी मराठ्यांच्याविषयी आपली मते त्यांनी प्रकट केली आहेत, ती त्या कालात आणि कॉलेजमध्ये असताना निर्भयपणे कीर्तने यांनी पुढे मांडिली, हे तर फारच कौतुकास्पद आहे. ते म्हणतात, "एक बाजीरावाच्या राज्यांत अंदाधुंदी झाली म्हणून सर्व मराठेशाईस, जिच्यायोगे या मराठ्यांचे देशावर अगणित उपकार झाले आहेत, ते सर्व विसरून तीस दोष द्यावा आणि तिच्या गुणांचे वर्णन करूं नये हा केवळ एक पक्षाचा न्याय होय असें आमचे मुकरर मत आहे." तसेच "मराठ्यांनीं, ज्या देशात शूर लोक नाहींत असा अपवाद आला होता, त्या देशांत शौर्याचीं कृत्ये करून या देशास मोठेपणा आणला. आपण कोणाचेहि ताबेदार नाहीं असा आव घालून स्वतंत्र राज्याचा पाया घातला व देशाभिमान धरिला, इत्यादि स्तुत्य कृत्यें करूनच जरी ते राहिले असते तरी

ते स्तुतीस पात्र होते. त्यांचे राज्य जरी धर्माचे आणि हिंदु जातीचे अभिमानानें उद्भवलें; तथापि त्यांच्या राज्यांत इतर धर्मांचे लोकांस इजा पोंचली नाहीं. ब्राह्मण व मराठे लोकांस मोठमोठ्या जागा मिळत, त्याप्रमाणेच मुसलमानांसहि मिळत," हेही त्यांनी निदर्शनास आणून दिले आहे. शेवटी ते असेही विचारतात की, इंग्रजी राज्यात शांतता नांदत आहे, तीपुढे या साऱ्या गोष्टींचे काहीच महत्त्व नाही काय? कीर्तने यांनी आपल्या टीकेमध्ये केवळ डफच्या उणिवाच दाखविल्या असे नाही, त्यांनी इतिहासाकडे आणि मराठ्यांच्याकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोणच दिला. त्यांच्या या निबंधात स्वतंत्र विचार आणि निर्भयपणा आहे एवढेच नव्हे, तर भाषेची प्रौढता आणि मतप्रकटनामधील संयमही आहे. एका कॉलेजमधील विद्यार्थ्याने स्वतःस बहुवचनी उल्लेखून जी टीका केली आहे, तीस आवश्यक अशी आपली योग्यताही त्यांनी प्रकट केली आहे. या निबंधाचा पहिला मसुदा प्रथम इंग्रजीत तयार केला होता, हेही जाता-जाता येथे नमूद केले पाहिजे.

## मराठे घराण्यांचे इतिहास

मराठेशाहीतील सरदार घराण्यांचे इतिहास म्हणजे मराठेशाहीच्या इतिहासाचा खरोखर पायाच होय. परंतु त्याकडे फारसे कोणाचे लक्ष १८६०-पर्यंत गेले नव्हते. रघूजी भोसल्यांच्या वंशावळीचा याबाबत एक अपवाद होता. १८६६ ते १८७२-च्या दरम्यान साताऱ्च्या छत्रपती महाराजांच्या वंशाचा इतिहास, त्यांच्या प्रतिनिधींच्या घराण्याचा इतिहास, शिंदे अलिजाबाहादूर ह्यांच्या घराण्याचा इतिहास असे ग्रंथ प्रकाशित झाले. परंतु याबाबत प्रारंभ त्रुटित निबंधस्वरूपात का होईना, लोकहितवादी यांनी आपल्या इंदुप्रकाशातील निबंधांमधून १८६२-पासूनच केला होता. आपल्या ५–७ पृष्ठांच्या निबंधामधून शिंदेसरकार, होळकर, गायकवाड, निजाम, साताऱचे छत्रपती, त्यांचे प्रतिनिधी यांच्या वंशाविषयी माहिती त्यांनी दिली होती. त्याचबरोबर पेशवेपदाचा इतिहास, कंपनीसरकारच्या कारभाराची अखेर, पुणे-दप्तर, यांच्याही-विषयी त्यांनी निबंध लिहिले आहेत. निबंधास मिळणारी वर्तमानपत्रांतील जागा पाहता त्यांचे स्वरूप त्रोटक व माहितीकोशाचे असणे अपरिहार्य होते. त्याच्या वृत्तवैभवातील निबंधांतून ब्राह्मण, मुसलमान, पारशी, ग्रीक, इस्रायल इत्यादी समाजांविषयीच्या माहितीबरोबर थोडा इतिहास येणे स्वाभाविकच होते. त्यांतील हिंदुलोकांची प्राचीन विद्या, प्राचीन स्थिती, हिंदुस्थानातील देश, मनुष्याची मूळ पीठिका, हिंदुस्थानचे स्थित्यंतर, फड व पेशवाईतील माहिती याही लेखांमधून इतिहासच भरलेला आहे, असे म्हणावयास हरकत नाही. या सर्वांच्या मुळाशी त्यांची चौकसबुद्धी, परिश्रमशीलता, मिळविलेले ज्ञान आपल्या लोकांस देण्याची इच्छा या गुणांचे दर्शन आपल्यास होते, आणि त्यांच्या व्यापक जिज्ञासेचा प्रत्यय येतो.

## लोकहितवादींचे इतिहासग्रंथ

ग्रंथरूपाने लोकहितवादींनी केलेले लेखन हे प्रस्तुत कालखंडाच्या बाहेरच

पडते. ते विपुल आहे. ऐतिहासिक गोष्टी आणि उपयुक्त माहिती ही ग्रंथरूपाने १८७७ साली प्रसिद्ध झाली असली, तरी ती पुष्कळशी निबंधस्वरूपात तरी आधी प्रसिद्ध झालेली होती. पानिपतची लढाई (१८७७), हिंदुस्थानचा इतिहास-पूर्वार्ध (१८७८), सुराष्ट्र देशाचा ससाक्ष इतिहास ( १८८१ ), पृथ्वीराज चव्हाण याचा इतिहास (१८८३ ), गुजरात देशाचा इतिहास ( १८८८ ), लंकेचा इतिहास ( १८८८ ) उदेपूरचा इतिहास ( १८९२ ), राज्यस्थानचा इतिहास ( १८९२ ) एवढे त्यांचे पुस्तकरूपाने प्रकाशित झालेले ऐतिहासिक वाङ्मय आहे. पैकी सुराष्ट्रदेशाचा आणि लंकेचा इतिहास हे आधी लोकहितवादी या मासिकातून प्रसिद्ध झाले होते. यांतील बहुतेकांस इतर ग्रंथांचे आधार आहेत. 'पानिपतच्या लढाई'स काशीराजाच्या फारसी ग्रंथाच्या इंग्रजीत तर्जुम्याचा व 'पृथ्वीराज चव्हाणा'स चंदवरदायी याच्या पृथ्वीराज रासोचा आधार होता. हिंदुस्थानच्या इतिहासास इंग्रजी, सुराष्ट्र देशाच्या इतिहासास गुजराती, लंकेच्या इतिहासास इंग्रजी, आणि गुजरातच्या इतिहासास अनेक इंग्रजी-गुजराती इतिहासग्रंथ आधाराला होते. पण ग्रंथांचा आधार असला, तरी ते केवळ अनुवाद नाहीत. त्यांत निवड आणि मांडणी या स्वतंत्र रचनेच्या गुणांस अवकाश असतो. शिवाय, गुजरातच्या इतिहासास त्यांनी शेवटी एक देशी संस्थान आणि ब्रिटिश हिंदुस्थान यांची कलमवारीने केलेली तुलना जोडलेली आहे, तीत स्वतंत्र विचार व मनन यांचा प्रत्यय येतो. ग्लीगच्या हिंदुस्थानच्या इतिहासाच्या भाषांतरास जोडलेली मुसलमानी धर्माविषयी सुमारे दीडशे पानांची प्रस्तावना स्वतंत्र विवेचन या दृष्टीने महत्त्वाची ठरेल. याप्रमाणे मराठी इतिहासवाङ्मयात लोकहितवादींनी विपुल भर टाकिली आहे, हे उघड आहे. ती प्रत्यक्ष प्रस्तुत कालखंडात पडत नसली, तरी मराठी इतिहासाच्या अनुवाद-युगातच बसणारी आहे, म्हणून तिचा निर्देश येथेच केला आहे. त्या मानाने प्रस्तुत कालखंडात बसू शकणारे भरतखंड-पर्व हे १८५१-मधील शिळाछापावरील ५६ पृष्ठांचं 'हिंदुस्थान देशाचा साद्यंत( ? ) इतिहास' देणारे पुस्तक केवळ नामोल्लेखावरच भागविण्यासारखे ठरते.

## प्रतिनिधी आणि शिंदे यांची घराणी

या स्वरूपाची तीन पुस्तके १८६६ ते १८७२-पर्यंत झाली. त्यांपैकी एक केवळ प्रतिनिधी-घराण्याची माहिती देणारे, एक शिंदे घराण्याचा इतिहास सांगणारे आणि एक 'सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजीमहाराज यांचे वंशाचा इतिहास प्रामुख्याने देणारे आणि शिवाय प्रतिनिधि आणि अष्टप्रधानांची' माहिती देणारे अशी ही तीन पुस्तके आहेत. हे शेवटले पुस्तक भोरचे विष्णू गोपाळ भिडे यांनी तयार केले. अडीचशे पृष्ठाच्या या शिळा-छापातील पुस्तकात शिवाजीपासून अलीकडेपर्यंतची भोसले-घराण्याची, सातारा-शाखेची माहितीच मुख्यतः देण्यात आली. लेखक पंतसचिव यांच्या निसबतीस असल्याने परंपरागत माहिती त्यास बरीच अवगत असावी. आपला हा ग्रंथ सातारच्या

दप्तरातील माहितीवरून लिहिला, असे त्याने स्पष्ट म्हटलेही आहे. अनुवादांच्या चाकोरीतून बाहेर पडल्याची ही खूण होती. भोसले-घराण्याबरोबर अष्टप्रधानांच्या माहितीचीजोड या मुख्य भागास दिलेली आहे. सातारच्या छत्रपतींच्या प्रतिनिधि-घराण्याचा इतिहास गोपाळ बल्लाळ टापरे यांनी ६०–६५ पृष्ठांमध्ये दिला आहे. 'दप्तरच्या कागद-पत्रांवरून व इतर माहितीवरून' प्रारंभापासून १८६६-पर्यंतची माहिती त्यांत दिलेली आहे. सरंजामे यांच्या पुस्तकात दीडशे पृष्ठांत शिंदे-घराण्याची हकीकत देण्यात आली आहे. या पुस्तकांचे स्वरूप कमी-अधिक प्रमाणात माहितीच्या कोशाचे असते. त्यांत विवेचनास विशेष जागा मिळत नाही. इतिहासग्रंथांस जिवंतपणा येण्यास वर्णन-विवरण- विवेचन यांचा मालमसाला असावा लागतो. त्याशिवाय तो नुसत्या घटना-तारखा-सन यांचा सांगाडाच राहतो. तथापि इतिहासलेखनास स्वतः काही श्रम करून माहिती जमवून तिची जुळवाजुळव करावी लागते. याची जाणीव आपल्यास होऊ लागली होती आणि तसे करण्याची तयारी होऊ लागली होती, ही गोष्ट स्वागतार्हच होती.

### हिंदुस्थानचे इतिहास

मराठ्यांच्या इतिहासाबाबत डफचे युग चालू होते. तर हिंदुस्थानच्या इतिहास-संबंधात एल्फिन्स्टनचे युग चालू होते, असे म्हणता येईल. तथापि मरे आणि मॉरिस या दोघांचाही भाग त्यामध्ये होता. हिंदुस्थानच्या इतिहासास १८४६ साली बाळशास्त्री जांभेकरांनी केलेल्या एल्फिन्स्टनच्या History of India या पुस्तकाच्या संक्षेपरूप पुस्तकाने सुरुवात करून दिली आणि १८७२-पर्यंत त्याच्या चार आवृत्ती प्रसिद्ध झाल्या. दुसऱ्या म्हणजे नव्या आवृत्तीच्या वेळी बाळशास्त्री हयात नव्हते. म्हणून कॅण्डीसाहेबाने मूळ हस्तलिखितात बरेच फेरफार आणि भाषाविषयक सुधारणा करून ती प्रसिद्ध केली. पुढे १८६१-मध्ये एल्फिन्स्टनच्या या ग्रंथाच्या संक्षेपाऐवजी समग्र भाषांतरच विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी दोन मोठ्या भागांत प्रसिद्ध केले.

एल्फिन्स्टनच्या ग्रंथाचे विश्वनाथ नारायण मंडलीक यांच्या अनुवादास भाषांतराचेच स्वरूप आहे. मात्र लेखकाने आपले धोरण सांगितले, ते 'शब्दास शब्द न उमटतां सरळ मराठी भाषेत ग्रंथकाराचा आशय वळविण्याचा यत्न केला आहे,' असे आहे. तथापि 'मुळांतील अर्थ अगदीं सोडून लिहिलेले असे लेख फार नसतील,' अशी त्यास आशा वाटते. हा ग्रंथ प्रथमतः मूळ भाग दोन व उपोद्घात अशा एकंदर तीन भागांत छापिला होता. दोन्ही भाग मिळून ८००-च्या वर पृष्ठ-संख्या भरेल. हा ग्रंथ अथवा त्याचा दुसरा भाग युनिव्हर्सिटी स्कूल फायनलला लाविलेला होता. साधी, अनलंकृत भाषा आणि केवळ अनुवाददृष्टी यांमुळे एवढ्या मोठ्या लेखनाचे श्रेय मात्र लेखकास मिळू शकत नाही. ग्रंथकर्ता आपल्या पुस्तकाच्या प्रकाशनाकरिता सरकारी शिक्षणखाते आणि दैरेक्टर आफ् पब्लिक् इन्सट्रूक्शन यांचा आभारी आहे. याचा अर्थ वाचकांच्या सहज लक्षात येण्यासारखा आहे.



विश्वनाथ नारायण मंडलीक

१८३३ – १८८९



काशीनाथ बाळकृष्ण मराठे

१८४४ – १९१८



जनार्दन बाळाजी मोडक

१८४५ – १८९०

एल्फिन्स्टनच्या ग्रंथाखेरीज ज्या दुसऱ्या ग्रंथाचा अनुवाद झाला तो ' मरे'चा History of British India हा होय. नरसिंह विनायक ओक आणि विष्णुशास्त्री पंडित यांनी त्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांचे भाषांतर केले, ते सरकारच्या आज्ञेवरूनच. यात हिंदुस्थानातील ब्रिटिश राजवटीवरच अधिक भर दिला जावा हे स्वाभाविक होते. हे अनुवादित खंडही एकत्रित मिळून एक मोठा इतिहास-ग्रंथ होतो. परकीयांची बाजू जशीच्या तशी मराठीमध्ये आणण्याचे काम या अनुवादांमुळे झाले. स्वतंत्र दृष्टिकोण आणि रचना याचा त्यांत अभावच आहे. सरकारी विद्याखात्यानेच हेन्री मॉरिसच्या ग्रंथाचेही भाषांतर आपल्या भाषांतरकारांकडून करून घेतले होते. ग्रंथ म्हणावे अशी सारी रचना याप्रमाणे इंग्रज लेखकांच्या अनुवादाच्या स्वरूपाची होती. बाकीची बहुतेक पुस्तके ' मुलांकरिता ' थोडक्यामध्ये माहिती पुरविणारी पुस्तके होती. साहजिकच इतिहासकार असे ज्यांना म्हणावे असे लेखकही प्रस्तुत कालखंडात झाले नाहीत.

### लहान शालेय इतिहास

हिंदुस्थानच्या इतिहासाची इतर पुस्तके आकाराने लहान, मांडणीमध्ये टिप्पण-वजा आणि भाषेबाबत अगदी साधी अशी उतरली आहेत. जाणूनबुजून लहान मुलांकरिता लिहिलेल्या या पुस्तकांचा इतिहासवाङ्मय म्हणून विचार करणेही शक्य नाही. शाळेतील मुलांविषयी फारच काळजी वाटत असलेली त्यांच्या प्रस्तावनांतून व्यक्त झालेली दिसते. कृ. प्र. काळे आपल्या ' हिंदुस्थानाचा इतिहास ' या मॉरिसच्या पुस्तकाच्या सारांशरूप पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहितात, " अलीकडे मुलांस मारीसकृत हिंदुस्थानाचा इतिहास शिकवीत असतात. तो लांबट मजकुरानें लिहिला असल्यामुळें मुलांस माहित करून घेण्यास फार अवघड पडतें असें समजून त्यांतील लांबट व पाल्हाळीक मजकूर कमी करून मुख्य मुख्य सर्व गोष्टींचे या पुस्तकांत **प्रश्नोत्तररूपानें** वर्णन केलें आहे. याची पूर्वी माहिती करून घेऊन मोठा इतिहास, एकवार वाचल्यावर संपूर्ण ग्रंथ अवगत होईल हे अनुभवसिद्ध आहे." अशा प्रश्नोत्तररूप पुस्तकांच्या इंग्रजी मलपृष्ठांवर ते Catechism असल्याचा स्पष्ट निर्देशही असे. वि. म. गोखले यांनी तर आपला ' हिंदुस्थानाचा इतिहास ' पद्यामध्ये ' लक्षांत राहण्यास सोयीचे ' म्हणून रचिला आहे. पांडव लयाला गेल्यापासून मुसलमानांच्या राज्यसमाप्तीपर्यंतचा कालखंड त्यात घेतला आहे. आधारास बाळशास्त्री जांभेकरांचे पुस्तक होते. शाळेतील मुलांच्या सोयीप्रमाणे ' स्कूलमास्तरांकरिता'ही कोणी लिहिले आहे. बोरामणीकर यांनी आपल्या पुस्तकास ' स्केच-बुक ' असेही नाव दिले होते. विनायक कोंडदेव ओक यांनी आपले लहान आकाराच्या ११८ पृष्ठांच्या इतिहासाचे पुस्तक ' लहान मुलांकरिता बहुत मेहनतीने ' तयार केले होते. लहान मुलांच्या पुस्तकाबाबत ' बहुत मेहनत ' ज्यांना वाटे, त्यांना मोठे ग्रंथ स्वतंत्रपणे तयार करण्यास किती मेहनत लागते याची कल्पना तरी होती की नाही याची शंका वाटते. हिंदुस्थानाच्या इतिहासात

शिपायांच्या बंडाच्या माहितीचा अंतर्भाव एकदोघांनी केला आहे. तो संपूर्ण आणि विश्वसनीय असण्याचा संभव अर्थात फारच थोडा होता. तसा तो देण्याची सोयही नसावी असे वाटते. वि. कों. ओक यांनी 'हिंदुस्थान कथारस' या नावाचे जे पुस्तक लिहिले, त्यावर इंग्रज-पक्षपाताचा आक्षेपा आलेला होता. या आक्षेपास ओकांनी विविध-ज्ञानविस्तारमधून (फेब्रुवारी, १९०५) लेख लिहून उत्तर लिहिले. त्यावरून यासंबंधात असणाऱ्या सरकारी नियंत्रणाची चांगली कल्पना येते. ते म्हणतात, "मी पुस्तकें लिहावयास लागलों, त्यास सगळा आधार काय तो सरकारचा होता. पुस्तकांस आश्रय मिळण्याचे सगळें धोरण मराठी ट्रान्स्लेटरांच्या अभिप्रायावर असे. आणि तेव्हां मराठी ट्रान्स्लेटर परलोकवासी मेजर क्यांडी होते, ते इंग्रज होते. सत्यप्रिय होते, तरी ते सरकारी नोकर होते. त्यांस सरकारच्या किंवा सरकारी कामदारांच्या विरुद्ध खरा प्रकार असला तरी त्याचे एक अक्षरही सहन होत नसे. आणि ग्रंथांचे शुद्धीकरण त्या दृष्टीने होई. त्यास मला मान्य व्हावें लागे...मीं हिंदुस्थान कथारस लिहिला, त्यात लार्ड डलहौसी ह्यांविषयीं एक निबंध घातला होता. तो सगळा इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें लिहिला होता. त्यांत पदरचे कांहीं घातलें नव्हते.... तरी ती गोष्ट इंग्लिश लोकांस व इंग्लिश राज्यास भूषणावह नव्हती म्हणून ती गाळून टाकण्याविषयीं क्यांडीसाहेबांनीं फार मोठा आग्रह धरिला. त्यांत त्यांनीं असे लिहिले कीं, ह्या निबंधांतल्या सगळ्या गोष्टी जरी खऱ्या आहेत, तरी त्या राजकारणसंबंधानें छापण्यास आणि प्रसिद्ध करण्यास फार अयुक्तिक आहेत, म्हणून हा विषय अजीबात गाळला पाहिजे. झालें. तो विषय मला गुपचुप गाळावा लागला. असे आणखी कितीएक विषयांचे झालें. तेथें माझा काय उपाय ?" यथार्थ इति-ह-आस कळण्याची शक्यता या सरकार-प्रेरित आणि सरकार-मान्य पुस्तकांमधून किती होती याची या ओकांनी केलेल्या आत्माविष्कारावरून कल्पना येईल.

### हिंदुस्थान-कथारस

ओकांचे हे पुस्तक मात्र अगदीच लहान मुलांकरिता लिहिलेले नाही. किंबहुना ते जरी शाळांमधून किंवा विद्यापीठाच्या अभ्यासक्रमामध्ये निरनिराळ्या कारणांनी नेमिले जाई, तरी मुळात ते त्या दृष्टीने लिहिलेले नसावे. इतिहासाचे ज्ञान व अभ्यास ही आवश्यक आणि लाभदायक असतात हे या पुस्तकाच्या पहिल्याच निबंधात सांगून ते म्हणतात, "ह्या साऱ्या गोष्टी खऱ्या, परंतु इतिहासाच्या अभ्यासांत मन रमत नाहीं, ह्यास काय उपाय, असा किती एक लोक प्रश्न करितात. त्याचे उत्तर इतकेच कीं, 'आमच्या ह्या मराठी भाषेंत मनोरम रीतीनें लिहिलेला असा इतिहास मुळींच नाहीं म्हटले तरी चालेल आणि तसे ग्रंथ तयार होत तोंपर्यंत लोकांचीं मने तिकडे लागावयाचीं नाहींत, हे खचीत आहे.'" ओकांनी दिलेला हा अभिप्राय लक्षात घेण्यासारखा आहे. आधी झालेले इतिहासग्रंथ मोठे असोत वा मुलांकरिता लिहिलेले असोत, भाषादृष्ट्या रूक्ष, निर्जीव असत. म्हणून इतिहास म्हणून त्यांचे मूल्य काय असेल ते असो,

वाङ्मयदृष्ट्या त्यांत वेधक आणि मनोरम असे काही नसे. ही उणीव भरून काढण्यासाठी ओकांनी हे पुस्तक लिहिले. त्याच्या नावामधील कथारस या शब्दाने त्याविषयी कल्पना येईल. ओक स्वतः सांगतात: "सूचनार्थ आणखी असें सांगतों कीं, मराठी वाचणाऱ्या जनांस हिंदुस्थानाच्या इतिहासाची गोडी लागावी आणि करमणूक करतां करतां त्यास तत्संबंधीं कांहीं चमत्कारिक आणि विशेष गोष्टी कळाव्या, अशा हेतूने हे पुस्तक लिहिले आहे." प्रस्तुत पुस्तक हे सलग इतिहासनिवेदनाच्या पद्धतीने लिहिलेले नाही. त्यातील प्रकरणे सुटी व स्वतंत्र अशी प्रकरणे अथवा निबंध आहेत व त्यात अगदीच स्थूल असा कालक्रम साधला आहे. बाकी रचना निबंधसंग्रहासारखी आहे. सतीवरील प्रकरण वा निबंध अथवा 'कथा' प्रथमच आली आहे. पुढे गाळावे लागलेले नायर लोकांविषयीचे प्रकरणही असेच आरंभी या प्रकरणात आले होते. ठग लोकांविषयी माहिती अशीच आरंभी येते, तर पेंढाऱ्यांविषयीचे प्रकरण शेवटी शेवटी येते. मध्ये एका प्रकरणात प्राचीन मराठी ग्रंथकारांविषयी लिहिले आहे, तर कोहिनूर हिऱ्याची हकीकतही शेवटी घातलेली आहे. शेवटच्या प्रकरणात इंग्रजी राज्यामुळे झालेले फायदे नमूद करून 'हीं सर्व इंग्लिश राज्याचीं फळें होत. जें हे राज्य आम्हा रयतेला इतके सुखावह आहे, ते परमेश्वरकृपेनें आम्हांवर निरंतर असो', अशा शब्दांत 'भरत-वाक्य' केले आहे. प्रस्तुत कालखंडाच्या अखेरच्या वर्षी (१८७४) ओकांनी 'शिपायांच्या बंडाचा इतिहास' ही लिहिला. त्यात कोणती बाजू रंगविली गेली असेल याची कल्पना वर दिलेल्या माहितीवरून येण्यासारखी आहे. तथापि त्यात माहिती तरी बरीच आहे. त्या मानाने बंडानंतर लगेच (इ. स. १८६०) लिहिलेला खं. बा. फडके यांचा चौतीस पृष्ठांचा इतिहास फारच त्रोटक ठरेल.

### हिंदुस्थानातील इतर प्रांतांचे इतिहास

मराठीमध्ये मराठ्यांच्या इतिहासाकडे अधिक लक्ष असावे हे स्वाभाविक होते. परंतु त्यात इतर प्रांतांनाही काही स्थान मिळाले होते. १८५० सालीच 'गुजराथ देशाचा इतिहास' या नावाने ए. मॅक्डोनल्ड यांनी मूळ अल्ली महंमदखान याच्या ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतराचे मराठी भाषांतर प्रसिद्ध केले. नाटककार कीर्तने (विनायक जनार्दन) नोकरीच्या निमित्ताने मध्य हिंदुस्थानात गेले होते. त्यानी सर जॉन मालकमच्या A Memoir of Central India चे 'मध्य-हिंदुस्थानाचा इतिहास' म्हणून भाषांतर केले. म्हणजे हे कामही अनुवादात्मकच झाले. आमच्यामधील जांभेकर, मंडलीक, पंडित, कीर्तने, पदमनजी, लोकहितवादी इत्यादी मोठमोठी प्रसिद्ध मंडळी इतिहासलेखनाच्या क्षेत्रामध्ये अनुवादाचाच आश्रय करून होती. बहुधा स्वतंत्र रीत्या हे काम करणे पुरेशा साधनांच्या अभावी फारच कठीण होते याची तीव्र जाणीव असल्यामुळे हे होत असावे. त्या मानाने कमी प्रसिद्ध असणारी मंडळीच काही स्वतंत्रपणे लेखन करण्यास प्रवृत्त होत असावी. 'गोमांतकाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास', 'कोल्हापूर प्रांताचे वर्णन' ही पुस्तके या स्वरूपाची दिसतात.

### इंग्लंडचे इतिहास

इंग्लंडच्या इतिहासाकडे मात्र १८४० च्या आधीपासूनच लक्ष गेले होते. परंतु अनुवाद म्हणूनही भरीव ग्रंथ म्हणता येतील अशी पुस्तके झाली नाहीत. मुंबईच्या शिक्षामंडळीने याचा प्रथम उपक्रम केला व तो बराच भरीव होता. बाकीची पाचसहा पुस्तके शिळाछापावरील शेसवाशे पृष्ठांच्या मजकुराची होती. रणजित आणि वझे-शौचे यांची पुस्तके प्रश्नोत्तररूपच होती. खं. बा. फडके यांचे 'इतिहाससार' हे गद्यपद्यात्मक होते. हरि केशवजी यांचा 'इंग्लंडाचा वृत्तांत' ( १८३८ ) हा पत्ररूप असून इंग्रजीवरून भाषांतरित होता. नाना नारायण यांचे 'इंग्लंड देशाचे वर्णन' ( १८३५ ) आणि रा. मो. पाटणकर यांची 'इंग्लंडची संक्षेप बखर' ( १८६० ) ही पुस्तकेही भाषांतरेच होती. पण हे अनुवादही मोठ्या प्रसिद्ध ग्रंथांचे न होता किरकोळ ग्रंथांचे झाले, ही गोष्ट लक्षात आल्यावाचून राहात नाही.

### हिंदुस्थानाबाहेरील इतर देशांचे इतिहास

इंग्लंडच्या इतिहासाबाबत जर ही अनास्था, तर इतर देशाबाबत ती अधिकच असावी यात आश्चर्य नव्हते. याहीबाबत जे थोडेसे श्रेय द्यावयाचे ते ख्रिस्ती मिशनऱ्यांकडे जाते. मिसेस विल्सन हिने 'आशुरी आणि बाबेली लोकांचे वृत्तांतकथन', 'ग्रेकी लोकांचे वृत्तांतकथन', 'मेदी आणि पारशी लोकांचे वृत्तांतकथन', 'प्राचीन मिस्री लोकांचे वृत्तांतकथन' अशी एक वृत्तांतकथनाची मालाच प्रसिद्ध केली. साधारणपणे ६०–६५ पृष्ठांपर्यंत शिळाछापाच्या लहान पुस्तकांतून हे वृत्तांतकथन करण्यात येई. असिरियन आणि बाबिलोनियन लोकांचा वृत्तांत सांगून शेवटी लेखिका म्हणते, " जे कोणी त्या लोकांचा इतिहास वाचतील, त्यांनीं मूर्तिपूजा त्यागून जिवंत देवास भजावे." या प्राचीन ख्रिस्तीतर समाजाचा वृत्तात सागत बसण्यामागे धर्मप्रसाराचा हेतू स्पष्ट आहे.

### जगाचा इतिहास

या सदराखाली एकच पुस्तक उल्लेखनीय ठरते. ते म्हणजे हरि रघुनाथ गाडगीळ यांनी दक्षिणा प्राईज कमिटीकरिता मार्शमन साहेबाच्या A Brief Survey of History या पुस्तकाचे दोन खंडामध्ये केलेले भाषांतर होय. त्यात 'जगाचे उत्पत्तीपासून मॅसिडनची बादशाहत गारद झाली' तोपर्यंत ( भाग १ ला ) आणि मग 'रूम शहराचे स्थापनेपासून एसू ख्रिस्ताचे जन्मापर्यंत' चा इतिहास ( भाग २ ) आलेला आहे. पिनॉक ( Pinnock ) याच्या Modern History च्या आधारे 'अर्वाचीन बखर' नावाचे भाषातर सदोबा पवार यानी केले असल्याचा उल्लेख मिळतो. तेही जगाच्या इतिहासात जमा करावे लागेल. पहिले पुस्तक दोन्ही भाग मिळून तीनशेवर पृष्ठांचे असले, तर दुसरे शालेय म्हणण्याइतक्या मजकुराचे येईल. बेहेरे याचे प्रश्नोत्तररूप लहानसे पुस्तकही अनुवाद स्वरूपाचे होते. असेच एक प्रश्नोत्तररूप पुस्तक कुकडे-धनेश्वर यांच्या नावावर रुजू आहे. सरकारी विद्याखात्याने

तयार करवून घेतलेले जनार्दन बाळाजी मोडकांचे ‘ जगाच्या इतिहासाचे सामान्य निरूपण ’ हे भाषांतरच होते. ‘ स्कूलमास्तराकरितां ’ तयार झालेले असा ज्याचा मागे उल्लेख केला आहे, ते हेच पुस्तक होय. हे पुस्तक ‘औतलैन आफ् युनिव्हर्सल हिस्तोरी ’ या पुस्तकाचे भाषांतर असून लेखकाच्या मताप्रमाणे ‘ पुढील धड्यांत जो विषय आहे त्याला इतिहास हे नांव जितके शोभते तितकेच भूगोलाचे वर्णन हेहि शोभते. ’ या ‘ जगाच्या इतिहासा ’ त मिसर, बॅबिलॉन, ग्रीस, रोम, अरब इत्यादींचाच भाग फार आहे. हिंदुस्थानचा संबंध पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्रज येथे आल्यापुरताच येतो. शेवटी प्राचीन व अप्रसिद्ध शब्दांचा ( व्यक्ती व स्थले ) लहानसा कोशही यास जोडला आहे. याशिवाय आणखीही १–२ पुस्तके झाली असल्याचा उल्लेख इंडिया ऑफिसच्या सूचीत आढळतो. स्वतंत्र आणि भरीव रचना करण्याची क्षमता इतर इतिहासांबाबतही जेथे नव्हती, तेथे ती ‘ जगाचा इतिहास ’ लिहिण्याबाबतही नसावी हे अर्थात निराळे सांगावयास नको.

**शकावल्या**

इतिहासाची साधने म्हणून ज्याचा उपयोग होतो अशा शकावलीचा उल्लेख केल्याविना इतिहासवाङ्मयाचा निरोप घेता येत नाही. या स्वरूपाची तीनचार पुस्तके या कालखंडात प्रकाशित झाली. त्यांपैकी गोविंद रावजी मांडे यांच्या ‘ हिंदुस्थानाच्या शकावली ’चा ( १८६० ) उल्लेख प्रथम करावयास हवा. हे पुस्तक टॉमस मॅक्कडनच्या The Oriental Eras या ग्रंथाचे भाषांतर आहे. यात अरबी, हिजरी, फसली, विक्रम, शालिवाहन, शिवशक आणि इंग्रजी सन इत्यादी सनाची माहिती दिली आहे. एकेका पृष्ठावर वेगवेगळे स्तंभ पाडून हिंदुस्थानातील व आशिया खंडातील महत्त्वाच्या घटनांचा निर्देश त्या त्या तारखेपुढे शेवटच्या स्तंभात केलेला आहे. बाळकृष्ण केशव पारखी यांच्या सनसमूहा (१८७२ ) मध्ये तारखा आणि ऐतिहासिक माहिती यांची ३५–४० पृष्ठे आहेत. शामराव मोरोजी यांच्या ‘ क्षत्रियवंशोद्गममाले ’ त प्राचीन राजाच्या वंशावळी, राजनीती इत्यादीसंबंधी संक्षेपाने विवेचन आले असून राजांच्या नामावली, कलियुगभविष्य इत्यादी सामान्य माहिती येते.

**मुंबईचे वर्णन**

मोडकांनी लिहिलेल्या ‘ जगाचा इतिहास ’ या पुस्तकाविषयी स्वतः लेखकानेच ते जेवढे इतिहासाचे, तेवढेच भूगोलाचे पुस्तक असल्याचे मत प्रकट केलेले वर आपण पाहिले. येथे आपाततः भूगोलाचे पुस्तक असणारे माडगावकरकृत ‘ मुंबईचे वर्णन ’ हे मुंबईचा इतिहास सांगणारे पुस्तक अवश्य लक्षात घ्यावयास पाहिजे. यात पलटणींचे बंड, महाराणीचा जाहिरनामा, काबूलची लढाई, रूस देशातील लढाई इत्यादी खास इतिहासातील गोष्टींचा परामर्श आहेच, पण मुंबईचा इतिहास हा त्याचा एक प्रमुख विषय आहे. तो सांगताना आवश्यक तेवढा भूगोल द्यावा लागला आहेच, परंतु हे पुस्तक खरोखर भूगोलाचे नाही. मुंबईच्या सामाजिक जीवनाची शक्य तेवढ्या अंगाची

माहिती देणारे हे पुस्तक १८६३ साली तरी अपूर्वच म्हणावयास योग्य ठरते. मुंबईतील नामांकित स्थळांच्या माहितीप्रमाणे तेथील लोक, लष्करी खाते, न्यायखाते, पोर्तुगीझ लोकांची गोष्ट, गव्हर्नरांची कृत्ये, कायदे करणारी मंडळी, टपाल खाते, शाळा व पुस्तकालये, पदार्थसंग्रहालये, रॉयल एशियाटिक सोसायटी, दक्षिणी भाषेत पुस्तके प्रसिद्ध करणारी मंडळी, बॉबे असोसिएशन इत्यादी मुंबईच्या संस्थात्मक जीवनाची माहिती यात आली आहे. याशिवाय देवळे, मशिदी, यात्रा, उरूस, सण, उद्योगधंदे, इस्रायल, मारवाडी, पारशी हे समाज, जमशेटजी जिजीभाई, विष्णुबुवा ब्रह्मचारी इत्यादी व्यक्ती, अशा अनेक विषयांचा परामर्श या पुस्तकात घेतलेला आहे. लेखकाचे चौरस लक्ष आणि बहुश्रुतता या पुस्तकामध्ये भरून राहिली आहे. त्यासाठीमागे माहिती, कित्येक वेळा आकडेवारीसह, जमा करून, जुळवून सांगण्यास केलेले परिश्रम स्पष्टपणे व्यक्त झाले आहेत. स्वतंत्र ग्रंथनिर्मितीचे जे श्रेय या काल-खंडातील इतिहासपुस्तकाबाबत आपणांस घेता येण्यासारखे नाही, ते या पुस्तकाबाबत भरपूर मिळण्यासारखे आहे हा ह्या पुस्तकाचा अभिनंदनीय आणि उल्लेखनीय असा विशेष आहे. माडगावकरांचे इतर ग्रंथ (सृष्टींतील चमत्कार सोडल्यास) हे त्रोटक स्वरूपाचे आहेत. हा ग्रंथ मात्र माहितीने भरलेला असा भरीव ग्रंथ आहे आणि या स्वरूपाचा हा एकच आहे. हे पुस्तक शिक्षण-खात्याचे त्या वेळचे प्रमुख हॉवर्डसाहेब यांस इंग्रजी अर्पणपत्रिका लिहून सादर केले आहे. मात्र ते देशी भाषेतील क्रमिक पुस्तके, इतर वाङ्मय आणि एकंदरीत लोकांचे शिक्षण याविषयी त्याने प्रकट केलेल्या आस्थेबद्दल अर्पण केले आहे. पुस्तकास सरकारी आश्रय अर्थात होताच. प्रस्तुत कालखंडातील एक अगदी वेगळे आणि महत्त्वाचे पुस्तक म्हणून त्याचा उल्लेख आवर्जून केला पाहिजे.

## तीन

## अव्वल इंग्रजीतील वाङ्मयविचार

आधी भाषा आणि मग तिचे व्याकरण असा ज्याप्रमाणे क्रम असतो, त्याच-प्रमाणे आधी वाङ्मय आणि त्यानंतर वाङ्मयविषयक विचार हा क्रमही असावा हे स्वाभाविक होय. अव्वल इंग्रजीत मराठी गद्य—वाङ्मयाला पुनः नव्याने प्रारंभ झाला ही आता मान्य झालेली घटना आहे. याला काही काल लोटल्यावरच आणि काही वाङ्मयनिर्मिती झाल्यानंतरच त्याविषयी विचाराला प्रारंभ झाला हे या स्वाभाविक क्रमाला धरूनच झाले. हा वाङ्मयविचार अत्यल्प आहे हे अर्थात निराळे सांगावयास नको. यापूर्वीच्या मराठी वाङ्मयातही स्वतंत्र वाङ्मयविषयक चर्चेची परंपरा विशेष सबल अशी नव्हतीच. त्या दृष्टीनेही विशेष अपेक्षा करणे शक्य नव्हते. अव्वल इंग्रजीतही स्वतंत्र ग्रंथरूपाने वाङ्मयविषयक चर्चा थोडीच झाली. तिचा परामर्श बराचसा इतस्ततः पसरलेल्या वाङ्मयविषयक विचारांचे संकलन करून घ्यावा लागतो.

## विखुरलेला विचार

या विचारांचा आढळ निरनिराळ्या ठिकाणी होतो. पुष्कळसे विचार निरनिराळ्या पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावनांतून विखुरलेले आहेत. या प्रस्तावना कित्येक वेळा इंग्रजीतून लिहिलेल्या असत. कुंटे यांनी लिहिलेली 'राजा शिवाजी' या काव्याची प्रस्तावना किंवा कीर्तने यांच्या 'जयपाळ' नाटकाची प्रस्तावना ही याची ठळक उदाहरणे आहेत. यांचा विचार मराठीमधील वाङ्मयविचार म्हणून करणे हे तांत्रिक दृष्ट्या योग्यही ठरणार नाही. परंतु मराठी माणसांनी मराठी वाङ्मयाच्या संदर्भात केलेले मतप्रकटन म्हणून त्यांचा परामर्श घेणे आवश्यक ठरते. मराठीमध्येच लिहिलेल्या प्रस्तावना अर्थात सहजपणेच या परामर्शाचा विषय होऊ शकतात. यासच जवळ येणारा वाङ्मयविचार म्हणजे सरकारी दप्तरात नमूद असलेले, परंतु सामान्य वाचकास सहज उपलब्ध नसणारे ग्रंथपरीक्षकांचे अभिप्राय होत. फरक इतकाच की, प्रस्तावनांतून ग्रंथास किंवा ग्रंथकर्त्यास अनुकूल किंवा त्याच्या बाजूचे मतप्रकटन असे, तर ग्रंथपरीक्षकांच्या अभिप्रायांतून अनेक वेळा प्रतिकूल असे मत प्रकट झालेले असे. सुसंगत व एकजिनसी वाङ्मयविचाराच्या दृष्टीने या दोन्ही प्रकारच्या मतप्रकटनास विशेष वजन प्राप्त होण्यासारखे नव्हते. यापेक्षा अधिक भरीव आणि संघटित असा विचार या कालाच्या अखेरीअखेरीस शालापत्रक आणि विविधज्ञानविस्तार यांसारख्या मासिकांतील परीक्षणांतून किंवा निबंधातून झालेला आहे. हाही विचार अल्पच म्हणावा लागतो. कारण या कालात वाङ्मयविचारापेक्षा विविध विषयांचे ज्ञानसंपादन व ज्ञानवृद्धी यांवरच बहुतेक मासिकांचा भर असे. समकालीन वाङ्मयनिर्मिती व तिचा विचार करणारी मासिकेही फारच थोडी होती. समकालीन वाङ्मयाचा स्वतंत्रपणे विचार करून लिहिलेल्या का. बा. मराठे यांच्या—नावल आणि नाटक ह्यांविषयी निबंध—या तीस-पस्तीस पानी पुस्तकाचे महत्त्व आणि वैशिष्ट्य लक्षात भरण्यासारखे आहे. ह्यालाही एक दीड पानी प्रस्तावना इंग्रजीत लिहिलेली आहेच. 'संस्कृत कविपंचका'वर शालापत्रकातून चिपळूणकरांनी लिहिलेले निबंध पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले, त्यांचाही निर्देश स्वतंत्र, सुसंबद्ध असे टीकालेखन म्हणून आवश्यक ठरतो. 'यशोदापांडुरंगी' सारखे जुन्या वाङ्मयावर विवेचनात्मक टीका या स्वरूपाचे लेखनही काही झाले. विशिष्ट काळात प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचे समालोचन हा वाङ्मयविचाराचा आणखी एक प्रकार होता असे एक समालोचन न्यायमूर्ती रानडे यांनी सरकारच्या आदेशावरून १८६५ च्या सुमारास केलेले त्यांच्या लेखसंग्रहात उपलब्ध आहे. ते इंग्रजीमधून केले आहे, तथापि मराठी वाङ्मयाचे समालोचन असल्याने इंग्रजी असले तरी विचारार्ह ठरते. याशिवाय संस्कृत काव्यशास्त्रीय चर्चेवरून केलेल्या काव्यविषयक विवेचनाचे दोन—तीन ग्रंथ या कालात झाले. त्यांना मात्र जुन्या वाङ्मयविचाराचा आधार होता. या एवढ्या सामग्रीच्या आधाराने या कालातील वाङ्मयविचाराचा परिचय करून घेता येईल.

## संस्कृतमधील काव्यविचार

संस्कृतमधील काव्यविचार मराठीमध्ये आणण्याचा प्रयत्न प्रथम १८५३ मध्ये काही संस्कृत नाटकांची भाषांतरे पुढे मराठीमध्ये करणाऱ्या कृष्णशास्त्री राजवाडे यांनी केला. हा प्रयत्न अलंकार-विवेक या नावाने दक्षिणा प्रैज कमिटीने शिळाछापावर मुद्रित करून प्रकाशित केला. या दीडशे पानी पुस्तकामध्ये मुख्य भर संस्कृतामधील काव्यालंकाराची मराठीमध्ये थोडक्यात माहिती देण्यावर आहे. ग्रंथ संस्कृतच्या आधाराने रचिला असे म्हटले तरी कोणत्या संस्कृत पुस्तकाच्या आधाराने रचिला ते स्पष्टपणे सांगितले नाही. मराठी भाषेत अलंकार आजपर्यंत कोणी लिहिले नाहीत, म्हणून ते लिहिणे आवश्यक आहे, —असे ग्रंथकार प्रस्तावनेमध्ये म्हणतात. अलंकारांविषयी ते म्हणतात, " जसें देहास शोभादायक जीं वस्त्रेंभूषणें त्यांस अलंकार असें नांव आहे, तसे भाषणास शोभा आणणारे उपमारूपक इत्यादि जे अर्थाचे प्रकार, त्यास अलंकार हे नांव योग्य आहे. अभिप्राय कळविणें व मनोरंजक करणें हे भाषणाचे दोन उद्देश. मनोरंजन अलंकारांवाचून सिद्ध होत नाहीं." पुस्तकामध्ये प्रथम अलंकाराचे नाव देऊन मग त्याचे गद्यात दोन-चार ओळींमध्ये लक्षण सांगितले आहे. मग उदाहरणे, एक अथवा दोन, देऊन अलंकाराची ही माहिती संपविण्यात आली आहे. उदाहरणे मराठी कवी मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत इत्यादींच्या कवितांमधून शक्य झाले तेथे दिली आहेत. काही बहुधा संस्कृतवरून स्वतः मराठीमध्ये तयार करून दिली आहेत. काही उदाहरणे गद्य वाक्यांचीही आहेत. अलंकार मम्मटाच्या काव्यप्रकाशात आलेल्यांशिवाय उल्लास, प्रहर्षण, ललित, विषादन, विधि, प्रतिषेध, आज्ञा, अनुज्ञा इत्यादी पंधरा-सोळा इतरही दिले आहेत. विवेचन असे केले नाही. म्हणून रचना सूत्रस्वरूपाची झालेली आहे.

## प्रधान यांचा रसमाधव ( १८६८ )

अलंकारांपेक्षा काव्यामध्ये रसाला महत्त्व अधिक आहे हे लक्षात घेऊनच आपला रसमाधव हा ग्रंथ रत्नागिरीचे सेवानिवृत्त मुन्सिफ श्री. दाजी शिवाजी प्रधान यानी मराठीमध्ये रचिला असे दिसते. रत्नागिरीसारख्या आडवळणाच्या गावी त्याचे शिळाछापावर मुद्रण झालेले आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ग्रंथास नाव देताना जगन्नाथाचा रसगंगाधर डोळ्यांपुढे असावा. आधाराला भानुदासाची रसतरंगिणी घेऊन आणि दुसरे ग्रंथींचे स्फुट श्लोक पाहून—हा ग्रंथ रचिलेला आहे. ' असा ग्रंथ कोणीं केलेला दृष्टिगत झाला नाहीं याकरितां उद्योग करून श्रमानें हा लहानसा ग्रंथ केला आहे ' असे लेखक म्हणतो. तथापि हा ग्रंथ लहान नाही. रॉयल आकाराची पावणे दोनशे पृष्ठे भरतील एवढा मोठा आहे. त्याचे चौदा अध्याय आहेत. पहिला प्रास्ताविक असून दुसऱ्या अध्यायात रस, भाव, अनुभाव, संचारी भाव इत्यादींचे विवेचन देऊन रससंख्या व त्यांची नावे नमूद केली आहेत. शांत आणि भक्ती या रसांचा अंतर्भाव त्यात केला आहे. तिसऱ्या अध्यायापासून शृंगार इत्यादी रसांचे

त्यांच्या भावानुभावादी अंगांसह सोदाहरण विवेचन केले आहे. भानुदासाच्या रसतरंगिणी-मधील विवेचनाचे मराठीमध्ये सविस्तर उपपादन केले आहे. या विषयावरील मराठीमधील पहिला ग्रंथ या दृष्टीने तो पुष्कळच भरीव झालेला आहे. भाषा प्रौढ, संस्कृतप्रचुर अशी आहे. शैली कीर्तनकाराच्या शैलीसारखी उतरली आहे. आपल्या या ग्रंथाविषयी व त्यातील विवेचनाच्या महत्त्वाविषयी लेखकास आत्मविश्वास वाटतो असे प्रस्तावनेमधील त्याच्या सूचनेवरून दिसते. ' ग्रंथाचा विषय फार गहन, यास्तव सर्वांस वाचनाचे प्रथमावृत्तीसच समजेल असे होणे अशक्य आहे. यास्तव त्यांनीं लक्षपूर्वक दुसरी आवृत्ति वाचावी ' असे त्याचे सांगणे आहे. त्या कालातील सामान्य वाचकाचे संस्कृताचे ज्ञान लक्षात घेता त्याची ही सूचना अस्थानी नव्हती. संस्कृत अथवा इंग्रजी ग्रंथांतील माहिती त्रोटकपणे वा सूत्ररूपाने मराठीमध्ये उतरण्याच्या या कालातील ग्रंथलेखनपद्धतीस हा ग्रंथ अपवाद समजावा लागेल.

## गणेशशास्त्री लेले यांचे साहित्यशास्त्र (१८६२)

" अलंकार, छंद यांवर वेगळाले केलेले लहान ग्रंथ आढळण्यांत येतात. परंतु काव्याच्या सकल अंगांचीं लक्षणे व उदाहरणें ज्यांत सविस्तर निरूपिलीं आहेत, असा प्राकृतांत एकही ग्रंथ नाहीं, याकरितां हा नवीन ग्रंथ रचून यास साहित्यशास्त्र असे नांव ठेवले आहे." अशा शब्दांनी ग्रंथकाराने आपला ग्रंथलेखनाचा हेतू स्पष्ट केला आहे. ' संस्कृत साहित्यशास्त्राचे जे नियम, तेच प्रायः ह्या भाषेंतील साहित्य-शास्त्रासंबंधीं गोष्टींस लागू पडतात. यास्तव हा प्राकृत ग्रंथ संस्कृत साहित्य-ग्रंथाच्याच आधाराने लिहिला ' असल्याचेही त्याने प्रकट केले आहे. हा ग्रंथ प्रश्नोत्तर रूपाने लिहिला आहे. विवेचनात्मक पद्धतीने लिहिलेल्या रसमाधवानंतर ह्या पद्धतीचा आश्रय म्हणजे मागचे पाऊलच ठरते. केवळ अलंकार किंवा केवळ रस एवढ्यापुरते क्षेत्र मर्यादित न करिता काव्यादिकांची लक्षणे, शब्दशक्ती, नायक-नायिका, रसभाव, गुणवृत्ति, वृत्ते, अलंकार, छंद आणि अखेरीस काव्यदोष इतके विषय यामध्ये आणले आहेत. यामुळे ग्रंथ अधिक समावेशक झाला आहे. उदाहरणांकरिता, प्राकृत म्हणजे मराठी कवींची कविता उपयोगात आणली असूनही स्वकृत उदाहरणांचाही उपयोग केला आहे. प्रश्नोत्तररूप पद्धतीमध्ये सलग आणि सविस्तर विवेचन येऊ शकत नाही. तसेच या ग्रंथात झाले आहे. स्वतंत्र विचार करून काही लिहिण्याची आवश्यकता ग्रंथकारास अर्थात वाटलेली नाही. संस्कृतमधील विचारच मराठीमध्ये आणण्याचे काम अद्यापि व्हावयाचे होते. ते करण्याचा एक प्रयत्न म्हणून ह्या ग्रंथाचे महत्त्व आहे.

## तात्यांचे वृत्तदर्पण (१८६०)

काव्याचे बाह्य स्वरूप जे पद्य त्यासंबंधी विद्यार्थ्यांना उपयुक्त असे वृत्तदर्पण परशुरामपंत गोडबोले ह्यांनी १८६० साली प्रसिद्ध केले मराठीमध्ये पूर्वी झालेली एतद्विषयक रचना सर्वसामान्य वाचकास, विशेषतः विद्यार्थिवर्गास उपलब्ध नसल्याने यासारख्या उपकरणात्मक साधन वाङ्मयाची गरज अर्थातच निकडीने वाटू लागली.

ही गरज भागविण्याच्या दृष्टीने लिहिलेल्या या छोटेखानी पुस्तकात मुख्यतः अक्षरगण-वृत्तात्मक रचना डोळ्यांपुढे होती. तिच्या विवेचनाकरिता उपयुक्त ठरलेली त्र्यक्षरी गणव्यवस्था आधारास घेऊन पंडित कवींच्या कवितेत आलेल्या वृत्तांबद्दलची माहिती यात देण्यात आली आहे. ओवी-अभंग-घनाक्षरी सारख्या अक्षरछंदांबद्दलही थोडक्यात लिहिले आहे. वृत्तविषयक किंवा पद्यविषयक मूलग्राही विवेचन यात येणे शक्यही नव्हते आणि तो त्याचा हेतूही नव्हता. मराठीमधील काही मात्रावृत्तांचाही समावेश त्यात झालेला आहे. एवढ्या सामग्रीवर पुढील साठ वर्षे तरी मराठी पद्यविचाराचा निर्वाह झाला, ही गोष्ट या पुस्तकाच्या उपयुक्ततेविषयी भरपूर साक्ष देणारी आहे. मराठी नवनीताने ज्याप्रमाणे या कालात शालेय विद्यार्थ्यांची काव्यविषयक गरज भागविली, तशी काव्याच्या बाह्यांग विचाराला वृत्तदर्पणाने आधार पुरविला यात शंका नाही. याचबरोबर भा दा. पाळंदे यांच्या पद्यरचनेवरील निबंधाचा निर्देश करावयास पाहिजे. तसेच या सर्वांच्याही आधी ( १८५१ ) लोकहितवादींनी लिहिलेल्या वीस पानी ' शब्दालंकार ' या पुस्तकाच्या सूचीमधील नोंदीचाही उल्लेख करावयास हवा. मात्र हे पुस्तक इंग्रजीमधील अलंकारचर्चेची आणि त्यांतील शब्दालंकारांची तेवढीच माहिती देते हे लक्षात ठेवणे योग्य होईल.

## जुन्या पद्धतीची टीका

येथे जुन्या पद्धतीने लिहिल्या गेलेल्या दोन[१] टीकाग्रंथांचा जरा विस्ताराने परामर्श घ्यावयास हवा. हे दोनही ग्रंथ एकाच, मोरोपंतांच्या काव्यावर, केकावलीवर, केलेल्या टीकेचे असून दोन वर्षांच्या अंतराने प्रसिद्ध झालेले आहेत. ' यशोदापांडुरंगी ' हा व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांचा १८६५ साली झालेला व दुसरा ' केकादर्श ' हा परशुरामपंत तात्या गोडबोले यांचा १८६७ या वर्षी प्रकाशित झालेला. आपल्या नवनीत या प्राचीन मराठी कवितेच्या निवडक वेच्यांच्या संग्रहाने मराठी वाचकास जुनी मराठी कविता परिचित करून देण्याचे बहुमोल कार्य परशुरामपंत तात्यांनी आधीच केले होते. तात्यांची मोरोपंतांवर विशेष भक्ती होती. सर्वसंग्रहातून प्रकाशित झालेल्या मोरोपंतांच्या कवितेच्या संपादनात त्यांची कामगिरी महत्त्वाची झाली होती. केकावलीसारखे काव्य लोकांच्या वाचनात यावे एतदर्थ त्याचा अर्थ सुगम करून सांगणे आवश्यक आहे असे पाहून त्यांनी केकादर्श रचिला. ' हा ग्रथ जरी प्राकृत भाषेत ( मराठींत ) केला आहे; तरी कवीने यांत संस्कृत शब्द फार घातले आहेत, आणि कोठें संक्षेपाने, कोठें संकेताने आणि कोठे अन्योक्तीने वर्णन केले आहे. यामुळे याचा भावार्थ प्राकृत जनांच्या तर काय, पण पंडितजनांच्याही मनांत विचार केल्या-शिवाय लवकर यावयाचा नाहीं. तो सर्वांस सुगम व्हावा म्हणून मी परशुराम या ग्रंथावर

१ यशोदापांडुरंगी—दादोबा पांडुरंग तर्खडकर, १८६५ आणि केकादर्श—परशुरामपंत तात्या गोडबोले, १८६७.

टीका करावयास आरंभ करितों,' असे आपल्या प्रास्ताविकात ते म्हणतात. मोरोपंतांची कविता फार प्रौढ व सुरस असून ही संस्कृत कवितेच्या बरोबरची म्हणण्यास चिंता नाही,–असा एकंदर मोरोपती कवितेविषयीचा आपला अभिप्रायही त्यांनी आरंभी नमूद करून ठेविला आहे. कवीचे हृद्गत 'समजणे कठीणच' असले तरी 'जितका अर्थ उघड करवेल तितका थोडक्यांत करावा' अशी या टीकाकाराने वांछा धरिली होती. तिला अनुसरूनच ही टीका लिहिली गेली आहे. मोरोपंत रामभक्त असले तरी प्रस्तुत काव्य हे कोणत्याही विशिष्ट देवतेला अनुलक्षून लिहिलेले नसून एका ईश्वरास अनुलक्षून लिहिले आहे ही गोष्ट वाचकांच्या नजरेस आणणे त्यांना आवश्यक वाटले आहे. आरंभी काव्याचे वृत्त पृथ्वी आहे हे सांगून आपल्याच वृत्तदर्पणातील त्या वृत्ताचे लक्षण त्यांनी उद्धृत केले आहे. १२२ श्लोकांच्या काव्यावरील ही टीका १५८ पृष्ठांतच ( मूळ काव्याचे जाड टाईपामधील श्लोक धरून ) तात्यांनी संपविली आहे. शब्दांचे अर्थ देणे, समासांचे विग्रह सोडविणे, पौराणिक प्रसंगांचे संदर्भ स्पष्ट करणे आणि पुढील श्लोकाशी अनुसंधान साधणे एवढा भाग या टीकेत आला आहे. यापेक्षा अधिक रसग्रहणाच्या स्वरूपाचा भाग तीमध्ये नाही. मल्लिनाथी टीकेत येणारी अलंकार, पाठभेद किंवा व्याकरणविषयक टीपा या स्वरूपाची चर्चाही तीमध्ये आलेली नाही.—प्राकृत माणसास म्हणजे संस्कृतामध्ये विशेष गती नसलेल्या मराठी वाचकास अर्थग्रहणास मदत करणे एवढाच नम्र उद्देश या टीकेचा होता, त्यामुळे सदृशार्थाची अवतरणे किवा त्यांतील विशिष्ट शब्द ज्यांत आले आहेत अशी इतर स्थळे, इत्यादी टीकाकाराचे पांडित्य प्रकट करणारा भागही या टीकेत नाही. मर्यादित उद्देश अगदी साधेपणाने साधणारी अशीही टीका आहे.

### यशोदापांडुरंगी

या आधी दादोबा पाडुरंग यांची 'यशोदापांडुरंगी' ही केकावलीवरील टीका प्रसिद्ध झाली असून गोडबोले यानी केकादर्श रचिला याचे कारण दादोबांची टीका ही-प्राकृत–जनांस झेपण्यास जरा अवघडच गेली हे असावे. ही टीका अधिक उच्च आकांक्षेने आणि प्रौढ पांडित्याने रचिलेली आहे. तिची प्रस्तावनाच ५२ पानांइतकी दीर्घ आहे आणि तीमध्ये बऱ्याच विषयांची चर्चा झाली आहे. इतर कित्येक इंग्रजी-शिक्षित लेखकांप्रमाणे एक ५–६ पृष्ठांची इंग्रजी प्रस्तावनाही दादोबांनी तिला जोडली आहे. दादोबांनी ही टीका आपल्या अकाली दिवंगत झालेल्या मुलीस ( किंवा इंग्रजी पद्धतीने स्मरणास–To the Memory ) अर्पण केली असून अर्पणपत्रिका मराठी आणि इंग्रजी अशा दोनही भाषांत दिली आहे. टीकेला सुरवात मुलींच्या अभ्यासा-करिता केली होती. परंतु ती मुलगी–कावेरी–ही ह्या 'ग्रंथाची समाप्ति पाहण्यास जगदीशाच्या इच्छेनें राहिली नाहीं.

### इंग्रजी प्रस्तावना

आपल्या इंग्रजी प्रस्तावनेत दादोबा पुढील विचार प्रकट करितात. मोरोपंतांनी

स्वतःस आपल्या तरुण वयात संस्कृत भाषा आणि वाङ्मय यांच्या अभ्यासास वाहून घेतले असताही आपल्या देशबांधवांकरिता प्राकृत भाषेमध्ये (Vernacular Tongue ) लेखन वा रचना केल्याबद्दल आणि संस्कृत वाङ्मयातील आधीच तयार असलेले बौद्धिक खाद्य पुढे वाढून ठेवल्याबद्दल दादोबांनी त्यांना धन्यवाद दिले आहेत. मोरोपंतांचे समग्र वाङ्मय किती प्रचंड आहे याची कल्पना देऊन आपण टीका करीत असलेला त्या वाङ्मयाचा भाग किती अल्प आहे तेही सांगितले आहे. काव्य लहान असले तरी ते कवीच्या प्रतिभेची उत्तम साक्ष देते, त्या काव्याची शैली प्रौढ आणि शुद्ध आहे, त्यांतील काव्यसौंदर्य, तसेच त्यातील विषयाचे सौरस्य फार वेधक आहे, म्हणून आपण त्याची निवड केली. पेशवाईतील एका संस्कृत पंडिताने मराठीमध्ये संस्कृतच्या धर्तीवर लिहिलेले हे काव्य सामान्य विद्यार्थ्यास समजणे कठीण आहे. त्याचे सोपे शब्दान्तर करणे ( Paraphrase ) आणि त्याचा अर्थ स्पष्ट करणे हे आवश्यक आहे एवढेच नव्हे, तर संस्कृताच्या अभ्यासकासही त्याचे संपूर्ण व सहज अवगमन होणे अशक्यप्राय आहे, असाही अभिप्राय ते प्रकट करितात.

**मराठी प्रस्तावना**

दादोबांनी लिहिलेल्या मराठी प्रस्तावनेत पुष्कळच अधिक आणि महत्त्वाची चर्चा केली आहे. प्रथम मोरोपंतांविषयी त्यावेळी उपलब्ध असलेली चरित्रविषयक माहिती येते. पंतांची तुलना ते नैषधकाव्यकर्ता श्रीहर्ष याच्याबरोबर करितात; कारण त्याच्या काव्याप्रमाणेच पंतांचे काव्य दुर्बोध आणि कठीण आहे. पंतांची कीर्ती त्यांच्या हयातीतच काशीपर्यंत गेली होती. त्याचे कारण ती हरिदासांनी आपल्या कथांतून लोकपरिचित केली. त्यात रसिक रामजोश्याने बराच हातभार लावला असावा इत्यादी गोष्टींचा दादोबांनी पुढे उल्लेख केला आहे. यमकाच्या बाबतीत मोरोपंतांनी वामनाकडून कित्ता घेतला असावा असा तर्क करून पंतांची वाणी वामनापेक्षा अधिक शुद्ध आणि रसभरित असल्याचे आपले मत दिले आहे. वामनाचा विषय अधिक गंभीर व प्रगल्भ असल्याने शब्दशुद्धीकडे आणि रस व अलंकारांकडे त्याचे लक्ष नसावे, म्हणूनच त्याच्या रचनेतील अशुद्धतेबाबत किंवा रसाभावाबद्दल ते वामनास क्षमाही करितात. पंतांचा विषय इतिहासकथन आणि स्तवन असा असल्याने त्यांना आपल्या 'कवनांत रस, अलंकार, प्रास आणि यमके साधण्यास अधिक अवकाश होता. परंतु तितके चारही प्रकार रम्य आणि उत्कृष्ट रीतीने साधून पुनः शुद्ध शब्दांच्या निवेशाकडे जें त्याहीं अपूर्व लक्ष दिलें, तेणेकरून त्यांहीं रसिक आणि भाषाभिज्ञ अशा विद्वज्जनांच्या स्तुतिग्रहणाविषयीं पर्वकाळच साधिला.'[१] 'त्यांच्या काव्यांत संस्कृत शब्दांचा भरणा इतका प्रचुर असून त्यांणीं तितक्या शब्दांचे वर्ण आणि र्‍हस्वदीर्घत्वही अबाधित

१. यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ. १८

संभाळिलें, येणेंकरून तर त्यांच्या कवितेला पवित्रतेचा पाटाव नेसविला"[1] –असा पंतांच्या भाषाशुद्धतेचा गौरवही दादोबांनी मुक्तकंठाने केला आहे. मोरोपंतांच्या काव्य-चातुर्याचा नमुना म्हणून त्यांच्या वनपर्वातील द्रौपदी –सत्यभामासंवादातील नऊ आर्यांचे सविस्तर अर्थग्रहण आणि रसग्रहण दादोबांनी करून दाखविले आहे. पंतांच्या यमकसाधनाबद्दल त्यांना मोठे सकौतुक आश्चर्य वाटते. 'सहज बोलत असतां मोरोपंतांच्या मुखांतून सरस आर्या निघाव्या आणि मोठमोठे प्रास आणि यमकें सहज त्यांणीं साधावीं इतकी परमाश्चर्यकारक कवन करण्याची हातोटी त्यांस साधून गेली होती.'[2] –असे ते आदरपूर्वक लिहितात. त्यानंतर पंतांच्या निरनिराळ्या रामायणांतून आणखी काही पदांचे उतारे त्यांच्या काव्यवैचित्र्याचे नमुने म्हणून त्यांनी सादर केले आहेत.

**केकावलीमधील भक्ति**

'केकावली' हे एक स्तोत्र असून त्यातून पंताची ईश्वरभक्ती व्यक्त होते. ती एका विशिष्ट देवतेची नसून सर्व देवांविषयी भक्ती होती. इतर साधुसंतांविषयी त्यांना आदर असे हे पंतांच्या तद्विषयक आर्या उद्धृत करून दादोबांनी निदर्शनास आणून नंतर पंतांनी ईश्वराशी केलेला लडिवाळपणा अथवा सलगी या आक्षेपविषय झालेल्या बाबीचा परामर्श घेतला आहे. अशा सलगीबद्दल आपली नापसंती व्यक्त करूनही मराठी संतांची अद्वैतमूलक भूमिका लक्षात घेता दीर्घ परंपरेने प्राप्त झालेली ही सलगी अस्वाभाविक नाही असाही अभिप्राय त्यांनी दिला आहे. शिवाय अपराधी लोकांची न्यायाधीशापुढील विनयाची आणि दीनवाणी भूमिका आणि मुले आपल्या आई-बापांशी काही वस्तू मागताना दाखवितात तो रोष, तो लडिवाळपणा अथवा ती सलगी या गोष्टी अगदी वेगळ्या असल्याचे ते सांगतात. त्यामध्ये विनयभाव नसतो असे नाही हेही त्यांनी स्पष्ट केले आहे. शेवटी 'ज्या लोकांमध्ये लडिवाळपणाने आणि सलगीने ईश्वराची प्रार्थना आणि स्तुति करण्याचा सांप्रदाय व्यासाच्या वेळेपासून पडला आहे, त्यांमध्ये आपल्या कवीसच (मोरोपंतास) निवडून काढून या दोषाचा भार त्यांच्या मस्तकावर ठेवण्यास त्यांस पुढे करणे मला योग्य दिसत नाहीं' (प्रस्ता. पृ. ४०) असा आपला निर्णयही देऊन टाकला आहे. पुढे गीतगोविंदामधील परमेश्वराचा शृंगार किती उत्तान आहे ते सोदाहरण सांगून 'असा शृंगाररसान्वित भक्तिप्रेम प्रकट करण्याचा शिष्टसांप्रदाय जेथें प्राचीन कालापासून चालत आहे, तेथें आपल्या यःकश्चित प्राकृत कवीनें आपल्या स्तोत्रांत कोठे सातआठ श्लोकांत या रसाचे एक दोन थेंब ओतले असल्यास हा त्यांजकडेस मोठा दोष न येतां मला उलट वाटते कीं हे त्या रसाचे अत्यल्पत्व त्यांच्या सदभिरुचीचे ज्ञापक होतें,'

१. यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ. १८.
२. यशोदापांडुरंगी, प्रस्तावना, पृ. १८.

(पृ. ४३) असे प्रशस्तिपत्रकही मोरोपंतांस त्यांनी देऊन टाकले आहे. शेवटी या प्राकृत काव्याची प्रौढी आणि संस्कृतप्रचुरता लक्षात घेऊन आपण त्यावर टीका लिहिण्यास का प्रवृत्त झालो हे सविस्तर स्पष्ट करून आणि आपल्या या टीकेचे विशेष कोणते ते सांगून ही विस्तृत प्रस्तावना दादोबांनी संपविली आहे.

## दादोबांच्या टीकेचे स्वरूप

दादोबांच्या पुढेही मल्लिनाथाच्या टीकेचा आदर्श होता हे उघड आहे. परंतु संस्कृत काव्याच्या वाचकापेक्षा हे मराठी काव्य वाचणारा वाचक फारच कमी विदग्ध असण्याचा संभव असल्याने ही टीका सुगम व सुबोध करण्याचा प्रयत्न यात स्पष्ट दिसतो. तात्यांच्या केकादर्शापेक्षा ही टीका अधिक प्रौढ, पांडित्यपूर्ण आणि विस्तृत झाली आहे. प्रत्येक केकेच्या प्रारंभी मागील केकेवरून पुढील केकेशी लावलेले अनुसंधान प्रथम देऊन मग त्या केकेचा पदान्वय म्हणजे गद्य अन्वय, एकेका पदाची फोड व अर्थस्पष्टीकरण, मधून मधून अलंकारचर्चा, तळटीपांमधून संस्कृत आणि प्राकृत कवींच्या ग्रंथामधून अवतरणे, पाठभेदचर्चा, व्याकरणविचार इत्यादी अंगांनी मंडित अशी ही टीका अव्वल इंग्रजीतील टीकेचे वैदग्ध्यपूर्ण आणि प्रौढ असे उदाहरण ठरते यांत शंका नाही. अमरकोश, संस्कृत नाटके, भारत, भागवत, विष्णुसहस्रनाम, भगवद्गीता, गजेंद्रमोक्ष, भीष्मस्तवराज, गीतगोविंद इत्यादी अनेक संस्कृत ग्रंथ आणि ज्ञानेश्वरी, विवेकसिंधु, तुकाराम अभंग, वामनपंडितांची कविता इत्यादी प्राचीन काव्यातील अवतरणे यांमुळे या टीकेत पांडित्यपूर्णता आली आहे. दादोबांनी आपल्या कन्येसाठी लिहावयास घेतलेली ही टीका वस्तुतः बालबोध राहिली नसून विदग्ध रसिकासच तिचे महत्त्व कळावे अशी उतरली आहे.

## प्रस्तावनांतील विचार

वाङ्मयविषयक काही विचार या कालात लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्या, काव्ये आणि नाटके यांच्या प्रस्तावनांतून येतो; पण तो सामान्यतः अगदी त्रोटक आणि मामुली स्वरूपाचा असतो. भाषांतरित कृतींच्या प्रस्तावनांतून भाषांतराविषयी काही विचार प्रकट झालेले दिसतात. संस्कृत नाटकांचे एक प्रमुख भाषांतरकार परशुरामपंत गोडबोले भाषांतराविषयी आपले मत सांगताना भाषांतर शब्दास शब्द बराबर असावे ही तात्त्विक भूमिका मान्य करूनही क्वचित संस्कृतातील अर्थ घेऊन महाराष्ट्रभाषेच्या रीतीने लिहावे लागले असे म्हणतात. विक्रमोर्वशी नाटकाच्या प्रस्तावनेत पद्याचे भाषांतर पद्यातच असणे इष्ट असल्याचे कृष्णशास्त्री राजवाडे सांगतात. इतर ग्रंथांतून लेखक आपला ग्रंथलेखनाचा हेतू काय आहे हे सांगताना आपली वाङ्मयविषयक भूमिका अभावितपणे सांगून जातात. कोणी बोध, तर कोणी मनोरंजन हा आपला हेतू असल्याचे स्पष्ट करितात. कृ. प. गाडगीळ यांनी केवळ एक व्यक्तिदर्शन एवढाच हेतू असल्याचे व हे व्यक्तिदर्शन निर्भेळ खलाचे असल्याचे सांगितले आहे. मनोरमा नाटकाच्या इंग्रजी प्रस्तावनेत नाटककार चितळे हे ललित वाङ्मयाच्या इतर

प्रकारांपेक्षा नाटकाचे आगळेपण सांगताना म्हणतात की, नाटकात सद्गुणांना आणि दुर्गुणांना योग्य ते प्रतिनिधित्व दिलेले असते. काव्यातून आणि कादंबऱ्यांतून ज्या गोष्टी केवळ वाचकांच्या कल्पनेवर सोपवून दिलेल्या असतात, त्या प्रत्यक्ष रूपात नाटकांतूनच प्रभावीपणे प्रेक्षकांपुढे मांडल्या जाऊ शकतात. निःपक्षपाती, प्रगत लोकमत बनवण्यासही यामुळे साहाय्य होते. परंतु प्रस्तावनांतून झालेले हे मतप्रकटन फार त्रोटक असते. त्याला सुसंगत, सुसंबद्ध वाङ्मयविचाराचे स्वरूप येऊ शकत नाही. कित्येक वेळा ते सुटे सुटे किरकोळ विचार असतात. जयपाळ नाटकाच्या प्रस्तावनेत वि. ज. कीर्तने यांनी एका महत्त्वाच्या विचाराबरोबर दोन किरकोळ विचार सांगितले आहेत. नाटकातील पात्रे ही सर्वच स्थळी आणि सर्व काली दिसणारी असतात. सामान्य माणसाच्या भावना आणि त्याचे अंतरंग यांचे दर्शन लेखक करवीत असतो हे सांगतानाच स्थलांची नावे काल्पनिक असल्याने काही बिघडत नाही आणि आपल्या नाटकातील काल हा जरी जुना असला तरी खालच्या दर्जाच्या व्यक्तींची प्राचीन नावे उपलब्ध नसल्याने वरच्या पात्रांची नावे जुनी आणि खालच्या पात्रांची नावे मात्र आजची, असे करणे भाग पडल्याचेही त्यांनी नमूद केले आहे. असे वाङ्मयविचारांचे सुटे सुटे कण या प्रस्तावनांतून विखुरलेले आहेत हे खरे, परंतु यामधून एक सलग, सुसंबद्ध विचारसरणी निघू शकत नाही. प्रस्तावनांचा तो हेतूही नसे.

### कुंटे यांची ' राजा शिवाजी 'ची प्रस्तावना

याला अपवाद म्हणजे कुंटे यांच्या ' राजा शिवाजी ' या काव्याची प्रस्तावना. आपल्या काव्याच्या १९ पानांच्या दीर्घ प्रस्तावनेमध्ये त्यांनी काव्य, काव्याभिरुची, जुनी काव्याभिरुची, महाकाव्याचे स्वरूप, टीकेचे प्रकार, रोमँटिक आणि क्लासिकल हे संप्रदाय, कथावस्तू इत्यादींविषयी आपले विचार प्रकट करून ठेवले आहेत. प्रथमच सामान्य वाचका ( Public ) चे मत क्वचितच चूक असू शकते असे म्हणून काव्य म्हणजे बुद्धीचा अवमान न करिता भावनेला आवाहन करणारे लेखन अशी त्याची व्याख्या त्यांनी केली आहे. काव्याचे यश वाचकाच्या अभिरुचीवर आणि भावनांवर अवलंबून असते. ही अभिरुची शुद्ध, सुसंस्कृत, अतिचिकित्सक असू शकते अथवा सदोषही असते, व केवळ व्यक्तीचीच नव्हे, तर संबंध समाजाचीही ती तशी असते असे ते सांगतात. महाराष्ट्रीय समाजाचे अभिरुचिदृष्ट्या त्यांनी तीन वर्ग केले आहेत. पहिल्यात शास्त्रीमंडळी आणि त्यांचे अनुयायी येतात; दुसऱ्यात शिक्षित, म्हणजे इंग्रजी जाणणारे लोक आणि तिसऱ्यात ह्या दोहोबद्दलही उदासीन असणारे आणि आपल्या प्रवृत्तींनीच प्रेरित झालेले असे बहुसंख्य अशिक्षित लोक येतात. ह्यांपैकी शास्त्रीजनांची अभिरुची हीच कुंटे यांच्या काली प्रभावी होती; परंतु ती कुंट्यांना कृत्रिम, चमत्कृतिनिष्ठ व म्हणून अनुचित अशी वाटे. ही शास्त्रीमंडळी म्हणजे जुन्या पद्धतीने अध्ययन केलेल्यांची पिढी होती. काव्याचा एकंदर संकलित, संश्लिष्ट परिणामा-ऐवजी प्रत्येक द्विपदीत असलेल्या चमत्कृतीकडेच त्यांचे लक्ष असते अशी त्यांची

तर्फार होती. नैसर्गिक वा स्वाभाविक सौंदर्यापेक्षा कृत्रिम, लक्षवेधक, भडक चमत्कृतीलाच ते महत्त्व देतात व ही त्यांची अभिरुची चांगली नाही असे कुंट्यांचे मत होते. शास्त्रीमंडळींच्या नंतर संख्येने त्यांच्यापेक्षा कमी, पण बुद्धिमत्तेच्या दृष्टीने फार वरच्या दर्जाचे रसिक, म्हणजे ज्यांचे इंग्रजी शिक्षण झाले आहे असे लोक. त्यांची अभिरुची सुधारलेली, मने पूर्वग्रहरहित, मते बहुधा विचारपूर्वक बनविलेली आणि म्हणून बरोबर व समजूत व्यापक आणि उदार असते अशी कुंटे यांची धारणा होती. मत देण्यास किंवा परीक्षण करण्यास हेच खरोखर पात्र आणि समर्थ असतात. तथापि त्यांच्याकडून हे काम नीट होत नाही असे त्यांना म्हणावयाचे होते. हे इंग्रजी शिक्षित लोक इंग्रजी वाङ्मय वाचत असताना मात्र स्तुतीस पात्र अशा वाङ्मयाची योग्य ती कदर करितील, परंतु एखादे मराठी पुस्तक हाती घेतले की त्यांची रुची एकदम पालटते. मराठी कवितेतील शब्दयोजना त्यांना बेंगरूळ वाटते, तीमधील मालमसाला कच्चा वाटतो. शास्त्री काय किंवा इंग्रजी शिक्षित काय, दोघांनाही समान अशी गोष्ट म्हणजे मराठीची अभिरुची लावून घेण्याची त्यांची तयारी नसते. एक संस्कृतच्या दृष्टिकोणातून, तर दुसरे इंग्रजीच्या दृष्टिकोणातून पाहात असतात. इंग्रजी शिकलेल्यांपैकी काहींनी मराठी काव्यरचना केली असली, तरी गद्यलेखनाच्या वेळी नवीन इंग्रजी पद्धतीने लिहिणारे हे लोक काव्यलेखनाच्या वेळी मात्र वामन–मोरोपंतांच्या कृत्रिम पद्धतीचे काटेकोरपणे पालन करिताना व संस्कृतप्रचुर, क्लिष्ट अशी रचना करिताना दिसतात. मराठी शब्द उपलब्ध असताना संस्कृत शब्दांचा आश्रय करणे अयोग्य होय. तिसरा वर्ग अशिक्षित लोकांचा. ह्यांच्या अभिरुचीचा प्रश्नच नाही; तथापि कोणीही त्यांना झुकवावे असे मात्र नाही, असे कुंटे यांना वाटते. सामान्य अशिक्षित मराठी माणूस हा स्वतंत्र बुद्धीचा, आपले चालवू शकणारा व स्वतःकरिता विचार करणारा असतो असे कुंटे यांचे मत होते. म्हणूनच तुकारामासारखा कवी त्यांच्यामध्ये निर्माण झाला व सर्व खालचा समाज त्यांचे काव्य ग्रहण करू शकला असे ते म्हणतात.

### रोमँटिक आणि क्लासिकल

या संदर्भात कुंटे यांनी रोमँटिक आणि क्लासिकल या दोन शैलींचा (!) उल्लेख केला आहे. कला जेव्हा निसर्गाचेच अनुकरण करिते, म्हणजे त्याला विरोधी नसते, त्याच वेळी ती खरी कला असते असे सांगून निसर्गापेक्षा वरचढ होण्याच्या प्रयत्नात ती कृत्रिम होते, कलाच राहात नाही; अशा प्रकारच्या कृत्रिम शैलीला क्लासिकल शैली म्हणतात असे त्यांचे म्हणणे आहे. कुंटे यांनी आपला काव्यविषयक आचार पहिल्या म्हणजे रोमँटिक शैलीला धरून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ही भाषाशैली एपिक या काव्यप्रकाराला अनुरूप ठरली नाही. त्यांना एक एपिक लिहावयाचे होते म्हणून त्याविषयीही काही चर्चा त्यांनी केली आहे. त्यात ट्रॅजिडी आणि कॉमेडी, कथात्मक काव्य, भावगीत किंवा एखादे पॅस्टोरल काव्य यांविषयीही आपली कल्पना सांगून एपिकचा विषय म्हणजे एका राष्ट्राच्या उत्थानाचा, प्रगतीचा आणि ऱ्हासाचा

इतिहास असून त्यात वत्सल–अद्भुत यांसह सर्व रस येतात असेही त्यांनी म्हटले आहे. थोडक्यात एपिक म्हणजे राष्ट्राच्या अस्मितेचे चित्र होय. मराठ्यांच्या उत्थानाचे आणि प्रगतीचे चित्र काढण्याची महत्त्वाकांक्षा कवीने म्हणजे स्वतः कुंटे यांनी बाळगिली असल्याचा त्यांनी आवर्जून उल्लेख केला आहे. प्रस्तुत काव्यास नाटकाचे नियम लावणे चुकीचे होतील असे ते बजानतात. टीकेबद्दलही त्यांनी विधायक आणि विघातक असे दोन भेद निर्दिष्ट केले आहेत आणि काव्याचे कथानक स्पष्ट करताना कवीचे कार्य कसे चालते ते थोडक्यात सांगून विवेचन संपविले आहे. मराठी काव्य-विचारात नवीन इंग्रजी विचाराचा प्रवेश करून देणारे हे पहिलेच विवेचन होय. या दृष्टीने ते अत्यंत महत्त्वाचे आहे. कुंटे यांनी हे काम अत्यंत निर्भीडपणे आणि धिटाईने केले. नवीन मराठी काव्याचा जरी हा प्रारंभ ठरला नाही, तरी नवीन काव्यविचारांचा आरंभ ठरतो यात शंका नाही. काव्याभिरुची किंवा वाङ्मयाभिरुची याविषयीची ही पहिली चर्चा होती. कुंट्यांच्या काव्यातील आचारापेक्षा त्यांचा हा विचारच अधिक मोलाचा वाटतो. परतु हा इंग्रजीमधून व्यक्त झाला यामुळे आणि आचारांतील विक्षिप्तपणामुळे या विचाराकडे दुर्लक्ष झाले.

### का. बा. मराठे यांचा निबंध

कुंटे यांच्या प्रस्तुत प्रस्तावनेनंतर, परंतु स्वतंत्र टीकात्मक निबंधाच्या स्वरूपात झालेला या काळानंतरचा वाङ्मयविचार म्हणजे मराठे यांचा ‘ नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध ’ हा होय. नावाप्रमाणे ह्यात नावल ( कथा-कादंबरी ) आणि नाटक यांच्या आदर्श रूपाविषयी आणि मराठीमध्ये त्या काळात होत असलेल्या नाटक-कादंबऱ्यांविषयी चर्चा आलेली आहे. समकालीन वाङ्मयांतील अनिष्ट भागामुळेच प्रस्तुत निबंध लिहिण्याची त्याना प्रेरणा झाली. प्रस्तुत मराठी निबंधालाही इंग्रजी प्रस्तावना आहे तीमध्ये लेखकाने स्पष्टपणे समकालीन लेखक आणि वाङ्मय यांविषयी मतप्रकटन केले आहे. आपल्याकडील नाटककार आणि कादंबरीकार यांच्यातील शंभरांपैकी एकासही युरोपियन लेखकाप्रमाणे या वाङ्मय–प्रकाराची मूलतत्त्वे आणि नियम माहीत नसल्याची तक्रार लेखकाने आरंभालाच केली व कालिदास, स्कॉट वा शेक्सपियर यांचे यश एकाच्याही वाट्यास येणार नसल्याचे भाकित केले. आपल्यांतील शिक्षित आणि बुद्धिमान लोकांना तसे यश मिळणे वस्तुतः अशक्य नसले, तरी सरकारी नोकरीच्या मायापाशात सापडल्याने त्यांच्याकडून देशी भाषांतील वाङ्मयाची अभिवृद्धी करण्याचे कार्य होत नाही अशी त्यांनी या परिस्थितीची मीमांसा केली आहे. आजच्या नाटक-कादंबऱ्यांनी वाचकाचा फायदा व्हावयाचा नाही, उलट त्यांतील काही तर फार घातक आहेत असा इशारा दिला आहे. त्या तशा का आहेत ते दाखविण्यासाठी प्रस्तुत निबंध लिहिला असल्याचे सांगून त्या विवेचनामधील काही तत्त्वे ॲडिसन, स्कॉट, मेकॉले यांच्याकडून आणि काही संस्कृत अलंकार-शास्त्रातून घेतल्याचा निर्देशही केला आहे.

**नावल-विषयक विवेचन**

निबंधाच्या निम्म्या भागात म्हणजे पहिल्या १५–१६ पृष्ठांत नावलांचा म्हणजे कथा-कादंबऱ्यांचा, आणि उर्वरित भागात नाटकांचा विचार लेखकाने केला आहे. कादंबरी हा शब्द वापरण्याऐवजी त्याने नावल हा नॉव्हेलला जवळ असणारा शब्दच वापरला आहे. नावल या प्रकाराची फारच व्यापक अशी कल्पना देऊन चमत्कृतिपूर्णता किंवा अद्‌भुतता हे त्याचे व्यवच्छेदक लक्षण म्हणून सांगितले आहे. नावलांमध्ये चार वेद, आष्टदश पुराणे व एकंदर काव्ये, त्यांत महाभारत, रामायण, भागवत आणि इतर पुराणे यांचाही अंतर्भाव होतो असे म्हटले आहे. आरंभाला नावलाची व्याप्ती एवढी ऐसपैस घेऊनही पुढे उदाहरणे देताना समकालीन कादंबरी-वाङ्मयातूनच ती घेतली आहेत. पहिल्या दोन-तीन पानांत अद्‌भुताचेच महत्त्व वर्णन करून त्यामुळे कथाविषयात रंजकता आणि आकर्षकता येते हे विस्ताराने सांगितले आहे. शिवाजीच्या व्यक्तित्वाभोवती अद्‌भुताचे वलय कसे निर्माण झाले आहे याचा उल्लेख करून तसे व्हावेच असा स्पष्ट अभिप्रायही दिला आहे. परंतु अद्‌भुताचा इतका गौरव करूनही पुढे त्याला सत्याचे अधिष्ठान पाहिजे असे सांगताना विषयगत व्यक्ती सत्य असून त्यांचे वर्णन अंशतः अद्‌भुत-मिश्रित असल्यास ते फारच उत्तम (याला ते Romance म्हणतात) वर्णन समग्र सत्य असून व्यक्ती मात्र कल्पित असतात. याला इंग्रजीत नॉव्हेल म्हणतात असा या दोहोंमधील भेद स्पष्ट केला आहे. वर्णन सत्य असावे याचा अर्थ इतकाच की, प्रत्येक व्यक्तीच्या संबंधाने प्रत्येक गोष्ट कल्पित असली तरी संभवण्यासारखी असली पाहिजे. नायक-नायिकांवर सारखी संकटे येत असणे हे योग्य नव्हे असे सुचवून शृंगारादी वर्णनात सर्व उघड वर्णन असण्यापेक्षा सूचकता असावी असेही सांगितले आहे. पुढे नाटकातल्याप्रमाणेच नावलांतील 'काळ, वेळ, पुरुषस्वभाव आणि स्थळ' ही एकच असावी असे सांगून ॲरिस्टॉटलच्या त्रिविध ऐक्यात्म्याचा पुरस्कार त्यांनी केल्याचे दिसते. स्वभाववर्णनात सुसंगती असावयास पाहिजे व व्यक्तीच्या भाषणात प्रसंग पाहून योग्य त्या प्रकारची भाषा घातली पाहिजे हे पुढे स्पष्ट केले आहे. नावलामध्ये सृष्टीचे नैसर्गिक स्वरूपाचे वर्णन असावे, म्हणजे व्यक्तींची जी गोष्ट सांगितली असेल, ती खरी कोठे तरी झालेली असावी. झालेली नसेल तर संभाव्य व खऱ्यासारखी भासणारी असावी. हलकट लोकांचे फार वर्णन नको व श्रीमंत लोकांच्या थाटामाटाच्या वर्णनापासूनही नेहमी आनंद होणार नाही. कामक्रोधादी 'मनोद्वेगाचे' मासले दाखवावे लागतात ते सर्व मनुष्यजातीमध्ये ज्या सामान्य चिन्हांनी त्यांचे प्रदर्शन होते ते दाखवावे; कोणत्याही विशेष गोष्टींचे फारसे वर्णन कामाचे नाही. विविध देशांत पेहराव आणि चालीरीती भिन्न असतात. परंतु आत्मा सर्वांचा एक आहे म्हणून आकृतीचे वर्णन करताना आत्म्याकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. नावलांचा विषय ज्यापासून वाचकास उत्तेजन येईल व समाधान वाटेल असा असावा. नावलांमध्ये किंवा तत्समान ग्रंथांत फारसे पांडित्य, शब्दलालित्य,

अथवा फारशी विद्वत्ता ही कामाची नाहीत, गोष्ट साधी असावी, तीत फार आढेवेढे नसावे, हे सारे मुद्दे शेवटी थोडक्यात नमूद करून नावलांबद्दलचे हे विवेचन संपविले आहे. विवेचन करीत असता आपल्याकडील कादंबरीवाङ्मयातून भरपूर उदाहरणे दिली आहेत, पण ती बहुधा दोषदर्शनार्थ येतात. कारण समकालीन नावलांमधील दोषांचे विवेचन करण्याकरिताच हा निबंध मुळात लिहिला गेला होता. नावलांचा प्रकार मराठीमध्ये नवीनच होता. त्याच्या परीक्षणार्थ लेखकाने इंग्रजीमधील विचारच आधारास घेतला. मराठीत तरी तो अगदी नवीन होता; त्यामुळे त्याचे स्वागत झाले यात आश्चर्य नाही.

## नाटकविषयक विवेचन

आरंभालाच नाटक म्हणजे हावभावांसह रंगभूमीवर म्हणून दाखविण्याजोगे रसभरित संवादमिश्रित काव्य अशी त्याची व्याख्या करून नाट्याबद्दलची आवड व त्याचे आकर्षण सर्वच समाजांतून कसे असते ते सांगितले आहे. नाटककारास आवश्यक असणाऱ्या कवीची प्रज्वलित बुद्धी, इतिहासकाराचे इतिहासज्ञान, विजातीय ( ? ) चित्रकाराची कला, वक्त्याची विलक्षण मनोवेधकता, नावलकाराचे चातुर्य, व तत्त्ववेत्त्याची गहन बुद्धी या गुणांची यादी देऊन पुढे भरताचार्यांने घालून दिलेल्या नाट्यशास्त्राचा थोडक्यात परिचय करून दिला आहे. भरताच्या नाट्यापेक्षा आपण इंग्रजीवरूनच आरंभी दिलेली व्याख्याच अधिक बरी असे मत देऊन वस्तू, नायक व रस या तीन गोष्टी नाटकात महत्त्वाच्या आहेत याचा निर्देश करून क्रमाने विषय ( वस्तू ) ऐतिहासिक किंवा कल्पित असू शकतो, नायक-नायिका गुणवान असावी, इतर पात्रांचेही स्थान काय असावे इत्यादीविषयी भरताचे मत दिले आहे. पुढे रसांची उदाहरणे मराठीमधून देऊन भारतीय नाट्यशास्त्राचा परिचय संपविला आहे. त्यानंतर प्राचीन पाश्चात्त्य नाटकांचे स्वरूप थोडक्यात निर्दिष्ट करून अर्वाचीन पाश्चात्त्य नाटकाकडे लेखक वळतो. त्यात कॉमेडी, ट्रॅजिडी, ऐतिहासिक नाटके, ऑपेरा इत्यादी प्रकारांचा उल्लेख व कालिदासादी संस्कृत नाटककारांचा नामोल्लेख करून पुढे एकंदरीत चांगल्या नाटकास आवश्यक गोष्टींच्या चर्चेस हात घातला आहे. नाटकात अनेक गोष्टी घालून उपयोग नाही. मुख्य पात्राच्या गोष्टीला साधनीभूत दुसऱ्या गोष्टी घातल्या असता चिंता नाही. नाटकाचा विषय प्रौढ असावा, त्यापासून वाचकाच्या मनाची सुधारणा व्हावी, दुष्ट, हलकट लोकांचा फारसा उल्लेख असू नये, नाटकामध्ये स्थळाचे व काळाचे ऐक्य पाहिजे, इत्यादी मुद्द्यांचे उदाहरण देऊन विवेचन केले आहे. माधवराव ( थोरले ), जयपाळ, झाशीची राणी, नारायणराव या मराठी नाटकांतून यांपैकी काही गोष्टी आल्याचे मत प्रकट केले आहे. संस्कृत नाटकांच्या भाषांतरांची गणना केली नाही तर एकही उत्तम नाटक मराठीमध्ये अद्याप नसल्याचा स्पष्ट अभिप्राय अखेरीस दिला आहे. नाटकाविषयीच्या भागात मराठी नाटकांपेक्षा इतर नाटके किंवा तद्विषयक शास्त्र यांच्या माहितीलाच अधिक

महत्त्व दिले गेल्याने मराठी नाटकाविषयींची चर्चा फारच अपुरी व त्रोटक वाटते. मराठे यांच्या या निबंधाला ऐतिहासिक दृष्ट्या विशेष महत्त्व आहे. वाङ्मयविषयक मूलभूत तत्त्वाच्या नवीन विचाराला प्रारंभ होऊन चालना मिळाली. त्यातील परखड टीकेचा पुढील वाङ्मयनिर्मितीवर कितपत परिणाम झाला हे ठरविणे कठीण असले तरी गद्य वाङ्मयाचे जे दोन प्रमुख प्रकार, त्यांच्या स्वरूपाविषयी काही मूलभूत आणि तात्त्विक विचार होऊ शकतो, याची जाणीव तरी वाचकांच्या मनात निर्माण झाली असावी. मराठे यांनी यानंतर विशेष वाङ्मयविचार का केला नाही याचे आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाही.

## काव्यविचार

नावल आणि नाटक यांच्या विचाराप्रमाणे काव्यविचारही झाला. तो मासिक पुस्तकांमधील लेखमालेच्या स्वरूपात प्रकटला. १८६७ साली विविधज्ञानविस्तार मासिक निघाले. त्याच्या पहिल्या अंकापासून विद्यालयाकरिता म्हणून रा. भि. गुंजीकर यांनी काव्यविचार ही लेखमाला सुरू केली. आधाराला संस्कृत काव्यविचारच प्राधान्याने घेतला, परंतु त्याचे विवेचन स्वतंत्रपणे आणि आधुनिक पद्धतीने केलेले दिसते. केवळ पद्य आणि काव्य ही भिन्न असून काव्यात रस हाच आत्मा असून गुणालंकाररीती ही त्याचा उत्कर्ष होण्यास पोषक अशी अंगे आहेत हे सांगितले आणि नंतर रसचर्चेला प्रारंभ केला. रस म्हणजे काय व ते किती हे दिग्दर्शित केल्यावर शब्दशक्तींचे विवरण जुन्या मतास धरून केले. या तीन लेखांकांनंतर ही चर्चा चार वर्षे स्थगित ठेवून पुढे आणखी दोन लेखांकांत पुनः रसविचाराचा अंगभूत असा नायक-नायिका विचार करून ही लेखमाला सोडूनच दिलेली दिसते. रसमाधवात आलेल्या विचाराच्याच आधाराने त्यांतील संस्कृत शैलीची दाट छाया बाजूस करून हे लेख लिहिले आहेत हे त्यांचे वैशिष्ट्य होय. फार तपशिलात किंवा खोलात जाणे हे गुंजीकरांना अर्थात शक्य आणि इष्ट वाटले नसावे. मराठी कवितेचे वैशिष्ट्य म्हणून तिची भाषा बोलण्यातील भाषेपेक्षा किती भिन्न असते, ते दाखवून हे एक प्रकारचे न्यून आहे असे सांगून ते दूर कसे करावे याविषयीचा विचार व्हावयास पाहिजे असे सुचविले आहे.

## चिपळूणकरांचा काव्यविचार आणि काव्यसमीक्षण

गुंजीकरांच्यापेक्षा वेगळा आणि पाश्चात्त्य विचाराशी जुळणारा असा काव्यविचार शालापत्रकामधून १८७२ सालापासून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी वाचकांपुढे मांडिला. कविता या नावाने लिहिलेल्या तीन लेखांत प्रथम त्यांनी कवितेच्या तीन अवस्थांचे विवेचन केले आहे. पहिली व अत्युत्तम अवस्था म्हणजे केवळ अंतःकरणाचे स्वाभाविक उद्गार यांची असून त्या वेळेस शब्दाचे वगैरे बाह्यालंकार मुळीच नसतात, तरी तिचे साधे शुद्ध स्वरूप त्या वेळेस फारच रमणीय दिसते. अंतःकरणस्फूर्ती असून कवितेस बाह्यालंकारांचेही साहित्य असते, तेव्हा तिची दुसरी अवस्था समजावी. परंतु हृदयद्रावक गुण काहीच नसून केवळ अलंकारादिकांचा मात्र भरणा कवितेत केलेला

असतो, तेव्हा ती तिची तिसरी अवस्था होय, इत्यादी विवेचन पहिल्या लेखात येते. या अवस्था इंग्रजी कवितेतही कशा दिसतात ते सविस्तर सांगण्याकरिता म्हणून पुढील लेख लिहिला. त्यात शेक्सपिअर, मिल्टन, पोप आणि वर्डस्वर्थ, स्कॉट, बायरन, शेली, कीट्स इत्यादी कवींच्या कवितेचा धावता परामर्श घेतला आहे. हे विवेचन काव्येतिहासाच्या स्वरूपाने झाले आहे. तिसऱ्या लेखांकात पुढे संस्कृत कविपंचक या नावाने स्वतंत्रपणे प्रकाशित झालेल्या संस्कृत कवितेच्या विचाराप्रत नेणारी अशी उपन्यासात्मक चर्चा केली आहे. शाहिरी कविता हीच खरोखर मराठीची आद्य कविता होय हे त्यांचे मत याच चर्चेत येऊन गेले आहे. चिपळूणकरांच्या प्रौढ आणि चटकदार लेखनशैलीचा प्रत्यय या वेळेपासूनच येऊ लागतो. तथापि या लेखांतील विवेचन विचारांच्यादृष्टीने सखोल आणि सूक्ष्म असे उतरले नसल्याचा माडखोलकरांचा अभिप्राय[1] यथार्थच वाटतो.

## संस्कृत कविपंचक

परंतु पुढे 'संस्कृत कविपंचक' या नावाने ग्रंथरूपाने प्रकाशित झालेली लेखमाला ही मराठीमधील समीक्षणवाङ्मयाचे पहिलेच असूनही अत्यंत भरदार, मार्मिक आणि डौलदार असे उदाहरण ठरली आहे. तीमध्ये कालिदास, भवभूती, बाणभट्ट, सुबंधु आणि दंडी या संस्कृत कवींच्या लेखनाचे विस्तृत सोदाहरण समीक्षण येते. काव्य हा शब्द येथे संस्कृत अर्थाने घ्यावयाचा असून त्यात काव्याबरोबर नाटके आणि कथा यांचाही समावेश होतो. म्हणजे हे समीक्षण संस्कृतमधील उत्कृष्ट अशा ललित वाङ्मयाचेच समीक्षण ठरते. एकेका कवीच्या वाङ्मयपरामर्शामध्ये प्रथमतः त्याच्याविषयी उपलब्ध चरित्रविषयक माहिती अथवा दंतकथा देऊन मग त्याच्या एक अथवा अनेक कृतींचा परामर्श घेतलेला आहे. यामध्येही त्या त्या कृतीचे बाह्यरूप वर्णन दऊन मग त्यातील सौंदर्यस्थळांचा विस्ताराने परिचय करून दिला आहे. शेवटी त्या त्या कवीची मुख्य मुख्य गुणवैशिष्ट्ये आणि त्याचे दोष यांचेही विवेचेन केले आहे. हे सारे अत्यंत सहृदयतेने आणि रसिकपणाने केलेले आहे. रसिकतेबरोबर प्राचीनाभिमानही या समीक्षणामध्ये ठायी ठायी व्यक्त होत आहे. आपल्या या समीक्षणास जोडलेल्या उपोद्घातात चिपळूणकरांनी केवळ रसास्वादाशिवाय दुसरेही दोन मोठे उपयोग सागितले आहेत. "एक राष्ट्राच्या संबंधाने आणि एक देशभाषेसंबंधाने. "राष्ट्राच्या संबंधाने उपयोग हा की, सध्या आम्हास आमच्याविषयीचेच जे लज्जास्पद अज्ञान आहे, ते नाहीसे होऊन आपली वास्तविक योग्यता किती हे चांगले कळून येईल.... भाषेच्या संबंधाने उपयोग असा की, जुनी गीर्वाणभाषा ही चालू देशभाषांची आदिजननी असल्यामुळे व अत्यंत परिपक्व दशेस पोंचल्यावर तिचा लय झाल्यामुळे तिचे ज्ञान सांप्रतच्या भाषांचे व्युत्पत्तिज्ञान होण्यास कारणीभूत

१. विष्णु कृष्ण चिपळूणकर – काल आणि कर्तृत्व, पृ. १४५.

होणार आहे." पहिल्या उपयोगाच्या अनुषंगाने या निबंधात संस्कृत कवी आणि त्यांची कविता यांसंबंधी पाश्चात्त्य विमर्शकांनी प्रतिपादलेल्या दुर्मतांचे सावेश आणि सयुक्तिक असे खंडन आलेले आहे. परंतु या उपयोगापेक्षा संस्कृत काव्याचे जे रसग्रहण आणि त्यांतील सौंदर्यस्थळांचे जे दर्शन चिपळूणकरांनी या लेखांतून केले आणि करविले आहे, त्यामुळेच वाङ्मयसमीक्षेच्या दृष्टीने या लेखनास महत्त्व प्राप्त झाले असे म्हणावे लागेल. रसग्रहणात्मक समीक्षेचा त्यांच्या कालच्या वाचकांपुढे एक आदर्शच त्यांनी या लेखमालेमध्ये, इतक्या लहान वयात घालून दिलेला आहे.

### गाडगीळ यांचा शैलीवरील निबंध

ज्ञानप्रसारक मासिकामध्ये वाङ्मयविचारास विशेष स्थान नसून १८६३ च्या एप्रिल महिन्याच्या त्याच्या अंकात जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी मराठी ज्ञान-प्रसारक सभेपुढे वाचलेला एक निबंध प्रसिद्ध झाला आहे. गाडगीळ यांचे इतर लेखन वाङ्मयविषयक नसूनही या निबंधात मात्र सर्वच प्रकारच्या वाङ्मयास साधारण अशा एका महत्त्वाच्या विचाराची चर्चा त्यात त्यांनी केलेली आहे हे त्याचे वैशिष्ट्य होय. हा विचार संस्कृत विचारानुसारी नाही हे त्याचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणता येईल. मुख्यतः निबंधलेखन हे गाडगिळांच्या डोळ्यांसमोर असावे. जीस इंग्रजीत Style म्हणतात ती लिहिण्याची शैली आपल्यास अभिप्रेत असल्याचे लेखकाने आरंभीच सांगितले आहे. शैली चांगली येण्यास भाषाचातुर्याखेरीज दुसरा एक गुण आवश्यक असतो हेही त्यांनी स्पष्ट केले आहे. हा महत्त्वाचा गुण म्हणजे जे आपण लिहिले आहे त्या सर्व लिहिण्याचा संबंध स्पष्टपणे वाचकाच्या लक्षात यावा हा आहे असे लेखकाचे मत आहे. प्रसादगुणाबरोबर एकात्म संस्कारावरही गाडगीळ यांनी भर दिला आहे. ज्या लिहिण्यात विचाराचा अंश कमी दिसतो व ती कमताई मुख्यत्वेकरून विषयाच्या निरनिराळ्या भागांचा संबंध दाखविण्यात दिसून येते, तेथे भाषेच्या बाह्य अलंकारांकडे लक्ष देण्यास वाचणारास धीर धरवत नाही असेही लेखक सांगतो. जेथे मूळ काया नीट नाही, तेथे कोणी अलंकार पाहात बसत नाही– भाषेचे ज्ञान चांगले झाले नाही व विचार प्रौढ झाले नाहीत, तोपर्यंत चांगल्या शैलीचे जे बाह्यगुण म्हणजे शब्दालंकारादी प्रकार, हे साधण्याविषयी यत्न करिता सर्व चांगल्या लिहिण्याचा पाया जो स्पष्ट लिहिणे व विचाराचा ओघ दाखविणे तो साधण्याविषयी महान प्रयत्न करावा असे गाडगिळांचे मत आहे. याहींपेक्षा अधिक महत्त्वाचा विचार म्हणजे घरगुती अथवा सरकारी पत्रांतून लेखनात विचारांची स्पष्टता असते. परंतु त्याला कोणी चांगल्या शैलीने लिहिले आहे असे म्हणत नाही. याची कारणमीमांसाही करण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. लिहिण्याची शैली चांगली साधण्यास विचारशक्ती आणि कल्पनाशक्ती यांचे ऐक्य केले पाहिजे असे तो सांगतो. कल्पनाशक्तीच्या योगे लेखनात पदलालित्य, वाक्यलालित्य आणि विचारलालित्य येते असेही प्रतिपादले आहे. वाक्य-लालित्य आणि विचारलालित्य यांचा आपला अर्थ विशद करून शैलीमध्ये त्यांचे

महत्त्व कसे आहे हेही लेखकाने सांगितले आहे. विचार प्रौढ असावेत, परंतु ते रंजकतेने व्यक्त व्हावेत याकरिता लेखकाच्या ठिकाणी कल्पनाशक्ती असावयास पाहिजे. लेखनामध्ये अतिरिक्त अलंकारित्व अथवा अप्रस्तुतत्व असू नये असा इशाराही अखेरीस दिला आहे. तात्त्विक विवेचनात इंग्रजी वाङ्मयाचे उल्लेख आले असले, तरी समकालीन मराठी वाङ्मयाविषयी प्रस्तुत संदर्भात लिहिताना दादोबा पांडुरंगांच्या व्याकरणाच्या प्रस्तावनेतून व मराठी कोलंबस ( कोलंबसाचा वृत्तांत ), थोरले माधवराव पेशवे, बाळमित्र ( छत्रे )–प्रस्तावना, यमुनापर्यटण ( कादंबरी–पदमनजी ) यांतून उदाहरणादाखल उतारे घेतले आहेत. प्राचीन रीतिविचाराचा आधार न घेता आणि विशेषतः नवीन गद्यवाङ्मयाच्या संदर्भात इंग्रजी विचारास अनुसरून, तथापि स्वतंत्र विचार करून लिहिलेल्या या निबंधास या कालातील वाङ्मयविचारात एक आगळेच महत्त्व आहे यात शंका नाही. लेखकाची स्वतःची शैली विशेष लक्षणीय नसली, तरी त्याने केलेला शैलीचा विचार खास लक्षणीय आहे.

**अभिप्राय आणि पुस्तकपरीक्षणे**

वाङ्मयविचार हा तद्विषयक तात्त्विक चर्चेच्या किंवा त्यातील एकेका प्रकाराच्या समीक्षणाने जसा होऊ शकतो, तसा सुट्या सुट्या एकेका ग्रंथाच्या परीक्षणाच्या किंवा त्यावरील अभिप्रायाच्या द्वारेही होतो. अशा परीक्षणांची पद्धतही १८६० च्या पुढे तुरळकपणे रूढ होऊ लागली होती. परीक्षण करण्याजोगी पुस्तके अल्पसंख्य असत आणि त्यांना पुरेशी जागा मिळणेही कठीण. अशा स्थितीत वाङ्मयविचाराचा हा प्रवाह विशेष समृद्ध नसल्यास ते स्वाभाविकच होते. शालापत्रक आणि विविधज्ञानविस्तार निघाल्यावर अशा मासिकांतून मधून मधून पुस्तक-परीक्षणे येत. परंतु प्रत्येक अंकाचा एक भाग म्हणून ती येत नव्हती. मराठी पत्रकर्ते व पुस्तककर्ते नवीन नवीन झालेल्या पुस्तकांविषयी काहीच मते प्रसिद्ध करीत नाहीत, अशी तक्रार बॉम्बे गॅझेटमध्ये कोणीतरी केल्याचा उल्लेख करून वि. ज्ञा. विस्तारामध्ये अशी परीक्षणे येत असतात असे विस्तारकर्त्यांनी आवर्जून लिहिले आहे.[1] तथापि त्यावरून सर्वसामान्य वाचकाचा ग्रह काय होता, याची कल्पना येते. ही मधून मधून येणारी परीक्षणे ज्या प्रकारच्या पुस्तकावर असत, त्या त्या वाङ्मयप्रकाराविषयी काही सामान्य विचारही त्यामध्ये येई. परीक्षणाच्या निमित्ताने काव्य, कादंबरी वा नाटक कसे असावे याविषयीच्या आपल्या कल्पना परीक्षणकर्त्यांनी विशद केलेल्या आहेत. त्यांतून काही वाङ्मयविचार निष्पन्न झाला आहे. उदाहरणार्थ, शि. रा. नित्सुरे यांच्या विद्याधनप्रशंसा या काव्यावर अभिप्राय देताना शालापत्रकात ( जुलै १८७२ ) विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी कवितेचा मुख्य संबंध कल्पनाशक्तीशी आहे, म्हणून मनास रंजविणे हेच तिचे काम असे सांगून काव्याचा रसास्वाद घेत असता

१. विविधज्ञानविस्तार, पुस्तक—४, अंक—३.

त्याच्या कथानकाच्या असत्यतेकडे, किंबहुना असंभाव्यतेकडे लक्ष पोचविणे हे अरसिकत्वाचे दर्शक होय, असेही प्रतिपादिले आहे. कुमारसंभवाच्या मराठी भाषांतराविषयी अभिप्राय देताना चिपळूणकरांनी भाषांतराचे काम किती कठीण असते ते विषद करून 'स्वतः नवीन काव्यें रचणेंहि एक्या पक्षीं कठीण नाहीं, पण परभाषेंतील काव्याचे सर्व गुण आपल्या भाषांत हुबेहुब उतरणें म्हणजे परम दुर्घट होय' असा अभिप्राय दिला आहे. 'विश्वासराव' या कादंबरीचे परीक्षण करिताना वि. ज्ञा. विस्तारामधील लेखकाने कल्पित कथेविषयी काही सामान्य चर्चा केली आहे. तीमध्ये तो म्हणतो, 'कल्पित गोष्टींत प्रत्येक निमित्त संविधानकास नीट लागू झालें पाहिजे व ते जागच्या जागीं आणण्यास कारण पाहिजे. प्रत्येक स्थलाच्या आणि मनुष्याच्या वर्णनांत पार्थक्य असलें पाहिजे व ते त्यासच लागू असें असावे. पात्राचे वर्णन असे व्हावें कीं अमक्या स्थळीं ते कल्पित पात्र असते तर कोणत्या प्रकारचे वर्तन करितें हे समजावे... विशेषतः असंभवनीय निमित्ताचे व अशक्य मानवी स्वभावाचे अवलंबन कदापि करू नये.' सारांश, परीक्षणाच्या निमित्ताने मराठीत त्या त्या वाङ्मयप्रकाराच्या तात्त्विक चर्चेत आणि तंत्र-विचारास प्रारंभ झाला होता असे आपल्यास म्हणता येते.

## गुणदोषविवेचन आणि परखड टीका

परीक्षणामध्ये गुणदोषविवेचनही साहजिकपणेच येई व त्यामध्ये बराच स्पष्टवक्तेपणाही असे. गुणांबरोबर दोषांचीही दखल घेण्यात येई. विद्याधनप्रशंसेवर लिहिताना परीक्षणकार म्हणतात, 'दुर्बोधत्व, व्याकरणविरोध या पुस्तकांत अगदी नाहीत. जे कांही दोष दिसतात तेहि सांगतो.' मात्र शेवटी असा स्पष्ट अभिप्राय देतात की, 'काव्ययश संपादण्याची ज्यांस हौस असेल त्यांनीं ती शक्ति आपले ठायीं किती वसते आहे हे अगोदर नीट पाहून नंतर जुन्या मराठी कवींचे व सोय असल्यास संस्कृत कवींचेहि चांगलें अध्ययन करून मग त्या कामास हात घालावा.' पुणेवर्णनावर अभिप्राय देताना विस्तारकर्ते म्हणतात, 'ज्या गृहस्थाला आपण प्रथम काय लिहिलें व मग काय लिहितों याची आठवण राहत नाहीं, त्याचीं पुस्तकें लिहिण्याची चाल कशी असेल याचा वाचकांनी विचार करावा' (वर्ष २, अंक ८). घोसाळकर यांनी प्रकाशित केलेल्या कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या शाकुंतलाचे परीक्षण करताना पुस्तकाच्या बाह्यांगाचेही परीक्षण विस्तारकर्त्यांनी करून त्याबद्दल त्यांना धन्यवाद दिले आहेत. परंतु त्यांत चित्रें घालण्याबद्दल व त्या चित्राबद्दल मतभेद दर्शविला आहे. शकुंतलेचे चित्र तरुणीपेक्षा पन्नास वर्षांच्या स्त्रीचे दिसते अशी टीका केली आहे. पुस्तक अर्पण करण्यास हिंदू दाता मिळाला नाही काय अशीही पृच्छा केली आहे. भाषांतर बरे आहे असे म्हणूनही 'मूळांत जें माधुर्य, जो भाषणाचा ओघ आणि जें स्वारस्य आहे, ते मराठीमध्यें सर्वांशीं उतरलें नाहीं', असे स्पष्ट मत दिले आहे. त्याच वेळी मोनियर विल्यम्सकृत भाषांतराची प्रशस्ती करून आपली गुणग्राहकता परीक्षणकार व्यक्त करितो. मंजुघोषा या कादंबरीवर अभिप्राय देताना

‘ त्या गोष्टीचें संविधान पूर्वीचेंच, एका भाकडकथेंत होतें, त्यांनीं ( लेखकानें ) त्यास नवा पोशाख मात्र दिला. परंतु हें ते प्रस्तावनेंत कबूल मात्र करीत नाहींत व त्याची मालकी आपण घेऊं पाहतात ’, असा स्पष्ट आरोप परीक्षणकर्त्याने केला आहे. मनोरमा नाटकाविषयी मत देताना, ‘ हे पुस्तक तरुण स्त्रीपुरुष व इतर सभ्य लोक यांच्या हातीं न पडण्याविषयीं सर्वोनीं बंदोबस्त ठेवला असतां फार चांगलें होईल, ’ असे म्हटले आहे. ‘ स्वैरसकेशा ’ नाटकाबद्दल मनोरमेप्रमाणेच ते आहे असे सांगून निराळे परीक्षण असे केलेच नाही. ‘ राजा शिवाजी ’ या कुंटे यांच्या काव्याचे परीक्षण तीन लेखांमधून करून त्याच्या गुणदोषांची सविस्तर छाननी केलेली दिसते. ‘ घाशीराम कोतवाल ’ या पुस्तकाचे निर्भीड परीक्षण नी. ज. कीर्तने यानी शालापत्रकात ( अंक ३–४–१८६३ ) सविस्तर केले आहे या परीक्षणांनी मराठी समीक्षावाङ्मयाचा चांगला आरंभ करून दिला असे म्हणावयास प्रत्यवाय नाही.

## न्या. रानडे यांचा वाङ्मयीन आढावा

वाङ्मयाचे समालोचन किंवा आढावा घेणारे लेखनही वाङ्मयविचारातच अंतर्भूत करावयास पाहिजे. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर झालेली वाङ्मयनिर्मिती खरोखर अल्प होती आणि त्या कालातील वाङ्मयाचा आढावा घेण्याइतका कालही लोटलेला नव्हता. तेव्हा वाङ्मयाचे समालोचन करण्याचा विचारच खरोखर कोणास सुचण्या-सारखा नव्हता. तथापि सरकारी आदेशाने सरकारी नोकरीत असलेल्या न्या. रानडे यांनी १८६५ मध्ये असा एक आढावा घेतला होता. १८६४ पर्यंत प्रकाशित झालेल्या पुस्तकांची एक सूची सरकारने तयार करविली होती. या सूचीचे नाव Catalogue of Native Publications in the Bombay Presidency upto 31st December, 1864 असे आहे. या सूचीला जोडून मराठी वाङ्मयाचा एक आढावा सरकारने प्रसिद्ध केला. हा आढावा तयार करण्याचे काम रानडे यांच्याकडे सोपविले होते. रानडे यांचे हे समालोचन इंग्रजीमध्ये लिहिलेले असले तरी ते मराठी वाङ्मयाचे असल्याने त्याचा येथे परामर्श घेणे आवश्यक ठरते. [१]

## समालोचनाचे स्वरूप

रानडे यांचे प्रस्तुत समालोचन हे बरेचसे बहिरंगपरामर्श करणारे असले, तरी तोपर्यंत निर्माण झालेल्या मराठी वाङ्मयाची यथार्थ कल्पना आणून देणारे झाले आहे. त्या वर्षापर्यंत मराठीमध्ये झालेल्या एकंदर ६६१ पुस्तकांपैकी ४३१ गद्यात्मक आणि २३० पद्यात्मक असल्याचे प्रथम सांगून गद्यविभागाचे ( १ ) शालेय, ( २ ) सामान्यजनोपयोगी, ( ३ ) शास्त्रीय आणि ( ४ ) कायदाविषयक असे चार स्थूल-विभाग त्यांनी केले. शालेय पुस्तकांविषयी विशेष काही म्हणायचे नव्हते. सामान्य

१. असेच एक समालोचन १८९८ मध्ये रानडे यांनीच पुनः केले आहे, ते खूपच सविस्तर असून अधिक उपयुक्त आहे.

वाङ्मयाचे त्यांनी आणखी दहा उपविभाग केले आणि प्रत्येकाचा थोडक्यात परामर्श घेतला. इतिहासग्रंथांमध्ये स्वतंत्र असे एकही नावाजण्यासारखे पुस्तक नव्हते; आणि ग्रीस, रोम, युरोप व अमेरिका या देशांकडे दुर्लक्षच झाले असल्याचे दिसून आले. कथाविभागात पंचोपाख्यान, वेताळपंचविशी, शुकबहात्तरी, सिंहासनबत्तिशी या जुन्या कथांवरच विशेष भर होता आणि इंग्रजीच्या संबंधाने काही भाषांतरे उपलब्ध झाली असली, तरी कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या अरेबियन नाईट्सच्या भाषांतरा-इतका वाङ्मयगुण असलेली इतर भाषांतरे कोणतीही झाली नव्हती. मुक्तामाला आणि राजा मदन या कादंबऱ्यांचा सर्वांत चांगल्या असा उल्लेख करून या प्रकारची वाङ्मयनिर्मिती वाढत असल्याचे रानडे यांनी नमूद केले आहे. नीतिपर निबंध या पुस्तकात विशेष वाङ्मयगुण नसल्याचे सांगून ' विदुरनीति ' किंवा ' नारदनीति ' यांचा काहीसा अपवाद केला आहे. चरित्रग्रंथामध्ये चरित्रनायकाच्या निवडीमागे काही योजना नसल्याची तक्रार केली असून प्रवासग्रंथांचे दालन अगदीच तोटके असल्याचे सांगितले आहे. पौराणिक बखरी म्हणजे मराठी गद्यातील एक स्वागतार्ह प्रवृत्ती असल्याचे मत दिले आहे. धार्मिक आणि तत्त्वज्ञानात्मक ग्रंथासंबंधी लिहिताना धर्मविचार आणि तत्त्वज्ञान या दोन वेगळ्या गोष्टी आहेत याची जाणीव लेखकांस नाही, तत्त्वज्ञानचर्चा धर्मविचारास गुणीभूत असल्याचे दिसते असे म्हटले आहे. हा तत्त्वविचार संस्कृत वा इंग्रजी तत्त्वज्ञानविचाराच्या मानाने अगदीच कोता असल्याचा अभिप्राय दिला आहे. सामान्य वाचकाकरिता लिहिलेल्या विज्ञानग्रंथांतही योजना-पूर्वकता नसून व्यवस्थित ज्ञानप्रदानापेक्षा वाचकामध्ये औत्सुक्य उत्पन्न करण्यावरच भर अधिक असल्याचे सांगितले आहे. राजकीय विषयांवरील पुस्तिका आणि नियत-कालिके यांचा उल्लेख करून वर्तमानपत्रांमध्ये धीमी अशी सुधारणा होत असली, तरी मासिकांची पातळी मात्र खालावली असल्याचा निर्देश केला आहे.

शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथास शालेय जगाबाहेर मागणी नसल्याने एकंदरीत हा विभाग मागासलेलाच आहे असे मत प्रकट करून त्या मानाने वैद्यकशास्त्राकडे अधिक लक्ष दिले गेले असल्याचे नमूद केले आहे. संस्कृतमधील वैद्यक ग्रंथ मराठीत आणण्याचा प्रयत्न विशेष उल्लेखनीय होता. कोशवाङ्मयासंबंधी, विशेषतः मोल्सवर्थ आणि कँडी यांच्या कोशांविषयी मोठ्या गौरवाने लिहिले आहे. कायदाविषयक ग्रंथांत मिताक्षरा आणि व्यवहारमयूख यांच्या भाषांतरास महत्त्व दिले आहे.

काव्यग्रंथांमध्ये मोरोपंत, वामन, श्रीधर, मुक्तेश्वर आणि तुकाराम ह्यांच्या प्रकाशनाचाच भाग मोठा होता. पद्यांत असलेल्या ग्रंथांत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, वामनाची यथार्थदीपिका या तत्त्वज्ञानपर ग्रंथांचा समावेश झालेला होता. अर्वाचीन कवितेला म्हणण्यासारखा प्रारंभही झालेला नसल्याने नावाजण्यासारखे अर्थात काहीच नव्हते. संस्कृत नाटकांच्या भाषांतराचे स्वागत करून संस्कृत महाकाव्यांची भाषांतरे झाली पाहिजेत अशीही सूचना केली आहे.

सर्वसामान्य अभिप्राय म्हणून प्रस्तुत काळातील वाङ्मयाविषयी रानडे म्हणतात की, १८६४ पर्यंतच्या सुमारे चाळीस वर्षांच्या कालावधीत झालेली वाङ्मयनिर्मिती ही त्या पुढील कालात झालेल्या वाङ्मयाची वानगी म्हणूनच विचारार्ह ठरते, तोपर्यंत झालेल्या कामगिरीमुळे नव्हे. रानडे यांनी १८९८ मध्ये पुनः घेतलेल्या आढाव्यात प्रस्तुत कालातील वाङ्मयाचाही काही विचार येतो. त्यातही या कालखंडातील वाङ्मयाविषयी लिहिताना, The stage of advance made was more full of promise for the future, than of success accomplished. असाच अभिप्राय पुनः दिला आहे.[1] रानड्यांचे हे समालोचन म्हणजे व्यापक बुद्धीच्या आणि समतोल विचाराच्या माणसाने थोडक्यात परंतु यथार्थ असे केलेले मूल्यमापन आहे. ते इंग्रजीत होते म्हणून आणि सरकारदप्तरी दाखल झालेले असल्याने मराठी वाङ्मयविचाराला किंवा वाङ्मयनिर्मितीलाही त्याचा व्हावा तसा उपयोग झाला असे मात्र वाटत नाही.

---

1. Miscellaneous Writings, p. 20.

प्रकरण बारावे

# टीका आणि इतर विवेचनपर वाङ्मय[1]

## एक

### मागील कालखंडाशी अनुबंध

टीका आणि इतर विवेचनपर वाङ्मयाच्या मराठी भाषेतील निर्मितीला इ. स. १८०० च्या सुमाराला सहाशे वर्षांची पार्श्वभूमी लाभलेली आहे. मात्र इतक्या दीर्घ कालाची पार्श्वभूमी लाभलेली आहे म्हणून त्या वाङ्मयाच्या आधीच्या स्वरूपात इ. स. १८०० ते १८७४ या कालखंडामध्ये मूलभूत असा काही बदल झाला किंवा त्याचा काही विशेष विकास घडून आला असे म्हणता येत नाही. संस्कृत ग्रंथांचा आश्रय घेऊन परंपरेने चालत असलेले तत्त्वज्ञानविषयक विचार मराठीत व्यक्त करणे हे जे अशा वाङ्मयाच्या निर्मितीचे स्वरूप इ. स. १६८० ते १८०० या काल-खंडात दिसते तेच या काळातही कायम आहे असे म्हणावे लागते. टीकेसाठी घेत-लेले ग्रंथ थोडे निराळे दिसतात एवढेच. गीता आणि भागवत हे दोन्ही ग्रंथ टीका-विषय या दृष्टीने मागे पडलेले दिसतात. गीता आधीच मागे पडली होती, आता भागवतही मागे पडलेले आहे. त्याऐवजी शंकराचार्यांचे काही ग्रंथ आलेले दिसतात.

१. वस्तुतः हे वाङ्मय प्राचीन परंपरेमधील आहे. म्हणून पहिल्या आवृत्तीमध्ये त्याचा या खंडामध्ये अंतर्भाव केला नव्हता तथापि कालदृष्ट्या वाचक त्याचा मागोवा या खंडात घेण्याचा प्रयत्न करू लागले; म्हणून या आवृत्तीत त्याचे समालोचन येथे दिलेले आहे.

त्याचबरोबर ज्ञानेश्वरांच्या अनुभवामृत या ग्रंथावर काही टीका झाल्या आहेत. टीकेसाठी मराठी ग्रंथाची निवड व्हावी हे विशेष आहे. स्वतंत्र विवेचनपर ग्रंथांची निर्मिती मागच्या कालखंडापेक्षा कमीच आहे. विशेषत्वाने नाव घ्यावे असे लेखकही फार नाहीत. टीका किंवा स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याच्या मागची प्रेरणा पूर्वीप्रमाणेच केवळ पारमार्थिक आहे. तत्त्वज्ञानाचा शोध केवळ ज्ञानाच्या जिज्ञासेतून घ्यावयाचा आणि तो पूर्वीच्या ग्रंथावर टीका लिहून न घेता स्वतंत्र विचार मांडून घ्यावयाचा, असा दृष्टिकोण निर्माण होण्यास अद्याप पुष्कळच अवकाश आहे. आजही तो निर्माण झाला आहे असे म्हणता येण्यासारखे नाही. मात्र जुनी परंपरा हळूहळू क्षीण होत जाणे आणि इंग्रजी विद्येच्या आगमनामुळे वाङ्मयविषयक व एकंदर जीवनविषयक नव्या दृष्टिकोणाची चाहूल लागणे या दोन महत्त्वाच्या गोष्टी या कालखंडात घडल्या आहेत. पण या परिवर्तनाची गती अतिशय सावकाश आहे. त्यामुळे या कालखंडात जुनी परंपरा संपूर्ण नाहीशी झालेली दिसत नाही किंवा नवा दृष्टिकोण प्रस्थापित झाला आहे असेही आढळत नाही. मराठी वाङ्मयाच्या एकंदर इतिहासाच्या दृष्टीने विचार करता हा कालखंड संधिकालाचा आहे. परिवर्तनाचा अस्फुट असा प्रकाश दाखविणारा आहे, हा याचा सर्वांत महत्त्वाचा विशेष होय. ज्या लेखनाला मराठी साहित्यात सहाशे वर्षांची दीर्घ परंपरा लाभलेली आहे, त्या टीका व विवेचनपर वाङ्मयाबाबतही हे परिवर्तन जाणवल्याशिवाय राहात नाही.

मराठवाड्यातील परंडा येथील हंसराजस्वामी, अखेर मिरजला स्थायिक झालेले निरंजन रघुनाथ, प्रथम सिन्नरला व नंतर मुंबईला राहिलेले मौनिनाथ, नारायणबोवा जालवणकर, गोमंतकातील महेश्वरभट्ट सुखटणकर हे या कालखंडातील प्रमुख ग्रंथकार होत. त्यांनी व इतर काही लेखकांनी लिहिलेल्या काही प्रमुख ग्रंथांचा परिचय यापुढे करून दिला आहे.

### व्यंकटांची योगवासिष्ठसारटीका :

गोमंतकातील व्यंकट या नावाच्या कवीनी लघुयोगवासिष्ठसारावर समश्लोकी टीका लिहिली आहे. यांनीच वेदस्तुतीवर श्रुतिदीप या नावाची टीका आणि उत्तरगीतेवर एक समश्लोकी लिहिल्याचा उल्लेख आहे. लघुयोगवासिष्ठसारावरील ही समश्लोकी इ. स. १८०२-च्या सुमाराला लिहिली गेली असावी. संस्कृतमधील मूळ योगवासिष्ठ ग्रंथ बत्तीस हजार श्लोकांचा आहे, त्याचे सार लघुयोगवासिष्ठसारामध्ये २२५ श्लोकांमध्ये आणलेले आहे. मूळ योगवासिष्ठ ग्रंथ सागरासारखा आहे पण त्याचेच सार या दहा प्रकरणांच्या लघुयोगवासिष्ठसारात आलेले आहे, असा उल्लेख व्यंकट कवीनी आपल्या टीकेच्या प्रास्ताविकात केला आहे. आपल्या या समश्लोकी टीकेस त्यांनी समाक्षरी असे नाव दिले आहे. प्रकरण ३, ९ आणि १० यांमध्ये मिळून चार श्लोक शार्दूलविक्रीडित व अन्य वृत्तांत आहेत, बाकीची सर्व टीका अनुष्टुभ छंदात आहे. प्रत्येक प्रकरणाच्या अखेरीस—

“ योगवासिष्ठसारी हे टीका समाक्षरी वदे
व्यंकटाख्यमुखें आत्माराम सांब सदाशिव ॥ ”

असा आपल्या टीकेचा व स्वतःचा नामनिर्देश कवीने केला आहे. मूळ लघुयोगवसिष्ठासाराच्या अनुवादाचे श्लोक २२३ आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभी व्यंकटांनी मागची पुढची संगती स्पष्ट करणारे काही श्लोक घातले आहेत. ते वेगळे दाखविले असून ‘ संगतिश्लोक हे पृथक् ’ असा त्या त्या स्थळी स्पष्ट उल्लेख केला आहे. या संगतिश्लोकांची संख्या ३९४ आहे. त्याशिवाय दहाव्या म्हणजे शेवटच्या प्रकरणाच्या अखेरीस अवतारिका म्हणून ७५ श्लोक आले आहेत, ते एकंदर ग्रंथाचा उपसंहार करणारे आहेत. अनुवादाचे श्लोक २२३, तर संगतिश्लोक व अवतारिका म्हणून कवीच्या स्वतंत्र रचनेचे ४६९ अशी या समाक्षरी टीकेची एकुण श्लोकसंख्या ६९२ आहे.

योगवासिष्ठातील श्लोकांचा व्यंकटांनी केलेला मराठी अनुवाद भाषेच्या दृष्टीने ठाकठीक दिसतो. मूळ ग्रंथ संस्कृतमध्ये असल्याने त्याच्या अनुवादाची भाषा संस्कृतप्रचुर व्हावी हे स्वाभाविक आहे. व्यंकट कवींच्या स्वतंत्र रचनेचे दर्शन संगतिश्लोक व अवतारिका या भागात घडते. आधीच्या प्रकरणात कोणता विषय येऊन गेला आणि त्यानंतर पुढील प्रकरणात कोणता विषय येत आहे याचे स्पष्टीकरण संगतिश्लोकांमध्ये व्यंकटांनी दिले आहे, त्यामुळे मूळ लघुयोगवासिष्ठसारातील विवेचनाचे सूत्र वाचकांना कळणे सोयीचे होते. या आपल्या स्पष्टीकरणातील अध्यात्मविषयक विचारांना आधार म्हणून व्यंकटांनी भगवद्गीता व शिवगीता या दोन ग्रंथांतील वचने बऱ्याच ठिकाणी दिली आहेत. त्याशिवाय उपनिषदे, भागवत व अन्य संस्कृत ग्रंथ यांतील वचनेही अधूनमधून येतात. सहज वाचीत गेले तर अर्थाचे सुलभतेने आकलन व्हावे इतपत प्रसादगुण व्यंकटांच्या भाषेमध्ये आहे, तशी क्लिष्ट किंवा दुर्बोध रचना कोठे आढळत नाही, पण त्या मानाने भाषेची शुद्धता कमी आहे. नाटयरूपे, तिच्या अनेकरीति, कवित्वअभिमानिता अशी अशुद्ध शब्दरूपे अधूनमधून आढळतात किंवा छंदासाठी ‘ कृपेने ’ याऐवजी ‘ कृपेन ’ असे योजिलेले आढळते. ‘ लीलेने त्यागुणी राहे ऽहंकारमयि वासना ’ । ३.१७ या श्लोकार्धात ‘ राहे ’ यापुढे ‘ अहंकार ’ हा शब्द घालून त्यातील ‘ अ ’ द्विखंडचिन्हाने दाखविला आहे. हे मराठीच्या लेखनपद्धतीला धरून नाही, पण हा दोष छंदाच्या सोयीसाठी व्यंकटांनी पत्करला आहे. मूळ संस्कृतच्या अनुकरणाने त्यांनी आपली मराठी रचनाही नियमक केली आहे. यतिभंगाची उदाहरणे अधूनमधून येत राहतात.

‘ भ्रमसी तो देह कोठे जागरीं कीं तुते मृषा । ’
‘ यश अपेश देणार भगवंत धनी किजे । ’ किंवा
‘ विंध्याद्रीसम ह्या नव्हे ऐसे कित्येक थोर ते । ’ ( ५, १२, १०, ४८,

१०,५९) अशी वृत्तदृष्ट्या सदोष रचना थोडीफार आढळते. एकंदरीत वृत्तप्रभुत्वाचा अभाव जाणवतो.

योगवासिष्ठासारख्या तत्त्वज्ञानपर ग्रंथाचा अनुवाद करण्याचे सामर्थ्य आपल्या ठायी नाही, पण हा सारा गुरूचा प्रसाद आहे.

'सूर्यकांतीं निघे अग्नी अर्कयोगें जशापरी ।
अथवा चुबकासंगें जड ते लोह चेष्टते ॥'

त्याप्रमाणे गुरूच्या कृपेमुळे टीका लिहिण्याचे हे कार्य आपल्या हातून घडत आहे, (१·३३); असे नम्रतेचे उद्‌गार व्यंकट कवींनी ग्रंथाच्या प्रारंभीच काढले आहेत. हा गुरु कोण हे सांगताना 'समष्टिरूप बिंबात्मा राम तो सद्‌गुरु स्वये ॥' असे म्हटले आहे (१·३८). ग्रंथाच्या अखेरीस लिहिलेल्या अवतारिकेमध्येही असेच लीनतेचे उद्‌गार आले आहेत. आपण योगवासिष्ठावर ही जी टीका लिहीत आहोत तिच्या मागचा भाव ध्यानात घ्यावा, असे 'भावे हि विद्यते देवो ।' या वचनाचा आधार घेऊन व्यंकटांनी सुचवले आहे. त्यानंतर आपण ही टीका लिहिली असली तरी तिच्या कर्तृत्वाचे श्रेय आपले नाही हे स्पष्ट करिताना भागवतातील एका कथेचे उदाहरण त्यांनी घेतले आहे. राधा बालरूपातील श्रीकृष्णाला आपल्या घरी जाते आणि आपली कामवासना तृप्त करून घेते या कथेचा संदर्भ व्यंकटांनी दिला आहे. 'अनंत कोटि ब्रह्मांडें रोमरंध्रि जयाचिया ॥' (१०.६१) असा जो भगवान श्रीकृष्ण 'स्वकुचाग्रि त्यासि राधा उचलोनि धरी, परी ।' तेवढ्यावर तिला 'कृष्णधारी' असे श्रेय कोणी देत नाही (१०·६३); त्याप्रमाणे या टीकारचनेचे श्रेय वा कर्तृत्व आपणाला नाही, 'महत्त्व यश ते सत्ता ईश्वराधीन बोलिजे ॥' (१०·६५), असे वर्णन व्यंकट कवीनी केले आहे. तरुणपणीच वैराग्य प्राप्त झाल्यामुळे श्रीरामचंद्राला वसिष्ठांनी अध्यात्माचा उपदेश केला. तो उपदेश ज्या ग्रंथाचा विषय आहे त्या योगवासिष्ठाच्या अनुवादाचा शेवट राधाकृष्णांमधील शृंगाराच्या उल्लेखाने व्यंकट कवींनी केला आहे, यातील अनौचित्य निराळे स्पष्ट करण्याची आवश्यकता नाही.

### ज्ञानसागर आणि राष्ट्रभाष्य

ज्ञानसागर या नावाचे एक स्वतंत्र ओवीबद्ध प्रकरण भैरव अवधूत यांनी लिहिलेले आहे. याची ओवीसंख्या फक्त ३१५ आहे, म्हणजे प्रकरण तसे लहान आहे. पण त्याचे चौदा भाग पाडले असून त्यांना प्रथम रेषा, द्वितीय रेषा अशी नावे दिली आहेत. शके १७३४ (सन १८१२) मध्ये ग्रंथ समाप्त झाला असे ग्रंथाच्या अखेरीस म्हटले आहे. प्रथम रेषेच्या प्रारंभी एका संस्कृत श्लोकात दक्षिणामूर्तींना व एका मराठी श्लोकात ह्याला वंदन केले आहे. प्रत्येक रेषेच्या अखेरीस संस्कृतमध्ये समाप्तिदर्शक उल्लेख आहे आणि रेषांना, 'मनशुद्धस्थितिरूपपरमार्थकथनम्' किंवा 'प्रपंचोपक्रमांतर्गतचिन्मयदृष्टिसृष्टिपक्षकथनम्' अशी अवजड संस्कृत नावे दिली आहेत. एकूण प्रकरणाची मराठी भाषाही काहीशी बोजड आहे. प्रसादगुण कमी

आहे, अर्थबोध सुलभतेने होत नाही. अद्वैताचे प्रतिपादन, सविकल्पनिर्विकल्प समाधी, सद्गुरुकृपेची आवश्यकता, साक्षात्कारासाठी साधनाभ्यासाची जरुरी आदी विषयांचे विवेचन या प्रकरणात आलेले आहे.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने मांडलेले काही निराळे विचार हा या छोट्या प्रकरणाचा ध्यानात येण्यासारखा विशेष आहे. आकाशापासून वायू, वायूपासून तेज अशा क्रमाने पंचमहाभूते उत्पन्न झाली असे म्हणतात, पण ही 'असंगत वाणी' आहे, 'तत्त्वीं तत्त्व निपजते। हे बोलणें दिसे रिते।' (४.२५,२७) असे म्हणून;

" ब्रह्म कमलिनी वेलींतून। स्फूर्ति कलिका होय उत्पन्न।
ते विकसित होय पूर्ण। अष्टधा जाण अष्टदळ कमळ॥
कलिका उमलतांचि पाही। पुष्पा पाकळ्या एकेचि समयीं।
प्रकट होती निश्चयीं। म्हणवी अष्टधा तैशी प्रकटे॥" ५.१,२

अशाप्रकारे ब्रह्मातून अष्टधा प्रकृती उत्पन्न होते असे आपले मत एक अगदी वेगळा दृष्टांत घेऊन भैरव अवधूतांनी सांगितले आहे. माया आणि जीव यांच्या स्वरूपाबद्दलही ते असेच अगदी वेगळे विचार मांडतात. जीव हा प्रतिबिंबस्वरूप आहे असे अनेकांनी म्हटले आहे, यावर

" ब्रह्मीं नाहीं बिंबाकार। तेथे प्रतिबिंब प्रकार।
न घडे निर्धार पाहता॥" २.१०

असे भैरव अवधूतानी म्हटले आहे. त्यांनी घेतलेला आक्षेप तर्कदृष्टया सुसंगत आहे. माया ही ईश्वराची शक्ती असून प्रलयकाळी ती निर्गुणाच्या ठायी लय पावते म्हणजेच ती तत्त्वतः नाशवंत आहे; अशी मांडणी बहुतेक साऱ्या अध्यात्मग्रंथांतून केलेली आढळते. पण ही माडणी भैरव अवधूताना मान्य नाही.

" एक म्हणती ब्रह्मशक्ती माया।
ते बोलणेंचि गेले वाया॥" २.१९

असे त्यांचे म्हणणे आहे. ब्रह्माच्या शक्तीचा नाश होणे शक्य नाही, तसेच माया ही ब्रह्मातून उत्पन्न पावली असेही म्हणता येत नाही, असे सांगून–

" ज्ञानाभ्यासे माया नासे। यास्तव अजत्व न संभवे तियेस।
जन्यत्व मानतां कारणास। ठाव न दिसे कोठेही॥
अंधकारासी कारण। सूर्य नोहे आपण।
तेवी आत्मा सच्चिदानंदघन। मायेसी कारण न घडेचि॥" (२.२१,२२)

असा मोठा समर्पक युक्तिवाद भैरव अवधूतांनी केला आहे. 'शक्त शक्ति अमेळें। पूर्ण ब्रह्म एक नांदे'। (३.१३) असा सिद्धांत ब्रह्म आणि माया यांच्या बाबतीत त्यांनी केला असून, या मायेच्या योगाने ब्रह्मातून पुन्हापुन्हा निर्माण होणाऱ्या विश्वाच्या स्वरूपाबद्दल—

" रत्न आणि रत्नकीळ। पर ते रत्नचि केवळ।

तैसें परब्रह्म निर्मळ । विलसे सकळ विश्वरूपें ।
जैसें रत्नाचें चमकणें । तैसे विश्वाचे होणें जाणें ।
सहज स्वभावें चैतन्य । लीला नूतन प्रतिक्षणीं ॥ " ३.१५–१६

असे स्पष्टीकरण केले आहे. 'मत्तः परतरं नान्यत्' या गीतावचनाचा व योगवासिष्ठातील एका श्लोकाचा आधारही येथील आपल्या विवेचनास भैरव अवधूतांनी घेतला आहे. 'ब्रह्मविलास प्रपंचव्यक्ति । जाण निगुतीं सुविचारें ।' १.४ असे जे ग्रंथाच्या प्रारंभीच भैरव अवधूतांनी म्हटले आहे त्याचाही अर्थ हाच आहे.

'जग आसिकी वस्तुप्रभा' या अनुभवामृतातील ज्ञानेश्वरांच्या सुप्रसिद्ध उद्‌गारांची येथे कोणालाही आठवण होईल आणि ते ठीकच आहे. कारण आपण हे सारे विवेचन ज्ञानेश्वरांनी अनुभवामृतात सांगितलेल्या चिद्‌विलासवादाच्या आधारेच करीत आहोत, असे भैरव अवधूतांनी म्हटले आहे. या चिद्‌विलाससिद्धांताचा उल्लेख या प्रकरणात त्यांनी अनेक वेळा केलेला आहे.

चिद्‌विलाससिद्धांताप्रमाणेच भक्तीचाही पुरस्कार या प्रकरणात आहे. 'देव प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ।', त्या प्रेमाचा अनुभव मिळावा म्हणून देव स्वये भक्त होतो, भक्ताला आपुलेपण देण्यासाठी तो स्वतः गुरुरूप घेऊन भक्ताच्या ठायी चिदात्मपण बाणवतो; असे जे वर्णन भैरव अवधूत करितात ( १०. १२–१३ ) त्यावर असलेली ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची छाया स्पष्ट आहे.

ज्ञानेश्वरांच्या चिद्‌विलासवादाचे हे ज्ञान आपल्याला पेठण येथे हरिहरेन्द्रस्वामीकडून झाले, आणि त्यांनी अनुभवामृतातील तत्त्वज्ञान आपल्यास समजावून सांगितले, 'त्या श्रवणामृताचे तुषार । स्फुरले तो बोलिलो प्रकार ।' १४. २८, त्यातून हा ज्ञानसागर निर्माण झाला ; असे या प्रकरणाच्या अखेरीस भैरव अवधूतांनी म्हटले आहे. राष्ट्रभाष्य या नावाची अनुभवामृतावर जी गद्य टीका आहे ती या हरिहरांचीच आहे.[1] तिचे मूळ नाव महाराष्ट्रभाष्य आहे. त्याचे संक्षिप्त रूप होऊन राष्ट्रभाष्य हे नाव आले. ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलाससंवाद, त्याचप्रमाणे जीवाच्या व मायेच्या स्वरूपाविषयी वर उल्लेखिलेले सिद्धांत यांचे सविस्तर दिग्दर्शन हरिहरांनी अनुभवामृतावरील आपल्या टीकेत केले आहे. हरिहरांची ही टीका छापील तीनशे पृष्ठे आहे. अनुभवामृतातील अकेक ओवी म्हणजे एकेक सूत्र मानून हरिहरानी त्यांचे स्वतंत्र व सविस्तर विवेचन केले आहे, 'इति अनुभवामृतसूत्रे' असा ग्रंथाच्या अखेरीस त्यांनी उल्लेख केला आहे. तेथेच ज्ञानेश्वरांचा निर्देश 'परमहंसपरिव्राजकाचार्य' असा केला आहे हेही ध्यानात घेण्यासारखे आहे. ओव्यांवरील हरिहरांचे विवरण काही संस्कृत व काही मराठी असे मिश्र आहे. अनुभवामृतावरील हे राष्ट्रभाष्य इ. स. १८११ ते १८१९ या दरम्यान केव्हातरी लिहिले गेले असावे, असा श्री. भा. पं. बहिरट यांचा तर्क आहे.

१. प्रकाशन १९६६ मध्ये, संपादन – भा. पं. बहिरट.

## निरंजन–रघुनाथांची आत्मबोधप्रकाशिनी

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी श्रीरघुनाथभटजी या नावाचे एक सत्पुरुष नाशिक क्षेत्री होऊन गेले. पुढे मिरजेस वास्तव्य करून राहिलेले निरंजन–रघुनाथ, सिन्नरचे मौनीनाथ, नाशिकचे अच्युतराव मोडक व आनंदभट दातार, खेडचे चंडिरामबोवा असे अनेक सत्पुरुष रघुनाथभटजींच्या शिष्यवर्गांपैकी होत. त्यांपैकी निरंजन–रघुनाथ व मौनिनाथ या दोघांनी केलेली वेदांतपर रचना उल्लेखनीय आहे. निरंजन–रघुनाथांची आत्मबोध-प्रकाशिनी ही शंकराचार्यांच्या आत्मबोध या संस्कृत ग्रंथावरील श्लोकवार लिहिलेली टीका आहे.

" वडुथ ग्रामि कृष्णा तिरि । शके सत्रासे अडतीस धात्र संवत्सरि ।
श्रावण वद्य एकादशि इंदुवारी ॥ "

ही टीका समाप्त झाली, असा उल्लेख ग्रंथाच्या अखेरीस केला आहे.( ८३४ ) ग्रंथ ओवीबद्ध असून त्याचे अध्याय वा प्रकरणे केलेली नाहीत. मूळ शंकराचार्यांनी लिहिलेले श्लोक ६८ असून त्यांवर निरंजन–रघुनाथांनी सलग ८३५ ओव्या लिहिलेल्या आहेत.

मराठी लेखकांनी टीकात्मक लेखनासाठी शंकराचार्यांचे ग्रंथ घ्यावेत हा या कालखंडाचा एक विशेष दिसतो. निरंजन–रघुनाथांनी शंकराचार्यांचा ग्रंथ का निवडला असावा याचे थोडेसे स्पष्टीकरण त्यांनी ग्रंथारंभी लिहिलेल्या प्रास्ताविकात मिळते. ' धर्माच्या संस्थापनेसाठी मी युगायुगामध्ये अवतार घेतो ' या भगवंतांच्या गीतेमधील उक्तीचा उल्लेख करून आणि त्या आधारे ' आत्मविद्या हा मुख्य धर्म। ' तो स्थापन करण्यासाठी व ' अविद्या अधर्म ' त्याचा नाश करण्यासाठी भगवान पुन्हा पुन्हा अवतार घेतात असे त्या उक्तीचे स्पष्टीकरण करून, पुढे–

" कृतायुगीं जाले श्रीदत्तात्रय । त्रेतायुगिं वसिष्ठ मुनिवर्य ।
द्वापारिं बुद्धिप्रतापवीर्य । व्यास आपण जाहाले ॥
कलयुग हा चवथा प्रहर । जाला शंकराचार्य अवतार।
तया पाठि श्रीरघुवीर । जनस्थानि प्रगटले। " १२–१३

असा चार युगांतील चार अवतारांचा निर्देश निरंजन–रघुनाथांनी केला आहे. दशावतारांच्या रूढ कल्पनेपेक्षा ही कल्पना थोडीशी निराळी आहे. या चारांपैकी एक जे शंकराचार्य त्यांचा ग्रंथ निरंजन–रघुनाथांनी टीकेसाठी घेतला आहे. शंकराचार्यांनंतर श्रीरघुनाथभट यांचा उल्लेख त्यांनी करावा ही गोष्ट आपल्या गुरूविषयी त्यांना वाटणारा अनन्य भाव प्रगट करणारी आहे. ही टीका लिहिण्यासाठी त्यांना आपल्या गुरूंची आज्ञा झाली होती, असे त्यांनी ग्रंथाच्या अखेरीस म्हटले आहे ( ८२८ ).

## आत्मबोधप्रकाशिनीचे स्वरूप

ग्रंथाच्या प्रारंभी लिहिलेले वीस ओव्यांचे प्रास्ताविक आणि अखेरच्या उपसंहारात्मक दहा ओव्या एवढाच भाग आत्मबोधप्रकाशिनीमध्ये स्वतंत्र आहे, बाकी सारा भाग मूळ ग्रंथावरील टीका आहे. आत्मबोध–ग्रंथाचे श्लोकवार निरूपण वक्ता

करीत आहे आणि श्रोते ते ऐकत आहेत अशा भूमिकेने टीकेची रचना केलेली आहे. मूळ शंकराचार्यांच्या ग्रंथात असा गुरुशिष्यांचा कोणताही उल्लेख नाही. निरूपण चालू असताना शिष्याने अधूनमधून शंका उपस्थित केल्या आहेत आणि आचार्यांनी त्यांची उत्तरे दिली आहेत, असे वर्णन निरंजन–रघुनाथांनी केले आहे. यामुळे मूळ वेदान्तपर ग्रंथाचा रुक्षपणा काहीसा कमी झाला आहे. मागच्या पुढच्या श्लोकांतील संगती लावण्यासाठी किंवा एखाद्या श्लोकाचे निमित्त स्पष्ट करण्यासाठी शिष्याने उपस्थित केलेल्या या शंकांचा उपयोग निरंजन-रघुनाथांनी अनेक स्थळी करून घेतला आहे.

टीकेसाठी घेतलेला ग्रंथ शंकराचार्यांचा असल्यामुळे तो अद्वैतमतप्रतिपादक आहे हे सांगण्याचे कारण नाही. देहाचे मिथ्यत्व, आत्म्याचे अविनाशित्व, विश्वाचे स्वरूप, ब्रह्ममाया, विद्याअविद्या, अन्वयव्यतिरेक, ज्ञान, कर्मनाश, अभ्यास, मोक्ष आदी जे विषय अशा ग्रंथामध्ये येतात तेच येथेही आले आहेत. केवळ तात्त्विक प्रतिपादन करण्यावर या टीकेत फारसा भर दिलेला नाही, केवळ सरळ अर्थ स्पष्ट करून सांगण्याकडे अधिक लक्ष दिले आहे. भक्तीचा विशेष पुरस्कार यात आढळत नाही, मूळ ग्रंथ शंकराचार्यांचा आहे हे त्याचे कारण असू शकेल. वेदान्तातील कठीण प्रमेये निरंजन-रघुनाथांनी पुष्कळच सुलभ करून सांगितली आहेत. घरगुती व सोपे असे दृष्टान्त अधूनमधून घातल्यामुळे विवेचन सुगम होण्यास साहाय्य झाले आहे. पंचकोशांचे विवरण संपल्यावर चौदाव्या श्लोकामध्ये, आत्मा हा पंचकोशांच्याही पलीकडचा आहे हे जाणून घेतले पाहिजे असे म्हटले आहे. त्यावरील आपल्या टीकेमध्ये आत्मा-अनात्मा हा भेद निवडून घेणे फार कठीण आहे हे शिष्याच्या मुखाने स्पष्ट करिताना –

> " जैसे कर्नाट देशीचे तांदूळ । अर्धे तांदूळ अर्धे हारळ ।
> निवडोनि घेऊं जातां निर्मळ । न होतिच सर्वथा ॥
> चाळणि घेउनि चाळुं जातां । दोहिही रिचवति तत्त्वता ।
> मागति भरोनिया घेतां । येति हाता दोन्हिही ।
> तैसा आत्मा आणि अनात्मा मिश्रित । सांडिता घेता होतो घात ।
> तरि कैसे करावे जी निश्चित । स्वामिराया याप्रति ॥ "

असा व्यवहारातील दृष्टान्त निरंजन–रघुनाथांनी घेतला आहे. या बरोबरच सुवर्ण-अलंकार, रज्जुसर्प, घटमृत्तिका, किरणमृगजळ इत्यादी वेदान्तपर विवेचनात नित्य येणारे दृष्टान्त आले आहेतच, किंबहुना ते दृष्टान्त पुनः पुन्हा येत राहतात.

> "जे शांतीचे मुख्य कोंभ । जे ब्रह्मांडीचे धैर्यस्तंभ । " किंवा
> " कांडितां न सांपडे जरी कण । तरी कां कोंडा कांडावा । "

(१४, ४३)

अशा दृष्टान्तांमधून ज्ञानेश्वरीची असलेली छाया स्पष्ट दिसते. काही वेळा अशा

दृष्टान्तांना आधारभूत असलेल्या गोष्टीच विस्ताराने वर्णन करून सांगण्याची निरंजन-रघुनाथांची एक वैशिष्ट्यपूर्ण लकब आहे, त्यामुळे रुक्ष अशा वेदान्तप्रवचनामध्ये थोडीशी कथानिवेदनाची झुळूक येऊन गेल्यासारखी वाटते. जीव हा आत्मस्वरूपच आहे पण अविद्येमुळे त्याला त्याची प्रचीती येत नाही, हा ४४ व्या श्लोकातील विचार स्पष्ट करीत असताना, कोणा स्त्रीने तोंड धुण्याच्या वेळी नाकातील मोती काढून तो गळसरीत अडकावून ठेवला आणि नंतर सारे घर धुंडाळून अखेर तो हरवला अशा कल्पनेने ती कशी शोक करीत बसली याचे वर्णन निरंजन–रघुनाथांनी केले आहे ( ५८१–९१ ). याच सर्व घटनेवर थोडेसे वेदान्ताचे रूपक करण्याचा प्रयत्नही याच्या पुढच्या आठ-दहा ओव्यांमध्ये त्यांनी केला आहे. याच्या पुढच्या म्हणजे ४५ व्या श्लोकामध्ये भ्रांतीमुळे वृक्षावर होणाऱ्या पुरुषाकृतीचा दृष्टान्त शंकराचार्यांनी दिला आहे. त्यावरील टीकेमध्ये कोणी एक वेव्हारी सकाळच्या प्रहरी निघाला असता झाडाच्या खुंटाच्या ठिकाणी त्याला मनुष्याकृतीचा भास होऊन तो कसा भयभीत झाला त्याचे सविस्तर वर्णन आले आहे. पण निरंजन-रघुनाथांना ही वर्णने विशेष वेधक करता आलेली नाहीत आणि त्यामुळे त्यांचा व्हावा तितका परिणाम वाचकांच्या मनावर होत नाही. चिदाकाशाच्या पलीकडे असलेले ब्रह्मस्वरूप आचार्यांनी स्पष्ट केलेले ऐकताच शिष्याची वृत्ती कशी एकतान होते, ती स्वरूपी लीन होते आणि सारे दृश्यमात्र आटून सर्वत्र एक स्वरूपच कोंदाटून राहिल्याचा अनुभव त्याला येतो, असे वर्णन ३९ व्या श्लोकावरील टीकेमध्ये निरंजन-रघुनाथांनी बरेच विस्ताराने केले आहे (५२०–४०). अद्वैताच्या अनुभवाची अशी भावोत्कट वर्णने मराठी संत साहित्यामध्ये ज्ञानेश्वरांच्या काळापासून आलेली आहेत आणि ती परिणामकारक झाल्याची उदाहरणे आहेत. पण निरंजन–रघुनाथांच्या वर्णनाचा एकंदर तपशील ठाकठीक असला तरी त्यांच्या प्रतिभेला हा विषय पेलत नाही असा अनुभव येतो. आपल्या प्रतिपादनाला आधार म्हणून उपनिषदे, भगवद्गीता, योगवासिष्ठ, स्वात्मानंदप्रकाश आदी संस्कृत ग्रंथांतील वचने निरंजन रघुनाथ देतात. अनेक जुने संस्कृत ग्रंथ त्यांनी अभ्यासिले आहेत याची प्रचीती त्यावरून येते. जे एक जाणले असता दुसरे काही जाणावे लागत नाही ते ब्रह्म होय या विचाराचे स्पष्टीकरण करताना –

"ये विषइ येक इतिहास। तूंते सांगतो पा अतिसुरस।"

असे म्हणून छांदोग्योपनिषदातील श्वेतकेतू व त्याचा पिता यांच्यात 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या वेळी झालेल्या संवादाची कथा निरंजन–रघुनाथांनी विस्ताराने कथन केली आहे ( ७१६–२९ ). एखादे निमित्त घेऊन अधूनमधून एखादी कथा सांगण्याची त्यांची जी एक लकब आहे तिचेच हे एक उदाहरण म्हणता येते.

### निरंजन–रघुनाथांची भाषा

निरंजन-रघुनाथांची मराठी भाषा बरीच अशुद्ध आहे. वाच्यार्थ, लक्षार्थ, सिष्य, सर्वस्वे, बुत्धी, अशंका, अवसिष्ट, ज्ञानदृष्टी, येतद्विषइ, निम्धिकरण अशी

कितीतरी अशुद्ध शब्दरूपे केवळ २८ आणि २९ या दोन श्लोकांवरील टीकेमध्ये आढळतात ; तर –

"नाना उपाधि योगेंकरुन । आत्मनि आरोपित जाति आश्रमवर्ण।
ब्राह्मण क्षत्रि आगि वैश्य जाण। शुद्र आदिकरोनि ॥
ब्रह्मचारी आणि ग्रहस्थ । त्रितीय अश्रम वानप्रस्त।
चतुर्थ अश्रम सन्यस्थ । सिखा सुत्र त्यागेसी ॥" १११–१२.

अशा ओव्या जागोजाग आढळतात. यामध्ये मूळ निरंजन-रघुनाथांची अशुद्धे किती, मुळावरून प्रत करणाऱ्याच्या चुका किती आणि छापण्याऱ्या वेळी त्यात पडलेली भर किती हे ठरवणे अर्थातच अशक्य आहे. पण ग्रंथामध्ये सर्वत्र अशी अशुद्ध शब्दरूपे भरलेली आहेत. इतकी अशुद्ध शब्दरूपे सारखी येत गेल्याने ग्रंथामध्ये रचनेच्या दृष्टीने कोठे काही चांगला भाग असला तरी त्याचाही परिणाम बराच कमी होतो. क्वचित् प्रसंगी निरंजन–रघुनाथांची शब्दयोजना अभिरुचीच्या दृष्टीनेही ग्राम्य पातळीला उतरलेली आढळते. ६४ व्या श्लोकावरील टीकेमध्ये –

"जैसि कोण्हि येकाचि स्त्री प्रचंड।तीतें दुसरा म्हणु गेला रांड।
ती म्हणे मी आपल्या नवऱ्याची रांड। परि तुझा धगडाची असे मेल्या ॥
तैसि माया मिथ्या खरि। परि इते जो ब्रह्मरूपत्वें वरि।
तयाचीच हे अर्धांग नोवरि। वर्ते अभेदरूपत्वें ॥ " ७९२–९३

असे वर्णन निरंजन–रघुनाथांनी केले आहे. ब्रह्म व माया यांच्या विवेचनामध्ये अशी भाषा शोभा देणारी नाही. मात्र असे काही दोष असले तरी निरंजन–रघुनाथांची भाषा अगदी सोपी आहे. संस्कृत शब्दांचा भरणा काहीसा कमी असल्याने ती दुर्बोध होत नाही. विवेचनही धावते असून त्याचा प्रवाह कोठे अडत नाही. पण हे सारे वाचण्यास सोपे आहे एवढाच या ग्रंथाचा गुण आहे. विवेचनाच्या दृष्टीने प्रज्ञेची काही स्वतंत्रता किंवा काव्याच्या दृष्टीने प्रतिभेची काही भरारी हे भाग निरंजन–रघुनाथांच्या वाणीत आढळत नाहीत. त्यामुळे त्यांचा हा ग्रंथ वाचल्यावर त्याचा वाचकाच्या मनावर विशेष असा कोणताही ठसा उमटत नाही.

### निरंजन–रघुनाथांचे टीकापर गद्य ग्रंथ

आत्मबोधप्रकाशिनीव्यतिरिक्त आणखी दोन टीकाग्रंथ निरंजन–रघुनाथांनी लिहिले आहेत. महत्त्वाची गोष्ट अशी की हे दोन्ही ग्रंथ गद्यामध्ये आहेत. पैकी एक ग्रंथ म्हणजे केनोपनिषद्टीका हा होय. जुन्या मराठीमध्ये विवेचनपर किंवा टीकात्मक ग्रंथही पद्यबद्ध असत. निरंजन–रघुनाथांची केनोपनिषदावरील ही टीका शके १७८० च्या श्रावण महिन्यात समाप्त झाली, असा उल्लेख तिच्या अखेरीस आहे. इसवी सनाप्रमाणे हे वर्ष १८५८ येते. या वेळेपर्यंत गंभीर व विचारप्रधान लेखन गद्यामध्ये करण्याची प्रथा मराठीत बरीच रूढ झाली होती, तिचा परिणाम होऊन निरंजन–रघुनाथांनी ही आपली टीका गद्यामध्ये लिहिली असावी असा तर्क करण्यास जागा

आहे. केनोपनिषदावरील ही टीका आपण शंकराचार्यांच्या भाष्यास अनुसरून लिहिली आहे, असे त्यांनी ग्रंथाच्या अखेरीस म्हटले आहे. ही टीका छापील पंचवीस पृष्ठांची आहे, तेव्हा ती सारांशात्मक आहे हे उघड आहे. अधूनमधून इतर श्रुतिवचनांचे उल्लेख करून आपले लेखन सजवण्याचा प्रयत्न निरंजन–रघुनाथांनी केला आहे. गुरूने शिष्याला समोर बसवून एखादा विषय समजावून द्यावा अशा थाटाने येथील सर्व विवेचन केले आहे.

निरंजन–रघुनाथांचा दुसरा गद्य टीका–ग्रंथ म्हणजे अनुभवामृतपदबोधिनी हा होय. हा ज्ञानेश्वरांच्या अनुभवामृतावरील टीकाग्रंथ असून त्याचा विस्तार छापील २२८ पृष्ठे आहे. ग्रंथ केव्हा पूर्ण झाला याबद्दल ग्रंथात काही उल्लेख आढळत नाही. अनुभवामृताचा अर्थ कळावा अशी फार इच्छा होती, म्हणून 'श्रीअलंकापुरीं जाऊन लेकरासारखें रडून प्रार्थना श्रीज्ञानेश्वरपदीं केली, त्याजवरून या ग्रंथावरि टीका करण्याविषयीं स्वप्नांत प्रसाद जाला. अस्तु, आपण आपणास अर्थ कळावयासाठी लिहिता जालों.' असे निरंजन-रघुनाथांनी ग्रंथाच्या अखेरीस म्हटले आहे. हा उल्लेख ग्रंथाच्या प्रारंभीही त्यांनी केला आहे. त्याचबरोबर 'अनुभवामृत हा ग्रंथ दुर्बोध आहे, तो स्पष्ट करावा' अशी श्रोत्यांनी विनंती केल्याचा निर्देशही आहे. ग्रंथातील विवेचनाची सरणीही श्रोत्यांना ग्रंथ समजावून सांगावा अशा धाटणीची आहे. एकेक ओवी घेऊन तिचा अर्थ निरंजन-रघुनाथ स्पष्ट करीत गेले आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या अखेरीस समर्पणात्मक अशा दोन ठराविक ओव्या लिहिल्या आहेत. पहिल्या प्रकरणाच्या अखेरीस मात्र चार ओव्या आहेत. प्रकरणाच्या प्रारंभी त्याचे मागील प्रकरणाशी असलेले अनुसंधान त्यांनी स्पष्ट केले आहे. निरनिराळ्या ओव्यांमधील संगतीही त्यांनी अनेक ठिकाणी स्पष्ट केली आहे. विवेचन एकंदरीत सुगम असून लक्षपूर्वक वाचीत गेले तर मूळ ग्रंथ समजेल इतपत प्रसाद या गद्य मराठीत आहे. आत्मबोधप्रकाशिनी इतकी अशुद्ध रूपे या ग्रंथात आढळत नाहीत. अनुभवामृतासारख्या जुन्या मराठी ग्रंथावर लिहिलेली सविस्तर गद्य-टीका या दृष्टीने या ग्रंथाचे महत्त्व आहे. इ. स. १८०० ते १८७४ या कालखंडामध्ये अनुभवामृतावर आणखी तीन गद्य-टीका मराठीत झाल्या आहेत. वीरेश्वर दीक्षित याचे अनुभवामृतव्याख्यान, हरिहर यांचे राष्ट्रभाष्य आणि भय्याकाका किबे यांची ज्योत्स्ना या त्या तीन टीका होत. त्या अनुक्रमे इ. स. १७९५, सुमारे १८१५ आणि १८७८ मध्ये लिहिल्या गेल्या आहेत.

निरंजन–रघुनाथांनी लिहिलेल्या तीन टीकाग्रंथांचा उल्लेख येथवर केला. वेदान्तविषयावर स्वतंत्र ग्रंथ त्यांनी लिहिलेला नाही. स्वात्मचरित्र आणि साक्षात्कार हे त्यांचे लेखन आत्मचरित्रपर आहे, तर 'श्रीरघुनाथचरित्र व केशवचैतन्यकथातरु' हे चरित्रपर आहे. याशिवाय काही अभंग, पदे व इतर काही स्फुट रचना त्यांनी केली आहे.

**मौनीस्वामींचा स्वात्मबोध**

सिन्नर येथील सत्पुरुष, मौनीस्वामी, यांचे पूर्वाश्रमीचे नाव नारायण भिकाजी रत्नपारखी असे होते. नाशिक येथील श्रीरघुनाथभटजींच्या शिष्यवर्गातील हे एक प्रमुख ग्रंथकार आहेत. वयाच्या साठीनंतर त्यांचे वास्तव्य मुंबईला झाले आणि त्यांच्या शिष्यवर्गामध्ये डॉ. भाऊ दाजी लाड, नाना शंकरशेट, महादेव चिमणाजी आपटे असे नामवंत नवशिक्षित होते. मौनीस्वामींच्या रचनेमध्ये स्वात्मबोध हा ग्रंथ सर्वात महत्त्वाचा आहे. शके १७४० (सन १८१८) तारणनाम संवत्सरात पौष शुद्ध दशमीच्या दिवशी प्रथम प्रहरात हा ग्रंथ समाप्त झाला, असे ग्रंथाच्या अखेरीस सांगितलेले आहे. या ग्रंथाचे एकूण अकरा अध्याय असून ओवीसंख्या १०६० आहे. ओवीसंख्या हा शब्द येथे थोड्या मर्यादित अर्थाने घ्यावयास हवा, कारण या ग्रंथाचे पहिले सहा अध्याय ओवीबद्ध असले तरी सात व आठ हे दोन अध्याय गद्यात आहेत तर त्यापुढचे अध्याय, काही भाग ओवीबद्ध तर काही भाग गद्य असे, गद्यपद्यमिश्र आहेत. अशी संमिश्र रचना हा या ग्रंथाचा एक विशेषच म्हणावयास हवा. गद्य-रचनेतही ओव्यांच्या अखेरीस घालतात, त्याप्रमाणे दोन तीन वाक्यांनंतर क्रमाने आकडे टाकले आहेत. दोन-तीन वाक्यांच्या त्या खंडामध्ये एकेक छोटा विचार सामावलेला आहे. प्रत्येक वाक्याच्या अखेरीस बखरीतील गद्यात किंवा संस्कृत गद्य-रचनेत आढळतो तसा उभा दंड टाकलेला आहे. विरामचिन्हांची योजना केलेली नाही किंवा परिच्छेद पाडलेले नाहीत. जेथे दंड घातलेला आहे तेथे वाक्यार्थ पूर्ण झाला आहे असे सर्व स्थळी आढळत नाही. काही स्थळी वाक्यार्थ पुरा झाला आहे हे समजत असले तरी क्रियापद अध्याहृत आहे असे दिसते.

स्वात्मबोध हा ग्रंथ श्रोता व वक्ता यांच्यातील संवादाच्या रूपाने लिहिलेला आहे. पहिल्या अध्यायामध्ये प्रारंभी मौनीस्वामींनी आपले सद्गुरु व श्रोते यांना वंदन केले आहे. ग्रंथातील विवेचनाला श्रोत्याने विचारलेल्या 'भगवत्प्राप्ति घडे कैसे। निरसोनि जन्मादि दुःखासी। अभय जीवांसि होय कैसे।' १.४९ या प्रश्नाने प्रारंभ झाला आहे. नरदेहामध्ये असलेल्या मनुष्याने 'स्वात्मविचार' करावा, हा विचार कोणता, तर 'अद्वैत स्वात्मज्ञानेवीण। विचार अन्य मुख्य नसे'। १.५७ असे आरंभीच या प्रश्नाचे उत्तर गुरूने दिले आहे. वेदांतशास्त्राच्या आधारे केलेले या आत्मस्वरूपाचे विवेचन व त्याच्या प्राप्तीची साधने हा या ग्रंथाचा विषय आहे. शुद्ध भक्तीने ईश्वर प्राप्त होतो म्हणून नवविधा भक्तीचे सविस्तर विवेचन पहिल्या अध्यायातच केले आहे.

गुरू व देव या दोघांच्याही भक्तीचा उल्लेख मौनीस्वामी करितात. नवविधा-भक्तीच्या विवेचनामध्ये भक्तीच्या प्रत्येक प्रकाराच्या स्पष्टीकरणात ईश्वर व गुरू या दोघांचाही निर्देश त्यांनी केला आहे. आत्मा हा सत्, चित् व आनंद अशा तीन लक्षणांनी युक्त आहे हा विषय दोन ते पाच या चार अध्यायांमध्ये विस्ताराने स्पष्ट

केला असून, आनंदमय कोशाचे आणि ब्रह्मानंद व वासनानंद यांचे विवरण सहा व सात या अध्यायांत केले आहे. जीव हा सच्चिदानंदस्वरूप होय हा मागे सविस्तर येऊन गेलेला विषय सातव्या अध्यायात पुन्हा आला आहे. त्या अध्यायाच्या प्रारंभी 'आतां सिंहावलोकनेंकरून आत्मा सच्चिदानंद जो तो मीच होय ऐसें तुज स्पष्ट कळावयास अल्प विस्तारे पुनः त्रिपदार्थ वार्णितो ॥ १ ॥' असे म्हटलेले आहे. तेव्हा मागे येऊन गेलेला विषयच आपण पुन्हा सांगत आहोत याचे भान लेखकाला आहे, पण ही पुनरुक्ती करण्याचे कारण स्पष्ट केलेले नाही. ब्रह्म आणि माया यांचे स्वरूप हा आठव्या अध्यायाचा विषय आहे, तर नवव्या अध्यायात मुमुक्षुत्व, वैराग्य, नित्यानित्यविवेक व शमदमादि षट्कसंपत्ती या साधकाला आवश्यक अशा साधन-चतुष्टयाचे स्पष्टीकरण केले आहे. दहाव्या अध्यायात जीवन्मुक्तीचे वर्णन करून अकराव्या अध्यायात प्रथम संचित, क्रियमाण व प्रारब्ध ही कशी नष्ट होतात ते सांगितले आहे आणि त्यानंतर विदेहमुक्तीचे वर्णन करून मौनीस्वामींनी हा आपला ग्रंथ संपविला आहे. ग्रंथ प्राकृतात असला तरी त्यात अद्वैतसिद्धान्तच सांगितलेला आहे हे ध्यानात घेऊन त्याचा श्रोत्यांनी आदर करावा अशी विनंती शेवटच्या अध्यायात केली आहे. त्याचप्रमाणे ग्रंथातील एकूण विवेचनाचा सविस्तर आढावाही घेतला आहे. मौनीस्वामींच्या एकंदर प्रतिपादनावर शांकर वेदान्ताची गाढ छाया आहे. अनेक तपशिलाच्या गोष्टी त्यानी शंकराचार्यांच्या ग्रंथांमधून घेतल्या आहेत; पण त्यांचा येथे विस्ताराने उल्लेख करण्याचे कारण नाही.

**स्वात्मबोधातील निरूपणपद्धती**

स्वात्मबोधातील आपल्या विवेचनाला आधार म्हणून अनेक प्राचीन संस्कृत ग्रंथांतील व जुन्या मराठी ग्रंथांतील वचने मौनीस्वामी जागोजाग देतात. पण अशी वचने दिली आहेत असे म्हणण्यापेक्षा निरानिराळ्या ग्रंथांतील उतारे दिले आहेत असे म्हणणे योग्य होईल. संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांमधील वेदान्तविषयक ग्रंथांचा मौनीस्वामींनी जबर व्यासंग केला आहे हे मात्र या आधारादाखल घेतलेल्या अवतरणा-वरून उत्तम प्रकारे जाणवते. उपनिषदातील वचने तुरळक येतात. त्याशिवाय भगवद्‌गीता, अष्टावक्रगीता, योगवासिष्ठ, पंचदशी, भागवत आणि शंकराचार्यांची अपरोक्षानुभूती व लघुवाक्यवृत्ती असे ग्रंथ यांतील वचने अनेकानेक आली आहेत. त्याचबरोबर मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, रंगनाथ, रामदास, वामनपंडित, उद्धवचिद्‌घन, मृत्युंजय अशा जुन्या मराठी ग्रंथकारांची प्रमुख अवतरणे एकसारखी व एकामागोमाग येतात. शिवरामस्वामी व अच्युतरावजी हे त्या मानाने अलीकडच्या काळातील लेखक आहेत. पैकी अच्युतरावजी मोडक हे मौनीस्वामींचे गुरुबंधूच आहेत. यांचीही वचने जागोजाग आली आहेत. 'पानपात्र' या ग्रंथातील अवतरणेही आली आहेत. हा ग्रंथ कोणाचा आहे ते मात्र दिलेले नाही. योगवासिष्ठाच्या दोन श्लोकांवरील रामकृष्ण पंडितांच्या गद्य मराठी टीकेचा भागही आधारादाखल

उद्धृत केला आहे.

आपल्या विवेचनाला मौनीस्वामींनी निरनिराळे आधार द्यावेत हे अगदी ठीक आहे. किंबहुना अशी वचने दिल्याने एकंदर विवेचनाची परिणामकारकता वाढते, विवेचन साधार असल्याचे वाचकाला जाणवते, हेही खरे आहे. पण अशा अवतरणांचा अतिरेक करणे हे केव्हाही त्याज्यच म्हणावयास हवे, कारण त्यामुळे ग्रंथकाराच्या स्वतंत्र प्रज्ञेस अवसरच उरत नाही. पण मौनीस्वामी केवळ फार अवतरणे देतात असे नाही, तर एखाद्या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण करीत असताना ते निरनिराळ्या ग्रंथकारांच्या लेखनाचे उतारेच्या उतारे एकामागोमाग उतरून काढतात. एक उदाहरण येथे देणे ठीक होईल. नवव्या अध्यायामध्ये निर्विकल्प समाधीचा विषय आला आहे आणि तेथे समाधीतील हा आनंद प्राप्त करवून घेण्यासाठी ज्ञानी पुरुषानेही नित्य अभ्यास करावयास हवा या मुद्द्याचे विवेचन मौनीस्वामींनी केले आहे. एकदा आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर त्या पुरुषाला पुन्हा अभ्यास कशाला हवा अशी शंका यावर उपस्थित करून तिचे निराकरण करिताना मौनीस्वामींनी प्रथम वामनपंडितांच्या निगमसार ग्रंथातील अठ्ठेचाळीस ओव्या दिल्या आहेत. त्यानंतर याच विषयावरील दासबोधातील बावन ओव्या देऊन पुन्हा निगमसारातील सात ओव्या आणि त्याच्यापुढे पुन्हा दासबोधातील अठ्ठेचाळीस ओव्या दिल्या आहेत. एवढ्याने भागले नाही म्हणून की काय यानंतर रंगनाथांच्या योगवासिष्ठातील दहा, एकनाथी भागवतातील दहा आणि पुन्हा वामनपंडितांच्या निगमसारातील अठरा ओव्या मौनीस्वामींनी उद्धृत केल्या आहेत. अवतरणांचा हा हव्यास खरोखरी अपूर्व आहे. या सर्व अवतरणांच्या ओव्या एकशेऐंशीहून अधिक झाल्या आहेत. मौनीस्वामींच्या स्वतःच्या ओव्या या अध्यायामध्ये केवळ एकसष्ट आहेत हे ध्यानात घेतले तर अवतरणांची ही संख्या कशी प्रमाणाबाहेर गेली आहे ते अधिक स्पष्ट होते. एवढी सारी अवतरणे दिल्यावर–

"एवं इत्यादि संमती । येथे लिहाव्या तरी किती ।। " ९.५३ असा उद्गार त्यांनी काढला आहे. पाचव्या आणि सहाव्या अध्यायांतही अशीच अनेक अवतरणे उद्धृत केलेली आढळतात. साऱ्या स्वात्मबोध ग्रंथभर आधारादाखल इतर ग्रंथांमधून घेतलेल्या अवतरणांची तऱ्हा हीच आहे. त्यामुळे मूळ मौनीस्वामींचे प्रतिपादन कोठे लुप्त होऊन जाते आणि विषयाचे सूत्र कोठे नाहीसे होऊन जाते ते कळतही नाही. स्वात्मबोध ग्रंथांत मौनीस्वामींच्या लेखणीतून उतरलेला जितका भाग आहे तितकाच भाग अवतरणांनी व्यापलेला आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होण्याचा संभव नाही. शिवाय अवतरणांमुळे ग्रंथाच्या एकात्मतेस फार मोठा धक्का पोचतो. त्यात पुन्हा अधूनमधून गद्यात लिहिलेले भाग येतात. या साऱ्या विषम रचनेमुळे ग्रंथातील एकरूप असा परिणाम वाचकांच्या मनावर होण्यास मोठाच अडथळा उत्पन्न होतो.

ग्रंथाची रचना प्राधान्याने गुरुशिष्यसंवादरूप आहे. श्रोत्याने अधूनमधून शंका विचारल्या आहेत व त्यांचे निराकरण वक्ता करीत आहे असेही वर्णन केले आहे. आठवा अध्याय तर जवळ जवळ सारा शिष्याने उपस्थित केलेल्या शंका व गुरूने त्यांची दिलेली उत्तरे यांनी भरलेला आहे. स्वतःच्या विवेचनावर आपणच शंका उत्पन्न करून तिचे निराकरण करणे ही एक मौनीनाथांची विशेष लकब आहे. जुन्या संस्कृत विवेचनपर ग्रंथांत पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करतात तशा स्वरूपाचाच हा प्रकार वाटतो. अशी शंका देताना तेथे ओवीच्या आधी ' आशंका ' हा शब्द घातलेला आहे. मौनीस्वामींची भाषा संस्कृतप्रचुर आहे आणि काहीशी क्लिष्ट आहे. तीमध्ये तत्त्वज्ञानाच्या प्रतिपादनामुळे येणारा एक प्रकारचा कठोरपणा व रुक्षपणा आहे. वाणीमध्ये माधुर्य जवळ जवळ नाही, त्यामुळे या साऱ्या लेखनाला वाङ्मयीन सौंदर्याचा स्पर्श झालेला सहसा आढळत नाही. उपमादृष्टान्त अधूनमधून येतात, पण संस्कृतप्रचुर व क्लिष्ट अशा भाषेमुळे ते उपमादृष्टान्त रचनेमध्ये कोणताही गोडवा आणू शकत नाहीत. भक्तीचा पुरस्कार मौनीस्वामी करतात, पण ही भक्ती बरीचशी ज्ञानस्वरूप आहे. व ईश्वराविषयीच्या केवळ जिव्हाळ्याने ओथंबून जाणारी जी भक्तिभावना मराठी संतांच्या रचनेत आढळते तिचा अभाव असल्यामुळे या ग्रंथातील भक्तीचे विवेचन त्यातील रुक्षपणा कमी करू शकलेले नाही. गद्य-लेखनाची भाषाही दुर्बोध व जड आहे. गद्य-लेखन असले तरी हे गद्य अव्वल इंग्रजीतील तत्कालीन मराठीशी नाते जोडणारे नाही. त्यावर संस्कृतची घनदाट छाया आहे. ' माया विद्या ' ' अखंडा द्वितीयत्वे ' अशा शब्दांतून द्विखंडचिन्हांची योजना केली आहे हा देखील संस्कृतचा परिणाम म्हणावयास हवा. गद्य-रचनेवर इंग्रजीचाही परिणाम झाल्यासारखा वाटतो हे विशेष लक्षणीय आहे. ' काही दानधर्म करण्यास अशक्त झालों तर...।' ७. ६ किंवा 'आत्मा तूं पूर्वी मृत होऊन जर अनित्य असतास तर....। ' ७.७ ही वाक्य-रचना मराठीच्या दृष्टीने चमत्कारिक वाटते व ती इंग्रजीशी अधिक जुळती वाटते. मौनीस्वामींच्या गद्य-लेखनाचा नमुना म्हणून पुढील उदाहरण पाहण्यासारखे आहे.

" त्यात मुमुक्षुत्व म्हणजे त्रिविधतापें करून व जन्मजरादिदुःखेंकरून व लोकेषणा द्रव्येषणा व भार्यापुत्रादि ईषणा इत्यादि ताप व स्वर्गनरकादि ताप असे अनेक ताप जे तेणेंकरून तप्त झाला जो अधिकारी तो हा संसारतापापासून विमुक्त होऊन मला परमानंदाचा लाभरूप ब्रह्मसाक्षात्कार कधीं होईल ऐसी अतिदग्धदाहमस्तकवत् किंवा ग्रीष्मकाळीं चहुकडून वणव्यांत सांपडलेल्या गजाचे शीतल गंगेचा महाह्रद-प्राप्तीचे इच्छेपरी तीव्र इच्छा तें मुमुक्षुत्व जाणावे ।।"....९.२.

मौनीस्वामींच्या या भाषाशैलीवर अधिक भाष्य करण्याची आवश्यकता नाही. त्यांच्या चरित्रातील उल्लेखांवरून असे दिसते की मुंबईतील त्यांच्या वास्तव्यात त्यांची परमार्थविषयक प्रवचने लोकांना फार आवडत असत. त्या लोकप्रियतेची प्रचीती त्यांच्या रचनेत मात्र येत नाही असे म्हणावे लागते.

## मौनीस्वामींची इतर रचना

स्वात्मबोधाशिवाय इतरही काही रचना मौनीस्वामींनी केली आहे. स्वात्मबोधसुधा हे बावन श्लोकांचे अनुष्टुभातील छोटे काव्य असून त्याच्या नावावरून यामध्ये स्वात्मबोध ग्रंथाचा सारांश असावा असे मानता येते. स्वात्मबोध या ग्रंथात आलेले अनेक विचार यामध्ये थोडक्यात आले आहेत. जीव हा चिन्मयस्वरूप आहे हा यातील प्रमुख सिद्धान्त आहे. दुसऱ्या श्लोकाच्या पूर्वार्धामध्ये, प्रारब्धयोगाने देहाला लाभालाभ प्राप्त होतात असे सांगितले असून, त्याचा उत्तरार्ध "चिन्मयाला मला नाहीं ऐसे जाणोनि हो सुखी ॥" असा आहे. यातील 'ऐसें जाणोनि हो सुखी।' हा शेवटचा चरण पुढे प्रत्येक श्लोकाच्या अखेरीस पालुपदाप्रमाणे आला आहे. लघुबोध हेही असेच एक चोपन ओव्यांचे लहान प्रकरण असून जीवाचे ब्रह्मस्वरूपत्व हा त्याचा विषय आहे. "अरे, तूं सच्चिदानंद साक्षी। वस्तुता असाक्षी ॥" असे दोन चरण त्यामध्ये धृपद म्हणून घातले आहेत आणि ते प्रत्येक ओवीनंतर आवृत्त होतात. ज्ञानबिंदू या प्रकरणाची रचना अभंगात केली आहे. आत्मानात्मविचारावरील हा बहात्तर चरणांचा गुरुशिष्यसंवाद आहे. याचा विशेष एवढाच सांगता येईल की, या प्रकरणाचा प्रारंभ नेहमीप्रमाणे शिष्याने विचारलेल्या प्रश्नाने न होता साधनसंपन्न व अनन्य अशा शिष्याला गुरूने कौतुकाने विचारलेल्या अध्यात्मविषयक प्रश्नाने झाला आहे. पंचीकरण हे सतरा पृष्ठांचे छोटे प्रकरण असून त्याचा विषय नावावरूनच स्पष्ट आहे. हे सारे प्रकरण गद्यामध्ये आहे. त्यातही मौनीस्वामींच्या पद्धतीप्रमाणे संस्कृत व मराठी ग्रंथातील वचने उद्धृत केली आहेत. 'आशंका' असा उल्लेख करून त्या शंकेचे निराकरण करणे हा प्रकारही आहे. याची भाषा स्वात्मबोधातील गद्याप्रमाणेच क्लिष्ट व दुर्बोध आहे. अव्वल इंग्रजीतील बदलत्या काळाला अनुसरून वेदान्तासारख्या शास्त्रीय विषयावर मौनीस्वामींनी गद्य-लेखन केले एवढे श्रेय त्यांना देता येण्यासारखे आहे. याशिवाय भक्तिज्ञानवैराग्यपर काही अभंग व पदे मौनीस्वामींनी लिहिली आहेत.

## दोन

## हंसराजांची ईशावास्योपनिषद्टीका

मूळचे परभणीचे व पुढे परंडा येथे वास्तव्य करून राहिलेले श्रीनारायणतीर्थ तथा हंसराजस्वामी यांनी मराठीमध्ये वेदान्तविषयावर विपुल ग्रंथरचना केली असून ईशावास्योपनिषदावर त्यांनी 'वेदाज्ञा' या नावाची टीका लिहिली आहे. जुन्या मराठी वाङ्मयात उपनिषद्ग्रंथांवर फार क्वचित टीका लिहिल्या गेल्या आहेत, त्या दृष्टीने या टीकेला विशेष महत्त्व आहे. आरंभीचा मंगलाचरणरूप किंवा शांतिपर श्लोक धरून या उपनिषदाचे एकूण श्लोक एकोणीस आहेत, त्यावर हंसराजांनी ४८३ ओव्या लिहिल्या आहेत.

"इति श्रीमद्वेदानुज्ञा । ईशावास्य उपनिषत्संज्ञा ।
प्राकृत संस्कृत भेद अज्ञा । परी अर्थ एक ॥

प्रसिद्ध ईशावास्य उपनिषत् । त्यावर टीका हंसराजकृत ।
वेदाशा नावाची विख्यात । साधकांकारणे रचलीसे ॥" ४८२-८३

असे टीकेच्या अखेरीस हंसराजांनी म्हटले आहे. रचनाकालाचा वा स्थलाचा निर्देश त्यांनी केलेला नाही. उपनिषदाचा एकेक श्लोक घेऊन त्याचे पदशः विवरण त्यांनी केलेले आहे. प्रत्येक श्लोकावरील या ओवीबद्ध टीकेशिवाय हंसराजांनी मूळ उपनिषदाच्या श्लोकांचा आशय अनुष्टुभ छंदातील एकूण चाळीस मराठी श्लोकांत सांगितला आहे. सहाव्या व सातव्या श्लोकांचा अनुवाद :

"जो हे, हीं सर्वही भूते ब्रह्मात्मत्वीं पहातसे ।
तैसाचि भूतीं ब्रह्मात्मा पाहतां अल्प भाविना ॥
जो यया सर्व भूतांसी जाणे आत्मा म्हणोनियां ।
तेथें कैचा शोक मोह, एकत्व पाहतां खरें ॥" ११.१२ ॥

असा हंसराजांनी केला आहे. हा अनुवाद किती प्रसादपूर्ण साधला आहे हे एवढ्यावरून ध्यानात येईल. जेथे मूळ श्लोकाचा आशय एका श्लोकात व्यक्त होत नाही असे हंसराजांना वाटले तेथे त्यांनी एकाऐवजी दोन श्लोक लिहिले आहेत, त्यामुळे या अनुवादपर श्लोकांची संख्या चाळीस झाली आहे. यावरून ध्यानात येईल की ईशावास्योपनिषदावरील या टीकेचे स्वरूप अनुष्टुभातील अनुवादपर रचना आणि श्लोकांवरील पदशः केलेली ओवीबद्ध टीका असे दुहेरी आहे. श्लोकावरील ओवीबद्ध टीकाही सुगम उतरलेली आहे. पदशः टीका केलेली असल्यामुळे मूळ उपनिषदाचा आशय वाचकाला सहजपणे आकलन करता येतो. हंसराजांची टीका अर्थातच अद्वैतसिद्धान्ताला धरून आहे. आपल्या टीकेच्या प्रारंभीच त्यांनी चार वेदांमधील चार महावाक्यांचा निर्देश केला आहे. ती महावाक्ये अद्वैतवाचक आहेत असे सांगून, प्रस्तुत उपनिषदाचा प्रारंभी आलेला 'ओं पूर्णमदः पूर्णमिदं' हा शांतिपर श्लोकच अद्वैतसूचक आहे असे त्यांनी म्हटले आहे.

## हंसराजांची सदाचार टीका

सदाचार या नावाचे शंकराचार्यांनी संस्कृतमध्ये लिहिलेले एक छोटे प्रकरण आहे. त्यावर हंसराजांनी सविस्तर ओवीबद्ध टीका लिहिली आहे. शके १७६१ (सन १८३९) मध्ये डोमगावला वास्तव्य असताना प्रस्तुत टीका लिहिली गेली, असे कथाकल्पलतेच्या प्रारंभी दिलेल्या हंसराजांच्या चरित्राच्या रूपरेषेत संपादकांनी म्हटले आहे. मूळ ग्रंथामध्ये रचनेचे स्थल वा काल यांबद्दल हंसराजांनी कोणताही उल्लेख केलेला नाही. ग्रंथाची एकूण ओवी संख्या २०६४ असून ती एक सलग रचना आहे. अध्याय किंवा प्रकरणे असे तिचे विभाग केलेले नाहीत.

देवदत्त या नावाचा एक अधिकारी पुरुष होता, त्याने ज्ञान प्राप्त व्हावे म्हणून आचार्यांकडे जाऊन प्रार्थना केली, त्याचा अधिकार जाणून त्याला आचार्यांनी जो उपदेश केला तो हा सदाचार ग्रंथ होय; असा उल्लेख टीकेच्या प्रारंभी हंसराजांनी

केला आहे. हे आचार्य म्हणजे अर्थातच शंकराचार्य होत. ' वेदांतसिद्धांत हा एक । आत्मा ब्रह्म निश्चयात्मक ' ( १३४ ) आणि हा सिद्धान्त हा या सदाचार ग्रंथाचा विषय आहे, असे हंसराजांनी म्हटले आहे. आपल्या टीकेमध्ये श्लोकातील प्रत्येक पदाचे सुबोध असे विवरण हंसराजांनी केले आहे. मागीलपुढील श्लोकांची संगती त्यानी ठिकठिकाणी स्पष्ट केली आहे. त्यामुळे एकूण विवेचनाचा प्रवाह सुसूत्र व सुसंगत असा राहिलेला आहे. हंसराजांची वाणी संस्कृतप्रचुर असली तरी ती कमालीची प्रसादयुक्त आहे, त्यामुळे विषयाचे आकलन होण्यास कोठेही अडचण पडत नाही. अतिशय कठीण अशा कल्पनाही ते दृष्टान्तांच्या साहाय्याने सोप्या करून मांडतात. ग्रंथाच्या सुरुवातीलाच ईशस्तवन करिताना, आपणच पूर्ण ब्रह्म असताना असे स्तवन कसे घडू शकेल अशी शंका उपस्थित करून तिचे उत्तर देताना,—

" आपुलेचि वदन पाहावें । ऐसे इच्छी स्वभावें ।
तरी आरसियापुढे करावे । देखावे मुख ॥
तैसे अद्वैत पाहणें जरी । दुसरे करून जाणावें तरी ।
पुन्हा स्वसुखामाझारी । रामरसावें ॥ " १४–१५

असे हंसराजांनी म्हटले आहे. अद्वैतावर आधारलेला विचार ते सोपा करून कसा मांडतात हे यावरून ध्यानात येईल. नित्याच्या अनुभवातील असे अनेक सरस दृष्टान्त हंसराजांच्या विवेचनात मधूनमधून येत राहतात. विवेचनाच्या सुबोधतेत व रमणीयतेत त्यामुळे मोठीच भर पडते. सविस्तर व सांग रूपके करण्याचे सामर्थ्यही हंसराजांच्या प्रतिभेत आहे. देह हे देवालय असून देही हा त्यातील देव होय आणि त्या देवाची सर्वभावाने पूजा केल्याने तो देही स्वानुभूतीने शोभतो, असा विचार तेराव्या श्लोकामध्ये आहे. त्यावरील आपल्या टीकेमध्ये केवळ नरदेहापुरते हे वर्णन मर्यादित न ठेवता सारे जड ब्रह्मांड हेही एक देऊळ आहे, निर्विकार असा आत्मा ब्रह्म असून तो तेथील देव आहे, अहंकार हा पुजारी तर सारी मायादी तत्त्वे ही पूजासाहित्य आहेत असा एकंदर तपशील हंसराजांनी स्पष्ट केला आहे आणि तेथील पूजाविधीचे स्पष्टीकरण करताना, या देवाचे स्नानगंधलेपन इत्यादी झाल्यावर—

" चंचळ तितुकीं सुमने । ओविलीं चैतन्यतंतूनें ।
सच्चिद्रूपीं अर्पिता तेणें । अति शोभा पावलीं ॥
अज्ञान धूप जाळिला । ज्ञानदीप उजाळिला ।
धुरेवीण दाटला । प्रकाशचि ॥
निजतृप्ति नैवेद्य पूर्ण । तांबूल अखंडैकरस जाण ।
हरपलें जें द्वैतभान । फलादि हेचि ॥ " ५८६–८८

असे वर्णन हंसराजांनी केले आहे. अध्यात्माचा रूक्ष विषय सुबोध व रमणीय करण्याची हंसराजांची हातोटी यावरून स्पष्ट होते. व्यवहारातील सरस उपमादृष्टान्तांनी आपले लेखन सजवण्याची ही पद्धती ज्ञानेश्वरांच्या शैलीची आठवण करून देणारी

आहे. आपल्या प्रतिपादनातील एखादा विचार वाचकांच्या मनावर ठसावा यासाठी तो विचार थोडक्यात व्यक्त करणारा ओवीचा शेवटचा चरण एकामागोमाग अनेक ओव्यांतून घालण्याची हंसराजांची एक लकब आहे. देह, प्राण, इंद्रिये, बुद्धी ही तत्त्वतः नाहीतच, जे काही आहे ते एक पूर्ण ब्रह्मच आहे हा मुद्दा ठसविण्यासाठी ' पूर्ण ब्रह्म ' ॥ असा चौथा चरण त्यांनी एकामागोमाग वीस ओव्यांमध्ये घातला आहे.

अशा ओव्यांवर विचार आणि भाषा या दोन्ही दृष्टींनी समर्थांचा परिणाम आढळून येतो. मात्र हंसराजांचे एकंदर विवेचन व त्यांची भाषाशैली पाहिल्यावर त्यांनी ज्ञानेश्वर वा समर्थ यांपैकी कोणाचेही केवळ कोरडे अनुकरण केलेले नाही हे ध्यानात आल्याशिवाय राहात नाही. संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषांतील आध्यात्मिक वाङ्मय त्यांनी उत्तम प्रकारे अभ्यासिले आहे, त्यांतील तत्त्वज्ञानविषयक विचार त्यांनी पचवले आहेत, परमार्थाची साधना करून ते विचार आपल्या अनुभवाचा विषय केले आहेत आणि त्यानंतर हा विषय सर्वसामान्य जनांना कळावा यासाठी सुबोध अशा शैलीमधून तो त्यांनी आपल्या ग्रंथामधून मांडला आहे असाच ग्रह हंसराजांचे लेखन वाचताना आपल्या मनाचा होतो.

### गुरुशिष्यांतील जिव्हाळा

सदाचार हा ग्रंथ केवळ अध्यात्माचे सिद्धान्त स्पष्ट करणारा आहे. हंसराजांनी त्यावर लिहिलेली टीका गुरुशिष्यसंवादरूप आहे. शंकराचार्य हे गुरू तर देवदत्त हा त्यांचा शिष्य अशी मांडणी त्यांनी केली आहे. आचार्यांचे विवेचन चालू असताना देवदत्त अधूनमधून शंका उपस्थित करतो व आचार्य त्यांचे निराकरण करितात, किंवा देवदत्त प्रश्न विचारतो व आचार्य उत्तर देतात असे वर्णन हंसराजांनी केले आहे. पण केवळ शंकासमाधान वा प्रश्नोत्तरे यांतून निर्माण होणारा गुरुशिष्यांचा संवाद एवढेच मर्यादित स्वरूप हंसराजांनी आपल्या टीकेचे ठेवलेले नाही. आचार्य आपले विवेचन करीत जातात, तसतशी त्यावर देवदत्ताच्या मनाची होणारी निरनिराळी प्रतिक्रियाही हंसराजांनी आपल्या टीकेत जागोजाग विस्ताराने वर्णिली आहे. त्यामुळे या टीकेचे स्वरूप केवळ विवेचनपर किंवा प्रतिपादनरूप न राहाता गुरू आणि शिष्य यांच्यामधील जिव्हाळ्याचे संबंध व्यक्त करणारे असे झाले आहे. ही सारी निर्मिती अर्थातच हंसराजांची आहे, कारण मूळ सदाचार ग्रंथामध्ये हा भाग नाही. गुरूने केलेल्या विवेचनावरील शिष्याची प्रतिक्रिया आणि तीवर होणारी गुरूची प्रतिक्रिया या ग्रंथात नाना प्रकारांनी प्रकट झाली आहे आणि तिने या ग्रंथाचा बराच मोठा भाग व्यापलेला आहे.

ग्रंथाच्या प्रारंभीच्या भागात वेदान्तज्ञानाचा अधिकारी कोण हे आचार्यांनी स्पष्ट केले आहे असे वर्णन हंसराज करितात. ते विवेचन ऐकल्यावर आपल्या ठायी तो अधिकार नाही असे वाटून देवदत्त खिन्न झाला. त्यावर गुरूंनी त्याला थोपटल्या-

सारखे केले आणि—

"आतां भीती सांडीं ये क्षणीं । अधिकार तुज असे ॥
सद्‍गुरुपदीं अनन्यता । आतां तुजसी कायसी चिंता ॥" १७२–७३

असे आश्वासन दिले. ते आश्वासन मिळताच देवदत्ताला अपार आनंदाचे भरते कसे आले, आता आपण हा भवसागर क्षणमात्रात उल्लंघून जाऊ असा आवेश त्याच्या ठायी कसा उत्पन्न झाला आणि याचा हा हर्षपूर उतरला पाहिजे म्हणून आचार्यांनी त्याला– "सावध, देवदत्ता, । मायेनें ग्रासिलें तुज आतां ।" ( २०० ) असे सावध कसे केले, याचे वीस-पंचवीस ओव्यांमध्ये हंसराजांनी विस्ताराने वर्णन केले आहे. ज्ञानी पुरुषांचा आचार कसा असतो याचे आचार्यांनी केलेले विवरण ऐकल्यावर हे अपरोक्षज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी आपण गुरूची सेवा हरप्रकारे कशी करू याचे जे चित्र देवदत्ताच्या मनात उभे राहिले त्याचे वर्णन हंसराज विस्ताराने करितात आणि गुरू बोलावयाचे थांबले आहेत हे ध्यानात आल्यावर देवदत्त व्याकुळ होऊन त्याची करुणा कशी भाकतो हेही त्यानंतर सविस्तर वर्णन करितात ( ७५४–८६२ ). गुरूला शिष्याविषयी वाटणारा आत्मभाव हंसराज नाना प्रकारांनी व्यक्त करितात.

"वत्सालागी धेनु जैशी । गुरु माय कळवळिली तैशी ।
चाटूं पाहे सच्छिष्यासी ।"
"गुरू माय कृपाळू मोठी । मुखचि चुंबितसे ॥" किंवा
"शंकरे उचलूनि आलिंगिली । तनू देवदत्ताची ॥" ( १७९५, १७९६, १२२८ )

अशा प्रकारचे उल्लेख हंसराजांनी केले आहेत. आपण केलेला उपदेश देवदत्त केवळ मौन धारण करून श्रवण करीत आहे, तो काही बोलत नाही हे पाहून त्याला प्रश्न विचारण्यासाठी आचार्यांनी उत्तेजन दिले आहे, 'जर तू येथे प्रश्न विचारला नाहीस, तर हे तुझे कोड अन्यत्र कोठे पुरे होणार?' असे त्यांनी त्याला म्हटले आहे; असे वर्णन एका ठिकाणी आलेले आहे. गुरुशिष्यप्रेमाची ही सारी वर्णने उत्कटता निर्माण होण्याच्या दृष्टीने ठीक आहेत. पण अशी वर्णने करीत असताना क्वचित अतिशयोक्ती झाल्यासारखे वाटते. गुरू व शिष्य हे नाते विसरून दोघे एकरूप झाले, 'न धरत-चालिलें स्फुंदन । उभयतांसी ॥' १२२८ असा उल्लेख एका ठिकाणी आला आहे किंवा शंकरांनी आपले नेत्र पुसून देवदत्ताचे मुख कुरवाळले आणि—

"अगा वत्सा परम सख्या । कौतुक पाहिले शिष्यराया ।
आम्ही दुर्मिळ एकुलतिया । उपेक्षू कैसें ॥
वृद्धपणीं विटाळ जातां । वंध्या जैशी प्रसवे सुता ।
तया कैशी अव्हेरी माता । निर्दयपणे ॥" ८५३–५४

असे त्यांनी देवदत्तास म्हटले असे हंसराज सांगतात तेव्हा या वर्णनातील मर्यादा काहीशी सुटली आहे असे वाटून जाते. मात्र असे स्थळ क्वचितच आढळते. अखेर

गुरुशिष्यांतील हा जिव्हाळा हा देखील मायेच्या प्रांतातीलच आहे आणि अध्यात्म-ज्ञानाच्या योगे तो योग्य त्या मर्यादेत राखला पाहिजे याचे भानही हंसराजांना आहे. आपला उपदेश संपत आल्यावर, आता आमची आज्ञा घ्यावी आणि " स्वरूपीं स्वरूपानुभवें । जीवन्मुक्तिसुख भोगावें । उरले प्रारब्ध सारावें । " ( १९५४ ) असे आचार्यांनी देवदत्ताला म्हटले. हे ऐकून गुरु-वियोगाच्या कल्पनेने तो घाबरा झाला. आणि—

" आतां काज असे कवण । कीं ते म्यां करावें जाऊन ।
सेवाचि इच्छितसे मन । हाचि प्रसाद द्यावा ॥
परम लावण्य वेल्हाळी । परी ते शोभे पतीजवळी ।
तेवी मीही चरणातळीं । शोभेन अत्यंत ॥ " ( १९५८–५९ )

अशी विनवणी, त्याने केली. पण यावर शिष्यप्रेमाच्या भावनेला थारा न देता, वियोग अथवा संयोग हे सारे मायिकाचे ढोंग आहे, सर्वांच्या ठायी एक निर्विकार आत्मा आहे तेथे ' देवदत्त किंवा शंकरु । नाम हे कोठें ? ॥ ' (१९८१) असे शंकरांनी म्हटले आणि त्यावर देवदत्तानेही ' तथास्तु ' म्हटले; असे वर्णन हंसराजांनी केले आहे. गुरू आणि शिष्य यांच्यामधील जिव्हाळ्याच्या प्रेमाचे हे वर्णन हा हंसराजांच्या टीकेचा एक मोठाच विशेष आहे. हा भाग मूळ सदाचार ग्रंथात नाही हे वर सांगितलेच. हंसराजांनी केलेल्या या वर्णनामुळे त्यांनी केलेल्या अध्यात्मविषयाच्या प्रतिपादनात सुबोधता येते व त्यात एक प्रकारचा जिवंतपणाही येतो. सदाचार ग्रंथावरील या टीके-नंतर जवळजवळ दहा वर्षांनी आचार्यांच्या वाक्यवृत्ति या प्रकरणावर हंसराजांनी विस्तृत टीका लिहिली. त्यांच्या लेखनपद्धतीचे वर वर्णिलेले सारे विशेष त्या टीकेमध्ये अधिकच प्रकर्षाने आढळून येतात, तेव्हा आता त्या टीकेचा परिचय करून घेऊ.

### हंसराजांची लघुवाक्यवृत्तिटीका

श्रीमत् शंकराचार्यांच्या लघुवाक्यवृत्तीवर लिहिलेली सविस्तर ओवीबद्ध टीका हा हंसराजांच्या टीकापर रचनेपैकी एक अतिशय महत्त्वाचा ग्रंथ आहे. शंकराचार्यांची मूळ रचना केवळअठरा संस्कृत श्लोकांची आहे, पण तीवर हंसराजांनी ५६०० ओव्या लिहिल्या आहेत. या ओवीसंख्येवरूनच मूळ रचनेच्या मानाने टीकेचा विस्तार किती प्रचंड आहे हे ध्यानात येण्यासारखे आहे.

" शके सत्राशें एकाहत्तरीं । सौम्यनामक संवत्सरीं ।
आश्विन शुक्ल सौम्यवासरीं ॥ " ( ५५९९ )

विजयादशमीच्या दिवशी ही टीका संपूर्ण झाली, असा ग्रंथाच्या समाप्तिकालाचा निर्देश अखेरीस केलेला आहे. आपले पट्टशिष्य रघुनाथस्वामी यांना ज्ञान प्राप्त व्हावे म्हणून हंसराजांनी या ग्रंथाची रचना करून तो त्यांना वरप्रदान म्हणून दिला असे सांगितले जाते.

एकेका श्लोकावरील टीकेचे एकेक प्रकरण किंवा अध्याय केला असता तर

एकूण अठरा विभाग झाले असते आणि ग्रंथाचा विस्तार ध्यानात घेता ते ठीक झाले असते. पण तसे न करिता हंसराजांनी अठरा श्लोकांवर सलग टीका लिहिली आहे. प्रत्येक श्लोकावरील टीका लिहिताना त्यांनी प्रथम त्याचा सरळ अर्थ दोन-तीन ओव्यांत सांगितला आहे आणि त्यानंतर अर्थानुरोधाने दोन किंवा तीन पदे घेऊन त्यांवर विस्तृत भाष्य केले आहे. एका श्लोकावरील टीका संपवून दुसऱ्या श्लोकावरील टीकेस प्रारंभ करिताना तो श्लोक आधीच्या श्लोकानंतर का आला आहे त्याचे कारण हंसराजांनी स्पष्ट केले आहे, त्यामुळे एकंदर विवेचनात संगती व सुसूत्रता राहिली आहे. श्लोकातील दोन-तीन पदे घेऊन त्यावर व्याख्यान करिताना त्या पदांशी संबंधित अशा वेदान्तातील सर्व कल्पना हंसराजांनी स्पष्ट केल्या आहेत. त्यामुळेच या टीकेचा इतका विस्तार झाला आहे. दुसऱ्या श्लोकाच्या आरंभीची पदे 'अज्ञानकारणम्' अशी आहेत. त्यांचे विवेचन करिताना अज्ञान हे कारणशरीर होय एवढेच न सांगता अज्ञान, शुद्ध ज्ञान, विद्या-अविद्या, आवरणविक्षेप, पंचमहाभूते, पंच विषय, उपादानकारण, कर्ताभोक्ता असे अनेक आनुषंगिक विषय हंसराजानी विशद केले आहेत. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे विषय येथे आले आहेत, त्या श्लोकांवरील टीका अर्थातच त्या मानाने वाढली आहे. लघुवाक्यवृत्तीवरील या टीकेच्या निमित्ताने वेदान्तातील हरएक प्रश्नाचे सांगोपांग विवेचन करण्याची संधी हंसराजांनी घेतली आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

### गुरुशिष्यांचा सुखसंवाद

रविदत्त या नावाच्या ब्राह्मणाच्या मनात, आपण पूर्वी कोण होतो, जन्माला का आलो, मृत्यूनंतर आपली गती काय, अशा प्रकारचे प्रश्न उभे राहिले. त्यांची समाधानकारक उत्तरे मिळावीत म्हणून त्याने नाना साधने केली, अनेक देव धुंडले, पण त्याचा काही उपयोग झाला नाही अखेर तो सदाशिवाला म्हणजे शंकराला शरण गेला असता त्याने त्याला स्वप्नात दर्शन दिले आणि—शंकरस्वामीस शरण जा अशी आज्ञा केली. त्याप्रमाणे रविदत्त शंकराचार्यांना शरण गेल्यावर त्यांनी हा अधिकारी आहे असे जाणून त्याला उपदेश केला. 'जीव ब्रह्म ऐक्य निर्धार।' (३४) हाच चारी वेदांचा सारांश असून तो त्यांच्या 'अहं ब्रह्मास्मि' अशा महावाक्यामध्ये ग्रथित केला आहे. 'हेचि अहं ब्रह्मास्मि निश्चिती। वाक्यार्थाची जे अनुभूती। ऐसी वृत्ती ते वाक्यवृत्ति।' (३८) असा ग्रंथाच्या वाक्यवृत्ति या नावाचा उलगडा हंसराजांनी केला आहे. पुढे सोळाव्या श्लोकावरील टीकेमध्ये याचेच त्यांनी अधिक विस्ताराने निरूपण केले आहे (५१००–५११३). 'प्रत्यगात्मा ब्रह्माद्वय।' हाच 'वेदांतीचा मुख्य विषय।' असून तो चार वेदांनी चार वाक्यांत सांगितला आहे. 'तत्त्वमसि।' हे सामवेदातील, 'प्रज्ञानं ब्रह्म।' हे ऋग्वेदातील, 'अहं ब्रह्मास्मि।' हे यजुर्वेदातील, आणि 'अयमात्मा ब्रह्म।' हे अथर्ववेदातील, ही ती चार महावाक्ये होत. साऱ्या वेदान्ताचा मथितार्थ या वाक्यांत सामावला असून श्रवण-

मननादि साधनांच्या योगे साधकाने त्यांचा अनुभव घ्यावा असे हंसराजांनी म्हटले आहे. आपण देहस्वरूप नसून केवळ ब्रह्मस्वरूप आहोत हे अनुभवाला येण्यासाठी अभ्यास करावयास हवा, तो 'अभ्यास म्हणजे मी ब्रह्म आपण। या अर्थाचे अनुसंधान।' (४०) होय; पण ब्रह्म किंवा आत्मा म्हणजे काय ते कळल्याशिवाय हे अनुसंधान कसे साधणार? म्हणून देहादिकांतून आत्मा भिन्न कसा हे स्पष्ट करण्यासाठी शंकराचार्यांनी रविदत्ताला उपदेश केला आणि तोच वाक्यवृत्ति ग्रंथ होय 'चातकासाठी वर्षे घन। परी सर्वांसीच होय जीवन।' (५०) त्याप्रमाणे रविदत्ताच्या निमित्ताने सर्वांना हे ज्ञान प्राप्त होत आहे, तेव्हा श्रोत्यांनी सावधान असावे, असे आवाहन करून हंसराजांनी लघुवाक्यवृत्तीवरील या आपल्या सविस्तर टीकेस प्रारंभ केला आहे.

मूळ शंकराचार्यांचे श्लोक केवळ सिद्धान्त सांगणारे आहेत, त्याला कोणतीही प्रस्तावना नाही वा उपसंहार नाही, त्याचप्रमाणे त्यात रविदत्त या नावाची कोणी व्यक्तीही नाही. पण हंसराजांनी आपल्या प्रतिभेतून ती उभी केली आहे. लघुवाक्यवृत्तीवरील त्यांची टीका म्हणजे रविदत्त व शंकराचार्य यांच्यातील म्हणजेच शिष्य व गुरू या दोघांमधील संवाद आहे. रविदत्त प्रश्न विचारतो व आचार्य त्याचे उत्तर देतात एवढेच या संवादाचे स्वरूप नाही, तर आचार्यांचे विवेचन ऐकत असताना रविदत्त काही शंका उपस्थित करतो व आचार्य त्यांचे निराकरण करितात असे वर्णन अनेक स्थळी हसराजांनी केले आहे. पण सदाचारग्रंथावरील हंसराजांच्या टीकेप्रमाणेच केवळ प्रश्नोत्तरे किंवा शंकासमाधान एवढ्यावर हे वर्णन थांबत नाही. नवव्या श्लोकावरील टीकेमध्ये हंसराज असे म्हणतात की, शाखा दाखविताच चंद्र पाहावा, त्याप्रमाणे उपदेशमात्राबरोबर अभेद पावणारे तेच या ब्रह्मज्ञानाचे अधिकारी होत, असा अधिकार आपला आहे का याचा तूच विचार करून पाहा, तू मंदप्रज्ञ दिसतोस, तुझा विचाररूप ज्ञानावर अधिकार नाही, तेव्हा 'तुवां कर्म अथवा उपासनेसी। जाऊन संपादावे ॥' (२६१२), असे बोलून आचार्य स्तब्ध राहिले. त्यावेळी 'रविदत्ता कैसे जाहलें। वज्रचि काय मस्तकीं पडिले। जाहले शतचूर्ण ॥' (२६१३), त्या मूर्छेतून दोन घटकांनी सावध झाल्यावर त्याने गुरुचरणी लोळण घेतली आणि आचार्यांची करुणा भाकली आणि 'मी मरमरून शत जन्म घेईन। परी न सोडीं न सोडीं हे चरण।' (२६४३) असे म्हटले; तेव्हा त्याची ती अनन्य निष्ठा पाहून श्रीगुरू द्रवले आणि शिष्याने अनन्यभावाने गुरूला शरण असणे हाच त्याचा अधिकार आहे असे म्हणून आणि 'अरे शिष्यासी अलभ्य गुरु। तेवींचि गुरूसी अलभ्य लेकरु' (२६४९) असा पुढे उद्‌गार काढून आचार्यांनी पुढील उपदेशास प्रारंभ केला, असे वर्णन हंसराजांनी केले आहे. याच्यापुढील काही विवेचन झाल्यावर आचार्य रविदत्ताला विचारतात, 'तू आतापर्यंत जे श्रवण केलेस त्याचा तुला काय बोध झाला, कोणता अनभव आला?' त्यावर रविदत्ताने तोवर ऐकलेल्या उपदेशाचा

थोडक्यात सारांश सांगितला व आपल्याला वाटत असलेली अडचणही त्याने सांगितली तेव्हा त्या अनुरोधाने आचार्यांनी पुढील श्लोकास प्रारंभ केला ( २६९६–२७७२ ) असे हंसराजांनी दाखविले आहे. अशा प्रकारे रविदत्त व शंकराचार्य या उभयतांमधील संवादावर व क्रिया-प्रतिक्रियांवर हंसराजांनी आपल्या ग्रंथाची उभारणी केली असल्यामुळे हा तत्त्वज्ञानाचा ग्रंथ असूनही त्याला मानवी भावनांचे एक परिमाण लाभले आहे व त्यात एक प्रकारचा जिवंतपणा आला आहे. शंकराचार्यांचे मूळ श्लोक तसे रुक्ष आहेत, पण त्यावरील हंसराजांची टीका गुरू व शिष्य यांच्यातील प्रेमळ संवादामुळे रोचक झाली आहे.

आपण देहस्वरूप आहोत ही बुद्धी सर्वांच्या ठायी जितकी दृढ असते तितकी दृढ बुद्धी आपण ब्रह्मस्वरूप आहोत या विषयी ज्यांची होते ते देह पडताच मुक्त होतात यात संशय नाही, असा वाक्यवृत्तीमधील शेवटच्या श्लोकाचा आशय आहे. त्यावरील आपल्या टीकेमध्ये अखेरीस सिद्धदशा व प्रारब्धक्षय यांचे विवेचन हंसराजांनी केले आहे. त्यानंतर ज्या ज्ञात्या पुरुषाचे जागृती, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थांमध्ये असणारे विश्वाभिमान, तैजस अभिमान व प्राज्ञ अभिमान हे नष्ट झाले तो मुक्तच झाला असे म्हणावयाचे; असे शंकराचार्यांनी रविदत्तास आशीवर्चनपूर्वक सांगून आपला उपदेश संपविला. त्यावर रविदत्ताने त्यांना साष्टांग वंदन घातले, त्यांना वारंवार प्रदक्षिणा घातली, ‘ पुन्हा साष्टांग पुन्हा प्रदक्षिणा । आनंदाश्रु भरले नयना ॥ ’ (५५६९) अशी त्याची अवस्था झाली; असे हंसराजांनी म्हटले आहे. मंद अधिकारी असूनही त्यानंतर चिरकाल अभ्यास करून रविदत्त मुक्त झाला. त्याच्या मार्गाने जो मुमुक्षू जाईल ‘ तो मुक्त होईल निःसंशयपणीं । येथें संदेह नाहीं ॥ ’ (५५८०) असे आश्वासन देऊन आणि वाक्यवृत्तीतील अठरा श्लोकांचे माहात्म्य स्पष्ट करून हंसराजांनी आपली ही टीका संपवली आहे.

असा हा हंसराजांचा लघुवाक्यवृत्तीवरील टीकाग्रंथ आहे. ग्रंथाची भाषा सुबोध आहे. अधूनमधून संस्कृत ग्रंथातील वचनांचे आधार दिले आहेत. जुन्या मराठी संतांच्या ग्रंथांची छायाही जाणवते. परिमित अशा उपमादृष्टान्तांनी ग्रंथाच्या रमणीयतेत भर पडली आहे. हंसराजांची विवेचनपद्धती सुगम व आकर्षक आहे. प्रस्तुत ग्रंथात तत्त्वज्ञानातील कोणकोणत्या प्रश्नांचा ऊहापोह त्यांनी केला आहे व त्याविषयी कोणते सिद्धान्त मांडले आहेत त्यांचा नुसता नामनिर्देश करणेही येथे स्थलाभावी शक्य नाही. वाङ्मयेतिहासात त्याचे तसे प्रयोजनही नाही. हंसराजांनी प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञानाचे सम्यक अवलोकन करणे हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय होऊ शकेल, इतके त्याचे या विषयावरील लेखन महत्त्वाचे आहे. अद्वैताचे प्रतिपादन, कर्म आणि भक्ती यापेक्षा ज्ञानावर असलेला भर आणि गुरूविषयीची परम कोटीची निष्ठा हे त्यांच्या विचारांचे इतरत्र आढळणारे विशेष या ग्रंथातही दिसतात. त्या दृष्टीने हंसराजांच्या सर्वच

ग्रंथामध्ये एक सुसंगती आहे. अध्यात्मिक विषयावर जुन्या मराठीत विपुल लेखन झालेले असले तरी तत्त्वज्ञानातील सिद्धान्तांचे तर्कशुद्ध पद्धतीने विवेचन करणारे आणि त्याच वेळी सुबोध शैलीने नटलेले असे ग्रंथ फार थोडे आढळतात. अशा ग्रंथांत हंसराजांच्या लघुवाक्यवृत्तिटीका या ग्रंथाचा क्रम बराच वरचा लागेल.

## योगवासिष्ठातील चूडालाख्यान

योगवासिष्ठातील चूडालाख्यानावर हंसराजांनी मराठीत रचना केली आहे. ' श्रीयोगवाशिष्ठांतर्गत चूडालाख्यान ' असे त्याचे नाव असून ' हंसराजकृत अभंग, शतकें २२ ' असे त्याचे वर्णन त्याच्यापुढेच कंसात केलेले आहे. ही रचना अभंग-छंदात आहे हे खरे, पण एकूण अभंगसंख्या २२०० नसून एकूण चरणांची संख्या २२०० आहे. प्रत्येकी सहा अक्षरांचे तीन खंड आणि चौथा खंड चार किंवा पाच अक्षरांचा अशी ही रचना आहे. मराठीतील सर्वांना परिचित असलेला अभंग अशा पाच ते आठ चरणांचा असतो. पण हंसराजांनी तशी विभागणी न करता सलग अशी रचना केली आहे. चूडाला नावाच्या राणीने आपला पति जो शिखिध्वज त्याचा केलेला उद्धार हा या कथेचा मुख्य भाग आहे. योगवासिष्ठामध्ये वसिष्ठांनी ही कथा भगवान श्रीरामचंद्राला सांगितली आहे. चूडालेने राजाला केलेला अध्यात्माचा उपदेश, आपल्या पत्नीच्या अध्यात्मिक अधिकाराबद्दल राजाला प्रथम वाटलेला अविश्वास, चूडालेने केलेले त्या अविश्वासाचे निराकरण, राजाच्या ठिकाणी झालेल्या वैराग्याचा उद्‌भव आणि चूडालेस न सांगता त्याने केलेले अरण्यगमन, हटयोगातील सिद्धींच्या साहाय्याने चूडालेने त्याचा केलेला शोध, कुंभक नावाच्या मुनीचे रूप धारण करून तिने राजाला केलेला उपदेश, त्याची तिने नाना प्रकारांनी पाहिलेली परीक्षा आणि अखेर शिखिध्वजाला झालेला पूर्ण आत्मबोध, असा हा सलग कथाभाग हंसराजांनी अभंगछंदात सांगितला आहे. कथा व तिच्या आश्रयाने अध्यात्मविवरण अशी ही रचना आहे. कथेमध्ये काही स्थळी अद्‌भुताचा रंग मिसळलेला आहे. निरनिराळ्या प्रसंगांचे वर्णन आणि अध्यात्मातील सिद्धान्तांचे विवेचन हे दोन्ही भाग सुबोध उतरले आहेत. मात्र ही रचना विशेष महत्त्वाची म्हणवत नाही. विवेचनापेक्षा कथेतील अद्‌भुत प्रसंगच मनावर अधिक ठसा उमटवतात. कथानिवेदन व अध्यात्मविवेचन यांसाठी अभंग या छंदाची केलेली योजना हे या आख्यानाचे एक प्रमुख वैशिष्ट्य म्हणता येईल. रचनेचे स्थल वा काल यांचा काहीही निर्देश मूळ ग्रंथात केलेला नाही, त्याचप्रमाणे स्वतःचा उल्लेखही हंसराजांनी केलेला नाही.

## हंसराजांची कथाकल्पलता

कथाकल्पलता हा हंसराजांचा एक निराळ्या प्रकारचा ग्रंथ आहे. याची अठरा प्रकरणे आहेत आणि एकूण ओवीसंख्या दहा हजार आहे असे म्हटलेले आहे. हा ग्रंथ अद्याप संपूर्ण प्रसिद्ध झाला नसल्याने नेमकेपणाने बोलता येत नाही. परंडा येथे

हंसराजांच्या स्मरणार्थ स्थापन झालेल्या हंसमंडळाने इ. स. १९४६ मध्ये कथाकल्पलतेचा काही भाग प्रसिद्ध केला आहे. त्यामध्ये केवळ आठ प्रकरणे छापलेली आहेत आणि तीही क्रमाने नाहीत. कारण तशी क्रमाने ती उपलब्ध झालेली नव्हती. पहिले प्रकरण उपलब्ध झाले नसल्याने ग्रंथ लिहिण्याचा हेतू किंवा त्याचे निमित्त यासंबंधी अधिकृत असे काही बोलता येत नाही. प्रकरण दोन ते सोळा यामधली अधलीमधली आठ प्रकरणे छापली गेली आहेत. एकेक प्रकरण म्हणजे एकेक आख्यान आहे. प्रत्येक प्रकरणाचे पूर्व प्रकरण व उत्तरप्रकरण असे दोन भाग आहेत. पूर्व प्रकरणात कथा व उत्तरप्रकरणात तिचा रूपकात्मक उलगडा असे सर्व प्रकरणांचे स्वरूप आहे. शिवराम आख्यान, गारूड आख्यान, बुचबंगाली आख्यान, अशी प्रकरणांची नावे आहेत. त्याशिवाय प्रकरणातील प्रतिपाद्य सिद्धान्तानुसार 'निष्काम उपासनाप्रकार' किंवा 'शुद्धाशुद्ध कल्पना प्रकार' अशी नांवे कंसात दिलेली आहेत. शके १७६२ (सन १८४०) मध्ये परंडा येथे केशवराजाच्या देवालयात हंसराजांचा मुक्काम असताना श्रीमती मनाबाई रजपूत या नावाच्या स्त्रीने त्यांची निष्ठेने सेवा केली. या मनाबाई केवळ निरक्षर होत्या. हंसराजांनीच त्यांना लिहिणे-वाचणे शिकविले आणि त्यानंतर त्यांना अध्यात्मविषयाची माहिती व्हावी या हेतूने काही कथा लिहून दिल्या, त्या मनाबाईंनी उतरून घेतल्या आहेत. आणि अशा प्रकारे या ग्रंथाचा जन्म झाला, असे कथाकल्पकतेच्या प्रस्तावनाकारांनी म्हटले आहे. वेदान्तविषयाचा व्यासंग ज्यांना घडलेला नाही त्यांना सोप्या भाषेत कथांच्या आश्रयाने वेदान्त समजावून सांगावा असा ग्रंथाचा उद्देश दिसतो. दुसऱ्या प्रकरणामध्ये पूर्व प्रकरणाच्या अखेरीस,

"इति श्रीकथाकल्पलता । रूपके वर्णिली कथा ।
धनलाभ आख्यान तत्त्वतां । द्वितीय प्रकरणीं कथियेलें।" २.१.३९८

अशी ओवी हंसराजांनी घातली आहे आणि तीमध्ये या कथा रूपकात्मक आहेत असा स्पष्ट निर्देश आहे. प्रकरणाच्या नावाचा तेवढा उल्लेख बदलून अशीच ओवी सर्व प्रकरणांमध्ये पूर्वप्रकरणाच्या अखेरीस आणि थोड्याशा शब्दभेदाने उत्तर प्रकरणांच्या शेवटी आली आहे.

या ग्रंथात सांगितलेल्या बहुतेक सर्व कथा काल्पनिक दिसतात, पुराणांतून किंवा अन्य कोणत्या ग्रंथातून घेतलेल्या दिसत नाहीत. ही सारी हंसराजांचीच निर्मिती असेल तर विवेचनपर ग्रंथांबरोबरच कथात्मक वाङ्मय लिहिण्याची प्रतिभाही त्यांच्या ठायी होती असे म्हणता येते. ग्रंथाची भाषा अगदी सोपी व घरगुती अशी आहे. त्यामुळे विषय समजण्याच्या दृष्टीने अतिशय अनुकूल आहे. त्यावरून मनाबाईसारख्या निरक्षर स्त्रीला वेदान्तविषय समजावून देण्यासाठी या ग्रंथाची रचना झाली आहे ही आख्यायिका पटण्यासारखी आहे.

**कथाकल्पलतेमधील अध्यात्मिक रूपक-कथा**

कथाकल्पलतेच्या छापलेल्या प्रतीच्या पहिल्या प्रकरणात म्हणजे मूळ ग्रंथाच्या

दुसऱ्या प्रकरणात शिवराम आख्यान सांगितलेले आहे. पूर्वप्रकरणास ' चुकलेल्या धनाची प्राप्ती ' व उत्तरप्रकरणास ' अन्वयव्यतिरेक ' अशी नावे कंसात दिलेली आहेत. पूर्व प्रकरणात शिवरामाची सरळ कथा सांगितलेली आहे, तर तीमधील अध्यात्मिक रूपक उत्तरप्रकरणात स्पष्ट केले आहे. कथेमध्ये असलेल्या निरनिराळ्या व्यक्ती व त्यांच्यावर येणारे प्रसंग ही सारी रूपकेच आहेत. त्यातील शिवरामशेट म्हणजे ईश्वर, रमा म्हणजे माया, तीन गुमास्ते म्हणजे त्रिगुण, देशोदेशीची दुकाने म्हणजे निरनिराळे जीव, शिवराम शेटाचे गुप्त धन म्हणजे ईश्वराच्या ठायी असणारी ब्रह्मविद्या, त्याचा पुत्र जीवनराम म्हणजे जीव, तो बापाचे गुप्त धन जाणीत नाही म्हणजे आपण तत्त्वत: ब्रह्मस्वरूप आहोत हे त्याला माहीत नाही, माया तीच विद्या म्हणून रमा ही विद्या, तर जीवाची अविद्या ती गमाई ती सारी सुखदु:खे निर्माण करते; असे हे रूपक हंसराजांनी उत्तरप्रकरणात स्पष्ट केले. हे रूपक त्यांनी यापुढेही अगदी बारिकसारिक तपशिलापर्यंत नेऊन भिडविले आहे. स्थूलदेह, सूक्ष्मदेह, पुनर्जन्म, प्रत्येक जन्मात होणारी नव्या देहाची प्राप्ती, सद्‌गुरूची भेट, जीवाला प्राप्त होणारे आत्मज्ञान, साधनांचा अभ्यास व अखेरचा अद्वैतसाक्षात्कार येथवर हे रूपक पोचले आहे. अद्वैतसाक्षात्काराचे वर्णन करिताना—

" तया अनिर्वाच्य सदनीं । सुवर्णरूप ब्रह्म चिद्‌घनीं ।
एकाएकी जाली मिळणी । प्रतिबिंबा बिंबीं ॥
सुवर्ण कढया सुवर्ण पात्रें । सुवर्ण सांखळ्या स्तंभादि विचित्रें ।
हे रूपकास्तव नाममात्रें । परि ते अद्वय ॥
तया सदनासी नाहीं अंत । यास्तव नामें तो अनंत ।
तेथें जीव ठेलासे निवांत । अभिन्नपणे ॥ " २.२. १४१–४३

असे हंसराजांनी म्हटले आहे. हे सारे एका सद्‌गुरूच्या कृपेने घडते म्हणून सद्‌गुरूचे महत्त्व काहीशा विस्ताराने अखेरच्या भागात स्पष्ट केले आहे. जीवाची व ईश्वराची भेट होते तेव्हा ' बाप-लेकरा जाली भेटी, ' त्यामुळे सर्वत्र आनंद झाला आणि ' ईश्वर धावून चरणीं मिठी । घाली श्रीगुरूच्या ॥ ' ( २.२. १६९ ) इतके सद्‌गुरूचे स्थान हंसराजांनी मोठे मानिले आहे. हा सद्‌गुरु कसा निर्माण झाला, तर ज्या क्षणी जग उत्पन्न होऊन जीवाला अविद्येचा संग प्राप्त झाला, त्या वेळीच याची सुटका कशी होणार या विचाराने ' मुळीं स्फूर्ति ' निर्माण झाली, ' तेव्हां निर्विकारचि अविनाशी । गुरुरूपें प्रगटलें ॥ '(२.२.५४), असे हंसराजांनी म्हटले आहे. आपल्या ग्रंथांमध्ये सर्वत्र हंसराज सद्‌गुरूचे जे महत्त्व वर्णन करतात त्याच्याशी हे सुसंगतच आहे. गुरूच्या कृपेने जीवाची ईश्वराशी अभिन्नत्वाने भेटी झाल्यावर हे शिवराम–आख्यान संपले आहे.

वर्णाभास, गारूड, अभयरूप निजतृप्ति इत्यादी पुढे आलेली आख्यानेही याच स्वरूपाची आहेत. चौथ्या प्रकरणामध्ये अरण्यात तप करणाऱ्या पुरुषाची कथा

आहे. आत्मसाक्षात्कारासाठी करावा लागणारा अभ्यास, त्या अभ्यासातील बुद्धीचे स्थान, साधकाला येणारे निरनिराळे अनुभव आणि अखेर त्याची ब्रह्माशी होणारी एकरूपता यावर हे रूपक केलेले आहे. आठव्या प्रकरणातील स्वप्नावस्था ही कथा एका राजाला स्वप्न पडते, त्याविषयीची आहे. तो राजा म्हणजे कूटस्थ आत्मा आणि ते स्वप्न म्हणजे त्या आत्म्याला जीवदशेत भासमान होणारे भोग असे हे रूपक आहे. बारावे प्रकरण गारुड आख्यान म्हणून आहे. याच्या पूर्वप्रकरणाचा एक विशेष असा आहे की, त्यातील गारुडी स्त्रीच्या खेळाचे वर्णन गद्यात केले आहे. ती गारुडी स्त्री व तिचा सहकारी हंडीबाग या दोघांच्या संवादातून हे वर्णन आले आहे. या वर्णनाचा आणखी एक महत्त्वाचा विशेष असा की, हा सारा संवाद हिंदीमध्ये आहे. हंसराजाचे वास्तव्य त्या वेळच्या हैदराबाद संस्थानात होते व तेथे निजामाची राजवट होती, त्यामुळे हिंदी भाषा अवगत करून घेण्याची संधी त्यांना मिळाली असावी. हिंदी भाषेतील हा संवाद हंसराजांनी सफाईने लिहिलेला आहे. त्यांचे हे भाषाप्रभुत्व डोळ्यात भरणारे आहे. गारुडी स्त्री व तिचा साथीदार यांचा संवाद हिंदीमध्ये दिला पाहिजे असे हंसराजांना वाटले, यावरून अशा प्रकारचे खेळ करणारे मुसलमान गारुडी त्यांनी पाहिले असावेत असा तर्क करावासा वाटतो. हा संवाद हिंदीमध्ये लिहून आपल्या लेखनात वास्तवतेचा भास उत्पन्न करण्याचा त्यांचा प्रयत्न असेल तर तोही कौतुकास्पद म्हणावयास हवा. गारुडी स्त्री व हंडीबाग या दोघांतील येथील संवादाचे पाच भाग आहेत. ते सारेच गद्यामध्ये आहेत आणि ते सोडून पूर्व प्रकरणाचा आरंभीचा व अखेरचा भाग ओवीबद्ध आहे. "या जगद्भ्रमाचा जो भास। तो गारुडापरी दिसे विलास।"... (१२. २. ३) असे त्यांनी या रूपकाचे स्पष्टीकरण उत्तर प्रकरणात केले आहे. हे जगद्भ्रमाचे रूपक त्यांनी पुढे असेच अनेक तपशिलांच्या द्वारा स्पष्ट केले आहे.

साम्राज्य-पावन-आख्यान हे तेरावे प्रकरण होय. त्यामध्ये निष्काम उपासनेचे प्रकार एका कथेवरील रूपकाने सांगितले आहेत. चौदाव्या प्रकरणातील अभयरूप आख्यानाचा विषय पिपीलिकादि पंच मार्ग प्रकार, तर सोळाव्या प्रकरणातील बुच-बंगाली आख्यानाचा विषय शुद्धाशुद्ध कल्पना व चत्वार देव हा आहे.

चत्वार देवाची कल्पना त्यांनी दासबोधात समर्थांनी मांडलेल्या चत्वार देवांवरून घेतली आहे हे स्पष्ट आहे. याच्या आधीचे पंधरावे प्रकरण निजतृप्ति आख्यान या नावाचे असून त्यामध्ये चौदा ब्रह्मांचा प्रकार वर्णिला आहे. ही चौदा ब्रह्मांची कल्पनाही हंसराजांनी दासबोधातून उचलली आहे. यांपैकी तेरा ब्रह्मांचे महत्त्व निरनिराळ्या साधकांच्या अधिकारानुरूप स्पष्ट केले असून, तत्त्वतः पाहता अंती ती सारी मिथ्या आहेत आणि —

"जे नाहीं-आहे वीण। कीं टाकणें घेण्यावांचून।
मौनेंचि पावावे समाधान।" ... १५–२–५६.

असे अनिर्वाच्य ब्रह्म काय ते सत्यत्वाने आहे, असा सिद्धान्त हंसराजांनी केला आहे.

कथाकल्पलतेचा छापून प्रसिद्ध झालेला भाग हा एवढाच आहे. प्रत्येक प्रकरणातील आख्यान हे तसे स्वतंत्र असल्यामुळेच हा ग्रंथ अपूर्ण असूनही त्याचा एवढा परिचय करून देता आला. यातील निरनिराळ्या प्रकरणांतून विशद केलेले अध्यात्मातील सिद्धान्त अखेर सर्वत्र तेच आहेत. पण ते स्पष्ट करण्यासाठी सांगितलेल्या आख्यानांतील कथा, त्यातील व्यक्ती, प्रसंग आणि त्यावर केलेली रूपके मात्र निरनिराळी आहेत. या सर्व आख्यानांमधून आलेली पात्रे नाना वर्णांची व नाना धंद्यांतील आहेत. त्यात राजे आहेत, राण्या आहेत, मांडलिक व बंदीजन आहेत, इतर सेवक आहेत, ब्राह्मण व तपस्वी आहेत; व्यापारी, गुमास्ते, कुंभार व गारुडी आहेत, त्याचप्रमाणे ब्राह्मणी, क्षत्रिणी व वेश्याही आहेत. यात तपश्चर्येचे वर्णन आहे तसेच शृंगारभोगाचेही आहे. पण सर्व ठिकाणी हंसराजांनी एका तटस्थपणाने सारा विषय हाताळला आहे. हरएक प्रसंगाच्या मागे एखादी अध्यात्मिक प्रक्रिया उभी असल्याने कोठेही वर्णनाची पातळी सदभिरुचीच्या मर्यादेचा अतिक्रम करीत नाही. एकच विषय श्रोत्यांच्या मनावर बिंबविण्यासाठी हंसराजांनी हा अनेक रूपकांचा आश्रय केला आहे. केवळ तात्त्विक विवेचन समजून घेणे ज्यांना कठीण जाते त्यांच्यासाठी हा एक सुलभ मार्ग त्यांनी काढला आहे आणि तो त्यांनी यशस्वीपणे हाताळला आहे. संपूर्ण ग्रंथ अद्याप उपलब्ध झाला नसल्याने एकंदर ग्रंथाच्या स्वरूपाबद्दल निर्णायक असे काही सध्या बोलता येत नाही. अशा प्रकारची रचना मराठीमध्ये अन्य कोणा संताने केलेली दिसत नाही. एकनाथांनी अध्यात्मिक विषयावर काही रूपके लिहिली आहेत, पण ती स्फुट स्वरूपाची व विस्ताराने अगदी लहान लहान अशी आहेत. अद्वैततत्त्वज्ञानामधील एकंदर प्रक्रिया अशी सविस्तर रूपकांच्या द्वारा स्पष्ट करण्याचा हा प्रयत्न मराठी संतसाहित्यामध्ये आपल्या वेगळेपणाने उठून दिसणारा आहे. पूर्वप्रकरणांतील कथानिवेदनाचा ओघ सर्वत्र अगदी सहजपणे चाललेला दिसतो, तर उत्तरप्रकरणांतील सिद्धान्तविवेचन अगदी सोप्या भाषेत केलेले आहे असे आढळते. पूर्वपक्ष, उत्तरपक्ष, प्राचीन ग्रंथातील वचनांचे आधार, क्लिष्ट तात्त्विक प्रतिपादन असा भाग येथे आढळत नाही. लौकिकातील कथा व अध्यात्मातील सिद्धान्त यांचे सरस असे मिश्रण करण्याची हंसराजांची हातोटी केवळ कौतुकास्पद आहे. मराठी संतसाहित्यात ही एक अगदी वेगळ्या प्रकारची रचना आहे असे म्हणावेसे वाटते.

## अनुभवामृताचा अनुवाद

ज्ञानेश्वरांच्या अनुभवामृतावर हंसराजांनी एक समओवी टीका लिहिली आहे. एकेका ओवीवर एकेक ओवी आहे. दहाव्या अध्यायातील एकतिसाव्या ओवीवर हंसराजांची ओवी आढळत नाही. त्यांनी अनुवादाकरिता घेतलेल्या अनुभवामृताच्या पोथीमध्ये ती ओवी नसावी. प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी त्या अध्यायात कोणता विषय

आला आहे हे सांगणारी एक ओवी हंसराजांनी लिहिली आहे. मात्र पहिल्या अध्यायाच्या प्रारंभी ओवी अशी आढळत नाही. पण दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभी हंसराजांच्या दोन ओव्या आहेत. म्हणजे या ग्रंथात हंसराजांच्या स्वतंत्र अशा केवळ दहा ओव्या आहेत. बाकी सारा ग्रंथ म्हणजे ओवीला ओवी असा सरळ अनुवाद आहे. अनुभवामृतातील तत्त्वज्ञान आधीच समजण्यास कठीण व त्यातील जुन्या मराठीमुळे ते आणखी कठीण होते. या अनुवादातील हंसराजांची मराठी भाषा त्यांच्या इतर ग्रंथांतील भाषेप्रमाणेच सुबोध व अर्थवाही आहे, त्यामुळे अनुभवामृताचा आशय समजून घेण्याच्या दृष्टीने त्यांचा हा अनुवाद निःसंशय उपयुक्त आहे.

**श्रीसंकेतकुबडी**

श्रीसंकेतकुबडी हा हंसराजांनी लिहिलेला एक छोटेखानी ग्रंथ आहे. याची रचना शके १७६१ ( सन १८३९ ) विकारी नाम संवत्सर, ज्येष्ठ शुद्ध द्वादशी या दिवशी पूर्ण झाली, असा निर्देश ग्रंथाच्या अखेरीस केला आहे ( २०.४४ ). समर्थ रामदासांच्या दासबोधातील एकंदर विवेचन थोडक्यात सुसंगतपणे सांगणे हा या ग्रंथाचा हेतू आहे,—

“ इति श्रीसंकेतकुबडी । दासबोधीचे सार निवडी ।
वांकुडी परी आवडी । श्रीरामदासा ॥ ”

अशी ओवी पहिल्या दशकाच्या अखेरीस हंसराजांनी लिहिलेली आहे व तीमध्ये ग्रंथाच्या विषयाचा उल्लेख त्यांनी केला आहे. प्रत्येक दशकाच्या अखेरीस ही ओवी आली आहे, पण सर्व ठिकाणी ती पुरी लिहिलेली नाही असे दिसून येते. हस्तलिखित प्रती करून घेणाऱ्यांनी ती तशी अपुरी लिहिली असावी. दासबोधाच्या एकेक दशकाचा विषय ग्रंथाच्या एकेक प्रकरणात दिलेला आहे, म्हणून या प्रकरणातही दशक पहिला, दशक दुसरा अशी नावे दिलेली आहेत. दासबोधातील एकेका दशकाचा विषय हंसराजांनी साधारणपणे वीस ते तीस ओव्यांत सांगितला आहे. सातवा दशक हा ‘ निःसंदेह ज्ञानाचा अर्क । ७.५४ ’ आहे, तर आठवा ज्ञानदशक आहे. त्यामुळे त्या दशकांवरील ओव्या सर्वांत अधिक म्हणजे अनुक्रमे चोपन्न व अठ्ठावन्न आहेत. सर्वांत कमी ओव्या अठराव्या दशकावर असून त्या केवळ तेरा आहेत. ग्रंथाची एकूण ओवीसंख्या ६४८ आहे.

ग्रंथाच्या प्रारंभी ‘ अथ श्रीमद्दासबोधींची संकेतसूचना प्रारंभ ॥ ’ असे हंसराजांनी म्हटले आहे. संकेत म्हणजे खूण, दासबोधातील प्रतिपाद्य विषयाचे मर्म किंवा रहस्य अशा अर्थाने हा शब्द योजिलेला आहे. कुबडी ही समर्थसांप्रदायिकांच्या वापरात आढळते म्हणून तो शब्द घातला असावा. पांगळ्या माणसाला चालण्यासाठी कुबडीचा उपयोग होतो, त्याप्रमाणे अज्ञजनांना या कुबडीचा आधार घेऊन दासबोधाच्या अंतरंगात प्रवेश करता येईल अशी ग्रंथकर्त्यांची धारणा आहे.

“ उतरावया चंचळ सागर । दासबोध जहाज थोर ।
साधक पावती पैलपार । कुबडी तेथें होडगें ॥ ” २०. ४३.

असे आपल्या या ग्रंथाचे वर्णन अखेरीस हंसराजांनी केले आहे तर “ ग्रंथींचे तात्पर्य सकळ । अल्प संकेते आकळू ॥ ” (१.५) असे उद्‌गार ग्रंथाच्या प्रारंभी काढलेले आहेत. दासबोधात समुच्चयवाद सांगितला आहे असे कोणी म्हणतात तर कोणाच्या मते या ग्रंथात व्यवहारज्ञान सांगितले आहे; कर्म, ज्ञान व उपासना या तीन कांडांचे विवेचन येथे आले आहे असे आणखी कोणी म्हणतात. पण हे सारे म्हणणे व्यर्थ आहे, हा अपरोक्षज्ञानाचा ग्रंथ आहे—

“ असो आतां बहुते । जयासी साधणे आत्महित ।
तेणें दासबोधीचा निश्चितार्थ । गुरुमुखें आकळावा ॥
येथें अज्ञानाची बोळवण । ज्ञानाचें होते विज्ञान ।
आणि अनिर्वाच्य समाधान । हे फलश्रुती ये ग्रंथीं ॥ ” १. ८. ९.

असे आपले मत हंसराजांनी संकेतकुबडीच्या आरंभीच स्पष्ट केले आहे. ग्रंथाचे वीस दशक व दोनशे समास असले तरी त्या सर्वांत विषय एकच आहे व तो म्हणजे अनिर्वाच्य अपरोक्षज्ञान हा होय.

हंसराजांच्या मते दासबोधाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. एक ते आठ दशक हा पूर्वार्ध, तर नऊ ते वीस दशक हा उत्तरार्ध होय. पूर्वार्धात व्यतिरेक पद्धतीने तर उत्तरार्धात अन्वय पद्धतीने अध्यात्म सांगितलेले आहे, असे हंसराजांचे आणखी म्हणणे आहे. ग्रंथाचा विस्तार विशेष केला नसल्याने त्यांनी आपल्या या म्हणण्याचे सविस्तर विवेचन केलेले दिसत नाही. पूर्वार्धाच्या पहिल्या दोन दशकांत नित्यानित्यविवेक असून त्याच्या पुढच्या तीन दशकांत अनुक्रमे वैराग्य, शमादि संपत्ती व मुमुक्षुत्व यांचे निरूपण आहे. अशा मुमुक्षूला देवशोधन होऊन म्हणजे परमेश्वराचा साक्षात्कार होऊन समाधान मिळावे म्हणून सहावा व सातवा दशक सांगितला असून, आठवा दशक हा ज्ञानदशक आहे. दासबोधाच्या ४.४ या समासांमध्ये संगत्याग, निवेदन, विदेहस्थिती, अलिप्तपण, सहजस्थिती, उन्मनी व विज्ञान हे समाधानाचे सात संकेत सांगितले आहेत व त्यांचेच विस्ताराने विवेचन नऊ ते पंधरा या सात दशकांमध्ये केलेले आहे, असा हंसराजांचा अभिप्राय आहे. सोळा ते एकोणीस या चार दशकांमध्ये उपासना, वासनाक्षय, मनोजय व शोकनिरसन हे विषय आहेत, तर विसावा दशक हा निरतिशयानंदाची खाण आहे, असे त्यांनी म्हटले आहे.

अशा प्रकारे दासबोधामध्ये आलेल्या एकंदर विषयांची एक सुसूत्र अशी संगती लावून दाखविण्याचा प्रयत्न या ग्रंथात हंसराजांनी केला आहे. वर वर पाहता दासबोधात अनेक विषय आलेले आढळतात आणि कितीएक स्थळी मागीलपुढील समासांची वा दशकांची संगती लागत नाही असे वाटते. पण हंसराजांना हे सारे

विवेचन आरंभापासून अखेरपर्यंत सुसंगत, क्रमबद्ध व एकरूप आहे असे वाटते. गीतेच्या अठरा अध्यायांत नाना विषय आले आहेत व ते तशा क्रमाने का आले आहेत हे सामान्य जिज्ञासूच्या ध्यानात येत नाही, म्हणून गीतारहस्यामध्ये त्या अठरा अध्यायांतील विवेचनाची संगती लोकमान्य टिळकांनी लावून दाखवली आहे आणि गीतेतील ते ते विषय त्या त्या स्थळी का आले आहेत त्याचे स्पष्टीकरण केले आहे. तशाच प्रकारचा हा हंसराजांचा प्रयत्न आहे. दासबोधाची रचना एकाच वेळी झाली नसावी, तो जसा उपलब्ध आहे तसा त्या क्रमाने लिहिला गेला नसावा, अनेक समास निरनिराळ्या वेळी लिहिले गेले असावेत आणि नंतर ते सारे एकत्र केले असावेत, असा अधुनिकांचा तर्क आहे. पण अशा प्रकारच्या तर्कांची अपेक्षा आपण हंसराजाकडून करू शकत नाही, किंबहुना त्यांना तशा प्रकारची काही शंकाही आलेली नाही. त्यांच्या दृष्टीने दासबोधातील सारे विवेचन एका विशिष्ट हेतूने व सुसंगतपणे आलेले आहे व ते कसे आले आहे ते त्यांनी प्रस्तुत ग्रंथात सांगितले आहे. एखाद्या मोठ्या विषयावरील विस्तृत प्रबंधाचा सारांश थोडक्यात कोणीतरी द्यावा, त्याप्रमाणे दासबोधाचा हा सारांश हंसराजांनी दिला आहे.

हा सारांश देताना तो बऱ्याच स्थळी समर्थांच्या मूळ शब्दांत द्यावा हे सयुक्तिकच आहे. समर्थांची विशिष्ट परिभाषा हंसराजांनी चांगली आत्मसात केली आहे. चंचळ ब्रह्म, निश्चळ ब्रह्म, विमळ ब्रह्म किंवा अंतरात्मा, निवेदनभक्ती अशा समर्थांच्या विशिष्ट संज्ञा ते वापरतातच; पण त्या योजताना समर्थांना अभिप्रेत असलेले त्यांचे अर्थ हंसराजांना यथार्थपणे आकलन झालेले आहेत हे आपल्याला जाणवते. अंतरात्मा किंवा चंचळ किंवा आत्मनिवेदनभक्ती यांविषयीचे सामर्थांचे विचार अगदी थोडक्यात पण समर्पकपणे हंसराजांनी व्यक्त केले आहेत.

" भक्ताचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।
समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ "
" ग्रंथा नाम दासबोध ॥ "
" ऐसी कीर्ती करून जावे । तरीच जन्मालागि यावे ॥ "
" प्रत्यय बोलोन करी समाधान । कोठें अटक ठेवीना ॥ "

अशी समर्थांच्या वचनांचे स्मरण करून देणारी रचना या ग्रंथात एकसारखी येते व तीवरून हंसराजांचा दासबोधाचा व्यासंग ध्यानात येतो. त्यांनी केलेली मांडणी अर्थात सर्वांना मान्य होईलच असे नाही. दासबोधाची त्यांनी केलेली पूर्वार्ध-उत्तरार्ध ही विभागणी विवाद्य होऊ शकेल. दशक नऊ ते पंधरा यांमध्ये दासबोधाच्या चौथ्या दशकातील सात संकेत सविस्तर स्पष्ट केलेले आहेत हे म्हणणे पटण्यासारखे नाही. पूर्वार्धात व्यतिरेक तर उत्तरार्धात अन्वय हा भागही मान्य होईल असे नाही. ग्रंथाचा विस्तार अगदी मर्यादित असल्याने हंसराजांनीही या मुद्द्यांचे सविस्तर समर्थन केलेले नाही. दासबोधामध्ये कोणकोणते विषय कसकसे आले आहेत ते थोडक्यात सांगावे व

त्यांमध्ये एक आंतर-संगती कशी लावता येते हे जाता जाता दाखवावे, एवढाच त्याचा हेतू आहे. हे मर्यादित कार्य त्यांनी प्रासादिक शैलीने आणि समर्थांच्या मूळ विवेचनाचा व भाषेचा प्रत्यय येईल अशा रीतीने पार पाडले आहे असे म्हणता येते.

### हंसराजांचा आगमसार

आगमसार हा हंसराजांचा स्वतंत्र वेदान्तपर ग्रंथ आहे. पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे याचे दोन भाग आहेत. या प्रत्येकाचे पुनः सात पोटविभाग केले असून त्यांना पंचिका असे नाव दिले आहे. प्रत्येक पंचिकेमध्ये पाच समास आहेत, म्हणजे ग्रंथामध्ये एकूण सत्तर समास आहेत. एकेका समासात वेदान्तातील एकेक विषय घेऊन त्याचे विवेचन केले आहे. ग्रंथ ओवीबद्ध असून एकूण ओवीसंख्या ३५२६ आहे. पूर्वार्धाच्या २०८३ व उत्तरार्धाच्या १४४३ ओव्या आहेत, म्हणजे पूर्वार्धाच्या मानाने उत्तरार्ध काहीसा लहान आहे. पंचिकांना त्यांतील प्रमुख विषयांना अनुसरून ज्ञानप्रतिष्ठा, ब्रह्ममायाजीवेशस्वरूप, समष्टिव्यष्टिनिरूपण अशी नावे दिलेली आहेत. समासांतील प्रतिपाद्यविषयांना अनुसरून त्यांनाही निदिध्यासपंचदशांगप्रकार, विविदिषासंन्यास-प्रकार, कर्मकरणानुकार अशी स्वतंत्र नावे दिली आहेत. प्रत्येक समासाच्या अखेरीस —

> " इति श्रीमदागमसारे । उपनिषत्तात्पर्यानुसारे ।
> मंगलाचरणानुकारे । प्रथम समासः ॥

अशी समाप्तिदर्शक संस्कृत ओवी आहे.

या सर्वांवर असलेली संस्कृतची गाढ छाया स्पष्ट आहे. हंसराजांचा संस्कृत-मधील मूळ वेदान्तग्रंथांचा व्यासंग फार मोठा आहे हे या ग्रंथात त्यांनी अनेक अध्यात्म-सिद्धान्तांचे जे सारख्याच समर्थपणाने विवेचन केलेले आहे, त्यावरून ध्यानात येते. उपनिषदे किंवा गीता यांतील विवेचनाचे संदर्भ त्यांच्या प्रतिपादनात अगदी सहजपणे येऊन जातात. पण ग्रंथाच्या एकंदर विषयावर व त्याच्या विवेचनावर अशी संस्कृतची छाया असली तरी हंसराजांनी मराठीचा पुरस्कार स्पष्टपणे केला असून, संस्कृतमधील वेदांतविषयाचे प्राकृतातून केलेले विवेचन त्याज्य मानू नये असे त्यांनी म्हटले आहे. रामकृष्णादी अवतार मनुष्यरूपाने भूमीवर अवतीर्ण झाले म्हणून ते सर्वसामान्य जनांना गोचर झाले, त्याचप्रमाणे संस्कृतमधील वेदान्ताचे प्राकृतमधून केलेले विवेचन सर्वांना सुलभ होते. वैकुंठातील रामकृष्णांचे स्वरूप मानवांना गूढ राहाते तसेच संस्कृतमधील ज्ञान सामान्यांना गुह्य राहते. रामकृष्ण हे अवताररूप धारण करून आले म्हणून त्यांचे देवत्व नष्ट झाले असे कोणी मानीत नाही, —

> " अवतार होतां देवत्व गेलें। ऐसें नाहीं ऐकिलें।
> पतितपावन हें नाम जालें। तिहीं लोकीं ॥
> तैसेंचि प्राकृतींच्या अर्थे। बहुत पावली परमार्थ पंथें।
> न्यूनाधिक कोणी येथें। मानुंचि नये ॥ " १४.४, ११.१२.

असे हंसराजांनी मराठीचा कैवार घेऊन म्हटले आहे. त्यांची ही व्यापकदृष्टी केवळ मराठी भाषेच्या पुरस्कारापुरती मर्यादित राहिलेली नाही. हा परमार्थविषय सर्वांना मोकळा आहे, अनधीत व स्त्रीशूद्र यांनाही येथे अधिकार आहे, फक्त वैराग्ययुक्त बुद्धी व श्रवणमननात गोडी हवी; अशी मोठी उदार दृष्टी त्यांनी याच्या पुढच्याच ओव्यांत व्यक्त केली आहे. 'स्त्रीशूद्रही शिवासमान', 'अन्य याती ब्रह्मज्ञानी। तेही पूर्वपुण्याची करणी।' असे त्यांचे उद्गार आहेत. ( १४.४, १५.१९ ).

पूर्वीच्या अनेक आचार्यांनी हा वेदान्तविषय स्पष्ट केला असताना या नव्या ग्रंथाचे प्रयोजन काय? असा प्रश्न श्रोता करतो. त्याचे उत्तर देताना हंसराज विचारतात की, घरोघरी श्रीमंत गृहस्थ अन्नसंतर्पण करीत असले तरी एखाद्या दरिद्री मनुष्याला धनाचा ठेवा सापडल्यावर त्याने संतर्पण केले तर ते अन्न कोणी भक्षण करीत नाही काय? त्या गरीब मनुष्याने असे अन्नसंतर्पण न केले तर समस्तांना उपवास पडेल असे नाही, पण तो स्वतःच्या श्रेयासाठी संतर्पण करतो. आपला हा ग्रंथरचनेचा उद्योग त्याच प्रकारचा आहे.

असे आपल्या ग्रंथलेखनाचे निमित्त हंसराजांनी सांगितले आहे. स्वत:कडे दरिद्री पुरुषाची भूमिका घ्यावी हा हंसराजांचा केवळ विनय आहे. एकूण ग्रंथकर्तृत्वा-बद्दलही त्यांनी अशीच विनीत वृत्ती धारण केली आहे. आपल्या ग्रंथांचा प्रारंभ त्यांनी पहिल्या मंगलाचरणपर समासात सद्‌गुरूला परब्रह्मभावाने वंदन करून केला आहे, तर ग्रंथाच्या शेवटच्या समासात हे सारे ग्रंथकर्तृत्व आपले नसून ते आपल्या गुरूचे आहे असे त्यांनी म्हटले आहे.

अखेर ही आपली कृती संतसज्जनांच्या साक्षीने त्यांनी सद्‌गुरुचरणी अर्पण केली आहे. ग्रंथाच्या रचनाकालाबद्दल स्वतः हंसराजांनी कोणताही उल्लेख केलेला नाही. पण कथाकल्पलतेच्या प्रस्तावनेमध्ये डोमगावच्या शके १७६१ ( सन १८३९ ) च्या मुक्कामात या ग्रंथाची रचना झाली असे संपादकांनी म्हटलेले आहे.

**आगमसाराचे स्वरूप**

उपनिषदांतील तात्पर्यानुसार आगम म्हणजे अध्यात्मज्ञान स्पष्ट करून सांगणे हा या ग्रंथाचा विषय आहे. हे अध्यात्म अद्वैतसिद्धान्तास अनुसरून आहे. ग्रंथाच्या मंगलाचरणानंतर पहिल्या पंचिकेच्या दुसऱ्या समासात विषयप्रतिपादनास प्रारंभ करिताना हंसराजांनी अनुबंधचतुष्टय म्हणजे ग्रंथाचा विषय, संबंध, प्रयोजन व अधिकारी अशा चार गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. या साधनांचा विचार उत्तरार्धाच्या पहिल्या पंचिकेत केला असून, निदिध्यासाचे अनेक प्रकार, निर्गुणोपासना, अभ्यासयोग, आचार्योपासना आदींचे विवेचन तेथे केले आहे. अद्वैताची सिद्धी कशी होते हे त्यापुढील पंचिकेत सांगितले असून, त्यानंतर जीवन्मुक्ती व विदेहमुक्ती यांच्या लक्षणांना एकेक पंचिका दिली आहे. आत्म्याचे अकर्तृत्व त्याची व सहजस्थिती याचे विवेचन त्यापुढील पंचिकेत करून तिच्या अखेरच्या समासात अभेदभक्तीचे स्वरूप

सांगितले आहे. तेराव्या फलरूप या पंचिकेत अनुभवाच्या पायरीवर पोचलेल्या ज्ञानी पुरुषांचे वर्णन आहे. चौदावी पंचिका ही शेवटची आहे. तीमध्ये संत गुरुपुत्र व यांचा महिमा स्पष्ट केला असून अखेर ग्रंथाचा उपसंहार केला आहे. ग्रंथाच्या पूर्वार्धातील सारे विषय एका अद्वैतसिद्धान्ताला धरून आलेले आहेत. एकीकडे ब्रह्म, माया, ईश्वर व जीव यांचे स्वरूप आणि दुसरीकडे तत्, त्वम् व असि या पदांचे अद्वैतपूर्वक विवरण या दोहोंचा एकमेकांशी उत्तम मिलाफ होत असल्याने पूर्वार्धातील विवेचनात एकरूपता व सुसूत्रता आढळते. त्या मानाने उत्तरार्ध काहीसा विस्कळीत वाटतो. पूर्वार्धात स्पष्ट केलेल्या अद्वैतज्ञानाचा प्रत्यक्ष साक्षात्कार कसा साध्य करून घ्यावयाचा याविषयीच्या साधनांची व त्याच्या अनुषंगाने इतर काही गोष्टींची चर्चा उत्तरार्धात आली आहे. त्यामुळे त्यातील काही समास स्फुट स्वरूपाचे वाटतात आणि त्या सर्वांमध्ये तितकी एकात्मता आढळत नाही. तरीदेखील या सर्व समासांमध्ये व त्यांतील विषयप्रतिपादनामध्ये एक सुसंगती राखण्याचा पद्धतशीर प्रयत्न हंसराजांनी केला आहे एवढे मान्य करावयास हवे.

**आगमसाराचे विशेष**

गुरुभक्ती हा हंसराजांचा एक ध्यानात घेण्यासारखा विशेष आहे आणि त्याचा प्रत्यय आपल्याला आगमसारामध्ये सर्वत्र येतो. ग्रंथाच्या प्रारंभी व अखेरीस या प्रखर गुरुभक्तीचा आढळ होतोच, पण आचार्योपासना या नावाने लिहिलेल्या स्वतंत्र समासात हंसराजांची गुरुविषयीची संपूर्ण शरणागतीची व तितकीच जिव्हाळ्याची भावना उत्कटत्वाने व्यक्त झाली आहे. त्यांना प्रिय असा विषय असल्यामुळेच की काय त्या समासाचा विस्तारही १०८ ओव्यांपर्यंत वाढलेला आहे. गुरुसेवा हे साधन सकळ साधनांत वरिष्ठ असून ज्या साधकाला ही आचार्योपास्ती घडते त्याच्या करतळावर मुक्ती असते, 'ब्रह्मानंद घर पुसे। कीं गुरुपुत्र कोठे राहतसे।', ईश्वर अष्टमहासिद्धीसहित त्याच्या हृदयात नांदत असतो, 'ओंकार राहिला द्वारांत। द्वारपाल होऊनी ॥ बहु काय बोलूं वचनीं। लाजून पळाली मायराणी' – असे गुरुभक्ती ज्याला साधली आहे त्या साधकाचे भाग्य हंसराजांनी वर्णन केले आहे (८.५.३–७). गुरू व शिष्य यांच्यातील अद्वैतसंबंधीचेही वर्णन हंसराजांनी केले आहे. ते ज्ञानेश्वरांनी भावार्थदीपिकेत केलेल्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या एकत्वाच्या वर्णनाचे स्मरण करून देणारे आहे. मात्र गाढ गुरुभक्तीचे एवढे दर्शन आगमसारात होत असले तरी हंसराजांनी आपल्या गुरूचा प्रत्यक्ष उल्लेख कोठेही केलेला नाही हे थोडे नवलाचे वाटते. वसमत येथे सरदेशपांडेगिरीच्या हुद्द्यावर असलेले लक्ष्मणपंत दिवाणजी हे हंसराजांचे गुरू होते. समर्थांचे प्रथम शिष्य उद्धवस्वामी यांच्या परंपरेतील श्रीसमर्थांपासून ते सहावे पुरुष होते. साधकावस्थेमध्ये असताना त्यांच्या घरी राहून त्यांची सेवा हंसराजांनी केली होती, असा उल्लेख त्यांच्या चरित्रात आढळतो. गुरुसेवेचे त्यांनी केलेले वर्णन त्यामुळेच एवढे प्रत्ययकारी उतरले असावे.

हंसराज समर्थांच्या परंपरेतील आहेत याच्या खुणा आगमसारात आढळतात. श्रीराम या देवतेचा येतो तितका विठ्ठल किंवा श्रीकृष्ण या देवतांचा उल्लेख या ग्रंथात येत नाही. भक्तीपेक्षा ज्ञानाचे महत्त्व हंसराजांनी अधिक मानले आहे. हा मराठी संतांच्या ग्रंथांतून सर्वत्र आढळणारी विचारप्रणाली ध्यानात घेता एक विशेषच म्हणावयास हवा केवळ भक्तीच्या आनंदातच रमावे व मुक्तीपेक्षाही भक्ती श्रेष्ठ मानावी अशी भक्तीबद्दलची आत्यंतिक प्रीती त्यांनी दाखविलेली नाही त्यांच्या बाबतीत ज्ञानालाच भक्ती हे नाव मिळते व त्यानंतर वेगळे असे काही शिल्लक उरतच नाही. ' त्रिपुटी जेथें विराली । हेच अभेदभक्तीची किल्ली ॥ ' ' अभेद सहजची आहे । अति नवें केले नव्हे ॥ ' असे समजून जो पाहतो तोच अभेदभक्त होय, " करणे पाहणें आटलें । द्वैतभाव विराले ॥ " ते खरे भजन होय, याविरहित जे काही कोणीकोणी म्हणतात ती कर्मभक्ती होय, हे जे सारे अभेदभक्तीचे स्पष्टीकरण या समासात ( १२.५ ) हंसराजांनी केले आहे, ते ज्ञानावर सारा भर देणारे आहे. जीवन्मुक्ती, विदेहमुक्ती, सहज स्थिती किंवा अभेदभक्ती हे सारे केवळ नामभेद होत, एरवी या सर्व अवस्था एकरूप आहेत; असे त्यांनी म्हटले आहे. भक्तीपेक्षा तर्कशुद्ध ज्ञानावर दिलेला हा भर हंसराजांनी समर्थांशी असलेली जवळीक दाखविणारा आहे.

मात्र याचा अर्थ असा नव्हे की आगमसारामध्ये सांगितलेले सारे विचार समर्थांच्या वाङ्मयातून आलेले आहेत. तसे मानण्यास जागा नाही. समर्थांच्या लेखनात न आलेले अनेक विषय येथे आलेले आहेत. किंबहुना समर्थांची एकूण विचारसरणी व हंसराजांचे या ग्रंथातील एकूण प्रतिपादन यामध्ये जाणवण्यासारखा असा काही फरक आहे. पारमार्थिक कल्याणाबरोबरच समाजाच्या ऐहिक जीवनाचाही विचार करण्याचा जो एक भाग समर्थांच्या वाङ्मयात आहे किंवा प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय घालण्याची त्यांची जी एक दृष्टी आहे तिचा लवलेशही हंसराजांच्या लेखनात आढळत नाही. त्यांचे सारे विवेचन निखळ अध्यात्मिक भूमिकेवरून केलेले आहे. लोकसंग्रहार्थ फलाशारहित वृत्तीने ज्ञानी पुरुषांनी कर्म करावे हा कर्मयोगाचा विचारही ते विशेष उचलून धरीत नाहीत, हे या दृष्टीने ध्यानात घेण्यासारखे आहे.

लोकरीतीनुसार जरी काही कर्म ज्ञात्या पुरुषाने केले तरी उदंड कर्मी जेथे असतात तेथे त्यानेही नाक धरावे तसे ते कर्म आहे, " बापें मेळविलीं जैसीं मुले । त्यासह खेळे चक्रादि ॥ " १३.५.२२ तसे ज्ञानी पुरुषाने ते कर्म करणे असते. साधक वा मुमुक्षू यांना ज्ञानी पुरुष कर्मे करण्यास लावीत नाही तर तो त्यांच्याकडून श्रवण, मनन व ब्रह्माभ्यास करवितो; असा ज्ञानी पुरुषांच्या कर्माचरणाविषयीचा हंसराजांचा एकूण अभिप्राय आहे. कर्म आणि उपासना यांहून त्यांनी अखेर ज्ञानच श्रेष्ठ मानिले आहे. वेदातील तीनही कांडांचे पर्यवसान अखेर ज्ञानातच होते असे जे त्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे ( ३. ४. ५१ ) त्याचा आशय हाच आहे.

## आगमसारातील विवेचनशैली

आगमसार या ग्रंथाची रचना श्रोत्याने प्रश्न विचारावा व वक्त्याने त्याचे उत्तर द्यावे अशी प्रश्नोत्तररूप नसली, तरी श्रोत्यांना उद्देशून वक्ता बोलत आहे अशा भूमिकेतून त्यातील सारे विवेचन केलेले आहे. श्रवण करीत असलेल्या श्रोत्यांना विवेचन समजले पाहिजे अशी जाणीव ठेवल्यामुळे त्यात सुलभता आली आहे, त्याचप्रमाणे अशा संवादातून उत्पन्न होणारा विवेचनाचा प्रवाहीपणा वाणीत उमटला आहे, विषय समजला नाही असे वाटले तर श्रोत्याने मध्येच शंका उपस्थित केली आहे व वक्त्याने तिचे लगेच निराकरण केले आहे. एका ओवीत श्रोत्याची शंका, दुसऱ्या ओवीत तिचे उत्तर, पुन्हा पुढच्या ओवीत त्यावरील शंका व त्यापुढे लगेच तिचे उत्तर, अशी पाठोपाठ श्रोत्यावक्त्यांची उत्तरेप्रत्युत्तरेही झडलेली आढळतात. लेखनाच्या या विशिष्ट पद्धतीमुळे मनमोकळ्या संवादात आढळणारा जिवंतपणा प्रतिपादनात आला आहे. श्रोता आणि वक्ता यांचा प्रत्यक्ष संवाद चालला आहे असा आभास उत्पन्न करणारी मनमोकळी शैली या ग्रंथात अनेक ठिकाणी आढळून येते. ग्रंथाच्या समाप्तीच्या वेळी हंसराज आपला ग्रंथ गुरुचरणी अर्पण करितात आणि संतांची काही विनवणी करितात. त्या विनवणीमध्ये हंसराजांच्या एकेका मागणीला संत 'तथास्तु तथास्तु' म्हणतात असे वर्णन केले आहे. तो सारा भागही त्यातील संवादाच्या जिवंतपणामुळे अतिशय प्रत्ययकारी झालेला आहे.

हंसराजांची भाषा प्रौढ आणि अर्थघन आहे. प्रसाद हा तिचा एक विशेष गुण आहे. केवळ वेदान्ताविषयाच्या तात्त्विक विवेचनास वाहिलेल्या या गंभीर ग्रंथात सर्वत्र अर्थाची प्रतीती अगदी सुलभपणाने होत जाते. हंसराजांच्या भाषेवर संस्कृतची छाया आहे, पण तिला संस्कृतचे ओझे होत नाही किंवा तिचे मराठीपण लोपत नाही. अध्यात्मातील कोणत्याही विचाराचे स्पष्टीकरण करीत असताना त्या भाषेचा प्रवाह कोठे अडत नाही. अतिशय सूक्ष्म व कळण्यास कठीण अशा विचारांचेही सुसंगत व सुगम विवेचन हंसराज करितात आणि ते विवेचन वाचीत असताना मूळ विचार वाचकाच्या बुद्धीवर बिंबत जातो. उपनिषदे, गीता व इतर अध्यात्मग्रंथ यांतील संदर्भ अधूनमधून चपखलपणे येऊन जातात. विषय स्पष्ट व्हावा म्हणून अधूनमधून सरस दृष्टांन्ताची पेरणी हंसराज करितात. पण अशा दृष्टान्तांचाच मोह त्यांना पडला आहे व त्यामुळे मूळ विषयाचे विवेचन बाजूला पडले आहे असे कोठेही आढळत नाही. त्यांची दृष्टी विषयप्रतिपादनावर आहे, सरस वर्णनावर वा उपमादृष्टान्तांची पखरण करून काव्याची खुलावट साधण्यावर नाही. पण अशा सहजपणे येऊन जाणाऱ्या थोड्याशा दृष्टान्तांमुळे त्यांच्या प्रतिपादनाला सुगमता व रमणीयता प्राप्त झाली आहे. संसाराचा मोह ओलांडून जाणाऱ्या व कामक्रोधांचा निरास करणाऱ्या साधकाला शांती कशी प्राप्त होते हे सांगताना —

"मोहार्णव हा सागर । साधन सेतु केला थोर ।

शमदमादि वानर | गेला रघुवीर पैलतीरा ॥
कामक्रोधादि असुर | निर्दाळुनिया समग्र ।
शांतिसीता हे सुंदर | आत्माराम प्राप्त जाली ॥ " ९. १. १-२

असे सुरेख रूपक हंसराजांनी केले आहे. आपण तत्वतः ब्रह्मस्वरूप आहोत ही प्रचीती आल्यावर तिचे स्मरण वा विस्मरण यांमुळे तीत बाध उत्पन्न होऊ शकत नाही हे सांगताना —

" कोण्या सदैवाची पत्नी | मी सुवासीण विसरली मनीं ।
तरी सौभाग्यसुखाची शिराणी | तिजला नव्हे ॥
तैसे ब्रह्मत्व आपुलें | विस्मरणे न वचे हारपलें ।
विस्मरणें दुःख जालें | कोणते सांग ॥ " ७. ४. ३३-३४

असे कोणाही प्रापंचिकाला सहज समजेल असे वर्णन हंसराजांनी केले आहे. आहे. अद्वैतानुभवाच्या सीमारेषेवर पोचणारा अनुभवही हंसराज शब्दांत बांधू शकतात, हे पाहताना ज्ञानेश्वरांनी केलेल्या अशा प्रकारच्या अनुभवांची वर्णने आठवतात. ज्ञानेश्वरांच्या वाणीची कोवळीक व प्रतिमेची तरलता हंसराजांत नाही हे खरे, पण अध्यात्माच्या क्षेत्रातील कोणताही अनुभव ते आपल्या ओघवती वाणीने शब्दबद्ध करू शकतात एवढे पटल्याशिवाय राहत नाही. समास १०.४ मध्ये सविकल्पसमाधीचे जे वर्णन त्यांनी केले आहे, तेही त्यांच्या वर्णनशैलीची साक्ष पटविणारे आहे.

तत्त्वज्ञानातील एखाद्या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण असो, अद्वैताच्या अनुभवासारखा एखादा विषय असो किंवा गुरुभक्तीचा भावनात्मक आविष्कार असो; हंसराजांची प्रसन्न व प्रसादपूर्ण वाणी त्या सर्वांमध्ये सारख्याच सहजतेने विहार करिताना दिसते. दुर्बोधता किवा क्लिष्टता यांचा स्पर्श त्या वाणीला झालेला दिसत नाही. तर्कशुद्ध प्रतिपादन व लालित्यपूर्ण आविष्कार या दोहोंचा समन्वय त्यांना साधता येतो हे त्यांच्या शब्दकळेचे फार मोठे वैशिष्ट्य आहे. हंसराज हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेलेले जुन्या मराठी संतांच्या परंपरेतील एक शैलीकार लेखक आहेत, असे निःशंकपणे म्हणता येते.

## हंसराजांची ग्रंथसंपदा

इ. स. १८०० ते १८७४ या कालखंडात होऊन गेलेल्या टीकापर व विवेचनपर लेखन करणाऱ्या लेखकांमध्ये हंसराजांचे नाव विविधता, विस्तार व गुणवत्ता या तीनही दृष्टींनी अग्रभागी लिहावे लागेल. त्यांनी लिहिलेल्या प्रमुख ग्रंथांचा परिचय येथवर करून दिला आहे. अद्याप उपलब्ध न झालेली अशी स्फुट पदरचना सोडल्यास हंसराजांची सर्व रचना अभंग, ओवी या छंदांमध्ये आहे. त्यातही अभंगाचा वापर त्यांनी अगदी कमी केला आहे. त्यांचे बहुतेक प्रमुख ग्रंथ ओवीबद्ध आहेत. हंसराजांच्या लेखनातील विविधता डोळयांत भरण्यासारखी आहे. स्फुट अभंग व पदे त्यांनी लिहिली आहेत. अनुभवामृतावरील त्यांची समओवी टीका ही अनुवादपर

म्हणता येईल, तर दासबोधावरील श्रीसंकेतकुबडी ही रचना ग्रंथटीकेचा नमुना मानता येईल. शिवगीतेवर वेदेश्वरी या नावाची, तर इशावास्योपनिषदावरील वेदाज्ञा ही त्यांची टीकापर रचना असून, त्याशिवाय शंकराचार्यांच्या सदाचार व लघुवाक्यवृत्ति या ग्रंथांवर त्यांनी विस्तृत टीका लिहिल्या आहेत. शंकराचार्यांच्या तत्वज्ञानपर ग्रंथांकडे हंसराजांनी विशेष लक्ष दिले आहे हे तत्त्वज्ञानाचा सकस अभ्यास असण्याच्या दृष्टीने विशेष लक्षणीय आहे. चूडालाख्यान हा ग्रथ प्राधान्याने कथात्मक आहे. कथाकल्पलता ही स्वामींची स्वतंत्र रचना आहे. कथानिवेदन व तत्त्वनिरूपण या दोहींचे सुरेख मिश्रण त्यांनी त्यात साधले आहे. या ग्रंथातील विस्तृत अध्यात्मिक रूपके हाही एक विशेषच म्हणावयास हवा. आगमसार हा हंसराजांचा स्वतंत्र वेदान्तपर ग्रंथ आहे. स्फुट, अनुवादस्वरूप, ग्रंथटीकारूप, टीकात्मक, कथात्मक, रूपकात्मक आणि स्वतंत्र विवेचनपर इतकी विविधस्वरूपी रचना हंसराजांनी केली आहे. स्वात्मादर्श हा त्यांचा ग्रंथ संस्कृतमध्ये आहे, पण तो अद्याप उपलब्ध झालेला नाही. कथाकल्पलतेमधील गद्य हिंदी भागाचाही उल्लेख तेथे करावयास हवा. संस्कृत, मराठी व हिंदी या तीनही भाषांवर हंसराजांचे प्रभुत्व आढळते. कथाकल्पलतेची काही प्रकरणे, वेद या मुद्रेचे अभंग, गुरुभक्तिसार व तत्त्वझाडी एवढी हंसराजांची रचना अद्याप अनुपलब्ध आहे. उपलब्ध व अनुपलब्ध अशी सारी रचना मिळून हंसराजांचे एकूण लेखन पस्तीस ते चाळीस हजार ओव्यांपर्यंत भरते. रचनेच्या या विस्ताराप्रमाणेच शैलीचा मनोरम आविष्कार त्यांच्या वाङ्मयात होतो. सुबोध विषयप्रतिपादन व लालित्यपूर्ण शैली यांचा आकर्षक संगम त्यांच्या वाणीत झाला आहे. वेदान्तविषयाला वाहिलेल्या जुन्या पद्धतीच्या मराठीतील तात्त्विक लेखनाला इ. स. १७५० पासूनच एक उतरती कळा लागलेली दिसून येते. इ. स. १८२० नंतर या देशात इंग्रजी विद्येचा व नव्या दृष्टीचा प्रवेश झाल्यावर तर या वाङ्मयाला बरे दिवस मुळीच राहिले नाहीत. त्या परंपरेतच जे वाढले अशा संतमहंतांनी जी काही केवळ एक ठराविक चाकोरीतील रचना केली तेवढीच. पण त्या रचनेत आत्मप्रत्ययाचा जोम व शैलीचा जिवंतपणा कोठे आढळून येत नाही, तो हंसराजांमध्ये दिसतो. तत्त्वस्पर्शी बुद्धिमत्ता, रसस्पर्शी प्रतिभा, सखोल व्यासंग, प्रसादपूर्ण व ओघवती वाणी, प्रतिपाद्य विषयाबद्दलचा जिव्हाळा, असे अनेक गुण हंसराजस्वामींच्या ठिकाणी एकवटलेले आहेत. जुन्या मराठी वाङ्मयाच्या या परागतीच्या कालखंडात असा समर्थ व प्रतिभाशाली लेखक लाभला हे मराठी संतसाहित्याचे एक भाग्यच म्हणावयास हवे.

## तीन

### जालवणकरांचे सागरग्रंथ

श्रीनारायणमहाराज जालवणकर यांच्या नावावर सप्तसागर या नावाच्या एका ग्रंथाचा उल्लेख काही ठिकाणी केलेला आढळतो. हा सप्तसागर म्हणजे सलग असा

एक ग्रंथ नसून हे निरनिराळे सात ग्रंथ आहेत. बोधसागर, कैवल्यसागर, ज्ञानसागर, विज्ञानसागर, आनंदसागर, शांतिसागर व करुणासागर अशी या सात ग्रंथांची नावे आहेत. सर्वांच्या अखेरीस सागर हा शब्द असल्याने ही सारी मिळून एक रचना आहे असा समज झाला असावा. पण या निरनिराळ्या रचनांचा एकमेकीशी तसा काही संबंध नाही. सर्वांचा विषय मात्र अध्यात्म हा एकच आहे. पण प्रत्येक ग्रंथाचे स्वरूप व प्रतिपाद्य विषय निरनिराळे आहेत. या सर्वांना येथे ग्रंथ असे म्हटले, पण यांतील पहिले दोन सागर म्हणजे अगदी छोट्या रचना आहेत, त्यापुढचे चार मध्यम आकाराचे असून शेवटचा करुणासागर मात्र ग्रंथ या संज्ञेस पात्र आहे. यांपैकी कोणत्याही ग्रंथामध्ये रचनाकाळाचा निर्देश केलेला नाही, रचना कोठे केली त्याबद्दलही काही उल्लेख आढळत नाही. जालवणकरांचा काळ इ. स. १७९३ ते १८६८ असा आहे. आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी ही रचना केली असावी असा तर्क केल्यास प्रस्तुत ग्रंथ इ. स. १८३५–४० नंतर लिहिले गेले असावेत असे म्हणता येते.

“ बोधसागर ’ हा गुरू आणि शिष्य यांच्यामधील एक छोटा संवाद आहे. हा संवाद गद्यात लिहिला असून त्याचा विस्तार छापील चौदा पृष्ठे आहे. जड व चैतन्य यांचे स्वरूप, चार प्रकारचे देह, पिंड व ब्रह्मांड यांतील तत्त्वे, या सर्वांच्या पलीकडे असलेल्या निराकार व साक्षी असा आत्मा, असे विषय या गुरुशिष्य-संवादात आले आहेत. त्यानंतर शिष्याने प्रश्न केल्यावरून ‘ तत्पद व त्वंपद ’ यांचे विवेचन केले आहे. ते विवेचन ऐकल्यावर प्रथम अनेक प्रश्न विचारणारा श्रोता मौन धारण करून राहिला असे वर्णन केले आहे. आत्मस्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्याचा तो परिणाम होय, असे यात सुचवायचे आहे. गुरूने पुन्हा दोनदा प्रश्न केल्यावर केवळ सद्गुरुप्रीत्यर्थ म्हणून शिष्याने आपणास प्राप्त झालेला बोध चारसहा वाक्यात स्पष्ट केला आहे ज्ञानाच्या दृष्टीने शिष्याला आलेली ही पूर्णता पाहून, ‘ आता याचा दृढ अभ्यास करावा ’ असे गुरूनी त्याला सांगितले, असे वर्णन करून हा बोधसागर ग्रंथ संपविलेला आहे.

कैवल्यसागर हा ग्रंथही असाच छोटा आहे. मात्र तो केवळ गद्य नाही तर गद्यपद्यमिश्र आहे. आरंभी प्रास्ताविकाच्या म्हणून ३६ तर शेवटी उपसंहाराच्या २५ ओव्या आहेत. आपल्या ठायी शब्दचातुर्याची गोडी नाही, पण अर्थाकडे लक्ष देऊन श्रोत्यांनी येथे बुडी द्यावी, असे जालवणकरांनी प्रास्ताविकात म्हटले आहे. कोणी एक ब्रह्मपुत्र म्हणजे ब्राह्मणाचा पुत्र जन्ममरणदुःखापासून सुटण्यासाठी व्याकुळ झाला असता, त्याच्यापुढे परमेश्वर गुरुरूपाने प्रगट झाला आणि त्याने त्यास स्वानंद-सुख प्राप्त करून दिले. पण थोड्या वेळातच त्यात विक्षेप उत्पन्न होऊन ते सुख नष्ट झाले. त्यावर आपला हा आनंद अखंड राहावा अशी शिष्याने गुरूची विनवणी केली. तेव्हा सद्गुरूंनी त्याला जो बोध केला तो हा कैवल्यसागर होय, असे जालवणकरांनी प्रास्ताविकात म्हटले आहे. प्रास्ताविक व उपसंहार या दोहोंच्यामध्ये

ग्रंथाचा मुख्य भाग आहे तो गद्यामध्ये आहे. ग्रंथाचा एकूण विस्तार बोधसागराच्या दुप्पट आहे. विवेचन गुरुशिष्यसंवादरूपाने केलेले आहे. जडचैतन्यविवेक, स्थूल व सूक्ष्म देह, त्यांतील तत्त्वे, आत्म्याचे स्वरूप हे बोधसागरात आलेले विषय येथेही आले आहेत. आपल्या प्रतिपादनाला आधार म्हणून अनेक संस्कृत वचने उद्‌धृत केली आहेत. एवढ्या छोट्या ग्रंथाच्या मानाने ही वचने बरीच आहेत. काही स्थळी एका पाठोपाठ नुसती निरनिराळ्या ग्रंथांतील अवतरणे आली आहेत आणि त्यांचे स्पष्टीकरण असे काहीच केलेले नाही. त्यामुळे सुसंगत असे काही प्रतिपादन झाल्यासारखे वाटत नाही हा एक या ग्रंथातील दोष जाणवतो. आशयाच्या दृष्टीने बोधसागर व कैवल्यसागर या दोहोंचे स्वरूप पुष्कळ सारखे आहे. बोधसागराच्या मानाने कैवल्यसागर हा पुष्कळच प्रौढ भाषेत आहे, पण तो काहीसा क्लिष्ट उतरला आहे. विशेषतः गद्यात लिहिलेला भाग पुष्कळच दुर्बोध वाटतो. मोठमोठ्या संस्कृत अवतरणांमुळे या क्लिष्टतेत भरच पडते.

ज्ञानसागर हा ग्रंथ संपूर्ण ओवीबद्ध असून एकूण ओवीसंख्या ७०२ आहे. ग्रंथाचे पाच भाग केले असून त्याना तरग असे म्हटले आहे. ग्रंथाचे स्वरूप सांगताना ‘ विपरीत ज्ञानाचा नाशक । कैवल्य वस्तूचा बोधक॥ ’ ( १.११ ) असे त्याचे वर्णन पहिल्या तरंगाच्या प्रारंभी केले आहे. ग्रंथाचा पहिला तरंग विपरीत ज्ञानाचे खंडन करणारा तर पाचवा ज्ञानतत्त्वाचे निरूपण करणारा आहे. दुसरा तरंग कर्माच्या विवेचनाला दिला असून, कर्माने मोक्ष मिळत नाही तर त्यासाठी ज्ञानाचीच कास धरावी लागते, हा त्यातील मुख्य सिद्धान्त आहे. हे ज्ञान सद्‌गुरूच्या कृपेशिवाय प्राप्त होत नाही म्हणून तिसऱ्या तरंगामध्ये सद्‌गुरूचे महत्त्व स्पष्ट केले आहे आणि त्या सद्‌गुरूची सेवा कशी करावी हे चौथ्या तरंगामध्ये सांगितले आहे. पूर्वीच्या दोन सागरांप्रमाणे या ग्रंथातही जागोजाग अनेक संस्कृत वचने दिलेली आहेत. ग्रंथातील एकूण विवेचन मात्र त्रुटित वाटते.

विज्ञानसागर या ग्रंथाचे एकूण बारा अध्याय असून ओवीसंख्या ७३१ आहे. विज्ञान या शब्दाचा अर्थ स्पष्ट करिताना ‘ विज्ञान याचा ऐसा भाव । विज्ञान म्हणजे अनुभव । ’ ( १२.६९ ) असे ग्रंथाच्या अखेरीस जालवणकरांनी म्हटले आहे. सर्वत्र एक आपलाच आत्मा भरून राहिलेला आहे असा सर्वात्मभावाचा अनुभव ते विज्ञान, असा त्यांचा एकूण अभिप्राय आहे. पहिला अध्याय केवळ मंगलाचरणपर आहे. कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग असे मोक्षप्राप्तीसाठी तीन मार्ग आहेत, त्यामध्ये भक्तिमार्ग हा सर्वांत श्रेष्ठ होय, असा सिद्धान्त दुसऱ्या अध्यायात केला असून परमेश्वरालाही भक्ती प्रिय आहे असे तिसऱ्या अध्यायात म्हटले आहे. चौथ्या अध्यायात भक्तीचे माहात्म्य स्पष्ट करण्यासाठी अंबरीषाची कथा सांगितली आहे, तर अभक्त पुरुष त्याज्य होत हा पाचव्या अध्यायाचा विषय आहे. भक्तरक्षक हे परमेश्वराचे बिरुद होय हे सहाव्या अध्यायात स्पष्ट केले आहे. वैराग्य उत्पन्न

करणाऱ्या संसारदुःखाचे वर्णन सातव्या अध्यायात करून पुढील अध्यायांतून भक्तीचे लक्षण, भक्ताचे हृदय हे भगवंताचे मंदिर, मानसपूजा, तिचे विविध उपचार आदी विषय आले आहेत. कर्म, उपासना व ज्ञान असा तीन मोक्षमार्गांचा उल्लेख ग्रंथाच्या प्रारंभी केला असला, तरी एकंदर विवेचनामध्ये भक्तीला सर्वाधिक प्राधान्य दिले आहे, हे निरनिराळ्या अध्यायांमध्ये आलेल्या या विषयावरून स्पष्ट होईल. भक्तीच्या तात्त्विक विवेचनापेक्षा तिच्या निरनिराळ्या अंगांच्या स्पष्टीकरणावर व वर्णनावर ग्रंथामध्ये अधिक भर आहे. एकंदर ग्रंथात संस्कृत वचने पाचसहाच आहेत. विज्ञान या शब्दाचा संबंध अशा प्रकारे जालवणकरांनी प्रामुख्याने भक्तीशी जोडलेला आहे. वामनपंडितांनी यथार्थदीपिकेमध्ये केलेल्या विज्ञान या पदाच्या स्पष्टीकरणाची त्यांच्यावर असलेली येथील छाया स्पष्ट आहे.

**आनंदसागर आणि शांतिसागर**

आनंदसागराची एकूण ओवीसंख्या ४०५ असून त्याचे सात भाग केले आहेत आणि त्यांना प्रथम सिद्धान्त, द्वितीय सिद्धान्त अशी नावे दिलेली आहेत. आत्मस्वरूपाच्या अनुभवामुळे प्राप्त होणारा आनंद हा या ग्रंथाचा प्रमुख विषय आहे. विश्वात सर्वत्र मूलतः तोच आनंद भरलेला आहे, असा जालवणकरांचा सिद्धान्त आहे. किंबहुना मनुष्याला विषयसुखापासून जो आनंद प्राप्त होतो त्याचा उगमही अखेर या ब्रह्मानंदातच असतो, असे त्यांनी म्हटले आहे. परंतु तत्त्वतः असे असले तरी विषयसुख हे अंती दुःखकारक आहे, तर आत्मानुभवाचा आनंद हा अखंड व अविनाशी असतो; हा त्या दोहोंमधील महत्त्वाचा फरक आहे. कामना ही अंती दुःखकारक असते हे पहिल्या सिद्धान्तात सांगून दुसऱ्या सिद्धान्तामध्ये त्यांनी अगदी थोडक्यात देहचतुष्टयांचे निरसन केले आहे. त्यानंतरचे पुढचे सारे भाग म्हणजे एकूण पाच सिद्धान्त हे ब्रह्मानंदाचे स्वरूप निरनिराळ्या प्रकारे स्पष्ट करण्यासाठी दिलेले आहेत. अखेरच्या सच्चिदानंद विवरण या सिद्धान्तात सत्, चित् व आनंद या तीन पदांच्या आधाराने आत्मसाक्षात्काराचे स्वरूप विशद केले आहे. त्या सिद्धान्ताच्या एकूण २२३ ओव्या आहेत, म्हणजे ग्रंथाचा अर्ध्याहून अधिक भाग त्याने व्यापलेला आहे. वर्ण्य विषयाचे स्वरूप स्पष्ट करिताना एकामागोमाग अनेक सरस दृष्टान्त देण्याची येथील जालवणकरांची लेखनशैलीही ज्ञानेश्वरांची आठवण करून देते. शब्दात मांडून दाखविण्यास अतिशय कठीण असा हा विषय जालवणकरानी मोठ्या समर्थपणे उभा केला आहे असे आढळून येते. सुलभ दृष्टान्त आणि सुबोध भाषा यांनी येथील त्यांचे विवेचन नटलेले आहे. ग्रंथाच्या अखेरीस पंचवीस-तीस ओव्या उपसंहाराच्या आहेत. निर्विकल्प ब्रह्मानंदाचा हा विषय प्राकृतात सांगितला आहे, पण श्रोत्यांनी भाषेकडे लक्ष न देता अर्थाकडे द्यावे —

" प्राकृत काय ते बापुडें । लक्ष द्यावें अर्थाकडे ।
जेणे अंतर्दृष्टी उघडे । तो हा जाणावा निगमार्थ ॥

सुवर्णपात्रीं क्षीर प्याला। तेणेंच तो पुष्ट झाला।
मृद्‌भांडीचे क्षीरे त्याला। दुर्बळ केवी करावें? ॥" ७.२१२-१३

असा प्रश्न विचारून त्यांनी मराठीचा कैवार घेतला आहे. मराठी भाषेत सांगितल्या गेलेल्या अध्यात्मविचाराचे असे समर्थन त्यांनी आपल्या इतर सागरांमध्येही जाता जाता केलेले आढळते.

शांतिसागर हा ग्रंथ एकूण ३८१ ओव्यांचा असून त्याचे एकूण पाच उल्लास आहेत. आपल्या निरनिराळ्या ग्रंथांच्या विभागांना जालवणकरांनी निरनिराळी नावे दिली आहेत. या विभागांना अध्याय हे सर्वपरिचित नाव त्यांनी फक्त विज्ञानसागरात दिले असून इतरत्र सिद्धान्त, तरंग, उल्लास असे निरनिराळे शब्द त्यांनी योजिले आहेत. शांतिसागराचा पहिला उल्लास मध्यस्थविटंबन व प्राप्त्युत्कर्षवर्णन या नावाचा तर पाचवा प्राप्तपुरुषोत्कृष्टप्रौढीवर्णन या नावाचा आहे. मधले तीन उल्लास ब्रह्म-प्राप्ती या विषयाला वाहिलेले आहेत आणि त्यांना ब्रह्मप्राप्तिविवरण, ब्रह्मप्राप्तिदृढी-करण व ब्रह्मप्राप्तिनिरूपण अशी नावे दिली आहेत. उल्लासांना दिलेल्या या नावांवरूनच त्यांतील विषयांची कल्पना सहज येण्यासारखी आहे. आपल्या विवेचनाला आधार म्हणून अनेक संस्कृत वचने जालवणकरांनी दिली आहेत. पहिल्या उल्लासात ती खूपच आहेत, त्या मानाने पुढच्या उल्लासात ही अवतरणे कमी आहेत. दुसऱ्या उल्लासात आठ ओव्यांनंतर एक चूर्णिका आलेली आहे तीमध्ये प्रत्येक चरणाच्या अखेरीस प्रकाशे, नाशे, साचे, जाणावे, पावावे असे मराठी शब्द आहेत म्हणूनच ती मराठीत आहे हे कळते. बाकीची सारी रचना संस्कृतप्रचुर व दीर्घसमासयुक्त आहे.

'पुनर्मध्यस्थवदितस्ततः यत्रतत्रक्षुद्रविषयीं न धावे तो।
दृश्यदाहे न बाधिजे तो अखंडानंदैकरूपप्राप्तपुरुष बोलिजेतो॥'

या शेवटच्या दोन चरणांवरून या चूर्णिकेचे संस्कृतप्रचुरत्व व समासप्रचुरत्व काहीसे ध्यानात येण्यासारखे आहे. आनंदसागर व शांतिसागर हे विवेचनाच्या दृष्टीने बरेच सारखे असलेले ग्रंथ आहेत, पण शांतिसागरापेक्षा आनंदसागराची रचना काव्यदृष्ट्या पुष्कळच सरस व प्रसादपूर्ण आहे असे आढळते.

**सागरस्वरूप करुणासागर**

नारायणमहाराज जालवणकरांनी लिहिलेल्या सात सागरग्रंथांतील करुणासागर हा अखेरचा ग्रंथ होय. वर उल्लेखिलेल्या सहा सागरांच्या तुलनेने याचा विस्तार प्रचंडच म्हणावयास हवा; कारण याची एकूण ओवीसंख्या १७६७२ आहे सागर हे नाव या ग्रंथास खरेखुरे शोभते. ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धाची ओवीसंख्या केवळ १८९६ आहे, म्हणजे उत्तरार्धाच्या मानाने पूर्वार्ध फार लहान आहे. पूर्वार्धाचे तीन भाग केलेले आहेत, त्या भागांना वेगळी नावे दिलेली नाहीत. उत्तरार्ध १५७७६ ओव्यांचा आहे, पण एवढा विस्तार असूनही त्याचे केवळ दोन भाग केलेले आहेत. असे करण्याचे कारण जालवणकरांनीच उत्तरार्धामध्ये स्पष्ट केलेले आहे.

"या ग्रंथीं तें कांहीं न दिसे । एकच कथानुसंधान असे ।
एकच सबंध प्रकर्ण विलसे । अध्याय एकच इतिश्री ॥
त्वदर्थ जैसें मनिं उद्भवतें । तैसे तैसें लिहिण्यांत येतें ।
सबंध कथानुसंधान पुरते । इतकेंच 'भेट दे मज इष्ट तूं' ॥ "
(१४८२८-२९)

असे त्यांनी आपली इष्ट देवता जी दत्तात्रय तिला उद्देशून म्हटले आहे. ज्ञानसागर, शांतिसागर असे जे याच्या आधीचे सागर लिहिले गेले ते लिहिताना एखाद्या विषयाचे स्पष्टीकरण करण्याचा हेतू लेखकाच्या दृष्टीसमोर होता आणि त्या अनुरोधाने त्या त्या ग्रंथाचा प्रारंभ, शेवट व प्रकरणे केलेली आहेत. करुणासागराचा प्रकार तसा नाही. या ग्रंथाला विषय नाही असा याचा अर्थ नाही. पण तो विषय प्रतिपादनाचा किंवा विवेचनाचा नाही, तर केवळ निवेदनाचा आहे. हे भक्ताने आपल्या इष्ट देवतेजवळ केलेले आत्मनिवेदन आहे किंवा हितगुज आहे. आपली उपास्यदेवता जी दत्तात्रय तिची जालवणकरमहाराजांनी भाकलेली करुणा हा या ग्रथाचा विषय आहे, म्हणजे ही सारी रचना आत्मनिष्ठ आहे, कवीच्या मनातील भाव प्रकट करणारी आहे. समर्थांच्या करुणाष्टकांची येथे साहजिकच आठवण होईल. पण त्या दोहोंच्या भूमिकेत थोडासा निराळेपणा आहे आणि त्यांच्या विस्तारात तर फारच फरक आहे. विस्ताराच्या दृष्टीने करुणासागराची तुलना जुन्या मराठी वाङ्मयातील एकनाथी भागवत, यथार्थदीपिका, हरिवरदा अशा मोठ्या ग्रंथांशीच करावी लागेल. पण करुणासागर म्हणजे एखाद्या संस्कृत ग्रंथावरील टीका नव्हे तर ती एक स्वतंत्र रचना आहे, हे येथे ध्यानात ठेवावयास हवे. आपल्या मनात ज्या ज्या वेळी जे जे आले ते ते भक्ताने येथे ईश्वरापाशी मनमोकळेपणाने सांगितले आहे आणि त्या आत्मनिवेदनातून हा ग्रंथ निर्माण झाला आहे. जालवणकरमहाराज नित्यनियमाने भोजनोत्तर तीसचाळीस ओव्या लिहीत असत आणि त्यातून हळूहळू या ग्रंथाची रचना होत गेली, असा एक उल्लेख करुणासागरास लिहिलेल्या प्रस्तावनेत आढळतो. तो या दृष्टीने महत्त्वाचा आहे.[1] एखाद्याने दैनंदिनी लिहावी व तीमध्ये आपल्या मनात नित्य उत्पन्न होणारी भावनांची आंदोलने टिपावीत तसा हा प्रकार आहे. "तुझें नांव करुणासागर आहे म्हणून या ग्रंथाचे नांवही करुणासागर ठेवले आहे. तूं मला दर्शन देशील तेव्हांच हा ग्रंथ पुरा होईल." असे जालवणकरांनी एके ठिकाणी म्हटले असून, "हे मी केवळ करमणूक म्हणून लिहीत नाहीं." असेही त्यांनी पुढे दत्तात्रयाला बजावले आहे (१४५३६).

ईश्वराची करुणा भाकणे हा एकच विषय असल्याने या एकूण रचनेला एक

१. करुणासागर, उत्तरार्ध. प्रथम भाग, प्रकाशक ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी, मुंबई. इ. स. १९४०.

प्रकारची एकरूपता आपोआपच प्राप्त झाली आहे, पण त्याबरोबरच तीमध्ये पुनरुक्ती येणे किंवा पाल्हाळ होणे हेही स्वाभाविक झाले आहे.

"प्रार्थिलेंचि प्रार्थितों याचे वर्म। दत्ता, जाणसी आतुर धर्म। अर्थार्थियाचें हे नित्य कर्म॥" १०७५०.

असे जालवणकरांनीच म्हणून ठेवलेले आहे. एकच विषय असल्याने पुनरुक्ती होते. त्याचप्रमाणे त्या एकाच विषयावर काही ना काही ओव्या लिहिण्याचा नित्यक्रम दिवसानुदिवस चालवल्याने रचनेमध्ये अनेक स्थळी विस्कळितपणा किंवा शिथिलपणा आला आहे. मागचा पुढचा धागा सर्वत्र नीट जुळलेला आहे असे म्हणता येत नाही. त्याचबरोबर एकदा लिहिल्या गेलेल्या ओव्यांवरून पुन्हा दृष्टी फिरवलेली आहे, त्या ठाकठीक केल्या आहेत असे वाटत नाही. मनाच्या विशिष्ट ऊर्मीनुसार त्या त्या दिवशी लेखणीतून जे काही उतरले ते तसेच ठेवलेले आहे आणि यामधून ग्रंथ जसा व जितका वाढत गेला तसा तो वाढू दिला आहे. किंबहुना या ग्रंथाचा विस्तार एवढा वाढत जाईल याची कल्पना स्वतः लेखकालाही प्रारंभी नसावी. त्यामुळेच पूर्वार्धाच्या मानाने उत्तरार्ध फार मोठा झाला आहे किंवा लहान असलेल्या पूर्वार्धाचे तीन भाग केले आहेत तर विस्तृत अशा उत्तरार्धाचे दोन भाग केले आहेत, अशी स्थिती झाली आहे. भक्ताने आर्तपणे देवाच्या भाकलेल्या करुणेवर उभारलेली एक प्रचंड रचना या दृष्टीने या करुणासागराचे स्थान मराठीतील परमार्थपर वाङ्मयात केवळ अद्वितीय म्हणावयास हवे. या ग्रंथाची भाषा त्याच्या या विषयाला शोभेशीच जिव्हाळ्याची, आर्तता व्यक्त करणारी व अकृत्रिम अशी आहे. या दृष्टीने या ग्रंथातील भावना व भाषा या दोहींचे मराठीतील अभंगवाङ्मयाशी बरेच साम्य आहे. जालवणकरांनी आपल्या उपास्य देवतेला नाना प्रकारांनी आळविले आहे. दत्तात्रयाला त्यांनी कधी गुरू म्हणून संबोधलेले आहे व स्वतःकडे शिष्याची भूमिका घेतली आहे. तर कधी त्याला माउली म्हटले आहे व स्वतःला बालक कल्पिले आहे. एखाद्या वेळी त्यांनी देवाच्या भेटीसाठी आपण किती अपार कष्ट सोसले त्याचे वर्णन केले आहे, तर दुसऱ्या एखाद्या स्थळी अद्याप देवाची भेट घडत नाही म्हणून शोक केला आहे. कधी त्यांनी देवाची आतुरतेने प्रार्थना केली आहे, तर कधी व्याकुळ होऊन टाहो फोडला आहे कधी देवाशी लडिवाळपणे संवाद केला आहे तर कधी त्याच्यापाशी हट्ट घेतला आहे. भक्तिभावनेची नाना रूपे या करुणासागरात प्रकट झाली आहेत. स्वतःचा अनधिकार व ईश्वराची आपल्याविषयीची कृपादृष्टी यावर अर्थातच अधिक भर आहे. हे सारे निवेदन प्रथमपुरुषी असल्याने त्यात उत्कटता निर्माण झाली आहे. भाषेची क्लिष्टता व दुर्बोधता कोठेही आढळत नाही, सारी रचना केवळ प्रसादपूर्ण आहे. तात्त्विक विवेचनाची सरणी जालवणकरांना विशेष साधत नाही असे त्यांच्या ग्रंथांवरून दिसते. पण करुणासागर हा अंतरीचा उद्‍गार असल्याने त्यात सर्वत्र सुबोधता व अकृत्रिमता आलेली आहे. मात्र एकाच विषयाला व भक्तीच्या एकाच भावनेला

वाहिलेली एवढी दीर्घ रचना वाचताना ती काहीशी कंटाळवाणी झाल्यास व तीमध्ये एक प्रकारचा तोच-तो-पणा जाणवल्यास तेही स्वाभाविकच म्हणावे लागेल.

## जालवणकरांचे लेखनविशेष

नारायणमहाराज जालवणकरांनी लिहिलेल्या सात सागरग्रंथांचा थोडक्यात परिचय येथवर करून घेतला. हे सात सागरग्रंथ निरनिराळे आहेत. ते एकाच मोठ्या ग्रंथाचे भाग आहेत असे मानण्यास जागा नाही. हे ग्रंथ कोणत्या क्रमाने लिहिले गेले हे समजण्यास ग्रंथांतर्गत असे काही साधन नाही, कारण रचनेचा काळ व स्थळ याबद्दल कोणताही उल्लेख त्यांनी केलेला नाही. इ. स. १७९३ ते १८६८ असा जालवणकरमहाराजांच्या आयुष्याचा काळ आहे. चाळिशीनंतर त्यांनी ग्रंथरचना केली असावी असे मानले तर या सर्व ग्रंथांची रचना इ. स. १८३५ नंतर झाली असावी असे अनुमान करता येते. आपल्या कोणत्याच ग्रंथामध्ये स्वतःच्या इतर रचनेचा उल्लेख जालवणकरांनी केलेला आढळत नाही, ही काहीशी आश्चर्याची गोष्ट आहे. बोधसागर व कैवल्यसागर या दोन रचना अनुक्रमे गद्य व गद्यपद्यमिश्र आहेत आणि त्यांचा विस्तार फारच कमी आहे, त्यावरून या रचना प्रथम केल्या असाव्यात असे वाटते. करुणासागर खूपच मोठा आहे, तर उरलेल्या ग्रंथांचा विस्तार ३०० ते ७०० ओव्यांएवढा आहे. बोधसागर, कैवल्यसागर व ज्ञानसागर या तिहींचे स्वरूप विषय-दृष्ट्या काहीसे सारखे असून जडचैतन्य, पिंडब्रह्मांड आणि ब्रह्म किंवा आत्मा या-विषयीचे सिद्धान्त त्यात थोडक्यात सांगितले आहेत. विज्ञानसागर, आनंदसागर व शांतिसागर या तीन सागरांमध्ये परब्रह्माचा अनुभव, त्या अनुभवातील आनंद आणि त्या आनंदप्राप्तीचे साधन अशी भक्ती हे विषय प्रामुख्याने आले आहेत. सातवा सागर जो करुणासागर त्याचे स्वरूप या सर्वांहून निराळे आहे, भक्ताची ईश्वराच्या दर्शनाविषयीची तळमळ हा त्याचा एकमेव विषय आहे.

जालवणकरांनी ग्रंथाच्या प्रारंभी सर्वत्र श्रीगणेश व दत्तात्रय यांना वंदन केले आहे. सद्‌गुरू व श्रोते यांना त्यानंतर वंदन केलेले असते. संतसज्जनांना वंदन करतात त्याचप्रमाणे त्यांनी एका ठिकाणी दुर्जनांनाही वंदन केले आहे. दत्तात्रय हे जालवण-करांचे उपास्य दैवत आहे, तेव्हा त्या दैवताचा सर्वत्र वारंवार उल्लेख यावा हे स्वाभाविक आहे. करुणासागर तर सारा केवळ दत्तात्रयाला उद्देशून लिहिलेला आहे. त्या मानाने श्रीकृष्ण या देवतेचा उल्लेख विशेष येत नाही. अधूनमधून श्रीराम या देवतेचा उल्लेख आलेला आढळतो. गुरुसेवेवर जालवणकरांची अपार श्रद्धा असली तरी आपले गुरू जे निरंजन–रघुनाथ त्यांचा निर्देश ते विशेषत्वाने करीत नाहीत. मराठी भाषेबद्दल अभिमानपर उल्लेख त्यांनी काही स्थळी केलेला आहे. संस्कृतातील अध्यात्म मराठीत सांगितले असले, तरी ते संतसज्जनांनी अर्थाकडे लक्ष देऊन स्वीकारावे, अशा स्वरूपाचे हे उल्लेख असतात. मराठीमधील पारमार्थिक वाङ्मयातील परंपरेला हे धरून आहे. आपल्या प्रत्येक ग्रंथाला काही ना काही

प्रास्ताविक लिहिण्याची व अखेरीस उपसंहार करण्याची जालवणकरांची प्रथा आहे. काही ठिकाणी त्यांनी आपल्या ग्रंथाची फलश्रुतीही सांगितली आहे. निरनिराळ्या ग्रंथांतील प्रकरणांच्या वा अध्यायांच्या अखेरीस जो संस्कृतमधून समाप्तिदर्शक उल्लेख येतो त्यामध्ये ' श्रीमत् परमतपःपरायण श्रीमन्नारायणविरचिते ' असा स्वतःचा निर्देश त्यांनी सर्वत्र केला आहे. स्वतःचा उल्लेख त्यांनी परमतपःपरायण असा करावा हे अनपेक्षित वाटते, किंबहुना हा उल्लेख नंतर त्यांच्या शिष्यांपैकी कोणीतरी घातला असावा असे वाटून जाते.

जालवणकर अद्वैतमतानुयायी आहेत, आध्यात्मिक विचारांचे त्यांनी केलेले स्पष्टीकरण पारंपरिक पद्धतीने केलेले आहे. अद्वैत आणि भक्ती हे दोन त्यांचे सर्वांत महत्त्वाचे सिद्धान्त आहेत. निरनिराळ्या ग्रंथांमध्ये मिळून वेदान्तातील सर्व विषयांचा परामर्श कटाक्षाने घ्यावा असा काही आग्रह त्यांच्या लेखनात दिसत नाही. काही विषयांची पुनरुक्तीही झालेली आहे. त्यांच्या भक्तीच्या विवेचनावर वामनपंडितांच्या यथार्थदीपिकेतील भक्तिविषयक विचाराची काही छाया आहे. विज्ञान या शब्दाचा त्यांनी केलेला अर्थ वामनांच्या अर्थाशी मिळताजुळता आहे. ऐश्वरयोगविषयक गीतेच्या नवव्या अध्यायातील श्लोकाचा, त्याचप्रमाणे व्यतिरेकयोग व अन्वययोग याला आधारभूत असे गीतेतील जे श्लोक वामनपंडित दाखवतात त्यांचा आधार जालवणकरानी घेतलेला आहे. वामनांनी सांगितलेल्या योगवासिष्ठातील योगविषयक वचनांचाही उल्लेख त्यांनी केला आहे आनंदसागर व शांतिसागर यांवरील विवेचक टीपांमध्ये जालवणकरमहाराजांच्या कल्पना स्पष्ट करिताना श्री रामचंद्र शंकर टाकी ऊर्फ श्रीभाई यांनी अनेक वेळा यथार्थदीपिकेतील विवेचनाचा हवाला दिला आहे हे या संदर्भात ध्यानात घेण्यासारखे आहे.

आपल्या विवेचनामध्ये अनेक संस्कृत ग्रंथांतील वचने जालवणकर उद्धृत करितात. विशेषतः बोधसागर व कैवल्यसागर या दोन ग्रंथांमध्ये ही वचने बरीच आली आहेत. त्या मानाने इतर ग्रंथांत अशी अवतरणे देण्याची प्रवृत्ती कमी प्रमाणात आढळून येते. जालवणकरांचा संस्कृतमधील वेदान्तविषयक ग्रंथांचा व्यासंग फार मोठा होता हे यावरून ध्यानात येते. त्या मानाने मराठी संतांच्या वाङ्मयाचा परिणाम त्यांच्यावर कमी आढळतो. भक्तीवर विशेष भर असला तरी जालवणकर भागवताचा विशेष उल्लेख करीत नाहीत हे लक्षणीय आहे. गुरु-विषयीची अपार निष्ठा, मोक्षासाठी भक्ती हे साधन आणि ब्रह्मानुभवाचा आनंद यांवर त्यांच्या ग्रथांत सर्वांत अधिक भर आहे. प्रतिपादन किंवा विवेचन हे जालवणकरांना त्या मानाने कमी साधते, वर्णनावर त्यांचा रोख अधिक असतो. बोधसागर व कैवल्यसागर यांतील प्रश्नोत्तररूप संवाद तर रुक्षच झाले आहेत. इतरत्र आलेल्या विवेचनामध्ये चिकित्सेचा किंवा मीमांसेचा आढळ विशेष होत नाही. विवेचनातील त्यांची भाषा संस्कृतप्रचुर व काहीशी दुर्बोध आहे. भक्ती व आत्मानुभव

यांची वर्णने ते करितात, तेथील त्यांची भाषा त्या मानाने पुष्कळच सुगम रूप धारण करते. या दोन विषयांबद्दल त्यांना विशेष जिव्हाळा आहे, त्यामुळे ते विषय ते समर्थपणे उभे करू शकतात. या वर्णनामध्ये एकामागोमाग सरस दृष्टान्त देण्याची त्यांची शैली ज्ञानेश्वरांची आठवण करून देते. मात्र त्यांच्या प्रतिभेचे सामर्थ्य ही आठवण करून देण्याइतकेच मर्यादित आहे. करुणासागर हा त्यांचा ग्रंथ मात्र त्यातील विषय, उत्कटता व विस्तार या दृष्टींनी मराठी संतवाङ्मयात उठून दिसावा इतका महत्त्वाचा आहे.

या सात सागरग्रंथांशिवाय परमार्थदीपिका या नावाचे एक लहानसे ओवीबद्ध प्रकरण जालन्नणकरांनी लिहिलेले आहे. गुरुभक्ती हा त्याचा विषय आहे. विचारमाला, चिद्रत्नमाला, निर्वाणपंचक, सिद्धयोगाष्टक, गुरुपादुकाष्टक अशी काही स्फुट रचनाही त्यांनी केली आहे. पण स्वतंत्रपणे दखल घेण्याइतकी ती महत्त्वाची नाही.

## उपसंहार

इ. स. १८०० ते १८७४ या कालखंडातील टीका आणि विवेचनपर अशा प्रमुख ग्रंथांचा परामर्श येथवर घेतला. प्रकाशित अप्रकाशित असे एकूण सुमारे पंचेचाळीस ग्रंथ या कालखंडात झालेले आढळतात. अन्य ग्रंथांवरील टीका व स्वतंत्र विवेचनपर असे त्याचे दोन वर्ग मानल्यास वीस ग्रंथ टीकात्मक व पंचवीस-सव्वीस ग्रंथ स्वतंत्र विवेचनपर अशी विभागणी आढळून येते. टीकाग्रंथांपैकी चौदा टीका संस्कृत ग्रंथांवरील तर सहा मराठी ग्रंथांवरील आहेत. गीता, भागवत व योगवासिष्ठ हे मराठीतील टीकाग्रंथांचे आधार मराठी वाङ्मयाच्या प्रारंभकाळापासूनचे आहेत. त्यांपैकी प्रत्येकावर या कालखंडामध्ये दोन दोन टीका झाल्या आहेत. त्याशिवाय शिवगीतेवर एक टीका व उत्तरगीतेचा समश्लोकी अनुवाद झाल्याची नोंद आहे. गीतेवरील एक टीका महेश्वरभट्ट सुखटणकर यांची आहे. हंसराजांचा वेदेश्वरी हा सुमारे दहा हजार ओव्यांचा ग्रंथ शिवगीतेवरील टीका आहे, तर गोमांतकातील व्यंकट कवींनी उत्तरगीतेवर समश्लोकी टीका लिहिल्याचा उल्लेख आहे. जयराम अनंत बाबळे यांनी भागवताच्या दशमस्कंधावर टीका लिहिली असून, व्यंकट कवींचा श्रुतिदीप हा ग्रंथ भागवतातील वेदस्तुतीवर आधारलेला असावा. याच व्यंकट कवींनी योगवासिष्ठसारावर समश्लोकी लिहिलेली आहे. हंसराजांचे चुडालाख्यान अभंगबद्ध असून ते योगवासिष्ठावर आधारलेले आहे. दोन उपनिषदांवर मिळून एकूण तीन टीका लिहिल्या गेल्या आहेत. पैकी, हंसराजांची टीका ईशावास्योपनिषदावर आहे, तर निरंजन–रघुनाथ व कृष्ण विठ्ठल यांच्या टीका केनोपनिषदावर आहेत. टीका लिहिण्यासाठी या कालखंडामध्ये मराठी लेखक शांकर ग्रंथांकडे वळले आहेत हा एक उल्लेखनीय भाग आहे. शंकराचार्यांच्या आत्मबोधावरील निरंजन–रघुनाथांची टीका सामान्य आहे. महेश्वरभट्ट सुखटणकरांची टीका

वाक्यसुधेवर आहे. हंसराजांनी शंकराचार्यांच्या सदाचार व लघुवाक्यवृत्ति या दोन ग्रंथांवर सविस्तर टीका लिहिल्या असून त्यांतील दुसरा ग्रंथ अतिशय महत्त्वाचा आहे. सुबोध भाषेत व ओघवती वाणीने अद्वैतवेदान्तातील हरएक प्रमेयाचे ज्यामध्ये इतके सुंदर विवरण केलेले आहे असे ग्रंथ मराठीत फार थोडे आहेत. प्रस्तुत कालखंडामध्ये हा ग्रंथ सर्वांत महत्त्वाचा आहे असे म्हणण्यास हरकत नाही. मराठी ग्रंथांवर टीकालेखन हा देखील या कालखंडाचा एक विशेष म्हणावयास हवा. त्यांतील हंसराजांची संकेतकुबडी ही दासबोधाचा थोडक्यात केवळ आढावा घेणारी आहे. इतर सर्व टीका ग्रंथ ज्ञानेश्वरांच्या अनुभवामृतावर असून त्यातील एक समओवी टीका तर इतर चार गद्य टीका आहेत.

स्वतंत्र विवेचनपर ग्रंथ एकूण पंचवीस सव्वीस झाले आहेत. त्यांपैकी सतरा-अठरा केवळ स्फुट प्रकरणे आहेत. ही सारी प्रकरणे छोटी असून त्यांत विशेष ध्यानात घ्यावी अशी कोणतीही कृती नाही ज्यांची नोंद घ्यावयास हवी असे स्वतंत्र ग्रंथ सुमारे सात-आठ आहेत. त्यांपैकी कथाकल्पलता व आगमसार हे दोन ग्रंथ हंसराजांचे आहेत. आनंदसागर, शांतिसागर व करुणासागर हे तीन ग्रंथ नारायणबुवा जालवणकरांनी लिहिलेले आहेत. स्वात्मबोध हा मौनीस्वामींचा तर भावार्थसिंधु हा विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा स्वतंत्र ग्रंथ आहे.

या कालखंडातील नाव घेण्यासारखे ग्रंथकार दोन आहेत. एक हंसराज व दुसरे नारायणबुवा जालवणकर. नारायणबोवा जालवणकरांचा करुणासागर हा ग्रंथ सर्वांत मोठा आहे, एवढा भाग सोडला, तर इतर सर्व दृष्टींनी या कालखंडातील लेखकांमध्ये हंसराजस्वामी यांचेच नाव अग्रभागी लिहावे लागेल. त्यांचे लेखन विपुल तर आहेच, पण ते विविध प्रकारचेही आहे. जुन्या परंपरेने लेखन करणारे, वेदान्तातील हरएक प्रश्नाची सुबोध मीमांसा करणारे, प्रज्ञा व प्रतिभा या दोहोंची सारखीच देणगी लाभलेले आणि निरनिराळ्या प्रकारचे विपुल लेखन करणारे एक शैलीकार लेखक म्हणून हंसराजांचे नाव फार महत्त्वाचे आहे. त्यांच्याएवढा प्रभावी लेखक या कालखंडात दुसरा झालेला नाही. या कालखंडाच्या अखेरीअखेरीस होऊन गेलेले विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे नाव प्रभावशाली व्यक्ती व लेखक म्हणून डोळ्यांसमोर येते, पण त्यांचे महत्त्व व कार्य वेगळ्या प्रकारचे आहे. विष्णुबुवांनी प्राधान्याने गद्य लेखन केले, तर हंसराजांचे बहुतेक लेखन पद्यबद्ध आहे, हा ग्रंथरचनेच्या दृष्टीने महत्त्वाचा फरक आहेच. पण या दोहोंमध्ये त्यांहूनही महत्त्वाचा फरक आहे. विष्णुबुवा हे इंग्रजी मिशनऱ्यांशी सामना देणारे व नव्या काळाने हिंदुधर्माला दिलेले आव्हान स्वीकारणारे असे आधुनिक संन्यासी होते, तर हंसराज हे जुन्या मराठी संतांच्या परंपरेतून आलेले आणि सर्वसामान्य भाविक जनतेला अध्यात्माचा मार्ग दाखविणारे संत होते. विष्णुबुवांची बहुतेक कामगिरी मुंबईसारख्या आधुनिक संस्कृतीचा नव्याने स्पर्श झालेल्या शहरात झाली, तर हंसराजांचे सारे जीवन

मराठवाड्यातील एका बाजूच्या छोट्याशा गावात गेले हाही एक फरक आहे.

इ. स. १८०० नंतरचा काळ हा महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या अस्ताचा आणि इंग्रजी राज्याच्या उदयाचा काळ आहे. इंग्रजी राज्याच्या आगमनाबरोबर जुन्या परंपरेतील अध्यात्मविद्या हळूहळू मागे पडत गेली आणि नवीन विद्येचा प्रसार अधिकाधिक होत गेला. या संक्रमणाचा परिणाम महाराष्ट्रीय समाजाच्या एकंदर जीवनावर जसा झाला तसाच तो भाषा व साहित्य यांच्या सर्व अंगांवरही झाला. आपण ज्या स्वरूपाच्या वाङ्मयाचे अवलोकन या प्रकरणात करीत आहोत त्या टीकात्मक व विवेचनपर वाङ्मयावर तो परिणाम सर्वांत अधिक झाला. आधुनिक इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराबरोबर जुन्या पद्धतीने तात्त्विक लेखन करण्यास महत्त्व राहिले नाही. अशा प्रकारच्या लेखनासाठी आजवर वापरले जाणारे ओवीबद्ध रचना हे माध्यमही या काळात हळूहळू मागे पडले, कारण अव्वल इंग्रजीच्या प्रारंभकाळापासूनच वैचारिक लेखनासाठी गद्याचा अवलंब करण्याचे प्रमाण झपाट्याने वाढत गेले. जुन्या तत्त्वज्ञानाचे चाहतेही समाजात हळूहळू कमी होऊ लागले. इंग्रजी जाणणाऱ्या अर्वाचीन नवशिक्षितांमध्येही मौनीस्वामींचे कित्येक शिष्य होते, असा त्यांचा गौरव त्यांच्या पुत्राने लिहिलेल्या संस्कृत चरित्रामध्ये केलेला आहे, पण त्याचा अर्थ मर्यादितच घ्यावयास हवा. अशा प्रकारच्या लेखनातील तेज इ. स. १८०० च्या आधीपासूनच मंदावत चालले होते. या कालखंडात ते अधिकाधिक मंद होत गेले आणि इंग्रजी विद्या व गद्यलेखनाची वाढती प्रथा या दोहोंच्या जोरदार आक्रमणामुळे इ. स. १८६० च्या सुमारास ते अगदीच लुप्तप्राय झाले. त्यानंतरच्या काळात अशा प्रकारची टीकात्मक व विवेचनपर लेखन पद्यामध्ये प्रवृत्ती केवळ अपवादात्मक राहिली असे आढळून येते.

प्रकरण तेरावे

# उपसंहार

येथवर ज्या वाङ्मयाचा परामर्श आपण घेतला, त्याची फलश्रुती काय याचा विचार अखेरीस साहजिकच क्रमप्राप्त होतो. प्रस्तुत वाङ्मयपरामर्शाच्या प्रास्ताविकात हा विचार करण्याचे स्थान खंडाच्या अखेरीस आहे असे म्हटले होते. त्याला अनुसरून तो विचार आता करावयाचा आहे. या कालखंडातील वाङ्मयाविषयीची अभ्यासकाची वृत्ती विशेष अनुकूलतेची अथवा आदराची नसे. त्या वृत्तीची निदर्शक अशी 'भाषांतर-युग' किंवा 'तमोयुग' अशी नावेही या कालखंडाला देण्यात येत आणि त्याच्या वाट्यास उपेक्षा वा अवहेलनाच आलेली दिसे. ही वृत्ती योग्य नव्हे एवढेही प्रस्तुत वाङ्मयपरामर्शामुळे लक्षात आले, तरी त्याचे उद्दिष्ट साध्य झाले असे म्हणता येईल. प्रस्तुत कालखंडास भाषांतर-युग असे म्हणण्यात येते. हे त्याचे वर्णन साफ चूक आहे असे अर्थातच म्हणता येणार नाही. त्यातील पाठ्य-पुस्तके, आरंभीचा निबंध, आरंभीच्या कथा, संस्कृत नाटकांचे आणि काही इंग्रजी नाटकांचे अनुवाद, चरित्रे, इतिहास इत्यादी वाङ्मय पाहिले, तरी त्याचे भाषांतरस्वरूपाचे अंग किती मोठे आहे याची सहज कल्पना येते. परंतु हे अर्थात संपूर्ण सत्य नव्हे, हेही त्याच वेळी शतपत्रे आणि तदनंतरचे निबंधवाङ्मय, बरीच नाटके आणि कादंबऱ्या, बरेचसे काव्य इत्यादी वाङ्मय लक्षात घेतले असता कळण्यासारखे आहे. यातही अनुकरण बरेच असे हे खरे, तथापि तेवढ्याने ते भाषांतररूप ठरत नाही. असे असूनही वाङ्मयाचे हे युग भाषांतर-युग असे म्हटल्यास त्याविरुद्ध गहजब करण्यासारखे काही

नाही. ‘प्राधान्याने व्यपदेश’ हा न्याय सर्वत्रच प्रभावी ठरतो. तरीही या नामकरणामागे उपेक्षेची अथवा तुच्छतेची भावना असेल, तर मात्र या प्रकाराच्या भावनेस ते युग पात्र नाही, किंबहुना त्यामुळे त्याला अन्याय होईल हे स्पष्ट करणे आवश्यक आहे.

**पायातील बांधकाम**

कोणत्याही वाङ्मयाच्या इतिहासामध्ये वाङ्मयविषयक एक दृष्टिकोण बदलून त्याच्या जागी दुसरा वेगळा दृष्टिकोण प्रभावी व्हावा, आणि त्यामुळे त्या वाङ्मयाचे एकंदर रूपच पालटून जावे असे प्रसंग अधूनमधून येतातच. वाङ्मयविषयक दृष्टिकोण बदलण्यास कारण काही वेळा जीवनविषयक दृष्टिकोणही बदललेला असतो असेही दिसून येते. अशा तऱ्हेचा बदल मराठी वाङ्मयाच्या बाबत गेल्या शतकात येऊन गेला ही गोष्ट आज वाङ्मयाभ्यासकांस मान्य झालेली आहे. याचे वर्णन न. चि. केळकर यांनी ‘नवी दृष्टी, नवी सृष्टी आणि नवी तुष्टी’ या शब्दांनी केले आहे.[1] विशेषतः ललित वाङ्मयाच्या काव्य, कादंबरी आणि नाटक या शाखांच्या संबंधी हे घडून आले असे स्पष्टपणे दिसून येते. नाटकांमध्ये या क्रांतीचे कारक हे अण्णासाहेब किर्लोस्कर, कादंबरीक्षेत्रात हरिभाऊ आपटे, आणि काव्यक्षेत्रात कवि केशवसुत यांची नावे घेण्यात येतात. यांनी १८८० ते १८९० या दशकात ही क्रांती रूढ केली, ही कल्पना आज मान्य झालेली आहे. या दशकाला मराठी वाङ्मयातील क्रांतिकाल असे म्हणता येईल. अशी क्रांती व्हावयास किंवा तिचा कारक असा तद्विषयक दृष्टिकोणामधील बदल व्हावयास एकाएकीच प्रारंभ झाला असे होत नाही. त्या क्रांतीची बरीच पूर्वतयारी व्हावी लागते. ती तयारी होण्यास जो काल खर्ची पडतो, त्याचे स्वरूप झगझगीत, डोळ्यांत भरण्यासारखे असतेच असे नाही. ते भाग्य नवीन वाङ्मयाला लाभते. तथापि आधीच्या तयारीच्या कालातील कार्य झाल्याविना नवीन वाङ्मयाचे आगमन होऊ शकत नाही. पुढील भाग्यशाली काल हा आधीच्या कालाच्या खांद्यावर आरूढ होऊन मोठ्या ऐश्वर्याने येत असला, तरी आधीच्या कालातील श्रम आणि काम खर्ची पडल्याशिवाय हे घडून येत नाही. प्रारंभीच्या प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे या कालातील वाङ्मयसेवक आणि त्यांचे वाङ्मय हे पुढील वाङ्मयप्रासादाच्या पायातील बांधकाम आहे. ते पाहून कोणी मुग्ध वा स्तिमित होत नाही, तथापि त्याची अपरिहार्य अशी आवश्यकता आणि उपकारकता डावलून पुढे जाता येत नाही. प्रस्तुत कालखंडातील वाङ्मयाकडे या दृष्टीने पाहणेच योग्य ठरते; पुढील कालातील नेत्र दिपविणाऱ्या कर्तृत्वाच्या अहंकाराच्या दृष्टीने नव्हे.

**ज्ञानार्जनाचे उत्कट स्फुरण**

या वाङ्मयीन क्रांतीपेक्षा तिच्या आधी आपल्या समाजाच्या जीवनविषयक

---

१. अर्वाचीन मराठी साहित्य. पृ. ५८३ व ५९५

दृष्टिकोणामध्ये झालेला बदल हा कदाचित अधिक महत्त्वाचा म्हणावा लागेल. यात आपला समाज अध्यात्माकडून भौतिकाकडे, पारलौकिकाकडून इहलोकाकडे, अंधश्रद्धेकडून डोळस विवेकाकडे वळला या गोष्टीस विशेष महत्त्व द्यावे लागेल. अठराव्या शतकाच्या अखेरीस आपला समाज हा वैयक्तिक, सामाजिक आणि राजकीय नीतीच्या दृष्टीने अधोगतीच्या ज्या सीमेपर्यंत आला होता, तिची जाणीवसुद्धा आपले राज्य आणि स्वातंत्र्य गेल्यानंतरच आपल्याला होऊ लागली. या स्थितीमधून आपला उद्धार व्हावयाचा असेल, तर हरएक प्रकारचे ज्ञान आपण संपादन केले पहिजे अशी जाणीव या कालात निर्माण झाली. ज्ञानसंपादनाच्या या तीव्र जाणिवेमधून ज्ञानप्रकाश, ज्ञानप्रसारक, विविधज्ञानविस्तार इत्यादी नियतकालिके निघाली. शिक्षित व अर्धशिक्षित अशा दोघांनीही या ज्ञानाचा प्रसार करण्याचा चंग बांधला. ज्ञानाभिवृद्धीविषयी या कालात जी आस्था आणि तळमळ व्यक्त झाली, ती पाहून खरोखर आश्चर्य आणि कौतुक वाटल्यावाचून राहात नाही. विशेषतः या आधीच्या कालखंडाच्या तुलनेने हे फारच जाणवण्यासारखे आहे. ज्याला जे जमेल असे वाटले , त्याने ते लेखननिविष्ट करून संस्कृतमधून अथवा इंग्रजीमधून मराठीमध्ये आणून सोडण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे वाङ्मयाच्या कक्षेत नीटसे बसत नसल्याने प्रस्तुत वाङ्मयेतिहासात ज्याचा उल्लेखही होऊ शकला नाही, असे कितीतरी वाङ्मय या कालखंडामध्ये निर्माण झाले आहे. त्यात स्थलवर्णने आहेत, प्रवासवर्णने आहेत आणि स्थानिक, प्रादेशिक आणि व्यापक देशिक भूगोलग्रंथही आहेत. काही पुस्तके विशिष्ट ज्ञातिविषयक आहेत, काही खेळ वा गृहव्यवस्था यांविषयीची आहेत. कित्येक ग्रंथ युरोपीय व भारतीय वैद्यकाविषयीचे, तर कित्येक शारीर, इंद्रियविज्ञान, ग्रहज्योतिष व फलज्योतिष यांवरील आहेत. याशिवाय पदार्थविज्ञान, रसायन, प्राणिशास्त्र, भूस्तरशास्त्र, शिल्पविज्ञान वा यंत्रविज्ञान यावरील पुस्तकेही तयार झाली होती. धर्म व तत्त्वज्ञान याविषयीची आपली परंपरा जुनीच होती. तेव्हा वेद, पुराणे, धार्मिक आचार, सामान्य नीती आणि राजनीती, गीतातत्त्वज्ञान यांविषयीही लेखन व्हावे यात नवल नव्हते. मुद्रणाची सोय आणि गद्यलेखनाची प्रथा या दोन गोष्टी नव्याने उपलब्ध झाल्याने ज्ञानसंकलनाचे हे कार्य अल्पावधीतच बऱ्याच वेगाने होऊ लागले. ज्यांना लेखनकला साधली होती, त्यांनी आपल्या अभ्यासकक्षेबाहेर जाऊन अनुवादस्वरूपाचे का होईना, ग्रंथलेखन केले. रसिक कवी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह आणि अर्थशास्त्रपरिभाषा हे ग्रंथ लिहिले. यात्रिकक्रमण आणि शालोपयोगी नीतिग्रंथ लिहिणाऱ्या हरि केशवजींनी पदार्थविज्ञानविषयक आणि रसायनशास्त्रविषयक संवाद लिहिले. शतपत्रे लिहिणाऱ्या लोकहितवादींनी लक्ष्मीविज्ञान आणि स्वाध्याय हे ग्रंथ निर्माण केले. बाळशास्त्री जांभेकरांनी तर इतिहास-भूगोल, व्याकरण-शब्दसिद्धी, गणित-ज्योतिष इत्यादी अनेक विषयांवरील पुस्तके लिहिली. कोणी काही अर्थप्राप्ती होईल म्हणून तर कोणी ती होत नसतानाही या ज्ञानयज्ञामध्ये भाग घेतला. ज्ञानप्राप्ती-

विषयीचे हे सामाजिक उत्थान अपूर्वच म्हणावयास हवे.

**गद्याचा नवावतार**

ज्ञानार्जनाच्या या उत्कट स्फुरणाचा एक वाङ्मयीन परिणाम म्हणजे गद्य-लेखनास मिळालेले महत्त्व होय. मागील काळात मराठी वाङ्मयाचा वेष म्हणा वा रूप म्हणा, पद्य हेच प्राधान्याने होते. अगदी गद्यप्राय ओवी घेतली तरी तिच्यावर पद्याची काही बंधने असतच. निदान तीन चरणांचे यमक जुळविण्याचे श्रम घ्यावे लागत. प्रस्तुत कालखंडात पद्याची ही गुलामगिरी जाऊन इष्ट आविष्कारास मोकळे असे क्षेत्र उपलब्ध झाले. 'जें जें आपणास ठावें' ते ते इतरांना सांगून सकल जन 'शहाणे करून सोडावे' ही गोष्ट फार सुलभ होऊन बसली. म्हणून आपल्याजवळचे खरोखर महत्त्वाचे आहे की नाही, ते पूर्वी कोणी सांगितले आहे की नाही, ते सांगण्याचे सामर्थ्य अथवा त्याला आवश्यक असणारी कला आपल्याजवळ आहे की नाही याचाही पुरेसा विचार न करिता कित्येकांनी या कालामध्ये लेखन किंवा ग्रंथनिष्पत्ती केल्याचे दिसून येते. असे असले तरी वाङ्मयाचा गद्य विभाग समृद्ध करण्याचे कार्य या स्फुरणामुळे झाले यात शंका नाही. एवढेच नव्हे तर पद्य आणि गद्य यांचे प्रमाणच या काला-मध्ये अगदी उलटेपालटे झाले. पद्य हे त्या वेळच्या कल्पनेप्रमाणे ज्याला काव्य म्हणता येईल अशा वाङ्मयाकरिताच बहुतांशी योजले जाऊ लागले. किंबहुना ललित वाङ्मयाचे कथा–कादंबरी आणि नाटके हे जे प्रकार, त्यांमध्ये अधिक रचना होऊ लागली, आणि काव्यरचना प्रमाणदृष्ट्याही अल्प होऊ लागली. ललितेतर वाङ्मयाचे क्षेत्र तर गद्यानेच व्यापून टाकले आणि निबंध, चरित्रे, इतिहास यांसारखे नवीन गद्यप्रकारही मराठीला उपलब्ध झाले. मराठी वाङ्मयाच्या पद्यातून गद्यात झालेल्या या परिवर्तनास वेषांतर म्हणा, वा रूपांतर म्हणा, त्यामुळे त्याचा प्राचीनातून अर्वाचीनामध्ये प्रवेश झाला ही गोष्ट विसरता येत नाही. यामुळे एकंदर वाङ्मयातच नव्हे, तर ललित वाङ्मयातही या कालामध्ये काव्याला कमी महत्त्व मिळाले. प्रस्तुत कालातील वाङ्मयासंबंधी जे दोन ग्रंथ आज उपलब्ध आहेत, काव्यविचाराला स्थानही मिळाले नाही हे कदाचित त्याचेच द्योतक असावे.

**वाङ्मयप्रकारांची समृद्धी**

व्यक्तीच्या आत्माविष्कारास हे जे स्वातंत्र्य आणि ही सुकरता लाभली तिचा एक परिणाम म्हणजे गद्य वाङ्मयाच्या निरनिराळ्या प्रकारांचा उद्‌गम आणि त्यांची वेगाने झालेली वाढ हा होय. त्या प्रकारात निबंध हा प्रमुख प्रकार होय. विषय कोणताही असो, सामाजिक सुधारणा वा राजकीय मतप्रतिपादन, नीतिबोध किंवा धर्म-चर्चा, व्याकरण, भाषामीमांसा अथवा वाङ्मयविचार, शास्त्रविज्ञान अगर तत्त्वविज्ञान, किंबहुना व्यक्तिचरित्रे अथवा ऐतिहासिक माहिती यांपैकी काहीही असो, लहान वा मोठ्या निबंधाच्या स्वरूपात तो लोकांपुढे मांडावा अशी प्रथा या कालात रूढ झाली. त्या लेखनातील तर्कशुद्धता, प्रमाणबद्धता अथवा भाषासौंदर्य यांविषयींचा विचार

करण्याचा तो काल नव्हता. पुनरुक्ती अथवा पाल्हाळ यांचीही फिकीर बाळगण्याचे ते दिवस नव्हते. मोकळा, सरळ धोपट आणि कित्येक वेळा उत्कट असा आत्माविष्कार हेच प्रथम त्याचे रूप होते. इतर कोणत्याही वाङ्मयप्रकारापेक्षा याच प्रकाराने एकंदर वाङ्मयीन क्षेत्र अधिक व्यापले होते. या कालखंडाच्या अखेरीअखेरीस चरित्रे आणि इतिहास यांनी आपला स्वतंत्र संसार थाटण्याचा प्रयत्न केला. ललित वाङ्मयात कादंबरी आणि नाटक यांनी तो अधिक ठळकपणे मांडून आपले निराळे अस्तित्व गाजवावयास प्रारंभ केला होता. कथेला इतके स्वातंत्र्य व महत्त्व मिळाले नसले तरी तीही वेगळे अस्तित्व मिळवून राहिली होती. वाङ्मयाचे हे जे विविध ठळक प्रकार त्यांची उपलब्धी हा या कालखंडाचा एक प्रमुख विशेष आहे. त्यामुळे मागील कालखंडापेक्षा त्यास अधिक रूपवैचित्र्य लाभले. रूप या शब्दाचा वाङ्मयप्रकार हा अर्थ घेतल्यास या कालखंडातील वाङ्मयाविषयी ' एतद्धि कर्मसमृद्धम् यत् रूपसमृद्धम् ' असे म्हणता येण्यासारखे आहे.

## गद्याच्या भाषेस लागलेली शिस्त

अव्वल इंग्रजीमधील मराठी गद्याचा हा नवावतार प्रारंभी तरी अगदीच बालबोध होता. शुद्धता, सामर्थ्य आणि सौंदर्य या तीनही दृष्टींनी तिचे रूप बालांना साजेल असेच होते. कारण ' बालानां सुखबोधाय ' त्याची निर्मिती होत होती. या अवस्थेत या गद्याची तुलना एखाद्या सुरवंटासारख्या कीटकाशी सहज करता येत होती. जमिनीवर कशीबशी हालचाल करणाऱ्या या कीटकाचे विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमालेच्या आरंभास मोकळ्या हवेत स्वैर संचार करणाऱ्या मनोवेधक फुलपाखरामध्ये रूपांतर झालेले होते. मराठी गद्याचे आणि त्याच्या भाषेचे हे रूपांतर होण्यास अनेक कारणे झाली. त्यांत सरकारमार्फत आणि मोल्सवर्थ-कँडी या दोन परकीय व्यक्तींच्या द्वारे झालेल्या प्रयत्नास पहिले स्थान द्यावयास हवे. त्यांनी आपल्यास होणाऱ्या विरोधाची आणि मराठी स्वभाषा असणाऱ्या लेखकांच्या त्यांच्यावर होणाऱ्या टीकेची पर्वा न करिता गद्याच्या भाषेला नीटस आणि शुद्ध वळण लावण्याचे कार्य बराच काळपर्यंत सतत चालू ठेवले. मराठी कवितेच्या भाषेला मोरोपंतांच्या हाती जे प्रौढ आणि शुद्ध वळण लाभले होते, त्याचा फायदा अव्वल इंग्रजीतील कवितेला मिळाला. तशी स्थिती मराठी गद्याच्या भाषेची नव्हती. गद्याची भाषा या वेळी असावी तेवढी व्याकरणबद्ध झालेली नव्हती. म्हणून त्या वेळी तिचे पहिले व्याकरण करणाऱ्या पंडितांनाही अडचण वाटली होती. विशेषतः वाक्यरचनेबाबत हे अधिक खरे होते. या बाबतीत इंग्रजी भाषा अधिक शिस्तबद्ध झालेली होती. शब्दयोजनेबाबतही फारशीच्या वर्चस्वापासून तिला बऱ्याच प्रमाणात मुक्त करण्याचे कार्य या दोघांनी केले. पुढे पुढे हे कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित इत्यादी एतद्देशीयांनीही केलेले असले तरी त्याचा पाया आणि शिस्त या दोघांनी घालून दिली हे अमान्य करण्यात अर्थ नाही. कोणत्याही भाषेबाबतचे हे

प्राथमिक पण आवश्यक कार्य मराठीच्या संबंधात शासकीय प्रयत्नांनी घडून आले.

**कोश आणि व्याकरण याविषयीचे कार्य**

या संबंधात झालेल्या दोन महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख या ठिकाणी करणे आवश्यक आहे. त्या घटना म्हणजे मराठी भाषेचे कोश आणि व्याकरण यांची निर्मिती या होत. भाषेला स्थैर्य प्राप्त होण्यास आणि तिचा पद्धतशीर अभ्यास होण्यास तिचे व्याकरण होणे आणि तिचा कोश होणे या दोन गोष्टी अत्यंत आवश्यक आहेत. त्या दृष्टीने गेल्या शतकाच्या तिशी–चाळिशीमध्ये पंडिती कोश आणि मोल्सवर्थ–कोश, आणि दादोबांना माहीत नसलेले पंडिती व्याकरण आणि स्वतः दादोबांचे व्याकरण या ग्रंथानी मराठी भाषेचा आणि तिच्या अभ्यासाचा पायाच घालून दिला ही गोष्ट कोणासही मान्यच करावी लागेल. या कालखंडामध्ये इतर कोणतेही कार्य झाले नसते, तरी या कोश–व्याकरण ग्रंथांनीच विशेषतः मोल्सवर्थचा कोश आणि दादोबांचे व्याकरण या दोन ग्रंथांनी, त्याची बाजू सावरून धरिली गेली असती, इतके या ग्रंथांचे महत्त्व आहे. कोशाबद्दल दादोबांनी स्वतः 'हे मोठे अद्भुत कृत्य मराठी भाषेंत त्या वेळेस झालें' असे आपल्या आत्मचरित्रात म्हटले आहे, ते अगदी यथार्थ आहे. व्याकरणाच्या बाबतीत वयाच्या विशीबाविशीत आपले व्याकरण रचून असेच दुसरे अद्भुत कृत्य दादोबांनी केले असे म्हणावयास हरकत नाही.

**भाषासामर्थ्याची वृद्धी**

पण भाषेस नीटस वळण लागले, तरी तिच्यामध्ये सामर्थ्य येण्यास काही निराळेच कारण प्रभावी ठरते. ते म्हणजे तिचा उपयोग तळमळीने व पोटतिडिकेने करण्याची आवश्यकता हे होय. पाठ्यपुस्तकनिर्मितीच्या मुळाशी हे असण्याचा फारसा संभव नव्हता. त्याकरिता समाज-जीवनात विचारांच्या संघर्षाची स्थाने आणि प्रसंग निर्माण व्हावे लागतात. असा विचार-संघर्ष या काळामध्ये धर्म आणि समाजसुधारणा या दोन क्षेत्रांमध्ये निर्माण झाला होता. खिस्ती मिशनऱ्याचे स्वतःच्या धर्माच्या प्रसाराबाबत इतर प्रयत्नांबरोबर वाङ्मयनिर्मितीच्या क्षेत्रातही कसे प्रयत्न चालू होते, याची कल्पना याच ग्रंथातील 'खिस्ती धर्मप्रचारातून निर्माण झालेले वाङ्मय' या प्रकरणावरून येण्यासारखी आहे. त्यांच्या या प्रयत्नांच्या आघाताला प्रत्याघात करण्याचे कामही अर्थात चालू झाले. खिस्ती धर्मप्रचारात्मक वाङ्मयाला खिस्ती धर्मसंस्थांच्या संघटनेचे जेवढे पाठबळ लाभले होते, तेवढे त्याला विरोध करणाऱ्याच्या वैयक्तिक प्रयत्नांना अर्थातच लाभले नव्हते. तथापि त्यामुळे भाषेला उत्तरे–प्रत्युत्तरे करण्याचे, प्रतिपक्षावर डाव उलटवून मात करण्याचे, मुद्द्यास प्रतिमुद्दा मांडून हिरीरीने मतप्रतिपादन करण्याचे शिक्षण मिळाले हा लाभ काही लहानसहान नव्हता. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या 'विचारलहरी'मधील लेखनावर ते 'हलकट आणि पोरकट' आहे अशा तऱ्हेचा अभिप्राय एरवी मवाळ लेखन करणाऱ्या सौम्यप्रकृती

बाबा पदमनजींनी द्यावा याचा अर्थ हे लेखन चांगलेच बोचक आणि समर्थ असले पाहिजे असा होतो. चिपळूणकरांबरोबर मोरभट दांडेकर, भाऊ महाजन, गंगाधरशास्त्री फडके इत्यादींनी या वाग्युद्धामध्ये भाग घेतला होता. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे तर ते मिशनच होते. ख्रिस्ती धर्माच्या बाजूने विल्सन, नेसबिट, मिचेल, ॲबट इत्यादी साहेबांनी या संघर्षामध्ये भाग घेतला होता. या साहेबांचे बहुतेक सारे लेखन ‘ कुणीतरी शास्त्र्याच्या नजरेखालून गेलेले असे. ’ असे अनेक ‘ शास्त्री ’ या कामामध्ये होते. त्याची नावे ज्ञात नसली तरी आणि स्वधर्माविरुद्ध आणि परधर्माच्या बाजूने हे काम झाले असले तरी त्यांनीही मराठीची सेवाच केली असे समजावे लागते.

## विचारसंघर्षामुळे सामर्थ्यप्राप्ती

पण यापेक्षाही अधिक जबरदस्त असा विचारसंघर्ष हिंदू समाजाच्या अंतरंगामध्ये याच कालामध्ये निर्माण झाला होता. तो म्हणजे समाज-सुधारक आणि सनातनी समाज यांच्यामधील होय जुनी विद्या आणि नवे शिक्षण, स्त्रियांना मिळणारी विषम वागणूक आणि पुरुषांचे हक्क, जातिभेद आणि गुणकर्मानुसारे ठरावयाचे उच्चनीचत्व, स्पृश्यास्पृश्यता आणि व्यक्तीव्यक्तीमधील समता, व्यक्तिस्वातंत्र्य विरुद्ध समाजाची सत्ता यांमधील विरोधाचे स्वरूप या विचारसंघर्षाला प्राप्त झाले होते. यामधून खूपच विचारमंथन झाले, आणि एकंदरीत नवशिक्षित वर्ग आणि नवविचार यांचाच जय होण्याकडे समाजप्रवृत्ती असली, तरी हा जय सुखासुखी मिळाला असे झाले नाही. यातच प्रार्थनासमाजादी धर्मसुधारक पंथांच्या हालचालींची भर पडली होती. लोकहितवादी हे या नवविचाराचे एक युयुत्सू धुरीण म्हणून रानडे–भांडारकरादींच्या पिढीच्या आधीच्या कालात मान्यता पावले होते. त्यांच्या ‘ शतपत्रां’तून आणि त्यानंतरच्या निबंधांतून त्यांनी आपल्या विचारांचा मारा सतत चालविला होता. इ. स. १८४८ पर्यंतच्या पाठ्यपुस्तकी आणि नीतिबोधवादी मिळमिळीत अशा मराठीमध्ये त्यांनी काही वेगळे चैतन्य आणि जोम ओतला होता. या विचारप्रतिपादनात कोठे अतिरेक, कोठे फटकळपणा, क्वचित ग्राम्यता, क्वचित प्रमाद असा भाग असला, तरी ते लेखन एकंदरीत प्रमाथी वाङ्मय होते यात शंका नाही. त्यांच्या काळात त्यांना कोणी यशस्वीपणे प्रत्युत्तर देऊ शकला असे झाले नाही. त्यांच्या या समाजटीकेने मराठी भाषा अधिक सकस आणि प्रभावी झाली.

## लालित्याची जोड

या भाषेला काही डौल, लालित्य आणि सौंदर्य प्राप्त करून दिले ते कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी. कृष्णशास्त्री यांचा संस्कृत काव्याचा आणि भाषेचा अभ्यास त्यांच्या मेघदूताच्या किंवा भामिनीविलासाच्या अनुवादावरून स्पष्टच दिसण्यासारखा होता. परंतु त्या भाषेचा उपयोग त्यांनी आपल्या काळची मराठी ललित आणि तरीही प्रौढ अशी करून घेण्यापुरताच केला. तिचा वरचष्मा त्यांनी मराठीवर होऊ दिला नाही. त्यांच्या समकालीन शास्त्रीमंडळींनी केलेले संस्कृत नाटकांचे अनुवाद पाहिले,

तर संस्कृतच्या दडपणाखाली त्यांची मराठी भाषा काहीशी बेडौल झालेली होती. कृष्णशास्त्री यांच्या मराठीमध्ये एक प्रकारची सहजता आणि तिजबरोबर येणारे लालित्य आहे. त्यांच्या काव्यावरूनच नव्हे, तर 'अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी' अथवा 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' या ललित किंवा शास्त्रीय स्वरूपाच्या गद्य-लेखनावरूनही ही गोष्ट उघड दिसते. आधीच्या साध्यासुध्या किंवा जोमदार परंतु ओबडधोबड मराठीला कृष्णशास्त्री यांनी लालित्य मिळवून दिले, आणि आपल्या चिरंजीवांच्या हाती हे चमकदार आणि धारदार हत्यार सुपूर्त केले. मराठी वाङ्मयाच्या भाषेचा या कालखंडातील आलेख हा असा आहे.

### भावी अवस्थांतराची पूर्वतयारी

भाषेच्या आलेखाकडून वाङ्मयाच्या आलोकाकडे वळल्यास प्रस्तुत कालखंडाचे दोन ठळक भाग पडतात असे दिसून येईल. पहिला स्थूलमानाने १८६० पर्यंतचा आणि दुसरा त्यानंतरचा. पहिल्या भागातील वाङ्मय प्राधान्याने वैचारिक वाङ्मय आहे, अर्थात हा विचार फार मोठा किंवा नवीन, स्वतंत्र होता असे नाही. तो पाठ्य-पुस्तके आणि नीतिबोधपर ग्रंथामधून व्यक्त झाला. त्यापेक्षा महत्त्वाचा असा विचार निबंधाच्या द्वारे व्यक्त झाला हे आपण पाहिलेच आहे. या कालातील वाङ्मयाची ललित बाजू सावरण्याचे काम कथावाङ्मयाने केले आहे. ते अर्थात वाङ्मयाच्या बाल्यावस्थेस साजेल असेच होते, आणि बहुतेक सारे उसने होते. स्वतंत्र उन्मेषास कथेमध्ये वाव असतो ही कल्पनाही बहुधा अस्तित्वात नव्हती. १८६० नंतर मात्र कादंबरी, नाटक आणि काव्य या वाङ्मयाच्या ललित प्रकारांकडे आपले अधिक लक्ष गेले. नाटक-कादंबरीच्या बाबतीत बाल्यातून आपण कौमारावस्थेत पदार्पण केले असे म्हणता येईल. काव्याच्या क्षेत्रात त्याची परंपरा खंडित झालेली नसल्याने, निदान विसरली नसल्याने आपण थोडे अधिक प्रौढ होतो. परंतु तीनही बाबतींत अनुवाद–अनुकरणा-वरच भर होता. या तीन वाङ्मयप्रकारांमध्ये १८८० ते १८९० या दशकात हे अवस्थांतर पाचदहा वर्षांनी १८७४ पुढे गेले असले तरी या पाचदहा वर्षांतील वाङ्मय हे स्वरूपतः प्रस्तुत कालखंडाशीच निगडित झालेले आहे. या कालातील ललित वाङ्मयाच्या निर्मितीला १८५७ मधील विद्यापीठाची स्थापना ही प्रत्यक्षपणे नसली, तरी अप्रत्यक्षपणे कारण झालेली असावी. संस्कृत नाटकांच्या मराठीमधील अनुवादांना विद्यापीठामधील संस्कृत नाटकांचा अभ्यासातील अंतर्भाव अप्रत्यक्षपणे कारणीभूत असावा. काव्यातही मेघदूत, भामिनीविलास, रघुवंश इत्यादी संस्कृत काव्यांचा विद्यापीठीय अभ्यास क्रमातील अंतर्भाव प्रेरक झाला असणे शक्य आहे. बाणाची कादंबरी मराठीमधील सदृश लेखनाचे सामान्यनामच होऊन बसली, आणि तीमधील अद्भुताचे मूळही या मूळ 'कादंबरी' मध्ये असावे. विद्यापीठातील संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास या कालातील ललित वाङ्मयाच्या निर्मितीस प्रेरक झाला असावा. तेवढ्या प्रमाणात इंग्रजी वाङ्मयाचा भाग या प्रेरणेत नसला, तरी मिल्टन, स्कॉट, टेनिसन व

शेक्सपिअर यांच्या काव्य-नाटकांपासून काही प्रमाणात का होईना, स्फूर्ती मिळालेली दिसते. पुढे १८८० ते १८९० या दशकात काव्य, नाटक आणि कादंबरी या तीनही प्रकारांत झालेल्या अवस्थांतराला विद्यापीठामधील संस्कृत आणि इंग्रजी या वाङ्मयांचा अभ्यास कारणीभूत झाला असणे बरेच संभवनीय आहे.

## काव्यक्षेत्रातील अवस्थांतराची बीजे

यांपैकी काव्याचा विचार प्रथमतः करू. आताच उल्लेखिल्याप्रमाणे मराठी कवितेची परंपरा खंडित झालेली नसताही इतर क्षेत्राप्रमाणे येथेही अनुवादाला बरेच महत्त्व मिळाले होते. परशुरामपंत तात्या गोडबोले यांच्या कवित्वाची इमारत संस्कृत नाटकातील पद्यभागाच्या अनुवादावरच उभारलेली दिसते. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मेघदूत आणि त्यांचा विरहिविलाप हाही अनुवाद आहे. राजवाडेकृत ऋतुवर्णन आणि पारखीशास्त्रीकृत षड्ऋतुवर्णन हे कालिदासाच्या ऋतुसंहाराचे अनुकरण होत. तेच कृष्णशास्त्रीच्या अन्योक्तिसंग्रहाविषयी म्हणता येईल. प्राचीन मराठी कवितेच्या संप्रदायात विठोबा अण्णा दप्तरदार, भा. दा. पाळंदे, ना धों. खांडेकर, बापूसाहेब कुरुंदवाडकर, टी. माधवराव इत्यादी मंडळी होती. परंतु इंग्रजी कवितेलाही या अनुकरणात स्थान मिळाले होते. इंग्रजी दीर्घ कवितेच्या अनुवाद अनुकरणात प्रधान आणि कीर्तीकर यांनी भाग घेतला होता तर स्फुट कवितेच्या अनुवादानुकरणास महादेवशास्त्री कोल्हटकर, वि. कों. ओक, वि. मो. महाजनी यांचा भाग होता. काव्याचा मोहरा भक्तिसाधनाकडून ऐहिक विषयांकडे वळविण्याचे काम या कवींनी केले, आणि ओक, कोल्हटकर, महाजनींनी दीर्घ कवितेऐवजी स्फुट विषयांवरील स्फुट रचनेकडे ही कविता नेण्याचा प्रयत्न केला असे दिसते. ओकांच्या ' पुष्पवाटिके '-चे दुसरे वर्णनात्मक नाव 'मराठी **नवीन** कविता' असे आहे. मात्र व्यक्तिनिष्ठ आत्माविष्कारापर्यंत ती प्रस्तुत कालखंडात जाऊ शकली नाही. मध्यंतरी म. मो. कुंटे यांनी प्राचीन मराठी पंडित कवींना Degenerate कवी असे संबोधून रोमँटिक कवितेचा झेंडा फडकावला, परंतु आचारात मिल्टनच्या कवितेचा आदर्श ठेवला आणि रोमँटिसिझम हा भाषेपुरताच व्यक्त झाला. पुढे महाजनींनी इंग्रजी भावकवितेचा अनुवाद करून मराठीमधील भावकवितेची वाट मोकळी करून दिली. काव्यातील आगामी अवस्थांतराची पूर्वतयारी ही अशी आणि एवढी या कालखंडात झाली.

## कादंबरीतील अवस्थांतराची पूर्वतयारी

मराठी कादंबरीला प्रारंभ यमुनापर्यटणापासून ( १८५७ ) झाला असे काहींचे मत असले, तरी तिचे लेखन कादंबरीलेखनाच्या जाणिवेने झाले असावे असे वाटत नाही. विधवांची शोचनीय स्थिती आणि तीमधून पार पडण्यास ख्रिस्ती धर्माचा होणारा उपयोग या गोष्टींचे प्रतिपादन करण्यासाठी अनेक विधवांच्या सत्यकथा एका सूत्रात गोवण्याचा तो प्रयत्न होता. त्या दृष्टीने हळबेशास्त्री यांची मुक्तामाला हीच पहिली मराठी कादंबरी म्हणावी लागेल. कादंबरीक्षेत्रात मात्र अनुवाद कमी, आणि

अनुकरणसुद्धा मूळ पहिल्या कादंबरीचे अशी स्थिती आहे. असे असल्यामुळे तीमध्ये वैचित्र्य फारच कमी आले. कल्पनेला स्वैर सोडून ही कादंबरी लिहिली गेल्याने असंभाव्य गोष्टींचा आणि योगायोगांचा फारच उपयोग तिच्यामध्ये झाला. यातून ती बाहेर पडण्याची स्पष्ट चिन्हे जरी या कालखंडामध्ये दिसून येत नसली, तरी 'मोचनगड' या ऐतिहासिक कादंबरीने (१८७१) आणि 'नारायणराव आणि गोदावरी' या सामाजिक कादंबरीने (१८८४) पुढील अवस्थांतराची चाहूल लागली होती. यावेळच्या रम्याद्‌भुत कादंबरीविरुद्ध का. ब. मराठे यांनी १८७२ सालीच आवाज उठविला होता, आणि कादंबरीच्या अनुरोधाने इष्ट अशा सुधारणाही सुचविल्या होत्या. सामान्य सुबुद्ध वाचकांच्या तक्रारींना त्यांनी वाचा फोडली आणि अखेर १८८५ मध्ये 'मधली स्थिति' या एका अत्यत वास्तववादी कादंबरीने कादंबरीवाङ्मयातील अवस्थांतराचे शिंग फुंकले गेले.

## नाट्यवाङ्मयातील उमेदवारीचा काल

नाट्यवाङ्मयात कादंबरीपेक्षाही अधिक चळवळ झाली. मराठी रंगभूमीला प्रारंभ १८४२ साली विष्णुदास भावे यांनी करून दिला असला, तरी नाट्यवाङ्मयाला प्रारंभ १८५१ साली प्रसिद्ध झालेल्या 'प्रबोध-चंद्रोदय' या संस्कृत वेदान्तपर नाटकाच्या अनुवादाने झाला. आणि १८५७ ते १८७४ पर्यंत संस्कृतमधील उत्तमोत्तम आणि प्रसिद्ध नाटके एकदा किंवा अधिक वेळा मराठीमध्ये अनुवादिली गेली. या अनुवादांनी प्रगत अशा नाट्यलेखनतंत्राचा परिचय आपल्यास झाला, आणि त्याला अनुसरून, परंतु तितके यश न मिळविता २०–२२ पौराणिक नाटके लिहिली गेली. शेक्सपियरच्या दोन नाटकांचा अनुवाद झाला असला तरी त्याचे नाट्यलेखनतंत्र कोणी उचलले होते असे दिसत नाही. पौराणिक नाटकांखेरीज चारपाच ऐतिहासिक नाटके आणि १–२ सामाजिक नाटकेही लिहिली गेली. काही नाटकांवर कादंबरीच्या रम्याद्‌भुततेची छाप पडलेली दिसते. या साऱ्या चळवळींचा परिणाम १८८२ साली मराठी नाट्यांतील नवयुगाचा प्रारंभ करणाऱ्या 'सौभद्र' नाटकाच्या निर्मितीमध्ये झाला.

सारांश, या कालातील ललित वाङ्मयीन निर्मितीचे पर्यवसान पुढील कालखंडातील नवयुगाप्रत नेण्यामध्ये झालेले आहे असे दिसेल. म्हणूनच त्याला नवयुगातील स्वतंत्र मराठी वाङ्मयाच्या पूर्वतयारीचा काल असे म्हटले जाते.

## अल्पावधीत झालेले कार्य

ही तयारी फार झपाट्याने आणि अल्प कालावधीत झाली हा तिचा महत्त्वाचा विशेष आहे. वस्तुतः ती २०–२५ वर्षांतच झाली. पण ती १८१८–१८७४ या कालावधीतच झाली असे म्हणावयास हरकत नाही. वाङ्मयेतिहासात कोश, व्याकरण, पाठ्यपुस्तके, निबंध, कथा, कादंबरी, नाटक, चरित्रे इतिहास इतके वाङ्मयप्रकार एवढ्या थोड्या अवधीत निर्माण होऊन वाटचाल करू लागले ही गोष्ट खरोखर अद्-

भुतच समजावयास पाहिजे. हे अर्थात केवळ स्वाभाविक प्रक्रियेने झाले नाही. दुसऱ्या एका संपन्न अशा वाङ्मयाच्या आधाराने आपण हे करू शकलो. इंग्रज राज्यकर्ते आपल्यावर राज्य करावयास आले, या घटनेमागे काही दैवी योजना असेल किंवा नसेल, त्या घटनेचे राजकीय, धार्मिक व सामाजिक परिणाम इष्ट झाले की नाही याविषयी मतभेद असतील, परंतु मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने ती घटना फार उपकारक ठरली यात शंका नाही. अनेक शतके काही विशिष्ट प्रवृत्तीने निर्माण होत आलेल्या आपल्या वाङ्मयाच्या शरीरात बाहेरील निराळे रक्त मिसळण्याची आवश्यकता होती आणि ते कार्य या परकीय इंग्रजी राजवटीने केले. त्यामुळे त्यामध्ये काही नवीन जोम निर्माण झाला आणि त्याचे सुपरिणाम पुढील कालखंडात निरनिराळ्या रूपांनी व्यक्त होऊ लागले. ते होण्याकरिता प्रस्तुत कालखंड खर्ची पडला. हीच त्याची फलश्रुती आणि हेच त्याचे महत्त्व.

**इतर वाङ्मयांचे दाखले**

आणि हे सारे अपरिहार्यच असते असे वाटते. अमेरिकेमध्ये इ. स. १८५० च्या आधीचे जवळजवळ एक शतक अशा पूर्वतयारीमध्येच गेले होते. त्या वेळच्या अमेरिकन लेखकांबद्दल स्पिलर या वाङ्मयसमालोचकाने जे म्हटले आहे, ते आपल्याकडील प्रस्तुत कालखंडातील लेखकांसंबंधीही खरे आहे असे दिसून येईल. तो म्हणतो, "आपले पहिले पहिले लेखक एकाच वेळी भाबडे, प्रयोगप्रवण, पारंपरिक, अनुकरणशील आणि जादा आत्मवेदी असे होते."[1] आपल्याकडेही हीच स्थिती होती. अमेरिकेत एका शतकाच्या धडपडीनंतर १८५१ च्या सुमारास श्रेष्ठ वाङ्मयीन कृती निर्माण होण्याची पक्वता प्राप्त झाली असेही स्पिलर पुढे म्हणतो.[2] फ्रेंच वाङ्मयात सतराव्या शतकात आपल्यासारखीच परिस्थिती होती असे दिसते. तिचे वर्णन पुढीलप्रमाणे करण्यात आले आहे :— "प्रथम भाषा शुद्ध व्हावयास हवी होती. तशी तीमध्ये विशदताही यावयास पाहिजे होती. श्रेष्ठ दर्जाची कृती पेलण्यास योग्य होण्याइतकी ती समर्थ होणे आवश्यक होते. ज्या वाङ्मयप्रकारांकडे विशेष लक्ष द्यावयास हवे, त्यांची निवड करणे जरूर होते, आणि अशी निवड केल्यावर त्यांचा विकास घडविण्याचे कार्य करावयास पाहिजे होते. इ. स. १६३४ मध्ये फ्रेंच ॲकॅडमी स्थापन होऊन या कार्यास शासकीय आणि राष्ट्रीय नियोजनाचे स्वरूप व शक्ती प्राप्त झाली. त्यामुळे पुढे कार्नेल, रासीन, मोलियर हे आणि त्यानंतर बाल्झॅक, फ्लोबेअर, झोला

---

1. Our earliest men of letters were at once naive, experimental, conformist, self-conscious and imitative.
The Cycle of American Literature, p. 29

2. The time became ready by 1850 for a literary masterwork.
Ibid, p. 76

इत्यादी श्रेष्ठ ग्रंथकार होऊन गेले.[१] त्यांच्यानंतर झालेल्या आगमनाची तयारी आधीच्या शतकभर तरी चाललेली होती. आठराव्या शतकातील जर्मन आणि रशियन या वाङ्मयांची परिस्थितीसुद्धा कमी-अधिक प्रमाणात अशीच होती, म्हणजे असे की येऊ घातलेल्या ऐश्वर्यशाली वाङ्मयीन वैभवाची पूर्वतयारी आधीच्या कालातील वाङ्मय आणि लेखक यांच्याकरवी व्हावी लागे. शुद्ध आणि उच्च वाङ्मयीन मूल्यांच्या पातळीवरून या कालावधीतील वाङ्मयाविषयी विशेष उत्साहाने आणि गौरवाने बोलता येत नाही हे खरे; परंतु एवढ्याने त्या वाङ्मयाचे महत्त्व आणि उपयुक्तता अमान्य करिता येत नाही. प्रस्तुत कालखंडातील वाङ्मयीन कार्याविषयी हेच म्हणावे लागते.

## इतर भारतीय भाषांच्या मानाने लौकर

हे कार्य आपल्याकडे अल्प अवधीत आणि इतर भारतीय भाषांच्या बरेच आधी झाले हे लक्षात ठेवले पाहिजे. ते अल्पावधीत झाल्याचा उल्लेख आधी झालाच आहे. त्याविषयी न्यायमूर्ती रानडे आपल्या समालोचनात म्हणतात —

" केवळ चाळीस वर्षांच्या अल्प अवधीचा विचार केल्यास मात्र या कालात किती काम झालेले होते हे पाहून आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही. विशेषतः या इलाख्यातील ( मुंबई ) भाषाभगिनींचे ( गुजराती, कन्नड आणि सिंधी ) तुलनादृष्ट्या तुटपुंजे वाङ्मय पाहिल्यास ते अधिक जाणवते."[२] ते अल्प अवधीत झाले इतकेच नव्हे, तर इतर भारतीय भाषांच्या ( एक बंगाली सोडून ) पेक्षा हे बरेच आधी, जवळ जवळ पन्नास वर्षे, झाले होते हेही विसरता येत नाही. हिंदी वाङ्मयीन नवयुगाचा प्रारंभ पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस म्हणजे मराठीच्या नंतर पन्नास वर्षांनी झाला असे सांगण्यात येते.[३] कानडीची गोष्टही तशीच आहे.[४] मल्याळी भाषेतही पूर्वतयारीचा

---

1. The language first must be purified, made a fit medium for greater works, the forms to be cultivated must be chosen, and those chosen must be developed.

—Encyclopedia of Literature, Shipley, p. 291.

2. It is only when we look at the short interval of scarce forty years that we feel surprised at the amount of work that had already been done, especially when the comparative poverty of the sister languages of the persidency is taken into account.

—Miscellaneous Writings, p. 11.

3. But it is only with the end of the First World War that we ( Hindi ) really enter the modern age.

—Contemporary Indian Literature, p. 84.

4. It was from 1920 onwards that modern Kannada literature entered on its golden period.

–Contemporary Indian Literature, p. 107,

हा काल १९१५ च्या सुमारास संपला असे समजतात.[1] पंजाबी आणि उडिया भाषांबाबत कदाचित आणखीच अलीकडे यावे लागेल. मुंबईला अधिक दूरदर्शी आणि कळकळीचे राज्यकर्ते लाभले म्हणून त्यामागील योजनाबद्धता आरंभालाच कार्यकारी ठरली म्हणून म्हणा किंवा या योजनेप्रमाणे कामे करणारे लेखक येथे उपलब्ध झाले म्हणून म्हणा, १८३०-पासूनच या पूर्वतयारीला प्रारंभ होऊन १८७४-पर्यंत मराठी भाषा पुष्कळच समर्थ आणि वाङ्मयीन समज बरीच प्रौढ झाली, आणि पुढील दशकातील निबंध-वाङ्मय आणि ललित वाङ्मय आणि ललित वाङ्मयातील नवयुग या गोष्टी शक्य झाल्या. प्रस्तुत कालखंडाच्या वाङ्मयीन फलश्रुतीविषयी विचार करिताना हे सर्व लक्षात घ्यावे लागते.

### अनेकांचे अनेकविध कार्य

या सर्व कार्यामध्ये अनेकांनी अनेक प्रकारांनी भाग घेतला. त्या सर्वांना धन्यवाद दिले पाहिजेत. बाळशास्त्री जांभेकरांनी पाठ्यपुस्तकांची निर्मिती करून त्याला प्रारंभ केला. सदाशिव काशिनाथ छत्रे, हरि केशवजी यांनी त्यांना साथ देऊन सुबोध मराठीची घडण केली. मोल्सवर्थ, कॅंडी आणि त्यांना साहाय्य करणारी पंडित मंडळी यांनी भाषेचे कोश करून मराठीचा शब्दसंग्रह सुनिबद्ध केला. या पंडित मंडळींनी आणि जांभेकर, फडके, दादोबा यांनी ती व्याकरणबद्ध करून दिली. जांभेकर, भाऊ महाजन, मंडलीक प्रभृतींनी नियतकालिकांच्या द्वारे तिचा परिपोष केला. विष्णुशास्त्री पंडित, रा. भि गुजीकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादींनी नियतकालिक वाङ्मयास विचार-प्रौढता प्राप्त करून दिली. माडगावकर, मिसेस फेरार इत्यादींनी तिच्या द्वारे नीतिबोध करून समाजास सुसंस्कृत करण्याचा प्रयत्न केला. त्या समाजाची सुधारणा करण्याच्या पोटतिडिकेने लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित इत्यादींनी ती प्रचारक्षम केली. धर्मप्रचार करण्याच्या किंवा त्या प्रचारास आळा घालण्याच्या निमित्ताने विल्सन, मिचेल, पदमनजी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी इत्यादींनी तिला विवादक्षम बनविली. संस्कृत काव्यनाटकांच्या भाषांतरांच्याद्वारे मराठीला श्रेष्ठ संस्कृत वाङ्मयाचा परिचय गोडबोले, राजवाडे, लेले, पारखी, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादींनी करून दिला. परशुरामपंत तात्यांनी प्राचीन मराठी वाङ्मयातील 'नवनीत' काढून आपल्याजवळच्या ठेव्याचे पुनः स्मरण करून दिले. बजाबा रा. प्रधान, कीर्तिकर, कोल्हटकर, महाजनी यांनी इंग्रजी काव्यनाटकांचा अनुवाद करून इंग्रजीची तोडओळख करून दिली. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी 'सुरस व चमत्कारिक कथा' वाचण्याचा छंद मराठी वाचकवर्गास लावला. हळबे, रिसबूड इत्यादींनी स्वतंत्र कल्पित मनोरंजनात्मक वाङ्मयाचा पायंडा पाडला. वि. ज. कीर्तने यांनी स्वतंत्र

1. This preparatory period (in Malyalam) may be said to have ended with 1915. —Ibid, p. 135

नाट्यरचना करण्याचा धडा घालून दिला. विष्णुदास भावे यांनी मराठी रंगभूमीचा प्रारंभ करून दिला. कुंटे यांनी इंग्रजी धर्तीच्या महाकाव्याची ओझरती ओळख करून देऊन काव्यविषयक बंडखोरीस चालना दिली. दादोबांनी संस्कृत पद्धतीची टीका लिहून दाखविली, तर का. बा. मराठे यांनी नवीन पद्धतीच्या टीकेचा उपक्रम केला. कृष्णशास्त्री राजवाडे, लेले, प्रधान इत्यादींनी जुने संस्कृत काव्यशास्त्र काय आहे याची कल्पना आणून दिली. चरित्रे आणि इतिहास या क्षेत्रांतही चिपळूणकर, ओक, कीर्तने, लोकहितवादी इत्यादींनी मराठीचा प्रवेश करून दिला. शास्त्रीय वाङ्मय मराठीमध्ये आणण्यास जांभेकर, हरि केशवजी, जर्व्हिस, मॅकलेनन, केरूनाना छत्रे, चिपळूणकर यांनी हातभार लावला. सर्वांचा उल्लेख येथे करणे शक्य नाही व आवश्यकही नाही. यांपैकी कित्येकांनी हे काम आपल्या व्यवसायाचा भाग म्हणून केले, तर काहींनी केवळ हौसेखातर केले; कोणी सामाजिक कर्तव्य म्हणून केले, तर कोणी धर्मप्रेमाच्या पोटी केले, कोणास त्यापासून अर्थप्राप्ती झाली, तर कोणी स्वतःच्या पदरास झीज लावून ते केले. लोकहितवादींनी तर आपल्या लेखनावर आपला हक्कही ठेवला नव्हता. या सर्व मंडळींच्या भाषा आणि वाङ्मय यांच्या सेवेबद्दल कृतज्ञता व्यक्त केल्याखेरीज या कालखंडातील वाङ्मयाचा परामर्श पूर्ण होऊ शकत नाही.

# परिशिष्ट

अव्वल इंग्रजीमध्ये जी वाङ्मयनिर्मिती झाली, ती करण्यामध्ये ज्या संस्थांनी विशेष हातभार लावला त्यांचा उल्लेख या खंडामध्ये अनेक ठिकाणी करण्यात आला आहे. अशा विखुरलेल्या उल्लेखांवरून त्यांच्या कार्याची कल्पना नीटशी येत नाही. ती यावी याकरिता त्याची माहिती येथे एकत्रित करून देण्यात आली आहे. तीवरून या संस्थांविषयी आणि त्यांच्या वाङ्मयनिर्मितीमधील कार्याविषयी सलग, संपूर्ण अशी कल्पना वाचकांस येईल अशी आशा आहे.

## १. बॉम्बे नेटिव्ह स्कूलबुक अँड स्कूल सोसायटी

माउंट स्टयुअर्ट एल्फिन्स्टनच्या प्रेरणेने ही संस्था मुंबईत १८२२-मध्ये स्थापित झाली. हिला ‘ मुंबईची हैंदशाळा शाळापुस्तक मंडळी ’ असेही संबोधिले जाई. या ‘ मंडळी ’ ने शिक्षणप्रसाराचे कार्य सुरू केले व त्यासाठी लागणारी शालेय पुस्तके तयार करून छापण्यास प्रारंभ केला. ‘ मंडळी’ला सरकारी मदत मिळवून देण्याच्या कामी एल्फिन्स्टननेच पुढाकार घेतला. तोच या ‘मंडळी’चा पहिला अध्यक्ष होता. शिक्षण-प्रसाराची कल्पना एतद्देशीयांच्या पुढे मांडण्याच्या हेतूने एक सभा होऊन तीत ‘ मंडळी ’ चे उद्देश लोकांना समजावून सांगण्यासाठी एक समिती नेमण्यात आली. या समितीत रघुनाथ कृष्ण जोशी व सदाशिव काशिनाथ छत्रे यांची सभासद म्हणून व व्यंकोबा नाईक यांची नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून नेमणूक झाली. त्याशिवाय मुल्ला फिरोझ, इब्राहिम मखबा, जगन्नाथ शंकरशेट, धाकजी दादाजी वगैरे वजनदार मुंबईकरांचा या ‘ मंडळी’शी संबंध आला. परदेशी लोकांमधून प्रारंभी डॉ. टेलर व

नंतर जॉर्ज जर्विस हा युरोपिअन सेक्रेटरी होता. तत्कालीन शास्त्रीमंडळींचा मराठी भाषेबद्दलचा अनादर व अनास्था, छापील पुस्तकांबद्दलची सर्वसाधारण लोकांच्या मनात असणारी अढी इत्यादी अडचणींना 'मंडळी' ला तोड द्यावे लागले. सर्व अडचणींचा विचार करून त्यांतून मार्ग काढण्यासाठी 'मंडळी'ने एक ग्रंथनिर्माण-समिती नेमली. समितीने 'ग्रंथांचीं भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसाविषयी' चे प्रसिद्धिपत्र (१८२५) प्रकट केले. या पत्रकात वेगवेगळ्या विषयांवरील अनेक इंग्रजी पुस्तकांची यादी देऊन त्या पुस्तकावरून अगर स्वतंत्ररीत्या मराठी भाषेत शालेय पुस्तके तयार व्हावी अशी सूचना दिलेली होती. उपयुक्त पुस्तकांना शंभर ते पाच हजार रुपयांपर्यंत बक्षिसेही देण्याचे ठरले होते.

ठरलेल्या कार्यक्रमानुसार शालोपयोगी पुस्तके भराभर तयार होऊ लागली. जॉर्ज जर्विसला गणितविषयक पुस्तकाबद्दल दहा हजार रुपये, 'बाळमित्र' आणि 'इसाप-नीति' यांबद्दल बापू छत्रे याना पाच हजार रुपये, 'मराठ्यांची बखर' लिहिल्याबद्दल केपन व बाबा साने याना पाच हजार रुपये बक्षिसादाखल मिळाले. ग्रंथलेखनात व्यंकोबा नाईक, सदाशिव काशिनाथ छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, जगन्नाथ-शास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, हरि केशवजी पाठारे वगैरे एतद्देशीयांप्रमाणे जॉर्ज जर्विस, रॉबर्ट मनी, मेनवेअरिंग, डेविड केपन, हेन्री बेल, जॉन मॅक्लेनन, वॉथेन इत्यादी युरोपियन लोकांनीही भाग घेतला. या सर्व लेखकांनी मनोरंजक नीतिकथा-ग्रंथाबरोबरच गणित, व्याकरण, इतिहास, भूगोल, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, शिल्पविद्या, वैद्यक इत्यादी विषयांवर पुस्तके लिहिली. पंडितमंडळाचा कोश हा तर शाळापुस्तकमंडळीतर्फे झालेला या काळातील सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ होय. १८४० -मध्ये वरील संस्थेची पुनर्घटना होऊन तिचे 'बोर्ड ऑफ् एज्युकेशन' बनले, व या बोर्डाने नेमिलेल्या शालेय-पुस्तक-समितीने नव्या अभ्यासक्रमाला उपयुक्त होतील अशी पुस्तके निर्माण करण्याचे ठरविले. या समितीत मेजर कँडी, बाळशास्त्री जांभेकर इत्यादी लोक होते. याच वेळी 'माध्यम-वाद' सुरू झाला. बोर्डाचा अध्यक्ष टॉमस अर्स्किन पेरी हा इंग्रजीचा अभिमानी होता, तर जॉर्ज जर्विस, जेम्स फॅरिश, मेजर विल्किन्सन, जगन्नाथ शंकरशेट वगैरे मंडळी देशी भाषांच्या बाजूला होती. ज्ञानप्रसारार्थ वापरावयाच्या माध्यमावर बोर्डात झालेली चर्चा विचारात घेऊन सरकारने देशी भाषांच्या बाजूने कौल दिला. त्यामुळे.फिरून एकदा सरकारी पाठिंब्याने उपयुक्त इंग्रजी ग्रंथांची मराठी भाषांतरे होऊ लागली. या कामासाठी १८४७-मध्ये मेजर कँडी याची मराठी ट्रान्स्लेटर व रेफरी म्हणून नेमणूक झाली. कँडीने हे काम आमरण केले.

नव्या व्यवस्थेनुसार पुणे येथील पाठशाळेमध्ये भाषांतरकार (Translation Exhibitioners) तयार करणे व त्यांच्याकडून उपयुक्त इंग्रजी ग्रंथांची मराठी भाषांतरे करवून घेणे हे कँडीचे काम होते. परीक्षा घेऊन भाषांतरकार निवडले जात.

अशा प्रकारे पहिल्याच परीक्षेत कृष्णशास्त्री चिपळूणकर हे पहिले आले. नारायणशास्त्री आपटे, महादेवशास्त्री पुराणिक, नरसिंहशास्त्री ओक, विष्णुशास्त्री पंडित, जनार्दन बाळाजी मोडक वगैरे अधिकृत भाषांतरकार कॅंडीच्या देखरेखीखाली भाषांतराच्या कामात गुंतले. या भाषांतरकारांनी व पुणे पाठशाळेतील कृष्णशास्त्री राजवाडे, बाळशास्त्री देव इत्यादी शास्त्र्यांनी इंग्रजी व संस्कृत ग्रंथांची भाषांतरे केली. परशुरामपंत गोडबोले यांच्या मदतीने कॅंडी या सर्व लेखनाची तपासणी करीत असे, व नंतर ते सरकारी खर्चांनी छापले जाई.

१८५५ मध्ये पुनः एकदा शिक्षणविषयक नव्या धोरणानुसारे सर्व सत्ता एका व्यक्तीच्या हाती आली व तो 'डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' या नावाने काम करू लागला. शिक्षण व इतर संबंधित बाबींवर त्याचा अधिकार होता. या विद्याधिकाऱ्यानेसुद्धा मराठी भाषेत ग्रंथनिर्मिती व्हावी म्हणून पुस्तकांच्या काही प्रती विकत घेऊन लेखकांना प्रोत्साहन देण्याचे धोरण ठेवले. या धोरणाचे फळ म्हणूनच संस्कृतमधील महाकाव्ये व नाटके यांची भाषांतरे, कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या 'आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी,' हळब्यांची 'रत्नप्रभा,' रिसबुडांची 'मंजुघोषा,' गुंजीकरांची 'मोचनगड,' जोरवेकरांची 'विचित्रपुरी' यांसारख्या कादंबऱ्या, ब. रा. प्रधान यांची 'दैवसेनी,' म. मो. कुंटे याचा 'राजा शिवाजी,' जोतिबा फुल्यांचा 'पवाडा छत्रपति शिवाजी राजे भोसले यांचा' यांसारखी काव्ये, कोल्हटकरांचा 'अथेल्lो,' स. प. पंडितांची 'विलक्षण न्यायचातुर्य' (Merchant of Venice) व 'शेरास सवाशेर' (Taming of the Shrew) यांसारखी नाटके लिहिली गेली व विद्याखात्याच्या मदतीला ती पात्र ठरून त्यांच्या काही प्रती विद्याखात्याने विकत घेतल्या. कोल्हटकरांच्या 'अथेल्लो' च्या तर एक हजार प्रती घेतल्याचे नमूद आहे. या संदर्भात, जेव्हा प्रथमच शेक्सपियरच्या नाटकांची भाषांतरे करण्याची कल्पना निघाली, तेव्हा ही नाटके भाषांतरित करावी की इकडील वातावरणाला अनुकूल असे बदल त्यांत करावे याविषयी चर्चा झाली (१८६७–६८ चा विद्याखात्याचा वार्षिक अहवाल).

सरकारी मदतीचा हा ओघ केवळ ललित वाङ्मयापुरताच नसून 'मराठी ज्ञानप्रसारक' 'विविधज्ञानविस्तार', 'सर्वसंग्रह', यांसारख्या नियतकालिकांच्याही काही प्रती विद्याखाते विकत घेत असे. तसेच पंडितांच्या तुकाराम–गाथेच्या पहिल्या भागाच्या एक हजार प्रती विद्याखात्याने घेतल्या व दुसऱ्या भागासाठी ९६०० रुपयांची मदत केली.

थोडक्यात, शाळापुस्तकमंडळातर्फे सुरू झालेल्या या ग्रंथनिर्मितीच्या प्रयत्नाचे प्राथमिक स्वरूप जरी शालेय असे होते, तरी हळूहळू ललित–वाङ्मयाकडे विद्याखात्याची दृष्टी वळली व त्यामुळे भाषांतरित आणि स्वतंत्र असे ललित वाङ्मय निर्माण होऊ शकले. ही निर्मिती समाधानकारक नव्हती याची कल्पना विद्याखात्यालाही होती

हे त्याच्या १८६७–६८ च्या अहवालावरून दिसून येते. त्यात पुढीलप्रमाणे शेरा आहेः—

" The Marathi writers are fast getting out of the childish stage, but they have not yet got beyond what might be termed the ' boyish period ' of development. Their works are still characterised by 'slightness ' and want of finish. असे असले तरी त्याच शेऱ्यात पुढील उद्‌गार येतात:— Under all circumstances the state of things is only natural for the present and could hardly have been expected to be otherwise."

## २. ज्ञानचंद्रोदय

इंग्रजी आमदानीच्या सुरुवातीला मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या कर्नल व्हॅन्स केनडी, जेम्स मोल्स्वर्थ, रॉबर्ट मनी वगैरे परकीयांची अशी समजूत होती की मराठी ही केवळ व्यवहाराची भाषा आहे, व तिच्यात गद्य अगर पद्य वाङ्मय मुळीच नाही. त्यांना बखर वाङ्मय अगर ज्ञानेश्वरांपासून मोरोपंतांपर्यंतचे पद्य वाङ्मय यांची फारशी ओळख नव्हती. शाळापुस्तकमंडळाने दिलेल्या उत्तेजनामुळे व्याकरण, कोश आणि शालोपयोगी कथात्मक, शास्त्रीय व ऐतिहासिक इंग्रजी ग्रंथांची भाषांतरे अशासारखे नवे गद्य वाङ्मय निर्माण झाले, परंतु आपले जुने वाङ्मय छापून ते लोकांपुढे आणण्याकडे कोणाचेच लक्ष नव्हते. या वाङ्मयप्रकाशनाला राज्यकर्त्यांचे उत्तेजन नव्हते. नवशिक्षित इंग्रजी शिकण्याच्या मागे लागले होते आणि जुने लोक धार्मिक वाङ्मय मुद्रित होण्यालाच विरुद्ध होते. ग्रंथ छापला की तो ओवळा होतो अशी त्यांची समजूत होती. अशा काळात आपले प्राचीन वाङ्मय छापून प्रसिद्ध करण्याचा पहिला पद्धतशीर प्रयत्न १८४० साली पांडुरंग बापू जोशी पावसकर यानी ' ज्ञानचंद्रोदय ' नावाच्या मासिकाद्वारे केला. हे मासिक गणपत कृष्णाजींच्या शिळा–छापखान्यात छापले जाई. प्रत्येक अंकाची चाळीसपासून अठ्ठेचाळीसपर्यंत पृष्ठे असत व अंकाची किंमत आठ आणे असे. अंकाचे प्रारंभी आतील विषयानुरूप चित्र असे आणि केव्हा आतही प्रसंगानुसार एक वा अधिक चित्रे असत. या मासिकाने काही संस्कृत सुभाषिते व त्यांचे गद्य भाषांतर, विक्रमचरित्र, ज्ञानदेवकृत हरिपाठ, राधाभुजंग, मुक्ताबाईचे अभंग, कृष्णलीलामृत, नलदमयंती–आख्यान, रामजन्माचे श्लोक, सीतास्वयंवर, केकावलि, बाळक्रीडेचे अभंग, सुदामचरित्र वगैरे प्राचीन काव्य प्रसिद्ध केले. ' गीतार्थबोधिनी ' नावाचा अनेक कवींच्या गीतानुवादासह मूळ श्लोक देणारा ग्रंथही या मासिकांतून प्रसिद्ध झाला ( १८४२ ). हे मासिक साडेतीन वर्षे चालले. पहिल्या वर्षी या मासिकाला दोनशेवर आश्रयदाते होते.

## ३. उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा

'Students Literary and Scientific Society' या नावाची एक संस्था मुंबईत १३ जून, १८४८ रोजी प्रो. पॅटन यांच्या अध्यक्षतेखाली स्थापित झाली. प्रारंभीच्या चोवीस सभासदांपैकी आठराजण एलफिन्स्टन विद्यालयाचे विद्यार्थी होते. प्रो. रीड हे या संस्थेचे पहिले चिटणीस होते. या संस्थेच्या 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा' नावाच्या मराठी व गुजराती शाखा याच वर्षी सुरू करण्यात आल्या. मराठी शाखेचे पहिले अध्यक्ष दादोबा पांडुरंग व चिटणीस महादेवशास्त्री कोल्हटकर हे होते. या शाखांच्या द्वारा मराठी व गुजराती या भाषांमध्ये 'ज्ञानप्रसारक' या नावाची मासिके निघत. 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिक एप्रिल १८५० पासून निघू लागले. 'सभे'-च्या एल्फिन्स्टन विद्यालयात बैठका होत. एका गुरुवारी कोणीतरी सभासद शास्त्रीय विषयावर व्याख्यान देई व दुसऱ्या गुरुवारी दोघे सभासद निबंध वाचीत, व त्यावर वादविवाद होई. 'धर्मसंबंधीं व सांप्रतच्या राज्यप्रकरणासंबंधीं सर्वथा निबंध लिहिले जाणार नाहींत व त्या विषयांवर नुसता संवाद देखील होणार नाहीं,' असा 'सभे'चा नियम होता. या नियमाप्रमाणे धर्म व राजकारण सोडून पदार्थविज्ञान, रसायन, आरोग्यशास्त्र, संपत्तिशास्त्र, ज्योतिषशास्त्र, इतिहास, भूगोल, तत्त्वज्ञान, गणितशास्त्र वगैरे विषयांवर निबंध वाचले जात व ते 'मराठी ज्ञानप्रसारका'त प्रसिद्ध होत. बक्षिसांसाठीही विषय देऊन निबंध मागविले जात. या निबंध-लेखकांत व व्याख्यात्यांत केरो लक्ष्मण छत्रे, भास्कर दामोदर पाळंदे, वि. ना. मंडलीक, बाळ भास्कर, नारायण विष्णु, हरि केशवजी, गोविंद नारायण माडगांवकर, डॉ. भाऊ दाजी लाड, लक्ष्मण मोरेश्वर हळबे, विनायक जनार्दन कीर्तने, म. मो. कुंटे, ज. स. गाडगीळ, वा. आ. मोडक, म. गो. रानडे, डॉ. रा. गो. भांडारकर, का. त्र्यं. तेलंग, ना. म. परमानंद, बाळ मंगेश वागळे वगैरे मंडळी होती. वाचलेल्या निबंधापैकी काही पुस्तकरूपाने प्रसिद्ध होत. छत्रे यांची 'पदार्थविज्ञानशास्त्रातील विषयांवर व्याख्याने' माडगांवकर यांची 'उद्‌भिज्जन्य पदार्थ,' 'व्यवहारोपयोगी नाटक,' 'सुलेखनविद्या,' मंडलिक यांचा 'हिंदु लोकांचा मध्यंतरीय अवस्थेविषयीं विचार,' हे ग्रंथ प्रथम निबंध म्हणून 'सभे'पुढे वाचले गेले होते. 'मराठी ज्ञानप्रसारक'मधून कृष्णाजी बापूजी यांचा सोनगावचा वृत्तांत, पाळंदे यांचे विक्रमोर्वशी याचे भाषांतर, पेटकरांचा 'ग्रीस देशाचा इतिहास,' आणि शेक्सपियरच्या नाटकाच्या कथा प्रसिद्ध झाल्या. हे मासिक विद्यार्थ्यांना उपयुक्त असे असल्याने विद्याखाते त्याचे एकशेचोवीस अंक विकत घेऊन ते निरनिराळ्या शाळांतून पाठवीत असे. मेजर कँडी मराठी ट्रान्स्लेटर व रेफरी या भूमिकेतून हे मासिक पाहात असे. व्याकरणाविषयक काही मुद्द्यांवर मेजर कँडी व 'ज्ञान-प्रसारक' कार यांच्यामध्ये वाद झाला होता. सोसायटीतर्फे चालणाऱ्या मुलींच्या शाळांसाठी 'ज्ञानबोधक' नावाची मराठी पुस्तकेही सोसायटीने तयार केली होती. 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा' १८६४ पर्यंत मोठ्या जोमाने काम करीत होती. पण

हळूहळू ती क्षीण होत जाऊन १८९४ मध्ये बंद झाली.

## ४. डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी

कर्नल टी. फ्रेंच व कॅप्टन हार्ट या युरोपियन गृहस्थांच्या प्रोत्साहनाने ही संस्था १८४९-मध्ये मुंबईत स्थापिली गेली. सुरुवातीच्या तेरा सभासदांपैकी दहाजण युरोपियन होते विलोबीनामक सरकारी अधिकारी हा अध्यक्ष व कॅ. हार्ट हा चिटणीस होता. याच संस्थेला ' दक्षिणी भाषेत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी ' असे म्हणत. ' एतद्देशीय लोकांस ग्रंथ वाचायाचा जो तिरस्कार पडून गेला आहे, तो दूर करायास त्यांच्या स्वभाषेत अनेक विषयांवर मनोरंजक आणि ज्ञानोत्पादक असे ग्रंथ तयार करून घ्यावे व अशा उपायांनीं त्यांमध्ये विद्येची अभिरुचि निर्माण करावी ' हा या संस्थेचा उद्देश होता. तसेच ' ग्रंथांची भाषा संप्रदायाला धरून असावी, आंतील लेखाने वाचकाच्या मनाचें रंजन व्हावें, त्यास बोधप्राप्ति व्हावी, काहीं व्यवहारज्ञान मिळावें, सारांश त्या पुस्तकास लोकांकडून मागणी यावी, असे त्याचे अंतरंग सुंदर असावे, ' अशा अटी ' मंडळी'ने घातल्या होत्या. ' तर्जुमासंबंधी कमिटी'मध्ये मेजर कँडी, रे. स्टीव्हन्सन, डॉ. विल्सन इत्यादी लोक होते इतर संस्थांप्रमाणे या संस्थेसाठीही भाषांतरकारांना उपयुक्त असे नियम मे. कँडीने बनवून दिले होते. संस्थेजवळ बडोद्याचे गायकवाड व दक्षिणेतील काही संस्थानिक यांच्या मदतीने व काही वर्गणीदार मिळून सुमारे पंचवीस हजार रुपये जमले. याच रकमेतून माडगांवकराचा ' ऋणनिषेधक बोध ' आणि ' सृष्टींतील चमत्कार,' मॅक्डोनल्डकृत ' गुजराथ देशाचा इतिहास ' व ' नाना फडनवीस यांची बखर, ' हरि केशवजीकृत ' देश-व्यवहार व्यवस्था या शास्त्राचीं मूलतत्त्वे, ' भाटवडेकरांचे ' लोखंडी रस्त्याचे संक्षिप्त वर्णन, ' स. रा. दीक्षित यांचे ' शास्त्रीय ज्ञानदर्शन ' यासारखी भाषांतरित पुस्तके ' मंडळी 'ने छापिली. परंतु हा उत्साह पुढे टिकला नाही व मंडळीचे काम मंदावले. तेव्हा फिरून एकदा १८५९-मध्ये मंडळीचा चिटणीस फ्लिन याने नव्या दमाने कामाला सुरुवात केली. फ्लिन हा हायकोर्टात भाषांतरकार म्हणून काम करीत असल्याने मराठीचे ज्ञान त्याला चांगले होते. याच वेळी रावसाहेब मंडलीक मंडळीच्या व्यवस्थापक मंडळाचे सभासद होते. यावेळी मंडलिकांचा ' एल्फिन्स्टनचा हिंदुस्थानचा इतिहास, ' कृ. भाटवडेकरांचे ' आकाश सौंदर्य ' अशी काही पुस्तके मंडळीतर्फे प्रसिद्ध झाली. पण ती तितकीशी लोकप्रिय ठरली नाहीत व पैसा मात्र गुंतून राहिला. पुनः १८८४-मध्ये या संस्थेचा जीर्णोद्धार करण्याचे ठरले. या प्रयत्नात न्यायमूर्ती रानडे व तत्कालीन विद्याधिकारी चॅटफील्ड हे प्रमुख होते. या पुढील काळात दक्षिणाफंडातील काही पैसा दरवर्षी या संस्थेला मिळून त्यातून काही पुस्तकांना उत्तेजनार्थ बक्षिसे देण्याचे काम ही संस्था करी.

### ५. दक्षिण प्राइझ कमिटी

विद्येला उत्तेजन म्हणून पेशवाईमध्ये वर्षानुवर्षे वाटल्या जाणाऱ्या दक्षिणेचा उपयोग करण्याच्या हेतूने इंग्रज राज्यकर्त्यांनी काही एतद्देशीयांच्या मदतीने जे प्रयत्न केले, त्यांतील एक म्हणजे 'दक्षिणा प्राइझ कमिटी' होय. दक्षिणेच्या पैशातून १८२१-मध्ये स्थापन झालेल्या 'पुणे पाठशाळे'तून संस्कृत भाषेचाच अभ्यास होत होता काही वर्षांनंतर केवळ संस्कृत भाषेच्या अभ्यासावर एवढा पैसा खर्च व्हावा हे इष्ट नव्हे, या गोष्टीची जाणीव लोकहितवादींनी सरकारला करून दिली. त्यामुळे या पैशातून 'उपयुक्त विषयांवर मराठी भाषेत नवे नवे ग्रंथ तयार करवावे, होतकरू ग्रंथकारांस त्यांच्या योग्यतेप्रमाणे बक्षिसे द्यावीं आणि महाराष्ट्रभाषा प्रौढ आणि ऊर्जितदशेस आणावी' या उद्देशाने १८५१-मध्ये 'दक्षिणा प्राइझ कमिटी' स्थापण्यात आली. कमिटी हस्तलिखित पुस्तके मागवीत असे व मान्य होतील त्या पुस्तकांचे सर्वाधिकार विकत घेऊन ती छापीत असे व चांगल्या चांगल्या ग्रंथांना बक्षिसे देत असे. पहिल्या पाच वर्षांत कमिटीकडे नव्याण्णव हस्तलिखिते आली. त्यांतील शेचाळिसांना मान्यता मिळाली पण फक्त आठच छापून झाली. त्यांत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे 'सॉक्रेटिसाचे चरित्र', शंकरशास्त्री गोखले यांचे 'व्यवहार-दर्पण', कृष्णशास्त्री राजवाडे यांचा 'अलंकारविवेक', गणेशशास्त्री लेले यांचा 'कपतान कुकसाहेब यांचे जलपर्यटनाचा वृत्तांत', माडगांवकरांचे 'वृक्षवर्धन', यांसारखी पुस्तके होतीं. पाच वर्षांच्या अवधीत सुमारे सात हजार रुपये छपाई व बक्षिसे म्हणून खर्च झाले. तरी पण कमिटीचे काम फारच धिमेपणाने चालत असल्याबद्दल 'प्रभाकर' कर्त्यांनी तिच्या कार्यपद्धतीवर टीका केली. 'ज्ञानोदय'कारांनी काही सूचना केल्या. कमिटीचे सभासद या नात्याने लोकहितवादींनीही आपले विचार मांडले.

या सर्व टीकेचा व सूचनांचा परिणाम होऊन सरकाने १८६० मध्ये असे ठरविले की कमिटीने स्वतंत्र रीत्या काम न करिता सर्व व्यवहार विद्याधिकाऱ्यामार्फत चालावे. त्यामुळे नव्या व्यवस्थेप्रमाणे मेजर कँडीच्या प्रत्यक्ष देखरेखीखाली कमिटीचे काम सुरू झाले याच वेळी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची कमिटीचे 'सेक्रेटरी आणि रिव्हायझर' म्हणून नेमणूक झाली. कमिटीच्या अन्य सभासदांपैकी रे. मरे मिचेल व डॉ. हॉग यांच्या मदतीने कामाची दिशा ठरविली गेली. कमिटीने शालेय पुस्तकांना प्रोत्साहन देऊ नये, सर्वसाधारण लोकांना उपयुक्त असे, विशेषतः इतिहास, चरित्र, प्रवास, काव्य, नाटक इत्यादी प्रकारचे, वाङ्मय तयार करण्याची काळजी घ्यावी असे ठरले. पुनः एकदा हीच भूमिका घेऊन १८६६ मध्ये विद्याधिकाऱ्याच्या मदतीने कमिटीने निर्णय घेतला की शास्त्रीय विषयांवरील पुस्तके किंवा प्राचीन काव्ये हीपण कमिटीच्या मदतीला पात्र ठरू नयेत. फक्त ललित वाङ्मयालाच मदत व्हावी.

या वेळी कमिटीचे सभासद म्हणून रे. मिचेल, हॉग, बुहलर, कीलहॉर्न, रसेल या परकीयांबरोबर कृ. चिपळूणकर, नानाशास्त्री आपटे, केरोपंत छत्रे, भा. दा. पाळंदे, मोरोबा कान्होबा विजयकर, बा. मं. वागळे, म. गो. रानडे, गोविंदराव भागवत, वि. प. पंडित, विनायक वासुदेव, डॉ. भाऊ दाजी इत्यादी मंडळी होती. मे. कँडी अध्यक्ष म्हणून काम करीत असे.

नव्या धोरणानुसार सुशिक्षितांमधून नवीन लेखक निर्माण व्हावे म्हणून अनेक स्पधा आखण्यात आल्या. शिवाजीमहाराजांवर सुमारे दोन हजार ओळींचे ओवी, अभंग, अनुष्टुभ् यांखेरीज कोणत्याही वृत्तामधील काव्य, तत्कालीन विचारांचा झगडा दाखविणारी कादंबरी, हिंदू धर्मातील सणांवर काव्य, गंगेचे माहात्म्य वर्णन करणारे काव्य असे स्पर्धेचे विषय होते. या स्पर्धेत अनेकांनी भाग घेतला. गंगावर्णनपर काव्ये तर तेरा इतकी आली. या स्पर्धेत गंगेशशास्त्री लेल्यांच्या 'शिवाजी चरित्राला'ला तीनशे रुपये, चिंतामणीपेठकरांच्या गंगावर्णनाला चारशे रुपये, कृष्णशास्त्री राजवाड्यांच्या 'उत्सवप्रकाशा'ला चारशे रुपये, व 'ऋतुवर्णना' स चारशे रुपये, कुंटे यांच्या 'राजा शिवाजी' लाही शभर रुपये अशी पारितोषिके कमिटीने दिली. या प्रयत्नांतूनच प्रधान यांचे 'दैवसेनी', ताटके यांचे 'अकबर–काव्य' यांसारखी काव्ये, रिसबुडाची 'मंजुघोषा', जोरवेकरांची 'विचित्रपुरी', पटवर्धनांची 'हंबीरराव आणि पुतळाबाई', योगी यांची 'प्रेमबंधन', दामले यांची 'अवलिया' अशासारख्या कादंबऱ्या, राजवाड्यांचे 'विक्रमोर्वशी', पं. गोडबोल्यांची 'पार्वतीपरिणय' व 'वेणीसंहार', नातू यांचे 'विजयशिग' इत्यादी नाटके दक्षिणा-प्राइझ कमिटीच्या बक्षिसांना पात्र ठरली. नाटक–कादंबऱ्यांप्रमाणे वाङ्मयीन चर्चा करणाऱ्या मराठे यांच्या 'नावल व नाटक' या निबंधालाही शंभर रुपयांचे बक्षीस मिळाले. त्याप्रमाणेच राजवाड्यांचे 'अलंकारविवेक', बाबा पदमनजींचा 'शब्दकोश', माडगांवकरांचे 'मुंबईचे वर्णन' हे ग्रंथही बक्षिसास पात्र ठरले.

सरकारी विद्याखाते आणि दक्षिणा प्राइझ कमिटी यांच्यामध्ये मे. कँडी हा जणू दुवाच होता. कँडी दक्षिणा प्राइझ कमिटीचा अनेक वर्षे अध्यक्ष होता. या दोन्ही संस्थांमार्फत जास्तीत जास्त वाङ्मयनिर्मिती व्हावी असे त्याचे प्रयत्न होते व त्याप्रमाणे त्याच्या हयातीत हे काम सतत चालू राहिले.

## ६. सर्वसंग्रह

'ज्ञानचंद्रोदया' ने प्राचीन मराठी वाङ्मयाकडे लोकांचे लक्ष वेधले, परशुरामपंततात्या गोडबोले यांनी आपल्या 'नवनीता' च्या द्वारे ते लोकप्रिय केले. पण प्राचीन मराठी काव्यप्रकाशनाचे खरे भरीव कार्य माधव चंद्रोबा डुकले यांनी केले. त्यांनी १८६० मध्ये केवळ जुन्या मराठी-काव्य-प्रकाशनासाठी 'सर्वसंग्रह' नावाचे मासिक सुरू केले. 'सर्वसंग्रहा' च्या पहिल्या वर्षाच्या प्रस्तावनेत ते लिहितात: " या महाराष्ट्र देशांत प्राकृत भाषेत कविता करणारे मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर

...इत्यादि पुष्कळ रसिक विद्वान् कवि होऊन गेले. त्यांचे ग्रंथ...फार उत्तम प्रकारचे असतांहि जसे प्रसिद्ध असावे तसे नाहींत...भाषेचे पूर्ण ज्ञान त्या भाषेच्या कवितेच्या पूर्ण ज्ञानाखेरीज होणे अशक्य. भाषा सुधारण्याचे हे एक मुख्य व मोठें साधनच होय. असें असतां आपल्या अशा उत्तम ग्रंथांचा बहुधा लोप झाला आणि बाकीच्यांचीही तीच गति होणारसे स्पष्ट दिसून येते, हे किती दुःखकारक आहे! या कारणास्तव हे 'सर्वसंग्रह' नांवाचे मासिक पुस्तक काढण्याचे योजिलें आहे.' 'सर्वसंग्रहा'च्या दर अंकाला ९६ पृष्ठे असत व त्याची किमत आठ आणे होती. दर महिन्याला निरनिराळ्या कवींच्या कवितेचा थोडा थोडा भाग दिला जाई, परंतु त्याची रचना अशी योजिली होती की, स्वतंत्र पृष्ठांकांमुळे प्रत्येक कवीच्या काव्याचे स्वतंत्र पुस्तक बांधता यावे. प्राचीन काव्य समजण्यास कठीण म्हणून त्याची पदे पाडून दुर्बोध शब्दांचे अर्थ पृष्ठांचे खाली टीपा म्हणून दिले जात. तसेच विरामचिन्हांचाही प्रथमच पद्यवाङ्मयात उपयोग करण्यात आला. माधव चंद्रोबा स्वतः व्यासंगी होतेच व शिवाय या कामी जरूर तेथे त्यांनी परशुरामपंततात्या गोडबोले यांचेही साह्य घेतले होते.

या मासिकाच्या चोवीस प्रती विद्याखाते घेत असे. पण ही मदत फारच अपुरी होती. हे मासिक सात-आठ वर्षे चालून पुढे बंद पडले. 'सर्वसंग्रहा' तून खालील कवींची कविता प्रसिद्ध झाली:—

(१) मोरोपंतकृत आर्या–(भारत), श्रीमद्‌भागवत, ब्रह्मोत्तरखंड, हरिवंश बृहद्दशम (उत्तरार्ध), मंत्ररामायण, नलाख्यान, रामायणे (चार भाग), (२) तुकारामकृत अभंग (पाच भाग), (३) वामन पंडितकृत श्लोक, (चार भाग), (४) सर्वसंग्रह म्हणजे अनेक कविता (पाच भाग), (५) रामदासकृत अभंग, (६) नामदेवकृत अभंग, (७) मुक्तेश्वरकृत आदि, सभा, विराट ही पर्वे, (८) मुक्तेश्वर-कृत कौतूहलनाटक रामायण, (९) शुभानंदकृत भीष्मपर्व, (१०) एकनाथकृत आत्मसुख, (११) पंचतत्त्व, (१२) वेदांतसूर्य इत्यादी.

## ७. मिशनरी संस्था

महाराष्ट्रावर इंग्रजांचा अंमल सुरू होण्याच्याही आधीपासून जे मिशनरी महाराष्ट्रात आले व स्वधर्मप्रसारार्थ जे अनेक शालोपयोगी व इतर धार्मिक ग्रंथ त्यांनी लिहून प्रसिद्ध केले आणि नियतकालिके काढली, त्यांत 'अमेरिकन मिशन'ची संस्था आणि तिची प्रकाशने प्रमुख होती. अमेरिकेत ब्रॅडफर्ड येथे काही कॉलेज विद्यार्थ्यांनी सॅम्युअल मिलच्या नेतृत्वाखाली आशिया खंडातील लोकांना 'नैतिक अंधःकारांतून बाहेर काढण्यासाठीं' १८०६ पासून प्रयत्न सुरू केले होते. या प्रयत्नांतूनच १८१० मध्ये 'अमेरिकन बोर्ड' स्थापन झाले. त्यामार्फत गॉर्डन हॉल व सॅम्युअल नॉट हे दोघे अमेरिकन मिशनरी मुंबईला आले व त्यांनी १८१३ मध्ये मुंबईला 'अमेरिकन मिशन'ची स्थापना केली व अमेरिकन मिशन प्रेस सुरू केला. 'खऱ्या धर्मा'ची शिकवण

हिंदू लोकांना देण्यासाठी बायबलचे मराठी भाषांतर होणे जरूर होते. ते रे. हॉल, न्यूवेल, बार्डवेल, निकोल्स व ग्रेव्ह्ज या पाच मिशनऱ्यांनी मिळून केले व १८२६-मध्ये ते प्रसिद्ध केले. या अगोदर डॉ. कॅरी याने बायबलच्या काही भागांचे भाषांतर १८०५-मध्येच केले होते. परभाषिकांनी मराठी भाषिक परदेशात जाऊन तेथे धर्मप्रसाराचे कार्य करणे थोडेसे कठीणच. परंतु ते या परदेशस्थ मिशनऱ्यांनी केले. धर्मप्रसारार्थ निरनिराळ्या ठिकाणी शाळा काढणे व त्या शाळांमधून खिस्ती धर्माचा प्रचार ज्यांच्यायोगे करिता येईल अशी पुस्तके रचून मुलांच्या मनावर खिस्ती धर्माची महती बिंबविणे हाच एक उत्कृष्ट मार्ग या मिशनऱ्यांसमोर होता, आणि याच हेतूने या मिशनऱ्यांनी खिस्ती धर्माची प्रश्नोत्तररूपाने माहिती करून देण्याच्या पद्धतीचा अवलंब करून काही प्रश्नोत्तरावली (Catechism) तसेच लेकराच्या पोथ्या (Books of Children), 'यिशु खीस्त याचे अवतारकृत्याची बखर' (History of our Lord), 'अन्य देवांची परीक्षा' (Trial of false Gods) इत्यादी पुस्तिका प्रसिद्ध केल्या.

या मिशनऱ्यांपैकी ॲलन ग्रेव्हज, रीड व हार्वे हे तीन मिशनरी अहमदनगर येथे आले व त्यांनी कार्यक्षेत्र निवडले. हळूहळू मंगर, बलेटाइन, बर्जेस, ह्यूम, वाइल्डर, फेअरबँक, हेझन, बुसेल ब्रुस, वगैरे इतर मिशनरी येऊन त्यांनी या भागात धर्मप्रसाराचे काम केले. या प्रत्येकाने 'ईश्वराचा मार्ग शिकविण्याकरिता' मराठीमधून पुस्तके लिहिली. बाराखड्यांपासून ते खगोलविद्या, पदार्थविद्या, भूगोलविद्या, तर्कशास्त्र इत्यादी विषयांवर लिहिलेली ही पुस्तके आहेत. शिवाय, 'धर्माविषयी संवाद, प्रार्थनेचे सामर्थ्य, लेकरांचीं गायने, भजन करण्याची गीते, शास्त्राचा सारांश, ज्ञानाचे मार्ग, देव, मनुष्य, शास्त्र यांविषयीं विचार, कोकराचा चारा,' यांसारखी अनेक छोटी-मोठी पुस्तके या अहमदनगरवासी मिशनऱ्यांनी लिहिली.

या मिशनऱ्यांनी अहमदनगर येथे 'ज्ञानोदय' नावाचे एक त्रैमासिक सन १८४२ मध्ये सुरू केले. पहिले दोन अंक निघाल्यावर ते १८४४ अखेरपर्यंत दर महिन्याला निघे. पुढे ते पाक्षिक झाले. प्रारंभी नगर येथे ते शिळेवर मुद्रित होत असे. पुढे ते मुंबईला छापण्यात येऊ लागले. या नियतकालिकात महत्त्वाचे लेखन इंग्रजी व मराठी भाषांतून होत असे. ज्ञानोदयाचा संस्थापक व पहिला संपादक रे. हेन्री बॅलंटाइन हा होता. "लोकांस खरे ज्ञान दाखवावे, खरे काय आणि खोटे काय याचा शोध करावा, हे लोकास शिकवावें आणि विशेषकरून खिस्ती धर्माचीं प्रमाणें पुढें आणावीं आणि लोकांचे लक्ष त्याजकडे लागू करून त्या धर्माप्रमाणे चालल्याने किती कल्याण होईल हे दाखवावें," अशी 'ज्ञानोदया'ची भूमिका होती. या नियतकालिकामधून सामाजिक व धार्मिक विषयांवर वारंवार वादविवाद होत असत.

अमेरिकन मिशनप्रमाणे स्कॉटिश मिशननेही धर्मप्रसारासाठी मराठी भाषेत अनेक पुस्तके तयार केली. या मिशनचा पहिला मिशनरी डोनाल्ड मिचेल हा १८२३

मध्ये मुंबईत आला. त्यानंतर लागोपाठ क्रॉफर्ड, कूपर, जेम्स मिचेल व स्टीव्हन्सन हे मिशनरी आले. पुढे रॉबर्ट नेस्बिट व जॉन विल्सन हे दोघे या मिशनला येऊन मिळाले. 'उद्धाराचा उपाय', 'ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेचीं प्रमाणे', 'खरें प्रायश्चित्त', 'भगवद्गीतेचे सार', 'हिंदु शास्त्रांत सांगितलेले ब्राह्मणांचे महत्त्व', 'भगवान कसा ओळखावा,' 'पंढरपूरची यात्रा,' 'खंडोबाची गोष्ट,' यांसारखी अनेक धार्मिक पुस्तके या मिशनतर्फे प्रसिद्ध झाली. स्कॉटिश मिशनऱ्यापैकी डॉ. स्टीव्हन्सन, डॉ. जॉन विल्सन व रे. मरे मिचेल यांची कामगिरी मराठी भाषेच्या दृष्टीने महत्त्वाची मानली पाहिजे. डॉ. स्टीव्हन्सनने मराठी व्याकरणाचा सखोल अभ्यास करून मराठी भाषेचे व्याकरण (इंग्रजीमध्ये) १८३३-मध्ये लिहिले. ते लिहिताना त्याने परशुराम-पंततात्या गोडबोले व दाजीशास्त्री शुक्ल यांचे साहाय्य घेतले होते. त्याशिवाय त्याने रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्ये काही निबंध लिहून मराठीतील प्राचीन वाङ्मय, इंग्रजी–मराठी भाषांतील साम्यभेद, शास्त्रीय विचार व्यक्त करण्याची मराठी भाषेची ताकद इत्यादी विषयांवर आपले विचार व्यक्त केले. त्याप्रमाणे डॉ. विल्सनने हिंदु–धर्मग्रंथांचा अभ्यास करून, मोरभट दांडेकरांच्या 'हिंदुधर्मस्थापना' या हिंदुमतप्रतिपादक ग्रंथाला उत्तर म्हणून 'हिंदुधर्माचे पहिले प्रसिद्धिकरण' (१८३२) व प्रत्युत्तर म्हणून 'दुसरें हिंदुधर्मप्रसिद्धिकरण' लिहिले. (१८३५). शिवाय, त्याने १८३० मध्ये 'ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टेटर' नावाचे इंग्रजी नियतकालिक सुरू केले. मोल्स्वर्थच्या मराठी–इंग्रजी कोशाच्या दुसऱ्या आवृत्तीकरिता त्याने लिहिलेला मराठी भाषेसंबंधी विवेचनात्मक निबंध अभ्यासपूर्ण आहे. मुंबई विद्यापीठाच्या अभ्यास-क्रमामधील वरच्या परीक्षांतून मराठी भाषा वगळल्यामुळे मराठी भाषेच्या अभ्यासा-विषयी अनास्था उत्पन्न झाली असल्याचे त्याचे मत होते. रे. मिचेलचे पहिले काम म्हणजे बायबलचे मराठी भाषांतर सुधारण्याचे. मे. कँडीच्या गैरहजेरीत 'पूना कॉलेज' च्या प्रिन्सिपलचे काम मिशनच्या कामात व्यत्यय येईल म्हणून नाकारून 'व्हिजिटर' म्हणून मात्र काम केले. कँडीचे भाषांतरकारावर देखरेख ठेवण्याचे कामही त्याने केले. याशिवाय 'येशु ख्रिस्त माहात्म्य' रचून काही मराठी संतांवर इंग्रजी-मधून लेख लिहिले.

वर उल्लेखिलेल्या दोन मिशनांशिवाय आणखी काही मिशने ख्रिस्ती-धर्म-प्रसाराचे काम करीत होती. नाशिक येथे चर्च मिशनरी सोसायटीचे मिशन १८३२-मध्ये स्थापित झाले. या मिशनच्या वतीने जॉन डिक्सन, रे. विल्यम मिचेल, जॉर्ज कॅंडी, रे. फरार, मिसेस फरार, रे. प्राइस वगैरे मंडळी काम करीत होती. 'दाविदाचीं गीते', 'हेनरी आणि त्याचा संभाळणारा गडी संभू ह्यांची गोष्ट', 'कुटुंबप्रवर्तननीति', 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत', 'बालमोतांतलें शाळेचे वर्णन', इत्यादी अनेक पुस्तके या मिशनतर्फे प्रसिद्ध झाली. ही मिशने जरी वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळे मिशनरी चालवीत होते, तरी त्यांनी लिहिलेली पुस्तके त्या त्या मिशनकडून प्रसिद्ध होत असे

नव्हे. काही पुस्तके त्या त्या मिशनमार्फत प्रसिद्ध झाली. त्याशिवाय मुंबईमध्ये १८२७-साली ' बॉंबे ऑक्झिलियरी रिलिजस ट्रॅक्ट सोसायटी ' या कामासाठी सुरू झाली होती. याच संस्थेचे १८३२-मध्ये ' बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी ' असे नामांतर झाले. या संस्थेच्या पहिल्या वार्षिक अहवालात संस्थेला मदत करणारांची जी यादी दिली आहे, तीत मोल्सवर्थ व कॅंडी यांची नावे आढळतात. तसेच पुस्तकांची भाषिक तपासणी करणाऱ्या मंडळीत या दोघांखेरीज स्टीव्हन्सन, मिचेल, नेस्बिट व विल्सन यांचीही नावे आढळतात. कोणत्याही मिशनची पुस्तके प्रसिद्ध करण्याचे काम ही सोसायटी करीत असे.

या सर्व मिशनऱ्यांनी लिहिलेली मराठी पुस्तके भाषेच्या दृष्टीने आज जरी सदोष व अशुद्ध आढळली, तरी मराठी भाषेत गद्य लेखनाची प्रथा रूढ होण्यास त्यांचा पुष्कळ उपयोग झाला यात शंका नाही.

# सूची

या सूचीत, काही अपवाद वगळता, प्राधान्याने प्रस्तुत कालखंडातील (१८००–१८७४) मराठी ग्रंथ आणि ग्रंथकार यांच्या महत्त्वाच्या आणि उपयुक्त अशा निर्देशांची नोंद केली आहे. किरकोळ व मामुली स्वरूपाचे उल्लेख उपेक्षिले आहेत. लेखकांची परिचित नावेच वर्णानुक्रमाकरिता स्वीकारिली आहेत; जशी भाऊ महाजन, बाबा पदमनजी, हरि केशवजी, विष्णुबुवा ब्रह्मचारी इत्यादी. त्यांची आडनावे घेतलेली नाहीत. च. टी. म्हणजे चरित्रटीप त्यांच्या नोंदीपुढे शेवटी वेगळी निर्देशिली आहे.

वर्णानुक्रमामध्ये 'अ' नंतर 'ॲ', आणि 'आ' नंतर 'ऑ' घेतला आहे. क्ष आणि ज्ञ रूढ पद्धतीप्रमाणे स्वतंत्र वर्ण म्हणून शेवटी धरले आहेत. अक्षरांवरील अनुस्वारक्रम हा त्यापुढील वर्णाच्या अनुरोधाने घेतला आहे.

ग्रंथ–पुस्तके–मासिके–वर्तमानपत्रे इत्यादी वाङ्मयाचे निर्देश अवतरणामध्ये केले आहेत.